

अध्याय १३ ते १७

श्रीगुरु सारवरे महाराज सांप्रदायिक

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी



केसन महाराज सारवरे ब्र.भू. विनायक नारायण जोशी
( सारवरे महाराज )

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय तेरावा

आत्मरूप गणेशु केलिया स्मरण । सकळ विद्यांचें अधिकरण । तेचि वंदूं श्रीचरण । श्रीगुरूंचे ॥ १ ॥ जयांचेनि आठवें । शब्दसृष्टि आंगवें । सारस्वत आघवें । जिव्हेसि ये ॥ २ ॥ वक्तृत्वा गोडपणें । अमृतातें पारुखें म्हणे । रस होती वोळंगणें । अक्षरांसीं ॥ ३ ॥ भावाचें अवतरण । अवतरविती खूण । हाता चढे संपूर्ण । तत्त्वभेद ॥ ४ ॥ श्रीगुरूंचे पाय । जैं हृदय गिंवसूनि ठाय । तैं येवढें भाग्य होय । उन्मेखासी ॥ ५ ॥ ते नमस्कारूनि आतां । जो पितामहाचा पिता । लक्ष्मीयेचा भर्ता । ऐसें म्हणे ॥ ६ ॥

श्रीभगवानुवाच :—

इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते । एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥

तरी पार्था परिसिजे । देह हें क्षेत्र म्हणिजे । जो हें जाणे तो बोलिजे । क्षेत्रज्ञु एथें ॥ ७ ॥

क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्व क्षेत्रेषु भारत । क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥

तरि क्षेत्रज्ञु जो एथें । तो मीचि जाण निरुतें । जो सर्व क्षेत्रांतें । संगोपोनि असे ॥ ८ ॥ क्षेत्र आणि क्षेत्रज्ञातें । जाणणें जें निरुतें । ज्ञान ऐसें तयातें । मानूं आम्ही ॥ ९ ॥

तत्क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत् । स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥

तरि क्षेत्र येणें नांवें । हें शरीर जेणें भावें । म्हणितलें तें आघवें । सांगों आतां ॥ १० ॥ हें क्षेत्र कां म्हणिजे ? । कैसें कें हें उपजे ? । कवणकवणीं वाढविजे ? । विकारीं एथ ॥ ११ ॥ हें औट हात मोटकें ? । कीं केवढें पां केतुकें ? । बरड कीं पिकें ? । कोणाचें हें ? ॥ १२ ॥ इत्यादि सर्व । जे जे याचे भाव । ते बोलिजती सावेव । अवधान देईं ॥ १३ ॥ पैं याचि स्थळाकारणें । श्रुति सदा बोवाणे । तर्कु येणेंचि ठी करणें । तोंडाळु केला ॥ १४ ॥ चाळितां हेंचि बोली । दर्शनें शेवटा आलीं । तेवींचि नाहीं बुझविली । अझुनी द्वंद्वें ॥ १५ ॥ शास्त्रांचिये सोयरिके । विचळिजे येणेंचि एकें । याचेनि एकवंकें । जगासि वादु ॥ १६ ॥ तोंडेंसी तोंडा न पडे । बोला बोलेंसी न घडे । इया युक्ति बडबडें । त्राय जाहली ॥ १७ ॥ नेणों कोणाचें हें स्थळ ।

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय तेरावा

सर्व विद्यांचे आश्रयस्थान व आत्मरूप श्रीगणेशाचें स्मरण करून अर्थात तत् स्वरूपच असणाऱ्या श्रीगुरूंच्या श्रीचरणास वन्दन करूं १. ज्या श्रीगुरूंचें स्मरण केलें असतां सर्व शब्दसृष्टि-स्वाधीन होते [ म्हणजे उचित भावार्थास अर्थभरितरीत्यां-शब्दांकित करून स्पष्ट करण्याचे सामर्थ्य येते ] व सर्व विद्या जिव्हाग्रीं येतात; २. तसेंच भाषणाला इतकें माधुर्य येतें कीं, तें अमृतासही फिकें वा 'पलीकडे सर' म्हणते व तोंडांतून निघणाऱ्या प्रत्येक अक्षरास नवरस अनुकूल सेवक होतात ३. जे शब्द गर्भितार्थरूप अभिप्राय प्रगट करणारे असून आत्मानुभूतींची मार्मिक खूण पटवून देतात आणि ज्यामुळें निरनिराळ्या तत्त्व विचारांतील सूक्ष्म फरक स्पष्ट होऊन-संपूर्ण तत्त्वज्ञान हस्तगत होतें ४. जेव्हां आपले अंतःकरण श्रीगुरूंचे चरण धरून राहते. म्ह. त्यांचे नेहमीं स्मरण ठेवतें तेव्हां उपर्युक्त ज्ञानरूपी भाग्योदय व ज्ञानप्राप्ति होते ५. त्या श्रीगुरुचरणांस वंदम करून श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतातः-ब्रह्मदेवाचा पिता व श्रीलक्ष्मीचा नाथ जे भगवान् श्रीकृष्ण ते असें म्हणतात ६.

**अन्वयार्थ**—**हे कौन्तेय**-हे कुंतिपुत्रा अर्जुना !-**इदं शरीरं**-हें शरीर-**क्षेत्रम् इति**-क्षेत्र आहे असें-**अभिधीयते**-म्हटलें जातें-**यः**-जो-**एतत्**-ह्याला-**वेत्ति**-जाणतो-**तं**-त्याला-**क्षेत्रज्ञः**-क्षेत्रज्ञ-**इति**-असें-**तद्विदः**-क्षेत्रक्षेत्रज्ञवेत्ते-**प्राहुः**-सांगतात १.

पार्था ऐक. या देहाला 'क्षेत्र' असें म्हणतात व जो हें देहरूपी क्षेत्र जाणतो. म्ह. प्रकाशितो त्याला येथें 'क्षेत्रज्ञ' असें म्हणतात ७.

**अन्वयार्थ**--**हे भारत**-हे अर्जुना !-**सर्वक्षेत्रेषु**-सर्व शरीररूपक्षेत्रांतील-**क्षेत्रज्ञं**-क्षेत्रज्ञ-**मां च अपि**-मलाच-मी आहें, असेंहि-**विद्धि**-जाण-**यत्**-जें-**क्षेत्रक्षेत्रज्ञयोः ज्ञानं**-क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें ज्ञान-**तत् ज्ञानं**-तें यथार्थ ज्ञान म्हणून-**मम**-मला-**मतं**-संमत आहे २.

आणि क्षेत्रज्ञ त्याला म्हणतात की, जो सर्व क्षेत्रांचें पालन पोषण करून असतो तो येथें मीच होय, असें पक्के समज. [ हेंच गीता शास्त्रांतील महावाक्य होय ] ८ आणि क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांना जें यथार्थ जाणणें, त्यासच आम्ही खरें 'यथार्थ ज्ञान' असें समजतों ९.

**अन्वयार्थ**—**तत्**-**क्षेत्रं**-तें क्षेत्र-**यत्**-कोणतें-**च**-व **यादृक्**-कोणत्या प्रकारचें-**च**-आणि **यद्विकारि**-कोण-कोणत्या विकारांनीं युक्त असलेलें-**यतः च यत्**-व ज्या कारणाचें जें कार्य आहे-**च**-त्याचप्रमाणें-**यः**-जो क्षेत्रज्ञ **सः**-तो कोण-**च**-व-**यत्प्रभावः**-ज्या प्रभावानें युक्त आहे-**तत्**-तें-**मे**-मजपासून-**समासेन**-संक्षेपतः-**शृणु**-ऐक ३.

तर आतां या शरीराला ज्या अभिप्रायानें 'क्षेत्र' हें नांव दिलें, तो सर्व अभिप्राय आम्ही स्पष्ट सांगतों. १०. म्हणजे त्याला 'क्षेत्र' कां म्हणावें, हें कसें व कोठें उत्पन्न होतें, कोणत्या कोणत्या विकारांनीं हें वाढलें जातें ११. हें क्षेत्र लहान म्हणजे मोजके साडेतीन हातांचेंच आहे, किंवा तें केवढे मोठें व कसलें आहे ? तसेंच हें क्षेत्र-म्ह० जमीन नापीक किंवा पिकाऊ आहे व हे कोणाचें मालकीचें आहे ! १२. इत्यादि जे जे याचे गुणधर्म आहेत, ते यथासांग आम्ही वर्णन करून सांगतों तिकडे तूं लक्ष दे. १३. याच क्षेत्र निर्णयाकरितां श्रुतीची नेहमीं बडबड चालू आहे व तर्कहि याचाच निश्चय करण्याकरितां एकसारखीं वाटाघाट करितो; १४. याच गोष्टीचा खल करतां करतां सहा शास्त्रें थकून हातटेकीस येऊन स्वस्थ बसली आणि म्हणूनच त्यांच्यां-तील मतभेद निवृत्त होऊन अजून ऐक्य झाले नाहीं १५. या क्षेत्राविषयीं सर्व शास्त्रांची नाती मोडली जातात व त्यांचें एकमत स्थापन करण्याकरितां सर्व जगभर शास्त्र-संबंधयुक्त वाटाघाट चालू आहे १६. पण अजून एकमेकांची निर्णयात्मक तोंडे मिळाली-नाहीत व ऐक-मत्यहि झाले नाहीं; म्हणजे निर्णय व प्रतिपादन यांत बराच मतभेद आहे. आणि याच संबंधानें युक्ति लढवितां लढवितां बडबडीची शिकस्त झाली १७. हें क्षेत्र कोणाचें आहे हे अजिबात

परि कैसें अभिलाषाचें बळ । जे घरोघरीं कपाळ । पिटवीत असे ॥ १८ ॥ नास्तिका द्यावया तोंड । वेदांचें गाँढे बंड । तें देखोनि पाखांड । आनचि वांजे ॥ १९ ॥ म्हणती तुम्ही निर्मूळ । लटिकें हें वाग्जोळ । ना म्हणसी तरी पोफळं । घातलें आहे ॥ २० ॥ पाखांडाचे कडे । नागवीं लुंचिती मुंडें । नियोजिलीं'' वितंडें'' । ताळासि येती ॥ २१ ॥ मृत्युबळाचेनि माजें । हें जाईल वीर्णें काजें । तें देखोनियां व्याजें । निघाले योगी ॥ २२ ॥ मृत्यूनी आधाधिलें । तिहीं निरंजन सेविलें । यमनियमांचे केले । मेळावे पुरे ॥ २३ ॥ येणेंचि क्षेत्राभिमानें । राज्य त्यजिलें ईशानें । गुंति जाणोनि स्मशानें । वासु केला ॥ २४ ॥ ऐसिया पैजा महेशा । पांघुरणें दाही दिशा । लांचकरु म्हणौनि कोळ्सा । कामु केला ॥ २५ ॥ पैं सत्यलोकनाथा । वदनें आलीं बळार्था । तरि तो सर्वथा । जाणेचिना ॥ २६ ॥

ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् । ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥

एक म्हणती हें स्थळ । जीवाचेंचि समूळ । मग प्राण हें कूळ । तयाचें एथ ॥ २७ ॥ जया प्राणाचे घरीं । अंगें राबती भाऊ चारी । आणि मना ऐसा आवरी । कुळवाडीकरु ॥ २८ ॥ तयातें इंद्रियबैलांची पेटी । न म्हणे अंवसीं पाहाटीं । विषयक्षेत्रीं आटी । काढी भली ॥ २९ ॥ मग विधीची वाफ चुकवी । आणि अन्यायाचें बीज वाफवी । कुकर्माचा करवी । राबु जरी ॥ ३० ॥ तरी तयाचिसारिखें । असंभड पाप पिके । मग जन्मकोटी दुःखें । भोगी जीवु ॥ ३१ ॥ नातरी विधीचिये वाफे । सत्क्रिया बीज आरोपे । तरी जन्मशताचीं मापें । सुखचि मवीजे ॥ ३२ ॥ तंव आणिक म्हणती हें नव्हे । हें जिवाचेंचि न म्हणावें । आमुतें पुसा आघवें । क्षेत्राचें या ॥ ३३ ॥ अहो जीवु एथ उखिता । वस्तीकरु वाटे जातां । आणि प्राणु हा बलौता । म्हणौनि जागे ॥ ३४ ॥ अनादि हे प्रकृती । सांख्य जियेतें गाती । क्षेत्र हे वृत्ती । तियेचि जाणा ॥ ३५ ॥ आणि इयेतेंचि आघवा । आथी घरमेळावा । म्हणौनि ते वाहिवा । घरीं वाहे ॥ ३६ ॥ वाह्याचिये रहाटी । जे कां मुद्दल तिघे इये सृष्टीं । ते इयेच्याचि पोटीं । जहाले गुण ॥ ३७ ॥ रजोगुण पेरी । तेतुलें सत्त्व सोंकरी । मग एकलें तम करी । संवगणी ॥ ३८ ॥ रचूनि महत्तत्त्वाचें खळें ।

कळत नाहीं, परंतु त्याच्या मीपणाबद्दलची व निर्णयाविषयींच्या अहमहमिकेची काय थोरवी वर्णावी, कीं ज्याच्या योगानें घरोघर याचाच काथ्याकूट केला जातो ! १८. वादविवादानें नास्तिकांचें तोंड बंद करण्याविषयीं वेदाचे प्रचंड बंड आहे म्ह. वेद महान् प्रबळ आहे हें पाहून पाखांड्यांची वेदांविषयीं तिसरी निराळीच बडबड सुरू झाली १९. ते म्हणतातः—अगोदर तुम्ही वेद निर्मूल आहांत. तुम्ही व्यर्थ [ शाब्दिक ] बडबड करणारे आहांत, बरे तुम्ही असें खरे नाहीं म्हणाल तर, तसें सिद्ध करण्याकरितां आम्ही पैजेची—प्रतिज्ञेचीं सुपारी ठेविली आहे २०. पाखांड्यांचे थवेच्या थवे त्यांत कोणी दिगंबर बनतात, तर कोणी मुंडक्यावरील केंस उपटून काढण्याचा लुंचन विधि करतात, तरी त्यांनीं ठरविलेलें सर्व वितंडवाद आपोआप ताळ्यावर येऊन खालीं बसतात २१. हें क्षेत्र मृत्यूच्या सपाट्यांत सांपडून निरर्थक जाईल असें पाहून त्या निमित्तानें क्षेत्र निर्णयार्थ व त्याचें संरक्षणार्थ योगी पुढें सरसावतात २२. जे मृत्यूला भितात, ते योगी एकांतवास करून यमनियमांचे साधनसमुदाय जमवितात २३. याच क्षेत्राचा आपण विचारपूर्वक निर्णय करूं या अभिमानानेच श्रीशंकरांनीं राज्य सोडिलें आणि त्यापासून आपल्यास उपाधि लागू नये, म्हणून ते स्मशानांत वास्तव्य करून राहिले २४. या क्षेत्राचें ज्ञान करून घेणार, अशी प्रतिज्ञा करून शंकरांनीं वनांत राहून दाही दिशा हेंच आपलें पांघरूण असें मानलें व काम हा योगभ्रष्ट करणारा—[ लांचखाऊ—मोह पाडणारा ] असें जाणून त्यास जाळून कोळसा करून टाकिलें; २५. ह्याच गोष्टीचा निश्चय करण्याकरितां ब्रह्मदेवाला असलेलीं जरी चार मुखें जोरावर आली असली तरी त्यालाहि या क्षेत्राची अचूक ओळख पटली नाहीं ती नाहींच २६.

**अन्वयार्थ—ऋषिभिः**—वसिष्ठादि ऋषींनीं—**बहुधा**—अनेक प्रकारांनीं—**गीतं**—गाइलेलें—**विविधैः छन्दोभिः**—नाना प्रकारच्या वेदांनीं—**पृथक्**—[ गीतं ]—अगदीं—विवेकतः गाइलेलें—**च**—आणि **हेतुमद्भिः**—युक्तियुक्त—**विनिश्चितैः**—अत्यंत निश्चित अशा **ब्रह्मसूत्रपदैः**—ब्रह्मसूत्रपदांनीं **एव** [ **बहुधा गीतं** ] अनेक प्रकारें गाइलेलें असें हें आहे ४.

[ येथून क्षेत्रविषयक मतांचा अनुवाद करतात ] कोणी [ जीववादी ] असें म्हणतात कीं, हे सर्व क्षेत्र जीवाच्या सर्वस्वी मालकीचें असून त्याची सर्व व्यवस्था पाहाणारा वहिवाटदार कूळ प्राण हा आहे २७. कारण, ज्या प्राणाच्या घरीं त्यांचे चार भाऊ [ अपान, व्यान, समान व उदान ] हे अंगमेहनतीनें झटणारे आहेत व त्यांच्यावर मनासारखा देखरेखीचा कारभार करणारा अतीव चतुर कारभारी आहे २८. त्या जीवाजवळ पंच ज्ञानेंद्रियें व पंच कर्मेंद्रियें मिळून दहा इंद्रियरूप बैलांचा ताफा—समुदाय असून तो [ प्राण ] रात्र व दिवस कांहीं न म्हणतां शरीरानें चांगली मेहनत करवून घेऊन विषयरूपी शेतांत राब काढतो; २९. मग कर्तव्याची वाफ चुकवून [ विहित कर्माचरणाची संधि दवडून ] व अन्यायाचें बीज पेरून त्याला वाईट कर्माचें खतहि घालतो ३०. तर या योगानें बीजाप्रमाणें अनन्वित, पापरूपी अतिशय पीक येते मग कोट्यावधि जन्मपर्यंत जीव हा दुःखेंच भोगितो ३१. किंवा विधीची वाहित कर्माचरणरूपी योग्य वाफ साधून जर सत्क्रियेचे बीज पेरलें तर मग शतजन्माच्या मापानें म्ह. शतावधि जन्मपर्यंत सुखच मोजतो म्ह० भोगितो एवढे पीक येते ३२. पण कांहीं [ 'प्रकृतिवादी ' सांख्य ] असें म्हणतात कीं, क्षेत्र हे जीवाच्या स्वाधीन आहे हे म्हणणें बरोबर नाहीं, ते जीवाच्यामालकीचें म्हणतां येत नाहीं, ते कोणाच्या स्वाधीन आहे, इत्यादि सर्व कांहीं खुलासा हवा असेल तर आम्हास पुसा ३३. अहो ! जीव हा उपरा वाटसरू असून वाटेने चालत जात असतांना क्षेत्रांत नुसती वस्ती करितो आणि प्राण हा बलुतेदार असल्यामुळें अहोरात्र क्षेत्र संरक्षणार्थ जागा राहतो ३४. ज्या प्रकृतीची अनादिसिद्ध म्हणून सांख्यमतवादी स्तुति करितात, त्या प्रकृतीचीं या क्षेत्रांचें ठिकाणीं वृत्ति म्ह वतन—मालकी आहे असे समजा, ३५. आणि शेतकीस लागणारा सर्व जमाव, बैल, बारदाना त्या प्रकृतीच्या घरचा असल्यामुळें या क्षेत्राची सर्व वहिवाट ती घरींच करते ३६. या क्षेत्राच्या वाहतुकीच्या कामीं मुख्य खटपट करणारें व मूळ कारणीभूत असणारें या सृष्टींत जे मुख्य तीन गुण आहेत, ते तिच्याच पोटीं उत्पन्न झालेले आहेत ३७. त्यांत रजोगुण हा पेरणी करितो, तितके सर्व सत्त्वगुण हा राखतो व मग एकटा तमोगुण सर्व पीक कापणी वा काढणी करून गोळा करितो ३८. नंतर महातत्त्वाचें खळें तयार करून काळ

१ लोभाचें, मीपणाचें. २ डोकेफोड काथ्याकूट केली जाते. ३ मोठे. ४ पाखांडी. ५ बडबडे. ६. शब्दपांडित्य. ७ प्रतिज्ञा, सुपारी. ८ दिगंबरवादी. ९ डोकीचें मुंडण करितात. १० ठरविली. ११ वितंडवादानें. १२ निरर्थक. १३ निमित्तानें. १४ म्याले.

मळी एके काळुगेनि पोळें। तेथ अव्यक्ताची मिळे। सांजै भली ॥३९॥ तंव एकीं मंतिवंतीं। या बोलाचिया खंतीं। म्हाणितलें या झंसी। अर्वाचीना ॥४०॥ हां हो परतत्त्वांआंतु। कें प्रकृतीची मातु। हा क्षेत्र वृत्तांतु। उगेंचि आइका ॥ ४१ ॥ शून्यसेजेशेंालिये। सुलीनंतेचिये तुळिये। निद्रा केली होती बेंळियें। संकल्पें येणें ॥ ४२ ॥ तो अवसांत चेइला। उद्यमीं सदैव भला। म्हणौनि ठेवा जोडला। इच्छात्रशें ॥४३॥ निरांलंबींची वौडी। होती त्रिभुवनायेवढी। हे तयाचिये जोडी रूपा आली ॥४४॥ मग महाभूतांचें एकवाट। सैरां वेंटाळूनि भांट। भूतग्रामांचे आघांट। चिरिले चौंरी ॥ ४५ ॥ यावरी आदी ॥ पांचभूतिकांची मांदी। बांधली प्रंभेदीं। पंचभूतिकीं ॥ ४६ ॥ कर्माकर्मांचे गुंडे। बांध घातले दोहींकडे। नपुंसके बैंरडें। रानें केलीं ॥ ४७ ॥ तेथ येरझारेलागीं। जन्ममृत्यूची सुरंगी। सुहांविली निंलागी। संकल्पें येणें ॥ ४८ ॥ मग अहंकारासि एकलाधी। करूनि जीवितावधी। वहाविलें बुद्धि। चराचर ॥ ४९ ॥ यापरी निराळीं। वाढे संकल्पाची डाहाळी। म्हणौनि तो मुळीं। प्रपंचा यया ॥ ५० ॥ यापरी मत्तमुगुतकीं। तेथ पडिघायिलें आणिकीं। म्हणाति हां हो विवेकीं। कैसें तुम्ही ॥ ५१ ॥ परतत्त्वाचिया गांवीं। संकल्पसेज देखावी। तरी कां पां न मनावी प्रकृति तयाची? ॥ ५२ ॥ परी असो हें नव्हे। तुम्ही या न लगावें। आतांचि हें आघवें। सांगिजैल ॥ ५३ ॥ तरी आकाशीं कवणें। केली मेघाचीं भरणें। अंतरिक्ष तारांगणें। धरी कवण? ॥ ५४ ॥ गगनाचा तडावा। कोणें वेढिला केधवां। पवनु हिंडतु असावा। हें कवणाचें मत? ॥ ५५ ॥ रोमां कवण पेरी। सिंधू कवण भरी। पर्जन्याचिया करी। धारा कवण? ॥ ५६ ॥ तैसें क्षेत्र हें स्वभावें। हे वृत्ती कवणाची नव्हे। हें वाहे तया फावे। येरां तुटे ॥ ५७ ॥ तंव आणिकें एकें। क्षोभें म्हणितलें निकें। तरी भोगिजे एकें। काळें केवीं हें? ॥ ५८ ॥ तरी ययाचा मारु। देखताति आनिवारु। परी स्वमतीं भरु। अभिमानिया ॥ ५९ ॥ हें जाणों मृत्यु रागिटा। सिंहाडयाचा दरकुटा। परी काय कीजे वांजटा। पूरिजंत असे? ॥ ६० ॥ महाकल्पापरौतीं। कव घालूनि अवचितीं। सत्यलोकभद्रजाती। आंगीं वाजे ॥ ६१ ॥ लोकपाल नित्य नवे। दिग्गजांचे मेळावे। स्वर्गींचिये आडवे।

नामक जबरदस्त एकट्या पोळाकडून ती मळणीं घालतें, मग सूक्ष्मसृष्टिरूप अव्यक्ताची चांगली आयतीच संध्याकाळ होतें किंवा रास बनतें ३९. इतक्यांत कित्येक बुद्धीमानांना [संकल्पवाद्यांना] हें बोलणें रुचलें नाहीं म्हणून तें म्हणालें की, "या तुमच्या कल्पना, जाणिवा अगदीं अलीकडल्या, व स्थूल आहेत ! ४०. अहो ! परब्रह्मापुढें या प्रकृतीची काय किंमत ! या क्षेत्राची हकीकत आम्ही सांगतों, ती निवांतपणें ऐका तर खरी ! ४१. शून्य निर्विशेष शय्यागृहांत पूर्ण लीनावस्थारूपी पलंगावरील बिछान्यावर एक बलवान् संकल्प निजला होता ४२. तो आकस्मात् जागा झाला व तो [दैववान् असून] आपल्या नित्याच्या उद्योग-व्यापारांत नेहमीं तत्पर होता, म्हणून त्याला त्याच्या इच्छेनुरूप एक ठेवा मिळाला; ४३. आणि त्या संकल्पाच्या निर्गुण परब्रह्म स्वरूपाच्या केवळ सत्ता-स्फूर्तीच्या आधारानें त्रिभुवनाएवढी बागहि त्याच्याच साह्यामुळें-खटपटीनें प्रमाणगोचरतेस आली आहे ४४. नंतर निरनिराळीं [अपंचीकृत] पंचमहाभूतें ह्याच कोणी पड जमीनी त्या [पंचीकृतरूप] मेहनतीनें एकत्र करून, भूतमात्रांचें जारज, स्वेदज, अंडज व उद्भिज असे चार घाट म्ह० हद्दी किंवा प्रकार रचिलें ४५. नंतर प्रथम पंचमहाभूतांचें निरनिराळे पोटभेद करून बांधे म्ह० भौतिक शरीरें तयार केलीं ४६. त्या घाटांच्या [मनुष्यरूपी] शेताच्या दोन्हीं बाजूंस कर्म व अकर्म यांच्या ताली घातल्या व त्यांमधील निकस, नापीक माळ जमिनीची म्हणजे [पशुपक्ष्यांदिक] हीं सुपीक रानें बनविलीं ४७. नंतर या संकल्पानें निरालंबापासून तों थेट मृत्युलोकांपर्यंत जेथें कोणाचा लाग लागणार नाहीं अशीं जन्ममृत्यूंच्या येरझारा करण्यांकरितां सोपी व कधीं बंद न पडणारीं अशीं भुयारांतून वाट तयार केलीं; ४८. मग संकल्पानें अहंकाराबरोबर जन्मभराचें ऐक्य करून, बुद्धीकडून चराचराची वहिवाट करविली ४९. याप्रमाणें चिदाकाशांत निरालंब स्वरूपीं मूळ संकल्पाची ढाळी वाढल्यामुळें या प्रपंचाला तो संकल्पच मूळ कारण झाला" ५०. याप्रमाणें संकल्पवाद्यांची विचारसरणीरूपी-मतरूपी, मुक्ताफळें ऐकून त्यांस दुसरें जे [स्वभाववादी] होतें त्यांनीं पराभविलें व पुढें होऊन म्हणाले कीं, अहो ! आपण तर चांगलेंच विचारवन्त आहांत. काय हे आपले मत व ही आपली विचारसरणी ! ! ५१. परब्रह्माच्या गावांत जर संकल्पाची शेज म्ह० लीनावस्थान बिऱ्हाड आहे असें मानावयाचें तर मग त्या परब्रह्मस्वरूपीं सांख्यांची प्रकृति कां मानूं नये ? ५२. परंतु हे असो, तुमचे म्हणणें मात्र बरोबर नाहीं. व तुम्हीं या भानगडींत पडून याचे नादीं लागूं नका, हे क्षेत्रक्षेत्रज्ञ निर्णयाचें काय प्रकरण आहे, हे अस्मादिकांकडून सांगण्यांत येईल ५३. तर आकाशांतील ढगांमध्यें पाण्याचा भरणा कोण करतो ? अंतरिक्षांतील चांदण्या खालीं पडू न देतां आवरून असें कोण धारण करतो ? ५४. आकाशाचें छत मध्यें झोल न येऊं देतां जे सारखें ताणलेलें आहे, तें कोणीं व केव्हां उभविलें ? आणि वाऱ्यानें नेहमीं वाहात-हिंडत असावें; हें कोणी ठरविलें आहे ? ५५. अंगावरील जी लव दिसतें तिची पेरणी कोण करतो ! व समुद्र कधींहि आटत नाहीं असें त्यांत पाणी कोण भरतो ? आणि पावसाच्या धारा त्या कोण उत्पन्न करतो ? ५६. या गोष्टी जशा स्वभावसिद्ध आहेत तसेंच क्षेत्र हे स्वभावसिद्ध असून हे कोणाचेंहि मालकीचें असें वतन नाहीं. जो यांत मेहनत मशागत करील त्यांस हे फलद्रूप होईल व जो मेहनत करणार नाहीं. त्यांस फलद्रूप होणार नाहीं" ५७. इतक्यांत दुसरे एक [कालवादी] रागावून आवेशानें म्हणालें कीं, "ठीक आहे ! ! तुम्हीं म्हणतां असें जर खरें आहे, तर मग या क्षेत्रावर एकट्या काळाचीच सत्ता कां असावी ? ५८. तथापि त्या काळाच्या सत्तेचा अनिवार तडाखा आहे, हे पाहतात; तरीपण स्वमताविषयीं अभिनिविष्ट झालेले आहेत तें त्यास न जुमनतां अभिमानास पेटून आपल्याच मतावर भर देऊन त्याचें समर्थन करतात ५९. हें [क्षेत्र म्हणजे] मृत्युरूपी रागीट सिंहाची एक भयकर दरीच आहे असें आम्हांस वाटतें. जर तुम्हीं या क्षेत्राबद्दल व्यर्थ बडबड केलीं, तर त्यास पुरे पडवेल काय ? ते म्हणणें विचारापुढें टिकेल काय ? ६०. हा काळ महाकल्पापलीकडेहि अकस्मात् मिठी घालून ब्रह्मदेवाचें स्थान जो सत्यलोकरूपी हत्ती त्याच्यावरहि या काळाचा चपेट घात वाजतो ६१.

१ काळनामक बैलाकडून. २ जीवाची. ३ रास, ढीग. ४ मायावादी. ५ बुद्धिवानांनीं. ६ तिरस्कारानें. ७ ज्ञान, कल्पना. ८ ब्रह्मापुढें. ९ अव्यक्तरूपी सेजगृहांत, १० शाळा, मंदीर. ११ लयरूपी बिछान्यावर. १२ बलवान्. १३ आकस्मात्. १४ जागा झाला. १५ परब्रम्हींचीं. १६ जमीन, बाग. १७ उद्योगानें, साहाय्यानें, खटपटीनें. १८ ऐक्य, एकीकरण. १९ यथेच्छ, चोहोंकडून. २० भाट, जमीन, पडित जमीन, उखर भूमि. २१ भाग. २२ जारज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज अशी चार प्रकारांनीं सृष्टि पसरली. २३ पंचमहाभूतांचें बंधन, बांधे. २४ वेगवेगळे. २५ नापीक जमीन. २६ भुयार. २७ सुशोभित तयार केलीं. २८ निरालंबापासून वाडीपर्यंत [ मृत्युलोकापर्यंत ].

रिगोनि मोडी ॥ ६२ ॥ येर ययाचेनि अंगवातें । जन्ममृत्यूचिये गर्तें । निर्जिवें होऊनि भ्रमतें । जीवमृगें ॥ ६३ ॥ न्याहाळीं पां केन्हडा । पसरलासे चंवडा । करूनियां माजिवडा । आकारगजु ॥ ६४ ॥ म्हणौनि काळाची सत्ता । हाचि बोलु निरुता । ऐसे वाद पंडुसुता । क्षेत्रालागीं ॥ ६५ ॥ हें बहु उंखिविखी । ऋषीं केली नैमिषीं । पुराणें इयेविषीं । मतपत्रिका ॥ ६६ ॥ अनुष्टुभादि छंदें । प्रबंधीं जे विविधें । तें पत्रावलंबन मदें । करिती अझुनी ॥ ६७ ॥ वेदींचें बृहत्सामसूत्र । जें देखणेपणें प्रवित्र । परी तयाही हें क्षेत्र । नेणवेचि ॥ ६८ ॥ आणीक आणिकींही बहुतीं । महाकवीं हेतुमंतीं । ययालागीं मती । वेंचिलिया ॥ ६९ ॥ परी ऐसें हें एवढें । कीं अमुकेयाचेंचि फुडें । हें कोणाही वरपंडे । होयचिना ॥ ७० ॥ आतां यावरी जैसें । क्षेत्र हें असे । तुज सांगों तैसें । साद्यंतु गा ॥ ७१ ॥

महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च । इंद्रियाणि दशैकं च पञ्च चेन्द्रियगोचराः ॥ ५ ॥
इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः । एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥

तरि महाभूतपंचकु । आणि अहंकारु एकु । बुद्धि अव्यक्त दशकु । इंद्रियांचा ॥ ७२ ॥ मन आणीकही ऐकु । विषयांचा दशकु । सुख दुःख द्वेषु । संघात इच्छा ॥७३॥ आणि चेतना धृती । एवं क्षेत्रव्यक्ती । सांगितली तुजप्रती । आघवीची ॥७४॥ आतां महाभूतें कवणें । कवण विषयो कैसीं करणें । हें वेगळालेपणें । एकैक सांगों ॥७५॥ तरी पृथ्वी आप तेज । वायु व्योम इयें तुज । सांगितलीं बुझ । महाभूतें पांचें ॥ ७६ ॥ आणि जागतिये दशे । स्वप्न लपालें असे । नातरी अंवसे । चंद्र गूढु ॥७७॥ नाना अप्रौढबाळकीं । तारुण्य राहे थोकीं । कां न फुलतां कळिकीं । आमोदु जैसा ॥७८॥ किंबहुना काष्ठीं । वन्हि जेवीं किरीटी । तेवीं प्रकृतीचिया पोटीं । गोप्यु जो[२१] असे ॥७९॥ जैसा ज्वरु धातुगतु । अपथ्याचें मिष पहातु । मग जालिया आंतु-। बाहेरी व्यापी ॥८०॥ तैसी पांचांही गांठीं पडे । जैं देहाकारु उघडे । तैं नाचवी चहूं-कडे । तो अहंकारु गा ॥८१॥ नवल अहंकाराची गोठी । विशेषें[२२] न लगे अज्ञाना पाठीं । सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी ॥८२॥ आतां बुद्धि जे म्हणिजे । ते ऐशिया चिन्हीं जाणिजे । बोलिलें यदुराजें । तें आइकें सांगों ॥ ८३ ॥ तरी कंदर्पाचेनि[२३] बळें । इंद्रियवृत्तीचेनि मेळें[२४] । विभांडूनि[२५] येती पौळे[२६] । विषयांचे

[ हा काळ सिंह ] स्वर्गाच्या अरण्यांत नित्य नवे अष्टलोकपाल व आठ दिशांचे आठ ऐरावत यांचाहि संहार करतो ६२. यांच्या केवळ अंगवायूनें जीवरूप मृग निर्जीव होऊन जन्ममृत्यूंच्या खळग्यांत पडून भ्रमण करीत राहतात ६३. या काळानें हाताचा पंजा केवढा मोठा पसरला आहे तो पहा कीं, यच्चयावत् जगदाकाररूप हाच कोणी एक हत्ती तो यानें आपल्या तळहाताच्या चवड्यांत धरिला आहे ६४. म्हणून सर्व काळाची सत्ता आहे, असेंच म्हणणें खरे आहे याप्रमाणें अर्जुना, या क्षेत्राबद्दल बरेच मतभेद आहेत ६५. असा पुष्कळ ऊहापोहात्मक वादविवाद नैमिषारण्यांत-ऋषींनीं केला आहे याबद्दल आपल्यास पुराणेंहि साक्षीभूत-आधार आहेत ६६. [ वेदांतील ] अनुष्टुभादि छंदांत याबद्दल पुष्कळ चर्चा केली असून, या क्षेत्राविषयीं लोक गर्वानें अद्यापपर्यंत ग्रंथ तयार करीत आहेत ६७. वेदांतील बृहत्सामसूत्र-जें ज्ञानदृष्टीनें अति पवित्र आहे, त्यालाहि हे क्षेत्र म्हणजे काय हें समजलें नाहीं [ कारण, वस्तुतः क्षेत्र म्हणून पदार्थच नाहीं ] ६८. आणखी पुष्कळ दूरदर्शी अशा महाकवींनी या क्षेत्र निर्णयाबद्दल वादविवाद करून आपल्या बुद्धि खर्च केल्या ६९ परंतु हे क्षेत्र असें आहे वा एवढें आहे किंवा हे खरोखर अमक्याच्या मालकीचें खास आहे, हें सांगता येत नाहीं व आजवर याचा उलगडा कोणासहि आकलन होत नाहीं ७०. अरे अर्जुना ! आतां हे क्षेत्र जसें आहे तसे व तेहि-अथपासून इतिपर्यंत तुला मी सांगतों ७१.

**अन्वयार्थ**--**महाभूतानि**-पृथिव्यादि पंच सूक्ष्म भूतें,-**अहंकारः**-त्याचें कारण अहंकार-**बुद्धिः**-त्याचें कारण निश्चयात्मिका बुद्धि,-**अव्यक्तम् एव च**-आणि बुद्धीचें कारण अव्यक्त;-**दश**-[ **च** ] **एकं च इंद्रायाणि** दहा व एक अशी अकरा इंद्रियें-**च पंच इंद्रियगोचराः**-आणि पांच इंद्रियांचें विषय-**इच्छा**-सुखाला कारण झालेल्या पदार्थाला ग्रहण करण्याची इच्छा-**द्वेषः**-प्रतिकूल पदार्थाविषयीं द्वेष-**सुखम्**-अनुकूल असलेले सुख **दुःखम्**-अप्रिय वाटणारें दुःख-**संघातः**-शरीर व इंद्रियें यांचा समुदाय **चेतना**-देहांत व्यक्त झालेली चिदाभासयुक्त अंतःकरणवृत्ति व-**धृतिः**-धैर्य-**एतत् क्षेत्रं**-हें क्षेत्र-शरीर-**समासेन**-संक्षेपतः-**सविकारं**-विकारांसह-**उदाहृतम्**-सांगितलें आहे ५-६.

तर पंचमहाभूतें, एक अहंकार, बुद्धि प्रकृति, पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें मिळून दहा इंद्रियें ७२. आणखी एक मन, ज्ञानेंद्रियांचें पांच व कर्मेंद्रियांचें पांच मिळून असे दहा विषय; सुख, दुःख, द्वेष, संघात, इच्छा ७३. आणि चेतना [ आत्मचैतन्याची सत्ता ] व धृति याप्रमाणें या क्षेत्राची एकूण छत्तीस तत्त्वें आहेत, तीं तुला सर्वच स्पष्ट सांगितलीं ७४. आतां महाभूतें कोणती, विषय कोणते व इंद्रियें कोणती, कशीं हें प्रत्येकाचें वेगळेपणें वर्णन करून क्रमानें एकेक तुला सांगतों ७५. [ **महाभूतानि** ] हें पहा, पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं तुला सांगितलेली पंचमहाभूतें आहेत असें समज ७६. [ **अहंकारः** ] आणि जागृतावस्थेंत जसें स्वप्न लोपलेलें, लीन असतें, किंवा अमावस्येच्या दिवशीं चंद्र जसा [ आपल्या स्वरूपानें ] गुप्त असतो ७७. अथवा लहान बालकामध्यें तारुण्य जसें गुप्त दबलेलें असतें, किंवा फुलाचीं कळी उमलण्यापूर्वी जसा तिच्यांत सुगंध गुप्त रूपानें असतो ७८. फार काय सांगावें ! ! अर्जुना, लाकडांत ज्याप्रमाणें अग्नि गुप्त असतो, त्याप्रमाणें प्रकृतीच्या पोटांत जो गुप्त असतो ७९. ज्याप्रमाणें शरीरांतील धातुगत म्हणजे हाडीज्वर हा प्रगट होण्यासाठीं कुपथ्याचें केवळ निमित्त होण्याची वाट पाहत असतो. व तेच कुपथ्य झाल्याबरोबर तो शरीराला अंतर्बाह्य जसा व्यापून टाकतो ८०. त्याप्रमाणें पंचमहाभूतांची गांठ पडून [ पंचीकरण होऊन ] ज्या वेळीं देहाचा आकार स्पष्ट बनतो, त्या वेळीं त्या देहाला जो चहूंकडे नाचवितो तोच अहंकार होय असें समज ८१. या अहंकाराची अशी कांहीं मौज आहे कीं; तो विशेषेंकरून अज्ञान्याच्या पाठीस लागत नाहीं; पण सज्ञान्याच्या मानगुटीस धरतो आणि त्याला नाना प्रकारच्या संकटांत घालून गोते खावयास लावतो ८२. यदुराज श्रीकृष्ण म्हणतात,-अर्जुना ! ऐक. [ **बुद्धिः** ] आतां बुद्धि जिला म्हणतात ती अशा लक्षणांवरून जाणावी. ती सांगतों ८३. तीव्रेच्छारूप कामाच्या जोरावर इंद्रियें वृत्तींच्या साह्यानें विषयांचे समुदाय जिंकून आणितात ८४.

१. पंजा. २ मध्यें. ३ जगदाकार हत्ती. ४ वादविवाद, भवति न भवति. ५ अभिप्राय, पत्रें. ६ आठ अक्षरांचा चरण, बत्तीस अक्षरांचा छंद. ७ ग्रंथाश्रय. ८ स्पष्ट खरें. ९ मास्र, स्वाधीन. १० प्रकृति. ११ आत्मसत्ता. १२ तत्त्वें. १३ इंद्रियें. १४ आकाश. १५ समज. १६ आमावस्येला. १७ लहान बालकाच्या ठायीं. १८ गुप्त, दबलेले. १९ कळींत. २० वास. २१ अहंकार. २२ विशेषेंकरून. २३ कामाचें. २४ समागमें. ५२ मोडून. २६ टोळ्या समुदाय.

॥ ८४ ॥ तो सुखदुःखांचा नागोवा । जेथ उगोणों लागे जीवा । तेथ दोहींसी बरवा । पाडु जे धरी ॥ ८५ ॥ हें सुख हें दुःख । हें पुण्य हे दोष । कां हें मैळ हें चोख । ऐसें जे निवडी ॥ ८६ ॥ जिये अधमोत्तम सुझे । जिये सानें थोर बुझे । जिया दिठीं पारखिजे । विषो जीवें ॥ ८७ ॥ जे तेजतत्त्वांची आदी । जे सत्त्वगुणाची वृद्धी । जे आतमया जीवाची संधीं । वसवीत असे जे ॥ ८८ ॥ अर्जुना ते गा जाण । बुद्धि तूं संपूर्ण । आतां आइकें वोळखण । अव्यक्ताची ॥ ८९ ॥ पैं सांख्यांचिया सिद्धांतीं । प्रकृती जे महामती । तेचि एथें प्रस्तुतीं । अव्यक्त गा ॥ ९० ॥ आणि सांख्ययोगमतें । प्रकृती परिसविली तूंतें । ऐसी दोहीं परी जेथें । विवंचिली ॥९१॥ तेथ दुंजी जे जीवदशा । तिये नांव वीरेशा । येथें अव्यक्त ऐसा । पर्यावो हा ॥९२ ॥ तऱ्ही पाहालया रजनीं । तारा लोपती गगनीं । कां हारपे अस्तमानीं । भूतक्रिया ॥९३॥ नातरी देहो गेलिया पाठीं । देहादिक किरीटी । उपाधि लपे पोटीं । कृतकर्माच्या ॥ ९४ ॥ कां बीजमुद्रेआंतु । थोके तरु समस्तु । कां वस्त्रपणें तंतु-। दशे राहे ॥९५॥ तैसें सांडूनियां स्थूळधर्म । महाभूतें भूतग्राम । लया जाती सूक्ष्म । होऊनि जेथें ॥९६॥ अर्जुना तया नांवें । अव्यक्त हें जाणावें । आतां आइकें आघवें । इंद्रियभेद ॥९७॥ तरी श्रवण नयन । त्वचा घ्राण रसन । इयें जाणें ज्ञान-। करणें पांचें ॥९८॥ इयें तत्त्वमेळापकीं । सुखदुःखांची उखिविखी । बुद्धि करिते मुखीं । पांचें इहीं ॥९९॥ मग वाचा आणि कर । चरण आणि अधोद्वार । पायु हे प्रकार । पांच आणिक ॥ १०० ॥ कर्मेंद्रियें म्हणिपती । तीं इयें जाणिजती । आइकें कैवल्यपती । सांगतसे ॥ १ ॥ पैं प्राणाची अंतौरी । क्रियाशक्ति जे शरीरीं । तियेची रिगिनिगी[२१] द्वारीं । पांचें इहीं ॥२॥ एवं दाहाही करणें । सांगितलीं देवो म्हणे । परिस आतां फुंडेपणें । मन तें ऐसें ॥ ३ ॥ जें इंद्रियां आणि बुद्धि । माझारिलिये संधीं । रजोगुणाच्या खांदीं । तरळत असे ॥ ४ ॥ नीळिमा अंबरीं । कां मृगतृष्णालहरी । तैसें वायांचि फेरारी । वावो जाहलें ॥ ५ ॥ आणि शुक्रशोणितांचा सांधा । मिळतां पांचांचा बांधा । वायुतत्त्व दशधा । एकचि जाहलें ॥ ६ ॥ मग तिहीं दाहे भागीं । देहधर्माच्या खेवंगीं[३०] । अधिष्ठिलें आंगीं । आपुलाल्या ॥ ७ ॥ तेथ चांचल्य निखळ । एकलें ठेलें निढाळ । म्हणौनि

त्या सुखदुःखाच्या लुटीचा जेव्हां हिशोब म्हणजे साक्षात्कारात्मक भोगांची निवड करावी लागते. तेव्हां जी सुख व दुःख दोहोमधील हे बरे, हे वाईट असा योग्य निवाडा निश्चित करते ८५. हें सुख व हें दुःख, हें पुण्य व हें पाप, हें अशुद्ध व हें शुद्ध असा जी योग्य निवाडा करते ८६. जिच्या योगानें निंद्य, उत्तम हें समजतें, लहानमोठे कळतें व जिच्या दृष्टीनेंच जीवांकडून विषय–परिक्षा केली जाते ८७. जी [ वृत्तिरूप ] ज्ञानतत्त्वाचें मूळ कारण आहे, जी सत्त्वगुणांची वाढती दशा आहे आणि जी आत्मा व [ चिदाभासरूप ] जीव या दोहोंच्या मध्य संधींत राहात असते ८८. अर्जुना ! हेच बुद्धीचे संपूर्ण लक्षण होय व तीच [ **बुद्धि** ] होय असे तूं समज. आतां अव्यक्ताचीं सर्व लक्षणें सांगतों, तीं ऐक ८९. [ **अव्यक्तम् एवच** ] हे महाबुद्धीमंता, सांख्यांच्या सिद्धांतामध्यें जिला 'प्रकृति' अशी संज्ञा आहे, तेच तूं सख्यांच्या विचारांत 'अव्यक्त' आहे असें समज ९०. आणि पूर्वीं जेथे [ सातव्या अध्यायांत श्लो. ४–५ ] सांख्य व योग या मतानुसार प्रकृति तुला ऐकविली तेव्हां परा व अपरा असे दोन प्रकार पुष्कळ विस्तारानें वर्णिले आहेत ९१. त्यांतील दुसरी जी जीवदशा संज्ञक 'प्रकृति' आहे तिलाच हे वीरश्रेष्ठ अर्जुना ! 'अव्यक्त' असें पर्यायानें आम्ही येथें म्हणत आहोंत ९२. रात्र उजाडल्यावर ज्याप्रमाणें नक्षत्रें आकाशांत लीन होतात अथवा सूर्यास्त झाल्यावर प्राणिमात्राच्या व्यवहार–क्रिया थांबल्या जातात ९३. अथवा अर्जुना ! देह नाहींसा झाल्यावर देहापासून वासनेपर्यंत सर्व उपाधी केलेल्या कर्मांच्या पोटांत संस्काररूपानें गुप्त लीन होऊन असतात ९४. किंवा बीजाच्या आकारांत जसा वृक्ष गुप्तरूपानें असतो, अथवा तंतूच्या दशेंत ज्याप्रमाणें वस्त्र-पणा गुप्त रूपानें असतो ९५. त्याप्रमाणें पंच महाभूतें व भूतांचे समुदाय आपला स्थूलधर्म टाकून ज्या ठिकाणीं सूक्ष्म होऊन लय पावतात ९६. तेच अर्जुना ! 'अव्यक्त' असें समज. आतां इंद्रियांचे सर्व प्रकार तुला सांगतों, तें ऐक ९७ [ **इंद्रियाणि दश** ] तर कान, डोळे, त्वचा, नाक व जिव्हा हीं पांच ज्ञानेंद्रियें आहेत, असे समज ९८. या तत्त्वाच्या मेळाव्यामध्यें या पंच ज्ञानेंद्रियांच्याद्वारां बुद्धि ही सुख दुःखाचा विचार वा निवाडा करिते ९९. वाचा, हात, पाय, गुद आणि उपस्थ हे आणखी इंद्रियांचे पांच प्रकार आहेत " १००. श्रीकृष्ण म्हणतात " अर्जुना ! ऐक, ज्यांना 'कर्मेंद्रियें' म्हणतात तीं हींच होत १. क्रियाशक्ति म्हणून जी या शरीरांत वास करिते, ती प्राणाची स्त्री आहे ती त्या पांच कर्मेंद्रियांच्या द्वारानें आंतबाहेर जाण्यायेण्याचा व्यवहार करिते " २. श्रीकृष्ण म्हणतातः–" याप्रमाणें पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें अशीं दहा इंद्रियें तुला सांगितलीं [ **एकं च** ] मन म्हणजे तरी काय, तें तुला स्पष्टपणें सांगतों, तें ऐक ३. जें इंद्रियें आणि बुद्धि या दोहोंच्या सांध्यामध्यें व रजोगुणाच्या खांदीवर [ आश्रयावर ] चंचलतेनें वावरत असतें ४. ज्याप्रमाणें आकाशाचे ठिकाणीं नीलवर्ण अथवा मृगजलाच्या लाटा व्यर्थ भासतात, त्याप्रमाणें जें व्यर्थ भासते. तेंच मन आहे ५. आणि शुक्र व शोणित यांचे ऐक्य झाले असता पंचमहाभूतात्मक आकारवान् हा देह तयार होतो. तेव्हां एकाच वायुतत्त्वाचें [ शरीरांतील ] स्थानभेदानें पांच प्राण व पांच उपप्राण असें दहा प्रकार होतात ६. मग त्या दहा भागांनीं आपापल्या देह धर्माच्या बळानें देहांतील ठराविक अशा एक एक भागाच्या ठिकाणीं आश्रय केला ७.

१ लूट. २ अनुभव, हिशेब देणें. ३ मलिन. ४ समजे. ५ कळे. ६ ज्ञानेंद्रियांची. ७ मूळ. ८ बुद्धिमान अर्जुना. ९ विस्तारानें सांगितली. १० अध्याय ७ श्लोक, ५ यांत सांगितलेली. ११ उजाडल्यावर. १२ प्राणिमात्रांचें व्यापार. १३ बीजाचे आकारांत. १४ थांबून राहतो, असतो. १५ ज्ञानेंद्रियें. १६ विचार, वाटाघाट. १७ उपस्थ. १८ गुदस्थान. १९ श्रीकृष्ण. २० स्त्री, बायको. २१ जाणें येणें. २२ निश्चयानें. २३ खेळतें. २४ मृगजळाच्या लाटा. २५ व्यर्थ. २६ स्फुरण, भास. २७ वायु. २८ स्त्री-पुं-बीजाची. २९ ऐक्य, गांठ. ३० बलानें. ३१ निव्वळ, निव्वळ.

रजाचें बळ। धरिलें तेणें ॥ ८ ॥ तें बुद्धीसि बाहेरी। अहंकाराच्या उरावरी। ऐसा ठायीं माझारीं। बळियावलें ॥ ९ ॥ वायां मन हें नांव। एऱ्हवीं कल्पनाचि सावेव। जयाचेनि संगें जीव-। दशा वस्तु ॥ ११० ॥ जें प्रवृत्तीसि मूळ। कामा जयाचें बळ। जें अखंड सूये छळ। अहंकारासी ॥ ११ ॥ जें इच्छेतें वाढवी। आशेतें चढवी। जें पाठी पुरवी। भयासि गा ॥ १२ ॥ द्वैत जेथें उठी। अविद्या जेणें लाठी। जें इंद्रियांतें लोटी। विषयांमाजीं ॥ १३ ॥ संकल्पें सृष्टी घडी। सवेंचि विकल्पूनि मोडी। मनोरथांच्या उतरंडी। उतरी रची ॥१४॥ जे भुंलीचें कुंहर। वायुतत्त्वाचें अंतर। बुद्धीचें द्वार। झांकविलें जेणें ॥१५॥ तें गा किरीटी मन। या बोला नाहीं आन। आतां विषयाभिधान-। भेदू आइकें ॥ १६ ॥ तरी स्पर्शु आणि शब्दु। रूप रसु गंधु। हा विषयो पंचविधु। ज्ञानेंद्रियांचा ॥१७॥ इहीं पांचै द्वारीं। ज्ञानासि धांव बाहेरी। जैसा कां हिरवे चारीं। भांबावे पशु ॥१८॥ मग स्वर वर्ण विसर्गु। अथवा स्वीकार त्यागु। संक्रमण उत्सर्गु। विण्मूत्रांचा ॥ १९ ॥ हे कर्मेंद्रियांचे पांच। विषय गा साच। जे बांधोनियां मांच। क्रिया धांवे ॥ १२० ॥ ऐसे हे दाही। विषय गा इये देहीं। आतां इच्छा तेही। सांगिजैल ॥ २१ ॥ तरि भूतलें आठवे। कां बोलें कांन झांकावे। ऐसियावरि चेतवे। जे गा वृत्ती ॥२२॥ इंद्रियाविषयांचिये भेटी-। सरसीच जे गा उठी। कामाची बांहुटी। धरूनियां ॥ २३ ॥ जियेचेनि उठिलेपणें। मना सैंधें[२२] धांवणें। न रिगावें तेथ करणें[२३]। तोंडें[२४] सुती ॥२४॥ जिये वृत्तीचिया आवडी। बुद्धी होय वेडी। विषयां जिया गोडी। ते गा इच्छा ॥ २५ ॥ आणि इच्छिलिया सांगेंडें। इंद्रियां आमिष न जोडे। तेथ जोडे ऐसा जो डावो पडे। तोचि द्वेषु ॥२६॥ आतां यावरी सुख। तें एवंविध देख। जेणें एकेंचि अशेख। विसरे जीवु ॥ २७ ॥ मना वाचे काये। जें आपुली आण[२७] वाये। देहस्मृतीची त्राये। मोडित जें ये ॥ २८ ॥ जयाचेनि जालेपणें। पांगुळा होइजे प्राणें। सात्त्विकासी दुणें-। वरीही लाभु ॥ २९ ॥ कां आघवियाचि इंद्रियवृत्ती। हृदयाचिया एकांतीं। थापटूनि सुषुप्ती। आणी जें गा ॥ १३० ॥ किंबहुना सोये। जीव आत्मयाची लाहे। तेथ जें होये। तया नाम सुख ॥ ३१ ॥ आणि ऐसी हे अवस्था। न जोडतां पार्था। जें जीजे तेंचि सर्वथा। दुःख जाणे ॥ ३२ ॥ तें मनोरथसंगें नव्हे। एऱ्हवीं सिद्धि गेलेंचि

त्यांमध्यें निखालस केवळ चंचलपणा एकटा राहिला त्यामुळें त्यानें रजोगुणाच्या बळाचा आश्रय केला ८. ते बुद्धीच्या बाहेर व अहंकाराच्या उरावर म्हणजे–दोहोंच्या मध्यभागांत बळकट होऊन बसले ९. त्याला 'मन' हे व्यर्थ नांव आहे. वास्तविक ते मूर्तिमंत एक कल्पनारूपच होय. ज्याच्या [ आध्यासिक ]–संबंधामुळें ब्रह्म वस्तूला–जीवदशा प्राप्त झाली आहे ११०. जें मन कोणतीहि गोष्ट करण्यास प्रवृत्त होण्याचे मूळ कारण आहे. ज्याच्या योगानें वासना बळकट होते व जें नेहमी अहंकाराशीं स्पर्धा करतें; ११. जें मन इच्छेला वाढवितें, आशेला चढवून प्रबळ करते, व जे भयाला पाठ पुरावा देऊन मदत करते १२. ज्याच्या [ बहिर्मुख प्रवृत्तीमुळें ] द्वैत-भाव उत्पन्न व प्रतीत होतो व ज्याच्या योगानें अविद्या अगदीं जोरावते, जें इंद्रियांना विषयांत ढकलतें; १३. जें एका क्षणांत आपल्या संकल्पमात्रानें सृष्टि उत्पन्न करते व ती लागलीच विकल्पमात्रानें मोडूनहि टाकितें आणि जे मनोरथांच्या उतरंडी रचतें व उतरतें; १४. जे भ्रमाचें कोठार आहे, व वायुतत्त्वाचा आंतला गाभा आहे व ज्यानें बुद्धीचें म्ह. ज्ञानाचें द्वार झांकून टाकले आहे म्ह. ज्ञानाचें कांहीं चालूं देत नाहीं १५. अर्जुना! तेंच 'मन' होय. या बोलण्यांत कांहींहि अन्यथा नाहीं. आतां विषयांची नांवें व भेद ऐक १६. [ **पंच च** ] तर शब्द आणि स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच ज्ञानेंद्रियांचें पांच प्रकारचे विषय आहेत १७. ज्याप्रमाणें जनावर हिरवागार चारा पाहून त्याकडे धांव घेते, त्याप्रमाणें त्या पांच ज्ञानेंद्रियांच्या द्वारानें ज्ञान बाहेर विषयाकडे धांव घेतें १८. आतां [ वाणीनें ] स्वर, वर्ण व विसर्ग यांचा उच्चार करणें, [ हातानें ] वस्तु घेणें व टाकणें, [ पायानें ] चालणें व [ पायु व उपस्थ ] यानें मलमूत्र विसर्जन करणें; १९. हे पांच कर्मेंद्रियांचे पांच विषय खरे आहेत त्यांचा माळा बांधून म्ह. ज्यांच्या आधारानें बाह्य क्रिया व्यवहार धांव घेतो, चालतो १२० [ **इंद्रियगोचराः** ] असे हे ज्ञानेंद्रियांचें व कर्मेंद्रियांचें मिळून दहा विषय या देहांत आहेत आतां इच्छा म्हणजे काय तेंहि सांगतों २१. [ **इच्छा** ] पूर्वीं अनुभविलेल्या पदार्थांच्या आठवणी होण्यामुळें किंवा दुसऱ्याच्या मुखांतून एखाद्या वस्तूचें कानभरून वर्णन ऐकल्यामुळें जी वृत्ति अभिव्यक्त वा जागृत वा प्रकाशित होते २२. किंवा इंद्रियांची व विषयांची गाठ पडतांक्षणींच कामाच्या हाताचा टेका घेऊन जी वृत्ति वेगानें उठतें २३. ज्या वृत्तीच्या उद्भवण्यामुळें मन इकडे तिकडे एकसारखें धावूं लागतें व जेथें प्रवेश करूं नये अशा ठिकाणीं हीं इंद्रियें तोंडें खुपसतात २४. ज्या वृत्तीच्या नादीं लागल्यामुळें बुद्धि वेडी होते व ज्या वृत्तीला विषयाचीच आवड असते, अरे! त्या वृत्तीला 'इच्छा' असें म्हणतात हो! २५. [ **द्वेषः** ] आणि इच्छा उत्पन्न होण्याबरोबर इंद्रियांना ते इच्छित विषय उपभोगास मिळालें नाहींत तर त्यावेळीं जी वृत्ति उत्पन्न होते, तिलाच 'द्वेष' असें म्हणतात २६. [ **सुखम्** ] आतां यानंतर सुख हें या प्रकारच्या लक्षणांनीं जाणावें कीं, जें एकच प्राप्त झालें असतां इतर सर्व वस्तूंचा जीवाला विसर पडतो २७. जें कायेला, वाचेला आणि मनाला, आपली शपथ घालते व जे देहाच्या आठवणीचे बळ नाश करीत येते २८. जें प्राप्त झालें असतां प्राण पांगळा [ क्रियारहित ] होतो सात्त्विक वृत्ति पूर्वीं-पेक्षां दुप्पटीचेवर वाढते; २९. जें सगळ्या इंद्रियांच्या वृत्तींना हृदयाच्या एकान्तात आणते व तेथें त्यांना थापटून जे गाढ निद्रा वा तत्सम अवस्था आणतें १३०. फार काय सांगावें!! जेव्हां जीवाला [ सुखरूप ]–आत्मलाभ होतो तेव्हां तेथें जी स्थिति प्राप्त होते. त्या स्थितीलाच 'सुख' असें म्हणतात ३१. [ **दुःखम्** ] आणि पार्था, अशी ही आत्मसुखाची स्थिति न लाभतां जें जगणें तेंच सर्वथैव निव्वळ 'दुःख' आहे असें समज ३२.

---

१ मूर्तिमंत. २ परब्रह्म. ३ वासनेस. ४ टोंचणी लावते, आग्रह करिते. ५ उत्पन्न करिते ६ अज्ञान. ७ दोडगी. ८ वाईट करून, नाकारून. ९ उतरंडी. १० भ्रमाचें. ११ कठोर. १२ सत्त्व, गाभा. १३ विषय असे ज्याचें नांव आहे त्याचे भेद ऐक. १४ व्यंजन. १५ चालणें. १६ त्याग. १७ मळमूत्रांचा. १८ माळा, शिडी, परांची, अंतराळीं केलेला मार्ग. १९ मागलें. २० कानावर शब्द पडतांच. २१ हात. २२ जिकडे तिकडे, पुष्कळ २३ इंद्रियें. २४ तोंडें घालितात. २५ बरोबर. २६ संपूर्ण, निःशेष. २७ शपथ घालिते. २८ आधार, बळ, आश्रय. २९ लंगडा.

आहे । हे दोनीचि उपाये । सुखदुःखासी ॥ ३३ ॥ आतां असंगा साक्षिभूता । देहीं चैतन्याची जे सत्ता । तिये नाम पंडुसुता । चेतना येथें ॥ ३४ ॥ जे नखौनि केशवरी । उभी जागे शरीरीं । जे तिहीं अवस्थांतरीं । पालटेना ॥३५॥ मनबुद्ध्यादि आघवीं । जियेचेनि टवटवीं । प्रकृतिवनमाधवीं । सदांचि जे ॥ ३६ ॥ जडांजडीं अंशीं । राहाटे जे सरिसी । ते चेतना गा तुजसी । लटिकें नाहीं ॥ ३७ ॥ पैं रावो परिवारु नेणे । आज्ञाचि परचक्र जिणे । कां चंद्राचेनि पूर्णपणें । सिंधू भरती ॥ ३८ ॥ नाना भ्रामकाचें सान्निधान । लोहो करी सचेतंन । कां सूर्यसंगु जन । चेष्टवी गा ॥३९॥ अगा मुख मेळेंवीण । पिलियाचें पोषण । करी निरीक्षण । कूर्मी जेवीं ॥१४०॥ पार्था तियापरी । आत्मसंगती इये शरीरीं । सजीवत्वाचा करी । उपेगु जडा ॥४१॥ मग तियेतें चेतना । म्हणिपे पैं अर्जुना । आतां धृतिविवंचना- । भेदु आइक ॥ ४२ ॥ तरी भूतां परस्परें । उघड जाति स्वभाववैरें । नव्हे पृथ्वीतें नीरें । न नाशिजे ? ॥ ४३ ॥ नीरातें आटी तेज । तेजा वायूसि झुंज । आणि गगन तंव सहज । वायू भक्षी ॥ ४४ ॥ तेवींचि कोणेही वेळे । आपण कायिसयाही न मिळे । आंतु रिगोनि वेगळें । आकाश हें ॥४५॥ ऐसीं पांचही भूतें । न साहती एकमेकांतें । कीं तियेंही ऐक्यातें । देहासी येती ॥४६ ॥ द्वंद्वाची उखिविखी । सोडूनि वसती एकीं । एकेकातें पोखी । निजगुणें गा ॥४७॥ ऐसें न मिळे तयां साजणें । चळे धैर्यें जेणें । तयां नांव म्हणें । धृती मी गा ॥४८॥ आणि जीवेंसी पांडवा । या छत्तिसांचा मेळावा । तो हा एथ जाणावा । संघातु पैं गा ॥४९॥ एवं छत्तीसही भेद । सांगितलें तुज विशद । यया येतुलेयातें प्रसिद्ध । क्षेत्र म्हणिजे ॥१५०॥ रथांगांचा मेळावा । जेवीं रथु म्हणिजे पांडवा । कां अधोर्ध्व अवेवां । नांव देहो ॥५१॥ करीतुरंगसमाजें । सेना नाम निफजे । कां वाक्यें म्हणिपती पुंजे । अक्षरांचे ॥५२॥ कां जळधरांचा मेळा । वाच्य होय आभाळा । नाना लोकां सकळां । नाम जग ॥५३॥ कां स्नेहसूत्रवन्ही । मेळु एकिचि स्थानीं । धरिजे तो जनीं । दीपु होय ॥ ५४ ॥ तैसीं छत्तीसही इये तत्त्वें । मिळतीं जेणें एकत्वें । तेणें समूह परेत्वें । क्षेत्र म्हणिपे ॥५५॥ आणि वाहेतेनि भौतिकें । पाप पुण्य येथें पिके । म्हणौनि आम्ही कौतुकें । क्षेत्र म्हणों ॥५६॥ आणि एकाचेनि मतें । देह म्हणती ययातें ।

मनोरथांच्या संगतीनें म्हणजे इच्छारूप वृत्ति उत्पन्न झाली, तर त्यामुळें तें सुख [ अभिव्यक्त ] होत नाहीं. एऱ्हवीं कल्पना, इच्छा नाहीशी झाल्यावर तें सहजानुसार स्वतःसिद्ध असल्यानें प्राप्तच आहे. म्हणून कल्पना नाहीशीं होणें व उत्पन्न होणें[स्थिरता व चंचलता] हींच सुख दुःखाला दोन कारणें वा उपाय आहेत ३३. [ **चेतना** ] आतां अर्जुना, अलिप्त व सर्वसाक्षिभूत अशा ब्रह्माची [ चैतन्याची ] देहांत असणारी जी सत्ता तिलाच येथें चेतना असें नांव आहे ३४. या शरीरांत जी [पायांच्या] नखांपासून ते थेट [ मस्तकाच्या ] केसापर्यंत नित्य जागृत असते व जागृति, स्वप्न, सुषुप्ति या तिन्हीं अवस्थामध्यें जिच्यांत मुळींहि फरक पडत नाहीं ३५. जिच्या योगानें मन व बुद्धि इत्यादिकांना टवटवी, प्रसन्नता असते व जी प्रकृतिरूप वनाला नेहमीं वसंत ऋतुप्रमाणें प्रफुल्लित ठेवते ३६. आणि जड व चेतन वस्तूंत जिची अधिष्ठानरूपानें सारखीच व्याप्ति असते. तीच '**चेतना**' होय. हे तुला खोटें सांगत नाही. [ हे निःसंदिग्ध समज ] ३७. हें पहा, राजा जसा आपल्या लवाजम्यास तो किती आहे इत्यादि जाणत नसून, त्याच्या फक्त आज्ञेनेंच त्याची प्रजा परचक्रास जिंकिते किंवा पूर्ण चंद्राच्या उदयामुळें जशी समुद्रास भरती येते ३८. अथवा लोहचुंबकाचें केवळ सन्निधान जसें लोखंडास चंचलपणा आणून हालचाल करावयास लावतें किंवा सूर्याचा प्रकाशसंग जसा सर्व जीवांना आपापलें व्यापार करावयास लावितो ३९. अथवा स्तनास मुख स्पर्श केल्यावांचूनहि कासवी ज्याप्रमाणें केवळ नजरेनेंच आपल्या पिलांचें पोषण करते १४०. त्या प्रमाणें अर्जुना! या शरीरांत असलेल्या आत्मसत्तारूप चेतना संगतीमुळें त्या जडाचा सजीवत्वासारखा उपयोग होतो. वा केला जातो म्ह० आत्मसत्तासंगती जडवस्तूला सजीवपणा आणते ४१. अरे ! तिलाच बाबारे, ! '**चेतना**' हें नांव आहे. आतां धैर्याचें विवेचन व त्याचे भेद कोणते आहेत, तें ऐक ४२. [ **धृतिः** ] पंचमहाभूतांचे एकमेकांशीं जातिस्वभाववरून उघड उघड वैर असल्याचे प्रसिद्ध आहे. पहा कीं, पाणी हें पृथ्वीचा नाश करीत नाहीं काय ? ४३. पाण्याचें शोषण तेज करतें, तेजाचें वायूचें वैर आहे म्हणून तो त्यास खाऊन टाकतो. आणि आकाश हें वायूस सहजच गिळून टाकतें ४४. त्याप्रमाणें आकाश कधींहि कशाबरोबर न मिळतां सर्वत्र ओतप्रोत भरलेलें असून ते स्वरूपतः सर्वांहून वेगळेच असतें ४५. अशा प्रकारें पंचमहाभूतें एकमेकांस सहन करीत नाहींत; पण अशी विरुद्ध असूनहि ती देहामध्यें विरोध न करतां एकत्र राहतात ४६. इतकेंच नव्हे तर पूर्वींचा दुजेपणाचा वादविवाद सोडून एकोप्यानें एकत्र राहतात व ती आपापल्या गुणांनीं एकमेकांचें पोषणच करतात ४७. याप्रमाणें त्यांची स्वभाव वैरामुळें कधींहि न होणारी मैत्री ज्याच्या योगानें होते व हे ज्या धैर्यामुळें राहतें, त्या वृत्तीला मी 'धृति' असें म्हणतों ४८. आणि हे पांडवा ! जीवासह या पस्तीस तत्त्वांचा जो ऐक्यरूप समुदाय, तोच तेथें '**संघात**' नांवाचे छत्तीसावे तत्त्व समजावें ४९. याप्रमाणें हे छत्तीस भेद तुला स्पष्ट रीतीनें सांगितले व एवढ्या सर्वांना मिळून 'क्षेत्र' हें नांव प्राप्त व प्रसिद्ध झालें आहे १५०. अर्जुना, जसें चाक, जू इत्यादि रथाचे सर्व भाग एकत्र मिळून त्यास 'रथ' हें नांव येतें किंवा खाली पायापासून ते थेट वर डोक्यापर्यंत सर्व अवयवास एकत्र मिळून 'देह' हें नांव येतें; ५१. अथवा हत्ती, घोडे, रथ व पायदळ या सर्वांना मिळून जसें 'सेना' हें नांव प्राप्त होतें, किंवा अक्षरांच्या समुदायास 'वाक्य' असें म्हणतात ५२. मेघांच्या सर्व समुदायाला जसें 'आभाळ' असें म्हटले जातें. किंवा सर्व लोकांच्या समुदायास ज्याप्रमाणें 'जग' असें नांव प्राप्त होते ५३. अथवा तेल, वात व अग्नि यांचा संयोग करून एकत्र ठेवणें म्हणजे तोच 'दिवा' होय. असें लोकांत म्हणतात ५४. त्याप्रमाणें, हीं छत्तीस तत्त्वें जेव्हां एके ठिकाणीं एकोप्यानें मिळतात, तेव्हां त्या सर्वांना मिळून '**क्षेत्र**,' असे म्हटले जातें ५५. आणि सर्व प्राणी [ शरीरद्वारें ] जगतांत राहून जी पापाची किंवा पुण्याईची कमाई तेथें करतात तेंच कोणी एक पीक होय असें समजून त्यास [ शरीरास ] आम्ही प्रस्तुत 'क्षेत्र' [ शेतें ] असें कौतुकानें म्हटलें आहे ५६.

१ पायाच्या नखापासून डोक्याच्या केसापर्यंत. २ जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तिहींत. ३ मायारूप वनाला वसंत. ४ जड व चेतन वस्तूत. ५ संचार करते, वागते ६. लवाजमा-खटला. ७ जिंकिते. ८ अथवा. ९ लोहचुंबकाचें. १० चंचळपणा, चेतना. ११ स्तनांस तोंड लाविल्यावांचून. १२ अवलोकन. १३ धैर्याच्या विचाराचे. १४ संहारावें. १५ उदकाला. १६ वादविवाद. १७ स्वभाववैरामुळें ज्यांचें न पटावयाचें त्यांचे ठिकाणीं मित्रत्व. १८ रथाचे सर्व भागांचा. १९ अभ्रास. २० तेल, वात व अग्नि. २१ सर्वांना मिळून. २२ राबणाऱ्या, व्यापार करणाऱ्या. २३ शरीरानें.

परि असो हें अनंतें । नामें यया ॥ ५७ ॥ पैं परतत्त्वाआरौतें । स्थावराआंतौतें ।
जें कांहीं होतें जातें । क्षेत्रचि हें ॥ ५८ ॥ परि सुर नर ऊरगीं । घडत आहे
योनिविभागीं । तें गुणकर्मसंगीं । पडिलें सांतें ॥ ५९ ॥ हेचि गुणविवंचना । पुढां
म्हणिपैल अर्जुना । प्रस्तुत आतां तुज ज्ञाना । रूप दावूं ॥ १६० ॥ क्षेत्र तंव
सविस्तर । सांगितलें सविकार । म्हणौनि आतां उदारें । ज्ञान आइकें ॥६१॥ जया
ज्ञानालागीं । गगन गिळिताती योगी । स्वर्गाची आडवंगी । उमरंडोनि ॥ ६२ ॥
न करिती सिद्धीची चाड । न धरिती ऋद्धीची भीड । योगाऐसें दुवाड । हेळंसिती
॥ ६३ ॥ तंपोदुर्गें वोलांडित । क्रतुकोटि वोवांडितें । उलथूनि सांडित । कर्मवल्ली
॥ ६४ ॥ नाना भंजनमार्गीं । धांवत उघडिया आंगीं । एक रिगताती सुरंगीं ।
सुषुम्नेचिये ॥६५॥ ऐसी जिये ज्ञानीं । मुनीश्वरांचीं उंतान्ही । वेदतरूच्या पानोवानीं ।
हिंडताती ॥ ६६ ॥ देईल गुरुसेवा । इया बुद्धि पांडवा । जन्मशतांचा सांडोवा । टाकित
जे ॥६७॥ जया ज्ञानाची रिगंवणी । अविद्ये उणें आणी । जीवा आत्मया बुझावणी ।
मांडूनि दे ॥ ६८ ॥ जें इंद्रियांचीं द्वारें आडी । प्रवृत्तीचे पाय मोडी । जें दैन्येंचि
फेडी । मानसाचें ॥ ६९ ॥ द्वैताचा दुकाळु पाहे । साम्याचें[22] सुयाणें होये । जया
ज्ञानाची सोये[23] । ऐसें करी ॥ १७० ॥ मदाचा ठावोचि पुसी । जें महामोहातें
ग्रासी । नेदी आपपरु ऐसी । भाष उरों ॥ ७१ ॥ जें संसारातें ऊन्मूळी । संकल्प-
पंकु पाखाळी । अनावरातें वेंटाळी । ज्ञेयातें जें ॥ ७२ ॥ जयाचेनि जालेपणें ।
पांगुळा होइजे प्राणें । जयाचेनि विंदाणें । जग हें चेष्टे ॥ ७३ ॥ जयाचेनि
उजाळें । उघडती बुद्धीचे डोळे । जीवु दोंदावरी लोळे । आनंदाचिया ॥ ७४ ॥
ऐसें जें ज्ञान । पवित्रैकनिधान । जेथ विटाळलें मन । चोखं कीजे ॥ ७५ ॥
आत्मया जीवबुद्धी । जे लागली होती क्षयव्याधी । ते जयाचिये सन्निधी ।
निरुजा कीजे ॥ ७६ ॥ तें अनिरूप्य कीं निरूपिजे । ऐकतां बुद्धी आणिजे ।
वांचूनि डोळां देखिजे । ऐसें नाहीं ॥ ७७ ॥ मग तेचि इये शरीरीं । जें आपुला
प्रभावो करी । तें इंद्रियांचिया व्यापारीं । डोळांहि दिसे ॥ ७८ ॥ पैं वसंताचें
रिगंवणें । झाडांचेनि साजेपणें । जाणिजे तेवीं करणें । सांगती ज्ञान ॥ ७९ ॥
अगा वृक्षासि पाताळीं । जळ सांपडे मुळीं । तें शाखांचिये बाहाळीं । बाहेर

आणि कित्येकांच्या मतानें या क्षेत्रास देह असेंहि म्हणतात. पण तें आतां असो, या क्षेत्राला अनेक नांवें आहेत ५७. हें पहा ! परब्रह्माच्या अलिकडे व अखेर स्थावरापर्यंत धरून दोहोंच्या दरम्यान जेवढें कांहीं उत्पन्न होते व लय पावते, ते सर्व क्षेत्रच होय. [ सर्व आत्मभिन्न पदार्थ तेच क्षेत्र, हे क्षेत्राचें मुख्य लक्षण समजावें ] ५८. परंतु देव, मनुष्य, सर्प असें निरनिराळ्या योनींत जे निर्माण होतात, ते सत्त्व, रज व तम या गुणांची व कर्मांची संगति घडल्यानें उत्पन्न होतात तेच क्षेत्र ५९. अर्जुना ! ह्या गुणांचा विचार पुढें [चौदाव्या अध्यायांत] सांगण्यांत येईल. सध्यां तुला [ ज्ञानाचें ] स्वरूप काय आहे, ते सांगतों १६०. क्षेत्राचीं सर्व लक्षणें विकारांसह व विस्तारानें आम्हीं तुला सांगितलीं, आतां यापुढें ज्यापासून मोक्षप्राप्ति होते तें उदार ज्ञान तुला सांगतों तें ऐक ६१. ज्या ज्ञानाकरितां योगी लोक स्वर्गाचा आडमार्ग ओलांडून [ मूर्ध्न्याकाशाचा लय करतात ] ब्रह्मरंध्र आकाश गिळून टाकतात ६२. [त्या ज्ञानापुढें तें] सिद्धींची गरज, इच्छा बाळगीत नाहींत, ऐहिकैश्वर्याची भीड–पर्वा धरीत नाहींत, व कठीण असें योगसाधन त्यासहि तुच्छ मानून पर्वा करीत नाहींत ६३. तपोरूपी किल्लें ओलांडून पलिकडें जातात, कोट्यवधि यज्ञ [आचरण करून ] ओवाळून टाकतात. व कर्मकांडरूपी वेलीचीं उलथापालथ करून त्याचा त्याग करतात ६४. पुष्कळ प्रकारचें उपासनामार्ग स्वीकारून कोणी उघड्या अंगानेंच [ अंतर्बाह्य परिग्रह विमुक्त होऊन ] धांवतात व कोणी सुषुम्नेच्या गुप्त मार्गानें प्रवेश करतात ६५. असें जें ज्ञान, त्या ज्ञानाच्या प्राप्तीकरितां सर्व ऋषि–मुनि उत्कट इच्छा मनांत धारण करून, वेदरूपी झाडाचे पान ना पान हिंडतात [ ज्ञान प्राप्त्यर्थ संपूर्ण वेदाचे अध्ययन करतात ] ६६. हे पांडवा ! गुरूंची सेवा केली असतां त्यापासून ज्ञानप्राप्ति होईल. या बुद्धीनें जन्मभर श्रीगुरु सेवा करितात अनेक जन्मांची [ निष्काम पुण्याईची ] गुरुसेवेवरून ओवाळणी करतात ६७. ज्या ज्ञानाचा केवळ प्रवेश झाला असतां अविद्या नाहींशी होतें व ते जीवाचें आणि परमात्म्याचें ऐक्य करून देऊन मूळचें एकत्व पटवून देतें ६८. जें ज्ञान इंद्रियद्वारें बंद करून त्यास विषयाची इच्छा होऊं देत नाहीं, बहिर्मुख वृत्तीची, कर्म मार्गाची, हांव मोडून टाकतें, व मनाचें [ चिंता, परिच्छिन्नता भ्रांतिरूप ] दारिद्र्यच दूर करतें ६९. ज्या ज्ञानाची प्राप्ति झाली असतां अशी स्थिति लाभेल कीं, द्वैतरूपीं दुष्काळांचा अभाव होतो. सर्वत्र समबुद्धिरूप अद्वैत बोधाचा सुकाळ होतो १७०. ज्याच्या योगानें गर्वाचा मागमूसहि नाहींसा केला जातो, जें ज्ञान महामोहरूपीं मायेला देखील नाहींसें करतें व जें ज्ञान त्याचें ठिकाणीं आपपरभावाची भाषाहि उरूं देत नाहीं ७१ जें ज्ञान संसाराला मुळापासून उपटून टाकिते व संकल्परूपीं चिखल स्वच्छ धुवून टाकिते व सर्वव्यापक आणि आकलन करण्यास अवघड अशा परब्रह्माची भेट आत्मत्वानें करून देतें ७२. जें [ ज्ञान ] प्राप्त झालें असतां प्राण पांगळा होतो व ज्याच्या स्फूर्तीनें जगांतील सर्व व्यवहार चालत असतात ७३. आणि ज्या ज्ञानाच्या प्रकाशानें बुद्धीमध्यें आभासरूप ज्ञानशक्तीचें डोळे उघडतात व जीव आनंदाच्या पोटावर लोळतो, त्याचा धनी होतो ७४. असें जें ज्ञान, पवित्रपणाचा एकमेव ठेवा व जें प्राप्त झालें असतां विषयांनीं विटाळलेलें मन निर्मळ होतें ७५. देहतादात्म्य संबंधानें 'मी जीव आहे ' असा जो आत्म्याला जीवत्व भ्रांतिरूप क्षयरोग लागलेला असतो, तो ज्या शुद्धज्ञानाच्या प्राप्तीनें नाश पावतो; ७६. जें ज्ञान निरूपण करण्याजोगे नसूनहि आम्हीं त्याचे निरूपण करतो कारण, ते निरूपण ऐकून नीट समजून घे. म्हणजे बुद्धींत प्रकाश पडेल, ज्ञान लाभ होईल बाकी तें डोळ्यास पाहतां येईल अशी ती वस्तु नाहीं हें खरें ७७. पण तेंच ज्ञान ज्या वेळेस या शरीरांत अभिव्यक्त होऊन आपले सामर्थ्य प्रकट करते त्या वेळीं तें या इंद्रियांच्या आचरणावरून दृष्टोत्पत्तीसहि येतें ७८. जसें झाडाच्या टवटवीतपणावरून वसंत ऋतूचा प्रवेश झाला हे समजते, तसें इंद्रियें ज्ञानाचें अस्तित्व सांगतात म्ह० ज्ञानवानांच्या [ इंद्रियांच्या व्यापारावरून ज्ञानप्राप्तीची लोकांस ओळख होते ] ७९. अरे ! झाडाला जमिनींत मुळाशीं पाणी सांपडलें आहे हे फांद्याच्या विस्तारावरून व त्यांच्या टवटवी-

१ अनेक. २ अलिकडे. ३ जडाच्या आंत. ४ पडले असतां. ५ पुढें [ चतुर्दशाध्यायांत ]. ६ उत्तम. ७ आडमार्ग. ८ ओलांडून. ९ तुच्छ मानितात. १० तपरूपी किल्ले. ११ ओवाळून टाकितात. १२ कर्मरूपी वेल. १३ उपासनामार्गी. १४ भुयारांत, गुप्तमार्गांत. १५ उत्कृष्ट इच्छा. १६ ओंवाळणी. १७ शिरकाव, प्रवेश. १८ समजूत, ऐक्य. १९ बंदकरी. २० कर्माचें. २१ काळजी. २२ अद्वैताचा सुकाळ. २३ आरंभ, प्राप्ति. २४ उपटून टाकते. २५ परब्रह्मातें. २६ कळसूत्रानें, कौशल्यानें. २७ प्रकाशानें. २८ शुद्ध. २९ निरोगी. ३० प्रताप. ३१ प्रारंभ.

दिसे ॥ १८० ॥ कां भूमीचें मार्दव । सांगे कोंभाची लवलव । नाना आचार-गौरव । सुकुलीनाचें ॥ ८१ ॥ अथवा संभ्रमाचिया आयती । स्नेहो जैसा ये व्यक्ती । कां दर्शनाचिये प्रशस्तीं । पुण्यपुरुष ॥ ८२ ॥ नातरी केळीं कापूर जाहला । जेवीं परिमळें जाणों आला । कीं भिंगारीं दीपु ठेविला । बाहेरि फांके ॥ ८३ ॥ तैसें हृदयींचेनि ज्ञानें । जिये देहीं उमटती चिन्हें । तिये सांगों आतां अवधानें । चांगें आइक ॥ ८४ ॥

अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् । आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥

तरी कवणेही विषयींचें । साम्य होणें न रुचे । संभावितपणाचें । वोझें जया ॥ ८५ ॥ आथिलेचि गुण वानितां । मान्यपणें मानितां । योग्यतेचें येतां । रूप आंगा ॥ ८६ ॥ तैं गजबजों लागे कैसा । व्याधें रुंधला मृगु जैसा । कां बाहीं तरतां वळसा । दाटला जेवीं ॥ ८७ ॥ पार्था तेणें पाडें । सन्मानें जो सांकडे । गरिमेतें आंगाकडे । येवोंचि नेदी ॥ ८८ ॥ पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ती कानीं नायकावी । हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ॥८९॥ तेथ सत्काराची कें गोठी । कें आदरा देईल भेटी । मरणेंसीं साटी । नमस्कारितां ॥ १९० ॥ वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे । परि वेडिवेमाजीं दडे । महिमेभेणें ॥ ९१ ॥ चातुर्य लपवी । महत्त्व हारवी । पिसेपण मिरवी । आवडोनि ॥ ९२ ॥ लौकिकाचा उद्वेगु । शास्त्रांवरी उबगु । उगेपणीं चांगु । आथी भरु ॥ ९३ ॥ जगें अवज्ञाचि करावी । संबंधीं सोयचि न धरावी । ऐसी ऐसी जीवीं । चाड बहु ॥ ९४ ॥ तळौटेपण बाणे । आंगीं हिणावो खेवणें । तें तेंचि करणें । बहुतकरूनी ॥ ९५ ॥ हा जीतु ना नोहे । लोक कल्पी येणें भावें । तैसें जिणें होआवें । ऐसी आशा ॥ ९६ ॥ पैं चालतु कां नोहे । कीं वारेनि जातु आहे । जना ऐसा भ्रमु जाये । तैसें होईजे ॥ ९७ ॥ माझें असतेपण लोपो । नामरूप हारपो । मज झणें वासिपो । भूतजात ॥ ९८ ॥ ऐसी जयाचीं नवसियें । जो नित्य एकांता जातु जाये । नामेंचि जो जिये । विजनाचेनि ॥९९॥ वायू आणि तया पडे । गगनेंसीं बोलों आवडे । जीवें प्राणें झाडें । पढियंतीं जया ॥ २०० ॥ किंबहुना ऐसीं । चिन्हें जया देखसी । जाण तया ज्ञानेंसीं । शेज जाहली ॥ १ ॥ पैं अमानित्व पुरुषीं ।

वरून दिसून येते १८०. अथवा अंकुराचा लुसलुशीतपणा जसा जमिनीचा मृदुपणा सांगतो किंवा चांगल्या कुलीन मनुष्याच्या वागण्याच्या पद्धतींवरून त्याचा थोरपणा दिसून येतो ८१. अथवा आदरातिथ्याच्या तयारीवरून जसा स्नेहभाव प्रगट रूपानें दृष्टीस पडतो किंवा एखाद्याचे प्रथम दर्शन होतांच मनाला होणाऱ्या समाधानावरून हा पुण्यपुरुष आहे असें कळून येते. ८२. अथवा केळींत उत्पन्न झालेला कापूर जसा सुवासावरून ओळखण्यांत येतो; किंवा भिंगांत तावदानांत ठेविलेल्या दिव्याचा प्रकाश ज्याप्रमाणें भिंगाबाहेर सभोंवार पसरतो ८३. त्याप्रमाणें हृदयांत ज्ञानोदय झाल्यावर जीं शरिरावर त्याचीं लक्षणें उमटलेलीं दृष्टीस पडतात, तीं आतां सांगतों, चांगलें लक्ष देऊन ऐक ८४.

**अन्वयार्थ—अमानित्वं**–मी मोठा आहें, मी विद्वान् **आहें**, इत्यादि आत्मश्लाघा करणें व स्वतःला तसें समजणें, **हें** मानित्व होय; पण तसा मानीपणा न धरणें—**अदंभित्वं**–खरोखर धार्मिक नसतांना तसा आव आणणें वरवर धार्मिकता प्रकट करणें हा दांभिकपणा आहे, तसा दांभिकपणा न दाखविणें—**अहिंसा**–प्राण्यांना पीडा न देणें—**शान्तिः**–दुसऱ्यानें अपराध केला आसतांहि मनांत क्रोध हा विकार उत्पन्न होऊं न देणें—**आर्जवम्**–अन्तःकरणाचा सरळपणा—**आचार्योपासनं**–मोक्षाच्या साधनांचा उपदेश करणाऱ्या आचार्यांची शुश्रूषा वगैरे करणें—**शौचं**–शरिराचे मल वगैरे पाण्यानें धुवून टाकणें व मनाचे रागादि मल वैराग्यादिकांनीं घालविणें, असे हे दोन प्रकारचें शौच–शुद्धि—**स्थैर्यं**-मोक्षमार्गाविषयींचा दृढनिश्चय—**आत्मविनिग्रहः**–शरीरेंद्रिय–समूहाला असन्मार्गापासून परतवून सन्मार्गांतच ठेवणें ७.

[ **अमानित्वं** ] तर कोणत्याहि व्यवहारांत सर्व गोष्टींचे बाबतींत कोणाचीहि बरोबरी करणें ज्याला आवडत नसते व लोकांनीं संभावित म्हटलें असतां ज्याला त्या मोठेपणाचें पराकाष्ठेचें ओझें वाटतें; ८५. त्याच्या अंगीं असलेल्याच गुणांचे वर्णन केले असतां व योग्यतेनुरूप लोकांनीं सन्मान केला असतां किंवा अंगची योग्यता लोकांनीं प्रगट केली असतां ८६. त्यावेळीं तो कसा गडबडून जातो म्हणशील तर पारध्यानें चोहोंकडून वेढिलेला हरिण घाबरा होतो किंवा नदी बाहूबलानें पोहून पलीकडे जात असताना सांपडलेला मनुष्य जसा घाबरलेला दिसतो ८७. तशा प्रकारें पार्था लोकांनीं सन्मान केला असतां जो कष्टी होतो व जो आपल्या अंगाकडे मोठेपणा येऊंच देत नाही ८८ आपल्यास लोकांनीं पूज्य मानलेले आपण आपल्या डोळ्यांनीं न पहावें, आपली कीर्ति आपणच आपल्या कानांनीं न ऐकावी व आपली "हा अमुक एक मनुष्य आहे" अशी लोकांना आठवणसुद्धां होऊं नये; [ अशी ज्या पुरुषाची इच्छा असते ] ८९. अशा त्या पुरुषाचे ठिकाणीं सत्काराची गोष्ट कशास बोलावी ? व तो आदराचा तरी कसा स्वीकार करणार ? त्यास जर कोणी नमस्कार केला तर त्याला ते मरणासारखें दुःखकर वाटतें ! १९०. बृहस्पतीसारखी सर्वज्ञता तर अंगीं लाभलेली असते, तरीपण आपले महात्म्य लोकांत वाढेल या भीतीनें जो वेडिवेंत लपतो ९१. आपल्या अंगीं असलेलें शहाणपण तो लपवून ठेवतो आपला मोठेपणा सोडून देतो आणि मोठ्या प्रेमानें लोकांत वेडेपणा स्वीकारतो; ९२. ज्याला लोकांत होणाऱ्या कीर्तिचा कंटाळा असून–शास्त्रांच्या वादविवादाचीहि उपेक्षाच असते म्हणून कांहीं न करतां स्वस्थपणें बसण्यावरच ज्याचा अतीव भर असतो ९३. इतकेंच नव्हेतर लोकांनीं आपला अपमान, अनादरच करावा व आप्तेष्ट वर्गांनीं आपली संगतिच धरूं नये अशा प्रकारचीच ज्याच्या मनामध्यें फार इच्छा असतें; ९४. ज्यामुळें अंगांत नम्रपणा पूर्ण बाणला जाईल व हीनपणा हेंच आपलें भूषण होईल, अशाच गोष्टी तो बहुतकरून करितो; ९५. ज्यामुळें 'हा जीवंत आहे किंवा नाहीं' अशी लोक आपल्याविषयीं कल्पना करतील असें आपले वर्तन असावे अशी ज्यास आशा असते ९६. हा आपल्या पायांनीं चालत आहे कीं, नाहीं किंवा वाऱ्यानेंच ढकलला जात आहे असा लोकांस भ्रम व्हावा असें आपण व्हावे [ असे ज्यास वाटते ] ९७. म्हणून माझ्या अस्तित्वाचा लोप होवो, माझे नांव रूप नाहींसे होवो, प्राणिमात्राला माझ्यापासून कदाचित भय वाटेल पण तसे भय वाटूं नये ९८. असे ज्याचे देवापाशीं नवस असतात; त्यामुळें जो नित्य एकांतवासांत जात असतो व एकान्ताच्या नांवानें जगतो म्ह. एखादी जागा निर्जन आहे असें ऐकल्याबरोबर आनंद पावतो ९९. वायूचे व त्याचे पटते म्हणून त्याच्या अनुरोधानें जो वागतो व आकाशाबरोबर ज्याला बोलणें आवडते व ज्याला झाडेंच जीव कीं, प्राण अशी आवडतात २००. अधिक काय सांगावें ! ! अशी लक्षणें ज्याच्या अंगांत पूर्णपणें बाणलेली आहेत असें तुझ्या दृष्टीस पडेल. तोच ज्ञानाच्या बिछान्यावर स्वस्थ झाला आहे, म्हणजे त्यालाच ज्ञान हस्तगत झालें आहे, असें तूं समज १. म्हणून

तें जाणावें इहीं मिषीं । आतां अदंभाचिया वोळखीसी । सौरसु देवों ॥ २ ॥ तरी अदंभित्व ऐसें । लोभियाचें मन जैसें । जीवु जावो परी नुमसे । ठेविला ठावो ॥ ३ ॥ तयापरी किरीटी । पडिलाही प्राणसंकटीं । तरी सुकृत न प्रकटी । आंगें बोलें ॥ ४ ॥ खडाणें आला पान्हा । पळवी जेवीं अर्जुना । कां लपवी पंण्यांगना । वडिलपण ॥ ५ ॥ आढ्यु आतुडे आडवीं । मग आढ्यता जेवीं हारवी । नातरी कुळवधू लपवी । अवेवांतें ॥ ६ ॥ नाना कृषीवंळु आपुलें । पांघुरवी पेरिलें । तैसें झांकी निपजलें । दानपुण्य ॥ ७ ॥ वरिवरी देहो न पूजी । लोकांतें न रंजी । स्वधर्मु वाग्ध्वजीं । बांधों नेणें ॥ ८ ॥ परोपकारु न बोले । न मिरवी अभ्यासिलें । न शके विकूं जोडलें । स्फीतीसांठीं ॥ ९ ॥ शरीर भोगाकडे । पहातां कृपणु आवडे । एऱ्हवीं धर्मविषयीं थोडें । बहु न म्हणे ॥ २१० ॥ घरीं दिसे सांकेंड । देहींची आयेती रोड । परी दानीं जया होडँ । सुरतरूसीं ॥ ११ ॥ किंबहुना स्वधर्मी थोरु । अवसरीं उदारु । आत्मचर्चे चतुरु । एऱ्हवीं वेडा ॥ १२ ॥ केळीचें दळवाडें । हळू पोकळ आवडे । परी फळोनियां गाढें । रसाळ जैसें ॥ १३ ॥ कां मेघांचें आंग झील । दिसे वारेनि जैसें जाईल । परी वर्षती नवल । घनवट तें ॥ १४ ॥ तैसा जो पूर्णपणीं । पाहतां धाती आयणी । एऱ्हवीं तरी वाणी । तोचि ठावो ॥ १५ ॥ हें असो या चिन्हांचा । नटनाचु ठायीं जयाच्या । जाण ज्ञान तयाच्या । हातां चढे ॥ १६ ॥ पैं गा अदंभपण । म्हाणितलें तें हे जाण । आतां आईक खूण । अहिंसेची ॥ १७ ॥ तरि अहिंसा बहुतीं परी । बोलिली असे अवधारीं । आपुलालिया मतांतरीं । निरूपिली ॥ १८ ॥ परी ते ऐसी देखा । जैशा खांडूनियां शाखा । मग तयाचिया बुडुखा । कूंप कीजे ॥ १९ ॥ कां बाहू तोडोनि पचविजे । मग भुकेची पीडा राखिजे । नाना देऊळ मोडोनि कीजे । पौळी देवा ॥ २२० ॥ तैसी हिंसाचि करूनि अहिंसा- । निफजविजे हा ऐसा । पैं पूर्वमीमांसा । निर्णो केला ॥ २१ ॥ जे अवृष्टीचेनि उपद्रवें । गादलें विश्व आघवें । म्हणौनि पर्जन्येष्टी करावे । नाना याग ॥ २२ ॥ तंव तिये इष्टीचिया बुडीं । पशुहिंसा रोकडी । मग अहिंसेची थडी । कैंची दिसे? ॥ २३ ॥ पेरिजे नुसधी हिंसा । तेथ उगवैल काय अहिंसा? । परी नवल बापा धिंवसा । या याज्ञिकांचा ॥ २४ ॥ आणि आयुर्वेदु आघवा । तो याच मोहोरा पांडवा । जे

[ **अमानित्वं** ] ज्ञानी मनुष्यामध्यें अभिमानरहितत्व संज्ञक गुण आहे, तो या लक्षणांनी ओळखावा. आतां 'अदांभिकत्व' ओळखण्यासाठीं त्याचे लक्षणांचा अभिप्राय सांगतों २. [ **अदंभित्वं** ] तर अदंभित्व असें असतें कीं ज्याप्रमाणें कृपणाचें मन, आपल्या पैशावर इतके आसक्त असते कीं जीव गेला तरी तो आपल्या पुरून ठेवलेल्या पैशांची जागा कोणालाहि सांगत नाहीं ३. त्याप्रमाणें अर्जुना! संकटें आपल्या प्राणावर येऊन बेतली तरीहि तो आपण केलेले पुण्यकर्म स्वतः देहचेष्टेने किंवा बोलून दाखवित नाहीं ४. ज्याप्रमाणें खोड्याळ गाय आलेला पान्हा चोरून पळविते किंवा उतारवयांत आलेली वेश्या आपलें प्रौढ वय [ वार्धक्य ] लपवितें ५. एखाद्या धनवान् मनुष्याला अरण्यांत चोरट्यांनीं एकट्यास गांठलें असतां तो ज्याप्रमाणें आपली श्रीमंती प्रगट न करतां लपवितो किंवा कुलीन मुलगी आपले विशेष अवयव वस्त्रांनीं आच्छादित करिते ६. अथवा शेतकरी ज्याप्रमाणें धान्य पेरल्यावर त्याच्यावर कुळवानें माती ओढून तें झांकून टाकतो, त्याप्रमाणें, आपण केलेलें दान व पुण्य जो कोणासहि कळूं न देतां झांकतो ७. आपल्या देहास वर वर सुशोभित करीत नाही. लोकांचे केवळ मनोरंजन करीत नाही आणि आपण केलेला धर्म आपल्याच वाचारूपी ध्वजेवर बांधण्याचें ज्यास ज्ञात नसते म्हणजे आपल्या दानधर्माविषयीं आपणच आपल्या तोंडानें टिमकी वाजवित नाहीं. म्हणजे सांगत नाहीं ८. तसेच इतर लोकांवर उपकार केलेले बोलून दाखवित नाही. व आपण अभ्यासिलेल्या विद्येची प्रौढी मिरवीत नाहीं व प्रतिष्ठेसाठीं आपल्या विद्येचा वा मिळविलेल्या पुण्याचा विक्रय करण्यास धजत नाहीं ९. तो आपल्या शरीराच्या उपभोगाकरितां जे कांहीं खर्च करतो त्यावरून तो कृपण आहे, असें वाटते पण बाकी धर्माची बाब आली म्हणजे मात्र थोडे फार हे न म्हणतां हवा तेवढा खर्च करितो २१०. घरांत पाहिले असतांना सर्व गोष्टींची टंचाई असल्याचे दिसून येते स्वतःचे शरीराची ठेवण पाहूं गेले असतां रोडकी असावयाची, परंतु दान करण्याचे बाबतींत तो कल्पवृक्षाशीहि प्रतिज्ञापूर्वक चढाओढ करतो ११. फार काय सांगावें!! स्वधर्माचें आचरण करण्यांत जो थोर असून उचित प्रसंग आला असतां अति उदार असतो आणि त्याचप्रमाणें आत्मानात्मविचाराच्या गोष्टि निघाल्या असतां जो तत्त्वनिर्णायक वादविवादांत महाचतुर असतो, बाकी इतर गोष्टींचें बाबतींत पाहूं लागलें असतां तो वेड्यासारखा राहत असतो १२. केळीचे सर्व अंग हलके व पोकळ दिसले तरीपण त्यांचीं फळें दाट रसभरित असतात १३. किंवा मेघाचे अंग ज्याप्रमाणें दिसण्यांत हलके व सहज वाऱ्यानें नाहींसे होऊन जातील असें दिसतें; परंतु तेच मेघ वर्षाव करूं लागले म्हणजे ती नवलाव्याची जलमयता पाहून ते भरीव आहेत, असा निश्चिय होतो १४. त्याप्रमाणें ज्याची तात्त्विक पूर्णता पाहिली असतां बुद्धीला समाधान वाटतें व वाणीला वर्णन करण्यास उचित ठिकाण तोच असतो १५. हें असो; ह्या उपर्युक्त चिन्हांचा ज्याच्या ठिकाणीं उत्कर्ष असल्याचा दृष्टीस पडतो, त्याच्या हातीं ज्ञान आलेंच असें समज १६. **अदांभिकत्व** ज्याला म्हणतात तें हें होय. आतां अहिंसेची लक्षणें सांगतों तीं ऐक १७. [ **अहिंसा** ] हें पहा! अनेक मतवाद्यांनीं आपल्या मताप्रमाणें अहिंसेचें पुष्कळ प्रकारेंकरून वर्णन केलें आहे, तें प्रथम ऐक १८. परंतु ती अहिंसा इतकी चमत्कारिक आहे कीं, ज्याप्रमाणें झाडाच्या फांद्या तोडून मग त्या झाडाच्या संरक्षणार्थ बुंध्याभोवतीं त्यांचेच कुंपण घालावे तशी आहे १९. किंवा आपलें हात तोडून ते शिजवून आपल्या भुकेची पीडा शमन करावी अथवा देऊळ मोडून त्याच सामानानें देवाभोवतीं आवाराची भिंत बांधावी २२०. त्याचप्रमाणें यज्ञादि कर्मांत हिंसाच करून मग तिच्यापासून अहिंसा उत्पन्न करावयाची असा हा पूर्व मीमांसेनें [ कर्मकांडकारांनीं ] विलक्षण निर्णय केला आहे २१. कारण, पावसाच्या अवर्षणामुळें होणाऱ्या उपद्रवानें सर्व जग अतिशय गांजून, जर्जर झाले म्हणून पर्जन्याकरितां 'कारीरि' इत्यादि अनेक याग करितात २२. तर त्या यागाच्या मुळाशीं पाहूं गेलें असतां त्या यज्ञांत प्रत्यक्ष पशूची हिंसा ही केली जाते, मग अहिंसेचा जो पलीकडील कांठ, तो त्या ठिकाणीं कसा दृष्टीस पडणार? २३. जर नुसती केवळ हिंसाच पेरली असतां त्या ठिकाणीं अहिंसा उगवेल काय? [ तर नाहीं. ] परंतु अर्जुना! या याज्ञिकांच्या धैर्याची नवलपूर्ण कमाल आहे! २४. बा पांडवा! आयुर्वेद व सर्व वैद्यकग्रंथहि अशाच तऱ्हेच्या धोरणाचे

१ चिन्हांवरून. २ अभिप्राय, रहस्य. ३ सांगत नाहीं, उघड करीत नाहीं. ४ आपल्या मुखानें, स्वतः. ५ लाथाळ, पान्हा चोरणाऱ्या गाईला. ६ वेश्या. ७ धनवान्. ८ संकटांत पडतो. ९ अरण्यांत. १० शेतकरी. ११ आच्छादी. १२ शब्दरूप ध्वजावर. १३ कीर्तिसाठी, प्रतिष्ठेसाठीं. १४ वाटे. १५ टंचाई, दैन्य. १६ ठेवण, तयारी. १७ पैज. १८ वेळीं.

जीवाकारणें करावा । जीवघातु ।। २५ ।। नानारोगें आहाळलीं । लोळतीं भूतें देखिलीं । ते हिंसा निवारावया केली । चिकित्सा कां ।। २६ ।। तंव ते चिकित्से पहिलें । एकाचे कंद खणविलें । एका उपडविलें । समूळीं सपत्रीं ।। २७ ।। एकें आड मोडविली । अजंगमाची खाल काढविली । एकें गर्भिणी उकडविली । पुटामाजीं ।।२८।। अजातशत्रु तरुवरां । सर्वांगीं देववविल्या शिरा । ऐसे जीव घेऊनि धनुर्धरा । कोरडे केले ।।२९।। आणि जंगमाही हात । लाऊनि काढिलें पित्त । मग राखिले शिणत । आणिक जीव ।।२३०।। अहो वसतीं धवळारें । मोडूनि केलीं देव्हारें । नागवूनि वेव्हारें । गवांदी घातली ।। ३१ ।। मस्तक पांघुरविलें । तंव तळवटी उघडें पडलें । घर मोडोनि केले । मांडव पुढें ।। ३२ ।। नाना पांघुरणें । जाळूनि जैसें तापणें । कां जालें आंगधुणें । कुंजराचें ।। ३३ ।। नातरी बैल विकूनि गोठा । पुंसा लावोनि बांधिजे गांठा । इया करणीं कीं चेष्टा ? । काइ हंसों ! ।। ३४ ।। एकीं धर्माचिया वाहणी । गाळूं आदरिलें पाणी । तंव गाळितया आहाळणीं । जीव मेले ।।३५।। एक न पचवितीचि कण । इये हिंसेचे भेण । तेथ कदर्थले प्राण । तेचि हिंसा ।। ३६ ।। एवं हिंसाचि अहिंसा । कर्मकांडीं हा ऐसा । सिद्धांतु सुमनसा । वोळखें तूं ।। ३७ ।। पहिलें अहिंसेचें नांव । आम्हीं केलें जंव । तंव स्फूर्ति बांधली हांव । इये मती ।। ३८ ।। तरी कैसेनि इयेतें गाळावें । म्हणौनि पडिलें बोलावे । तेवींचि तुवांही जाणावें । ऐसा भावो ।। ३९ ।। बहुतकरूनि किरीटी । हाचि विषो इये गोठी । एऱ्हवीं कां आडवाटीं । धांविजैलगा ? ।। २४० ।। आणि स्वमताचिया निर्धारा- । लागोनियां धनुर्धरा । प्राप्त मतांतरां । निर्वेचु कीजे ।। ४१ ।। ऐसी हे अवधारीं । निरूपिती परी । आतां ययावरी । मुख्य जें गा ।। ४२ ।। तें स्वमत बोलिजैल । अहिंसे रूप किजैल । जिया उठलिया आंतुल । ज्ञान दिसे ।। ४३ ।। परी तें अधिष्ठिलेनि आंगें । जाणिजे आचरतेनि बगें । जैसी कसवटी सांगे । वानियातें ।। ४४ ।। तैसें ज्ञानामनाचिये भेटी । सरिसेंचि अहिंसेचें बिंब उठी । तेंचि ऐसें किरीटी । परिस आतां ।। ४५ ।। तरी तरंगु नोलांडितु । लहरी पायें न फोडितु । सांचलु न मोडतु । पाणियाचा ।। ४६ ।। वेगें आणि लेसा । दिठी घालूनि आंविसा । जळीं बकु जैसा । पाउल सुये ।। ४७ ।। कां कमळावरी भ्रमर ।

आहेत, कारण अरे! एका जीवाचें रक्षण करण्याकरितां दुसऱ्या जीवाचा घात करावा! असें त्यांत सांगितलें आहे २५. नानाप्रकारच्या रोगांनीं पोळलेले पुष्कळ जीव दुःखानें लोळत पडलेले आहेत, असें पाहून ह्या घडत असलेल्या हिंसेच्या [दुःखाच्या] निवारणार्थ रोगांचीं परीक्षा-निदान करून म्ह. मूळ कारण शोधून औषधांची योजना केली २६. तों औषधांच्या योजनेकरितां पहिल्याप्रथम एका झाडाचें मूळ खणून आणीले व दुसऱ्या कांहीं झुडुपाला मुळासकट व पानासकट उपटून आणीले २७. कित्येक झाडें मध्येंच मोडतात. कांहीं मोठ्या झाडाची साल काढून आणतात व फळ देण्याच्या बेतात आलेल्या कांहीं वनस्पती खाली वर आच्छादन घालून उकडून काढतात २८. शत्रुमात्र रहित असल्यामुळें ज्यांना शत्रूच उत्पन्न झाला नाहीं अशा झाडांच्या सर्वांगावर घाव घालून त्यांतून निघणारा चीक काढून घेतात, याप्रमाणें धनुर्धरा! सर्व वनस्पतींचें जीवनसत्त्व नाहींसें करून तीं झाडें कोरडी करितात २९. आणि सजीवांच्या अंगांत हात घालून त्यांचे पोटांतील पित्त काढून घेतात व त्यामुळें रोगांनी पीडित झालेल्या अशा दुसऱ्या पुष्कळ जीवांचें रक्षण करितात २३०. अहो! ही अहिंसा कसली! नांदतीं घरें मोडून त्यांचें देव्हारे किंवा देऊळें केलीं, लोकांस सायकारी व्यवहारांत बुचाडून त्या द्रव्याच्या साह्यानें अन्नसत्रें घातलीं ३१. नेसलेले वस्त्र सोडून डोक्याला तें वस्त्र गुंडाळले तर त्यामुळें खालचें अंग उघडें पडतें, पुढील अंगण उघडें होतें म्हणून त्यावर घर मोडून मांडव घातलें ३२. अथवा पांघरूणें जाळून शेक घेण्यासाठीं शेकुटी केली, [ती जशी व्यर्थ] किंवा हत्तीला स्नान घालणें व्यर्थ. [कारण हत्तीला स्नान घालून स्वच्छ धुवून काढल्यावर पाण्यांतून वर येतांच पुनः तो सोंडेनें माती-चिखल घेऊन आपलें अंग भरवितो] ३३. किंवा बैल विकून टाकून त्या पैशांचा जसा गोठा बांधणें अथवा राघूस हांकून देऊन मग त्याच्याकरितां पिंजरा तयार करणे याचे नांव योग्य काम करणें म्हणावें कीं चेष्टा म्हणाव्यात! कीं यास काय हंसावें? हेंच समजत नाहीं ३४. कोणी धर्म संप्रदायाप्रमाणें हिंसा होऊं नये म्हणून पाणी गाळून पिण्यास आरंभ करतात. तो चिरगुटांतील पाणी पिळून घेतेवेळीं जीव मरतात, ही हिंसाच होते ३५. कोणी हिंसा होईल त्या भीतीनें धान्य न शिजवितां उपाशीच राहतात, [किंवा कच्चे धान्य खातात व तेच पचन न झाल्यामुळें] त्यामुळें त्यांचे प्राण कासावीस, व्याकुळ होतात. हीच हिंसा होय ३६. याप्रमाणें हे सुप्रसन्न मनाच्या अर्जुना! हिंसेलाच कर्मकांडांत अहिंसा मानून जो [उलटा] सिद्धांत केला आहे, तो नीट समजून घेऊन लक्षांत ठेव ३७. पहिल्या प्रथम अहिंसेची लक्षणें सांगावीं असें जेव्हां आम्ही अहिंसेचें नांव मनांत आणलें, तेव्हां आमच्या स्फूर्तीला, बुद्धीला अशी हांव-इच्छा झाली कीं, अगोदर हीं मतें सांगून खऱ्या अहिंसेचीं लक्षणें सांगावींत ३८. परंतु वर वर्णन केलेल्या नांवाच्या मात्र अहिंसा, यांना कशा गाळाव्या, म्हणून त्यांचें वर्णन करणें भाग पडलें, त्याचप्रमाणें [त्या खोट्या अहिंसा आहेत हे] तुलाहि कळावें, असाहि आमच्या अंतःकरणांत भाव-हेतु होता ३९. अर्जुना! मुख्यत्वेंकरूनच हाच हेतु मनांत येऊन आम्हीं तुला वरील खोट्या अहिंसेचीं लक्षणें सांगितली. नाहींतर प्रतिपाद्य विषयाचा धोपट मार्ग सोडून मतमतांतरें सांगण्याच्या आडमार्गानें कोणी उगीच धांवेल कां? २४०. आणि अर्जुना! आपलें स्वतःचें मत निर्णित करून स्थापन करण्याकरितां प्रथम दुसऱ्या प्राप्त असलेल्या मतांविषयीं विचार व निर्णय करावा लागतो ४१. ह्याप्रमाणें आपलें मत स्पष्ट सांगण्याची ही पद्धति आहे तर आतां यापुढें आमचें जें मुख्य मत आहे, ते ऐक ४२. ते आमचें मत स्पष्ट सांगून अहिंसेची यथार्थ लक्षणें सांगूं. त्यामुळें अहिंसेचे स्वरूप समजेल. जी अहिंसा अंतःकरणांत अभिव्यक्त झाली असतां तेथे स्पष्ट ज्ञान झाले आहे, असें दिसून येईल ४३. परंतु ती अहिंसा, ज्याच्या चित्तांत अहिंसावृत्ति असून ती अंगावर पूर्ण बाणली आहे, ती मात्र त्याच्या आचारणावरूनच समजून येते. ज्याप्रमाणें सोनें कसोटीस लावले म्हणजे त्या सोन्याचा कस ती ठरविते ४४. त्याप्रमाणें खरोखर ज्ञानामनाची भेट झाली तरच [मनांत ज्ञान अभिव्यक्त झालें तर लागलींच] अहिंसेचा ठसा मनावर उमटतो. [मूर्तिमंत अहिंसा उत्पन्न होते] अर्जुना! तो ठसा कसा उमटतो तें ऐक ४५. पाण्याच्या लाटा उल्लंघन न करतां वा लहरी पायानें न फोडतां, न मोडतां आणि पाण्याचा स्थिरपणाहि न मोडूं देतां ४६. वेगानें व हळूच, जपून आपलें आमिष, खाद्य जो मासा, त्यावर नजर ठेवून बगळा ज्याप्रमाणें पाण्यांत पाऊल घालतो ४७. किंवा कमळाच्या आंतील केसर चुरगळेल, दुखावेल या शंकेने-भीतीनें भ्रमर जसें कमळावर हळूच जपून पाय ठेवतात

१ पोकली. २ औषधाची योजना. ३ मध्यें मोडली. ४. वृक्षाचीं, ५ साल. ६ सालीवर झांकण घालून. ७ शत्रुरहित. ८ सत्व. ९ निःसत्व. १० सजीवासहि. ११ पीडित झालेलें. १२ नांदती. १३ व्यापारांत. १४ अन्नछत्र.

पाय ठेविती हळुवार । कुचुंबैल केसर । इया शंका ॥ ४८ ॥ तैसे परमाणु पां गुंतले । जाणूनि जीव सानुले । तेथ कारुण्यामाजीं पाउलें । लपवूनि चाले ॥ ४९ ॥ ते वाट कृपेची करितु । ते दिशाचि स्नेहभरितु । जीवातळीं आंथरितु । आपुला जीवु ॥ २५० ॥ ऐसिया जंतना । चालणें जया अर्जुना । हें अनिर्वाच्य परिमाणा । पुरिजेना ॥ ५१ ॥ पैं मोहाचेनि सांगडें । लासी पिलीं धरी तोंडें । तेथ दांतांचे आगरंडे । लागती जैसे ॥ ५२ ॥ कां स्नेहाळु माये । तान्हयाची वास पाहे । तिये दिठी आहे । हळुवार जें ॥ ५३ ॥ नाना कमळदळें । डोलविजंती ढाळें । तो जेणें पाडें बुबुळें । वारा घेपे ॥ ५४ ॥ तैसेनि मार्दवें पाय । भूमीवरी न्यसीतु जाय । लागती तेथ होय । जीवां सुख ॥ ५५ ॥ ऐसिया लघिमा चालतां । कृमि कीटक पंडुसुता । देखे तरी माघौता । हळूचि निघे ॥ ५६ ॥ म्हणे पावो धडफडील । तरी स्वामीची निद्रा मोडैल । रचलेपणा पडैल । झोंती हन ॥ ५७ ॥ इया काकुळती । वाहँणी घे माघौती । कोणेही व्यक्ती । न वंचे वरी ॥ ५८ ॥ जीवाचेनि नांवें । तृणातेंही नोलांडवे । मग न लेखितां जावें । हे कें गोठी ? ॥ ५९ ॥ मुंगिये मेरु नोलांडवे । मशका सिंधु न तरवे । तैसें भेटलियां न करवे । अतिक्रमु ॥ २६० ॥ ऐसी जयाची चाली । कृपाफळी फळा आली । देखसी जियाली । दया वाचे ॥ ६१ ॥ स्वयें श्वसणेंचि सुकुमार । मुख मोहाचें माहेर । माधुर्या जाहले अंकुर । दशन तैसे ॥ ६२ ॥ पुढां स्नेह पाझरे । माघां चालती अक्षरें । शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥ ६३ ॥ तंव बोलणेंचि नाहीं । बोलों म्हणे जरी कांहीं । तरी बोल कोणाहि । खुपेल कां ॥ ६४ ॥ बोलतां अधिकुही निघे । तरी कोण्हाही वर्मीं न लगे । आणि कोण्हासि न रिघे । शंका मनीं ॥ ६५ ॥ मांडिली गोठी हन मोडैल । वासिपैल कोणी उडैल । आइकोनि वोवांडिलें । कोण्ही जरी ॥ ६६ ॥ तरी दुवाळी कोणा नोहावी । भुंवई कवणाची नुचलावी । ऐसा भावो जीवीं । म्हणौनि उगा ॥ ६७ ॥ मग प्रार्थिला विपायें । जरी लोभें बोलों जायें । तरी परिसतया होये । मायबापु ॥ ६८ ॥ कां नादब्रह्मचि मुसे आलें । कीं गंगापय असललें । पतिव्रते आलें । वार्धक्य जैसें ॥ ६९ ॥ तैसें साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ । शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥ २७० ॥ विरोधुवादुबळु । प्राणितापढाळु ।

४८. त्याप्रमाणें, परमाणूंमध्यें सुद्धां अतिसूक्ष्म लहान लहान जीव भरलेले आहेत, असें जाणून [ ते न मरावेत अशी ] मनांत करुणा उत्पन्न होऊन तींत आपलीं पाऊलें लपवून ती जमिनीवर बेतानें ठेवून चालतो; ४९. तो ज्या वाटेनें जातो तिकडे तो रस्ताच कृपादृष्टीनें भरतो व मग तो चालतो व ज्या दिशेस त्याची दृष्टि जाते ती दिशाच स्नेह-भावानें भरलेली करतो व कोणाहि प्राण्यास उपद्रव होऊं नये म्हणून जीवातळीं आपला जीव आंथरतो. [ आपल्या जीवापेक्षां त्याच्या जीवाला जपतो ] २५०. अर्जुना! अशा रीतीनें ज्याचे जपून चालणें असते त्याच्या अहिंसेचें माप शब्दांनी वर्णन करून अचूक करतां येत नाहीं. असें त्याचे अनन्यसाधारण महत्त्व आहे ५१. मोहाच्या योगानें मांजरी आपल्या तोंडांत पिलास धरिते, त्या वेळेस ज्याप्रमाणें तिच्या दातांची टोंकें त्या पिलांस लागत नाहींत ५२. किंवा ज्याप्रमाणें ममताळू आईची आपल्या तान्ह्या मुलाची वाट पाहण्याकडे दृष्टि लागलेली असतें तेव्हां त्या दृष्टींत प्रेमपूर्ण नाजुकपणा असतो ५३. अथवा कमळाच्या पानानें हळूं हळूं वारा घेऊं लागलें असतां ज्याप्रमाणें त्यापासून निघालेला वारा सुखकर असल्यामुळें डोळ्यांच्या बुबुळास समाधान होते ५४. तितक्याच मऊपणानें तो जमिनीवर पाय हळूच टेकून चालतो व ते पाय सहज ज्या जीवांना लागतात त्यांना त्रास न होतां, जपून टाकल्यामुळें उलट सुखच होतें ५५. अर्जुना! याप्रमाणें तो हळूच चालत असतांना जमिनीवर किडा किंवा मुंगी त्याचे दृष्टीस पडली, तर तो हळूच माघारा फिरतो ५६. जर आपण पाय जोरानें आपटीत चाललों तर स्वामींच्या म्ह. जीवात्म्याच्या निद्रेचा भंग होईल व त्यांच्या प्रकृतीच्या सहज स्वस्थपणास धक्का बसेल व विक्षेप होईल ५७. अशी दया मनांत उत्पन्न होऊन, कोणत्याहि प्राण्यांचें उल्लंघन न करतां माघारा फिरतो; ५८. जीवाचा नाश होईल म्हणून गवतावरहि पाय देऊन तुडवून जात नाहीं, मग एखादा प्राणी दृष्टीस पडून त्याला न जुमानतां त्यास तुडवून तो वाट चालेल ही गोष्ट त्याचे हातून कशी घडेल? ५९. ज्याप्रमाणें मुंगीला मेरु पर्वत ओलांडून जातां येत नाहीं, अथवा चिलटाला समुद्र तरून जातां येत नाहीं, त्याप्रमाणें प्राण्यांची भेट झाली असतां ज्याच्यानें त्याचे उल्लंघन करवत नाहीं २६०. अशी ज्याची चालण्याची रीत कृपारूप फळांनीं फळास आली व वाणींतहि मूर्तिमंत दया जगलेली आहे, हे तूं पाहशील ६१. जो स्वतः श्वासोच्छ्वास करावयाचा तोहि शेजारच्या मनुष्यास त्रास न होईल अशा बेतानें हळू नाजुकपणानें करतो व त्याचे मुख पाहिलें असतां केवळ प्रेमाचें माहेरघरच आहे असें दिसतें, तसेंच त्याचे दांत हे जणुं माधुर्याला अंकुरच फुटल्याप्रमाणें दिसतात ६२. तो बोलत असतां त्याच्या तोंडांतून अक्षरें बाहेर पडण्याचें अगोदर तोंडावर व पुढें स्नेहभाव पाझरत असल्याचे दृष्टीस पडते व चित्तांत अगोदर दया प्रगट, उत्पन्न होऊन नंतर कृपेनें भरलेलें असे शब्द मुखावाटे बाहेर पडतात ६३. अगोदर त्याचे होतां होईतोंपर्यंत कोणाशीं बोलणेंच नसते. त्यांतूनहि कांहीं बोलूं म्हणेल म्ह० कदाचित् त्यानें बोलण्याचे मनांत आणलें, तर आपलें बोलणें कोणास लागेल कीं काय! [ अशी त्यास भीति वाटत असते ] ६४. बोलतांना यदाकदाचित् आपल्या तोंडांतून कमीजास्त कांहीं शब्द निघाले, तर ते कोणाच्या वर्मीं न लागावेत व त्यापासून कोणाच्याहि मनांत शंका उत्पन्न होऊं नये ६५. त्यापासून कोणाचा ठरलेला बेत बिघडेल व मोडेल, कोणी भिईल व कोणी दचकून जागें होईल, किंवा उडून जाईल आणि जरी कोणी आपले बोलणे ऐकूनच त्याचा तिरस्कार करील ६६. तरी आपल्या बोलण्यानें कोणाला पीडा होऊं नये व कोणी भिंवया चढवून आपलेकडे पाहूं नये, असा हेतू मनांत आणून जो न बोलतां उगा असतो ६७. मग 'आपण बोलावे' अशी कदाचित् कोणी प्रार्थना केली व प्रेमानें जर तो बोलूं लागला तर ऐकणारास त्याचे बोलणें-ऐकून तो आई-बापच कीं, काय असें वाटण्याइतकें आनंददायक असते ६८. किंवा त्याचे बोलणे म्हणजे मधुर नाद [ नादब्रह्मच ], वेद हा आकार घेऊन मूर्तिमंत पुढें उभा राहिला आहे कीं, काय — असे वाटते अथवा स्वच्छ गंगोदक उसळले आहे [ असे स्वच्छ व पवित्र ] किंवा पतिव्रता स्त्रीला जणुं वृद्धपणा प्राप्त झाला आहे ६९. त्याप्रमाणें खरें आणि मऊ परिमित सरळ, प्रेमळ असे व जणुं अमृताच्या लाटाच आहेत कीं, काय असे त्याच्या तोंडांतून शब्द निघतात २७०. जे शब्द व्याजस्तुतीनें भरलेलें उपरोधिक

१ चुरडेल. २ अतिशय बारीक. ३ जपून. ४ वागतात. ५ योगानें. ६ मार्टी, मांजरी. ७ अग्रें, डोकें. ८ वाट. ९ प्रेम. १० पानानें. ११ वारा घेतात. १२ हळूहळू. १३ ठेवीत. १४ हळू. १५ आपटेल. १६ स्वास्थास. १७ धक्का. १८ मार्ग. १९ चाले. २० जुमानतां. २१ उल्लंघन. २२ वागणूक. २३ जगून राहिली. २४ प्रेमाचें. २५ दांत. २६ खोचेल. २७ प्रचलीत, चालू. २८ भिईल व दचकून परतेल. २९ तिरस्कारील, ओलांडील.

उपहासु छळु । वर्मस्पर्शु ॥ ७१ ॥ आटु वेगु विंदाणु । आशा शंका प्रतारणु । हे संन्यसिले अवगुणु । जया वाचा ॥ ७२ ॥ आणि तयाचि परी किरीटी । थाउ जयाचिये दिठी । सांडिलिया भ्रुकुटी । मोकळिया ॥ ७३ ॥ कां जे भूतीं वस्तु आहे । तिये रुपों शके विपायें । म्हणौनि वासु न पाहे । बहुतकरूनी ॥ ७४ ॥ ऐसाही कोणे एके वेळे । भीतरले कृपेचेनि बळें । उघडोनियां डोळे । दृष्टी घाली ॥ ७५ ॥ तरी चंद्रबिंबौनि धारा । निघतां नव्हती गोचरा । परी एकसरें चकोरां । निघती दोंदें ॥ ७६ ॥ तैसें प्राणियांसि होये । जरी तो कहीं वासु पाहे । तया अवलोकनाची सोये । कूर्मींही नेणें ॥ ७७ ॥ किंबहुना ऐसी । दिठी जयाची भूतांसी । करही देखसी । तैसेचि ते ॥ ७८ ॥ तरी होऊनियां कृतार्थ । राहिले सिद्धांचे मनोरथ । तैसे जयाचे हात । निर्व्यापार ॥ ७९ ॥ अक्षमें आणि संन्यासिलें । कां निरिंधन आणि विझालें । मुकेनि घेतलें । मौन जैसें ॥ २८० ॥ तयापरी कांहीं । जयां करां करणें नाहीं । जे अकर्तयाच्या ठायीं । बैसों येती ॥ ८१ ॥ आसुडैल वारा । नख लागेल अंबरा । इया बुद्धी करां । चळों नेदी ॥ ८२ ॥ तेथ आंगावरिलीं उडवावीं । कां डोळां रिगतें झाडावीं । पशुपक्ष्यां दावावीं । त्रासमुद्रा ॥ ८३ ॥ इया केउतिया गोठी । नावडे दंडु काठी । मग शस्त्राचें किरीटी । बोलणें कें ? ॥ ८४ ॥ लीलाकमळें खेळणें । कां पुष्पमाळा झेलणें । न करी म्हणे गोफणें । ऐसें होईल ॥ ८५ ॥ हालवतील रोमावळी । यालागीं आंग न कुरवाळी । नखांची गुंडाळी । बोटांवरी ॥८६॥ तंव करणेंयाचाचि अभावो । परी ऐसाही पडे प्रस्तावो । तरी हातां हाचि सरावो । जे जोडिजती ॥८७॥ कां नाभिकारा उचलिजे । हातु पडिलियां देइजे । नातरी आर्तातें स्पर्शिजे । अळुमाळु ॥ ८८ ॥ हेंही उपरोधें करणें । तरी आर्तभय हरणें । नेणती चंद्रकिरणें । जिव्हाळा तो ॥ ८९ ॥ पावोनि तो स्पर्शु । मळयानिळु खरपुसु । येणें मानें पशु । कुरवाळणें ॥ २९० ॥ जे सदा रिते मोकळे । जैशीं चंदनांगें निसळें । न फळतांही निर्फळें । होतीचिना ॥ ९१ ॥ आतां असो हें वाग्जाळ । जाणें तें करतळ । सज्जनांचें शीळ । स्वभाव जैसे ॥९२॥ आतां मन तयाचें । सांगों म्हणों जरी साचें । तरी सांगितलें कोणाचे । विलास हे ? ॥९३॥

आहेत, ज्यांपासून वाद उत्पन्न होतो व दुसऱ्यास संताप, त्रास उत्पन्न होतो, तसेंच चेष्टा, कुचेष्टा, छळवाद, वंचनाकारक आणि जे दुसऱ्याच्या वर्मी झोंबणारे शब्द बोलणें ७१. आणि अडवणूक, अति वेगाने बोलणें, कपट, खोटी आशा लावणें, कुशंका काढणे, व ठकबाजी करून फसाविणें, हे बोलण्यांतील दोष ज्याच्या वाणीनें पूर्ण टाकले आहेत ७२. त्याचप्रमाणें अर्जुना! ज्याची दृष्टि स्थिर असते व भिवया मोकळ्या असतात, [ म्हणजे रागानें भुवया चढविल्या नसल्यामुळें त्याच्या कपाळावर आठ्या दृष्टीस पडत नाहींत ] ७३. कारण प्रत्येक प्राण्यांत परब्रह्मवस्तु भरलेली आहे. तिला कदाचित् दृष्टि खुपेल व त्रास होईल म्हणून जो बहुतकरून कोणाकडेहि पहातच नाहीं ७४. असें असतांहि एखाद्या वेळीं आंतल्या कृपेच्या बळानें जर डोळे उघडून त्याने कोणाकडे दृष्टि घातली ७५. तर, चंद्रबिंबांतून निघणाऱ्या अमृताच्या धारा जरी कोणाच्या दृष्टीस पडत नाहींत, तरीपण एकसारखे चकोरपक्ष्यांना त्या कळतात, त्यामुळें त्यांना आनंद होऊन ते पुष्ट होतात ७६. त्याप्रमाणें ज्या प्राण्याकडे त्यानें आपल्या दृष्टीनें पाहीलें त्याला त्यापासून समाधान होतें त्याच्या अवलोकनाची पद्धति किती प्रेमयुक्त आहे, हें कांसवीलाहि माहीत नाहीं. [ कांसवीच्या केवळ कृपादृष्टीनेंच तिचीं मुलें वाढतात असें तिच्या दृष्टींत प्रेम, पोसण्याचें सामर्थ्य आहे ] ७७. अधिक काय सांगावें! जो भूतमात्रांकडे, अशा प्रेमळ दृष्टीनें पाहातो, तसेंच त्याच्या हाताचे गुण पाहूं गेलें असतां तेहि दृष्टिप्रमाणेच मृदु आहेत असें तुला दिसेल ७८. ज्याप्रमाणें ब्रह्मनिष्ठांचे मनोरथ कृतार्थतेनें पूर्ण झालेले असतात, त्याप्रमाणें ज्यांचें हातांस कांहीं एक करण्याची इच्छा, कर्तव्यबुद्धि नसून ते निर्व्यापार असतात ७९. अगोदरच जन्मांध त्यांतहि त्यानें ज्याप्रमाणें पाहण्याची क्रिया सोडावी, किंवा आधींच काष्ठरहित अग्नि आणि पुन: त्यांतून तो जसा विझावा अथवा मूळच्याच मुक्या मनुष्यानें जसें मौनव्रत धारण करावें २८०. तसें ज्याच्या हातांना कांहीं एक करावयाचें असें उरलेले नसतें व जे हात कांहीं एक कर्तव्य नसलेल्या सिद्ध पुरुषाचें ठिकाणीं स्वस्थ राहण्यास आलेलें असतात ८१. वाऱ्याला धक्का लागेल किंवा आकाशाला नख लागेल, अशा बुद्धीनें जो आपले हात हालवीतच नाहीं ८२. तेथें अंगावर बसलेली माशी वगैरे उडवावी, किंवा डोळ्यांत जाणारी म्ह. शिरणारी घुंगुरटीं एकीकडे करावीं अथवा पशुपक्ष्यांना आपल्या रागीट डोळ्यांनीं भीति वाटेल असा अविर्भाव दाखवावा ८३. या गोष्टी त्याच्याकडून कोठून घडणार? हे किरीटी! त्याला हातांत दंड किंवा काठी घेणेंहि जर आवडत नाहीं, तर मग हातांत शस्त्र घेण्याची गोष्ट कशाला पाहिजे? ८४.–हातांत लीलेनें कमळ घेऊन फिरविल्यास अथवा फुलांचा हार झेलल्यास ते गोफणींतील दगडाप्रमाणें एकाद्या जीवास लागून त्यास इजा होईल, अशा समजुतीनें हेंहि व्यापार जो हातानें करीत नाहीं ८५. अंगावरील लवेच्या रांगा हालतील व एखाद्या जीवास इजा होईल म्हणून जो अंग कुरवाळीत नाहीं. अंगावरून हात फिरवित नाहीं व बोटांची नखें काढली असतां हिंसा होईल, म्हणून जो ती बोटावर गुंडाळ्या होईपर्यंत वाढवितो ८६. तो कर्तव्यरहित असल्यामुळें अगोदर कोणतीहि गोष्ट त्यास हातानें करावयाचीच नसते. परंतु जर हातांस कांहीं करण्याचा प्रसंग आलाच तर हात जोडण्याशिवाय दुसरा अभ्यास ज्या हाताला ठाऊक नाहीं ८७. किंवा हातानें व्यापार केला तर दुसऱ्यास हात उचलून 'भिऊं नकोस' असे अभय वचन देणें किंवा एखादा कोणी पडत असल्यास त्यास हातानें सांवरणें अथवा पीडित मनुष्याची पीडा कमी व्हावी म्हणून त्याच्या अंगावरून हळूच हात फिरविणें ८८. ह्या गोष्टींहि तो मोठ्या संकटानें करतो, तथापि पीडित मनुष्याची चिंता तो हस्तस्पर्शानें दूर करतो, या त्याच्या हस्तस्पर्श करण्यानें जो कृपेचा पाझर सुटतो, तसा ओलावा चंद्रकिरणांसहि माहित नसतो ८९. त्याच्या हस्तस्पर्शाच्या मृदुत्वाच्या मानानें पाहिले तर मलय पर्वतावरून येणाऱ्या वाऱ्याचा स्पर्शहि कठीण भासेल इतका त्याचा हस्तस्पर्श मृदु व सुखकर असतो. अशाच हस्तस्पर्शानें त्याचे पशूंनाहि कुरवाळणें असते २९०. जे हात नेहमी रिकामे व मोकळे असतात तरीपण चंदनाच्या झाडाचा कोणताहि भाग थंडगार सुगंधमय असतो व त्याला फळें न येतांहि तो निष्फळ आहे असें कोणास म्हणतां येत नाहीं. तसेच याचे हात नेहमीं शीतल व सफल असतात ९१. आतां हें वाक्पांडित्य राहूं दे; सज्जन मनुष्याचें शील व स्वभाव हीं जशीं [ पवित्र ] असतात, तसेंच त्याच्या हाताचें आचरण [ पवित्र ] असतें ९२. आतां त्याचें मन खरोखर कसें आहे म्हणून जर सांगावयाचें म्हटलें तर आतांपर्यंत ह्या ज्या गोष्टी वर्णन केल्या, त्या कृति तरी कोणाच्या आहेत? ९३. झाडांच्या फांद्या म्हणजेच झाडें

१ निंदा. २ अंट. ३ अवसान, जोर. ४ खोंचदार बोलणें. कोटिक्रम, पेंच. ५ ठकबाजी, लबाडी.

काइ शाखा नव्हे तरु ? । जळेंवीण असे सागरु ? । तेज आणि तेजाकारु । आन काई ? ॥ ९४ ॥ अवयव आणि शरीर । हे वेगळाले कीर ? । कीं रसु आणि नीर । सिनानीं आथीं ? ॥ ९५ ॥ म्हणौनि हे जे सर्व । सांगितलें बाह्यभाव । तें मनचि गा सावयव । ऐसें जाणें ॥ ९६ ॥ जें बीज भुईं खोंविलें । तेंचि वरी रुखें जाहलें । तैसें इंद्रियद्वारीं फांकलें । अंतरचि कीं ॥ ९७ ॥ पैं मानसींचि जरी । अहिंसेची अवंसरी । तरी कैंची बाहेरी । वोसंडेल ? ॥ ९८ ॥ आवडे ते वृत्ती किरीटी । आधीं मनौनीचि उठी । मग ते वाचे दिठी । कारांसि ये ॥ ९९ ॥ वांचूनि मनींचि नाहीं । तें वाचेसि उमटेल काई ? । बींवीण भुईं । अंकुर असे ? ॥ ३०० ॥ म्हणौनि मनपण जैं मोडे । तैं इंद्रिय आधींचि उबंडे । सूत्रधारेंवीण साइखंडे । वांवो जैसे ॥ १ ॥ उगमींचि वाळूनि जाये । तें वोघीं कैचें वाहे । जीवु गेलिया आहे । चेष्टा देहीं ? ॥ २ ॥ तैसें मन हें पांडवा । मूळ या इंद्रियभावा । हेंचि रांहटें आघवां । द्वारीं इहीं ॥ ३ ॥ परी जिये वेळीं जैसें । ''जें होऊनि आंतु असे । बाहेरी ये तैसें । व्यापाररूपें ॥ ४ ॥ यालागीं साचोकारें । मनीं अहिंसा थांवे थोरें । जैसी पिकली द्रुती आंदरें । बोभांत निघे ॥ ५ ॥ म्हणौनि इंद्रियें तेचि संपदा । वेंचितां हीं उदावांदा । अहिंसेचा धंदा । करितें आहाती ॥ ६ ॥ समुद्रीं दाटे भरितें । तैं समुद्रचि भरी तरियांतें । तैसें स्वसंपत्ति चित्तें । इंद्रियां केलें ॥ ७ ॥ हें बहु असो पंडितु । धरूनि बाळकाचा हातु । वोळी लिही व्यक्तु । आपणचि ॥ ८ ॥ तैसें दयाळुत्व आपुलें । मनें हातापायां आणिलें । मग तेथ उपजविलें । अहिंसेतें ॥ ९ ॥ याकारणें किरीटी । इंद्रियांचिया गोठी । मनाचिये रांहाटी । रूप केलें ॥ ३१० ॥ ऐसा मनें देहें वाचा । सर्व संन्यासु दंडाचा । जाहला ठायीं जयाचा । देखशील ॥ ११ ॥ तो जाण वेल्हाळ । ज्ञानाचें वेळाउळ । हें असो निखिळ । ज्ञानचि तो ॥ १२ ॥ जे अहिंसा कानें ऐकिजे । ग्रंथाधारें निरूपिजे । ते पाहावी हैं उपजे । तैं तोचि पाहावा । ॥ १३ ॥ ऐसें म्हणितलें देवें । तें बोलें एकें सांगावें । परी फांकलों हें उपसाहावें । तुम्हीं मज ॥ १४ ॥ म्हणाल हिरवें चारीं गुरूं । विसरे मागील मोहरें धरूं । कां वारेलंगें पाखिरूं । गगनीं भरें ॥ १५ ॥ तैसिया प्रेमाचिया स्फूर्ती । फावलिया रसवृत्तीं । वाहविला मती । आकळेना ॥ १६ ॥ तरी तैसें नोहे अवधारा । कारण

नव्हेत काय? पाण्याशिवाय समुद्र आहे काय? तेज आणि सूर्य ही निरनिराळीं आहेत काय? ९४. अवयव आणि शरीर ही निरनिराळीं आहेत काय? किंवा पाणी व पाण्याची गोडी वा ओलावा हीं कांहीं निरनिराळीं आहेत काय? ९५. म्हणून हीं जीं सर्व इन्द्रियांची बाह्य व्यापारात्मक लक्षणें सांगितली तीं म्हणजे मूर्तिमंत मनच आहे असें समज ९६. जें बीज जमिनींत पेरलेलें असतें, तेंच अंकुरित होऊन वर झाडाच्या रूपानें दृष्टीस पडतें; त्याप्रमाणें इन्द्रियांकडून घडणाऱ्या व्यापारांच्याद्वारां अंतर्मनच पसरलें आहे. [कारण ते मनाच्याच प्रेरणेनें होतात] ९७. परंतु मनांतच जर अहिंसेचा उदय झाला नसेल तर इन्द्रियांच्याद्वारां ती बाहेर कशी पडेल? ९८. अर्जुना! कोणतीहि वृत्ति अगोदर मनांमध्येंच उत्पन्न होत असते आणि मग तीच वाचा, दृष्टि व हात यांच्याकडे येते. [मनोवृत्त्यनुसारच अनुक्रमें ज्ञानेन्द्रियांचें व कर्मेंद्रियांचे व्यवहार प्रारंभ होतात हें 'वाचा', 'दिठी' व 'कर' या उभयेंद्रियांच्या उपलक्षणात्मक पदयोजनेनें सूचित केलें आहे] ९९. बाकी जी गोष्ट मनांतच येत नाहीं, ती वाचेनें बोलून प्रगट केली जाईल काय? हें पहा! बीजाशिवाय जमिनींत अंकुर उत्पन्न होईल काय? ३००. म्हणून ज्याप्रमाणें सूत्रधाराशिवाय कळसूत्री बाहुली हालत नाहीं, व्यर्थ असते, त्याप्रमाणें मनाचा मनपणा नाहींसा होतो म्ह. मनांत कोणचाहि व्यापार करण्याची प्रवृत्ति-प्रेरणा निर्माण होत नाहीं, तेव्हां इन्द्रियें अगोदरच निर्बल होतात १. जें पाणी उगमापाशींच आटून जातें, तें नदीच्या ओघांत कोठून वाहणार? हें पहा! देहांतून जीव [प्राण] गेल्याबरोबर देहाकडून कांहीं हालचाली वा व्यापार घडतात काय? २. त्याप्रमाणें पार्था! मन हें या सर्व इन्द्रियांच्या व्यापारास मूळ कारण आहे व हेच सर्व इन्द्रियद्वारानें व्यवहार करीत असते ३. परंतु ज्यावेळीं मन आंत जशा वासनेच्या रूपानें होऊन असतें तसेंच तें इंद्रियांच्या व्यापाररूपानें बाहेर येत असते ४. ह्याकरितां ज्याप्रमाणें पिकलेल्या फळाचा सुवास आपोआप उत्साहपूर्वक चहूंकडे घमघमत बाहेर निघून पसरतो, त्याप्रमाणें खरोखर मनांत खरी अहिंसा चांगली बळकट कायम झाली म्हणजे इंद्रियांच्या व्यापारामध्यें अहिंसाच दृष्टीस पडतें ५. म्हणून सर्व इंद्रियें हीं [मनांतील] अहिंसा हीच आपली संपत्ति असें पूर्णपणें मानून अहिंसेचीच देवघेव, अहिंसेचाच व्यापार करीत असतात ६. किंवा ज्याप्रमाणें समुद्राला पूर्ण भरती आली म्हणजे समुद्रच आपल्या पाण्यानें खाड्या पूर्ण भरतों त्याप्रमाणें मनांत अहिंसेचें भरते आले म्हणजे तें मनच या इन्द्रियांना आपल्या अहिंसात्मक जलसंपत्तीनें पूर्णपणें भरून टाकतें ७. हे फार बोलणें राहूं दे. पंतोजी ज्याप्रमाणें लहान मुलाचा हात धरून त्याजकडून आपणच स्पष्ट सुरेख अक्षरांच्या ओळी लिहवितो ८. त्याप्रमाणें मनहि आपले ठिकाणीं पूर्णत्वास आलेले दयाळुत्व हस्तपादादि इन्द्रियांचे ठिकाणीं आणते व ते मनच हें त्या इन्द्रियांच्या ठिकाणीं अहिंसा उत्पन्न करवितें [म्हणूनच त्या इन्द्रियाकडून अहिंसेचें आचरण घडतें] ९. ह्याकरितां, अर्जुना! इद्रियांकडून घडणाऱ्या अहिंसेच्या म्हणून ज्या गोष्टी विवरण करून सांगितल्या त्या मनाच्याच अहिंसेच्या आहेत, असें समज १०. अशा प्रकारें ज्यानें कायावाचामनेंकरून सर्व हिंसेचा त्याग केला आहे, असें तूं पाहशील ११. तो पुरुष ज्ञानाचा विलासी व विस्तृत वसतिस्थान आहे, असें समज; हें राहूं दे फार तर काय? तो मूर्तिमंत केवळ ज्ञानच आहे १२. ज्या अहिंसेचें वर्णन आपण कानांनीं ऐकतों अथवा ग्रंथाच्या आधारानें आपण जिचें निरूपण करितों, ती अहिंसा प्रत्यक्ष पहावी अशी जेव्हां इच्छा निर्माण होते तेव्हां त्याच पुरुषाचें दर्शन घ्यावें म्हणजे झाले १३. श्रीज्ञानदेव म्हणतातः—असें जें श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें, तें मी वास्तविक तुम्हांला एका शब्दांत सांगावयास पाहिजे होतें, परंतु त्याचा फार विस्तार झाला, ह्याबद्दल आपण मला क्षमा करावी १४. कदाचित् तुम्ही असें म्हणाल कीं, जनावर हिरवे गवत खाऊं लागलें म्हणजे खात खात पुढें जातां जातां मागील क्रम व घराची वाट धरण्याचें विसरते, किंवा पक्षी आकाशांत वायुवेगानें उडूं लागल्यावर पुढेंच आपल्या घरट्यापासून दूरदूर भराऱ्या मारीत जातो १५. त्याप्रमाणें प्रेमाच्या भरांत स्फुरण येऊन निरनिराळ्या रसवृत्तींचा आस्वाद घेत माझी बुद्धि वाहवत गेली ती मलाच आवरेनाशी झाली आहे १६. असें आपण संतजन म्हणाल; पण हा तशांतला कांहीं प्रकार नाहीं

१ सूर्य. २ निरनिराळी. ३ वृक्ष. ४ मनच. ५ अडचण. हरकत, न्यूनता. ६ कशीं बाहेर पडेल? ७ निर्बल, पालथे, पराङ्मुख. ८ कळसूत्री बाहुली. ९ व्यर्थ. १० व्यापार करीं. ११ वासना. १२ स्थिरावें. १३ सुवास. १४ आपोआप. १५ सर्वत्र घमघमत पसरतो. १६ पूर्णपणें. १७ खाड्यांना. १८ पंतोजी. १९ अगदीं स्पष्ट. २० व्यापाराचें. २१ हिंसेचा. २२ विलासी. २३ घर. २४ चोख, मूर्तिमंत. २५ विस्तारलें. २६ मार्ग. २७ वाऱ्याच्या वेगानें.

असें विस्तारा । येऱ्हवीं पदें तरी अक्षरां । तिहींचेंचि ॥१७॥ अहिंसा म्हणतां थोडी । परी ते तैंचि होय उघडी । जैं लोटिजती कोडी । मतांचिया ॥ १८ ॥ येऱ्हवीं प्राप्तें मतांतरें । थातंबूनि आंगभरें । बोलिजैल ते न सरे । तुम्हांपाशीं ॥१९॥ रत्नपारखियांच्या गांवीं । जाईल गंडकी तरी सोडावी । कांश्मिरीं न करावी । मिडगण जेवीं ॥ ३२० ॥ काइसा वासु कापुरा । मंदें जेथ अवधारा । पिठाचा विकरा । तिये सांतें ? ॥ २१ ॥ म्हणौनि इये सभे । बोलकेपणाचेनि क्षोभें । लाग सरूं न लभे । बोला प्रभु ॥ २२ ॥ सामान्या आणि विशेषा । संकळे कीजेल देखा । तरी कानाचेया मुखा- । कडे न्याल ना तुम्ही ॥ २३ ॥ शंकेचेनि गदळें । जैं शुद्ध प्रमेय मैळे । तैं मागुतिया पाउलीं पळे । अवधान येतें ॥ २४ ॥ कां करूनि बाबुळियेची बुंथी । जळें जियें ठाती । तयांची वास पाहाती । हंसु काई ? ॥ २५॥ कां अभ्रापैलीकडे । जैं येत चांदिणें कोडें । तैं चकोरें चांचुवडें । उचलितीना ॥२६॥ तैसें तुम्ही वास न पाहाल । ग्रंथु नेघा वरी कोपाल । जरी निर्विवाद नव्हेल । निरूपण ॥२७॥ न बुझावितां मतें । न फिटे आक्षेपाचें लागतें । तें व्याख्यान जी तुमतें । जोडूनि नेदी ॥२८॥ आणि माझें तंव आघवें । ग्रथन येणेंचि भावें । जे तुम्ही संतीं होआवें । सन्मुख सदां ॥२९॥ येऱ्हवीं तरी साचोकारें । तुम्ही गीतार्थाचे सोइरे । जाणोनि गीता एकसरें । धरिली मियां ॥३३०॥ जें आपुलें सर्वस्व घ्याल । मग इयेतें सोडवूनि न्याल । म्हणौनि ग्रंथु नव्हे बोल । साचचि हे ॥ ३१ ॥ कां सर्वस्वाचा लोभु धरा । बोलीचा अव्हेरु करा । तरी गीते मज अवधारा । एकचि गती ॥ ३२ ॥ किंबहुना मज । तुमचिया कृपा काज । तियेलागीं व्याज । ग्रंथाचें केलें ॥ ३३ ॥ तरी तुम्हां रसिकांजोगें । व्याख्यान शोधावें लागे । म्हणौनि जी मतांगें । बोलों गेलों ॥३४॥ तंव कथेसि पसरु जाहला । श्लोकार्थु दूरी गेला । कीजो क्षमा यया बोला । अपत्या मज ॥ ३५ ॥ आणि घासांआंतिल हरळु । फेडितां लागे वेळु । तें दूषण नव्हें खडळु । सांडावा कीं ॥ ३६ ॥ कां संवचोरा चुकवितां । दिवस लागलिया माता । कोपावें कीं जीविता । जिताणें कीजे ? ॥३७॥ परी यावरील हें नव्हे । तुम्हीं उपसाहिलें तेंचि बरवें । आतां अवधारिजो देवें । बोलिलें ऐसें ॥३८॥ म्हणे उन्मेखसुलोचना । सावध होईं अर्जुना । करूं तुज ज्ञाना । वोळखी आतां ॥३९ ॥

ऐका महाराज ! मला हा विस्तार करण्याला कारण आहे बाकी ‘ अहिंसा ’ हा शब्द तीनच अक्षरांचा आहे १७. पाहूं गेलें तर ‘ अहिंसा ’ म्हणावयास थोडीं असून तिचे वर्णन थोडक्यांत करितां येईल; परंतु [ हिंसेलाच अहिंसा म्हणणाऱ्या ] इतर बहुमतांचें खंडण केले तरच ती स्पष्ट करितां येईल १८. बाकी अहिंसेसंबंधानें जीं मतें उपलब्ध आहेत, तीं मतें खंडित न करतां जशीच्या तशीच ठेवून जर मी अंगच्या बलानें अहिंसा सांगितली असती तर तुम्हांला माझें बोलणें आवडलें नसते १९. अहो ! रत्नपारख्यांच्या गावांत गंडकी [ शालिग्राम शिळा वा कसवटीची शिला ] रत्न म्हणून जर विकल्या जातील तरच त्यांचे गांठोडें सोडावें. किंवा सरस्वतीच्या पुढें जशी कुणाची वक्तृत्व वा तिची स्तुति करण्याची शक्ति नाहीं; म्हणून ती करूं नये २०. जेथें [ ज्या बाजारांत ] कापुरास ‘ वास मंद आहे ’ असें म्हणतात, त्या बाजारांत [ कापूर म्हणून ] पीठाची विक्री–कशी बरें होईल ? २१. म्हणून महाराज ! तुमच्या सभेमध्यें मी कोणी एक मोठा वक्ता आहे, असें बोलकेपणाच्या आवेशानें बोललों तर माझे बोलणें तुम्हांस रुचणार नाहीं. व आपली जवळीक मिळणार नाहीं २२. सामान्य व विशेष वर्णन यांतील फरक न जाणतां जर सगळेंच सरसकट करून सांगितलें तर ते व्याख्यान तुम्हीं आपल्या कानाच्या मुखाकडे सुद्धां नेणार नाहीं [ कानानें नुसते ऐकण्यासहि तयार होणार नाहीं. ] २३. एखादा यथार्थ सिद्धांत प्रतिपादन करतांना तो शुद्ध–सिद्धांत शंकारूपी कचऱ्यानें मळला जातो [ निःसंदिग्ध बोध होत नाहीं ] तेव्हां त्या सिद्धांत श्रवणाकडे येत असलेले आपले वा श्रोत्यांचे लक्ष मागच्याच पावलांनीं पळून जाईल २४. ज्या पाण्यावर शेवाळ पसरलेलें असतें त्या पाण्याकडे हंसपक्षी पाहतात काय ? तर ढुंकूनहि पाहात नाहींत २५. किंवा आभ्राच्छादित पण चंद्राचें कांहींसे सुंदर चांदणे पडले असले तरी तें मळकट चांदण्याचें भक्षण करण्याकरितां चकोरपक्षीं आपली चोंच वर करून कौतुकानेंहि उघडित नाहींत २६. त्याप्रमाणें जर माझे निरूपण निर्दोष, निःसंदेह झालें नाहीं तर तुम्ही माझ्याकडे पाहाणार सुद्धां नाहीं [ ग्रंथाचा स्वीकार करणार नाहींच ], इतकेंच नाहीं, तर उलट आपण रागवाल २७. अहिंसेवरील निरनिराळीं मतें समजून सांगतांना जर निरनिराळ्या आक्षेपांचे-मतांचे निरसन न करतां व्याख्यान केले तर तें व्याख्यान मला तुमचा लाभ जोडूं देणार नाहीं [ संशयास अवसर असलेलें माझें व्याख्यान आपण ऐकत बसणार नाहीं ], २८. आणि माझा ग्रंथ रचना करण्यांत वा हे सर्व–प्रतिपादन करण्यांत मुख्य हेतु तुम्हीं संतजनांनीं माझेवर नेहमी–प्रसन्न होऊन सन्मुख असावें एवढाच आहे २९. बाकी खरोखर पाहूं गेलें असतां तुम्हीं गीतेच्या अर्थाचें भोक्ते आहांत असें समजून मी एकदम गीताच व्याख्यानास आधारभूत म्हणून घेतली ३३०. कारण, त्या गीतेकरितां तुम्हीं आपलीं वाटेल ती हानि पत्कराल, आपले सर्वस्व घाल व या गीतेला सोडवून न्याल. म्हणून खरोखर हा ग्रंथ नव्हे, तर तुमच्या कृपेचा जामीनच मजजवळ आहे, ३१. इतक्यावरहि तुम्ही सर्वस्वाचा लोभ धराल व या गीताग्रंथरूपी जामिनाचा–तारणाचा अव्हेर कराल तर मग गीतेची जी गती तीच माझी गती आहे असें समजा ३२. फार काय सांगावें ! तुमच्या कृपाप्रसादाची मला जरूर असल्यामुळेंच मी गीतेचा अर्थ सांगण्याचें एक निमित्त केलें आहे ३३. तेव्हां आपण जे रसिक, त्या तुम्ही श्रोत्यांना रुचेल असें योग्य व्याख्यान केलें पाहिजे, म्हणून अहिंसेवरील इतर वेगळीं वेगळीं मतें तुम्हांस सांगितलीं ३४. त्यामुळें कथेचा विस्तार झाला; श्लोकाचा अर्थ बाजूला राहिला, या माझ्या बोलण्याबद्दल मज लेंकराला आपण क्षमा करावी ३५. दुसरें असें कीं, जेवतांना घासांत खडा लागला, आणि तो काढण्यास वेळ लागला तर तो लागलेला वेळ व्यर्थ गेला, हा जेवणाराचा दोष नव्हे. कारण तो घासांतील खडा काढून टाकलाच पाहिजे ३६. आपला मुलगा गांवाहून येत असतांना जर भोवतीच्या संभावित चोरांना चुकवून येण्याकरितां त्यांस बऱ्याच दिवसाचा वेळ लागला तर आईनें त्याच्यावर रागवावे कां जीवंत घरीं आला म्हणून त्याच्यावरून लिंबलोण उतरून टाकावें ? ३७. परंतु हे दाखले देण्याचें कांहीं कारण नाहीं. माझें वाढलेले व्याख्यान सहन केले व त्याबद्दल मला क्षमा केलींत हें चांगलेंच झालें. म्हणून पुढें श्रीकृष्ण हे अर्जुनास काय म्हणाले, तें ऐका ३८. भगवान् म्हणाले:- “हे ज्ञानरूपी उत्तम दृष्टि असणाऱ्या अर्जुना ! सावध हो. तुला ज्ञानाची आतां चांगलीच ओळख करून देतों ३९.

१ ‘अहिंसा’ हा शब्द. २ खंडन केल्या जातात. ३ प्राप्त झालेलीं अन्य मतें. ४ जशींच्या तशीं ठेवून. ५ आंगच्या जोरानें, बळावर. ६ चालणार–पटणार नाहीं. ७ शालिग्राम शिळा. ८ काश्मिरी दगडांनीं, स्फटिकांनीं. ९ स्तुति. १० मूर्ख. ११ त्याच्या बरोबरीनें. १२ अभिमानानें. १३ सरसकट मिश्रण. १४ मुख्यार्थ. १५ लक्ष.

तरी ज्ञान गा तें एथें। वोळख तूं निरुतें । आक्रोशेंवीण जेथें। क्षमा असे ॥३४०॥ अगाध सरोवरीं । कमळिणी जियायरी । कां सदैवाचिया घरीं । संपत्ति जैसी ॥ ४१ ॥ पार्था तेणें पाडें । क्षमा जयातें वाढे । तेही लक्षे तें फुडें । लक्षण सांगों ॥ ४२ ॥ तरि पेढियंतं लेणं । आंगीं भावें जेणें धरिजे तेवीं साहणें । सर्वांचि जया ॥ ४३ ॥ त्रिविधं मुख्य आघवे । उपद्रवांचे मेळावे । वरि पडिलिया नव्हे । वांकुडा जो ॥ ४४ ॥ अपेक्षितें पावे । तें जेणें तोषें मानवें । अनपेक्षितेंही करवे । तोचि मानु ॥ ४५ ॥ जो मानापमानातें साहे । सुखदुःख जेथ सामाये । निंदास्तुती नोहे । दुखंडु जो ॥ ४६ ॥ उन्हाळेनि जो न तपे । हिमवंती न कांपे । कायसेनिही नै वासिपे । पातलेया ॥ ४७ ॥ स्वशिखरांचा भारु । नेणें जैसा मेरु । कीं धरा यज्ञसूंकरु । वोझें न म्हणे ॥ ४८॥ नाना चराचरीं भूतीं । दाटणी नव्हे क्षिती । तैसा नाना द्वंद्वीं प्राप्तीं । घेंमेजेना ॥४९॥ घेऊनी जळाचे लोट । आलिया नदीनदांचे संघाट । करी वाड पोट । समुद्र जेवीं ॥३५०॥ तैसें जयाचिया ठायीं । न साहणें कांहींचि नाहीं । आणि साहतु असे ऐसेंही । स्मरण नुरे ॥५१॥ आंगा जें पातलें । तें करूनि घाली आपुलें । तेथ साहतेनि नवलें । घेपिजेना ॥५२॥ हे अनाक्रोश क्षमा । जयापाशीं प्रियोत्तमा । जाण तेणें महिमा । ज्ञानासि गा ॥ ५३॥ तो पुरुष पांडवा । ज्ञानाचा वोलांवा । आतां परिस आर्जवा । रूप करूं ॥५४॥ तरी आर्जव तें ऐसें । प्राणाचें सौजन्य जैसें । आवडे तयाही दोषें । एकचि गा ॥५५॥ कां तोंड पाहूनि प्रकाशु । न करी जेवीं चंडांशु । जगा एकुचि अवकाशु । आकाश जैसें ॥ ५६ ॥ तैसें जयाचें मन । माणुसाप्रती आन आन । नव्हे आणि वर्तन । ऐसें पैं तें ॥ ५७ ॥ जें जगेंचि सनोळख । जगेंसीं जुनाट सोयरिक । आपपर हे भाख । जाणणें नाहीं ॥ ५८ ॥ भलतेणेंसीं मेळु । पाणिया ऐसा ढाळु । कवणेविखीं आडळु । नेघे चित्त ॥ ५९ ॥ वारियाची धांव । तैसें सरळ भाव । शंका आणि हांव । नाहीं जया ॥ ३६० ॥ मायेपुढें बाळका । रिगतां न पडे शंका । तैसें मन देतां लोकां । नालोची जो ॥ ६१ ॥ फांकलिया इंदीवरा । परिवारु नाहीं धनुर्धरा । तैसा कोन-कोंपरा । नेणेचि जो ॥ ६२ ॥ चोखाळपण रत्नाचें । कां रत्नावरी किरणाचें ।

[ क्षांतिः ] हें पहा, ज्ञान म्हणून जें आहे, तें ज्या ठिकाणीं खेदावांचून सहज क्षमा वास करिते, त्याच ठिकाणीं खरोखर आहे असें तूं पक्कें समज ४०. अत्यंत खोल जल असलेल्या तळ्यांत जशी कमळें असतात किंवा दैववानाच्या घरीं जशी लक्ष्मी आपोआप वास करिते ४१. त्याचप्रमाणें पार्था ! ज्यांच्या योगानें क्षमा वृद्धिंगत होते. तेहि ज्या लक्षणांमुळें पूर्णपणें लक्षांत येईल अशी लक्षणें स्पष्टपणें सांगतों ४२. ज्या भावनेनें आवडता अलंकार धारण करतो, त्याच भावनेनें [ यदृच्छेनें प्राप्त होईल तें ] सर्वहि जो सहन करतो ४३. कितीही दुःखप्रसंग असले तरी त्याचे आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक असे मुख्य तीन भेद आहेत. तितकेहि मिळून एकदम त्याच्यावर कोसळले तरीहि त्याच्या भारानें जो वांकत, डगमगत नाहीं ४४. अपेक्षित, इच्छित वस्तु प्राप्त झाली असतां ज्या मानानें संतोष होतो त्याच मानाच्या संतोषानें अनिच्छित वस्तु लाभली तर तिचा स्वीकार करतो ४५. शिवाय जो मानापमान सहन करतो, सुखदुःखांनाहि सारखीच जागा देतो आणि निंदेनें किंवा स्तुतीनें मनाची समता दुभंगूं देत नाहीं ४६. जो उन्हाच्या तापानें संतप्त होत नाहीं व थंडीनें जो कांपत नाहीं म्हणजे शीतोष्ण सहन करितो आणि जो कसलाहि प्रसंग प्राप्त झाला असतां भीत नाहीं ४७. मेरु पर्वत जसा आपल्या शिखरांचा भार मानीत नाहीं, किंवा वराह अवतारी भगवान् जसा दंताग्रीं धारण केलेल्या पृथ्वीला ओझें आहे असें म्हणत नाहीं ४८. अथवा स्थावरजंगमात्मक अनेक भूतांचें ज्याप्रमाणें पृथ्वीला ओझें होत नाहीं, त्याप्रमाणें अनेक प्रकारचीं सुखदुःखें प्राप्त झालीं तरीं ज्याचे अंतःकरण डगमगून जो श्रमी होत नाहीं ४९. नदी व नद यांचे समुदाय पाण्याचे लोटच्या लोट घेऊन जरी आले तरी त्यांना कोठें ठेवावें अशी चिंता न करितां ज्याप्रमाणें समुद्र पोट मोठें करतो म्ह० त्यांना आपल्या पोटांत सहज सामावून घेतो ३५०. त्याप्रमाणें ज्याचें ठिकाणीं सहन न करणें असे कधींहि व कांहींहि नसतें व आपण सर्व गोष्टी सहन करतों, अशी आठवण करण्याइतका अभिमानहि ज्यास राहत नसतो ५१. देहाला ज्या ज्या गोष्टींचे भोग प्राप्त होतात, त्या त्या सर्व आपणच आहों, असें जाणून आपण सर्व अलौकिक असेंच कांहीं सहन करतो असाहि ज्याला अभिमान उत्पन्न होत नाहीं ५२. हे अर्जुना ! अशा प्रकारची दांत न खातां, ओठ न चावतां खेदरहित सहज क्षमा ज्या पुरुषापाशीं वास करिते त्या पुरुषाच्यायोगें ज्ञानासहि मोठेपणा प्राप्त होतो ५३. हे पांडवा ! असा जो पुरुष तो ज्ञानाचा खरोखर जिव्हाळाच होय. [ **आर्जवं** ] आतां आर्जव [ मनाच्या सरळपणाचे ] यथार्थ स्वरूप वर्णन करितों, तें ऐक ५४. अरे ! ते आर्जव असें कीं, वाटेल त्या बऱ्या वाईट अशा साऱ्या प्राणिमात्रास मग तो कोणीहि असो त्याला जसा प्राण एकसारखाच अनुकूल असतो ५५. किंवा सूर्य जसा 'हा चांगला, हा वाईट' अशी भेदबुद्धि न ठेवतां प्रकाश करितो, तोंड पाहून प्रकाश पाडीत नाहीं, किंवा आकाश हें ज्याप्रमाणें सर्व जगाला सारखाच अवकाश देतें ५६. त्याप्रमाणें ज्याचें मन हरएक प्राण्यागणिक निरनिराळें नसते, व त्याचें वर्तन असें असतें कीं ५७. सर्व जग जसें पूर्वीपासून त्याच्या ओळखीचेंच आहे, सर्व जगाबरोबर जसा आपला कांहीं दाट जुनाट सोयरिकीचाच संबंध आहे, आणि ज्याला आपपरभावाची भाषाहि ओळखीची नसते ५८. ज्याची वाटेल त्या बरोबर मैत्री होते; पाण्याला ज्याप्रमाणें ढाळ असतो. त्याप्रमाणें ज्याचा सर्वांशी जुळणारा सरळ स्वभाव असतो कोणाहि विषयीं ज्याचें मन विकल्प घेत नाहीं ५९. वाऱ्याचें वाहणे जसे सरळ असतें त्याप्रमाणें ज्याच्या मनाचा स्वभाव सरळ असतो आणि ज्याला शंका व लोभ हे मुळींच नसतात ३६०. ज्याप्रमाणें आईच्या मांडीवर बसण्यास मुलाला शंका येत नाहीं, त्याप्रमाणें जो दुसऱ्यास आपलें मन देण्याविषयीं—आपले विचार सांगण्याविषयीं मागे पुढे पाहात नाहीं ६१. हे धनुर्धरा ! फुललेल्या कमळास ज्याप्रमाणें आपला सुवास मर्यादित स्थलीं दाबून ठेवतां येत नाहीं, त्याप्रमाणें आंत एक व बाहेर एक अशा विचारास ज्याच्या मनांत अजिबात जागा नाहीं ६२.

---

१ आकाररहित, दुःखरहित. २ त्याप्रमाणें. ३ ती क्षमा ४ लक्षांत येईल. ५ स्पष्ट. ६ आवडते. ७ ज्या भावनेनें. ८ आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक. ९ समुदाय. १० प्राप्त झाले असतां. ११ इच्छित. १२ अनिच्छित. १३ सामावतें. १४ भग्न, विभागलेला. १५ हिवाळ्यानें. १६ भीत नाहीं. १७ पृथ्वी. १८ वराहावतारी भगवान्. १९ पृथ्वीला. २० सुखदुःखादि द्वंद्वें आली असतां. २१ श्रमी होत नाहीं. २२ समुदाय. २३ मोठें. २४ सहन करणाराला. २५ अभिमान उत्पन्न होत नाहीं. २६ दुःखरहित, शांति. २७ जिव्हाळा. २८ सरळपणाचें. २९ अनुकूलता. ३० पाहिजे त्या प्राण्याच्या. ३१ उद्देशानें. ३२ सूर्य. ३३ भरलेलें. ३४ ओळखीचें.

तैसें पुढां मन जयाचें । करणें पाठीं ॥ ६३ ॥ आलोचु जो नेणें । अनुभवचि जोगावणें । धरी मोकली अंतःकरणें । नव्हेचि जया ॥ ६४ ॥ दिठी नोहे मिणधी । बोलणें नाहीं संदिग्धी । कवणेंसीं हीनबुद्धी । राहाटीजे ना ॥ ६५ ॥ दाही इंद्रियें प्रांजळें । निःप्रपंचें निर्मळें । पांचही पांलव मोकळे । आठही पाहर ॥ ६६ ॥ अमृताची धार । तैसें उजूं अंतर । किंबहुना जो माहेर । या चिन्हांचें ॥ ६७ ॥ तो पुरुष सुभटा । आर्जवाचा आंगवटा । जाण तेथेंचि घरटा । ज्ञानें केला ॥ ६८ ॥ आतां ययावरी । गुरुभक्तीची परी । सांगों गा अवधारीं । चतुरनाथा ॥ ६९ ॥ आघवीयाचि दैवां । जन्मभूमि हे सेवा । जे ब्रह्म करी जीवा । शोच्यातेंहि ॥ ३७० ॥ हें आचार्योपास्ती । प्रकटिजैल तुजप्रती । बैसों दे एकपांतीं । अवधानाची ॥ ७१ ॥ तरी सकळ जळसमृद्धी । घेऊनि गंगा निघाली उदधी । कीं श्रुति हे महापदीं । पैठी जाहाली ॥ ७२ ॥ नाना वेंटाळूनि जीवितें । गुणागुण उंखितें । प्राणनाथा उंचितें । दिधलें प्रिया ॥ ७३ ॥ तैसें सबाह्य आपुलें । जेणें गुरुकुळीं वोपिलें । आपणपें केलें । भक्तीचें घर ॥ ७४ ॥ गुरुगृह जये देशीं । तो देशुचि वसे मानसीं । विरहिणी कां जैसी । वल्लभातें ॥ ७५ ॥ तियेकडोनि येतसे वारा । देखोनि धांवे सामोरा । आड पडे म्हणे घरा । बीजें कीजो ॥ ७६ ॥ साचा प्रेमाचिया भुली । तया दिशेसीचि आवडे बोली । जीवु थोनपती करूनि घाली । गुरुगृहीं जो ॥ ७७ ॥ परी गुरुआज्ञा धारिलें । देह गांवीं असे एकलें । वांसरुवा लाविलें । दावें जैसें ॥ ७८ ॥ म्हणे कैं हें बिरडें फिटेल । कैं तो स्वामी भेटेल । युगाहूनि वडील । निमिषें मानी ॥ ७९ ॥ ऐसेया गुरुग्रामींचें आलें । कां स्वयें गुरूनींचि धाडिलें । तरी गतायुष्या जोडलें । आयुष्य जैसें ॥ ३८० ॥ कां सुतकया अंकुरा- । वरी पडलिया पीयूषधारां । नाना अल्पोदकींचा सागरा । आला मासा ॥ ८१ ॥ नातरी रंकें निधान देखिलें । कां आंधळिया डोळे उघडले । भणंगांचिया आंगा आलें । इंद्रपद ॥ ८२ ॥ तैसें गुरुकुळाचेनि नांवें । महासुखें अति थोरावे । जें कोडेंही पोटाळवे । आकाश कां ॥ ८३ ॥ पैं गुरुकुळीं ऐसी । आवडी जया देखसी । जाण ज्ञान तयापासीं । पाइकी करी ॥ ८४ ॥ आणि अभ्यंतरीलियेकडे । प्रेमाचेनि पवाडे । श्रीगुरूचें रूपडें । उपासी ध्यानीं ॥ ८५ ॥ हृदयशुद्धीचिया आवारीं । आराध्यु तो

ज्याप्रमाणें रत्नांचा निर्मलपणा असतो पण तो दृष्टीस पडण्याच्या पूर्वीं त्यांचें तेजांचा निर्मळपणा फांकतो, त्याप्रमाणें कोणतीहि गोष्ट करण्यास, अगोदर ज्याच्या मनाची धांव पुढें असते व व्यवहार करणें पाठीमागून असते ६३. ज्याला पूर्वापार चिंतन करणें हें माहीतच नाहीं व विषयनिरपेक्ष सदोदित तृप्त असणें हाच ज्याचा अनुभव व सहज स्थिति आहे, अमुक गोष्ट करावयाची व अमुक गोष्ट करावयाची नाहीं असा जो अंतःकरणानें संकल्प-विकल्प करीत नसतो ६४. ज्याची दृष्टि कपटी किंवा लांचलुचपत खाणारी नसते व ज्याचे बोलणें संदिग्ध नसते. आणि तो कोणाबरोबरहि वाईट बुद्धीनें वागत नाहीं ६५. ज्याचीं दहा इन्द्रियें व पंचप्राण सदासर्वदा सरळ, निष्कपट असतात व शुद्ध बुद्धीनें वर्तन करीत असतात ६६. अमृताच्या धारेप्रमाणें ज्याचें अंतःकरण सरळ असते किंबहुना ! ! जो या चिन्हांचें माहेरघरच असतो ६७. हे वीरा ! तो पुरुष मूर्तिमंत आर्जवच होय; आणि त्या पुरुषांचें ठिकाणीं ज्ञानानें आपलें राहण्याचें घरटेच केलें आहे, हें ध्यानांत असूं दे ६८. [ **आचार्योपासनं** ] हे चतुरश्रेष्ठा ! आतां यापुढें तुला गुरुभक्तीचा प्रकार सांगतों, तो ऐक ६९. ही गुरुसेवा म्हणजे सर्व भाग्यांची जन्मभूमिच होय बरें. कारण, शोकानें ग्रस्त झालेल्या जीवास ही सेवा ब्रह्मस्वरूप करते ३७०. अशी ही जी गुरुसेवा, ती तुला स्पष्ट समजून सांगतों. तिकडे तुझें एकाग्रतायुक्त पूर्ण लक्ष असूं दे ७१. हें पहा ! ज्याप्रमाणें आपली सर्व जलसंपत्ति घेऊन गंगा ही समुद्रास मिळण्याकरितां निघाली किंवा सर्व अभिप्रायांसह श्रुति ब्रह्मपदीं प्रविष्ट होते ७२. अथवा उचित कर्तव्य म्हणून पतिव्रता स्त्री आपलें जीवित व गुणावगुण हे सर्व आपल्या प्रिय पतीस समर्पण करते ७३. त्याप्रमाणें ज्यानें आंतर मनादि व बाह्य देहेंद्रियादि आपलें सर्व कांहीं गुरुकुलाचे ठिकाणीं अर्पण केलें आहे आणि आपलें स्वतःस तर गुरुभक्तीचें आगरच केलें आहे ७४. [ **नवविधाभक्तिः—स्मरणं** ] ते कसें म्हणशील तर, ज्याप्रमाणें विरहिणी पतिव्रतेचे चित्तांत नेहमीं पतीचेंच चिंतन असते, त्याप्रमाणें ज्या देशांत आपल्या श्रीगुरूंचें घर असेल तोच देश ज्याचे मनांत नेहमीं घोळत असतो ७५. गुरुभक्तीविषयीं काय प्रेम सांगावें ! ज्या दिशेस गुरु राहतात त्या दिशेकडून वारा येत असेल तर त्या वाऱ्यासहि सामोरा धांवत जातो व त्यास जो साष्टांग नमस्कार घालतो आणि 'आपण माझ्या घरीं वस्तीला यावें' अशी प्रार्थना वाऱ्यासच करितो ७६. सद्गुरु विषयक खऱ्या प्रीतीनें वेडावून जाऊन, गुरु ज्या दिशेस राहतात त्या दिशेशींच बोलणें ज्याला आवडतें व जो गुरूंच्या घरीं आपला जीव वतनदार-मिरासदार करून ठेवतो ७७. परंतु ज्याप्रमाणें वांसराला दावें लावून बांधले असल्यामुळें त्याचें सर्व लक्ष गाईकडेच लागलेलें असतें फक्त त्याचें शरीर मात्र गोठ्यांत असतें, त्याप्रमाणें केवळ गुर्वाज्ञारूपी दाव्यानें बांधून ठेवल्यामुळेंच ज्यांचा एक देह मात्र आपल्या गांवीं असून ७८. त्याला असें वाटत असतें कीं, आपल्या गळ्याचे हें गुर्वाज्ञारूप दाव्याचे बिरडे केव्हां सुटेल व तो सद्गुरु स्वामी केव्हां भेटेल ? अशा चिंतेत त्याला एक एक क्षणहि युगापेक्षां मोठा भासत असतो ७९. अशांत जर आपले गुरूंचे गांवाहून कोणी मनुष्य आला किंवा स्वतः गुरूंनींच एखादा मनुष्य पाठविला, तर गतायुषी माणसाला आणखी आयुष्य प्राप्त व्हावे ३८०. किंवा सुकत असलेल्या अंकुरावर अमृताच्या धारा पडाव्यात, अथवा डबक्यांतील मासा जसा समुद्रांत यावा ८१. नाहींतर एखाद्या दरिद्र्यास द्रव्याचा ठेवा दृष्टीस पडावा, किंवा जन्मांधास एकाएकी दृष्टि यावी, अथवा भिकाऱ्याच्या वांट्यास जसें इंद्रपद यावे ८२. त्याप्रमाणें गुरूंच्या कुळाचें नांव ऐकतांच तो महासुखानें अतिशय थोरावतो; तो इतका कीं, कौतुकानें आकाशहि आपणास सहज कवटाळता येईल, असें त्यास वाटतें ८३. हे बघ ! गुरुकुलाच्या ठिकाणीं ज्याची अशी प्रीति असलेली तुझ्या नजरेस येईल, त्याच्याजवळ ज्ञान हें त्याची सेवा-चाकरी करीत राहिलेलें असतें, असें समज ८४. [ **अर्चनं** ] आणि अंतःकरणांत अत्यंत प्रेमयुक्त होऊन त्या प्रेमबळानें श्रीगुरूंच्या मूर्तीची जो ध्यानोपासना करतो; ८५. अंतःकरणाची शुद्धता हेंच देवळाच्या तटाच्या

१ विचार करणें. २ तृप्त असणें, निर्वाह करणें. ३ सोडणें. ४ ओशाळी, कपटी. ५ संशयित. ६ वाईट. ७ वागो. ८ मोकळेपणानें. ९ निष्कपटी. १० पंचप्राण. ११ मन. १२ मूर्ति. १३ पर्याय. १४ भाग्योदय. १५ शोकग्रस्तालाहि. १६ गुरुसेवा. १७ पूर्ण लक्ष असू दे. १८ पंक्तीला. १९ समुद्राला. २० ब्रह्मपदीं. २१ प्रविष्ट. २२ अवघें, उर्के, सर्व. २३ योग्यायोग्य. २४ साष्टांग नमस्कार घालतो. २५ आगमन करावें. २६ स्थानपति. वतनदार. २७ पेंडें, गुळखें. २८ मोठें. २९ क्षण. ३० अमृत. ३१ भिकाऱ्याच्या. ३२ आवडीनें. ३३ अलिंगावें, वेंगाटावें. ३४ सेवा, चाकरी. ३५ आंतल्या बाजूस, अंतःकरणांत. ३६ मोठ्या प्रेमानें. ३७ भजे, सेवी.

निश्चल ध्रुव करी । मग सर्व भावेंसीं परिवारीं । आपण होय ॥ ८६ ॥ कां चैतन्यां-
चिये पोवळी- । माजीं आनंदाचिया राउळीं । श्रीगुरुलिंगा ढाळी । ध्यानामृत
॥ ८७ ॥ उदयिजतां बोधार्का । बुद्धीची डाळ सात्त्विका । भरोनियां त्र्यंबका ।
लाखोली वाहे ॥ ८८ ॥ काळशुद्धी त्रिकाळीं । जीवदशा धूप जाळी । ज्ञानदीपें
वोवाळी । निरंतर ॥ ८९ ॥ सामरस्याची रसरसोय । अखंड अर्पितु जाय । आपण
भरोडा । होय । गुरु तो लिंग ॥ ३९० ॥ नातरी जीवाचिये सेजे । गुरु कांतु करूनि भुंजे ।
ऐसी प्रेमाचेनि भोजें । बुद्धी वाहे ॥ ९१ ॥ कोणेएके अवसरीं । अनुरागु भरे अंतरीं ।
कीं तया नाम करी । क्षीराब्धी ॥ ९२ ॥ तेथ ध्येयध्यानें बहु सुख । तेंचि शेषतुकें
निर्दोख । वरी जळशयन देख । भावी गुरु ॥ ९३ ॥ मग वोळगती पाय । ते लक्ष्मी
आपण होय । गरुड होऊनि उभा राहे । आपणाचि ॥ ९४ ॥ नाभीं आपण जन्मे । ऐसें
गुरुमूर्तिप्रेमें । अनुभवी मनोधर्मे । ध्यानसुख ॥ ९५ ॥ एकाधिये वेळे । गुरु माय करी
भावबळें । मग स्तन्यसुखें लोळे । अंकावरी ॥ ९६ ॥ नातरी गा किरीटी । चैतन्यतरु-
तळवटीं । गुरु धेनु आपण पाठीं । वत्स होय ॥ ९७ ॥ गुरुकृपास्नेहसलिलीं । आपण होय
मासोळी । कोणे एके वेळीं । हेंचि भावीं ॥ ९८ ॥ गुरुकृपामृताचे वडप । आपण सेवा-
वृत्तीचें होय रोप । ऐसेसे संकल्प । विये मन ॥ ९९ ॥ चक्षुपक्षेवीण । पिलूं होय आपण ।
कैसें पैं अपारपण । आवडीचें ॥ ४०० ॥ गुरूतें पक्षिणी करी । चारा घे चांचूवरी । गुरु
तारू धरी । आपण कांस ॥ १ ॥ ऐसे प्रेमाचेनि थावें । ध्यानचि ध्यानातें प्रसवे ।
पूर्णसिंधू हेलावे । फुटती जैसे ॥ २ ॥ किंबहुना यापरी । श्रीगुरुमूर्ति अंतरीं ।
भोगी आतां अवधारीं । बाह्यसेवा ॥ ३ ॥ तरी जीवीं ऐसें आवांके । म्हणे दास्य
करीन निकें । जैसेनि गुरु कौतुकें । माग म्हणती ॥ ४ ॥ तैसिया साचा उपास्ती ।
गोसावी प्रसन्न होती । तेथ मी विनंती । ऐसी करीन ॥ ५ ॥ म्हणेन तुमचा देवा ।
परिवारु जो आघवा । तेतुलें रूपें होआवा । मीचि एकु ॥ ६ ॥ आणि उपकरतीं
आपुलीं । उपकरणें आथि जेतुलीं । माझीं रूपें तेतुलीं । होआवीं स्वामी ॥ ७ ॥
ऐसा मागेन वरु । तेथ हो म्हणती श्रीगुरु । मग तो परिवारु । मीचि होईन ॥ ८ ॥
उपकरणजात सकळिक । तें मीचि होईन एकैक । तेव्हां उपास्तीचें कौतुक ।
देखिजैल ॥ ९ ॥ गुरु बहुतांची माये । परी एकलौति होऊनि ठाये । तैसें करूनि

भोंवतालचें एक आवार व आपलें जें आराध्यदैवत श्रीगुरु, त्यांची त्या आवारांत प्राणप्रतिष्ठापूर्वक स्थापना करतो व मग आपल्या सर्व भावनेनें आपणच पूजासाहित्य बनतो; ८६. अथवा ज्ञानरूपी तटांत आनंदरूप देऊळ बनवून, त्यांत श्रीगुरुरूपी शिवलिंगाची स्थापना करून मग त्याच्यावर ध्यानरूपी अमृतानें अभिषेक करितो ८७. बोधरूप सूर्य उगवल्याबरोबर बुद्धीच्या परडींत, टोपलींत अष्टसात्विक भावांची कमळें भरून श्रीगुरुरूप शंकराला त्याची लाखोली वाहतो ८८. उत्तम, पवित्र वेळ हेच शिवाच्या पूजेचे तिन्ही काळ असें मानून, त्यांत जीवपणारूपी धूप जाळतो व ज्ञानरूप दिव्यानें जो गुरुरूपी श्रीशंकरास निरंतर ओवाळतो ८९. श्रीगुरूंशीं ऐक्यभाव हाच नैवेद्य असून तो श्रीगुरूंना नेहमीं अर्पण करून आपण पुजारी बनून गुरूस शंकराची पिंडी मानून स्तवन करतो ३९०. [ सख्यं ] अथवा आपल्या जीवाची शेज करून गुरु हे आपले पति आहेत असें समजून जो त्यांचा उपभोग घेतो, आणि अशा प्रकारें प्रेमाच्या योगानें जो आपल्या बुद्धींत अशीं अनंत कौतुकें धारण करतो ९१. त्यांतील कांहीं अशा एखादे वेळेस मनांत गुरूविषयीं प्रीतीचा उमाळा भरून आला असतां त्या प्रेमालाच क्षीराब्धि असें नांव देतो ९२. त्या ठिकाणीं ध्येय स्वरूप श्रीगुरूंच्या ध्यानापासून होणाऱ्या बहुसुखरूप शुद्ध शेषशय्येवर गुरु हे भगवान् विष्णूच निजलेलें आहेत असें मानतो ९३. मग श्रीगुरुरूपी विष्णूचे पायांची सेवा करणारी जी लक्ष्मी ती आपणच होतो आणि गरुडहि आपणच होऊन पुढें हात जोडून उभा राहतो; ९४. श्रीगुरुरूपी विष्णूच्या नाभींकमळापासून जन्म घेणारा जो ब्रह्मदेव तोहि आपणच होतो असा गुरुमूर्तीच्या प्रेमानें आपल्या मनांत ध्यानसुखाचा अनुभव घेतो ९५. एखादे वेळेस भक्तीच्या बळानें श्रीगुरूला आई असें कल्पितो व मग स्तनपानापासून होणाऱ्या सुखाचा अनुभव घेत तिच्या मांडीवर लोळतो; ९६. किंवा अर्जुना ! चैतन्यरूपी वृक्षाच्या खालीं गुरु हींच कोणी गाय असें कल्पून आपण तिच्या पाठींमागून चाललेलें वांसरूं होतो ९७. गुरुकृपेच्या स्नेहरूपी उदकांत आपण मासोळी झालों आहोत अशींच एखादे वेळीं भावना करतो ९८. गुरुकृपा हीच अमृताची वृष्टि होय आणि आपण गुरुसेवावृत्तीरूप रोप आहोंत, असे निरनिराळे संकल्प त्याचे मन करीत असते ९९. त्याच्या आवडीचें अपारपण कसें आहे तें पहा कीं, डोळे उघडले नाहींत व पंख फुटले नाहींत असें [ पक्षाचें ] पिलूं आपण होतो ४००. मग श्रीगुरूला पक्षिणी करतो व त्या पक्षिणीच्या चोंचींतील चारा आपण घेत आहो किंवा गुरु तारू आहेत असें समजून आपण त्याच्या कांसेस लागतो आहोत १. अशा प्रकारें ज्याप्रमाणें समुद्राला भरती आल्यावर लाटांपासून लांटा उत्पन्न होतात. त्याप्रमाणें गुरुप्रेमाच्या बळानें गुरुध्यानच अनेक ध्यानास प्रसवते २. असे बहुत प्रकार किती सांगावे ! तर याप्रमाणें श्रीगुरूंची मूर्ति अंतर्यामीं धारण करून तो ध्यानसुखाचा अनुभव घेतो. आतां तो श्रीगुरूंची बाह्य सेवा कशी करितो ते ऐक ३. [ दास्यं ] तो आपल्या मनांत असा निश्चय करितो कीं, मी गुरूंची इतकी उत्तम सेवा करीन कीं, त्यामुळें गुरूंनीं, संतोष पावून मला प्रेमानें 'कांहीं तरी माग' असें म्हणतील ४. अशा प्रकारच्या माझ्या खऱ्या शुद्ध सेवेनें गुरु सुप्रसन्न होतील तेव्हां मी त्यांची अशी प्रार्थना करीन ५. मी म्हणेन कीं, "हे प्रभो ! आपला जेवढा म्हणून परिवार आहे, त्या सर्व परिवाराची रूपें मींच एकट्यानें घ्यावीं ६. आणि आपल्या उपयोगी पडणारीं जितकीं उपकरणें, वस्तु आहेत तितक्या सर्वांचीं रूपें मी एकट्यानें धारण करावीत" ७. याप्रमाणें त्यांना मी वर मागितल्यावर श्रीगुरु 'हो' म्हणतील, मग त्यांचा तो सर्व परिवार मीच होईन [ मीच त्यांची सर्वप्रकारें सेवा करीन ] ८. म्हणजे त्यांच्या उपयोगी पडणाऱ्या जेवढ्या म्हणून वस्तु आहेत त्यापैकीं प्रत्येक वस्तु मीच होईन, त्या वेळेस माझ्या उपासना सेवेचा चमत्कार दृष्टीस पडेल ९. गुरु हे जरी

१ ध्रुव, निश्चित. २ पूजासाहित्य. ३ ज्ञानाच्या ४ चौथऱ्यांत, ओट्यांत. ५ देवळांत. ६ अभिषेकी. ७ बोधरूपी सूर्य. ८ परडी. ९ अष्टसात्विक भावांचीं कमळें. १० शिवगुरूला. १० तिन्ही काळीं. १२ देहाभिमान. १३ ऐक्याची. १४ पाकसिद्धि. १५ भक्त. १६ प्रतिमा. १७ भोगी. १८ संतोषानें. १९ प्रीति. २० गुरुध्यान. २१ शेषशय्या. २२ विष्णू. २३ पादसेवा करणारी. २४ ज्ञानरूपी वृक्ष. २५ पाण्यांत. २६ वृष्टि. २७ नेत्रांवांचून आणि पंखांवांचून. २८ चोचीनें. २९ तारक. ३० स्थिरतेनें, बळानें. ३१ तरंग, लाटा. ३२ अवसान धरतो.

आणं वायें । कृपे तिये ॥ ४१० ॥ तया अनुरागा वेधु लावीं । एकपत्नीव्रत घेववीं । क्षेत्रसंन्यासु करवीं । लोभाकरवीं ॥ ११ ॥ चतुर्दिक्षु वारा । न लाहे निघों बाहिरा । तैसा गुरुकृपें पांजिरा । मीचि होईन ॥ १२ ॥ आपुलिया गुणांचीं लेणीं । करीन गुरुसेवे स्वामिणी । हें असो होईन गंवसणी । मीचि भक्तीसी ॥ १३ ॥ गुरुस्नेहाचिये वृष्टी । मी पृथ्वी होईन तळवटीं । ऐसिया मनोरथांचिया सृष्टी । अनंता रची ॥ १४ ॥ म्हणे श्रीगुरूंचें भुवन । आपण मी होईन । आणि दास होऊनि करीन । दास्य तेथिंचें ॥ १५ ॥ निर्गमागमीं दातारें । जें वोलांडिजती उंबरे । ते मी होईन आणि द्वारें । द्वारपाळु ॥ १६ ॥ पाउवाँ मी होईन । तियां मीचि लेववीन । छत्र मी आणि करीन । बारीपण ॥ १७ ॥ मी तळ उपरु जाणविता । चवंरुधरु हातु देता । स्वामीपुढें खोलंता । होईन मी ॥ १८ ॥ मीचि होईन सागळा । करूं सुइन गुरुळां । सांडिती तो नेपाळा । पडिघा मीचि ॥ १९ ॥ हडप मी वोळगैन । मीचि उगाळु घेईन । उळिगें मी करीन । आंघोळीचें ॥ ४२० ॥ होईन गुरूंचें आसन । अळंकार परिधान । चंदनादि होईन । उपचार ते ॥ २१ ॥ मीचि होईन सुआरु । वोगेरीन उपहारु । आपणपें श्रीगुरु । वोंवाळीन ॥ २२ ॥ जे वेळीं देवो आरोगिती । तेव्हां पांतीकरु मीचि पांतीं । मीचि होईन पुढती । देईन विडा ॥ २३ ॥ ताट मी काढीन । सेज मी झाडीन । चरणसंवाहन । मीचि करीन ॥ २४ ॥ सिंहासन होईन आपण । वरी गुरुकरिती आरोहण । होईन पुरेपण । वोळगेचें ॥ २५ ॥ श्रीगुरूंचे मन । जया देईल अवधान । तो मी पुढां होईन । चमत्कारु ॥ २६ ॥ तया श्रवणाचे आंगणीं । होईल शब्दांचिया अक्षौहिणी । स्पर्श होईन घसणी । आंगाचिया ॥ २७ ॥ श्रीगुरूंचे डोळे । अवलोकनें स्नेहाळें । पाहाती तियें सकळें । होईन रूपें ॥ २८ ॥ तियें रसनें जो जो रुचेल । तो तो रसु म्यां होईजैल । गंधरूपें कीजेल । घ्राणसेवा ॥ २९ ॥ एवं बाह्यमनोगत । श्रीगुरुसेवा समस्त । वेंटाळीन वस्तुजात । होऊनियां ॥ ४३० ॥ जंव देह हें असेल । तंव वोळगी ऐसी कीजेल । मग देहांतीं नवल । बुद्धि आहे ॥ ३१ ॥ इये शरीरींची माती । मेळवीन तिये क्षितीं । जेथ श्रीचरण उभे ठाती । श्रीगुरूंचे ॥ ३२ ॥ माझा स्वामी कवतिकें । स्पर्शीजाति जियें उदकें । तेथ लया नेईन निकें । आपीं आप ॥ ३३ ॥ श्रीगुरु वोंवाळिजती । कां भुवनीं जे उजाळिजती ।

पुष्कळ भक्तांची माउली आहेत. तरीपण त्या गुरूंच्या कृपेस मी आपली शपथ वाहवीन व माझी एकट्याचीच माउली करून घेईन ४१०. गुरूंच्या प्रेमास मी आपला छंद लावून, त्याच्याकडून एकपत्नीव्रत आचरवीन आणि गुरूंच्या लोभाकडून अन्यत्र कोठेहि न जाता माझेच ठिकाणीं वास करण्याविषयीं क्षेत्रसंन्यास घेववीन ११. वारा किती जरीं वाहूं लागला तरी तो जसा चारी दिशांच्या आंतच वाहतो, त्याच्या बाहेर निघूं शकत नाहीं त्याप्रमाणें गुरूंच्या कृपेस सर्व बाजूंनीं मीच पिंजरा होईन १२. माझी स्वामिनी जी गुरुसेवा, तिला मी आपल्या गुणांचीं लेणीं करीन. फार तर काय! पण गुरुभक्तीला मीच गंवसणीहि होईन १३. आणि गुरुस्नेहरूप वृष्टीखालीं मी पृथ्वी होईन. याप्रमाणें नानाप्रकारच्या मनोरथांच्या अनंत सृष्टि जो मनांत तयार करतो १४. आणि म्हणतो कीं, मी स्वतः श्रीगुरूंचे राहते घर होईन आणि दास होऊन त्यांची त्या ठिकाणीं सेवाचाकरी करीत राहीन १५. जातां-येतां जे घराचे उंबरे श्रीगुरु ओलांडतात, ते मीच होऊन, आणि घराची दारेंहि मीच होऊन, द्वारपाळहि मीच होईन १६. मी गुरूंच्या पादुका होऊन त्या पादुका-खडावा गुरूंच्या पायीं मीच लेववीन आणि छत्रहि मीच होऊन मीच ते छत्र गुरूंवर धरण्याचे काम करीन १७. महाराज! या ठिकाणीं खोल खळगा आहे, या ठिकाणीं उंचवटा आहे, अशी इशारत देणारा श्रीगुरूंचा चोपदार मीच होईन आणि गुरूंवर चवरी धरणारा मीच होईन, गुरूंस हात देणारा मीच होईन व गुरूंपुढें पळणारा वाटाड्या किंवा हुजऱ्याहि मीच होईन १८. गुरूंची झारी हातांत घेणारा शागीर्द मीच होईन व गुरूंना चूळ भरण्यासाठीं पाणीहि मीच देईन व चूळ टाकण्याचें निर्मळ तस्तहि मीच होईन; तांबूलादि साहित्य, पानदान मी बाळगीन त्यांनी चावलेला विडा, पिंक [ पान खाऊन थुंकलेली थुंकी ] मी घेईन १९. आणि उटणें घेऊन गुरूंना स्नान घालण्याची खटपट मीच करीन ४२०. श्रीगुरूंचें आसन मी होईन अलंकार, वस्त्रचंदनादिक सर्व उपचार हे सर्वहि मीच होईन २१. स्वयंपाक करणारा आचारी मीच होईन व गुरूंना फराळाचे पदार्थ वाढीन आणि मी आपल्या आत्मत्वानें श्रीगुरूला ओंवाळीन २२. ज्या वेळेस गुरुमहाराज भोजन करतील, त्या वेळेस त्यांचे पंक्तीचाहि लाभ घेणाराहि मीच होईन आणि मीच पुढें होऊन त्यास विडा देईन २३. [ **पादसेवनं** ] गुरूंचें भोजन केलेले ताट व उष्टें मीच काढीन, गुरूंचा बिछाना मीच झाडीन व गुरूंची चरणसेवाहि मीच करीन २४. आणि श्रीगुरूंचें सिंहासनहि मीच स्वतः होईन व मग त्यावर श्रीगुरु आरोहण करतील, बसतील याप्रमाणें सर्वप्रकारें मी श्रीगुरूंची सेवा करीन २५. [ **श्रवणं** ] श्रीगुरूंचें लक्ष ज्या गोष्टीकडे लागेल, ती वस्तूहि होण्याचा चमत्कार मीच करीन २६. श्रीगुरूंच्या श्रवणरूप अंगणांत शब्दाचे असंख्य समुदाय मीच होईन आणि श्रीगुरूंचा ज्या ठिकाणीं अंगस्पर्श होईल तें स्पर्श ठिकाणहि मीच होईन २७. श्रीगुरूंचे डोळे प्रेमळपणानें ज्या ज्या वस्तु अवलोकन करतील तीं सर्व रूपें वा त्या वस्तु मीच होईन २८. त्यांच्या जिव्हेस जो जो रस आवडेल, तो तो रसहि मीच होईन; मीच गंधरूप होऊन त्यांच्या घ्राणेंद्रियाची सेवा करीन २९. याप्रमाणें श्रीगुरूंची बाह्यसेवा सर्वप्रकारेंकरून गुरूंना लागणाऱ्या सर्व वस्तु मीच होऊन व्यापून टाकीन. असें त्याचे मनोगत असते ४३०. महाराज म्हणतात:- जोंपर्यंत हा देह आहे, तोंपर्यंत श्रीगुरूंची अशीच सर्वतोपरि सेवा करीन असें म्हणतो. [ **आत्मनिवेदनं** ] आणि मग देह पडल्यानंतरहि त्याची सेवेविषयीं अद्‌भुत आस्थाबुद्धि कशी धरिते. तें नवल ऐका ३१. तो म्हणतो:- " या शरीराची माती पृथ्वीच्या त्या भागांत मिळवीन कीं, ज्या ठिकाणीं श्रीगुरूंचे पूजनीय श्रीचरण उभे राहतील ३२. मी आपल्या शरीरांतील उदकाचा भाग खरोखर चांगल्या रीतीनें त्या उदकाला नेऊन मिळवीन कीं, ज्या उदकाला माझे स्वामी कौतुकानें, सहज स्पर्श करतील! ३३. आपल्या देहां-

---

१ शपथ घालून. २ छंद. ३ चहूं दिशाकडून. ४ पिंजरा. ५ जाण्यायेण्याच्या वेळीं. ६ गुरूंनीं. ७ पादुका. ८ पाळीची चाकरी. ९ उंचवटा. १० चवरी धरणारा. ११ दिवट्या, वाटाड्या. १२ झारी धरणारा. १३ गुळणी. १४ चूळ. १५ तस्त, पीकदाणी. १६ पानदान. १७ बाळगीन. १८ पिंक, चावलेला विडा. १९ चाकरी, काम. २० वस्त्र. २१ आचारी. २२ वाढीन. २३ आत्मत्वानें. २४ भोजन करतील. २५ पंक्तीस बसलेला. २६ पाय दाबणें. २७ सेवेचें. २८ असंख्य समुदाय. २९ प्रेमळपणानें. ३० जिव्हेला. ३१ पदार्थ. ३२ आटोपीन. ३३ सेवा. ३४ पृथ्वीला.

तयां दीपांचिया दीप्ती । ठेवीन तेज ॥ ३४ ॥ चंवरी हन विंजणा । तेथ लयो करीन प्राणा । मग आंगाचा वोळंगणा । होईन मी ॥ ३५ ॥ जिये जिये अवकाशीं । श्रीगुरु असती परिवारेंसी । आकाश लया आकाशीं । नेईन तिये ॥ ३६ ॥ परी जीतु मेला न संडी । निमेषु लोकां न धाडीं । ऐसेनि गणौवया कोडी । कल्पांचिया ॥ ३७ ॥ येतुलेवरी धिंवसा । जयाचिया मानसा । आणि करूनियांहि तैसा । अपारु जो ॥ ३८ ॥ रात्र दिवस नेणे । थोडें बहु न म्हणें । म्हाणियाँचेनि दाटपणें । साजा होय ॥ ३९ ॥ तो व्यापारु येणें नांवें । गगनाहूनि थोरावे । एकला करी आघवें । एकेचि काळीं ॥ ४४० ॥ हृदयवृत्ती पुढां । आंगचि घे दवडां । काज करी होडा । मानसेंशीं ॥ ४१ ॥ एकादियां वेळां । श्रीगुरूचिया खेळा । लोण करी सकळा । जीविताचें ॥ ४२ ॥ जो गुरुदास्यें कृशु । जो गुरुप्रेमें संपोषु । गुरुआज्ञेनिवासु । आपणचि जो ॥ ४३ ॥ जो गुरु कुळें सुकुलीनु । जो गुरुबंधुसौजेन्यें सुजनु । जो गुरुसेवाव्यसनें सव्यसनु । निरंतर ॥ ४४ ॥ गुरुसंप्रदायधर्म । तेचि जयाचे वर्णाश्रम । गुरुपरिचर्या नित्यकर्म । जयाचें गा ॥ ४५ ॥ गुरु क्षेत्र गुरु देवता । गुरु माता गुरु पिता । जो गुरुसेवेपरौता । मार्ग नेणें ॥ ४६ ॥ श्रीगुरूचे द्वार । तें जयाचें सर्वस्व सार । गुरुसेवकां सहोदर । प्रेमें भजे ॥ ४७ ॥ जयाचें वक्त्रें । वाहे गुरुनामाचे मंत्र । गुरुवाक्यांवांचूनि शास्त्र । हातीं न शिवे ॥ ४८ ॥ शिवतलें गुरुचरणीं । भलतैसें हो पाणी । तया सकळ तीर्थें आणी । त्रैलोक्यींचीं ॥ ४९ ॥ श्रीगुरूचें उंशिटें । लाहे जैं अवचटें । तैं तेणें लाभें विटे । समाधीसी ॥ ४५० ॥ कैवल्यसुखासाठीं । परमाणु घे किरीटी । उधळती पायांपाठीं । चालतां जे ॥ ५१ ॥ हें असो सांगावें किती । नाहीं पारु गुरुभक्ती । परी गा उत्क्रांतमंती ।-कारण हें ॥ ५२ ॥ जया इये भक्तीची चाड । जया इये विषयींचें कोड । जो हे सेवेवांचून गोड । न मनी कांहीं ॥५३॥ तो तत्त्वज्ञानाचा ठावो । ज्ञाना तेणेंचि आंवो । हें असो तो देवो । ज्ञान भक्तु ॥ ५४ ॥ हें जाण पां साचोकारें । तेथ ज्ञान उघडेनि द्वारें । नांदत असे जगा पुरे । इया रीती ॥ ५५ ॥ जिये गुरुसेवेविखीं । माझा जीव अभिलाखी । म्हणौनि सोयचुकी । बोली केली ॥ ५६ ॥ येऱ्हवीं असता हातीं खुळा । भजनावधानीं आंधळा । परिचर्येलागीं पांगुळा- । पासूनि मंदु ॥ ५७ ॥ गुरुवर्णनीं मुका । आळशी

तील तेज त्या दिव्यांतील तेजांत नेऊन मिळवीन कीं, ज्या दिव्यानीं लोक श्रीगुरूंना ओंवाळतील अथवा जे दिवे श्रीगुरूंच्या मंदिरांत प्रकाश करीत असतील! ३४. मी आपल्या देहांतील प्राणांचा लय त्या ठिकाणीं करीन कीं, ज्या ठिकाणीं श्रीगुरूंना पंख्यानें वा चवरीनें वारा घातला जात असेल! व मग वारा होऊन त्यांच्या शरीराची सेवा करीन ३५. मी आपल्या शरीरांतील आकाशाचा भाग त्या ठिकाणीं लयास नेऊन मिळवीन कीं, ज्या अवकाशांत [ पोकळींत ] श्रीगुरु आपल्या परिवारासह असतील! ३६. परंतु जींवत असतांना आणि मेल्यावरहि श्रीगुरूंची सेवा केल्याशिवाय मी राहणार नाहीं आणि एक निमिषभर, पळभरहि दुसऱ्यांवर गुरूंची सेवा सोंपविणार नाहीं, याप्रमाणें कोट्यावधि कल्पच्या कल्पकाल मोजला तरी श्रीगुरु सेवा करीतच राहीन ३७. येथपर्यंत अशा प्रकारची पूर्ण उत्कट इच्छा ज्याच्या मनांत असते आणि त्या आपल्या इच्छेप्रमाणेंच अपार गुरुसेवा करूनहि [ ज्याची सेवावृत्ति कायम असते ] ३८. जो गुरुसेवेला रात्र व दिवस जाणत नाहीं किंवा थोडी-फार म्हणत नाहीं आणि तशांत जर गुरूंनीं सेवा करण्याची आज्ञा केली, तर सेवेच्या दाटीमुळें त्याला जास्त स्फुरण येतें व तो प्रसन्न होतो ३९. श्रीगुरूंची अशा प्रकारें सेवा करावयाची म्हटले म्हणजे जो गगनाहूनहि मोठा होतो व ती सर्व सेवा एकटाच एकाचकाळीं करतो ४४०. मनोवृत्तीच्या धांवेपेक्षां याच्या शरीराची धांव पुढें असतें व याची सेवा करण्याची प्रत्यक्ष कृति ही मनाशीं चढाओढ-पैज बांधिते, ४१. एखादे वेळेस श्रीगुरूंच्या लीलांना, आपल्या जीवितांचें लिंबलोण करितो, [ त्यांच्या कांहींशा लीलांवरून आपलें जीवित उतरून ठेवतो, ] ४२. जो गुरूंच्या सेवेनें कृश झालेला असतो व गुरूंच्या प्रेमानें पुष्ट झालेला असतो आणि गुरूंच्या आज्ञेला आपणच स्थान असतो ४३. जो श्रीगुरूंच्या कुळामुळें आपणांस कुलीन असें मानतो जो गुरुबंधूंच्या बरोबर सौजन्यानें वागून सुजन-भला असतो व जो गुरुसेवारूप व्यसनानेंच निरंतर व्यसनी असतो ४४. गुरुसंप्रदायप्राप्त, परंपरेनें चालत आलेलें धर्म तेच ज्याचे वर्णाश्रम विहित धर्म होत व श्रीगुरूंची सेवा करणें हेंच ज्याचें नित्यनैमित्तिक कर्म असतें ४५. ज्याचें गुरु हेंच क्षेत्र श्रीगुरु हीच देवता श्रीगुरूंच आई व श्रीगुरुच बाप होत आणि ज्याला गुरुसेवेशिवाय दुसरें कांहीं एक माहीत नसतें ४६. श्रीगुरूंचें जें द्वार तेंच ज्यांचें सर्व धर्मांचें सार होय, आणि गुरुसेवकावर आपल्या सख्ल्या भावाप्रमाणें जो प्रेम करितो, व वागतो ४७. [ कीर्तनं ] ज्याच्या मुखांतून, वाणींतून रात्रंदिवस श्रीगुरुनामाचा मंत्रोच्चार चालत असतो व जो गुरुवाक्यावांचून दुसरें कोणतेंहि शास्त्र हातीं धरीत नाहीं, म्हणजे मानीत नाहीं, [ वदनं ] ४८. ज्या पाण्यास श्रीगुरूंचे चरण लागले आहेत तें पाणी कसलेंहि असलें तरी तें इतकें मोठें तीर्थ समजतो कीं, त्यांत त्रैलोक्यांतील सर्व तीर्थेंच तीर्थयात्रेकरितां आणतो ४९. त्याला अकस्मात् श्रीगुरूंचा उच्छिष्ट प्रसाद मिळाला तर त्या लाभापुढें जो समाधि-सुखालाहि विटतो, तुच्छ मानतो ४५०. अर्जुना! श्रीगुरु चालत असतांना त्या पायांमागें जें गुरूंचें पवित्र पदरजःकण उडतात ते जो आपले मस्तकावर धारण करितो, व त्या लाभामुळें तो गुरुभक्त आपल्याला मोक्षसुख लाभलें असें मानतो ५१. हें असो, गुरुभक्तीचा महिमा किती म्हणून सांगावा! कारण, त्या प्रेमाला अंतपार नाहीं. परंतु माझ्या बुद्धीला गुरुभक्तीची अतिशय स्फूर्ति झाल्यामुळें सांगितलें, हेच या विस्ताराचें कारण आहे ५२. ज्याला या गुरुभक्तीची इच्छा आहे व ज्याला याच गुरुभक्तीचें कौतुक वाटतें आणि ज्याला मनांत या गुरुसेवेवांचून दुसरें कांहींहि चांगलें, गोमटें वाटत नाहीं ५३. तो गुरुभक्त ब्रह्मज्ञानाचें माहेरघर असून ज्ञानाला त्याच्याच योगानें शोभा येतें. फार तर काय? अशी श्रीगुरूंची सेवा करणारा हाच देव आहे आणि ज्ञान हे त्याचा भक्त बनलें आहे ५४. ज्याला खरोखर अशा प्रकारच्या गुरुभक्तीची आवड आहे त्याच्या घरीं जगाला पुरून उरेल इतकें ज्ञान भरलेलें असून उघड्या दारानें नांदतें असें समज ५५. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात-गुरुसेवेविषयीं माझ्या मनांत खरी उत्कंठा आहे म्हणून मी त्या गुरुभक्तीचें अमर्याद असें वर्णन केलें ५६. नाहींतर माझ्याविषयीं विचार केला असतां मी हात असून थोटा आहे, डोळे असून भजनाविषयीं आंधळा आहे व पाय असून गुरुसेवा करण्याविषयीं पांगळ्यापेक्षांहि पांगळा आहे ५७. आणि श्रीगुरूंचे वर्णन करण्या-

१ सेवक, आश्रय करणारा. २ अशाच कल्पकोटी मोजाव्या व कल्पकोटिपर्यंत असेंच करीन. ३ धैर्य. ४ आज्ञा केलेल्या कार्याच्या. ५ मारानें. दडपणानें. ६ ताजा, टवटवीत. ७ धांव. ८ पैज. ९ ओंवाळणी. १० पुष्ट. ११ घर. १२ स्नेह. १३ गुरूंची सेवा. १४ तोड. १५ उष्टें, अन्नादि १६ गुरुपदरज. १७ विषयांतराला. १८ आवड. १९ डौल.

पोशिजे फुका । परि मनीं आथी निका । सानुरागु ॥ ५८ ॥ तेणेंचि पैं कारणें । हें स्थूळ पोसणें । पंडलें मज म्हणे । ज्ञानदेवो ॥ ५९ ॥ परि तो बोलु उपसाहावा । आणि वोळगे अवसरु देयावा । आतां म्हणेन जी बरवा । ग्रंथार्थुचि ॥ ४६० ॥ परिसा परिसा श्रीकृष्णु । जो भूतभारसहिष्णु । तो बोलतसे विष्णु । पार्थु ऐके ॥ ६१ ॥ म्हणे शुचित्व गा ऐसें । जयापाशीं दिसे । आंग मन जैसें । कापुराचें ॥ ६२ ॥ कां रत्नाचें दळवाडें । जैसें सबाह्य चोखडें । आंत बाहेरि एके पाडें । सूर्यु जैसा ॥६३॥ बाहेरीं कर्में क्षाळला । भीतरीं ज्ञानें उजळला । इहीं दोहीं परी आला । पाखाळा एका ॥ ६४ ॥ मृत्तिका आणि जळें । बाह्य येणें मेळें । निर्मळु होय बोलें । वेदाचेनी ॥ ६५ ॥ भलतेथ बुद्धीबळी । रजआरिसा उजळी । सौंदणी फेडी थिगळी । वस्त्रांचिया ॥ ६६ ॥ किंबहुना यियापरी । बाह्य चोख अवधारीं । आणि ज्ञानदीपु अंतरीं । म्हणौनि शुद्ध ॥ ६७ ॥ येऱ्हवीं तरी पंडुसुता । आंत शुद्ध नसतां । बाहेरि कर्म तो तत्त्वतां । विटंबु गा ॥६८॥ मृत जैसा शृंगारिला । गाढव तीर्थीं न्हाणिला । कडुदुधिया माखिला । गुळें जैसा ॥ ६९ ॥ वोस गृहीं तोरण बांधिलें । कां उपवासी अन्नें लिंपिलें । कुंकुमसेंदुर केलें । कांतहीनेनें ॥ ४७० ॥ कळस ढिमाचे पोकळ । जळो वरील ते झळाळ । काय करूं चित्रींव फळ । आंतु शेण ॥ ७१ ॥ तैसें कर्मवरिचिलेंकडां । न सरे थोर मोलें कुडा । नव्हे मदिरेचा घडा । पवित्र गंगें ॥ ७२ ॥ म्हणौनि अंतरीं ज्ञान व्हावें । मग बाह्य लाभेल स्वभावें । वरी ज्ञान कर्में संभवें । ऐसें कें जोडे ? ॥ ७३ ॥ यालागीं बाह्य भागु । कर्में धुतला चांगु । ज्ञानें फिटला वंगु । अंतरींचा ॥ ७४ ॥ तेथ अंतर बाह्य गेलें । निर्मळत्व एक जाहलें । किंबहुना उरलें । शुचित्वचि ॥ ७५ ॥ म्हणौनि सद्भाव जीवगत । बाहेरी दिसती फांकत । स्फटिकगृहींचे डोलत । दीप जैसे ॥ ७६ ॥ विकल्प जेणें उपजे । नाथिली विकृती निपजे । अप्रवृत्तीचीं बीजें । अंकुर घेती ॥७७ ॥ तें आइके देखे अथवा भेटे । परी मनीं कांहींचि नुमटे । मेघरंगें न कांटे । व्योम जैसें ॥७८॥ येऱ्हवीं इंद्रियांचेनि मेळें विषयांवरी तरी लोळे परी विकाराचेनि विटाळें । लिंपिजेना ॥७९॥ भेटलेया वाटेवरी । चोखी आणि माहारी । तेथ नातळें तियापरी । राहाटों जाणें ॥४८०॥ कां पतिपुत्रांतें आलिंगी । एकचि ते तरुणांगी । तेथ पुत्रभावाच्या आंगीं । न रिगे कामु ॥ ८१ ॥ तैसें हृदय चोख । संकल्पविकल्पीं

विषयीं मुका आळशी आहे, इतका अवगुण असूनहि मी आपल्या शरीराचे फुकट पोषण करीत आहे. परंतु त्याचेहि कारण म्हणजे गुरुभक्ति होण्याविषयीं माझी उत्कट इच्छा व प्रेमहि आहे, म्हणूनच ५८. महाराज म्हणतात:–एवढ्याच कारणाकरितां मला शरीराचें पोषण करणें भाग पडलें ५९. परंतु मी एवढें अमर्याद गुरुसेवेविषयीं वर्णन केलें, तें सहन करावें व मला आपली सेवा करण्यास संधि द्या म्हणजे मी ग्रंथार्थच उत्तम रीतीनें सांगेन ४६०. साधुजनहो! ऐका! ऐका! भूतांचा भार सहन करणारा विष्णूचा अवतार जो भगवान् श्रीकृष्ण तो सांगत असून पार्थ ऐकत आहे ६१. [ शौचं ] श्रीकृष्ण म्हणतात, जसा कापूर अंतर्बाह्य शुद्ध, स्वच्छ असतो तसें ज्याचे शरीर व मन पवित्र असतात असें शुचित्व स्वच्छ दिसते. तेंच खरें शुचित्व होय ६२. किंवा रत्नाचें स्वरूप जसें अंतर्बाह्य चकचकीत चोख असतें अथवा सूर्य जसा आंत व बाहेर एकसारखा प्रकाशमय लकलकीत दिसतो ६३. त्याप्रमाणें कर्माच्या योगानें ज्याची बाह्यशुद्धि झाली आहे व ज्ञानाच्या योगानें अंत:शुद्धि झालेली आहे आणि अशा दोन्ही प्रकारांनीं जो शुद्धत्वाला प्राप्त झाला आहे ६४. वेदांत सांगितल्याप्रमाणें मंत्रोच्चारपूर्वक मृत्तिका व पाणी बाहेरून लाविली असतां जशी बाह्यशरीरशुद्धि होते ६५. त्याप्रमाणें वाटेल तेथे व वाटेल तेव्हां बुद्धीच्या योगानें आरसा धुळीनें [ मातीनें ] स्वच्छ करतां येतो, किंवा परटाच्या सतेलांत [ भट्टीच्या पात्रांतील पाण्यानें ] वस्त्र धुतल्यानें ते त्या वस्त्राचे डाग नाहींसे करते ६६. फार काय सांगावें!! याप्रमाणें जो बाहेर निर्मळ शुद्ध झाला आहे आणि अंतर्यामी ज्ञानरूपी दीपाचा उजेड झाल्यामुळें खरोखरच अंतराहि शुद्ध झालेले असते असें समज ६७. बाकी अर्जुना! अंतर्यामीं शुद्ध न होतां केवळ बाह्यात्कारी शरीरानें कर्मे करणें म्हणजे ती सर्वत्र विटंबना होय ६८. ज्याप्रमाणें प्रेतावर दागिने घालून त्याला शृंगारीलें–सजविले किंवा गाढवास तीर्थांत न्हावूं घातले अथवा कडू दुध्याभोपळा गुळानें माखला ६९. किंवा ओसाड घराला तोरण बांधलें अथवा उपाशी मनुष्याच्या पोटावर बाहेरून अन्न लिंपिलें किंवा गतभर्तृकेनें कुंकू व शेंदूर लावला ४७०. बाहेरून सोन्याचा मुलामा केलेल्या कळसाचा पोकळ डेरा वरवर जरीं किती चकचकीत दिसला तरी नुसत्या चकचकीला आग लागो! कारण, ती व्यर्थ होय. तसेंच शेणाची फळांची चित्रें बाहेरून रंगवून ती हुबेहुब खऱ्या फळासारखी दिसत असली तरी घेऊन काय करावयाचें? त्यांत शेणच भरलेले असतें ७१. अंतर शुद्ध नसून फक्त बाह्यात्कारीं कर्म करण्याची स्थिति त्याप्रमाणें आहे! हिणकट पदार्थाला पुष्कळ मोल येत नाहीं वा ती खपतहि नाहीं; किंवा मद्यानें भरलेली घागर गंगेंत नेऊन बुचकळली वा ठेविली तरीहि ती घागर पवित्र होत नाहीं ७२. म्हणून अंतर्यामीं अंत:करणवृत्तींत ज्ञानप्राप्ति झालेली असावी म्हणजे मग बाहेरची कर्मशुद्धि सहजच प्राप्त होईल; परंतु ज्ञान आणि बाह्यकर्माचरण अशी उभय स्वरूपाची पवित्रता कोठें मिळेल? ७३. याकरितां बाह्यात्कारी कर्माचें आचरण करून बाह्य भाग शुद्ध झाला आहे व ज्ञानप्राप्तीमुळें ज्यानें अंतर्यामींचा मळ काढून टाकला आहे ७४. त्या स्थितींत आंत व बाहेर हा भेद न राहतां अंतर्बाह्य एक शुचित्त्वच झालें, फार काय सांगावें!! तेथें केवळ शुचित्त्वच उर्वरित राहते ७५. म्हणून अंतर्यामीं शुद्ध मनोवृत्ति झाली म्हणजे बाह्य इन्द्रियव्यापारद्वारां ती तशीच प्रगट झालेली दिसून येते. ज्याप्रमाणें स्फटिकाच्या घरांत लावलेले दिवे व त्यांच्या प्रकाशज्योति आंतल्याप्रमाणें बाहेरहि हालतांना व लखलखीत रूपानें दिसतात ७६. ज्या योगानें संशय उत्पन्न होतात, ज्यामुळें [ मनांत ] नसत्या विकृति निर्माण होतात व ज्यामुळें कुकर्म बीजें अंकुरित होतात म्ह० निषिद्ध कर्माकडे प्रवृत्ति होते ७७. ज्याप्रमाणें मेघांच्या रंगांचे आकाशावर डाग पडत नाहींत, त्याप्रमाणें उपर्युक्त स्वरूपाचें विषय जरी भेटले अथवा कानानें ऐकले, किंवा प्रत्यक्ष पाहिले, तरी ज्याच्या मनावर त्याचा परिणामीं विकारात्मक ठसा कांहींच उमटत नाहीं ७८. एव्हवीं जो इन्द्रियाच्या संगतीनें विषय सन्निकर्ष घडला तरी विषयांच्या विकाराच्या विटाळानें ज्याचे मन कोणत्याहि प्रकारें लिप्त होत नाहीं ७९. वाटेवरून एखादी पवित्र स्त्री अथवा अपवित्र स्त्री गेल्यानें वाट जशी दोहींपासून अलिप्त असते. त्याप्रमाणें जो संसारांत राहटत असतां इन्द्रियांच्या विकारांचें प्राबल्य आपल्या मनावर होऊं न देतां असंगत्वानें, अलिप्तपणें असतो ४८०. एकच तरुण स्त्री आपल्या पतीला व पुत्रालाहि आलिंगन देते, परंतु पुत्राला आलिंगन देतेवेळीं तिच्या मनांत पुत्रविषयक प्रेमांत कामवासनेचा अजिबात स्पर्शहि नसतो ८१. त्याप्रमाणें ज्याचें मन निर्मळ, पवित्र असतें, बऱ्यावाईट सकल्प-विकल्पाची ज्याला अचूक ओळख असते; व योग्यायोग्य कर्म कोणते याची ज्यास

१ प्रेमळ, प्रीतियुक्त. २ शरीर. ३ पोषण करावें लागलें. ४ सेवेला. ५ सर्व प्राण्यांचा भार सहन करणारा.

सनोळेख । कृत्याकृत्य विशेखें । फुडे जाणें ॥ ८२ ॥ पाणियें हिरा न भिजे । आधणीं हरळु न शिजे । तैसी विकल्पजातें न लिंपिजे । मनोवृत्ती ॥ ८३ ॥ तया नांव शुचिपण । पार्था गा संपूर्ण । हें देखसी तेथ जाण । ज्ञान असे ॥ ८४ ॥ आणि स्थिरता साचें । घर रिघाली जयाचें । तो पुरुष ज्ञानाचें । आयुष्य गा ॥ ८५ ॥ देह तरी वरिचिलीकडे । आपुलिया परी हिंडे । परी बैसका न मोडे । मानसींची ॥ ८६ ॥ वत्सावरूनि धेनूचे । स्नेह राना न वचे । नव्हती भोग सतियेचे । प्रेमभोग ॥ ८७ ॥ कां लोभिया दूर जाये । परी जीव ठेविलेचि ठाये । तैसा देहो चाळितां नव्हे । चळुं चित्त ॥ ८८ ॥ जातया अभ्रासवें । जैसें आकाश न धांवे । भ्रमणचक्रीं न भंवे । ध्रुव जैसा ॥ ८९ ॥ पांथिकाचिया येरझारा । सवें पंथु न वचे धनुर्धरा । कां नाहीं जेवीं तरुवरां । येणें जाणें ॥४९०॥ तैसा चळणवळणात्मकीं । असोनि ये पांचभौतिकीं । भूतोर्मी एकीं । चळिजेना ॥ ९१ ॥ वाहुटळीचेनि बळें । पृथ्वी जैसी न ढळे । तैसा उपद्रव उमाळें । न लोटे जो ॥ ९२ ॥ दैन्यदुःखीं न तपे । भयशोकीं न कंपे । देहमृत्यु न वासिपे । पातलेनी ॥ ९३ ॥ आर्ति आशा पडिभरें । वय व्याधी गजरें । उजू असतां पाठिमोरें । नव्हे चित्त ॥ ९४ ॥ निंदा निस्तेजं दंडी । कामलोभा वरपडी । परी रोमा नव्हे वांकुडी । मानसाची ॥ ९५ ॥ आकाश हें वोसरो । पृथ्वी वरि विरो । परि नेणें मोहरों । चित्तवृत्ती ॥ ९६ ॥ हांती हौला फुलीं । पौसवणा जेवीं न घाली । तैसा न लोटे दुर्वाक्यशेलीं । शेलिलीं सांता ॥ ९७ ॥ क्षीरार्णवाचिया कल्लोळीं । कंपु नाहीं मंदराचळीं । आकाश न जळे जाळीं । वणवियाच्या ॥ ९८ ॥ तैशा आल्या गेल्या ऊर्मी । नव्हे गजबज मनोधर्मी । किंबहुना धैर्य क्षमी । कल्पांतींही ॥ ९९ ॥ परी स्थैर्य ऐसी भाष । बोलिजे जे सविशेष । ते हे दशा गा देख । देखणयों ॥ ५०० ॥ हें स्थैर्य निधडें । जेथ आंगें जीवें जोडे । तें ज्ञानाचें उघडें । निधान साचें ॥ १ ॥ आणि इसाळु जैसा घेरा । कां दंदियाँ हतियेरा । न विसंबे भांडारा । बद्धकु जैसा ॥ २ ॥ कां एकलौतिया बाळका । वरि पडौनि ठाके अंबिका । मधुविषीं मधुमक्षिका । लोभिणी जैसी ॥ ३ ॥ अर्जुना जो यापरी । अंतःकरण जतन करी । नेदी उभें ठाकों द्वारीं । इंद्रियांच्या ॥ ४ ॥ म्हणे काम बागुल ऐकेल । हे आशा सियारी देखैल । तरी जीवा टेंकैल । म्हणौनि बिहे ॥ ५ ॥ बाहेरी धीट जैसी ।

अचूक ओळख असतें ८२. ज्याप्रमाणें पाण्यांत हिरा भिजत नाहीं वा आधणांत वाळू शिजत नाहीं, त्याप्रमाणें ज्याची मनोवृत्ति कोणत्याहि विकारांनी लिप्त होत नाहीं ८३. पार्था ! ह्यासच संपूर्ण शुचित्व हे नांव आहे व ज्याचे ठिकाणीं ही लक्षणें दृष्टीस पडतील तेथें ज्ञान आहे असें समज ८४. [ स्थैर्य ] आणि स्थिरता ज्याच्या मनांत आपण होऊन पूर्णपणें, खरोखर प्राप्त झाली आहे तो पुरुष ज्ञानाचें जीवनच होय ८५. त्या पुरुषाचा देह वरकांति पाहिला असतां आपल्या स्वभावानुसार वाटेल तिकडे हिंडत असतो तरी त्याच्या मनाची वैचारिक बैठक कायम असते ८६. ज्याप्रमाणें गाय रनांत चरावयास गेली असली तरी तिचे वासरावरील प्रेम रानांत जात नाहीं अथवा पतिव्रता स्त्रीस सहगमनसमयींचें वस्त्रा-लंकारादि उपचार–भोग, प्रेमदायक भोगरूप नसतात ८७. किंवा कृपण घर सोडून लांब जातो तरीपण त्याचें चित्त पुरून ठेवलेल्या द्रव्याजवळ असतें, त्याप्रमाणें स्थिर चित्तवानाच्या देहाचे व्यापार जरी चालू असले तरी त्यांचें चित्तांत चंचलता मुळीहि नसते ८८. इकडून तिकडे धांवणाऱ्या ढगांबरोबर ज्याप्रमाणें आकाश धांवत नाहीं, अथवा जसा फिरणाऱ्या नक्षत्रमंडळाबरोबर–गति-शील ग्रहचक्रांबरोबर ध्रुव तारा फिरत नाहीं ८९. अर्जुना ! प्रवास करणाऱ्या मनुष्याच्या येण्याजाण्याबरोबर ज्याप्रमाणें रस्ता चालत नाहीं किंवा झाडेंहि जात येत नाहींत ४९०, त्याप्रमाणें चलन वलन करणाऱ्या पंचमहाभूतात्मक या शरीरांत इंद्रियांच्या संबंधानें स्थिरचित्त पुरुष रहात असला, तरीहि ज्याचें मन सहा-उर्मींपैकीं कोणत्याहीं एका उर्मीनें–लहरीनें चळत, ढळत नाहीं ९१. वावटळीच्या बळानें ज्याप्रमाणें पृथ्वी हालत नाहीं, त्याप्रमाणें उपद्रवांच्या उसळण्यानें जो हालविला जात नाहीं ९२. दारिद्र्य व दुःख यांपासून जो कष्टी–पीडित होत नाहीं, भीति व शोक यांपासून जो व्याकुळ होऊन कांपत नाहीं व देहास मृत्यु आला असतांहि जो भीत नाहीं ९३. एखाद्या वस्तूची बलवत्तर इच्छा–आशा, वार्धक्य, यांच्या भारानें वा तशांत व्याधि यांचा भर अंगावर प्राप्त झाला असतां आत्मसन्मुख असलेलें चित्त पुनः आत्मविमुख होत नाहीं ९४. निंदा अपमान, यांचे तडाखे बसले किंवा काम व लोभ यांचा बरपगडा झाला असतांहि ज्याच्या मनाचा एक केंससुद्धां वांकडा होत नाहीं ९५. आकाश तुटून पडो किंवा पृथ्वी विरघळून जावो; परंतु ज्याची आत्माकार असलेली चित्तवृत्ति माघारी परत फिरण्याचें जाणत नाहीं ९६. हत्तीला फुलांनी मारिलें असतां त्याचा मार जसा त्याचे पासंगालाहि नसतो, म्हणून तो माघारी हटत नाहीं तसा सलण्यासारख्या शेलक्या अपशब्दांचा प्रहार केला असतांहि ज्याला ते सलत नाहींत ९७. क्षीराब्धीच्या लाटांनीं ज्याप्रमाणें मंदराचल कांपतनाहीं किंवा वणव्याच्या ज्वालांनीं आकाश जळत नाहीं ९८. त्याप्रमाणें इंद्रियांवर विषय-विकारांच्या शोक मोहादि उर्मींच्या कितीही लाटा आल्या किंवा गेल्या तरीहि ज्याचें मन गडबडत नाहीं, फार काय सांगावें ! ! तो क्षमावान् कल्पांतींहि आपले सहन शीलतेचें धैर्य सोडीत नाहीं ९९. हे डोळसा अर्जुना ! स्थैर्य स्थैर्य म्हणून ज्याला म्हणतात व जें "स्थैर्य" या नांवानें विशेष प्रसिद्ध आहे, त्याचीं हीं अशीं लक्षणें आहेत, असे समज ५००. हेंच अविनाशी अढळ स्थैर्य ज्याच्या अंगीं अंतर्बाह्य अर्थात् शरीर व मन यांचे ठिकाणीं बाणलें आहे तो ज्ञानाचा खरा उघड उघड ठेवाच आहे १. [ आत्मविनिग्रहः ] आणि अस्सल साप, जसा आपली खोडी करणाऱ्या किंवा आपले धन असलेल्या मनुष्याचें घराला किंवा योद्धा आपले हत्याराला अथवा कृपण आपल्या ठेव्याला विसरत नाहीं २. किंवा ज्याप्रमाणें एकुलत्या एका मुलावर त्याची आई जीव कीं प्राण करून असते, अथवा मधमाशी मधावर आसक्त असते ३. त्याप्रमाणें अर्जुना ! जो आपलें अंतःकरण सांभाळून ठेवतो आणि अंतःकरणाला इंद्रियांच्या दारांतहि उभें राहूं देत नाहीं ४. तो म्हणतो कीं, आपले अंतःकरण इंद्रियांच्या दारांत गेल्याचें कामरूपी बागुलबुवा ऐकेल; वा आशारूपी डाकीण अंतःकरणास इंद्रियरूपी दारांत पाहील आणि त्या उभयांनीं अंतःकरणास झपाटले तर मग आपल्या जीवावर बेतेल म्हणून तो फार भिऊन असतो ५.

१ परिचित. २ तारतम्य. ३ वाळू. ४ जीवन. ५ आत्मरूपी पडलेली बैठक. ६ ठेवलेल्या द्रव्याजवळ. ७ चलन. ८ भ्रमे. ९ प्रवास करणास. १० स्वरूपीं. ११ भूतमात्राच्या विकाराच्या लहरींनें. १२ ढळत नाहीं. १३ उसळण्यानें. १४ पीडा. १५ भरानें, आसक्तीनें. १६ गर्जनेनें. १७ अपमान. १८ सांपडला. १९ तुटून पडो. २० हत्तीला. २१ मारलें. २२ मार्गे हटणें. २३ दुर्वाक्य-रूपी शल्यानें. २४ छळिला असतां. २५ लाटा. २६ डोळसा २७ बळकट, पराक्रमी. २८ सर्प, भूत, पिशाच्च, ब्रह्मराक्षस, महापुरुष. २९ घर झाड. ३० योद्धा. ३१ कृपण.

दाटुंगा पति केळासी । करी टेहणी तैसी । प्रवृत्तीसीं ॥ ६ ॥ सचेतनीं वांणेपणें । देहासकट आटणें । संयमावरी करणें । बुझूनि घाली ॥७॥ मनाचिया महाद्वारीं । प्रत्याहाराचिया ठाणांतरी । जो यमदम शरीरीं । जागवी उभे ॥ ८ ॥ आधारीं नाभीं कंठीं । बंधत्रयाची धरटीं । चंद्रसूर्य संपुटीं । सूये चित्त ॥ ९ ॥ समाधीचे शेजेपासीं । बांधोनि घाली ध्यानासी । चित्त चैतन्य समरसीं । आंतु रते ॥ ५१० ॥ अगा अंतःकरणनिग्रहो जो । तो हा हें जाणिजो । हा आथी तेथ विजयो । ज्ञानाचा पैं ॥ ११ ॥ जयाची आज्ञा आपण । शिरीं वाहे अंतःकरण । मनुष्याकारें जाण । ज्ञानचि तो ॥ १२ ॥

इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च । जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥

आणि विषयांविखीं । वैराग्याची निकी । पुरवणी मानसीं कीं । जिती आथी ॥१३॥ वमिलिया अन्ना । लाळ न घोंटी रसना । कां आंग न सूये आलिंगना । प्रेताचिया ॥ १४ ॥ विष खाणें नागवे । जळत घरीं न रिगवे । व्याघ्रविवरां न वचवे । वस्ती जेवीं ॥ १५ ॥ धडोंडीत लोहरसीं । उडी न घालवे जैसी । न करवे उशी । अजगराची ॥ १६ ॥ अर्जुना तेणें पाडें । जयासी विषयवार्ता नावडे । नेदी इंद्रियांचेनि तोंडें । कांहींच जावों ॥ १७ ॥ जयाचे मनीं आलस्य । देहीं अतिकार्श्य । शमदमीं सौरस्य । जयासि गा ॥ १८ ॥ तपोव्रतांचा मेळावा । जयाचे ठायीं पांडवा । युगांतु जया गांवां- । आंतु येतां ॥ १९ ॥ बहु योगाभ्यासीं हांव । विजनाकडे धांव । न साहे जो नांव । संघाताचें ॥ ५२० ॥ नाराचांची आंथुरणें । पूयपंकीं लोळणें । तैसें लेखी भोगणें । ऐहिकींचें ॥ २१ ॥ आणि स्वर्गातें मानसें । ऐकोनि मानी ऐसें । कुहिलें पिशित जैसें । श्वानाचें कां ॥ २२ ॥ तें हें विषयवैराग्य । जें आत्मलाभाचें सभाग्य । येणें ब्रह्मानंदा योग्य । जीव होती ॥ २३ ॥ ऐसा उभयभोगीं त्रासु । देखसी जेथ बहुवसु । तेथ जाण रहिवासु । ज्ञानाचा तूं ॥ २४ ॥ आणि सचाडाचिये परी । इष्टापूर्तें करी । परी केलेंपण शरीरीं । वसों नेदी ॥ २५ ॥ वर्णाश्रमपोषकें । कर्में नित्यनैमित्तिकें । तयामाजीं कांहीं न ठके । आचरतां ॥ २६ ॥ परि हें मियां केलें । कीं हें माझेनि सिद्धी गेलें । ऐसें नाहीं ठेविलें ।

ज्यांप्रमाणें घराबाहेर ढालगजपणानें, धीटपणानें वागणाऱ्या स्त्रीला तिचा दांडगा नवरा तिच्यावर पाळत ठेवून तिला बाहेर फिरकूं न देतां घरांत कोंडून ठेवतो, त्याप्रमाणें आपल्या मनोवृत्तीला जो बाहेर इन्द्रियांकडे जाऊं न देतां अंतर्यामीं कोंडून तिच्यावर पाळत ठेवितो ६. जीवंतपणी देहाची पर्वा न करतां देह झिजवून इन्द्रियांची समजूत करून त्यांचा निग्रह करतो [सचेतन-साभास-चित्तासह देहाची आटणी करून इंद्रियांची द्वारें संयमद्वारां बंद करतो ] ७. या देहांत मनाच्या महादरवाज्यांत व प्रत्याहाराच्या जागेंत तो अनुक्रमें यम व दम हे मूर्तिमंत पहारेकरी रात्रंदिवस उभे, जागे ठेवितो ८. आधारचक्राचे स्थानीं मूळबंध, नाभीमध्यें मणिपूरचक्राचें स्थानीं ओढियाणाबंध व कंठामध्यें विशुद्धचक्राच्या स्थानीं जालंधरबंध हे तिन्ही स्थिर करून इडा व पिंगळा यांच्या संगमस्थानीं असणाऱ्या सुषुम्नेंत चित्ताचा लय करतो ९. समाधीच्या शेजेजवळ जो ध्यानाला बांधून टाकतो आणि चित्त व चैतन्य यांच्या समरसतेंत-ऐक्यांत अंतरींच रममाण होत असतो ५१०. अर्जुना! अंतःकरण निग्रह म्हणतात तो हाच असें समज. वरीलप्रमाणें अंतःकरणाची स्थिति अर्थात् असा अंतःकरणनिग्रह ज्याच्या ठिकाणीं आहे. त्याच्याच ठिकाणीं ज्ञानाचा विजय आहे असें समज ११. ज्या साधकाची आज्ञा, त्याचें अंतःकरण शिरसा वंद्य मानतें, तो जरी मनुष्याच्या आकाराचा दिसला तरीहि तो मूर्तिमंत, साक्षात् ज्ञानच आहे, असें जाण १२.

**अन्वयार्थ—इंद्रियार्थेषु वैराग्यम्**—ऐहिक व पारलौकिक विषयांविषयीं वैराग्य—**अनहंकारः एव च**—आणि गर्वरहित मी अमुक अमुक अशा प्रकारचा आहे, असा गर्व—अभिमान केव्हांहि न वाहणें—**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनं**—जन्म, मरण, म्हातारपण, रोग व दुःख, या प्रत्येकांतील दोषांचा विचार करणें किंवा जन्म—मरण—जरा—रोग यांतील असह्य दुःख ह्याच दोषांचें चिंतन करणें ८.

[ **वैराग्यम्** ] आणि विषयाविषयीं ज्याच्या मनांत वैराग्याचा चांगला जिवंत पुरवठा असतो १३. ओकलेलें अन्न फिरून खाण्याविषयीं जिव्हा लाळ घोटीत नाहीं म्ह. जिव्हेला पाणी सुटत नाहीं, अथवा प्रेताला आलिंगन देण्याविषयीं कोणीहि अंग पुढें करीत नाहीं व तशी इच्छाहि होत नाहीं १४. कोणासहि विष खाणें आवडत नाहीं, जळत्या घरांत ज्याप्रमाणें शिरण्याचें धैर्य होत नाहीं, व व्याघ्राच्या गुहेंत ज्याप्रमाणें वस्ती करण्यासाठीं जाववत नाहीं १५. सळसळीत, रसरशीत तापलेल्या लोखंडाचे रसांत जशी उडी घालवत नाहीं किंवा अजगराची उशी करवत नाहीं १६. त्याप्रमाणें अर्जुना! ज्याला विषयांचें नांव घेतलेलें देखील आवडत नाहीं, म्हणून तो इन्द्रियांची व कोणत्याहि विषयांची केव्हांच गांठ पडूं देत नाहीं १७. ज्याच्या मनांत विषय सेवनाविषयीं आळस भरलेला आहे, ज्याच्या देहांच्या ठिकाणीं पाहतां अतिकृश, रोडका असतो व ज्याला शम व दम यांचीं फार आवड असते १८. हें पांडवा! ज्याचे ठिकाणीं नेहमीं तपांची व व्रतांची एकसारखी गर्दी असते व ज्याला मनुष्याच्या वस्तींत येणें, म्हणजे प्रळयकाळाप्रमाणें एक संकटच होतें १९. ज्याची योगाभ्यासाविषयीं फार तीव्र इच्छा असते व अरण्यांत एकांतात राहण्याविषयीं ज्याच्या मनाची फार ओढ असते आणि जनसमूहांत मिसळण्याचे नुसते नांवहि ज्याला सहन होत नाहीं ५२०. बाणांच्या शय्येवर निजणें अथवा पूवाच्या चिखलांत लोळणें याप्रमाणें जो ऐहिक भोगांची योग्यता समजतो २१. आणि स्वर्गप्राप्तीची गोष्ट काढल्यावर ते ऐकून जो त्या स्वर्गांतील भोगास मनानें कुत्र्याच्या कुजलेल्या मांसाप्रमाणेंच मानतो २२. अरे! ज्याला विषयवैराग्य म्हणून जे म्हणतात तें हेंच होय व हेंच आत्मप्राप्तीचें परम भाग्य होय, त्याच्याच योगानें साधक जीव ब्रह्मानंदाचें सुख उपभोगण्यास योग्य होतात २३. याप्रमाणें इहपरलोकींच्या सुखोपभोगाचा ज्याला मनस्वी पूर्ण कंटाळा आहे असें तुला दिसेल, तेथेंच ज्ञानाची वस्ती आहे, असें पक्कें समज २४.

[ **अनहंकारः** ] आणि जो आस्थापूर्वक यज्ञ करणें व तलाव, बाग वगैरे बांधणें अशी इष्टापूर्त कर्मेंहि करितो, परंतु त्यांत कर्तृत्वाच्या अभिमानाचा फुंज वा लेशसुद्धां आपल्या अंगीं वसूं देत नाहीं २५. वर्णाश्रमधर्मास पोषक असणारीं जीं नित्यनैमित्तिक कर्में तीं यथाविधि आचरण करितो, त्यांत यत्किंचितहि उणीव वा खंड पडूं देत नाहीं २६. परंतु हें कर्म मी केलें किंवा

१ बांधून ठेवितो. २ देखरेख, अटकाव. ३ मनोगतीला. ४ कमी झाला. ५ इंद्रियनिग्रहहीं. ६ इंद्रियें. ७ मनाला विषयापासून पराङ्मुख करणें. ८ चौकीवर, पहाऱ्याच्या जागेवर. ९ मूलाधार चक्री. १० मणिपूर चक्री. ११ विशुद्ध चक्री. १२ वज्र, ओढियाणा व जालंदर. १३ ग्रस्त. १४ इडापिंगलाच्या संगमस्थानीं. १५ घालतो, लावतो. १६ ऐक्य. १७ जय. १८ मदत. १९ वाघाच्या गुहेंत. २० करवत नाहीं. २१ खळखळणाऱ्या. २२ लोखंडाच्या रसांत. २३ रोकडा. २४ मनाचा व इंद्रियांचा निग्रह. २५ ऐक्य. २६ प्रलयकालाप्रमाणें दुःख. २७ अरण्याकडे.

वासनेमाजीं ॥ २७ ॥ जैसें अवचितपणें । वायूसि सर्वत्र विचरणें । कीं निरभिमान उदैजणें । सूर्याचे जैसें ॥ २८ ॥ कां श्रुति स्वभावतां बोले । गंगा काजेंवीण चाले । तैसें अवष्टंभहीन भलें । वर्तणें जयाचें ॥ २९ ॥ ऋतुकाळीं तरी फळती । परी फळलों हें नेणती । तया वृक्षांचिये ऐसी वृत्ती । कर्मीं सदा ॥ ५३० ॥ एवं मनीं कर्मीं बोलीं । जेथ अहंकारा उखी जाहली । एकावळीची काढिली । दोरी जैसी ॥ ३१ ॥ संबंधेंवीण जैसीं । अभ्रें असती आकाशीं । देहीं कर्में तैसीं । जयासि गा ॥ ३२ ॥ मद्यपाआंगींचें वस्त्र । कां लेपाहोतींचें शस्त्र । बैलावरी शास्त्र । बांधलें आहे ॥ ३३ ॥ तया पाडें देहीं । जया मी आहें हे सेचि नाहीं । निरहंकारता पाहीं । तया नांव ॥ ३४ ॥ हें संपूर्ण जेथें दिसे । तेथेंचि ज्ञान असे । इयेविषीं अनारिसें । बोलों नये ॥ ३५ ॥ जन्ममृत्युजरादुःखें । व्याधिवार्धक्यकलुषें । तियें आंगा न येतां देखें । दुरूनि जो ॥ ३६ ॥ साधकु विवसियां । कां उपसर्गु योगिया । पावे उणेयापुरेया । वोथंबा जेवीं ॥ ३७ ॥ वैर जन्मांतरींचें । सर्पा मनौनि न वचे । तेवीं अतीतां जन्माचें । उणें जो वाहे ॥ ३८ ॥ डोळां हरळ न विरे । घाईं कोंत न जिरे । तैसें कांळींचें न विसरे । जन्मदुःख ॥ ३९ ॥ म्हणे पूयगर्तें रिगाला । अहा मूत्ररंध्रें निघाला । कटा रे मियां चाटिला । कुचस्वेदु ॥ ५४० ॥ ऐसऐसिया परी । जन्माचा कांटाळा धरी । म्हणे आतां तें मी न करीं । जेणें ऐसें होय ॥ ४१ ॥ हारी उमचावया । जुंवारी जैसा ये डाया । कीं वैरा बापाचेया । पुत्र जचे ॥ ४२ ॥ मारिलियाचेनि रागें । पाठीचा जेवीं सूड मागे । तेणें आक्षेपें लागे । जन्मापाठीं ॥ ४३ ॥ परी जन्मती ते लाज । न सांडी जयाचें निज । संभाविता निस्तेज । न जिरे जेवीं ॥ ४४ ॥ आणि मृत्यु पुढां आहे । तोचि कल्पांतीं कां पाहे । परी आजीचि होये । सावधु जो ॥ ४५ ॥ माजीं अथांव म्हणतां । थडियेचि पंडुसुता । पोहणारा आइता । कासे जेवीं ॥ ४६ ॥ कां न पवतां रणाचा ठावो । सांभाळिजे जैसा आवो । वोडण सुइजे घावो । न लागतांचि ॥ ४७ ॥ पाहेचा पेणा वाटवधा । तंव आजीची होइजे सावधा । जीवु न वचतां औषधा । धांविजे जेवीं ॥ ४८ ॥ येऱ्हवीं ऐसें घडे । जो जळत घरीं सांपडे । तो मग न पवाडे । कुहा खणों ॥ ४९ ॥ चोंढिये पाथरु गेला ।

मी केल्यामुळें सिद्धीस गेलें, असें त्याचें मनांत मुळींच तो आणीत नाहीं, २७. ज्याप्रमाणें वायु हा हेतुविना सहज सर्वत्र फिरतो. किंवा सूर्याचें उगवणें व प्रकाश देणें हे निरभिमानानें सर्वत्र सारखें असतें २८ अथवा श्रुतीहि स्वभावतः सर्वांस इष्ट अशाच गोष्टींचा उपदेश करिते, किंवा गंगानदी अमुकच ठिकाणीं जाण्याचा हेतु मनांत न धरितां सहज ओघानें वाहते, त्याप्रमाणें ज्याचें नेहमींचें वर्तन अभिमानशून्यतेचें चांगले असतें. २९. वृक्षांस योग्य ऋतुकाळीं फळें येतात, परंतु आपणांस फळें आली त्याची त्यांस आठवणहि नसते, त्या वृक्षांप्रमाणें प्राप्तकर्में करीत असतांना कर्मफलप्राप्तींविषयीं ज्याची वृत्ति अत्यंत उदासीन असते, ५३०. ज्याप्रमाणें एकेरी-एकपदरी हारांतील दोरी काढून घेतल्यावर त्या मण्यांचें ऐक्य नाहींसें होते, मणि गळून पडतात. त्याप्रमाणें मनांतून, आचरणांतून व बोलण्यांतून अहंकाराची उचलबांगडी केलेली असते ३१. अभ्रांचा आकाशाशीं मुळींच संबंध नसतांहि ज्याप्रमाणें तीं आकाशांत असल्याची आपल्या दृष्टीस पडतात त्याप्रमाणें जो देहानें कर्माचें आचरण करीत असतां अहंकारच नसल्यामुळें त्यापासून अलिप्त असतो, ३२. ज्याप्रमाणें मद्य प्यालेल्या पुरुषास आपल्या अंगावरील वस्त्राची आठवण नसते, किंवा चित्राच्या हातीं दिलेल्या शस्त्राचें त्या चित्राला भान नसतें अथवा बैलाच्या पाठीवर बांधलेल्या शास्त्रांची जाणीव त्यास नसते ३३. ज्याप्रमाणें ज्याला तत्त्वतः ‘मी देहांत आहे’ याचें भानच नसतें, त्या स्थितीलाच ‘निरहंकारता’ असें नांव आहे ३४. हें निरहंकारतेचें चिन्ह ज्याचे ठिकाणीं पूर्णपणें दृष्टीस पडतें, त्याचेच ठिकाणीं ज्ञान वास करितें, त्याजबद्दल बिलकुल अन्यथा नाहीं वा शंकाहि नाहीं ३५. जो जन्म, मृत्यु जरा, दुःखें, व्याधि, वार्धक्य व पातकें हीं अंगावर येण्याचे पूर्वीं तीं दूर आहेत तोंच जणुं आतां प्राप्त झालीं आहेत अशी कल्पना करून जो सावध राहतो ३६. यास दृष्टांत ज्याप्रमाणें आपल्यास पिशाच्चबाधा होऊं नये म्हणून मांत्रिक अगोदर व्यवस्था करितो अथवा आपल्यास दुसऱ्याचा उपसर्ग लागूं नये म्हणून योगी अगोदरच दक्षतेनें तजवीज करतो, किंवा गवंडीहि भिंत बांधतेवेळीं आरंभापासूनच ओळंबा लावून ती मागें पुढें जाऊं देत नाहीं ३७. [ जन्म ]-सर्पाचें मनांतून ज्याप्रमाणें जन्मांतरींचेंहि वैर नाहींसें होत नांहीं, त्याप्रमाणें जो पूर्वजन्मींचें दुःख व दोष मनांत आठवून पुनः जन्म प्राप्त होऊं नये म्हणून सतत प्रयत्न करतो ३८. ज्याप्रमाणें डोळ्यांत वाळूचा बारीक खडा गेला असतां तो विरघळत नाहीं, किंवा शस्त्राच्या घावांत भाला सहन होत नाहीं, त्याप्रमाणें या जन्मीं रोज होणारीं व मागील जन्माचीं दुःखें जो विसरत नाहीं ३९. व म्हणतो कीं, “अरेरे ! मी [ जन्मामुळें ] पूंवाच्या खाड्यांत–शिरलों व मूत्रद्वारानें बाहेर जन्माला आलों व मातेचें स्तनपान करतेवेळीं मी स्तनावरील घामहि चाटला !” ५४०. याप्रमाणें जो जन्माचा तिरस्कार, कंटाळा बाळगतो व असें म्हणतो कीं, ज्या योगानें असें होईल [ मला असा जन्म पुनः प्राप्त होईल ] तें कर्म मी आतां यापुढें करणार नाहीं ४१. ज्याप्रमाणें जुगार खेळणारा जुगारी हा पणास लावलेलें द्रव्यहि हरल्यावर तो ते सर्व परत मिळविण्याकरितां पुनः सावधगिरीनें डाव खेळण्यास तयार होतो किंवा मुलगा आपल्या बापाचा नाश केलेल्या माणसाचे वैर उगवण्यासाठीं परिश्रम करतो ४२. अथवा एकाद्यास कोणीं मारिलें असतां त्याचा पाठिराखा जसा त्याचा सूड उगवण्याचा प्रयत्न करतो तसा जन्म हा पुनः न यावा म्हणून जो तितक्याच काळजीनें त्याचे पाठीस लागून दक्ष असतो, ४३. ज्याप्रमाणें संभावित मनुष्याला अपकीर्ति सहन होत नाहीं. त्याप्रमाणें ज्याच्या मनांतून अशा अमंगल जन्मास आल्याची लज्जा केव्हांच नाहींशी होत नाहीं. [ मृत्युः ] ४४. पुढें येणारा मृत्यु कल्पांतीं कां असेना, पण त्याच्याविषयीं आजच तो आला आहे, असें समजून जो सावध राहतो ४५. अर्जुना ! नदीच्या मध्यभागीं अतिशय खोल पाणी आहे, असें कोणी सांगितल्याबरोबर पोहणारा पुरुष कांठावर उभा असतांच सहजच कांस बळकट बांधतो ४६. किंवा रणभूमीवर जाण्याचे पूर्वींच जसे आपले अवसान संभाळावें किंवा जो घाव लागण्याचे पूर्वींच ढाल पुढें करावी ४७. उद्यांच्या मुक्कामाला कांहीं दगा आहे असें समजल्यावर आपल्या जवळचें द्रव्य गांवांत ठेवून आजच सावध व्हावें अथवा प्राण जाण्याचें पूर्वींच धांवाधांव करून औषधाची योजना करावी ४८. नाहींतर जळत्या घरांत सांपडल्यावर मग तो विहिर आपल्या सामर्थ्यानें खणूं शकत नाहीं ४९.

१ फिरणें. २ अहंकारावांचून. ३ नाश, उचलबांगडी. ४ एकेरी हाराची. ५ दारुबाज. ६ चित्राचे हातातें. ७ मल, पाप. ८ प्राप्त होण्यापूर्वीं. ९ मांत्रिक. १० विवशीला. ११ उपद्रव. १२ ओळंबा, लंबक. १३ मागील. १४ दूषण, पाप. १५ खडा, रेती. १६ भाला, शल्य. १७ जन्माचें. १८ पूवाच्या खाड्यांत. १९ गेला.

तैसेनि जो बुडाला । तो बोबेंहीसकट निमाला । कोण सांगे ॥ ५५० ॥ म्हणौनि समर्थेंसीं वैर । जया पडिलें हाडखाइर । तो जैसा आठही पाहर । परजूनि असे ॥ ५१ ॥ नातरी केळवली नोवरी । कां संन्यासी जियापरी । तैसा न मरतां जो करी । मृत्युसूचना ॥ ५२ ॥ पैं गा जो ययापरी । जन्मेंचि जन्म निवारी । मरणें मृत्यु मारी । आपण उरे ॥ ५३ ॥ तया घरीं ज्ञानाचें । सांकडें नाहीं साचें । जया जन्ममृत्यूचें । निमालें शल्य ॥५४॥ आणि तयाचिपरी जरा । न टेंकतां शरीरा । तारुण्याचिया भरा- । माजीं देखें ॥ ५५ ॥ म्हणे आजिच्या अवसरीं । पुष्टि जे शरीरीं । ते पाहे होईल काचरी । वाळली जैसी ॥ ५६ ॥ निदैव्याचे व्यवसाय । तैसे ठाकती हातपाय । अमंत्र्या राजाची परी आहे । बळा यया ॥ ५७ ॥ फुलांचिया भोगा- । लागीं प्रेम टांगा । ते करेयांचा गुडघा । तैसें होईल ॥ ५८ ॥ वोढाळाच्या खुरीं । आखरुंआतें बुरी । ते दशा माझ्या शिरीं । पावेल गा ॥ ५९ ॥ पद्मदळेंसी ईसाळें । भांडताति हे डोळे । ते होती पडवळें । पिकलीं जैसीं ॥ ५६० ॥ भंवईचीं पडळें । वोये्यती सिन- सौळें । उरु कुंहिजैल जळें । आंसुवाचेनि ॥ ६१ ॥ जैसें बाभुळीचें खोड । गिरबडूनि जाती सरड । तैसें पिचेंडीं तोंड । सरकेंटिजैल ॥ ६२ ॥ रांधवेंणी चुलीपुढें । पैं हे उन्मादती खातेंवडे । तैसींचि यें नाकाडें । बिडबिडेंती ॥ ६३ ॥ तांबूलें वोंठ रौंऊं । हांसतां दांत दाऊं । सनागेरें मिरऊं । बोल जेणें ॥ ६४ ॥ तयाचि पाहे या तोंडा । येईल जळंबटाचा लोंढा । इया उमळेंती दाढा । दांतांसहित ॥ ६५ ॥ कुळवाडी रिणें दाटली । कां वांकडिया ढोरें बैसलीं । तैसी नुठी कांहीं केली । जीभचि हे ॥ ६६ ॥ कुसळें कोरडीं । वारेनें जाती बरडीं । तैसी आपदा तोंडीं । दाढीयेसीं ॥ ६७ ॥ आषाढींचेनि जळें । जैसीं झिरपती शैलांचीं मौळें । तैसें खांडीहूनि लाळे । पडती पूर ॥ ६८ ॥ वाचेसि अपवाडु । कानीं अनुघडु । पिंड गरुवा माकडु । होईल हा ॥ ६९ ॥ तृणाचें बुझवणें । आंदोळे वारेनगुणें । तैसें येईल कांपणें । सर्वांगासी ॥ ५७० ॥ पायां पडती वेंगडी । हात वळती मुरकुंडी । बरवेपणा बागडी । नाचविजैल ॥ ७१ ॥ मळमूत्रद्वारें । होऊनि ठाती खोंकरें । नवसियें होती इतरें । माझिया निधनीं ॥ ७२ ॥ देखोनि थुंकील जगु । मृत्यूचा पडैल पांगु । सोइरियां उबगु । येईल माझा ॥७३॥ स्त्रिया म्हणती विवसी । बाळें जाती मूर्च्छी । किंबहुना

अरे ! डोहांत दगड पडला म्हणजे तो तळाशी जातो. दगडाप्रमाणे जो या संसार सागरांत बुडतो तो 'मी बुडत आहे' या बोंबेसह बुडाला तर मग ओरडण्यासह तो बुडाला म्हणून सांगणार तरी कोण ? ५५०. म्हणून बलवंताबरोबर ज्याचें हाडवैर पडलें आहे, तो जसा आठहि प्रहर-रात्रंदिवस शस्त्र परजून सज्ज असतो; ५१. किंवा उपवर किंवा केळवण म्ह. लग्ननिश्चय होऊन गडगनेर झालेली नोवरी लवकरच दुसऱ्याच्या घरीं खास जाणार असल्यामुळें ती घरांत असूनहि नाहीं, असें तिचा बाप समजतो. व तीहि माहेराविषयीं उदास होते. अथवा संन्यास घेतल्यावर ज्याप्रमाणें तो सर्वस्वाचें तादात्म्य सोडून राहत असतो त्याप्रमाणें जो जिवंत असूनहि आतांच मृत्यु प्राप्त झाला आहे, असा येणाऱ्या मृत्युविषयीं विचार करून निश्चयानें जो उदासीन असतो ५२. जो या वरील विचाराप्रमाणें जिवंत असतानांच पुनर्जन्माचें निवारण करतो, तात्पर्य या देहाहून आपण पृथक् आहो या निश्चयामुळें आजच देहाच्या मृत्यूनें मृत्यूला मारून टाकून आपण ब्रह्मरूपानें उरतो ५३. आणि अशाप्रकारें ज्याला जन्ममृत्यूचें दुःख राहिलें नाहीं त्याला खरोखर ज्ञानाची कधींहि उणीव नसते ५४. [ जरा ] आणि त्याचप्रमाणें शरीरास म्हातारपण येण्याचे अगोदरच ऐन तारुण्याच्या उमेदीच्या भरांत जो म्हातारपणाबद्दल विचार करतो ५५. तो म्हणतो, " आजमितीस माझ्या शरीरांत ही जी शक्ति–पुष्टि आहे, तें शरीर उद्या जरा प्राप्त झाल्यावर वाळलेल्या काचरीसारखें होईल ५६. दैवहीनानें केलेले सर्व उद्योग व्यर्थ, आंत बट्ट्याचे होतात किंवा एखाद्या राजास प्रधान नसला, वा दुष्ट मंत्री असला म्हणजे त्याची जशी स्थिति होते तसे माझे हातपाय चालेनातसे झाले म्हणजे या माझ्या शक्तीची स्थिति दुबळी होईल ५७. फुलांचा सुवास भोगण्यासाठीं अत्यंत उत्सुक असलेले जे नाक ते उंटाच्या गुढघ्याप्रमाणें विद्रूप, अकार्यक्षम, बधिर होईल ५८. आषाढ महिन्यांत पावसाच्या झडींत, ज्याप्रमाणें ओढाळ गुरांचे पाय चिखलानें कुजतात, त्याप्रमाणें माझें हें शरीर होईल ५९. जे माझे डोळे सांप्रतकालीं कमलपत्राशीं स्पर्धेनें भांडण करीत आहेत, तेच पुढें पिकलेल्या पडवळाप्रमाणें निस्तेज होऊन खोल जातील ५६०. भुंवयांचे पडदे झाडाच्या वाळलेल्या सालीप्रमाणें डोळ्यांवर लोंबतील व डोळ्यांतून वाहणाऱ्या पाण्यामुळें ऊर कुजून जाईल ६१. ज्याप्रमाणें सरडा हा बाभळीच्या खोडावरून खालीं वर आल्यागेल्यामुळें तो डिंकानें बुळबुळीत होतो, त्याप्रमाणें थुंकीनें तोंड भरून जाईल; ६२. स्वयंपाकाच्या चुलीपुढें खणलेल्या चरांत ज्याप्रमाणें घाणपाणी सांचून दुर्गंधयुक्त बुडबुडे उसळून येतात, त्याप्रमाणें नाक दुर्गंधयुक्त शेंबडानें बरबटून जाईल ६३. ज्या ह्या तोंडाचे ओठ मी तांबुल खाऊन हल्लीं रंगवितो, हसतांना जे दांत दाखवितो व ज्याच्या योगानें मला उत्तम भाषण करतां येतें ६४. त्याच या तोंडाला लाळेचा कफाचा लोंढा येईल व दांतांसकट दाढा उखडून पडतील ६५. कर्ज झाल्यावर शेतकीचा व्यवहार जसा बुडतो किंवा पावसाच्या झडींत एकदां बसलेल्या जनावरांना उठवत नाहीं; तशी म्हातारपणीं जीभ कांहीं केल्यानें हालणार नाहीं ६६. जशी माळ रानांतील वाळलेल्या गवतांचीं कुसळें वाऱ्यानें उडून जातात, तशी दुर्दशा तोंडाचे ठिकाणीं दाढीचे केसांस येईल ६७. आषाढ महिन्यांतील पावसाच्या झडीनें ज्याप्रमाणें पर्वतांचीं शिखरें पाझरतात त्याप्रमाणें दातांच्या खिंडींतून लाळेचे पूर वाहतील ६८. वाणीनें शब्दांचा नीट उच्चार होणार नाहीं व कानांनीं स्पष्ट ऐकूं येणार नाहीं, अशी या शरीराची निव्वळ वृद्ध माकडाप्रमाणें बेडौल स्थिति होईल ६९. शेतांतील पांखरांकरितां उभें केलेलें गवताचें बुजगावणें जसें वाऱ्यानें सहज हालतें तसे म्हातारपणीं कांपरें येऊन सर्वांग सहज हालूं लागेल ५७०. पायांत पाय अडकतील व हात वांकडे वळून कांपू लागतील याप्रमाणें हल्लींचा सर्व शरीराच्या सुंदरपणाचें व शरीर चेष्टांचे सोंग नाचविले जाईल ७१. मलमूत्रद्वारेंहि फुटक्या मडक्याच्या भांड्यासारखीं होऊन जातील व आपल्या अवसानाबाहेर जातील इतकेच काय पण माझा अंत लवकर होवो, असा जवळची इतर मंडळी देवास नवस करतील ! ७२. माझी अशीं अवस्था पाहून जग माझा धिःकार करून थुंकील मला मृत्यु लवकर येणार नाहीं आणि सोयऱ्याधायऱ्यांना माझा कंटाळा येईल ७३. बायका मला पिशाच म्हणतील

१ हाडास भेदणारें. २ शस्त्र धारण करून, सज्ज. ३ केळवण केलेली, उपवर झालेली. ४ मरणाचा विचार. ५ दुःख. ६ म्हातारपण. ७ वाळलेली भाजी, उसरी. ८ नाक. ९ उंटाचा. १० खुरकुत नांवाचा रोग त्यानें. ११ चिखल. १२ शरीराला. १३ स्पर्धेनें. १४ पडदे. १५ लोंबतात. १६ जुन्या सालीप्रमाणें. १७ कुजेल. १८ अश्रूंचा. १९ थुंकयानें. २० भरेल. २१ स्वयंपाकाच्या. २२ मोरी, पाट. २३ उमलतात, बुडबुड्यानें बुजबुजतात. २४ घाणीच्या पाण्यानें. २५ बरबटतील. २६ रंगवू. २७ चांगलें. २८ लाळेचा, खोकल्याचा. २९ उखडून पडतील.

चिळसी । पात्र होईन ॥ ७४ ॥ उभेळीचा उजगरा । सेजारियां साइलियाँ घरा । शिणवील म्हणती म्हातारा । बहुतांतें हा ॥ ७५ ॥ ऐसी वार्धक्याची सूचणी । आपणियां तरुणपणीं । देखे मग मनीं । विटे जो गा ॥ ७६ ॥ म्हणे पाँहे हें येईल । आणि आतांचें भोगितां जाईल । मग काय उरेल । हितालागीं ? । ॥ ७७ ॥ म्हणौनि नाइकणें पावे । तंव आइकोनि घालीं आघवें । पंगु न होतां जावें । तेथ जाय ॥ ७८ ॥ दृष्टी जंव आहे । तंव पाहावें तेतुलें पाहे । मूकत्वा आधीं वाचा वाहे । सुभाषितें ॥ ७९ ॥ हात होती खुळे । हें पुढील मोटकें कळे । तंव करूनि घाली सकळें । दानादिकें ॥ ५८० ॥ ऐसी दशा येईल पुढें । तैं मन होईल वेडें । तंव चिंतूनि ठेवी चोखडें । आत्मज्ञान ॥ ८१ ॥ जैं चोर पाहे झोंबती । तंव आजीचि रुसिजे संपत्ती । कां झांकाझांकी वाती । न वचतां कीजे ॥ ८२ तैसें वार्धक्य यावें । मग जें वायां जावें । तें आतांचि आघवें । सवतें करीं ॥ ८३ ॥ आतां मोडूनि ठेलीं दुर्गें । कां वळित धरिलें खगें । तेथ उपेक्षूनि जो निघे । तो नागवला कीं ? ॥ ८४ ॥ तैसें वृद्धाप्य होये । आलेपण तें वायां जाये । जे तो शतवृद्ध आहे । नेणों कैंचा ॥ ८५ ॥ झाडिलींचि कोळें झाडी । तया न फळे जेवीं बोंडी । जाहला अग्नि तरी राखोंडी । जाळील काई ? । ॥ ८६ ॥ म्हणौनि वार्धक्याचेनि आठवें । वार्धक्या जो नागवें । तयाच्या ठायीं जाणावें । ज्ञान आहे ॥ ८७ ॥ तैसेंचि नाना रोग । पडिघाती ना जंव पुढां-आंग । तंव आरोग्याचे उपेग । करूनि घाली ॥ ८८ ॥ सापाच्या तोंडीं । पडली जे उंडी । ते लावूनि सांडी । प्रबुद्धु जैसा ॥ ८९ ॥ तैसा वियोगें जेणें दुःखें । विपत्ति शोक पोखें । तें स्नेह सांडूनि सुखें । उदासु होय ॥ ५९० ॥ आणि जेणें जेणें कडे । दोष सूतील तोंडें । तयां कर्मरंध्रीं गुंडे । नियमाचे दाटी ॥ ९१ ॥ ऐसऐसिया आइती । जयाची परी असती । तोचि तो ज्ञानसंपत्ती । गोसावी गा ॥ ९२ ॥ आतां आणीकही एक । लक्षण अलौकिक । सांगेन आइक । धनंजया ॥ ९३ ॥

असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु । नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥

तरि जो या देहावरी । उदासु ऐसिया परी । उखिता जैसा बिढारीं । बैसला आहे ॥ ९४ ॥ कां वृक्षाची साउली । वाटे जातां मीनली । घरावरी तेतुली ।

आणि ते ऐकून मुलांना माझी भीति वाटल्यामुळें ती मूर्च्छित होतील; फार काय सांगावें ! ! मी सर्व प्रकारें लोकांच्या किळस येण्याला पात्र होईन ७४. माझ्या खोकल्याची ढांस, उभळ रात्रभर ऐकून शेजारच्या घरांतील निजलेल्या माणसांना जाग्रण होईल व ते म्हणूं लागतील कीं, 'हा म्हातारा किती लोकांना त्रास देईल ! न कळे ! ७५. याप्रमाणें पुढें म्हातारपणीं आपली स्थिति होईल.' असा इशारा मनांत आणून जो तारुण्यांतच त्या स्थितीबद्दल विचारानें मनांत खंती बाळगतो, विटतो ७६. व असें म्हणतो कीं, "पुढें आपल्यास म्हातारपण येईल आणि हल्लींचें तारुण्य विषयभोगांत नाहींसें होईल; मग आपलें हित साध्य होण्याकरितां आपल्याजवळ काय उर्वरित राहील ?" ७७. [ **व्याधिः** ] म्हणून कानाला बधिरत्व प्राप्त झाले नाहीं, तोंपर्यंतच आत्मानात्मविचाराच्या योग्य अशा सर्व गोष्टी ऐकून घेतो आणि जोपर्यंत शरीर पांगळे न होतां स्वाधीन आहे तोपर्यंतच ज्या तीर्थयात्रा करावयाच्या त्या करून घेतो ७८. दृष्टी शाबूत आहे, तोंपर्यंतच शास्त्रानें पाहाण्यास योग्य म्हणून सांगितलें तें पाहून घेतो आणि मुकेपणापूर्वीं जोपर्यंत वाणी कायम आहे, तोंपर्यंतच सुभाषितें, ईश्वराचे गुणानुवाद, गाऊन पाठ करून घेतो ७९. पुढें आपले हात लुळे होतील ही पुढील गोष्ट त्यास कांहींशीं कळते. ते शाबूत आहेत तोंच आपल्या हातांनीं दानधर्म करून घेतो ५८०. याप्रमाणें पुढें दयनीय दशा येईल तेव्हां मन शुद्धीवर राहणार नाहीं, वेडे होईल. म्हणून अगोदरच शुद्ध आत्मज्ञानाचा पूर्ण विचार करून ठेवतो ८१. उद्यां आपल्यास चोर लुटतील, असें समजून तो आजच आपल्याजवळील संपत्तींचीं दूर ठेवण्याची व्यवस्था लावून अलिप्त राहतो, किंवा दिवा गेला नाहीं तोंच सर्व जिन्नस व्यवस्थित झांकपाक करून ठेवतो ८२. त्याप्रमाणें म्हातारपण यावें व ते आल्यावर तारुण्यांत ज्ञानप्राप्ति न करून घेतल्यामुळें जे जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत पडून व्यर्थ जावें, त्यापेक्षां जन्ममृत्यु देणाऱ्या सर्व गोष्टी आपल्यापासून दूर हातावेगळ्या कराव्यात व आतांच ज्ञान संपादन करावे ८३. ज्या वाटेंत पुष्कळ डोंगर, जिकडे तिकडे किल्लेच किल्ले आहेत असें समजून किंवा पक्षी आपल्या घरट्याकडे परत जात आहेत तेव्हां संध्याकाळ झाली असें समजून, जो आपल्याजवळ कांहींएक ऐवज न घेतां सडा जातो, किंवा जो पुढचा प्रवास टाकून किल्ल्यांत राहतो तो चोरांकडून लुटला जाईल काय ? [ तर नाहीं ] ८४. त्याप्रमाणें वार्धक्य येईल व आत्मज्ञानावांचून जन्मास आलेपण फुकट जाईल, असा विचार करून ज्यानें तारुण्यांतच आत्मचिंतन करून ठेवले आहे. तो खरा वृद्ध नसला तरी वरील विचारानें वृद्धापेक्षा वृद्ध आहे असें कसें समजूं नये ? किंवा आपण तरी शतायु आहोतच कीं नाहीं हें कोणास ठाऊक ? ८५. तिळाच्या झाडाचीं झाडलेलीं बोंडें पुन: झाडलीं तरी जसें कोळांच्या बोंडांतून तीळ सांपडावयाचें नाहींत; अथवा मोठा अग्नि जरी झाला तरी तो मूळ अग्निच राखोंडी झाला तर पुनः पोळील काय ? ८६. म्हणून असा वार्धक्याचा ज्यानें अगोदरच विचार केलेला आहे, जो वृद्धावस्थेनें ग्रासला जात नाहीं, त्याची वार्धक्यापासून हानि होत नाहीं आणि त्याच्याच ठिकाणीं ज्ञान आहे असें समजावें ८७. त्याप्रमाणें नाना प्रकारचे रोग जोंपर्यंत शरीरावर येऊन आदळले नाहींत, तोंपर्यंतच, रोग होण्यापूर्वींच शरीराच्या आरोग्याचा आत्मज्ञानाकडे उपयोग करून घेतो ८८. ज्याप्रमाणें सापाच्या तोंडांतून पडलेलीं पिठाची उंडी वा एखादी वस्तु शहाणा मनुष्य ती वस्तु टाकून देतो ८९. [ **दुःखदोषानुदर्शनं** ] त्याप्रमाणें ज्या स्नेहामुळें वियोगापासून होणारी दुःखें, विपत्ति व शोक प्राप्त होतात, पोसली जातात, तो स्नेह अगोदरच टाकून जो उदासीन होऊन समाधानात्मक वृत्तींत राहतो ५९०. ज्या इन्द्रियांच्या द्वारानें आपल्यांत दोष, निषिद्ध कर्में, चंचुप्रवेश करतील तीं कर्में तो करीत नाहीं व कर्मेंद्रियांच्या मार्गांनी दोष आंत जाऊं नयेत म्हणून इन्द्रियात्मक बिळांत नियमरूपी धोंडे ठोकून, आड बसवून त्या प्रवेशवाटा बंद करितो ९१. अशा अशा युक्तिरूप तयारीनें जो वागतो तोच ज्ञानसंपन्न आहे असें समज ९२. आतां अर्जुना ! तुला त्या ज्ञानवंताचें आणखी एक अलौकिक लक्षण सांगतों, तें ऐक ९३.

**अन्वयार्थ—असक्तिः**-विषयांवर प्रीति न ठेवणें—**पुत्रदारगृहादिषु अनभिष्वंगः**—पुत्र, स्त्री गृह इत्यादिकांमध्यें अत्यंत आसक्ति न ठेवणें—**च**—आणि—**इष्टानिष्टोपपत्तिषु**—इष्ट व अनिष्ट यांची प्राप्ति झाली असतां—**नित्यं**—हमेशा—नेहमीं—**समचित्तत्वं**—समचित्त ठेवणें—इष्टप्राप्तीनें हृष्ट न होणें व अनिष्ट प्राप्तीनें खिन्न न होणें हीं ज्ञानसाधनें आहेत ९.

[ **असक्तिः** ] हें पहा, जो आपल्या स्वतःचे शरीराविषयीं इतका उदास असतो कीं, जसा एक वाटसरू दुसऱ्या वाटसरूनें कांहीं वेळ आपले स्वाधीन केलेलें गाठोडें अभिलाष न धरितां तो वाटसरू परत येईपर्यंत उदासीन वृत्तीनें जतन करितो ९४.

१ किळस. २ खोकल्याची उभळ. ३ निजलेल्या. ४ उद्यां. ५ बहिरेपण. ६ लुळे, पंगु. ७ अल्प. ८ शुद्ध.

आस्था नाहीं ॥९५॥ साउली सरिसीच असे । परी असे हें नेणिजे जैसें । स्त्रियेचें तैसें । लोलुप्य नाहीं ॥ ९६ ॥ आणि प्रजा जे जाली । तियें वस्ती कीर आलीं । कां गोरुवें बैसलीं । रुखातळीं ॥ ९७ ॥ जो संपत्तीमाजीं असतां । ऐसा गमे पंडुसुता । जैसा कां वाटे जातां । साक्षी ठेविला ॥ ९८ ॥ किंबहुना पुंसा । पांजरियामाजीं जैसा । वेदाज्ञेसी तैसा । बिहूनि असे ॥ ९९ ॥ येऱ्हवीं दारागृहपुत्रीं । नाहीं जया मैत्री । तो जाण पां धात्री । ज्ञानासि गा ॥ ६०० ॥ महासिंधु जैसें । ग्रीष्मवर्षीं सरिसे । इष्टानिष्ट तैसें । जयाच्या ठायीं ॥ १ ॥ कां तिन्ही काळ होतां । त्रिधा नव्हे सविता । तैसा सुखदुःखीं चित्ता । भेदु नाहीं ॥ २ ॥ जेथ नभाचेनि पाडें । समत्वा उणें न पडे । तेथ ज्ञान रोकडें ॥ वोळख तूं ॥ ३ ॥

मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी । विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥१० ॥

आणि मीवांचूनि कांहीं । आणिक गोमटें नाहीं । ऐसा निश्चयोचि तिहीं । जयाचा केला ॥ ४ ॥ शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा कोश । एक मीवांचूनि वास । न पाहती आन ॥ ५ ॥ किंबहुना निकट निज । जयाचें जाहलें मज । तेणें आपणयां आम्हां सेज । एकी केली ॥ ६ ॥ रिगतां वल्लभापुढें । नाहीं आंगीं जीवीं सांकडें । तिये कांतेचेनि पाडें । एकसरला जो ॥७॥ मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें । मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ॥ ८ ॥ सूर्याच्या होण्या होइजे । कां सूर्यासवेंचि जाइजे । हें विकलेपण साजे । प्रभेसि जेवीं ॥९॥ पैं पाणियाचिये भूमिके । पाणी तळपे कौतुकें । ते लहरी म्हणती लौकिकें । येऱ्हवीं तें पाणी ॥ ६१० ॥ जो अनन्यु यापरी । मी जाहलाही मातें वरी । तोचि तो मूर्तधारी । ज्ञान पैं गा ॥११॥ आणि तीर्थें धौतें तटें । तपोवनें चोखटें । आवडती कपाटें । वसवूं जया ॥ १२ ॥ शैलकक्षांचीं कुहरें । जळाशय परिसरें । अधिष्ठी जो आदरें । नगरा नये ॥ १३ ॥ बहु एकांतावरी प्रीती । जया जनपदाची खंती । जाण मनुष्याकारें मूर्ती । ज्ञानाची तो ॥ १४ ॥ आणिकही पुढती । चिन्हें गा सुमती । ज्ञानाचिये निरुती- । लागीं सांगों ॥ १५ ॥

अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् । एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥

तरी परमात्मा ऐसें । जें एक वस्तु असे । तें जया दिसें । ज्ञानास्तव ॥१६॥ तें एकवांचूनि आनें । जियें भवस्वर्गादि ज्ञानें । तें अज्ञान ऐसा मनें । निश्चयो

किंवा वाटेनें जातांना ऊन टाळण्याकरितां ज्याप्रमाणें एखादा मनुष्य वाटेवरील झाडांचें सावलींत बसतो, पण तेथें आस्था नसते तितकीसुद्धां आस्था ज्याची घराविषयीं नसते ९५. [ **अनभिष्वंग:** ] ज्याप्रमाणें मनुष्याची पडछाया त्याचेबरोबरच असते तरीपण ती आहे कीं,- नाहीं याची त्याला मुळींच खबरहि नसते, त्याप्रमाणें नेहमीं सन्निध असणाऱ्या स्त्रीविषयीं ज्याला मुळींहि आसक्ति नसते ९६. बरें! मुलाबाळांविषयीं म्हटलें तरी ती संतति म्हणजे खरोखर ज्याप्रमाणें वाटसरू धर्मशाळेंत वस्तीस राहतात तशीं आपल्याकडे वस्तीस आलेली समजतो, किंवा गुरें दोन प्रहरीं झाडाखालीं सावलींत बसतात, त्याप्रमाणें प्रजेसंबंधी उदास असतो ९७. अर्जुना! जो श्रीमंतींत असतो तरीहि ज्याप्रमाणें कोणी मनुष्य वाटेनें जातांना रस्त्यांतील एखाद्या गोष्टीविषयीं केवळ साक्षिभूत ठेवलेला असतो, त्याप्रमाणें संपत्तीविषयीं उदास-अनासक्त असतो ९८. किंबहुना!! पिंजऱ्यांतील राघू जसा बाळगणाराच्या आज्ञेंत वागतो. त्याप्रमाणें जो वेदाज्ञेचें उल्लंघन न करतां भिऊन वागत असतो ९९. बाकी स्त्री, पुत्र, घर यांजविषयीं जो प्रीति बाळगीत नाहीं, तो ज्ञानाचें अधिष्ठान आहे असें जाण. ६००. [ **समचित्तत्वं** ] महासमुद्र जसा ग्रीष्मकाळीं, उन्हाळ्यांत कमी होत नाहीं. व वर्षाकाळीं, पावसाळ्यांत वाढतहि नाहीं तशी ज्याला प्रिय-अप्रिय गोष्टी सारख्याच असल्यामुळें तो हर्ष-विषादरहित असतो १. किंवा तिन्ही काळांत सूर्य ज्याप्रमाणें तीन प्रकारचा होत नाहीं त्याप्रमाणें ज्याचें मन सुखदुःखांपासून भेदास प्राप्त होत नाहीं २. आणि ऋतुपालट झाला तरीहि आकाश पालटत नाहीं त्या आकाशाप्रमाणें ज्याच्या समतेंत कमीपणा पडत नाहीं, अर्जुना!! त्याच्या ठिकाणीं ज्ञान प्रत्यक्ष वास करीत आहे, असें समज ३.

**अन्वयार्थ--च अनन्ययोगेन अव्यभिचारिणि भक्ति:**-आणि माझ्या ठिकाणीं अनन्ययोगानें म्ह. वासुदेवाहून श्रेष्ठ कोणी नाहीं, अशा चित्तसमाधानानें अढळ भक्ति--**विविक्तदेशसेवित्वम्**---एकान्त, निर्भय, पवित्र प्रदेशांत राहणें-अरण्य, नदीकांठ इत्यादि प्रदेशांचें सेवन करणें-**जनसंसदि अरति:**-सामान्य-प्राकृत जनांच्या समूहांत मिसळण्याची आवड नसणें हीं ज्ञानसाधनें आहेत १०.

[ **मयि च अनन्ययोगेन** ] ज्यानें तिघांनीं [ काया-वाचा व मनानें ] असा दृढ निश्चय केला आहे कीं, परमात्म्यावांचून या जगांत दुसरी चांगली अशी वस्तूच नाहीं ४. ज्याच्या शरीरानें, वाचेनें अशा निश्चयाचा कोश प्यायली आहे [ कृतनिश्चयाची शपथ वाहिली आहे ] आणि या जगांत माझ्यावांचून दुसऱ्या कशाचीहि तें- इच्छा करीत नाहींत ५ [ **अव्यभिचारिणी भक्ति:** ] फार काय सांगावें!! ज्यानें आपलें मन माझ्या स्वरूपीं लीन केलें त्यानेंच आपलें व आमचें ऐक्य करून जणुं माझ्या स्वरूपाचा बिछानाच केला ६. ज्याप्रमाणें आपल्या पतीकडे जातेवेळीं पतिव्रता स्त्रीला शरीरानें व मनानें मुळींच संकोच वाटत नाहीं; त्याप्रमाणें माझ्या बरोबर ऐक्य करण्यास जो निःशंकपणें अनुसरला आहे ७. ज्याप्रमाणें गंगोदक समुद्रास एकदां मिळाल्यावरहि जसे आणखी एकसारखें मिळतच असतें, याप्रमाणें माझे स्वरूपीं ऐक्य पावल्यावरहि जे सर्वभावेंकरून मलाच भजतात ८. सूर्याचें प्रभेचा सूर्याबरोबर उदय होतो व अस्ताबरोबर लय होतो, हें अनन्य साहचर्य जसें प्रभेसच शोभतें ९. तसेंच वाऱ्यानें पाण्यावरच जें पाणी कौतुकानें उसळून वर येतें, त्यास लोक लाटा असें म्हणतात, परंतु खरोखर पाहूं गेलें असतां तें पाणीच असतें ६१०. याप्रमाणें माझ्याशीं ऐक्य पावूनहि एकनिष्ठ होऊन जो माझी सेवा-भक्ति करितो, तो मूर्तिमन्त ज्ञानी होय ११. [ **विविक्तदेशसेवित्वम्** ] अशा मनुष्यास पवित्र तीर्थें, व नदी किनारे उत्तम तपोवनें व गुहा या ठिकाणीं राहण्याची सहजच आवड असते १२. तसेंच पर्वतांच्या कांखेंतील गुहा व सरोवरांचीं तीरें अशा ठिकाणींहि राहावयाची ज्याला विशेष आवड असते व ज्यांस शहरांत राहण्याचें आवडत नसल्यामुळें तेथें येत नाहीं १३. [ **जनसंसदि अरति:** ] ज्याची एकांतवासावर फार प्रीति असते व मनुष्यवस्तींत राहण्याचा कंटाळा असतो, तो मनुष्यरूपी ज्ञानाची केवळ मूर्तिच होय असे समज १४. हें सुबुद्धिमंता, तुला ज्ञानाच्या स्पष्टीकरणार्थ, निश्चयासाठीं आणखी कांहीं लक्षणें पुढें सांगतो १५.

**अन्वयार्थ--अध्यात्मज्ञाननित्यत्वम्**---आत्मा व अनात्मा यांच्या विवेकज्ञानामध्यें सतत गढून जाणें व-**तत्त्वज्ञानार्थदर्शनं**-तत्त्वज्ञानाचा अर्थ-फल जो मोक्ष त्याचें आलोचन करणें-**एतत् ज्ञानं-हें** सर्व ज्ञान म्हणजे ज्ञानाचें साधन आहे-**इति**-असें-**प्रोक्तं**-सांगितलें आहे **यत् अत: अन्यथा-तत् अज्ञानं**-जें याच्या उलट, तें अज्ञान होय ११.

[ **अध्यात्मज्ञाननित्यत्वं** ] हे पहा, परमात्मा म्हणून जी एक वस्तु आहे ती ज्या ज्ञानामुळें दिसते म्ह० आत्मत्त्वानें अनुभवास येतें १६. त्या एका

केला ॥ १७ ॥ स्वर्गा जाणें हें सांडी । भवविषयीं कान झाडी । दे अध्यात्मज्ञानीं बुडी । सद्भावाची ॥ १८ ॥ भंगलिये वाटे । शोधूनियां अऱ्हांटे । निघिजे जेवीं नीटें । राजपंथें ॥ १९ ॥ तैसें ज्ञानजातां करी । आघवेंचि एकीकडे सारी । मग मन बुद्धि मोहरी । अध्यात्मज्ञानीं ॥ ६२० ॥ म्हणे एक हेंचि आथी । येर जाणणें ते भ्रांती । ऐसी निकुरेंसीं मती । मेरु होय ॥ २१ ॥ एवं निश्चयो जयाचा । द्वारीं अध्यात्मज्ञानाचा । ध्रुव देवो गगनींचा । तैसा राहिला ॥ २२ ॥ तयाचिया ठायीं ज्ञान । या बोला नाहीं आन । जे ज्ञानीं बैसलें मन । तेऱ्हांचि तें तो मी ॥ २३ ॥ तरी बैसलेपणें जें होये । बैसतांचि बोलें न होये । तरी ज्ञाना तया आहे । सरिसा पाडु ॥ २४ ॥ आणि तत्वज्ञान निर्मळ । फळें जें एक फळ । तें ज्ञेयही वरी सरळ । दिठी जया ॥ २५ ॥ येऱ्हवीं बोधा आलेनि ज्ञानें । जरी ज्ञेय न दिसेचि मनें । तरी ज्ञानलाभुही न मने । जाहला सांता ॥ २६ ॥ आंधळेनि हातीं दिवा । घेऊनि काय करावा ? । तैसा ज्ञाननिश्चयो आघवा । वायांचि जाय ॥ २७ ॥ जरि ज्ञानाचेनि प्रकाशें । परतत्त्वीं दिठी न पैसे । ते स्फुर्तीचि असे । अंध होऊनी ॥ २८ ॥ म्हणौनि ज्ञान जेतुलें दावीं । तेतुली वस्तुचि आघवी । तें देखे ऐशी व्हावी । बुद्धि चोख ॥ २९ ॥ यालागीं ज्ञानें निर्दोखें । दाविलें ज्ञेय देखे । तैसेनि उन्मेखें । आथिला जो ॥ ६३० ॥ जेवढी ज्ञानाची वृद्धी । तेवढीच जयाची बुद्धी । तो ज्ञान हे शब्दीं । करणें न लगे ॥ ३१ ॥ पैं ज्ञानाचिये प्रभेसवें । जयाची मती ज्ञेयीं पावे । तो हातधरणिया शिवे । परतत्त्वातें ॥ ३२ ॥ तोचि ज्ञान हें बोलतां । विस्मयो कवण पंडुसुता ? । काय सवितयातें सविता । म्हणावें असें ? ॥ ३३ ॥ तंव श्रोते म्हणती असो । न सांगें तयाचा अतिसो । ग्रंथोक्ती तेथ आडसो । घालितोसी कां ? ॥ ३४ ॥ तुझा हाचि आम्हां थोरु । वक्तृत्वाचा पाहुणेरु । जे ज्ञानविषो फारु । निरोपिला ॥ ३५ ॥ रसु होआवा अतिमात्रु । हा घेतासि कविमंत्रु । तरि अवंतूनि शत्रु । करितोसि कां गा ? ॥ ३६ ॥ ठायीं बैसतिये वेळे । जे रससोय घेऊनि पळे । तियेचा येरु वोडव मिळे । कोणा अर्था ? ॥ ३७ ॥ आघवाचि विषयीं भादी । परी सांजवणीं टेंकों नेदी । ते खुरतोडी नुसधी । पोषी कवण ? ॥ ३८ ॥ तैसी ज्ञानीं मती न फांके । येर जल्पती नेणों केतुकें । परि तें असो

एका अध्यात्मज्ञानाशिवाय, संसार व स्वर्ग संबंधी कीं ज्या ज्ञानापासून लोकांतर प्राप्त होतात, तीं सर्व ज्ञानें अज्ञानच आहेत असा ज्याच्या मनानें पक्का निश्चय केलेला असतो १७. म्हणून तो स्वर्गास जाण्याची इच्छा सोडून देतो, संसाराविषयींची तर वार्ताहि कानानें ऐकत नाहीं व अध्यात्मज्ञानाचे ठिकाणीं सद्भावानें बुडी मारतो १८. ज्याप्रमाणें एकादा वाटसरू ज्या ठिकाणीं अनेक वाटा फुटतात त्या ठिकाणीं मार्ग कोणता व आडमार्ग कोणता यांचा नीट शोध करून आडमार्ग सोडून सरळ राजमार्गानें निघून जातो; १९. त्याप्रमाणें जेवढीं ज्ञानें आहेत त्या ज्ञानमात्राविषयीं नेटका विचार करून इतर सर्व ज्ञानें टाकून देऊन आपलें मन व बुद्धि केवळ अध्यात्मज्ञानाच्यामार्गाकडे लावतो ६२०. त्याचप्रमाणें इतर सर्व ज्ञानें भ्रांतिमूलक आहेत व अध्यात्मज्ञान हेंच एक खरें आहे म्हणून जो आपली बुद्धि मेरुपर्वताप्रमाणें स्थिर करून अध्यात्मज्ञानाकडेच लावतो २१. ज्याप्रमाणें आकाशांतील नक्षत्रांप्रमाणें ध्रुव तारा केव्हांहि हालत नाहीं, त्याप्रमाणें अध्यात्मज्ञानाच्या द्वारांतून म्ह. ते संपादन करण्याविषयींचा जो निश्चय त्यापासून ढळत नाहीं २२. त्याच्याच ठिकाणीं ज्ञान वास करते, या बोलण्यांत अन्यथा वा शंका नाहीं. कारण, जेव्हां त्या ज्ञानाचा चित्तवृत्तींत पूर्णतया उदय होतो तेव्हांच तो तें [ ज्ञान, ज्ञानस्वरूप ] होतो. अर्थात् मद्रूपच होतो २३. तरी [ ज्ञान प्राप्तीच्या दृढ निश्चयानें ] ज्ञानाच्या द्वारीं बसलेलें [ ज्ञान प्राप्तीच्या निश्चित साधनानुष्ठानांत प्रवृत्त झालेलें ] जें मन ते त्याचक्षणीं [ ज्ञान स्वरूप होते वा आहे असें जें वर म्हटले आहे 'बैसता क्षणींच' नसले [ असे अक्षरशः अर्थानें [ त्या साधकाला ज्ञानप्राप्तिपूर्वींच 'ज्ञानी' अशी संज्ञा देतां येत नसली ] तरीहि त्याच्या मनाची व ज्ञानाची [ साधकाची ज्ञान प्राप्त झाल्या- ] सारखीच योग्यता आहे २४. [ तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ] आणि शास्त्रशुद्ध तत्त्वज्ञानापासून जें एक फल प्राप्त होतें, तें फल म्हणजे ज्ञेय [ परब्रह्म ] होय. ज्ञेयापर्यंत त्याची [ प्रतिबंधरहित सरळ दृष्टि जाते २५. वास्तविक पाहतां, [ उपर्युक्त स्वरूपाचें ] ज्ञान उदयास [ चित्तवृत्तींत आत्मप्रचीतीस ] आलें, असूनहि [ सफल, फलीभूत होऊनहि ] जर त्या ज्ञानानें 'ज्ञेय' [ ज्ञानार्ह वस्तु किंवा परब्रह्म ] दिसत नसेल [ ब्रह्माचे आत्मत्वानें ज्ञान होत नसेल ] तर तो 'ज्ञानलाभ' [ त्याचे दृष्टीनें ] झाला असला तरीहि तो [ तात्त्विक दृष्टीला ] पटत नाहीं [ किंबहुना ! ] ज्ञान लाभ झालाच नाहीं, असाच त्याचा अर्थ होतो ] २६. आंधळ्यानें आपल्या हातीं दिवा घेतला असला तरीहि त्याचा त्याला काय उपयोग आहे ? त्याप्रमाणें ज्ञानाचा नुसता आश्रय वा निश्चय करूनहि ते ज्ञान जर ज्ञेय जें ब्रह्म तें आत्मत्वानें दाखवूं शकले नाहीं तर तो ज्ञाननिश्चय सर्वस्वी व्यर्थ होय २७. जर ज्ञानाच्या प्रकाशानें परमात्म्याची प्राप्ति किंवा बुद्धीचा प्रवेश होत नसेल तर ती बुद्धिच आंधळ्याप्रमाणें निरर्थक होय २८. म्हणून तें ज्ञान जेवढे म्हणून दाखवील तेवढे सर्व ज्ञेय परमात्मवस्तूच आहे. पण ती ज्ञेयवस्तु पाहील अशी त्याची बुद्धि स्वच्छ-शुद्ध असली पाहिजे २९. म्हणून त्या निर्दोष ज्ञानानें दाखविलेलें ज्ञेय जी पाहते अशाच शुद्ध बुद्धीनें, ज्ञान दृष्टीनें जो संपन्न झाला आहे ६३०. आणि ज्ञान जितकें मोठें विकसित आहे तितकीच ज्याची बुद्धीहि मोठी विकसित झाली आहे, तो ज्ञानसंपन्न आहे, हें शब्दांनीं सांगावयास नको ३१. ज्याची बुद्धि ज्ञानाच्या प्रकाशाबरोबर ज्ञेयास [ परब्रह्म स्वरूपास ] जाऊन भिडते, झोंबते, तो हातोहात परतत्त्वाची आत्मत्वानें प्राप्ति करून घेतो ३२. अर्जुना ! तो ज्ञानरूपच आहे, असें म्हटलें असतां त्यांत आश्चर्य तें कोणतें ? हें पहा, सूर्याला 'सूर्य' असें म्हणावें लागतें काय ? ३३. तेव्हां श्रोते म्हणूं लागले, "आतां हे असूं दे. कारण ज्ञान्याविषयींचें वर्णन फार करूं नकोस. कारण ग्रंथाच्या चालू प्रकरणांत उगीच अडथळा कां घालितोस ? ३४. तूं अध्यात्मज्ञानाविषयीं बऱ्याच विस्तारेंकरून निरूपण केलेंस; हाच तुझा आम्हांस वक्तृत्वाचा मोठा पाहुणचार झाला आहे ! ३५. इतर कवि कोणत्याहि वस्तूचें वर्णन करूं लागले असतां त्या वस्तूविषयीं वर्णन न करितां तिच्या उपांगांविषयींच रसभरित मोठ्या कौतुकानें विनाकारण पाल्हाळात्मक वर्णन करितात, हा सामान्य कवींचा मंत्र तूं आपल्या वर्णनांत आगांतुकाप्रमाणें कां घुसडतोस ? व श्रोत्यांस मुद्दाम बोलावून शत्रुत्व निर्मितीचा दोष कां घेतोस ? ३६. एकाद्या स्त्रीनें जेवावयास बोलवून व पाटरांगोळ्यांचा थाट करून, मंडळी पानावर बसल्यावर जर ती तयार असलेला स्वयंपाक ऐन जेवणाच्या वेळीं त्या ठिकाणाहून घेऊन पळून गेली तर तिनें बोलाविलेल्या मंडळींचें आणखी कितीहि आदरातिथ्य केलें तरी त्यांना त्याचा काय उपयोग ? ३७. इतर सर्व चांगल्या गुणांनीं युक्त आहे, पण जी गाय धार काढतेवेळीं कासेंत हात घालूं न देतां लाथा मारते, त्या लाथाळ गाईला फुकट कोण पोसील ? ३८. त्याप्रमाणें बुद्धीचा ज्ञानांत

निकें । केलें तुवां ॥ ३९ ॥ जया ज्ञानलेशोद्देशें । किजती योगादि सायासें । तें धणीचें आथी तुझिया ऐसें । निरूपण ॥ ६४० ॥ अमृताची साँतवांकुडी । लागो कां अनुघडी । सुखाच्या दिवसकोडी । गणिजतु कां ॥ ४१ ॥ पूर्णचंद्रेंसी राती । युग एक असोनि पहाती । तरी काय न पाहात आहाती । चकोर ते ? ॥४२॥ तैसें ज्ञानाचें बोलणें । आणि येणें रसाळपणें । आतां पुरे कोण म्हणे ? । आकर्णितां ॥४३॥ आणि सभाँग्यु पाहुणा ये । सुभगाँचि वाढती होये । तैं सरों नेणं रससोये । ऐसें आथी ॥ ४४ ॥ तैसा जाहला प्रसंगु । जे ज्ञानीं आम्हांसि लागु । आणि तुजही अनुरांगु । आथि तेथ ॥४५॥ म्हणौनि यया वांखाणा- । पासीं से आली चौगुणी । ना म्हणों नयेसि देखणा ? । होसी ज्ञानी ॥ ४६ ॥ तरी आतां ययावरी । प्रज्ञेच्या माजघरीं । पदें साच करीं । निरूपणीं ॥ ४७ ॥ या संतवाक्यासरिसें । म्हणतिलें निवृत्तिदासें । माझेंहि जी ऐसें । मनोगत ॥४८॥ यावरी आतां तुम्हीं । आज्ञापिला स्वामी । तरी वायां वाग्‍ मी । वाढों नेदी ॥४९॥ एवं इयें अवधारा । ज्ञानलक्षणें अठरा । श्रीकृष्णें धनुर्धरा । निरूपिलीं ॥ ६५० ॥ मग म्हणे या नांवें । ज्ञान एथ जाणावें । हें स्वमत आणि आघवें । ज्ञानियेही म्हणती ॥५१॥ करतळावरी वाटोळा । डोलतु देखिजे आंवळा । तैसें ज्ञान आम्हीं डोळां । दाविलें तुज ॥५२॥ आतां धनंजया महामर्ता । अज्ञान ऐसी वेदंती । तेंही सांगों व्यक्ती । लक्षणेंसीं ॥ ५३ ॥ येन्हवीं ज्ञान फुडें जालिया । अज्ञान जाणवे धनंजया । जें ज्ञान नव्हे तें अपैसया । अज्ञानचि ॥५४॥ पाहें पां दिवसु आघवा सरे । मग रात्रीची वारी उरे । वांचूनि कांहीं तिसरें । नाहीं जेवीं ॥५५॥ तैसें ज्ञान जेथ नाहीं । तेंचि अज्ञान पाहीं । तरी सांगों कांहीं कांहीं । चिन्हें तियें ॥ ५६ ॥ तरी संभावने जिये । जो मानाची वाट पाहे । सत्कारें होये । तोषु जया ॥ ५७ ॥ गर्वे पर्वताचीं शिखरें । तैसा महत्त्वावरूनि नुतरे । तयाचिया ठायीं पुरें । अज्ञान आहे ॥ ५८ ॥ आणि स्वधर्माची मांगळी । बांधे वाचेच्या पिंपळीं । उभिलीं जैसा देउळीं । जौणोनि कुंचा ॥ ५९ ॥ घाली विद्येचा पसारा । सुये सुकृताचा डांगोरा । करी तेतुलें मोहँरा । स्फीती-चिया ॥ ६६० ॥ आंग वरिवरी चर्ची । जनातें अभ्यर्चितां वंची । तो जाण पां अज्ञानाची । खाणी एथ ॥ ६१ ॥ आणि वन्ही वनीं विचरे । तेथ जळती जैसीं

प्रवेश होईल असें ज्ञानाविषयीं न बोलतां इतर कवि ज्ञानाविना अन्य विषयाचें किती पाल्हाळात्मक वर्णन करितात ते कळत नाहीं, तसें तूं न करितां आम्हांस खऱ्या ज्ञानाची पूर्णपणें ओळख करून दिलीस हें चांगलेंच केलेस ३९. अरे! ज्या ज्ञानाच्या थोड्या अंशात्मक प्राप्तीकरितां लोक योगादि साधनें मोठ्या कष्टानें करितात, अशा तऱ्हेच्या ज्ञानाचे बुद्धीला तृप्त करून टाकणारें आणि तुझ्यासारख्यानें रसभरित वर्णन केलें ६४०. अशा तऱ्हेच्या अमृताच्या वृष्टीचें जरी एकसारखें [ सात दिवस झड लागेना कां ? ] सातेरें लागलें तरी त्याला कोणी कंटाळेल काय ? व सुखाचें कोट्यवधि जरी दिवस गेले, तरी ते मोजीत बसतो काय ? [ त्यांचा कोणी कंटाळा करतो काय ? ] ४१. पौर्णिमेच्या चंद्रासह असलेली रात्र एक युगापर्यंत सतत असली तरी चकोर त्या चंद्राकडे सारखे पहात बसणार नाहींत काय ? ४२. त्याप्रमाणें तुझ्यासारख्या रसाळ वक्त्याकडून आणि त्यांतहि ज्ञानाचें बोलणें चाललें असतां, तें व्याख्यान ऐकतांना, 'आतां पुरे' असें कोण म्हणेल ? ४३. आणि भाग्यवान् पाहुणा आला व त्याला भाग्यशाली चतुर स्त्रीच वाढणारीण असल्यावर, तिच्या व त्याच्या मनांत जसे स्वयंपाकांतील पदार्थ सरूं नयेत, अशी इच्छा असते ४४. त्याचप्रमाणें आजचा हा प्रसंग झाला आहे. कारण, आम्हांला ज्ञानाविषयीं श्रवण करण्याची आवड आहे आणि तुलाहि तें ज्ञान सांगण्याविषयीं प्रेमच आहे ४५. या कारणामुळें तुझ्या व्याख्यानास स्फूर्तीचें चौपट बळ आलें आहे. तर तुला आम्हास 'ज्ञानाविषयीं तूं परिपूर्ण डोळस आहेस' असें म्हटल्यावांचून कसे राहवेल ? ४६. तर आतां यापुढें आपल्या व्याख्यानद्वारां बुद्धीचे माजघरांत ज्ञानाच्या अठरा लक्षणांविरुद्ध जें अज्ञान त्याचें यथार्थ वर्णन कर ४७. हें संतांचें भाषण ऐकल्यावर, श्रीनिवृत्तिमहाराजांचे दास श्रीज्ञानदेव म्हणाले कीं, "महाराज! माझेंहि मनोगत असेंच आहे" म्ह. अज्ञानाचेच वर्णन करावयाचें आहे ४८. यावर हे श्रीगुरो! तुम्हीं मला आज्ञा केली, तेव्हां आतां मी व्यर्थ शब्द वाढूं देणार नाहीं ४९. याप्रमाणें श्रीकृष्णांनीं अर्जुनास ज्ञानाचीं ही अठरा लक्षणें सांगितलीं, ऐका ६५०. मग देव म्हणाले हीं लक्षणें ज्याचे ठिकाणीं दृष्टीस पडतील, त्याचे ठिकाणीं ज्ञान वास करितें, हें माझें स्वतःचें मत आहे व सर्व ज्ञानीहि असेंच म्हणतात ५१. तळहातावरील आवळा वाटोळा फिरतांना जसा सर्व बाजूंनीं निःसंदिग्ध प्रत्यक्ष पहावा, तसें आम्हीं तुला तें ज्ञान डोळ्यांनी प्रत्यक्ष दिसेल असें दाखविलें ५२. हे महाबुद्धिमंता अर्जुना! आतां अज्ञान म्हणून ज्याला म्हणतात तेंहि त्याच्या लक्षणांसह स्पष्ट करून सांगतो ५३. सहज विचार करून पाहिले तर धनंजया! ज्ञान स्पष्ट समजल्यावर अज्ञान हे सहजच ओळखतां येतें; कारण, जें ज्ञान नव्हे तें अज्ञानच होय. हे आपोआपच ठरते ५४. हें पहा! दिवस संपल्यावर मग रात्रीचीच येण्याची पाळी उरते कारण, रात्र व दिवस या दोहोंवांचून तिसरें असें कांहींच नसते ५५. त्याप्रमाणें ज्या ठिकाणीं ज्ञान नाहीं, तेंच अज्ञान आहे, असें समज. तथापि अज्ञानाचीं कांहीं कांहीं लक्षणें तुला सांगतों ५६. [ **मानित्वम्** ] आपली प्रतिष्ठा व्हावी म्हणून जगतो किंवा लोक आपल्यास मान केव्हां देतील, याची जो वाट पहात असतो व लोकांनी केलेल्या सत्कारानें ज्याला संतोष होतो ५७. व तसा मान मिळाला म्हणजे गर्वानें पर्वताचे शिखराइतका चढून जातो कीं मोठेपणाहून कधींहि खालीं उतरत नाहीं, अशा पुरुषाचे ठिकाणीं पुरेपूर अज्ञान वास करितें, असें समज ५८. [ **दंभित्वम्** ] आणि पिंपळाची मुंज केली म्हणजे त्या पिंपळास जशी मुंज [ मोळाची दोरी ] सर्वांत उघड दिसेल अशी बांधतात. किंवा पार बांधतात अथवा देवळांतील कुंचा वाटेल त्याच्या दृष्टीस पडेल असा जाणून बुजून ठेवतात. त्याप्रमाणें आपण आचरिलेल्या स्वधर्माची मुंज आपल्या वाचारूपी पिंपळाला बांधतो. [ लोकांत आपल्या कृतकर्माची आपल्याच वाणीनें प्रसिद्धि करितो ] ५९. आपल्यास येत असलेल्या विद्येचा पसारा मांडतो व आपल्याच मुखानें प्रसिद्धिहि करितो व आपल्या हातून घडलेल्या सत्कृत्याचा लोकांत डांगोरा पिटतो; याप्रमाणें ज्या कृत्यांपासून आपली प्रतिष्ठा वाढेल तीं कृत्यें नेहमीं करीत असतो ६६०. आणि दिवसांतून तीनदां स्नान करून आपल्या अंगास भस्म, गंध किंवा अत्तर वगैरे लावून शरीर नटवितो, परंतु याचें लोक पूज्य म्हणून पूजन करीत असतां त्यांसहि फसवितो. तो अज्ञानाची खाण आहे, असें समज ६१. ज्याप्रमाणें रानांत अथवा

१ ज्ञानांशाच्या उद्देशानें. २ तृप्तीचें. ३ सात दिवसांची झड, सातेरें. ४ उघाडी वांचून, एकसारखी. ५ एकसारखी. ६ ऐकतां. ७ श्रीमान्. ८ सगुण, दैववती. ९ अपेक्षा, आवड. १० मीति. ११ व्याख्यानास. १२ चौपट. १३ बुद्धीची माजघरांत. १५ ज्ञानाचीं अठरा लक्षणें. १६ लोक वार्ता. १७ स्पष्ट करून. १८ आपोआप, सहज. १९ पाळीफेरी. २० प्रतिष्ठेसाठीं. २१ उभा केलेला. २२ मुद्दाम, २३ काठीला बांधलेली केरसुणी. २४ प्रतिष्ठेच्या मार्गासाठीं.

जंगमें स्थावरें । तैसें जयाचेनि आचारें । जगा दुःख ।।६२।। कौतुकें जें जें जल्पे । तें सावळाहूनि तीखें रुपे । विषाहूनि संकल्पें । मारकु जे ।। ६३ ।। तयातें बहु अज्ञान । तो अज्ञानाचें निधान । हिंसेसि आयतन । जयाचें जिणें ।।६४।। आणि फुंके भाता फुगे । रेचिलियाँ सवँचि उफगे । तैसा संयोगवियोगें । चढे वोहटे ।।६५।। पडली वारयाचिया वळसा । धुळी चढे आकाशा । हरिखा वळघे तैसा । स्तुतीवेळे ।। ६६ ।। निंदा मोटकी आइके । आणि कपाळ धरूनि ठाके । थेंबें विरे वारोनि शोखे । चिखलु जैसा ।। ६७।। तैसा मानापमानीं होये । जो कोण्हीचि उर्मी न साहे । तयाच्या ठायीं आहे । अज्ञान पुरें ।।६८।। आणि जयाचिया मनीं गांठीं । वरिवरी मोकळी वाचा दिठी । आंगें मिळे जीवें पाठीं । भलतया दे ।। ६९ ।। व्याधाचे चारा घालणें । तैसें प्रांजळ जोगावणें । चांगाचीं अंतःकरणें । विरु करी ।। ६७० ।। गार शेवाळें गुंडाळली । कां निंबोळी जैसी पिकली । तैसी जयाची भली । बाह्य क्रिया ।।७१।। अज्ञान तयाचिया ठायीं । ठेविलें असे पाहीं । या बोला आन नाहीं । सत्य मानीं ।।७२।। आणि गुरुकुळीं लाजे । जो गुरुभक्ती उभजे । विद्या घेऊनि माजे । गुरूसींचि जो ।। ७३ ।। तयाचें नाम घेणें । तें वाचे शूद्रान्न होणें । परी घडलें लक्षणें । बोलतां इयें ।।७४।। आतां गुरुभक्तांचें नांव घेवों । तेणें वाचेसि प्रायश्चित देवों । गुरुसेवका नांव पावों । सुर्यु जैसा ।। ७५ ।। येतुलेनि पांगु पापाचा । निस्तरेल हे वाचा । जो गुरुतल्पगाचा । नामीं जाला ।। ७६ ।। हा ठायवरी । तया नामाचें भय हरी । मग म्हणे अवधारीं । आणिकें चिन्हें ।। ७७ ।। तरि आंगें कर्मे ढिला । जो मनें विकल्पें भरला । अडवींचा अवगळला । कुहा जैसा ।। ७८ ।। तया तोंडीं कांटिवडे । आंतु नुसधीं हाडें । अशुचि तेणें पाडें । सबाह्य जो ।। ७९ ।। जैसें पोटालागीं सुणें । उघडें झांकलें न म्हणे । तैसें आपलें परावें नेणें । द्रव्यालागीं ।। ६८० ।। इया ग्रामसिंहाचिया ठायीं । जैसा मिळणी ठावो अठावो नाहीं । तैसा स्त्रीविषयीं कांहीं । विचारीना ।। ८१ ।। कर्माचा वेळु चुके । कां नित्य नैमित्तिक ठाके । तें जया न दुखे । जीवामाजीं ।। ८२ ।। पापी जो निसुगु । पुण्याविषयीं अतिनिलागु । जयाचिया मनीं वेगु । विकल्पाचा ।। ८३ ।। तो जाण निखिळा ।

पेटल्यावर स्थावर जंगमादि सर्व पदार्थ जळतात, त्याप्रमाणें ज्याच्या सहज आचरणानें सर्व जगास दुःख होतें ६२. तो सहजगत्या जें जें भाषण करितो तें तें मनुष्याचें हृदयास तीक्ष्ण पहारीचे टोंकापेक्षां जास्त भेदतें, टोचते व ज्याचे सर्व संकल्प इतर जनांस विषाहूनहि अधिक घातक असतात ६३. त्याचे ठिकाणीं पुष्कळ अज्ञान आहे. फार काय सांगावें !! तो अज्ञानाचें माहेरवरच, भांडारच आहे व त्याचें जिणें म्हणजे हिंसेचें आश्रय-स्थानच असतें ६४. [ अक्षांतिः ] आणि भातां फुंकला म्हणजे तो भाता जसा वाऱ्यानें फुगतो व त्यांतील वारा नाहींसा झाला म्हणजे लागलीच दबतो तसा इच्छित लाभ झाला असतां जो हर्षानें चढून जातो व हानि झाली असतां लगेच दुःखमग्न होतो ६५. वाऱ्याच्या भोंवऱ्यांत सांपडलेली जी धूळ ती ज्याप्रमाणें आकाशा-पर्यंत उंच उडते त्याप्रमाणें लोकांनीं स्तुति केली असतां जो हर्षानें चढून जातो ६६. थेंबभर पाण्यानें ज्याप्रमाणें चिखल विरघळून जातो आणि थोडासा वारा सुटल्यावर त्यानें हडकतो, त्याप्रमाणें कोणी थोडीशी निंदा केली असतांहि जो वाईट वाटून कपाळ धरून बसतो ६७. त्या-प्रमाणें प्रसंगविशेषीं मानानें व अपमानानें ज्याची स्थिति होते. ज्यास कोणत्याहि विकाराचा वेग सहन होत नाहीं, त्याचे ठिकाणीं पूर्ण अज्ञान वास करते असें समज ६८. [ अनार्जवं ] ज्याच्या मनांत गांठ असते. वरवर पाहतां बोलणें व पाहणें मोकळे वाटले तरी एकास वचन देऊन शरीरानें एकास मिळतो पण त्याचे उलट दुसऱ्यास मानानें मदत करतो ६९. पारध्याचे जना-वरांस चारा घालणें हें जसें [ वरकांती पाहणारांस प्रामाणिक व सरळ वृत्तीचे दिसते, पण त्याचे मनांत त्याचा प्राणघात करण्याचे ठरलेलें ] असते. त्याप्रमाणें ज्याचे इतरास भरण-पोषण करून सांभाळणें प्रांजळ-पणाचे दिसत असते. [ पण ते पोसल्या जाणाऱ्याच्या प्राणघातासाठींच असते ] व जो भल्या माणसाची अंतःकरणें विरुद्ध करतो, बिघडवितो ६७०. शेवाळानें लिप्त झालेली शिळा-गारगोटी वरकांती हिरवीगार सुंदर दिसते किंवा पिकलेल्या निंबोळ्या वरवर पिवळ्या धमक दिसतात, [ आंत कडू असतात त्याप्रमाणें ] ज्याची कृत्यें बाह्यात्कारी दिसण्यांत मात्र उत्तम असतात ७१. त्या मनुष्याचें ठिकाणीं अज्ञान खास ठेवलेलें आहे. हें तूं पक्के खरें समजून ठेव; यांत अन्यथा नाहीं ७२. [ आचार्योपासन-राहित्यम् ] आणि गुरुकुलाचें नांव घ्यावयास सुद्धां ज्याला लाज वाटते, गुरुसेवेला जो कंटाळलेला असतो आणि गुरूपासून आपल्यास विद्या प्राप्त झाली म्हणजे त्यांचेवरच उलटतो. त्यांनाहि जो मानीत नाहीं ७३. अशा अभक्त मनुष्याचें नांव घेणें म्हणजे जिव्हेला शूद्राच्या अन्न स्पर्शाप्रमाणें म्हणजे त्याच्या घरीं अन्न सेवन केल्याप्रमाणेंच होय ! पण काय सांगावें ? अज्ञानाची हीं लक्षणें सांगतांना त्याचा उच्चार ओघानें करावाच लागला ७४. अतएव आतां त्या गुरुभक्ताचें नाम घेऊं त्याचें नाम म्हणजे सूर्याच्या तेजाप्रमाणें सर्व अज्ञानांध-कार [ पातक ] नाहींसा करणारें आहे, त्याचें नांव घेऊन, वाचेनें घडलेल्या पापास प्रायश्चित द्यावे हे बरें ! ७५. इतक्यानेंच गुरुनिंदकाच्या नामोच्चारणानें वाचेस झालेले जे महान् दोष, त्यांचे निरसन होईल ७६. गुरुनिंदकाच्या नामोच्चारणापासून उत्पन्न होणारीं महान् भयें हीं निवृत्त करण्याचें सामर्थ्य गुरुभक्ताच्या नामोच्चा-रणांत आहे, हे असो ! आतां अज्ञानाचीं आणखी चिन्हें ऐका, असें देव म्हणाले:-७७. [ अशौचं ] जो आळसी ढिला असल्यामुळें स्वतः कर्में-करीत नाहीं, व जो मनांत संशयानें भरलेला असतो. तो गाळानें व काऱ्यानें भरलेला रानांतील त्याज्य म्हणून टाकलेला जणुं आडच समजावा ७८. तो आड कसा असतो ? तर त्याच्या तोंडावर कांटेरी झाडें उगवलेली असतात, कांटे पडलेले असतात व आंत पुष्कळ प्राणी पडून मेल्यामुळें नुसती हाडें सांचलेलीं असतात, त्या आडाप्रमाणें जो मनुष्य अंतर्बाह्य अशुद्ध, अमंगल असतो ७९. ज्याप्रमाणें अन्न उघडें आहे किंवा झांकलेलें आहे हें न पाहतां, ते कुत्रें पोटाला हवें म्हणून खातें, त्याप्रमाणें आपलें किंवा दुस-ऱ्याचें याची निवड न जाणतां विचार न करितां, जो द्रव्याचा अभिलाष करितो ६८०. कुत्र्याच्या ठिकाणीं जसा स्त्रीसंग करण्याविषयीं एकांत किंवा चव्हाट्याची योग्यायोग्य जागा यांचा विधिनिषेध वा विचार नसतो तसा जो स्त्रीसंगाविषयीं कांहींच विचार करीत नाहीं ८१. स्वधर्माप्रमाणें विहित कर्म करण्याची वेळ चुकत आहे किंवा नित्यनैमित्तिक कर्में करावयाचीं तीं राहात आहेत, त्याच्याबद्दल ज्याचे मनांत कधींहि खेद-दुःख वाटत नाहीं ८२. पापाचरणाबद्दल जो निर्लज्ज असतो व पुण्यकर्माचें आचरण करावें अशी ज्याच्या मनांत कल्पनाहि येत नसून, ज्याच्या मनांत विकल्पाचें अतिशय वेगवान् थैमान चालू असते ८३.

१ पाहारीपेक्षां. २ तीक्ष्ण. ३ रुततें. ४ बेत. ५ घातक. ६ घर. ७ सोडला असतां. ८ दबतो. ९ लाभालाभानें.

अज्ञानाचा पुतळा । जो बांधोनि असे डोळां । वित्ताशेतें ॥ ८४ ॥ आणि स्वार्थें अळुमाळें । जो धैर्यापासोनि चळे । जैसें तृणबीज ढळे । मुंगियेचेनी ॥ ८५ ॥ पावो सूदंलिया सवें । जैसें थिल्लरं कालवे । तैसा भयाचेनि नांवें । गजबजे जो ॥८६॥ मनोरथांचिया धारसां । वाहणें जयाचिया मानसा । पूरीं पडिला जैसा । डुधियां पाहीं ॥८७॥ वायूचेनि सावांयें । धूं दिगंतरा जाये । दुःखवार्ता होये । तसें जया ॥८८॥ वाउधणाचिया परी । जो आश्रो कहींचि न धरी । क्षेत्रीं तीर्थीं पुरीं । थारों नेणें ॥८९॥ कां मातलिया सरडा । पुढती बुडुख पुढती शेंडा । हिंडेंणवारा कोरडा । तैसा जया ॥६९०॥ जैसा रोविल्याविणें । रांजणु थारों नेणें । तैसा पडे तैं राहणें । एऱ्हवीं हिंडे ॥ ९१ ॥ तयाच्या ठायीं उदंड । अज्ञान असे वितंड । जो चांचल्यें भावंड । मर्कटाचें ॥९२॥ आणि पैं गा धनुर्धरा । जयाचिया अंतरा । नाहीं वोढावोरा । संयमाचा ॥९३॥ लेंडिये आला लोंढा । न मनी वाळुवेचा वरवंडा । तैसा निषेधाचिया तोंडा । बिहेना जो ॥९४॥ व्रतातें आड मोडी । स्वधर्मु पायें वोलांडी । नियमाची आसं तोडी । जयाची क्रिया ॥९५॥ नाहीं पापाचा कंटाळा । नेणें पुण्याचा जिव्हाळा । लाजेचा पेंडवळा । खाणोनि घाली ॥९६॥ कुळेंसीं जो पाठमोरा । वेदाज्ञेसीं दुऱ्हा । कृत्याकृत्यव्यापारा । निवाडु नेणे ॥९७॥ वसू जैसा मोकाटु । वारा जैसा अफाटु । फुटला जैसा पाटु । निर्जनीं ॥ ९८ ॥ आंधळें हातिरू मातलें । कां डोंगरीं जैसें पेटलें । तैसें विषयीं सुटलें । चित्त जयाचें ॥ ९९ ॥ पैं उबधडां काय न पडे । मोकाटु कोणां नातुडे । ग्रामद्वारींचें आडें । नोलांडी कोण ॥७००॥ जैसें सत्रीं अन्न जालें । कीं सामान्या बीक आलें । वाणसियेचें उभलें । कोण न रिगे? ॥ १ ॥ तैसें जयाचें अंतःकरण । तयाच्या ठायीं संपूर्ण । अज्ञानाची जाण । ऋद्धि आहे ॥ २ ॥ आणि विषयांची गोडी । जो जीतु मेला न संडी । स्वर्गींही खावया जोडी । येथूनिची ॥ ३ ॥ जो अखंड भोगा जचे । जया व्यसन काम्यक्रियेचें । मुख देखोनि विरक्ताचें । सचैल करी ॥ ४ ॥ विषो शिणोनि जाये । परि न शिणे सावधु नोहे । कुहीला हातीं खाये । कोढी जैसा ॥५॥ खरी टेंकों नेदी उडे । लातौनि फोडी नाकाडें । तऱ्ही जेवीं न काढे । माघौता खरु ॥ ६ ॥ तैसा जो विषयांलागीं । उडी घाली जळतिये आगीं । व्यसनाची आंगीं

जो आपल्या डोळ्यांपुढें द्रव्याच्या इच्छेस सदाच बांधून–वावरत असतो. तो केवळ अज्ञानाचा ओतीव पुतळाच आहे, असें समज ८४. [ **अस्थैर्यं** ] ज्याप्रमाणें गवताच्या काडीवर मुंगी चढली तरी ती गवताची काडी लवते त्याप्रमाणें जो अल्प लाभाकरितांहि स्वार्थीवृत्तीमुळें बुद्धीच्या स्थिरपणापासून, धैर्यापासून ढळतो ८५. डबक्यांत पाय घातल्याबरोबर जसें त्यांतील पाणी गढूळ होतें तसा जो भयाचें नांव ऐकल्याबरोबर अत्यंत घाबरा होतो ८६. पुरांत पडलेला भोपळा जसा जलौघाबरोबर हवा तिकडे वाहात जातो, तसा तो मनोरथाच्या पुरांत वाहात जातो, असे समज ८७. वाऱ्याच्या साह्यानें धूर जसा गगनापर्यंत उंच जातो तसा जो दुःखाची गोष्ट ऐकल्याबरोबर गडबडतो ८८. वावटळ ज्याप्रमाणें कोठेंहि स्थिर राहात नाहीं, त्याप्रमाणें जो क्षेत्राचें, तीर्थाचें किंवा शहराचे ठिकाणीं कोठेंहि कायम स्थिर राहात नाहीं ८९. किंवा जसा माजलेला सरडा झाडाच्या बुडापासून शेंड्यापर्यंत व पुनः शेंड्यापासून बुडापर्यंत व्यर्थ खेपा घालतो तसा जो व्यर्थ फिरतो ६९०. ज्याप्रमाणें पाण्याचा रांजण जमिनींत पुरल्याशिवाय एका जाग्यावर स्थिर राहण्याचे जाणत नाहीं, त्याप्रमाणें जो निद्रादिकांमुळें पडला तरच एके ठिकाणीं राहील नाहींतर सारखा चोहोंकडे हिंडतो ९१. ज्याच्या ठिकाणीं अज्ञान पूर्णपणें वास करतें व जो चंचलपणानें माकडाचें जणुं सख्खें भावंडच असतो ९२. [ **आत्मविनिग्रहाभावः** ] आणि अर्जुना ! ज्याचें अंतः-करणांत आत्मसंयमनाचा, निग्रहाचा धरबंध वा वाराहि नसतो ९३. ज्याप्रमाणें एखादे ओहोळास पुराचा लोंढा आला म्हणजे तो वाळूच्या बांधास मुळींच जुमानीत नाहीं, त्याप्रमाणें जो शास्त्रनिषिद्ध कर्म करण्यास भीत नाहीं ९४. जो व्रतें पूर्ण न पाळतां स्वधर्मास लाथेनें झुगारतो व शास्त्रानें घालून दिलेल्या नियमांविरुद्ध ज्याची क्रिया–आचार असतो ९५. ज्याला पापाचर-णाचा कंटाळा नसतो, पुण्याचरणाचा लवलेशहि माहीत नसतो आणि जो लज्जेची सीमा खणून टाकतो ९६. जो कुळधर्म कुळाचार ओळखीत नाहीं वेदांतील आज्ञा न मानतां त्यास बाजूला सारतो व जो बऱ्यावाईट गोष्टींची निवड मुळींच जाणत नसतो ९७. ज्याप्रमाणें मोकळा सोडलेला पोळ हवा तिकडे मोकळा हिंडत असतो किंवा वारा अफाट, हवा तिकडे वाहतो, अथवा रानांतील फुटलेल्या पाटाचे पाणी जसे वाटेल तिकडे वाहात जाते ९८. आंधळा हत्ती माजला असतां तो हवा तसा हिंडतो. किंवा डोंगरास वणवा लागला म्हणजे हवा तिकडे चेतत जातो त्याप्रमाणें ज्याचें चित्त विषया-विषयीं वाटेल तिकडे बहकत–भटकत असतें ९९. हें पहा ! उकिरड्यावर काय एक पडत नाहीं ? मोकळ्या पोळाला कोण आवरतो ? तो कोणासहि आवरला जात नाहीं आणि वेशीचा उंबरा कोण ओलांडून जात नाहीं ? ७००. ज्याप्रमाणें अन्नसत्रांत वाटेल त्यांनीं जेवावें किंवा साधारण मनुष्यास एकादा विशेष अधिकार प्राप्त झाला असतां तो आपला अधिकार वाटेल तसा गाजवितो अथवा वाण्याचे दुकानांत कोण बरे प्रवेश करणार नाहीं १. त्याप्रमाणें ज्याचे अंतःकरण बऱ्यावाईट विचारानें चंचल असते त्याच्या ठिकाणीं संपूर्ण अज्ञानाची समृद्धि, भरभराट असते असें समज २. [ **इंद्रियार्थेषु अवैराग्यम्** ] आणि तो जिवंत असतांना व मेल्यावरहि विषयांची इच्छा सोडींत नाहीं व जो [ देहपातानंतर ] स्वर्गांतहि विषयोपभोग प्राप्त व्हावेत म्हणून येथूनच सामग्री [ सकाम कर्माचे आचरण ह्या लोकीं ] करून ठेवतो ३. जो विषयभोगाचे प्राप्तीकरितां सर्व परिश्रम–सतत करीत असतो व ज्याला सकाम कर्माशिवाय इतर कर्में आवडत नाहींत इतकें त्या काम्य कर्मांचे व्यसन असते आणि विर-क्तांचे दर्शन ज्याला इतकें वावडे आहे कीं, ते झाले असतां जो सचैल स्नान करतो ४. ज्याप्रमाणें कोड असलेला मनुष्य आपल्या कुजक्या सडलेल्या हातानें अन्न खातो तसे खाण्यास त्या मनुष्यास किळस वाटत नाहीं, त्याप्रमाणें ज्या विषय सेवन करणाऱ्यांचा विषयांस जरी कंटाळा–त्रास आला तरी तो विषयांस कंटाळत नाहीं व कर्मफलांविषयीं सावध होऊन निरिच्छहि होत नाहीं ५. गाढवीच्या पाठीस भोगार्थ गाढव लागल्यावर ती आपल्या अंगास स्पर्श करूं देत नाहीं उलट गाढव तिच्याजवळ आले तर ती लाथ झाडून त्याचे नाकाड फोडते तरीहि तो गाढव मागे वळत नाहीं तिच्याच पाठीस लागतो ६. त्याप्रमाणें जो विषयाकरितां जळत्या आगीं-तहि उडी घालण्यास मागेंपुढें पहात नाहीं आणि आपलें

१ द्रव्यासक्तीला. २ अल्पस्वल्प. ३ गवताची काडी. ४ ठेवल्याबरोबर. ५ डबकें. ६ घाबरतो. ७ धारेबरोबर. ८ दुध्या भोपळा. ९ सहवासानें. १० धूळ, धुर्के. ११ वाद-ळाप्रमाणें. १२ छंद, परिभ्रमण. उनाडकी. १३ स्थिर रहात नाहीं. १४ मोठें. १५ धरबंध. १६ ओहळास १७ बांध. १८ मर्यादा. १९ सीमा, मर्यादा, २० कुल-धर्माला. २१ दूर. २२ निर्णय. २३ पोळ, देवाला सोडलेला बैल. २४ मोकाट, मोकळा. २५ अरण्यांत. २६ हत्ती.

लेणीं मिरवी ॥ ७ ॥ फुटोनि पडे तंव । मृग वाढवी हांव । परी न म्हणे ते मावें । रोहिणीची ॥ ८ ॥ तैसा जन्मोनि मृत्यूवरी । विषयीं त्रासितां बहुतीं परी । तऱ्ही त्रासु नेघे धरी । अधिक प्रेम ॥ ९ ॥ पहिलिये बाळदशे । आई बा हेंचि पिसें । तें सरे मग स्त्रीमांसें । भुलोनि ठाके ॥ ७१० ॥ मग स्त्री भोगितां थांवो । वृद्धाप्य लागे येवों । तेव्हां तोचि प्रेमभावो । बाळकांसि आणी ॥ ११ ॥ आंधळें व्यालें जैसें । तैसा बाळें परिवेसे । परी जीवें मरे तों न त्रासे । विषयांसि जो ॥ १२ ॥ जाण तयाच्या ठायीं । अज्ञानासि पारु नाहीं । आतां आणीक कांहीं । चिन्हें सांगों ॥ १३ ॥ तरी देह हाचि आत्मा । ऐसेया जो मनोधर्मा । वळघोनियां कर्मा । आरंभु करी ॥ १४ ॥ आणि उणें कां पुरें । जें जें कांहीं आचरे । तयाचेनि आविष्कारें । कुंथों लागे ॥ १५ ॥ डोईये ठेविलेनि भोजें । देवलविसें जेवीं फुंजे'' । तैसा विद्यावयसा माजे । उताणा चाले ॥ १६ ॥ म्हणे मीचि एकु आंथी । माझ्याचि घरीं संपत्ती । माझी आचरती रीती । कोणा आहे ॥ १७ ॥ नाहीं माझेनि पांडें वाडु । मी सर्वज्ञ एकचि रूढु । ऐसा गर्वतुष्टीगंडु । घेऊनि ठाके ॥ १८ ॥ व्याधि लागलिया माणुसा । नयेचि भोग दाऊं जैसा । निकें'' न साहे जो तैसा । पुढिलांचें ॥ १९ ॥ पैं गुण तेतुला खाय । स्नेह'' कीं जाळितु जाय । जेथ ठेविजे तेथ होय । मसीऐसें ॥ ७२० ॥ जीवनें'' शिंपिला तिडंपिडी । विजिला प्राण सांडी । लागला तरी काडी । उरों नेदी ॥ २१ ॥ आळुमाळें प्रकाशु करी । तेतुलेनीच उबारा धरी । तैसिया दीपाचि परी । सुविद्यु जो ॥ २२ ॥ औषधाचेनि नांवें अमृतें । जैसा नवज्वरु आंबुथे । कां विषचि होऊनि परतें । सर्पा दूध ॥ २३ ॥ तैसा सद्गुणीं मत्सरु । व्युत्पत्ती अहंकारु । तपोज्ञानें अपारु । ताठा चढे ॥ २४ ॥ अंत्यु रांणिवे बैसविला । अजगरें धारणु गिळिला । तैसा गर्वें फुगला । देखसी जो ॥ २५ ॥ जो लाटणें ऐसा न लवे । पाथरु तेवीं न द्रवे । गुणियांसि नागवे । फोडसें जैसें ॥ २६ ॥ किंबहुना तयापाशीं । अज्ञान आहे वाढीसीं । हें निकें गा तुजसीं । बोलत असों ॥ २७॥ आणीकही धनंजया । जो गृहदेह सामग्रिया । न देखे काळचेया । जन्मातें गा

व्यसन हें दूषण नसून भूषणच आहे असें मानून मिरवतो ७. हरिण मृगजळ पिण्याच्या लालसेनें, तीव्र इच्छेनें धांवते व धांवता धांवता जरी त्या मृगाचा उर फुटला, तरी ते त्याची हांव कमी करीत नाहीं अधिकच वाढविते; पण हे जल मिथ्या आहे असें त्याला कळतच नाहीं ८. त्याप्रमाणें जन्मापासून मरेपर्यंत विषयप्राप्तीकरितां सारखे परिश्रम करितो, तथापि विषयांनी त्यास बहुतप्रकारें त्रास दिला तरी त्याबद्दल त्यास तिटकारा न येतां उलट विषयावर अधिकच प्रेम धरतो ९. पहिल्यानदां बालपणीं मातापितरांचें 'आई, बाबा' हेच वेड असतें, व तें संपते व तारुण्यदशेंत स्त्रीचें देहास मुद्दन वेडा होऊन जातो ७१०. नंतर असा स्त्रीचा उपभोग पूर्ण झाल्यावर विषय भोगतां भोगतां म्हातारपण येऊं लागते तेव्हां तेंच स्त्रीवरील प्रेम मुलांबाळांवर करूं लागतो ११. आंधळ्या मुलास जन्म दिला तर त्यास माता विसंबत नाहीं व तेहि घर सोडून जात नाहीं, तसा जो मुलांबाळांतच आपल्या कालक्रमणा करतो. मरून जातो तरीपण त्यास मरेपर्यंत विषयाचा तिटकारा येत नाहीं १२. त्याचे ठिकाणीं अज्ञानास अंतपार नाहीं असें समज. आतां अज्ञानाचीं आणखीं कांहीं लक्षणें सांगतो १३. [ **अहंकारः** ] हे पहा! जो आपला देह हाच आत्मा आहे अशा मनाच्या समजुतीवर आरूढ होऊन कर्मे करूं लागतो १४. आणि त्याचे हातून जें जें कांहीं कर्माचें आचरण पूर्ण किंवा अपूर्ण झाले तरीहि त्यांत अभिमानानें अनुक्रमें फुगून जातो व कुंथूंहि लागतो १५. देवऋषीनें मस्तकावर अक्षता टाकल्या म्हणजे जसा पिशाच्चानें पछाडलेला मनुष्य घुमूं लागतो, तसा जो विद्येच्या मदानें व वयाचें मदानें मस्त होऊन अभिमानाचा ताठा धरून उताणा छाती काढून चालतो १६. आणि म्हणतो कीं, सर्व जगांत काय तो मीच एक शहाणा आहे माझ्याच घरीं सर्व संपत्ति आहे आणि आचरणाचीं माझ्याप्रमाणें चालरीत कोणाची आहे? १७. माझ्याबरोबरीचा मोठा दुसरा कोणीहि नाहीं, मीच एक सर्वज्ञ असून, मी एकटाच या जगांत ज्ञाता म्हणून प्रसिद्ध आहें, याप्रमाणें सर्व गोष्टींबद्दल गर्वानें संतुष्ट झालेला ताठ होऊन राहतो १८. शिवाय व्याधिग्रस्त माणसाला ज्याप्रमाणें कोणताहि विषयोपभोग दाखवूं नये [कारण, त्याची तळमळ होते.] त्याप्रमाणें दुसऱ्याचें चांगलें झालेलें ज्याला मुळींच सहन होत नाहीं; १९. यांस दृष्टान्त असा कीं, एखादा दिवा हा गुण [ वात ] तेवढाच खाऊन टाकून स्नेह [ तेल ] जाळून टाकतो आणि ज्या जागीं ठेवावा ती जागा काजळाप्रमाणें काळी कुट्ट करून टाकतो; ७२०. पाण्याचा थेंब शिंपडला गेला तर तो तडतडतो, वारा लागला तर विझतो, एखादे ठिकाणीं लागला तर काडी देखील उरूं देत नाहीं इतके दोष आहेत २१. त्यांच्यांत गुण काय असें पाहिलें तर कोठें उगीच थोडासा प्रकाश करतो, एवढाच; पण तेवढ्या अल्प गुणानेंहि उष्मा करावयास लागतो. ह्या दिव्याच्या अल्प गुणाप्रमाणें त्याच्या जवळ विद्या अल्पच असते व दोष मात्र बहुत असतात.! २२. शिवाय नवज्वर झालेल्या रोग्यास दूध हें औषध म्हणून जरीं दिलें तरीहि तें त्याचा ताप विकोपासच नेतें; किंवा सर्पास दूध पाजलें असतां तें जसे विष होऊन उलटतें २३. त्याप्रमाणें गुणवान् मनुष्याविषयीं जो मत्सरी असतो. व्युत्पत्तीबद्दल जो अहंपणा बाळगतो व क्षुद्र तपाचरणानें व ज्ञानानें ज्याचे आंगीं अमर्याद ताठा भरतो; २४. अंत्यजाला राज्यावर बसविलें असतां तो जसा अभिमानान फुगतो, अथवा अजगरानें खांब गिळल्यावर तो जसा ताठतो तसा ज्याच्या अंगीं गर्वाचा जाठा भरलेला आहे असें तूं पाहशील; २५. आणि जो लाटण्याप्रमाणें केव्हांहि लवत नाहीं व दगडाप्रमाणें ज्याला पाझर फुटत नाहीं आणि फुरसें चावलें म्हणजे जसें मांत्रिकाच्या मंत्रानेंहि उतरत नाहीं; २६. फार काय सांगावें!! अशी ज्याची स्थिति असते, त्याच्याजवळ अज्ञान वाढीस लागलें आहे, हें तुला आम्ही निश्चयानें, निक्षून सांगतो २७. [**जन्मादर्शनं**] हें पहा धनंजया! जो आपलें घरदार, संपत्ति,

१ तोंड फुटून. २ कपट. ३ मृगजळाची. ४ शरीरास. ५ ठाव, ठिकाण. ६ स्पर्शितो, आलिंगितो. ७ ओळंबून. चढून. ८ आविर्भावानें. ९ डोईवर ठेवलेल्या देवाच्या मूर्तीनें. १० देवाचा पुजारी, भगत. ११ गर्वानें फुगतो. वाढूं लागतो. १२ बलवान्. १३ बरोबरीचा. १४ प्रसिद्ध. १५ सर्व गोष्टींबद्दल गर्व. १६ बरें. १७ दुसऱ्याचें. १८ वात. १९ तेल. २० काजळाप्रमाणें. २१ पाण्यानें. २२ तडतडतो. २३ वारा घातला तर. २४ घराला स्पर्शला २५ किंचित्. २६ ज्ञानी, गुणी. २७ दुधानें. २८ विको, पास जातो. २९ राज्यावर. ३० अजगरानें. ३१ खांब. ३२ गारुड्यास, विषवैद्यास. ३३ उतरत नाहीं. ३४ फुरसें. ३५ वाढतें दशेंत. ३६ निश्चयानें. ३७ गत जन्माचे.

॥ २८ ॥ कृतघ्ना उपकारु केला । कां चोरा व्यवहारु दिधला । निसुगु स्तविला । विसरे जैसा ॥ २९ ॥ वोढाळितां लाविलें । तें तैसेंच कान पूंस वोलें । कीं पुढती वोढाळूं आलें । सुणें जैसें ॥ ७३० ॥ बेडूक सापाचिया तोंडीं । जातसे सबुडे-बुडीं । तो मक्षिकांचिया कोडीं । स्मरेना कांहीं ? ॥ ३१ ॥ तैसीं नवंही द्वारें स्रवती । आंगीं देहाची लुती जिती । जेणें जाली तें चित्तीं । सलेना जया ॥ ३२ ॥ मातेच्या उदरकुहरीं । पचूनि विष्ठेच्या दाथरीं । जठरीं नवमासवरीं । उकडला जो ॥ ३३ ॥ तें गर्भींची जे व्यथा । कां जें जालें उपजतां । तें कांहींचि सर्वथा । नाठवी जो ॥ ३४ ॥ मलमूत्रपंकीं । जें लोळतें बाळ अंकीं[12] । तें देखोनि जो न थुंकीं । त्रासु नेघे ॥ ३५ ॥ कालचि ना जन्म गेलें । पाहेचि[13] पुढती आलें । ऐसें हें कांहीं वाटलें । नाहीं जया ॥ ३६ ॥ आणि पैं तयाची परी । जीविताचि फँरांरी । देखोनि जो न करी । मृत्युचिंता ॥ ३७ ॥ जिणेयाचेनि विश्वासें । मृत्यु एक एथ असे । हें जयाचेनि मानसें । मानिजेना ॥ ३८ ॥ अल्पोदकींचा मासा । हें नौटे ऐसिया आशा । न[18] वचेचि कां जैसा । अगाध डोहां ॥ ३९ ॥ कां गोरीचियें भुली । मृग व्याधा दृष्टी न घाली । गळु न पाहतां गिळिली । उंडी[19] मीनें[20] ॥ ७४० ॥ दीपाचिया झगमगा[21] । जाळील हें पतंगा । नेणवेचि पैं गा । जयापरी ॥ ४१ ॥ गव्हारें[22] निद्रासुखें । घर जळत असे तें न देखे । नेणतां जेंवी[23] विखें । रांधिलें अन्न ॥ ४२ ॥ तैसा जीवितौंचेनि मिषें । हा मृत्युचि आला असे । हें नेणोचि रौंजसें । सुखें जो गा ॥ ४३ ॥ शरीरींची वाढी । अहोरात्रांची जोडी । विषयसुखप्रौढी । साचचि मानी ॥ ४४ ॥ परी बापुडा ऐसें नेणें । जें वेश्येचें सर्वस्व देणें । तेंचि तें नागवणें । रूप एथ ॥ ४५ ॥ संवचोराचें साजणें । तेंचि तें प्राण घेणें । लेपा स्नपन करणें । तोचि नाशु ॥ ४६ ॥ पांडुरोगें आंग सुटलें । तें तयाचि नांवें खुंटलें । तैसें नेणें भुललें । आहारनिद्रा ॥ ४७ ॥ सन्मुख शूळा । धांवतया पायें चपळा । प्रतिपदीं ये जवळा । मृत्यु जेवीं ॥ ४८ ॥ तेवीं देहा जंव जंव वाढु । जंव जंव दिवसांचा पवाडु । जंव जंव सुरवाडु । भोगांचा या ॥ ४९ ॥ तंव तंव अधिकाधिकें । मरण आयुष्यातें जिंके । मीठ जेवीं उदकें । घांसिजत असे ॥ ७५० ॥ तैसें जीवित्व जाये । तयास्तव काळु

देहादि सामुग्रीमुळें [ त्यांत मग्न झाल्यानें ] व आपल्या प्राक्जन्माविषयीं व भावीजन्माविषयीं कांहींसुद्धां विचार करीत नाहीं २८. कसा, तर कृतघ्नावर उपकार केला असतां [ तें जसें तो विसरतो ] अथवा चोरास व्यापाराकरितां भांडवल दिलें असतां किंवा निर्लज कोडग्या मनुष्याची स्तुति केली असतां, जशी तो ती विसरतो २९. तसें किंवा द्वाड ओढाळ, कुत्र्याचे कान आणि शेपूट कापून त्यांस घरांतून बाहेर हांकून लाविलें तरी तें कुत्रें रक्तानें कान व शेपूट ओले असताच जसें पुनः ते विसरून त्याच घरांत खोडी करण्यासाठीं शिरते ७३०. बेडूक सापाच्या तोंडांत सांपडून सगळा गिळला जात असतांहि तो कौतुकानें देखील माशाचे समुदाय गिळण्याची इच्छा धरतो, परंतु आपली स्थिति काय होत आहे, याची त्यास आठवणहि नसते ३१. त्याप्रमाणें अंगांत लूद भरून [ मलाने ] नाक-तोंडादि नवद्वारें वहात, पाझरत असतांहि त्याच्या मनांत आपली अशी स्थिति ज्यामुळें [ जन्मामुळें ] प्राप्त झाली ती गोष्ट ज्याच्या अंतःकरणांत मुळींच सलत नाहीं ३२. आईच्या गर्भाशयरूप गुहेमध्यें विष्ठेच्या थरांत घालून नऊ महिनेपर्यंत जो उकडला गेला ३३. ती त्या गर्भातील झालेली यातना किंवा उदरांतून बाहेर निघतेसमयींचें झालेले दुःख तें कांहींच तो मुळींहि आठवीत नाहीं ३४. मांडीवर घेतलेले मूल मलमूत्रांच्या चिखलांत लोळत असतांना पाहूनहि जो चिळस घेत नाहीं व ज्यास कंटाळा, त्रासहि उत्पन्न होत नाहीं ३५. मागचा जन्म नुकतांच संपला नाहीं काय ? हल्लीं ज्या जन्मांत आपण आहो व लागलींच उद्या दुसरा जन्म मिळणार यांविषयीं ज्याचें मनांत कांहींहि विचार उत्पन्न होत नाहीं ३६. [ **मृत्योरदर्शनम्** ] आणि त्याचप्रमाणें आपले तारुण्याचे भरांत पुढें येणाऱ्या मृत्युबद्दल जो कांहींहि काळजी बाळगीत नाहीं ३७. आपल्या जीवितावर मी अजरामर आहे असा पूर्ण विश्वास असतो म्हणून या जगांत मृत्यु म्हणून कोणी एक आहे तो आपणास मारील याबद्दल ज्याच्या मनांत कधींहि बिलकुल विचार येत नसतो ३८. डबकें आटणार नाहीं अशा समजुतीनें जसा त्या थोड्या पाण्यांतील मासा मोठ्या खोल डोहांत जात नाहीं ३९. किंवा पारध्याच्या गाण्यानें मुग्ध्न हरिण जसा त्या पारध्याकडे दृष्टीनें पहातहि नाहीं; अथवा मासा गळास लाविलेल्या आमिषाच्या आंत गळ आहे असें न समजतां तें आमिष गिळतो ७४०. किंवा दिव्याच्या चकाकीमुळें त्या ज्योतीनें आपण जळून जाऊं असें मुळींच न समजतां पतंग त्यावर झडप घालतो ४१. घर जळत असतांहि एखादा मूर्ख निद्रेच्या भरांत आळसानें तिकडे लक्ष देत नाहीं; किंवा या अन्नांत विष घातलें आहे हें न समजतां तें अन्न, एखादा मूर्ख निर्धास्तपणानें खातो ४२. त्याप्रमाणें जीविताचे रूपानें, निमित्तानें हा मृत्युच आला आहे असें जो राजस विषयसुखाचे भरांत असल्यामुळें जाणतच नाहीं ४३. प्रस्तुत असलेला आपल्या शरीराचा पुष्टपणा रात्र व दिवस यांची प्राप्ति व उपयोग आणि विषयसुखोपभोग हीं मोठ्या प्रौढीनें सत्यच मानतो ४४. परंतु तो बिचारा असें समजत नाहीं कीं, वेश्येचे एखाद्यास तन-मन सर्वस्व अर्पण करणें तेंच तिचे करणें वरकांति असून, त्यास खरोखर साक्षात् लुटण्याचाच, बुचाडण्याचाच तो मार्ग आहे ! ४५. किंवा वाटेनें जातांना सोबतीस संभावीत चोराची गांठ पडली तर त्यानें आपल्यास दाखविलेली वरकांति मैत्री म्हणजे [ ती खरोखर मैत्री नसून रानांत गेल्यावर ] आपला प्राण घेणेंच होय व मातीचे चित्रास स्नान वगैरे घालून पूजन करणें म्हणजे त्या चित्राचा नाश करणेंच होय ४६. पंडुरोगानें मनुष्याचे शरीर लठ्ठ झाले म्हणजे तो वास्तविक सशक्त नसून त्यांतच त्याचें आयुष्य संपलें असें समजावें. त्याप्रमाणें तो आहार खाणे, व निद्रा यांत गर्क होऊन, त्या विषयोपभोगसमृद्धीपासून आपला खरोखर नाशच आहे असें त्यांस समजत नाहीं ४७. सुळीं देण्याकरितां नेत असलेला मनुष्य समोर सूळ पाहिल्यावर त्याकडे जलद पावलानें धांवत जाऊं लागला म्हणजे तो आपल्या प्रत्येक पावलास जसा मृत्यु जवळच करितो ४८. त्याप्रमाणें देह जसा जसा वाढेल, आयुष्य दिवस जों जों वृद्धिंगत होतील व जों जों या विषयानुकूलतेमुळें त्या सुखांत निमग्न होईल ४९. तों तों मरण आयुष्यास जिंकील असेंच केल्यासारखें होईल आणि मीठ ज्याप्रमाणें पाण्यानें घासल्यावर हळू हळू विरघळत असते ७५०. त्याप्रमाणें जों जों आयुष्याचे दिवस कमी होत जातील

१ व्यापारास भांडवल. २ निर्लज्ज. ३ ओढाळपण करितां. ४ शेपूट. ५ कुत्रें. ६ मूळासहित, जीवासकट. ७ कौतुकानें, आशेनें. ८ मुख, मलद्वार, मूत्रद्वार, डोळे दोन कान दोन आणि नाकपुड्या दोन मिळून नऊ द्वारें. ९ लूत. १० गर्भगुहेंत. ११ दादऱ्यांत, थरांत. १२ मांडीवर. १३ उद्यां, लागलेंच. १४ वैभव, भरभराट, भर. १५ डबक्यांतला. १६ आटणार नाहीं. १७ जात नाहीं. १८ पारध्याच्या गाण्याच्या. १९ मांसाचा गोळा. २० माशानें. २१ प्रकाशानें, चकचकाटानें. २२ मुर्ख. २३ जेवतो. २४ आयुष्याच्या. २५ रजोगुणी सुखानें.

पाहे । हें हातोहातींचें न होये । ठाउकें जया ॥ ५१ ॥ किंबहुना पांडवा । हा आंगींचा मृत्यु नित्य नवा । न देखे जो भावा । विषयांचिया ॥ ५२ ॥ तो अज्ञान-देशींचा रावो । या बोला महाबाहो । न पडे गा ठावो । आणिकांचा ॥ ५३ ॥ पैं जीविताचेनि तोखें । जैसा कां मृत्यु न देखे । तैसाचि तारुण्यें पोखें । जरा न गणी ॥ ५४ ॥ कडांडीं लोटला गाडा । कां शिखरौनि सुटला धोंडा । तैसा न देखे जो पुढां । वार्धक्य आहे ॥ ५५ ॥ कां आडवोहळा पाणी आलें । कां जैसें म्हैसयांचें झुंज मातलें । तैसें तारुण्याचें चढलें । भुररें जया ॥ ५६ ॥ पुष्टि लागे विर्धरों । कांति पाहे निसरों । मस्तक आदरीं शिरो- । भागीं कंप ॥ ५७ ॥ दाढी साउळ धरीं । मान हालौनि वारी । तरी जो करी । मायेचा पैसु ॥ ५८ ॥ पुढील उरीं आदळे । तंव न देखे जेवीं आंधळें । कां डोळ्यावरलें निगळे । आळशी तोषें ॥ ५९ ॥ तैसें तारुण्य आजिचें । भोगितां वृद्धाप्य पोहेचें । न देखे तोचि साचें । अज्ञानु गा ॥ ७६० ॥ देखें अक्षमें कुंब्जें । कीं विटावूं लागे फुंजे । परि न म्हणे पोंहे माझें । ऐसेंचि भवे ॥ ६१ ॥ आणि आंगीं वृद्धाप्यतेची । संज्ञा ये मरणाची । परि जया तारुण्याची । भुली न फिटे ॥ ६२ ॥ तो अज्ञानाचें घर । हें साचचि घे उत्तर । तेवींचि परियेसीं थोर । चिन्हें आणिक ॥ ६३ ॥ तरि वाघाचिये अडवे । एक वेळ आला चरोनि दैवें । तेणें विश्वासें पुढती धांवें । वसू जैसा ॥ ६४ ॥ कां सर्पघरांआंतु । अवचटें ठेवा आणिला स्वस्थु । येतुलियासाठीं निश्चितु । नास्तिकु होय ॥ ६५ ॥ तैसेंचि अवचटें हें । एकदोनी वेळां लाहे । एथ रोग एक आहे । हें मानीना जो ॥ ६६ ॥ वैरिया नीद आली । आतां द्वंद्वें माझीं सरलीं । हें मानी तो सपिली । मुकला जेवीं ॥ ६७ ॥ तैसी आहार-निद्रेची उजरी । रोग निवांतु जोंवरी । तंव जो न करी । व्याधी चिंता ॥ ६८ ॥ आणि स्त्रीपुत्रादिमेळें । संपत्ति जंव जंव फळे । तेणें रजें डोळे । जाती जयाचे ॥ ६९ ॥ सवेंचि वियोगु पडेल । विळौनि विपत्ति येईल । हें दुःख पुढील । देखेना जो ॥ ७७० ॥ तो अज्ञान गा पांडवा । आणि तोहि तोचि जाणावा । जो इंद्रियें अव्हासवा । चारी एथ ॥ ७१ ॥ वयसेचेनि उवायें । संपत्तीचेनि सावायें । सेव्या-सेव्य जाये । सरकटितु ॥ ७२ ॥ न करावें तें करी । असंभाव्य मनीं धरी । चिंतूं

तों तों काळाला उजाडते म्ह. तो मृत्यु जवळ येतो व तो आपल्यास हातोहात घेऊन जाईल, हें ज्याला समजणार नाहीं ५१. फार काय सांगावे ! ! अर्जुना ! आयुष्याच्या वृद्धीपासून आपला मृत्यु नित्यनवा-दररोज जवळ जवळ येत आहे हे जो विषयाच्या भुलीनें जाणत नाहीं ५२. तो हे महाबाहो अर्जुना ! अज्ञानरूप देशाचा राजाच आहे असें समज. या म्हणण्यांत न्यूनता वा अन्यथा असें कांहींहि नाहीं ५३. [जराया अदर्शनं] ज्याप्रमाणें तो जगण्याच्या भरांत संतोष मानून पुढें येणाऱ्या मृत्यूबद्दल विचार करीत नाहीं, त्याचप्रमाणें तारुण्याच्या संतोषाच्या भरांत पुढें येणाऱ्या म्हातारपणाबद्दलहि बेपर्वा असतो ५४. डोंगराच्या कड्यावरून लोटलेला गाडा किंवा पर्वताच्या शिखरावरून सुटलेला धोंडा त्या उभयाला ज्याप्रमाणें आपला पुढें काय परिणाम होईल हें माहीत नसतें, त्याप्रमाणें जो आपल्यास वार्धक्य येऊन आपली काय स्थिति होईल याकडे मुळीहि लक्ष देत नाहीं ५५. किंवा आडरानांतील ओढ्यास पाण्याचा लोंढा आल्यावर त्यांतून पलीकडे जातां येत नाहीं, इतक्या जोराने तो वाहतो अथवा रेड्यांची टक्कर लागल्यावर ते उन्मत्त होऊन दुसऱ्यास जवळ येऊं देत नाहींत, त्याप्रमाणें ज्याच्या अंगावर तारुण्याची भुरळ-धुंदी चढलेली असते ५६. शरीरसंपत्ती सौष्ठव कमी होते, अंगावरील तेज लोप पावूं लागते व डोकें कांपरे सुटल्यानें मानेबरोबर हालूं लागतें ५७. दाढी पांढरी होते, मान 'नाहीं नाहीं' म्हणण्याप्रमाणेंच निवारण्याची खूण करीत उगीच हालते, अशी स्थिति झाली असतांहि जो आशा वा प्रिय वस्तूंचा पसारा वाढवितो ५८. आंधळ्याला ज्याप्रमाणें पुढें असलेला खांब वगैरे पदार्थ उरावर आदळेपर्यंत समजत नाहीं, किंवा डोळ्याजवळील पदार्थ दुसऱ्यानें तोंडांत घातलें असतां जो आळशी संतोष पावतो, परंतु आपण खटपट करीत नाहीं ५९. त्याप्रमाणें आजच्या तारुण्याचा उपभोग घेत असतां उद्याच्या-पुढें येणाऱ्या म्हातारपणाबद्दल जो विचार करीत नाहीं तो केवळ अज्ञानरूपच होय ७६०. [व्याध्यदर्शनं] तारुण्याचे भरांत, कोणी आंधळ्याकडे अगर कुबड वांकलेल्या मनुष्याकडे पाहून तो त्यास गर्वानें वेडावून दाखवितो; परंतु पुढें आपलीहि अशीच स्थिति होईल असें मनांत आणीत नाहीं ६१. आणि मरण्याची खूण-चिन्ह जें म्हातारपण, ते जरी शरीरावर प्राप्त झालें, तरी जो तारुण्याची भ्रमात्मक घमेंड सोडीत नाहीं ६२. तो पुरुष अज्ञानाचें घर आहे, असें पक्कें खरें समज. त्याचप्रमाणें अज्ञानाचीं आणखी कांहीं ठोकळ लक्षणें सांगतों तीं ऐक ६३. वाघाचे रानांतून एक वेळ बैल चरून दैववशात्-नशिबानें सुखरूप घरीं परत आला असतां त्याच विश्वासानें तो ज्याप्रमाणें त्या रानांत फिरून चरण्यास धांवतो ६४. अथवा ज्या घरांतील पुरलेल्या संपत्तीवर सर्प बसला होता त्यांतील द्रव्य-ठेवा एकदां चुकून सर्पदंश न होतां एखाद्यानें आणिला एवढ्यावरून तो खासच नास्तिक होतो [ म्हणजे तो 'संपत्तीवर बसतो, द्रव्य घेऊं देत नाहीं' या गोष्टीवर विश्वास ठेवीत नाहीं ] ६५. त्याप्रमाणें कांहीं काळपर्यंत दैववशात् आपलें शरीर निरोगी आहे एवढ्याच घमेंडीवर शरीरांत पुढें रोग उद्भवतील हें सत्य मानीतच नाहीं ६६. आपल्या वैऱ्याला झोंप लागली आहे एवढ्यावरूनच आता त्याचें व आपलें भांडण-तंटे सपलें असें जर कोणी मानील आणि त्या भरंवशावर स्वस्थ बसेल तर तो वैरी जागृत झाल्यावर ज्याप्रमाणें आपल्या मुलाबाळांसह जीवास मुकेल ६७. त्याप्रमाणें जोंपर्यंत आहार व झोंप ही चांगली व्यवस्थित लागत आहेत व जोंपर्यंत रोगराई वगैरे कांहीं झाले नाहीं तोपर्यंत आपल्यास वृद्धापकाळीं रोग वगैरे जडतील याची जो मुळींच काळजी बाळगीत नाहीं; ६८ [दुःखावर्शनम्] आणि स्त्रीपुत्रादिकांच्या संगतींत राहून संपत्ति ही जों जों जास्त मिळूं लागेल तों तों ज्याच्या डोळ्यावर अधिकाधिक धूर-संपत्तिमद चढून विचाररूपी डोळे नाहींसे होतात ६९. आणि स्त्रीपुत्रादिकांचा व संपत्तीचा वियोग एका क्षणांत होईल व एका दिवसांत, क्षणांत विपत्ति येईल, हें पुढील दुःख जो आरंभींच पहात नाहीं ७७०. तो अज्ञानी होय. अर्जुना, जो या मृत्युलोकीं इन्द्रियांना हव्या त्या विषयांत स्वस्थ चरूं देतो [ स्वैरवर्तन करूं देतो ] तोहि केवळ अज्ञानरूपच समजावा ७१. जो तारुण्याचे भरांत असल्यानें व संपत्तीच्या मदतीनें सेव्यासेव्य वस्तूंची विचारानें निवड न करितां त्यांचा उपभोग घेतो ७२. जी गोष्ट करूं नये ती हटकून करितो;

१ भुलीनें, कपटें. २ संतोषानें. ३ म्हातारपण. ४ डोंगराच्या कड्यावरून. ५ आडरानातल्या ओहळास. ६ रेड्यांचें ७ वेड, भुरळ, धुंदी. ८ नाश पावूं लागते, कमी होऊं लागते. ९ निःशेष लोप होऊं लागते. १० मस्तकप्रांतीं. ११ पांढरेपण, पांडुरता. १२ तारुण्याचा मद. १३ विस्तार. १४ न गळतें. १५ उद्यांचें. १६ अशक्त, आंधळें. १७ कुबड आलेला. १८ वेडावूं लागतो. १९ अभिमानानें, तोऱ्यानें. २० उद्यां. २१ वृद्धत्व हीच मरणाची खूण. २२ भ्रम, घमेंड,

नये तें विचारी । जयाची मती ॥ ७३ ॥ रिघे जेथ न रिघावें । मागे जें न घ्यावें । स्पर्शे जेथ न लागावें । आंग मन ॥ ७४ ॥ न जावें तेथ जाये । न पाहावें तें जो पाहे । न खावें तें खाये । तेवींचि तोषें ॥ ७५ ॥ न धरावा तो संगु । न लागावें तेथ लागु । नाचरावा तो मार्गु । आचरे जो ॥ ७६ ॥ नायकावें तें आइके । न बोलावें तें बके । परि दोष होतील हें न देखे । प्रवर्तता ॥ ७७ ॥ आंगा मनासि रुचावें । येतुलेनि कृत्याकृत्य नाठवें । जो करणेयाचेनि नांवें । भलतेंचि करी ॥ ७८ ॥ परि पाप मज होईल । कां नरकयातना येईल । हें कांहींचि पुढील । देखेना जो ॥ ७९ ॥ तयाचेनि आंगलगें । अज्ञान जगीं दाटुगें । जें सज्ञानाहि संगें । झोंबों सके ॥ ७८० ॥ परी असो हें आइक । अज्ञान चिन्हें आणिक । जेणें तुज सम्यक् । जाणवे तें ॥ ८१ ॥ तरी जयाची प्रीति पुरी । गुंतली देखसी घरीं । नवगंधकेसरीं । भ्रमरी जैशी ॥ ८२ ॥ साकरेचिया राशीं । बैसली नुठे माशी । तैसेनि स्त्रीचित्त आवेशीं । जयाचें मन ॥ ८३ ॥ ठेला बेडूक कुंडीं । मशक गुंतला शेंबुडीं । जैसा ढोरु सबुडबुडीं । रुतला पंकीं ॥ ८४ ॥ तैसें घरींहूनि निघणें । नाहीं जीवें मनें प्राणें । जया साप होऊनि असणें । भोंटीं तियें ॥ ८५ ॥ प्रियोत्तमाचिया कंठीं । प्रमदा घे आटी । तैशी जीवेंसी कोंपटी । धरूनि ठाके ॥ ८६ ॥ मधुरसोद्देशें । मधुकर जचे जैसे । गृहसंगोपन तैसें । करी जो गा ॥ ८७ ॥ म्हातारपणीं जालें । मा आणिक एक विपाइलें । तयाचें कां जेतुलें । मातापितरां ॥ ८८ ॥ तेतुलेनि पाडें पार्था । घरीं जया प्रेम आस्था । आणि स्त्रीवांचूनि सर्वथा । जाणेना जो ॥ ८९ ॥ तैसा स्त्रीदेहीं जो जीवें । पडोनियां सर्वभावें । कोण मी काय करावें । कांहीं नेणें ॥७९०॥ महापुरुषाचें चित्त । जालिया वस्तुगत । ठाके व्यवहारजात । जया-परी ॥ ९१ ॥ हानि लाज न देखे । परापवादु नाइके । जयाचीं इंद्रियें एकमुखें । स्त्रिया केलीं ॥ ९२ ॥ चित्त आराधी स्त्रियेचें । आणि तियेचेनि छंदें नाचे । माकड गारुडियाचें । जैसें होय ॥ ९३ ॥ आपणपेंही शिणवी । इष्टमित्र दुखवी । मग कवंडाचि वाढवी । लोभी जैसा ॥ ९४ ॥ तैसा दानपुण्यें खांची । गोत्रकुटुंबा वंची । परी गौरी भरी स्त्रियेची । उणी हों नेदी ॥९५॥ पूजिती दैवतें जोगावी ।

असंभाव्य–न होणाऱ्या गोष्टींची मनांत हांव धरितो आणि ज्या गोष्टीबद्दल विचार करूं नये अशाच गोष्टींविषयीं ज्याची बुद्धि विचार करते ७३. जेथें प्रवेश करूं नये तेथें शिरकाव करितो, जी वस्तु घेऊं नये तीच मागतो आणि ज्या गोष्टी मनांत सुद्धां आणूं नयेत किंवा ज्यास अंगानें स्पर्शहि करूं नये, अशांना जाऊन खेटतो ७४. जेथें जाऊं नये तेथें जातो, पाहूं नये तें पाहतो, जें खाऊं नये तें खातो आणि याप्रमाणें वर्ज्य केलेल्या गोष्टी केल्यानेंच ज्यास संतोष होतो ७५. ज्याची संगति धरूं नये त्याचीच संगत धरतो, ज्या ठिकाणीं संबंध असूं नये त्या ठिकाणीं संबंध ठेवतो आणि ज्या मार्गाचें आचरण करूं नये त्याच मार्गाचें आचरण करतो ७६. जें ऐकूं नये तें ऐकतो, बोलूं नये तें मोठ्यानें बडबडतो,. परंतु या गोष्टी केल्यानें आपल्या हातून दोष घडतील असें मनांतहि आणीत नाहीं ७७. आपल्या शरीरास व मनांस आवडेल व आपल्यास दृष्ट सुखावह होईल, एवढे असले म्हणजे झाले इतकच लक्ष असल्यामुळें जो बरी-वाईट गोष्ट करण्याबद्दल मुळींच विचार करीत नाहीं आणि यामुळें करावयाचे म्हणून भलत्याच गोष्टींचें आचरण करितो ७८. परंतु आपले हातून पाप घडेल किंवा पुढें आपल्याला नरकयातना सोसाव्या लागतील, या पुढील प्राप्त होणाऱ्या गोष्टीबद्दल जो कांहींच विचार करीत नाहीं ७९. त्या धर्मभ्रष्टाच्या संगतीनें सर्व जगात अतिशय अज्ञान पसरते, बळावते आणि तें शेवटीं इतकें वाढतें कीं, तें आपल्या बळानें ज्ञानावान'बरोबरहि झगडूं शकतें ७८०. पण हें असो. ज्या योगानें तुला अज्ञानाचें स्वरूप स्पष्ट समजेल अशी त्याचीं आणखी कांहीं लक्षणें सांगतों, ऐक ८१. [ **आसक्तिः** ] ज्याप्रमाणें भ्रमरीची चित्तवृत्ति नवीन उमललेल्या कमळाच्या सुगंधी केसरावर आसक्त होऊन ती गुंतलेली असतें, त्याप्रमाणें ज्याची प्रीति घरावर पुरती जडलेली पाहशील ८२. ज्याप्रमाणें साखरेच्या राशीवर बसलेली माशी उठत नाहीं, त्याप्रमाणें ज्याचें मन स्त्रीवर आसक्त होऊन तिच्या चित्ताला पोटाळून बसतें ८३. ज्याप्रमाणें बेडूक पाण्याच्या कुंडांत राहिलेला असतो, तेथून बाहेर पडत नाहीं, किंवा चिलट शेंबडांत गुंतल्यावर बाहेर पडूं शकत नाहीं किंवा जनावर पूर्णपणें चिखलांत रुतल्यावर त्यांतून बाहेर निघूं शकत नाहीं ८४. त्याप्रमाणें ज्याचें मन जीवंतपणीं वा मेल्यावर घरावरून दूर होत नाहीं व जो मरणानंतरहि आपल्या बखळींत साप होऊन बसतो ८५. एखादी तरुण स्त्री आपल्या जिवलगाच्या गळ्यांत मिठी मारून बसते, त्याप्रमाणें जो आपल्या झोंपडीला जिवाशीं धरून राहतो ८६. मधाचें प्राप्त्यर्थ व संरक्षणार्थ मधमाशा, जशा परिश्रम–जाच सोसतात, त्याप्रमाणें जो हवीं तीं संकटें परिश्रम सोसून आपल्या घराचें संरक्षण करितो ८७. म्हातारपणीं झालेलें आणि त्यांतहि तेंच एकुलतें एक असें पुत्ररत्न असलें म्हणजे त्याच्या आईबापांचें जितकें त्याच्यावर प्रेम असतें ८८. तितक्याच मानानें ज्याला घराविषयीं आस्था व प्रेम असते, [ **पुत्रादिषु अभिष्वंगः** ] आणि अर्जुना ज्याला स्त्रीवांचून जगतांत दुसरी प्रिय अशी वस्तुच नाहीं ८९. त्याप्रमाणें जो जिवाभावानें स्त्रीदेहावर आसक्त झालेला असतो, आणि आपण कोण आहों व आपलें कोणते कर्तव्य–आहे कीं, ज्यामुळें सार्थक होईल, हें जो कांहींच जाणत नाहीं ७९०. ज्याप्रमाणें सिद्ध, महापुरुषाचें चित्त ब्रह्मस्वरूपीं निमग्न झाल्यावर त्याचे सर्व व्यवहार थांबतात ९१. त्याप्रमाणें तो आपली हानि, लोकलज्जा हे कांहीं पहात नाहीं किंवा लोकांनी केलेली जी निंदा तिकडेहि लक्ष देत नाहीं. कारण, ज्याच्या साऱ्या इंद्रियांची धांव एकमुखानें स्त्री विषयाकडेच असते ९२. ज्याप्रमाणें गारुड्याचें माकड गारुड्याच्या छंदानें नाचणारें असते त्याप्रमाणें जो स्त्रीच्या चित्ताची आराधना करीत असतो. व तिच्याच छंदानें नाचत असतो ९३. आणि ज्याप्रमाणें आपण स्वतः अतिशय कष्ट सोसून शिणतो व आप्तमंडळींना दुखवितो व मग तो कृपण मनुष्य द्रव्यच वाढवितो ९४. त्याप्रमाणें दान व पुण्य करण्याचे कमी करतो, आपल्या कुटुंबातील इतर मंडळींनाहि फसवितो. परंतु आपल्या स्त्रीची खांच भरतो, तिची विषयेच्छा तृप्त करण्यांत मात्र उणेपणा होऊं देत नाहीं ९५.

१ स्पर्श करूं नये. २ बडबडतो. ३ समागमानें. ४ पसरतें. ५ स्पष्ट. ६ व्यापून, पोटाळून राहते. ७ राहिलेला. ८ चिलट, माशी. ९ समूळ बुडविणाऱ्या. १० ओसाड जमिनींत, बखळींत. ११ स्त्री. १२ मिठी. १३ खोपट. १४ मधाच्या संरक्षणार्थ. १५ भुंगा. १६ जाच सोशी. १७ घराचें संरक्षण. १८ पुत्ररत्न झालें. १९ क्वचित्, वाणीतिणीचें. २० सिद्धीचें. २१ ब्रह्मगत. २२ निंदा. २३ एकाकार वृत्तीचीं. २४ धनच. २५ कमी करी. २६ कपट करितो. २७ थैली, मागणी. २८ कशीबशीं समजावितो.

गुरूतें बोलें झकवी । मायबापां दावी । निंदारपण ॥९६॥ स्त्रियेच्या तरी विखीं । भोगसंपत्ती अनेकीं । आणी वस्तु निकी । जे जे देखे ॥९७॥ प्रेमाथिलेनि भक्तें । जैसेनि भजिजे कुळदैवतें । तैसा एकाग्रचित्तें । स्त्री जो उपासी ॥९८॥ साच आणि चोख । तें स्त्रियेसीचि अशेख । येरांविषयीं जोगावणूक । तेही नाहीं ॥ ९९ ॥ इयेतें हन कोणी देखैल । इयेसी वेखांसें जाईल । तरी युगचि बुडैल । ऐसें जया ॥ ८०० ॥ नायट्यांभेण । न मोडिजे नागांची आण । तैसी पाळी उणखुण । स्त्रियेची जो ॥ १ ॥ किंबहुना धनंजया । स्त्रीचि सर्वस्व जया । आणि तियेचियें जालियें-। लागीं प्रेम ॥ २ ॥ आणिकही जें समस्त । तियेचें संपत्तिजात । तें जीवाहूनि आप्त । मानी जो कां ॥ ३ ॥ तो अज्ञानासी मूळ । अज्ञाना त्याचेनि बळ । हें असो केवळ । तेंचि रूप ॥ ४ ॥ आणि मातलिया सागरीं । मोकललिया तरी । लाटांच्या येरझारीं । आंदोळे जेवीं ॥ ५ ॥ तेवीं प्रिय वस्तु पावे । आणि सुखें जो उंचावे । तैसाचि अप्रियासवें । तळवटु घे ॥ ६ ॥ ऐसेनि जयाचे चित्तीं । वैषम्यसाम्याची वोखंती । वाहे तो महामती । अज्ञान गा ॥ ७ ॥ आणि माझ्या ठायीं भक्ती । फळालागीं जया आर्ती । धनोद्देशें विरक्ती । नटणें जेवीं ॥ ८ ॥ नातरी कांताच्या मानसीं । रिगोनि स्वैरिणी जैसी । राहाटे जारेंसीं । जावयालागीं ॥९॥ तैसी मातें किरिटी । भजती गा पाउटी । करूनि जो दिठी । विषोसूंये ॥८१०॥ आणि भजिन्नलियासवें । तो विषो जरी न पावे । तरी सांडी म्हणे आघवें । टवाळ हें ॥ ११ ॥ कुणबट कुळवाडी । तैसा आन आन देव मांडी । आदिलाची परवडी । करी तया ॥ १२ ॥ तया गुरुमार्गा टेकें । जयाचा सुगरवा देखे । तरी तयाचा मंत्र शिके । येरु नेघे ॥ १३ ॥ प्राणिजातेंसीं निष्ठुरु। स्थावरीं बहु भरु । तेवींचि नाहीं एकसरु । निर्वाहो जया ॥१४॥ माझी मूर्ति निफजवी । ते घराचे कोनीं बैसवी । आपण देवो देवी । यात्रे जाय ॥ १५॥ नित्य आराधन माझें । कांजीं कुळदैवता भजे । पर्वविशेषें कीजे । पूजा आना ॥ १६ ॥ माझें अधिष्ठान घरीं । आणि वोवसे आनाचे करी । पितृकार्यावसरीं । पितरांचा होय ॥१७॥ एकादशीच्या दिवशीं । जेतुला पाडु आम्हांसी । तेतुलाचि नागांसी । पंचमीच्या दिवशीं ॥१८॥ चौथें मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होये । चावदसी

तेवढ्याकरितां कोणाला कसें फसवितो तें पहा. आपल्या आराध्यदेवतेची साधारण वरवर कशीबशी पूजा करतो, गुरूला थापा देऊन ठकवितो व आईबापांनीं पैसे मागितले तर त्यांस 'पैसे शिल्लक नाहींत' म्हणून दैन्य दाखवितो ९६. पण स्त्रीविषयीं म्हटलें कीं, अनेक भोग साधनें जी जी उत्तम वस्तु पाहील, ती ती तिच्या उपभोगाकरितां म्हणून घेऊन येतो ९७. ज्याप्रमाणें प्रेमळ भक्तानें आपल्या इष्ट देवतेस भजावें त्याप्रमाणें जो स्त्रीची एकाग्रचित्तानें उपासना, सेवा करितो ९८. जेवढ्या म्हणून खऱ्या उत्तम व मौल्यवान् वस्तु असतील तेवढ्या सर्वच्या सर्व स्त्रीलाच देतो आणि कुटुंबांतील बाकीच्या माणसांना नुसत्या निर्वाहापुरत्यासुद्धां जिनसा देत नाहीं ९९. हिला [ स्त्रीकडे ] कोणी वांकड्या नजरेनें पाहील किंवा तिच्या मनांविरुद्ध कोणी जाईल, तर ज्याला युगाचा अंतच होईल इतकें वाईट वाटतें ८००. नायटे होतील या भीतीनें ज्याप्रमाणें देवाची शपथ मोडीत नाहींत किंवा नागाचे नवस फेडतात. त्याप्रमाणें जो स्त्रीची थुंकी झेलतो, व तिचे मनोगताप्रमाणें वागतो १. अर्जुना ! फार काय सांगावें !! ज्याला सर्वस्वी काय ते एक स्त्री हीच असते व जो तिजपासून झालेल्या [ पुत्रादिकां ] वर विशेष प्रेम करित असतो २. आणखी तिचे जेवढे आप्तसंबंधीं चीज वस्तु असतील त्यास आपल्या जिवापेक्षां अधिक जवळच्या समजतो ३. तो अज्ञानाचें मूळ आहे व त्याच्याचमुळें अज्ञानाला बळ असते. हे बोलणें राहूं दे. तो केवळ अज्ञानरूपच होय ४. [ **असमचित्तत्वं** ] ज्याप्रमाणें खवळलेल्या समुद्रांत घातलेली नौका लाटांच्या येण्याजाण्यामुळे हेलकावे खाते ५. त्याप्रमाणें जो आवडती वस्तु प्राप्त झाली असतां सुखामुळें गर्वाच्या शिखरावर चढतो व नावडती वस्तु मिळाली असतां संकोच पावून खालीं आपटतो ६. त्याप्रमाणें हे महाबुद्धिमंत अर्जुना ! ज्याचे चित्तांत वस्तूच्या लाभालाभांपासून, भल्या-बुऱ्यापासून सम-विषमभाव वा चिंता उत्पन्न होते तो अज्ञानी होय ७. [ **व्यभिचारिणी भक्तिः** ] आणि कधीं तो माझी भक्ति करतो, पण मनांत फलाची तीव्र इच्छा धरतो. जसें धन मिळविण्याचा हेतू मनांत ठेवून ठक मनुष्य बाह्यात्कारी विरक्तीचें सोंग आणतो ८. किंवा व्यभिचारणी स्त्री आपलें जारकर्म चालविण्याकरितां पतीच्या पुढें पुढें करून त्याचेवर खोटें प्रेम दाखवून त्याची मर्जी संपादिते ९. त्याप्रमाणें हे किरीटी ! जो माझी भक्ति करतो व त्या भजनाची पायरी म्ह० साधन करून विषय प्राप्तीस साध्य समजून विषयाकडे दृष्टि ठेवतो ८१० आणि विषयप्राप्तीकरितां मला भजल्याबरोबर अपेक्षित विषयप्राप्ति झाली नाहीं तर तो माझी भजनभक्ति सोडून देतो व "ईश्वर, ईश्वरभक्ति वगैरे सर्व खोटें आहे" अशी माझी टवाळी करतो ११. कुणबी जशी आपली शेती निरनिराळी पिकें काढून वाढवितो तसा हा अज्ञानी दररोज नव्या नव्या देवांची स्थापना व भक्ति करितो व पहिल्यादेवाप्रमाणेंच दुसऱ्या देवांचीहि परवड करितो १२. ज्याचें ठिकाणीं विशेष थाटमाट आहे असे पाहतो त्या गुरु संप्रदायावर श्रद्धा भक्ति ठेवतो व त्याजपासून गुरुमंत्र घेतो व इतरांचा घेत नाहीं १३. यच्चयावत् प्राणिमात्राबरोबर निर्दयपणानें, कठोरतेची वागणूक करतो व पाषाणाच्या मूर्तीवर विशेष प्रेम करतो तसेच ज्याच्या वागण्याला व भक्तीला एकनिष्ठपणा असा मुळींच नसतो १४. माझी मूर्ति तयार करतो व तिची घरच्या एका कोपऱ्यांत स्थापना करितो आणि आपण मात्र इतर देवदेवतांच्या यात्रा करीत हिंडतो १५. रोज माझी पूजा करणें अवश्य असतां ती सोडून कार्यप्राप्तीकरितां कुळदेवतेची पूजा करतो आणि एखादी विशेष पर्वणी आली असतां तिसऱ्याच देवतेची पूजा करितो १६. माझी घरांत स्थापना केलेली असतांना दुसऱ्या देवाला नवस करितो किंवा इतर देवतांची व्रतें करतो व श्राद्धकाळीं पितरांची पूजा करणारा पितृभक्त होतो १७. एकादशीच्या दिवशीं जेवढ्या आदरानें माझी भक्ति करतो तेवढ्याच आदरानें नागपंचमीच्या दिवशीं नागास भजतो १८. गणेशचतुर्थीचा नेमका दिवस उगवल्यावर गणपतीचीच पूर्ण भक्ति करणारा भक्त होतो व चतुर्दशीचें दिवशीं देवीचे पूजन करून 'हे अंबे दुर्गे !' मी तुझाच आहे, अशी मनोभावानें प्रार्थना करितो १९.

१ दरिद्रता. २ विषयी. ३ आणतो. ४ चांगली. ५ प्रेमळ. ६ सांभाळ, भागवणूक, कसा तरी निर्वाह. ७ विरुद्ध. ८ नायटा होईल या भयानें. ९ मनोगत, इच्छा. १० पुत्रादिकांवर, आप्तसंबंध. ११ खवळलेल्या. १२ नाव, होडी. १३ डगमगते, हेलकावे खाते. १४ तळ, बुड. १५ लाभालाभाची. १६ चिंता. १७ इच्छा. १८ व्यभिचारिणी. १९ रीत, पद्धत. २० घालतो, ठेवितो. २१ लबाड, खोटें, झूट. २२ प्रकार. २३ थाटमाट, [illegible]पण. २४ पाषाणादि प्रतिमेवर. २५ एकनिष्ठपणा. २६ कार्यापुरते २७ दुसऱ्याची. २८ स्थापना. २९ नवस. ३० श्राद्धकाळीं. ३१ भक्ति. ३२ गणेशचतुर्थी. ३३ चतुर्दशीच्या दिवशीं.

म्हणे माये । तुझाचि वो दुर्गे ॥ १९ ॥ नित्य नैमित्तिकें कर्मे सांडी । मग बैसे नवचंडी । आदित्यवारीं वोढी । बहिरवां पात्रीं ॥ ८२० ॥ पाठीं सोमवार पावे । आणि बेलेंसी लिंगा धांवे । ऐसा एकलाचि आघवे । जोगावी जो ॥ २१ ॥ ऐसा अखंड भजन करी । उगा नोहे क्षणभरी । अवघेनें गांवद्वारीं । अहेव जैसी ॥ २२ ॥ ऐसेनि जो भक्तु । देखसी सैरा धांवतु । जाण अज्ञानाचा मूर्तु । अवतार तो ॥२३॥ आणि एकांतें चोखटें । तपोवनें तीर्थे तटें । देखोनि जो गा विटे । तोहि तोचि ॥२४॥ जया जनपदीं सुख । गजबजेचें कवतिक । वानूं आवडे लौकिक । तोहि तोची ॥२५॥ आणि आत्मा गोचरु होये । ऐसी जे विद्या आहे । ते आइकोनि डोरें वाहे । विद्वांसु जो ॥२६॥ उपनिषदांकडे न वचे । योगशास्त्र न रुचे । अध्यात्मज्ञानीं जयाचें । मनचि नाहीं ॥ २७ ॥ आत्मचर्चा एकी आथी । ऐसिये बुद्धीची भिंती । पाडूनि जयाची मती । वोढाळ जाहली ॥ २८ ॥ कर्मकांड तरी जाणे । मुखोद्गत पुराणें । ज्योतिषीं तो म्हणे । तैसेंचि होय ॥ २९ ॥ शिल्पीं अति निपुण । सूपकर्मीही प्रवीण । विधि आथर्वण । हातीं आथी ॥८३०॥ कोकीं नाहीं ठेलें । भारत केंरी म्हणितलें । आगम आफाविले । मूर्त होतीं ॥ ३१ ॥ नीतिजात सुझे । वैद्यकही बुझे । काव्यनाटकीं दुजें । चतुर नाहीं ॥ ३२ ॥ स्मृतींची चर्चा । दंशु जाणे गारुडियाचा । निघंटु प्रज्ञेचा । पाइकी करी ॥ ३३ । पैं व्याकरणीं चोखडा । तर्कीं अतिगाढा । परी एक आत्मज्ञानीं फुडा । जात्यंधु जो ॥ ३४ ॥ तें एकवांचूनि आघवां शास्त्रीं । सिद्धांत निर्माणधात्री । परी जळो तें मूळनक्षत्रीं । न पाहें गा ॥३५॥ मोराआंगीं अशेषें । पिसें असतीं डोळसें । परी एकली दृष्टि नसे । तैसें तें गा ॥ ३६ ॥ जरी परमाणूएवढें । संजीवनीमूळ जोडे । तरी बहु काय गाडे । भरणें येरें? ॥ ३७ ॥ आयुष्येंवीण लक्षणें । सिसेंवीण अळंकरणें । वोहरेंवीण वाधावणें । तो विटंबु गा ॥ ३८ ॥ तैसें शास्त्रजात जाण । आघवेंचि अप्रमाण । पार्था अध्यात्मज्ञानेंवीण । एकलेनी ॥ ३९ ॥ यालागीं अर्जुना पाहीं । अध्यात्मज्ञानाच्या ठायीं । जया नित्यबोधु नाहीं । शास्त्रमूढा ॥ ८४० ॥ तया शरीर जें जालें । तें अज्ञानाचें बीं विरूढलें । तयाचें व्युत्पन्नत्व गेलें । आज्ञानवेलीं ॥४१॥ तो जें जें बोले । तें अज्ञानचि फुललें । तयाचें पुण्य जें फळलें । तें अज्ञान

नित्यनैमित्तिक कर्मे अवश्य केली पाहिजेत. तीं टाकून देतो आणि मग नवरात्रांत नवचंडीचा पाठ एके जागीं बसून करितो; आदित्यवार आला म्हणजे बहिरोबाच्या नांवानें खिचडा वाटतो ८२०. नंतर सोमवार आला म्हणजे बेल घेऊन शिवपिंडीस वाहण्याकरितां धांवतो व याप्रमाणें जो एकटाच सर्व देवांची कशी तरी सेवा, भक्ति करितो २१. गांवाच्या वेशींत पाल ठोकून बसलेली वेश्या ही ज्याप्रमाणें अखंड सौभाग्यवतीच राहते. त्याप्रमाणें जो क्षणभरहि स्वस्थ बसत नाहीं विषयप्राप्तीकरितां असतील त्या सर्व देवांची अखंड पूजा, भक्ति करितो २२. याप्रमाणें जो देवांची भक्ति करीत वाटेल तसा चोहोंकडे धांवत असल्याचे पाहशील तो अज्ञानाचा मूर्तिमन्त अवतारच होय; असें समज २३. [ **अविविक्तदेशसेवित्वम्** ] आणि उत्तम पवित्र एकांतस्थानें, तपोवनें, तीर्थें व पवित्र नद्यांची तटें हीं पाहून ज्याचें मन विटतें; तोहि केवळ अज्ञानरूपच होय २४. [ **जनसंसदि अरतिः** ] ज्याला लोकसमुहांत राहण्यानें सुख वाटतें, पुष्कळ मंडळींत बसण्याचें व लोक गलबल्याचें कौतुक वाटतें व लौकिकांतील गोष्टीचें वर्णन सांगण्याची हौस वाटतें; तोहि केवळ अज्ञानरूपीच होय. २५. [ **अध्यात्मज्ञान नित्यत्वाभावः** ] आणि जी अशा प्रकारची विद्या आहे, कीं ज्या विद्येपासून आत्म्याचा यथार्थ साक्षात्कार होतो, ती ऐकून जो विद्वान् ब्रह्मविद्येची उपाहासानें निंदा करतो २६. उपनिषदांकडे जो प्रवृत्तच होत नाहीं, योगशास्त्र ज्याला आवडत नाहीं व अध्यात्मज्ञानाकडे ज्याचें लक्षच लागत नाहीं २७. आत्मानात्मनिरूपण होते म्हणून कांहींएक परम हितकर साधन आहे, अशा बुद्धीच्या समजुतीची भिंत-मर्यादा पाडून ज्याची मती इतर सर्व शास्त्रांकडे ओढ घेते वा स्वैरपणें भटकते २८. जो कर्मकांड पूर्णपणें जाणतो, ज्याला पुराणें मुखोद्गत आहेत आणि ज्योतिषांत तर इतका निपुण आहे कीं, तो म्हणेल, भविष्य वर्तवील तसेंच व्हावयाचें ! २९. जो कलाकौशल्य शास्त्रांत अति निष्णात असतो, पाकक्रिया शास्त्रांत प्रवीण असतो आणि आथर्वण विधि म्हणजे म्ह. जारण-मारण, उच्चाटन व वशीकरण ही त्यास हस्तगत झालेलीं असतात ८३०. कामशास्त्रांत ज्यास जाणावयाचें असें कांहींहि राहिले नाहीं. आणि भारत तर त्याला सहजच हस्तगत व पाठ असते व शास्त्रेंहि ज्यास मूर्तिमन्त हस्तगत झालेली असतात ३१. जो सर्व नीतिशास्त्रें उत्तम जाणतो, वैद्यकशास्त्रातहि जो निपुण असतो आणि काव्यनाटकांत त्याच्याहून दुसरें कोणीहि चतुर नाहीं ३२. स्मृतीचीं जो चर्चा करितो, गारोड्याच्या मंत्रविद्येचे रहस्य जाणतो, वेदांतील शब्दांचा कोश तर जणुं काय याच्या बुद्धीचा सेवकच ! ३३. आणखी जो व्याकरणांत निपुण असतो व न्यायशास्त्रांत ज्याच्या प्रज्ञेची गति अप्रतिहतपणें असतें; परंतु इतकें असले तरी एक आत्मज्ञानाविषयीं जो खरोखर जन्मांध आहे ३४. तो त्या एका अध्यात्मज्ञानाशिवाय इतर सर्व शास्त्रांतील सिद्धांतांना निर्माण होण्याची आधारभूमीच असला तरी पण जळों तें त्याचें ज्ञान ! तें म्हणजे सर्व लक्षणांनी संपन्न असलेल्या पण मूळ नक्षत्रावर जन्मलेल्या मुलास जसें आईबापांनी पाहूं नये तसें तूं तिकडे मुळींच लक्ष देऊं नकोस ३५. ज्याप्रमाणें मोराच्या सर्वांगावरील पिसाऱ्यावर डोळे असतात. परंतु एक दृष्टि नसतें [ त्यामुळें पिसाऱ्यावरील डोळ्यांचा कांहींच उपयोग नसतो. ] त्याप्रमाणें त्याची ती सर्व विद्यासंपन्नता निरूपयोगी होय ३६. मेलेल्या मनुष्यास जिवंत करणारी संजीवनी मुळी जर परमाणुएवढीहि मिळाली तर मग इतर वनस्पतींच्या गाडाभर मुळ्या काय करावयाच्या आहेत ? ३७. जसें आयुष्याविना इतर उत्तम लक्षणें आहेत, किंवा मस्तकाशिवाय [ केवळ धडास ] अलंकार घालावेत अथवा वधूवर असल्यावांचून वरधावा काढणें ही जशी केवळ विटंबना होय ३८. त्याप्रमाणें पार्था ! एका अध्यात्मज्ञानावांचून इतर सर्व शास्त्रें अप्रमाण होत, असें तूं समज ३९. यास्तव अर्जुना ! तूं हें ध्यानांत धर कीं, ज्या शास्त्रमूढाला, पढतमूर्खाला अध्यात्मज्ञानाविषयीं नित्यावबोध नाहीं ८४०. त्या मनुष्याला जे शरीर प्राप्त झालें तें अज्ञानाचें जणुं बीजच अंकुरित झालें आहे आणि त्याची व्युत्पन्नता, विद्वत्ता म्हणजे अज्ञानाच्या वेलीच होत ४१. तो जें जें बोलतो, तें अज्ञानाचें फूलच [ निव्वळ प्रदर्शनच ] होय;

१ नवरात्र चंडीपाठादि करावयास. २ खिचडा वांटतो. ३ समजावितो. ४ सर्व प्रकारें. ५ अखंड सौभाग्यवती वेश्या. ६ चोहोंकडे. ७ मनुष्यवस्तींत. ८ प्रत्यक्ष. ९ भराड्याचें वाजविण्याचें वाद्य, तद्वत् बडबड करितो. १० आत्मानात्मनिरूपण. ११ मनसोक्त वागणारी. १२ कलाकौशल्यांत. १३ पाककर्मांत. १४ जारण, मारण, उच्चाटन व वशीकरण. १५ अथर्वण वेदप्रतिपादक. १६ कामशास्त्रांत. १७ व्याख्यान करितो. १८ शास्त्र. १९ आपलेसें केलें. २० समजतो. २१ जाणतो. २२ मर्म, रहस्य. २३ कोश. २४ बुद्धीचा. २५ चाकरी. २६ न्यायशास्त्री. २७ पुरा. २८ खरा.

गा ॥ ४२ ॥ आणि अध्यात्मज्ञान कांहीं । जेणें मानिलेंचि नाहीं । तो ज्ञानार्थु न देखे काई । हें बोलावें असें ? ॥ ४३ ॥ ऐलीचि थडी न पवतां । पळे जो माघौता । तया पैलंद्वीपींची वार्ता । काय होय ? ॥ ४४ ॥ कां दौरवंठाचि जयाचें । शीर रोंविलें खांचे । तो केवीं परिवेरींचें । ठेविलें देखे ? ॥ ४५ ॥ तेवीं अध्यात्मज्ञानीं जया । अनोळख धनंजया । तया ज्ञानार्थु देखावया । विषो काई ? ॥ ४६ ॥ म्हणौनि आतां विशेषें । तो ज्ञानाचें तत्त्व न देखे । हें सांगावें आंखेंलेखें । न लगे तुज ॥ ४७ ॥ जेव्हां सगर्भे वाढिलें । तेव्हांचि पोटींचें धालें । तैसें मागिलें पदें बोलिलें । तेंचि होय ॥ ४८ ॥ वांचूनियां वेगळें । रूप करणें हें न मिळे । जेवीं अवंतिलें आंधळें । तें दुजेनसीं ये ॥ ४९ ॥ एवं इयें उपरतीं । अज्ञानचिन्हें मागुती । अमानित्वादि प्रभृती । वाखाणिलीं ॥ ८५० ॥ जें ज्ञानपदें अठरा । केलियां येरी मोहरां । अज्ञान या आकारा । सहजें येती ॥ ५१ ॥ मागां श्लोकाचेनि अर्धार्धें । ऐसें सांगितलें श्रीमुकुंदें । ना उफराटीं इयें ज्ञानपदें । तेंचि अज्ञान ॥ ५२ ॥ म्हणौनि ईया वाहणीं । केली म्यां उपलवणी । वांचूनि दुधा मेळऊनि पाणी । फार कीजे ? ॥ ५३ ॥ तैसें जी न बडबडीं । पदाची कोर न सांडी । मूळध्वनींचिये वाढी । निमित्त जाहलों ॥ ५४ ॥ तंव श्रोते म्हणती राहें । कें परिहारा ठावो आहे ? । बिहिसी कां वायें । कविपोषका ? ॥ ५५ ॥ तूतें श्रीमुरारी । म्हणितलें आम्ही प्रगट करीं । जें अभिप्राय गव्हरीं । झांकिलें आम्हीं ॥ ५६ ॥ तें देवाचें मनोगत । दावित आहासी तूं मूर्त । हेंही म्हणतां चित्त । दाटैल तुझें ॥ ५७ ॥ म्हणौनि असो हें न बोलों । परि सावियां गा तोषलों । जे ज्ञानतरिये मेळविलों । श्रवणें सुखाचिये ॥ ५८ ॥ आतां इयावरी । जे तो श्रीहरी । बोलिला तें करीं । कथन वेगां ॥ ५९ ॥ इया संतवाक्यासरिसें । म्हणितलें निवृत्तिदासें । जी अवधारा तरी ऐसें । बोलिलें देवें ॥ ८६० ॥ म्हणती तुवां पांडवा । हा चिन्हसमुच्चयो आघवा । आयकिला तो जाणावा । अज्ञानभागु ॥ ६१ ॥ इया अज्ञानविभागा । पाठी देऊनि पैं गा । ज्ञानविखीं चांगा । दृढा होईजे ॥ ६२ ॥ ॥ मग निर्वाळिलेनि ज्ञानें । ज्ञेयें भेटेल मनें । तें जाणावया अर्जुनें । आस केली ॥ ६३ ॥ तंव सर्वज्ञांचा रावो । म्हणे जाणौनि तयाचा भावो । परिसें ज्ञेयाचा अभिप्रावो । सांगों आतां ॥ ६४ ॥

त्याचीं जी पुण्यकर्में आहेत तें अज्ञानाचें फल होय. ४२. [ **तत्त्वज्ञानार्थदर्शनाभावः** ] आणि ज्यानें आध्यात्मज्ञान कधीं श्रद्धेने मानलेच नाहीं, त्याला ज्ञानार्थ [ तत्त्वार्थ परब्रह्म ] म्हणजे काय हे मुळीच कळणार नाहीं, हें बोलूनच दाखविलें पाहिजे काय? ४३. नदीच्या अलीकडील कांठापर्यंतहि न येतां जो माघारीं पळून जातो, त्याला पलीकडच्या कांठची बातमी कशी बरें कळेल? ४४. किंवा घरांत शिरतांना उंबऱ्यांतच ज्याचें मस्तक खांचेंत दडपलें गेलें. तो घरांत काय ठेवलें आहे हें कसें पाहील? ४५. त्याप्रमाणें अर्जुना! अध्यात्मज्ञानाची ज्याला मुळीं तोंडओळखहि नाहीं. त्याला ज्ञानार्थ [ तत्त्वार्थ परब्रह्म ] पहावयास [ आत्मत्वानें जाणण्यास ] विषय होईल काय? ४६. म्हणून असा मनुष्य ज्ञानाचें तत्त्व जाणूं शकत नाहीं, हें तुला विशेषेंकरून खडे, आंकडे मांडून सांगण्याचें कारण नाहीं ४७. गरोदर स्त्रीला जेवावयास वाढलें तेव्हांच तिच्या उदरांतील गर्भाची तृप्ति झाली, त्याप्रमाणें पूर्वीं जीं ज्ञानाची लक्षणें सांगितलीं त्यांतच तद्विरुद्ध ज्या गोष्टी असतील तेंच अज्ञान होय, [ अशी लक्षणें सांगितल्यासारखीच झाली ] ४८. आंधळ्यास जेवणाचें आमंत्रण दिल्यावर ज्याप्रमाणें त्याबरोबर दुसरा डोळस वाटाड्या मनुष्य येतोच, त्याप्रमाणें ज्ञानाची लक्षणें सांगितल्यावर अज्ञानाचेंहि लक्षण आपोआप सांगितलें असें होतेंच ४९. याप्रमाणें 'अमानित्वा'दि ज्ञानचिन्हें, पुनः त्याच्या उलट रीतीनें हीं अज्ञानाची लक्षणें सांगितलीं, ८५०. अर्थात् तीं ज्ञानाचीं अठरा लक्षणें उलटपक्षीं लाविलीं असतां अज्ञानाची लक्षणें सिद्ध होतात ५१. मागें [ याच अध्यायांतील अकराव्या ] श्लोकाच्या उत्तरार्धाच्या दुसऱ्या अर्धामध्यें श्रीमुकुंदांनीं असें सांगितलें कीं, "ही ज्ञानपदें-ज्ञानाचीं लक्षणें, होत आणि यांचे उलट असलेली जीं लक्षणें तेंच अज्ञान होय" ५२. म्हणूनच या प्रकारानें मी अज्ञान लक्षणांचा विस्तार केला. नाहींतर दुधांत पाणीं मिळवून दूध वाढवून काय करावयाचें? ५३. त्याप्रमाणें महाराज! मी कांहीं व्यर्थ बडबड केली नाहीं, श्लोकांतील पदांच्या अर्थमर्यादेची कोर सोडली नाहीं, परंतु मूळ श्लोकांत जो ध्वनितार्थ होता, त्याच्या विस्तारात्मक वर्णनास मी निमित्त झालों ५४. तेव्हां श्रोते म्हणतात पुरे! थांब!! हे कविपोषका! तुला परिहारास वाव कोठें आहे? असें उगीच कां भितोस [ कारण, परिहार देण्यासाठीं काय अपराध केला आहे! तर कांहींच नाहीं ] ५५. तुला श्रीमुरारींनींच सांगितलें आहे कीं, 'आम्हीं जें अभिप्राय गीतारूपीं गुप्तस्थळीं झांकून ठेविले आहेत, तें तूं प्रकट कर' ५६. हें जे देवाचें मनोगत तें आम्हांला सांगून तूं स्पष्ट करून दाखवित आहेस, असें जरी आम्हीं म्हटलें, तरी तुला त्यापासून चित्त दाटून गहिंवर येईल! ५७. म्हणून आम्हीहि आतां हे बोलत नाहीं; पण आम्हांस सहजच फार संतोष झाला आहे. कारण कीं, सध्यां तूं श्रवणसुखाची ज्ञाननौका आम्हांस प्राप्त करून दिलीस ५८. तर आतां यापुढें "श्रीहरी काय बोलले तें आम्हांस लवकरच कथन कर" ५९. हें संतांचें वाक्य ऐकल्याबरोबर श्रीनिवृत्तिदास श्रीज्ञानदेव म्हणाले, तर ऐका महाराज. देव असें बोललें:–८६०. तर देव म्हणाले, अर्जुना! हा जो तूं सर्व लक्षणांचा समुदाय ऐकलास तो अज्ञानाचा भाग आहे, असे समज ६१. ह्या अज्ञानभागाकडे पाठ फिरवून–दुर्लक्ष करून तूं ज्ञानप्राप्तीविषयीं आपला चांगला दृढनिश्चय करणारा हो! ६२. मग त्या शुद्ध ज्ञानाच्या योगानें तुला ज्ञेयाची [ ब्रह्माची ] अंतःकरणांत आत्मत्वानें भेट होईल. हे ऐकतांच अर्जुनास ते ज्ञेयस्वरूप जाणण्याविषयीं मनःपूर्वक इच्छा निर्माण झाली ६३. तेव्हां सर्वज्ञांचा राजा जो भगवान् श्रीकृष्ण यानें अर्जुनाच्या मनांतील भाव जाणून त्यास म्हटलें कीं, आतां तुला ज्ञेयाचे लक्षण, स्वरूप काय तें सांगतों, ऐक ६४.

१ परतीची. २ उंबऱ्यांत. ३ दडपलें. ४ खांचेंत. ५ आवारांतलें घरींचें. ६ विषय. ७ आंकडे मांडून. ८ तृप्त झालें. ९ आमंत्रणानें बोलाविलें. १० त्याच्या उलट रीतीनें. ११ उलटपक्षीं. १२ अशा प्रकारें. १३ विस्तार. १४ कडा, कांठ, मर्यादा. १५ करण्याला. १६ व्यर्थ कां भितोस? १७ गुप्त स्थळीं. १८ भरून, गहिंवरून येईल. १९ सर्वथा. २० ऐकण्यास सुखकारक अशी ज्ञाननौका आम्हांस प्राप्त झाली. २१ लक्षणसमुदाय. २२ शुद्ध. २३ जाणण्यास योग्य.

ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते । अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥

तरि ज्ञेय ऐसें म्हणणें । वस्तूतें येणेंचि कारणें । जें ज्ञानेंवांचूनि कवणें । उपायें नये ॥ ६५ ॥ आणि जाणितलेयावरौतें । कांहींच करणें नाहीं जेथें । जाणणेंचि तन्मयातें । आणी जयाचें ॥ ६६ ॥ जें जाणितलेंयासाठीं । संसारें काढूनियां कांठीं । जिरोनि जाइजे पोटीं । नित्यानंदाच्या ॥ ६७ ॥ तें ज्ञेय गा ऐसें । आदि जया नसे । परब्रह्म आपैसें । नाम जया ॥ ६८ ॥ जें नाहीं म्हणों जाईजे । तंव विश्वाकारें देखिजे । आणि विश्वचि ऐसें म्हणिजे । तरि हे माया ॥ ६९ ॥ रूप वर्ण व्यक्ती । नाहीं दृश्य द्रष्टा स्थिती । तरि कोणें कैसें आथी । म्हणावें पां ॥ ८७० ॥ आणि साचचि जरी नाहीं । तरि महदादि कोणें ठाईं । स्फुरत कैचें काइ । तेणेंवीण असे ? ॥ ७१ ॥ म्हणौनि आथी नाथी हे बोली । जें देखोनि मुकी जाहली । विचारेंसी मोडली । वाट जेथें ॥ ७२ ॥ जैसीं भांडघटशरावीं । तदाकारें असे पृथ्वी । तैसें सर्व होऊनियां सर्वीं । असे जे वस्तु ॥ ७३ ॥

सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् । सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥

आघवांचि देशीं काळीं । नव्हतां देशकाळांवेगळी । जे क्रिया स्थूळास्थूळीं । तेचि हात जयाचे ॥ ७४ ॥ तयातें याकारणें । विश्वबाहु ऐसें म्हणणें । जें सर्वांचि सर्वपणें । सर्वदा करी ॥ ७५ ॥ आणि समस्तांही ठाया ! एके काळीं धनंजया । आलें असे म्हणौनि जया । विश्वांघ्रिनाम ॥ ७६ ॥ पैं सवितेंया आंग डोळे । नाहींत वेगळे वेगळे । तैसें सर्वद्रष्टे सकळें । स्वरूपें जें ॥ ७७ ॥ म्हणौनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षूच्या ठायीं पक्षु । बोलावया दक्षु । जाहला वेदु ॥ ७८ ॥ जें सर्वांचें शिरावरी । नित्य नांदे सर्वांपरी । ऐसिये स्थितीवरी । विश्वमूर्धा म्हणिपे ॥ ७९ ॥ पैं गा मूर्ति तेंचि मुख । हुताशना जैसें देख । तैसें सर्वपणें अशेख । भोक्ते जे ॥ ८८० ॥ यालागीं तया पार्था । विश्वतोमुख हे व्यवस्था । आली वाक्पथा । श्रुतीचिया ॥ ८१ ॥ आणि वस्तुमात्रीं गगन । जैसें असे संलग्न । तैसें शब्दजातीं कान । सर्वत्र जया ॥ ८२ ॥ म्हणौनि आम्हीं तयातें । म्हणों सर्वत्र आइकतें । एवं जें सर्वांतें । आवरूनि असे ॥ ८३ ॥ ऐऱ्हवीं तरी महामती । विश्वतश्चक्षु इया

**अन्वयार्थ**--**यत् ज्ञेयं**-जें-ज्ञेय-**तत्**-तें-**प्रवक्ष्यामि** मी सांगतों--**यत् ज्ञात्वा**-जें जाणून-**अमृतम्**-अमरण-भावास-**अश्नुते**-प्राप्त होतो-**अनादिमत्**-जें आदिमत नसलेलें- **परं ब्रह्म**-निरतिशय ब्रह्म तें ज्ञेय होय-**तत्**-तें-**न सत्**-सत् म्हटलें जात नाहीं-**न असत् उच्यते**-व असत् म्हटलें जात नाहीं १२.

हें पहा, ज्ञेय म्हणजे परमात्मवस्तु. त्याला ज्ञेय म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, तें ब्रह्मात्मैक्यज्ञानाशिवाय दुसऱ्या इतर कोणत्याहि उपायानें प्राप्त होत नाहीं ६५. आणि तें [ब्रह्म आत्मत्वानें] समजल्यावर मुमुक्षूस कांहींहि कर्तव्य उरत नाहीं. कारण, ज्याचें ज्ञानच जाणणाऱ्या मुमुक्षूला तद्रूपतेला आणतें [ तें जाणल्याबरोबर तो तद्रूपच होतो ] ६६. जें ज्ञेय जाणलें असता मुमुक्षुंनीं संसाराला काठावर ठेवून म्ह. संसाराचा निरास करून नित्यानंदांत निमग्न व्हावें ६७. तें ज्ञेय असें आहे कीं, त्याला आदि, उत्पत्ति नाहीं आणि त्याला सहजच 'परब्रह्म' हें नांव आहे ६८. तें नाहीं म्हणावयास जावें तर विश्वाकाररूपेंकरून दृष्टीस पडतें आणि ते विश्वच परब्रह्म असें म्हणावें, तर [ नामरूपात्मक विश्व ] ही माया आहे ! ६९. त्याला रूप, वर्ण, आकार हीं नाहींत; तसेंच तें दृष्टीस विषय होणारे नाहीं व तें स्वतः कशास पहातहि नाहीं, तेव्हां अशा स्थितींत 'तें आहे' असें कोणी व कसें म्हणावें ? ८७०. बरें, तें खरोखरच नाहीं असें धरून चाललें, तर हीं महत्तत्त्वादिक कोठून स्फुरण पावलीं ! याचा पत्ता लागणार नाहीं आणि त्यावांचून [ सत्ता-स्फुर्तिवान् ] दुसरें आहे तरी काय ! ७१. एका ज्ञेय ब्रह्माव्यतिरिक्त दुसरा पदार्थच नाहीं, असें श्रुति सांगतें अशा अद्वितीय ब्रह्मरूपं ज्ञेयाविषयीं 'आहे', 'नाहीं' असें कांहींच बोलतां येणार नाहीं. कारण, त्यासंबंधी वेदांचीहि वाणी कुंठीत झाली आणि त्याच्या ठिकाणीं विचारांचीहि वाट खुंटली ७२. ज्याप्रमाणें माती पासून तयार केलेलें डेरे, घागरी, परळ इत्यादिमध्यें त्या त्या आकाराप्रमाणें पृथ्वी–माती दिसते [ परंतु त्यांपासून ती निराळी आहे ] त्याप्रमाणें ब्रह्म वस्तु आपणच सर्व जगास अधिष्ठान असून जगांत ओतप्रोत भरलेलें आहे, [ तथापि तें त्याहून भिन्न आहे ] ७३.

१ तदाकारतेस, तद्रूपतेस. २ जाणले असतां. ३ संसाराला कांठावर, तीरावर ठेवून. ४ भासमान झाली, भासली. ५ डेरा, घागर, परळ इत्यादिकांत. ६ सदा सर्वकाळ आणि सर्वत्र. ७ न होतां. ८ स्थूलसूक्ष्मीं. ९ ज्याचे पाय सर्वत्र आहेत असा.

**अन्वयार्थ**—**तत्** तें ज्ञेय-**सर्वतः पाणिपादं**-सर्व बाजूंनीं ज्याला हातपाय आहेत, असें आहे-**सर्वतः अक्षिशिरोमुखं**-सर्व बाजूंनीं ज्याला नेत्र, मस्तकें व मुखें आहेत, असें आहे.-**सर्वतः श्रुतिमत्**-ज्याला सर्व बाजूंनीं श्रवणेंद्रियें आहेत-असें आहे-**लोके**-या प्राणिसमूहांत-**सर्वं**-सर्वांला-**आवृत्य**-व्यापून-**तिष्ठति**-तें तत्त्व रहातें १३.

ज्या अर्थी सत्तास्फूर्तिस्वरूप ज्ञेयच सर्व जगांत सामान्य रूपानें नटलेलें म्ह. व्याप्त आहे त्या अर्थी सर्व देशांत, सर्व कालीं, स्थूल व सूक्ष्म वस्तूंपासून जी क्रिया होते, ती त्याच्याच सत्तेनें होते. कारण, तें सर्वत्र व्यापक आहे, म्हणून क्रियेचे हातहि तेंच आहे, ७४. म्हणूनच त्या परब्रह्माला वेदानें 'विश्वबाहु' असे म्हटलें आहे. कारण कीं, त्याच्याच सत्तेनें सर्वत्र इंद्रियें, सर्व प्रकारें सर्वदा क्रिया करीत असतात. तात्पर्य त्याच्या सत्तामात्रें-करूनच सर्व क्रिया होतात ७५. शिवाय अर्जुना ! तें सर्व ठिकाणीं एकसमयावच्छेदेंकरून असतें, म्हणूनच त्याला वेदांत 'विश्वांघ्रि' हें नांव प्राप्त झालें आहे ७६. ज्याप्रमाणें सूर्याला अंग व डोळे हें अवयव वेगळे वेगळे नाहींत त्याप्रमाणें ब्रह्मवस्तु सर्वाधिष्ठानस्वरूप असल्यानें ती सर्वांस आपल्या स्वप्रकाशानें पाहतें ७७. म्हणूनच त्यास डोळे नाहींत, तरी वेदानें त्याला मोठ्या चातुर्यानें 'विश्वतश्चक्षु' असें म्हटलें आहे ७८. जें सर्वांपेक्षां शिरोभागाप्रमाणें श्रेष्ठ, उंच व सर्व प्रकारें नित्य नांदत आहे म्हणूनच त्याला 'विश्वमूर्धा' असेंहि वेदांत म्हणतात; ७९. हें पहा, अग्नीचे जें स्वरूप तेंच त्याचें मुख होय, त्याचप्रमाणें, जें सर्व व्यापक ब्रह्म सर्व वस्तूंचा उपभोग घेतें ८८०. पार्था ! याच कारणास्तव त्या ब्रह्माला 'विश्वतोमुख' असें श्रुतीच्या बोलण्यांत आलें आहे ८१. आणि आकाश ज्याप्रमाणें सर्व वस्तूंत ओतप्रोत भरलेलें असते त्याप्रमाणें शब्दमात्राबरोबरच त्याचे श्रवण आहेत ८२. म्हणूनच त्या ब्रह्माला आम्ही 'सर्वत्र ऐकणारे' असें म्हणतों, कारण, या जगतांत सर्वांला ओतप्रोत व्यापून आहे ८३. हें महामते अर्जुना ! वास्तविक पाहतां 'विश्वतश्चक्षु' इत्यादि श्रुतींनीं परमात्म्याला अवयव आहेत

१० सूर्याला. ११ सर्वत्र पाहणारे. १२ सर्वत्र डोळे असणारा. १३ शहाणा, समर्थ. १४ सर्व प्रकारें. १५ सर्वांचे डोकीवर राहणारें. १६ अग्नीला. १७ सर्व तोंडें आहेत असा. १८ बोलण्यांत. १९ ओतप्रोत भरलेलें, चिकटलेलें. २० ऐकणारें.

श्रुती । तयाचिया व्याप्ती । रूप केलें ॥ ८४ ॥ वांचूनि हस्त नेत्र पाये । हें भाष तेथ कें आहे ?। सर्व शून्याचा न साहे । निष्कर्षु जें ॥ ८५ ॥ पैं कल्लोळातें कल्लोळें । ग्रसिजत असे ऐसें कळे । परी ग्रासितें ग्रासावेगळें । असे काई ? ॥ ८६ ॥ तैसें साचचि जें एक । तेथ कें व्याप्यव्यापक ? । परी बोलावया नावेंक । करावें लागे ॥८७॥ पैं शून्य जैं दावावें:जाहलें । तैं बिंदुलें एक पाहिजे केलें । तैसें अद्वैत सांगावें बोलें । तैं द्वैत कीजे ॥ ८८ ॥ एऱ्हवीं तरी पार्था । गुरुशिष्यसत्पंथा । आडळु पडे सर्वथा । बोल खुंटे ॥ ८९ ॥ म्हणौनि गा श्रुती । द्वैतभावें अद्वैतीं । निरूपणाची वाहती । वाट केली ॥ ८९० ॥ तेंचि आतां अवधारीं । इये नेत्रगोचरें आकारीं । तें ज्ञेय गा जयापरी । व्यापक असे ॥ ९१ ॥

सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् । असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥

तरी तें गा किरीटी ऐसें । अवकाशीं आकाश जैसें । पटीं पटु होऊनि असे । तंतु जेवीं ॥ ९२ ॥ उदक होऊनि उदकीं । रसु जैसा अवलोकीं । दीपपणें दीपकीं । तेज जैसें ॥ ९३ ॥ कर्पूरत्वें कापुरीं । सौरभ्य असे जयापरी । शरीर होऊनि शरीरीं । कर्म जेवीं ॥ ९४ ॥ किंबहुना पांडवा । सोनेंचि सोनयाचा रवा । तैसें जें या सर्वा । सर्वांगीं असे ॥ ९५ ॥ परी रवेपणामाजिवडे । तंव रवा ऐसें आवेडे । वांचूनि सोनें सांगडे । सोनया जेवीं ॥९६॥ पैं गा वोघुचि वांकुडा । परि पाणी उजू सुहाडा । वन्हि आला लोखंडा । लोह नव्हे कीं ॥९७॥ घटाकारें वेटाळें । तेथ नभ गमे वाटोळें । मठीं तरीं चौफळें । आये दिसे ॥९८॥ तरी ते अवकाश जैसें । नोहिजतीचि कां आकाशें । जें विकार होऊनि तैसें । विकारी नोहे ॥९९॥ मन मुख्य इंद्रियां । सत्त्वादि गुणां ययां । सारिखें ऐसें धनंजया । आवडे कीर ॥ ९०० ॥ पैं गुळाची गोडी । नोहे बांधया सांगडी । तैसीं गुण इंद्रियें फुडीं । नाहीं तेथ ॥ १ ॥ अगा क्षीराचिये दशे । घृत क्षीराकारें असे । परी क्षीरचि नोहे जैसें । कपिध्वजा ॥ २ ॥ तैसें जें इये विकारीं । विकार नोहे अवधारीं । पैं आकारा नाम भोंवरीं । येर सोनें तें सोनें ॥३॥ इया उघड मऱ्हाटिया । तें वेगळेपण धनंजया । जाण गुण इंद्रियां-। पासोनियां ॥ ४ ॥ नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु । हा आकारासीच प्रवादु । वस्तूसि नाहीं ॥५॥ तें गुण नव्हे कहीं । गुणा तया संबंधु नाहीं ।

असें सिद्ध करण्याकरितां केलेले नाहीं, फक्त परमात्म्याचें सर्वव्यापकत्व दाखविण्याचा त्यांचा मुख्य अभिप्राय आहे ८४. वास्तविक ब्रह्म हें सर्व शून्यपणाचा शेवट, निषेधावधीभूत आहे, हाहि सापेक्षभाव जेथें सहन होत नाहीं; त्याच्या ठिकाणीं नेत्र, हात, पाय इत्यादि अवयवांची गोष्टच बोलावयास नको ८५. आता लोकदृष्ट्या एखादी मोठी लाट दुसऱ्या एका लहान लाटेला गिळून टाकते असें दिसतें, परंतु ती ग्रासणारी थोरली लाट त्या ग्रासल्या जाणाऱ्या लहान लाटेपासून पाण्याच्या दृष्टीनें वेगळी आहे काय? ८६. त्याप्रमाणें खरोखरीच जर एकमेवाद्वितीयं ब्रह्मच सर्वत्र घनदाट भरलेलें आहे, तर त्याच्या ठिकाणीं व्याप्यव्यापकभाव तरी कोठून येणार? मग शास्त्र व्याप्यव्यापकभावाचें प्रतिपादन कां करितें? असें म्हणशील तर, शिष्याला यथार्थ बोध होण्याकरितां क्षणभर तसें कल्पित भेद स्वीकारून वर्णन करावें लागतें ८७. ज्याप्रमाणें हिशेब लिहिताना बाकी पूज्य दाखविण्याची वेळ येते त्या वेळेस शून्याबद्दल वर्तुलाकृति एक बिंदुलें काढावे लागते, त्याप्रमाणें अद्वैत शब्दद्वारां स्पष्ट करून सांगावयाचें म्हटलें म्हणजे द्वैताचा स्वीकार करूनच तसें स्पष्टीकरण करावें लागतें ८८. नाहींतर अर्जुना! गुरुशिष्यसंप्रदायरूप सन्मार्गास अडथळा येऊन तो चहूंकडे बंद पडेल; आणि अद्वैताविषयीं सर्व भाषणच बंद होईल ८९. म्हणून श्रुतींनीं द्वैताच्या साहाय्यानें अद्वैताचें प्रतिपादन करण्याचा राजमार्ग वाहता-सुरू केला ८९०. तेव्हां आतां आपल्या नेत्रांनीं जो दृश्य आकार दिसतो, त्यांत तें ब्रह्म कसें व्यापक आहे, तेंच ऐक ९१.

**अन्वयार्थ**—**सर्वेन्द्रियगुणाभासं**–ज्याचा अवभास–प्रकाश सर्व इन्द्रियांच्या गुणांनीं होतो, पण जें वस्तुत:–**सर्वेन्द्रियविवर्जितं**–सर्व इन्द्रियांनीं रहित आहे, त्यामुळें–**असक्तं**–कोठेंहि आसक्त न झालेलें–**च एव**–तथापि–**सर्वभृत्**–सर्वांला धारण करणारें, सर्वांचें अधिष्ठान–**निर्गुणं**–तें गुणरहित आहे–**च**–पण–**गुणभोक्तृ**–गुणांचा–सुख, दु:ख व मोह या कार्याचा भोग घेणारें असें तें ज्ञेय आहे १४.

हें पहा अर्जुना! तें ब्रह्म असें आहे कीं, ज्याप्रमाणें अवकाशांत–पोकळींत सर्व आकाश भरलेलें असतें, किंवा तंतु हे वस्त्रामध्यें वस्त्ररूप होऊन असतात ९२. हें बघ, रस ज्याप्रमाणें उदकामध्यें उदकरूप होऊन असतो, तेज ज्याप्रमाणें दीपामध्यें दीपपणानें राहात असते ९३. सुगंध जसा कर्पुरत्वाच्या रूपानें कापुरांत भरलेला असतो व क्रिया शरीराच्या रूपानें शरीरांत दृष्टीस पडते ९४. फार काय सांगावें! अर्जुना! ज्याप्रमाणें सोन्याचा तुकडा किंवा सोन्याचा अलंकार सोन्याच्याच रूपानें दृष्टीस पडतो, त्याप्रमाणें जें या सर्व जगाचें आदिकारण असून तेंच सर्वांत सर्वरूपानें दृष्टीस पडतें ९५. सोनें ज्या वेळेस रव्याच्या–तुकड्याच्या रूपानें दृष्टीस पडतें; त्या वेळेस आपल्यास तो रवा, तुकडा आहे असें वाटतें, परंतु सोनें या दृष्टीनें पाहूं गेलें असतां तो रवा सोनेंच होय ९६. अरे! अर्जुना! पाण्याचा ओघ वांकडा असला म्हणजे पाणी वांकडे दिसते, परंतु पाणी खरोखर वांकडे नसते तर सरळच असते; लोखंड तापवून लाल दिसूं लागलें तरी तें लोखंडच आहे, अग्नि नव्हे ९७. घटाच्या आकारानें वेटाळलेले आकाश वाटोळें दिसतें व तेंच घराचे चौकांत सांपडलेले आकाश पाहिलें म्हणजे ते चौकोनी दिसतें ९८. परंतु तोच मठ व घट नाश पावल्यावर त्यांतील आकाशाचा नाश होत नाहीं, किंवा तत्वत: आकाश वाटोळे वा चौफळें झालेच नाहीं, त्याप्रमाणें जें ब्रह्म मायेच्या उपाधीनें विश्वमय होते, परंतु ब्रह्म मात्र विकारी झालेले नसते ९९. अर्जुना! तें ब्रह्म, मन ज्यांत मुख्य आहे त्या इन्द्रियाप्रमाणें व सत्त्वादि गुणांप्रमाणें आकारास आलें आहे असा केवळ भास मात्र होतो खरें; ९००. परंतु ज्याप्रमाणें गुळाची गोडी ही गुळाच्या ढेपेंतच असते; पण ती गोडी त्या ढेपेच्या आकाराची झालेली नसते, त्याप्रमाणें इन्द्रियें व गुण हें खरोखर ब्रह्माचें ठिकाणीं नाहींतच १. हे कपिध्वजा! ज्याप्रमाणें दुधाच्या अवस्थेंत तूप दुधाच्या आकारानें असतें, परंतु तें दूध म्हणजेच तूप नव्हे २. त्याप्रमाणें जें ब्रह्म विकाररूप विश्वांत भरलेलें असून तें ब्रह्म, विकार [ नामरूपात्मक विश्व ] नव्हे. कारण, सुवर्णाचे अलंकार बनविल्यावर त्या आकारास आपण बुगडी, वांकी अशी नांवें देतों, बाकी सुवर्णदृष्टीनें सोनें तें सोनेंच! ३. याप्रमाणें मी तुला समजेल अशा उघड मराठी भाषेंत सांगावयाचें म्हटले तर अर्जुना! ब्रह्म हें गुण व इंद्रियें यांपासून वेगळेपणानें आहे असें समज ४. नांव, रूप, संबंध, जाति, क्रिया, भेद हे सर्व प्रकार विशेष, भाषा आकारालाच लागू आहे, ब्रह्म निर्विकार असल्यामुळें त्या ब्रह्म वस्तूला नाहीं ५. तें ब्रह्म

१ सार, मथितार्थ. २ तरंगाला, लाटेला. ३ क्षणभर. ४ वर्तुळ. ५ गुरुशिष्यसंप्रदाय. ६ प्रतिबंध, अडथळा. ७ पोकळींत. ८ सुगंध. ९ क्रिया. १० तुकड्यामध्यें. ११ वाटतें. १२ सारखें. १३ हे सुहृदा, मित्रा. १४ चौकोनी.

परी तयाच्याचि ठायीं । आभासती ॥ ६ ॥ येतुलेयासाठीं । संभ्रांताच्या पोटीं । ऐसें जाय किरीटी । जे हेंचि धरी ॥ ७ ॥ तरी तें गा धरणें ऐसें । अभ्रातें जेवीं आकाशें । कां प्रतिवदन जैसें । आरसेनी ॥८॥ नातरी सूर्य प्रतिमंडल । जैसेनि धरी सलिल । कां रश्मिकरीं मृगजळ । धरिजे जेवीं ॥९॥ तैसें गा संबंधेविण । यया सर्वांतें धरीं निर्गुण । परी तें वायां जाण । मिथ्यादृष्टी ॥११०॥ आणि यापरी निर्गुणें । गुणातें भोगणें । रंका राज्य करणें । स्वप्नीं जैसें ॥ ११ ॥ म्हणौनि गुणाचा संगु । अथवा गुणभोगु । हा निर्गुणीं लागु । बोलों नये ॥ १२ ॥

बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च । सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १५ ॥

जें चराचर भूतां- । माजीं असे पंडुसुता । नाना वन्हीं उष्णता । अभेदें जैसीं ॥ १३ ॥ तैसेंनि अविनाशभावें । जें सूक्ष्मदशे आघवें । व्यापूनि असे तें जाणावें । ज्ञेय एथ ॥ १४ ॥ जें एक आंतुबाहेरी । जें एक जवळ दुरी । जें एकवांचूनि परी । दुजीं नाहीं ॥ १५ ॥ क्षीरसागरींची गोडी । मांजीं बहु थडिये थोडी । हें नाहीं तैंया परवडी । पूर्ण जें गा ॥ १६ ॥ स्वेदंजादिप्रभृती । वेगळाल्या भूतीं । जयाचिये अनुस्यूतीं । खोमणें नाहीं ॥ १७ ॥ पैं श्रोते मुखटिळका । घटसहस्रा अनेकां- । माजीं बिंबोनि चंद्रिका । न भेदे जेवीं ॥ १८ ॥ नाना लवणकणांचिये राशी । क्षारता एकचि जैसी । कां कोडी[१६] एकीं ऊसीं । एकचि गोडी ॥ १९ ॥

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् । भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥

तैसें अनेकीं भूतजातीं । जें आहे एकी व्याप्ती । विश्वकार्या सुमती । कांरण जें गा ॥ १२० ॥ म्हणौनि हा भूताकारु । जेथोनि तेंचि तैंया आधारु । कल्लोळा सागरु । जियापरी ॥२१॥ बाल्यादि तिन्हीं वयसीं । काया एकचि जैसी । तैसें आदिस्थितिग्रासीं । अखंड जें ॥२२॥ सायंप्रातर्मध्यान । होतां जातां दिनमान । जैसें कां गगन । पालटेना ॥२३॥ अगा सृष्टिवेळे प्रियोत्तमा । जया नांव म्हणती ब्रह्मा । व्याप्ति जें विष्णुनामा । पात्र जाहलें ॥ २४ ॥ मग आकारु हा हरपे । तेव्हां रुद्र जें म्हाणिपे । तेंही गुणत्रय जेव्हां लोपे । तैं जें शून्य ॥२५॥ नभाचें शून्यत्व गिळून । गुणत्रयातें नुरऊन । तें शून्य तें महाशून्य । श्रुतिवचनसंमत ॥ २६ ॥

कधींहि गुण होत नाहीं व त्याचा आणि गुणांचा वस्तुतः संबंधहि नाहीं; परंतु [ रज्जुसर्पाप्रमाणें ] त्याचेच ठिकाणीं ते भासतात हें खरें ६. याच कारणांवरून अर्जुना ! अज्ञान्याच्या मनांत असें येतें कीं, गुण हें ब्रह्मच धारण करते ७. परंतु ब्रह्माच्या ठिकाणीं गुण आहेत तें त्यास धारण करते असें मानणें म्हणजे जसें ढग आकाशांत दृष्टीस पडतात म्हणून त्यांना आकाश धारण करितें, किंवा आरशांत पाहिलें असतां जें प्रतिबिंब दृष्टीस पडतें तें आरशानेंच धारण केलें आहे, असें म्हणण्याप्रमाणें होय ८. किंवा सूर्याचें प्रतिबिंब पाणी धारण करितें, अथवा सूर्यरश्मी मृगजळ धारण करितात, असें वास्तविक नसतांना लोक समजतात ९. त्याप्रमाणें गुणांचा व ब्रह्माचा वास्तविक संबंध नसतांनाहि निर्गुण ब्रह्म सर्व गुणाला धारण करितें असा जो निश्चय म्हणणे तो व्यर्थ आहे. [ कारण भ्रमात्मक दृष्टीचा स्वीकार करून तें म्हटलेलें आहे ] असें समज ९१०. ज्याप्रमाणें एखादा भिकारी मनुष्यानें स्वप्नांत राज्याचा उपभोग घेणें हें मिथ्या होय, त्याप्रमाणें ब्रह्म स्वतः निर्गुण असतां गुणांचा भोग घेतें, हें म्हणणें भ्रमात्मक–व्यर्थ होय ११. म्हणून निर्गुण ब्रह्म–गुणांचा संग–संबंध करिते अथवा गुणांचा उपभोग घेते, असें तत्त्वतः पाहिल्यास म्हणतां येत नाहीं व म्हणूहि नये १२.

**अन्वयार्थ**—**भूतानां**–हें सर्व प्राण्यांच्या–**बहिः**–बाहेर–**च**–व **अन्तः**–आंत आहे, तेच–**अचरं च चरम् एव**–अचर आहे व चरहि आहे–**तत्**–तें ज्ञेय–**सूक्ष्मत्वात्**–सूक्ष्म असल्यामुळें–**अविज्ञेयं**–विशेषतः ज्ञेय होत नाहीं–**च तत्**–व तें–**दूरस्थम्**–अज्ञदृष्ट्या अत्यंत दूर आहे–**च अन्तिके**–व ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें अगदीं जवळ हृदयांत आहे १५.

हे पंडुसुता, अग्नीचे निखारे जरी पुष्कळ आकारांचे निरनिराळे असले, तरी त्यांतील उष्णता ज्याप्रमाणें एकच भेदरहित असते. त्याप्रमाणें चराचर भूतांमध्यें ब्रह्मच साधारण व्यापक आहे. १३. त्याप्रमाणें, जे [ ब्रह्म ] अविनाश रूपानें व सूक्ष्मपणानें सर्व जगास व्यापून आहे, तेंच प्रस्तुतचें 'ज्ञेय' आहे असें समज १४. जे एक ओतप्रोत व्यापक असल्यामुळें शरीराच्या आंत असते व बाहेरहि असतें तसेंच जें एक जवळ आहे व दूरहि आहे व जें एक असून त्यावांचून दुसरा प्रकारच नाहीं; १५. क्षीरसागराची गोडी त्या समुद्राच्या कांठाशीं थोडी व मध्यभागीं पुष्कळ असा प्रकार नसतो त्याप्रमाणें जें सर्वत्र व्यापक असून पूर्णरूपानें आहे १६. स्वेदजादि करून जारज, अंडज, उद्भिज या सर्व वेगळाल्या भूतांच्या ठिकाणीं ज्या ज्ञेयाच्या अखंड व्याप्तीला न्यूनता अशी मुळींच नाहीं १७. हें श्रोतृशिरोमणे ! हजारो घटांच्या निरनिराळ्या आकारांत चंद्राचें प्रतिबिंब निरनिराळें दिसतें, तरीपण त्या चंद्रबिंबांत जसे भेद–अनेकत्व नाहीं १८. मिठाच्या पुष्कळ कणांच्या राशी जरी असल्या तरी सर्वांचा खारटपणा जसा एकच असतो अथवा मोळीभर किंवा कोट्यवधी ऊंस जरी असले तरी त्या सर्वांमध्यें गोडी जशी एकच असते १९.

**अन्वयार्थ**--**च**–आणि–[ **तत्** ]–तें ज्ञेय–**भूतेषु**–प्राण्यांमध्यें–प्रत्येक देहामध्यें–**अविभक्तम्**–एक भिन्न-भिन्न नसलेलें, असें आहे–**च**–पण–**विभक्तम् इव स्थितं** विभक्त असल्यासारखें राहिलें आहे. प्रत्येक शरीरांत भिन्न भिन्न असल्यासारखें दिसतें–**च तत् ज्ञेयम्**–आणि तें ज्ञेय–**भूतभर्तृ**–स्थितिकालीं भूतांचें भरण–धारण–करणारें आहे. तसेंच ते–**ग्रसिष्णु**–प्रलयकालीं–भूतांचा ग्रास–संहार करणारे–**च प्रभविष्णु**–व सृष्टिसमयीं त्या भूतांना प्रकट करणारें आहे १६.

तसे अनेक भूतमात्रांत जे एकत्वानें समव्याप्त आहे, आणि अर्जुना ! विश्वरूपी कार्य रचनेस जें आदिकारण आहे ९२० म्हणून ज्याप्रमाणें लाटा समुद्रापासून उत्पन्न होतात व त्या लाटांना आधारहि समुद्रच असतो त्याप्रमाणें प्राणिमात्राचा आकार ज्या [ ब्रह्म ]–पासून उत्पन्न होतो तेच त्यास आधार आहे २१. बाल्यावस्था, तारुण्यावस्था व वृद्धावस्था ह्या तिन्ही अवस्थास शरीर आधारभूत असतें, तसें जगाच्या उत्पत्ति, स्थिति व लय ह्या तिन्ही अवस्थांस जें [ ब्रह्म ] अखंड रूपानें आधारभूत आहे २२. प्रातःकाळ, माध्यान्हकाळ व सायंकाळ हे दिवसाचे तिन्ही काळ जरी आले गेले, तरी आकाशांत जसा पालट होत नसतो, २३. हे प्रियोत्तमा सृष्टीच्या उत्पत्तिकाळीं ज्याला [उपाधितः] ब्रह्मदेव म्हणतात व व्याप्तिकाळीं म्हणजे स्थितिकाळीं ज्याला विष्णु हें नांव देतात २४. मग जेव्हां विश्वाकार लय पावतो तेव्हां ज्याला रुद्र असें म्हणतात व हीं तिन्हीं कार्यें ज्यावेळेस लोप पावतात, त्या वेळेस जें शून्य म्ह. अव्यक्त असतें त्याला शास्त्र प्रकृति असें म्हणते २५. आणि आकाशाचें शून्यत्व गिळून गुणत्रय नाहींसे करणारे जें प्रकृतिरूपशून्य, त्या प्रकृतिलाहि जें नाहींसें करतें तें श्रुतींनीं वर्णन केलेलें महाशून्य म्ह. अत्यंत निर्विशेष ब्रह्म तेंच आमचें ज्ञेय होय २६.

१ भासतात. २ अज्ञानाच्या. ३ मुखाचें प्रतिबिंब. ४ पाणी. ५ सूर्यकिरणांमुळें. ६ परंतु तें व्यर्थ आहे असें समज.

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते । ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥ १७ ॥

जें अग्नीचें दीपन । जें चंद्राचें जीवन । सूर्याचे नयन । देखती जेणें ॥ २७ ॥ जयाचेनि उजियेडें । तारांगण उभडें । महातेज सुरवाडें । राहाटे जेणें ॥ २८ ॥ जें आदीची आदी । जे वृद्धीची वृद्धी । बुद्धीची जे बुद्धी । जीवाचा जीवु ॥ २९ ॥ जें मनाचें मन । जें नेत्राचे नयन । कानाचे कान । वाचेची वाचा ॥ १३० ॥ जें प्राणाचा प्राण । जें गतीचे चरण । क्रियेचें कर्तेपण । जयाचेनि ॥ ३१ ॥ आकारु जेणें आकारे । विस्तारु जेणें विस्तारे । संहारु जेणें संहारे । पंडुकुमरा ॥ ३२ ॥ जें मेदिनीची मेदिनी । जें पाणी पिऊनि असे पाणी । तेजा दिवेलावणी । जेणें तेजें ॥ ३३ ॥ जें वायूचा श्वासोश्वासु । जें गगनाचा अवकाशु । हें असो आघवाची आभासु । आभासे जेणें ॥ ३४ ॥ किंबहुना पांडवा । जें आघवेंचि असे आघवा । जेथ नाहीं रिगावा । द्वैतभावासी ॥ ३५ ॥ जें देखलियाचिसवें । दृश्य द्रष्टा हें आघवें । एकवाट कालवे । सामरस्यें ॥ ३६ ॥ मग तेंचि होय ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हन । ज्ञानें गंमिजे स्थान । तेंहि तेंची ॥ ३७ ॥ जैसे सरलियां लेखं । आंख होती एक । तैसें साध्यसाधनादिक । ऐक्यासि ये ॥ ३८ ॥ अर्जुना जिये ठायीं । न सरे द्वैताची वही । हें असो जें हृदयीं । सर्वांच्या असे ॥ ३९ ॥

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः । मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥

एवं तुजपुढां । आदि क्षेत्रें सुहाडां । दाविलें फाडोवांडां । विवंचुनी ॥ १४० ॥ तैसेंचि क्षेत्रापाठीं । जैसेंनि देखसी दिठी । तें ज्ञानही किरीटी । सांगितलें ॥ ४१ ॥ अज्ञानाही कौतुकें । रूप केलें निकें । जवं आयणी तुझी टेंके । पुरे म्हणे ॥ ४२ ॥ आणि आतां हें रोकडें । उपपत्तीचेनि पवाडें । निरूपिलें उघडें । ज्ञेय पैं गा ॥ ४३ ॥ हे आघवीच विवंचना । बुद्धी भरोनि अर्जुना । मत्सिद्धिभावना । माझिया येती ॥ ४४ ॥ देहादि परिग्रहीं । संन्यासु करूनियां जिहीं । जीवु माझ्या ठाईं । वृत्तिकु केला ॥ ४५ ॥ ते मातें किरीटी । हेंचि जाणोनियां शेवटीं । आपणपयां साटोवाटीं । मीचि होती ॥ ४६ ॥ मीचि होती परी । हें मुख्य गा अवधारीं । सोहोपी सर्वांपरी । रचिलीं आम्हीं ॥ ४७ ॥ कडां पायरी कीजे । निराळीं माचु बांधिजे । अथावीं सुइजे । तरी जैसी ॥ ४८ ॥ एऱ्हवीं अवघेंचि आत्मा । हें सांगों

**अन्वयार्थ**—**तत्**–तें ज्ञेय–**ज्योतिषाम् अपि**–सूर्य, अग्नि इत्यादि जड ज्योतींचीहि–**ज्योतिः**–ज्योति आहे. प्रकाशांनाहि प्रकाशित करणारें आहे–**तमसः परं**–तमाचा-अज्ञानाचा त्याला स्पर्शहि झालेला नाहीं, असें–**उच्यते**–म्हटलें जातें–**ज्ञानम्**–अमानित्वादि ज्ञान–**ज्ञेयं** [ अ. १२-१७ श्लोकांत सांगितलेलें ] ज्ञेय व–**ज्ञानगम्यं**–त्याच्या ज्ञानाचें फल, असें तें त्रिविध ज्ञेय–**सर्वस्य**–सर्व प्राण्यांच्या—**हृदि** – बुद्धींत – **धिष्ठितं**–विशेषतः स्थिर आहे १७.

जें ब्रह्म अग्नीला दीपन–दाह करण्याची शक्ति देणारे आहे व ज्या चंद्रापासून जगांत अमृताची प्राप्ति होते त्यालाहि जें अमृत देणारे आहे, ज्या सूर्याचे उजेडापासून सर्व जग व्यवहार करितें, त्याचे डोळेहि ज्याच्या प्रकाशापासून तेजसंपन्न होऊन पाहतात २७. ज्याच्या तेजानें तारांगणास तेज प्राप्त होतें, तसेंच महातेजस्वी [ सूर्य ] ज्याच्या तेजानें तेजस्वी होतो व सुखानें वावरतो २८. जगतांत जें मूळ पदार्थ म्हणून आहेत, त्यांचेंहि जे ब्रह्म मूळ म्हणजे आदि, कारण आहे. जें वृद्धीची वृद्धि, तसेंच बुद्धीची बुद्धि व जीवाचा जीव, [ जीवाधिष्ठान साक्षी आहे ! ] २९. जें मनाचें मन आहे, डोळ्याचा डोळा, आहे, कानाचा कान आहे व वाचेची वाचा आहे ९३०. जें प्राणाचें जीवन आहे, गतीचे चरण आहे व ज्यामुळें क्रियेस कर्तेपणा येतो ३१. हे पंडुकुमरा ! ज्याच्या सत्तेमुळें आकार आकारास येतो, विस्तार विस्तारतो व संहार नाश करतो ३२. जें पृथ्वीस धारण करणारी पृथ्वी आहे, जें पाण्याचें जीवन आहे व ज्याच्या योगानें तेजहि प्रकाशमान् होतें ३३. जे ब्रह्म वायूस वाहण्याची व श्वासोच्छ्वासाची शक्ति देतें व ज्यांत आकाश सामावतें, फार काय सांगावें ! ! सर्वच्या सर्व विश्वात्मकभास ज्याच्या तेजानें भासतो ३४. हे पांडवा, या सर्व जगतांत सर्व पदार्थांच्या रूपानें सर्वपणानें जे ज्ञेय आहे आणि ज्याच्या ठिकाणीं द्वैतभावाचा मुळींहि प्रवेश होत नाहीं ३५. जें [ आत्मत्वानें ] पाहिल्याबरोबर द्रष्टा, दृश्य व दर्शन ही आवघी त्रिपुटी ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीं ऐक्यभावानें एकरूप होतात ३६. मग तेंच ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान ही त्रिपुटी होऊन ज्ञानाच्या योगानें जें जाणले जाते तें ठिकाणहि तेच [ ब्रह्मच ] होय. ३७. ज्याप्रमाणें हिशोब-ताळा जुळून संपल्यावर हिशोबाच्या रकमा एक होतात त्याप्रमाणें ब्रह्मप्राप्ति झाल्यावर साध्य, साधक व साधन हे भाव नाहींतसे होऊन तेथें एकरूप होतात ३८. अर्जुना ! ज्या ब्रह्माचे ठिकाणीं द्वैताचा व्यवहार व संबंधहि रहात नाहीं, आतां हें राहूं दे. ते सर्वांच्या अंतःकरणात वास करितें. [ ब्रह्मच सर्वांचे सत्ता-स्फूर्ति देणारे अधिष्ठान आहे, हे तात्पर्य ] ३९.

**अन्वयार्थ**–**इति**–येणेंप्रमाणें-**क्षेत्रं**–क्षेत्रशरीर–**ज्ञानम्**–अमानित्वादि ज्ञानसाधनें–**च तथा**–आणि त्याचप्रमाणें–**ज्ञेयं**–जाणण्यास योग्य असें परब्रह्म–**समासतः**–संक्षेपतः–**उक्तं**–सांगितलें–**मद्भक्तः**–माझ्या ठिकाणींच ज्यानें आपला सर्व भाव ठेवला आहे असा माझा परम भक्त–**एतत्**–हें सर्व–**विज्ञाय**–जाणून–**मद्भावाय**–माझ्या भावाला–स्वरूपाला–**उपपद्यते**–प्राप्त होतो १८.

याप्रमाणें, हे प्रिय मित्रा, तुला अगोदर क्षेत्र म्हणजे काय हें खडे मांडून सांगण्याप्रमाणें विस्तारानें दाखविलें ९४०. त्याचप्रमाणें अर्जुना ! त्या क्षेत्रानंतर तुला उघड दृष्टीनें पाहतां येईल, अशा रीतीनें ज्ञानहि समजून सांगितलें ४१. त्याप्रमाणेंच तुझ्या बुद्धीची तृप्ति होऊन तूं ‘ पुरे ’ म्हणेपर्यंत अज्ञानाच्याहि लक्षणाचें कौतुकानें चांगलेच निरूपण केलें ४२. आणि आतांच दृष्टांत विवरणपूर्वक तुला ‘ ज्ञेय ’ म्हणजे काय तें स्पष्ट करून सांगितलें ४३. अर्जुना ! या सर्व गोष्टींचा विचार बुद्धींत भरून, माझ्या प्राप्तीची श्रद्धापूर्वक इच्छा धरून, माझे भक्त माझ्या स्वरूपसिद्धीला प्राप्त होतात ४४. देहादिक परिग्रहाचा त्याग करून जें माझ्या ठिकाणीं आपलें चित्त वतनदारच करतात ४५. हे किरीटी ! शेवटीं हाच विचार करून व जाणून ते माझे भक्त आपलें चित्त मला अर्पण करून व आपल्या मोबदल्यांत मला आपल्याकडे घेऊन, मद्रूपच होतात ४६. अशा रीतीनें मद्रूपच होण्याचा सर्वांत सुलभ, प्रधानमार्ग मीच मुमुक्षूंकरितां तयार करून ठेवला आहे ४७. डोंगराच्या कड्यावर चढून जाणें झाल्यास जशा पायऱ्या कराव्या लागतात किंवा अंतराळीं चढून जाणें असल्यास जसा माच–शिडी बांधावी लागते, किंवा खोल पाण्यांतून तरून जावयाचें असल्यास जशी त्या पाण्यांत नाव घालावी लागते ४८. सहज विचारपूर्वक पाहिले तर हे वीरोत्तमा ! सर्वच आत्मा आहे असें जर तुला एकदम वर्णन करून सांगितलें तर ते [ अन्वयात्मक ज्ञान ] तुझ्या बुद्धीला स्पष्ट कळणार नाहीं ४९.

१ दाहकशक्ति. २ तेजानें. ३ पृथ्वी. ४ तेज, अभ्यास. ५ सारखेपणानें, एकरूपानें. ६ जाणावें, पावावें. ७ गणना. ८ लेख, हिशेब. ९ शेत, शरीर. १० प्रिय मित्रा. ११ स्पष्टपणानें. १२ बुद्धी. १३ थके, विश्रांति पावे. १४ युक्तीच्या.

जरी वीरोत्तमा । परी तुझिया मनोधर्मा । मिळेल ना ॥ ४९ ॥ म्हणौनि एकचि संचलें । चतुर्धा आम्हीं केलें । जें अदळपण देखिलें । तुझिये प्रज्ञे ॥ ९५० ॥ पैं बाळ जैं जेवविजे । तैं घांसु विसा ठायीं कीजे। तैसें एकचि हें चतुर्व्याजें। कथिलें आम्हीं ॥ ५१ ॥ एक क्षेत्र एक ज्ञान । एक ज्ञेय एक अज्ञान । हे भाग केले अवधान । जाणौनि तुझें ॥ ५२ ॥ आणि ऐसेनही पार्था । जरी हा अभिप्रावो तुज हाता । नये तरी हे व्यवस्था । एक वेळ सांगों ॥ ५३ ॥ आतां चौठायीं न करूं । एकही म्हणौनि नं सरूं । आत्मांनात्मया धरूं । सरिसा पाडु ॥ ५४ ॥ परि तुवां येतुलें करावें । मागों तें आम्हां देआवें । जें कानचि नांव ठेवावें । आपण पैं गा ॥ ५५ ॥ या श्रीकृष्णाचिया बोला । पार्थु रोमांचितु जाहला । तेथ देवो म्हणती भला। उचंबळेंना ॥ ५६ ॥ ऐसेनि तो येतां वेगु । धरूनि म्हणे श्रीरंगु । प्रकृतिपुरुषविभागु । परिसें सांगों ॥ ५७ ॥ जया मार्गातें जगीं । सांख्य म्हणती योगी । जयाचिये भाटिवेलैगीं । मी कपिल जाहलों ॥ ५८ ॥ तो आइक निर्दोखु । प्रकृतिपुरुषविवेकु । म्हणे आदिपुरुखु । अर्जुनातें ॥ ५९ ॥

प्रकृतिं पुरुषं चैव विद्धयनादि उभावपि । विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥

तरी पुरुष अनादि आथी । आणि तैंचि लागोनि प्रकृति । संसरिसी दिवोराती । दोनी जैसी ॥ ९६० ॥ कां रूप नोहे वांया । परी रूपा लागली छाया । निकणु वाढे धनंजया । कणेंसीं कोंडा ॥ ६१ ॥ तैसीं जाण जेंवटें । दोन्हीं इयें एकवटें । प्रकृतिपुरुष प्रकटें । अनादिसिद्धें ॥ ६२ ॥ पैं क्षेत्र येणें नांवें । जें सांगितलें आघवें । तेंचि एथ जाणावें । प्रकृति हे गा ॥ ६३ ॥ आणि क्षेत्रज्ञ ऐसें । जयातें म्हणितलें असे । तो पुरुष हें अनारिसें । न बोलों घेईं ॥ ६४ ॥ इये आनानें नांवें। परि निरूप्य आन नोहे । हें लक्षण न चुकावें। पुढतपुढती ॥६५॥ तरी केवळ जे सत्ता । तो पुरुषु गा पंडुसुता । प्रकृतीतें समस्तां । क्रिया नाम ॥ ६६ ॥ बुद्धि इंद्रियें अंतःकरण । इत्यादि विकारभरणें । आणि ते तिन्ही गुण । सत्त्वादिक ॥ ६७ ॥ हा आघवाचि मेळावा । प्रकृती जाहला जाणावा । हेचि हेतु संभवा । कर्मांचियां ॥ ६८ ॥

कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते । पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥

तेथ इच्छा आणि बुद्धि । घडेवी अहंकारेंसीं आधीं । मग तियें लाविती

म्हणून तुझ्या बुद्धीचा असमर्थपणा आहे असें पाहून जें एकच ओतप्रोत व्याप्त ब्रह्म ते चार विभाग करून आम्ही सांगितलें ९५०. ज्याप्रमाणें मुलाला जेवूं घाला-वयाचें असलें म्हणजे जो आपण एक घास घेतों तोच त्याला वीस वेळ थोडाथोडा द्यावा लागतो, त्याप्रमाणें एकच परब्रह्म हें चार प्रकारांच्या निमित्तानें तुला मी स्पष्ट करून सांगितलें ५१. तुझी अवधानशक्ति पाहून एक क्षेत्र, एक ज्ञान, एक ज्ञेय व एक अज्ञान असें हें त्या ब्रह्माचे चार भाग केले ५२. आणि पार्था ! इतकेंहि करून जर ब्रह्म तुला नीट कळले नसलें, तर आतां तुला दुसऱ्या रीतीनें आणखी एकदां ह्याच विषय स्पष्ट करून सांगतों ५३. आतां त्याचे चार विभाग करणार नाहीं, तसेंच तें ब्रह्म एकच आहे असेंहि सांगून संपविणार नाहीं. आत्मा व अनात्मा [ प्रकृति व पुरुष ] असें दोन सारखें भाग करून ते तुला सांगतों ५४. परंतु तूं मात्र एवढें एक कर कीं, आम्ही तुझ्याजवळ जे मागूं तें आम्हांस दिलें पाहिजे. तें काय म्हणशील तर तूं आपले स्वतःस 'कान' हे नांव ठेव म्ह० लक्षपूर्वक कान देऊन आम्ही सांगूं तें ऐक ५५. असें श्रीकृष्णांचें वचन ऐकून पार्थाचें अंगावर रोमांच उभे राहिले. तेव्हां ते पाहून देव म्हणाले कीं, याच्या मनांत ही गोष्ट पूर्णपणें चांगली बिंबली आहे; पण हर्षवेगानें अनावर होऊं नकोस ५६. [ याप्रमाणें श्रीकृष्णालाहि वेग आला; परंतु ] तो हर्षवेग आंवरून धरून ते म्हणतातः-अर्जुना ! तुला ब्रह्माचे प्रकृति व पुरुष असे दोन भाग स्पष्ट करून सांगतों, तें ऐक ५७. प्रकृति व पुरुष असे यांचें ज्यांत विवेचन आहे, त्या मार्गाला जगांत योगी लोक 'सांख्य-मार्ग' असें म्हणतात व ज्याचें पूर्णपणें वर्णन करण्या-करितां मी कपिलावतार संपन्न झालों ५८. तो प्रकृति व पुरुष यांच्याविषयींचा निर्दोष विचार तूं ऐक. असें आदि पुरुष जे श्रीकृष्ण परमात्मा ते अर्जुनास म्हणाले ५९.

**अन्वयार्थ**--**प्रकृतिम्**-आठ प्रकारच्या प्रकृतीला **च एव**-आणि-**पुरुषं**-क्षेत्रज्ञाला-**उभौ अपि**-अशा दोघांना· **हि**-**अनादि**-तूं अनादि नित्य-**विद्धि**-जाण-**विकारान्**-बुद्धि, इन्द्रियें, देह इत्यादि विकारांस-**च**-आणि-**गुणान् च एव**-सुख-दुःख-मोहरूप गुणांना तूं-**प्रकृति**·**संभवान्**-ईश्वराच्या त्रिगुणात्मक मायाख्य प्रकृतीपासून झालेले-**विद्धि**-जाण १९.

तरी हा पुरुष अनादि असून तेव्हांपासून त्याच्या आश्रयावर असणारी मिथ्या प्रकृतिहि अनादिच आहे. ज्याप्रमाणें दिवस व रात्र यांची जोड अगदीं बरोबर चालणारी आहे ९६०. [ किंवा शरीर ] हे सांवलीप्रमाणें आभासिक रूप नव्हे, परंतु ती सांवली रूपाबरोबर सदाच जडलेली असते; तसेंच हें धनंजया ! बी पेरल्या-वर त्याचेबरोबर ज्याप्रमाणें सारभूत कण असारभूत कोंडा हीं दोन्हीं बरोबरच वाढत असतात ६१. त्याप्रमाणें प्रकृति व पुरुष ह्यांचें अनादिसिद्ध असलेले व एकत्र मिसळलेले जुळयाप्रमाणें प्रसिद्ध आहे, असें समज ६२. तर 'क्षेत्र' या नांवानें तुला जें आरंभीं सांगितलें, त्यालाच या ठिकाणीं आम्ही प्रकृति असें नांव दिलें आहे असे सम-जावें ६३. आणि 'क्षेत्रज्ञ' म्हणून ज्याला म्हटलें तोच या ठिकाणीं पुरुष आहे हें आम्हीं निःसंशय सांगतों, यांत अन्यथा नाहीं असें समज ६४. यांचीं जरी हीं प्रसंगविशेषीं निरनिराळीं नांवें दिली आहेत, तरी ज्याच्या-विषयीं निरूपण करावयाचें ते [ प्रतिपाद्य विषय ] निराळें नाहीं, ही मार्मिक गोष्ट तूं वरचेवर पूर्णपणें लक्षांत ठेव, विसरूं नकोस ६५. हे पंडुसुता ! ज्या केवळ सत्तेला कधींहि नाश नाहीं तिला 'पुरुष' असें समजावें व सत्तेच्या योगानें ज्या क्रिया घडतात, त्या संपूर्ण क्रियेस 'प्रकृति' असें म्हणावें ६६. बुद्धि, इन्द्रियें, अन्तःकरण इत्यादि विकारांचा समुदाय आणि सत्त्व, रज व तम हे तिन्ही गुण ६७. हा सर्व समुदाय त्या प्रकृतीपासून निर्माण झाला आहे, हाच समुदाय यच्चयावत् कर्मांच्या उत्पत्तीस कारण आहे ६८.

**अन्वयार्थ**--**कार्यकारणकर्तृत्वे**-कार्य म्हणजे शरीर व कारण म्हणजे सर्व इन्द्रियें यांच्या कर्तृत्वाविषयीं-**प्रकृतिः**-वरील प्रकृति-**हेतुः**-निमित्त-**उच्यते**-सांगितली जाते. त्याचप्रमाणें-**सुखदुःखानां भोक्तृत्वे**-सुखदुःखांच्या भोक्तृत्वाविषयीं-**पुरुषः**-पुरुष-क्षेत्रज्ञ-जीव-**हेतुः**-निमित्त-**उच्यते**-सांगितला जातो २०.

तसेंच तेथें पहिल्यानदां इच्छा व बुद्धि ही मिळून अहंकारास उत्पन्न करतात व त्यामुळें ती इच्छा व बुद्धि

---

१ समर्थपणा, अशक्तपणा. २ चार प्रकारें करून. ३ न मानूं. ४ आत्मा-पुरुष, अनात्मा-प्रकृति. ५ हालेना, भरून आला आहे कीं. ६ वर्णनासाठीं. ७ तेव्हांपासूनच. ८ अगदीं जवळ. ९ बीज. १० दाण्याबरोबर. ११ जुळीं १२ एकत्र. १३ वेगळे. १४ न बोलतां घे. १५ निरूपण. १६ अस्तित्व, अधिकार. १७ विकारांची उत्पत्ति, पोषण. १८ समुदाय. १९ कारण. २० कर्मांच्या उत्पत्तीला. २१ उत्पन्न करते. २२ इच्छा व बुद्धि.

वेधीं । कारणाच्या ॥६९॥ तेंचि कारण ठाकावया । जें सूत्र धरणें उपाया । तया नांव धनंजया । कार्य पैं गा ॥ १७० ॥ आणि इच्छा मदाच्या थांवीं । लागली मनातें उठवी । तें इंद्रियें राहाटवी । हें कर्तृत्व पैं गा ॥ ७१ ॥ म्हणौनि तीन्ही या जाणा । कार्यकर्तृत्वकारणा । प्रकृति मूळ हे राणा । सिद्धांचा म्हणे ॥ ७२ ॥ एवं तिहींचेनि समवायें । प्रकृति कर्मरूप होये । परी जया गुणा वाढे आंये । त्याचि सारिखी ॥७३॥ जें सत्त्वगुणें अधिष्ठिजे । तें सत्कर्म म्हणिजे । रजोगुणें निफजे । मध्यम तें ॥ ७४ ॥ जें कां केवळ तमें । होतीं जियें कर्में । निषिद्धें अधमें । जाण तियें ॥ ७५ ॥ ऐसेनि संतांसंतें । कर्में प्रकृतीस्तव होतें । तयापासोनि निर्वाळतें । सुखदुःख गा ॥ ७६ ॥ असंतीं दुःख उपजे । सत्कर्मीं सुख निफजे । तया दोहींचा बोलिजे । भोगु पुरुषा ॥ ७७ ॥ सुखदुःखें जंववरी । निफजती साचोकारीं । तंव प्रकृति उद्यमु करी । पुरुषु भोगी ॥ ७८ ॥ प्रकृतिपुरुषांची कुळवाडी । सांगतां असंगडी । जे आंबुली जोडी । आंबुला खाय ॥ ७९ ॥ आंबुला आंबुलिये । संगती ना सोये । कीं आंबुली जग विये । चोजें ऐका ॥ १८० ॥

पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान् गुणान् । कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥

जे अनंगु तो पैंधा । निकवेंडा नुसधा । जीर्णु अतिवृद्धा- । पासोनि वृद्धु ॥ ८१ ॥ तया आडनांव पुरुषु । एऱ्हवीं स्त्री ना नपुंसकु । किंबहुना एकु । निश्चयो नाहीं ॥ ८२ ॥ तो अचक्षु अश्रवणु । अहस्तु अचरणु । रूप ना वर्णु । नाम आथी ॥ ८३ ॥ अर्जुना कांहींचि जेथ नाहीं । तो प्रकृतीचा भर्ता पाहीं । कीं भोगणें ऐसयाही । सुखदुःखांचें ॥८४॥ तो तरी अकर्ता । उदासु अभोक्ता । परी इया पतिव्रता । भोगविजे ॥ ८५ ॥ जियेतें अळुमाळु । रूपा गुणाचा चाळेंढाळु । ते भलतैसाही खेळु । लेखें आणी ॥ ८६ ॥ मा इये प्रकृती तंव । गुणमैयी हेंचि नांव । किंबहुना सावेव । गुण तेचि हे ॥ ८७ ॥ हे प्रतिक्षणीं नित्य नवी । रूपा गुणाचीच आघवी । जडातेंही माजवी । इयेचा माजु ॥८८॥ नामें इयें प्रसिद्धें । स्नेहो इया स्निग्धें । इंद्रियें प्रेबुद्धें । इयेचेनि ॥ ८९ ॥ कायि मन हें नपुंसक । कीं ते भोगवी तिन्ही लोक । ऐसें ऐसें अलौकिक । करणें इयेचें ॥ १९० ॥ हे भ्रमाचे महाद्वीप । हे व्याप्तीचें रूप । विकार

फलप्राप्तीकरितां [ इच्छित विषय प्राप्त्यर्थ ] इन्द्रियांना आपापलीं कार्यें करण्याकरितां नादीं लावतात ६९. तेंच इच्छित फल प्राप्त होण्याकरितां जे प्रयत्नात्मक सूत्र हातांत धरून उपाय करावयाचा त्या बाह्य प्रयत्नांस हे धनंजया ! 'कार्य' असें म्हणतात ९७०. तीच इच्छा मदाच्या आश्रयानें प्रबळ होऊन ती मनाला जागृत करते व नंतर तें मन इन्द्रियांकडून इच्छित सर्व व्यवहार करविते, ही प्रेरणात्मक क्रिया हेंच 'कर्तृत्व' होय ७१. म्हणूनच कार्य, कर्तृत्व व कारण या त्रिपुटीस प्रकृति हीच मूळ होय असें समज, असें सिद्धांचा राणा जो श्रीकृष्ण परमात्मा तो म्हणाला ७२. याप्रमाणें तिन्ही एकत्र झाल्यावर प्रकृति क्रियारूप होते; परंतु ज्या गुणांचा विशेष जो उत्कर्ष होईल, त्या गुणाप्रमाणें ती क्रिया घडते ७३. जें कर्म सत्त्वगुणाच्या आश्रयापासून उत्पन्न होतें, तें सत्कर्म होय, जें कर्म रजोगुणाच्या आश्रयापासून उत्पन्न होते, तें मध्यम जाणावें ७४. आणि जीं कर्में केवळ तमोगुणाच्या आश्रयापासून उत्पन्न होतात, तीं निषिद्ध म्हणजे शास्त्रविरुद्ध व कनिष्ठ अशी कर्में होत ७५. याप्रमाणें प्रकृतीपासून चांगलीं व वाईट कर्में घडतात व मग त्या कर्मांपासून जे [ फल ] उत्पन्न होते ते सुखदुःख होय ७६. वाईट कर्मांपासून दुःख उत्पन्न होतें, सत्कर्मापासून सुख उत्पन्न होतें व त्या दोहोंचा उपभोग पुरुषास होतो असें म्हणतात ७७. जोंपर्यंत सुख व दुःख ही सत्यत्वानें उत्पन्न होतात, तोंपर्यंत प्रकृति व्यापार करते व पुरुष भोग भोगतो ७८. प्रकृति व पुरुष यांचा व्यापार सांगावा तर फारच अघटित स्वरूपाचा आहे, कारण या व्यवहारांत स्त्री मिळविते व नवरा स्वस्थ बसून खातो ७९. काय चमत्कार आहे पहा कीं ! या स्त्री-पुरुषांचा कधींहि संग-संबंध नसतो व यांच्यांत सुसंवाद व मेळहि नसतो. तरीपण स्त्री [ प्रकृति ] जगास प्रसवते ९८०.

**अन्वयार्थ**—**हि**—कारण—**पुरुषः**—पुरुष—**प्रकृतिस्थः**—शरीरेंद्रियांच्या रूपानें परिणत झालेल्या—शरीरेंद्रियाकार प्रकृतींत स्थिर होऊन 'हेंच मी' असें मानून—**प्रकृतिजान्** **गुणान्**—प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या सुख—दुःखमोहात्मक गुणांस—**भुंक्ते**—भोगतो. त्यांचा अनुभव घेतो—**अस्य**—या भोक्त्याचा—**गुणसंगः**—गुणांवरील संग-आसक्ति-हेंच त्यांचा—**सदसद्योनिजन्मसु**—देवादि सत् योनि व पश्वादि असत् योनि, यांत जन्म होण्याचे—**कारणं** — कारण — निमित्त आहे २१.

कारण तो [ पुरुष-ब्रह्म ] निराकार असून, पांगळा [ क्रियारहित ] आहे, तसेंच निर्धन असून केवळ एकटा आहे आणि जीर्ण असून या जगांत जी अति वृद्ध वस्तु असेल तिच्यापेक्षांहि वृद्ध [ जगज्येष्ठ ] आहे ८१. त्याला 'पुरुष' हे नुसते आडनांव आहे, एरव्ही तो स्त्री किंवा नपुंसक नाहीं. अधिक काय सांगावे ! ! अमुक एक तो आहे, असा कोणताहि निश्चय करतां येत नाहीं ८२. त्याला डोळे, कान, हात, पाय, रूप, वर्ण व नांव हें कांहींएक नाहीं ८३. अर्जुना ! ज्याचे ठिकाणीं कांहींच [ कोणताहि विशेष ] नाहीं अशा स्वरूपाचा तो, त्या प्रकृतीचा नवरा असून त्यालाहि सुखदुःखें भोगावीं लागतात ८४. तो अकर्ता—कर्म न करणारा, हर्षविषादरहित व अभोक्ता, उपभोग न घेणारा असा जरी आहे, तरीपण ही पतिव्रता प्रकृति त्याला उपभोग घेण्यास लावते म्ह० उपभोग घेतो असें ती दाखविते ८५. जी प्रकृति आपल्या गुणांच्या व रूपाच्या अगदीं किंचित् हालचालीनें विलक्षण चमत्कार करून हवा तो खेळ आकारास आणून दाखविते ८६. म्हणून या प्रकृतीला 'गुणमयी' असें नांव दिलें आहे, किंबहुना ! ! ही प्रकृति म्ह० मूर्तिमंत गुणच आहे ८७. ही क्षणोक्षणीं नित्य नवी आहे व संपूर्णपणें ही रूप व गुण यांनींच युक्त आहे व ही जड वस्तूकडूनहि आपल्या कर्तबगारीनें कर्म करविते ८८. या प्रकृतीमुळें सर्व नांवें प्रसिद्धीस आली आहेत, हिच्यामुळेंच—स्नेह प्रेमयुक्त—प्रेमळ झाले आहे व इन्द्रियें आपापल्या व्यापारांत जागृत—दक्ष झालीं आहेत ८९. खरें पाहूं गेलें असतां मन हें नपुंसक नव्हे काय ? पण तें [ जीवाला एका क्षणांत ] तिन्हीं लोकांत हिंडवून आणते, भोग भोगवितें, अशी हिची अलौकिक करणी आहे ९९०. ही प्रकृति भ्रमाचें केवळ

१ नदी. २ प्राप्त होण्यास. ३ धोरण. ४ वागविते, राबविते. ५ एकत्वानें, ऐक्यानें. ६ क्रियारूप. ७ बळ, जोर, आधिक्य. ८ त्या गुणासारखी. ९ निंद्य. १० चांगलें व वाईट. ११ उत्पन्न होत. १२ कुणबावा, शेतकी, व्यापार. १३ अघटित. १४ स्त्री. १५ मिळविते. १६ पति. १७ नवल. १८ निराकार. १९ उदासीन. २० दरिद्री. २१ केवळ, एकटा. २२ किंचित्. २३ हालचाल. २४ गणतीस. २५ गुणांनीं भरलेली. २६ शहाणी.

उमपं । इया केले ॥९१॥ हे कामाची मांडवी । हे मोहवनींची मांधवी । इये प्रसिद्धचि दैवी । माया हें नाम ॥९२॥ हे वाङ्मयाची वाढी । हे साकारपणाची जोडी । प्रपंचाची धोंडी । अभंग हे ॥९३॥ कळा एथूनि जालिया । विद्या इयेच्या केलिया । इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ॥ ९४ ॥ हे नादांची टांकसाळ । हे चमत्काराचें वेळाउळ । किंबहुना सकळ । खेळु इयेचा ॥ ९५ ॥ जे उत्पत्ति प्रलयो होत । ते इयेचे सायंप्रात । हें असो अद्भुत । मोहन हे ॥९६॥ हे अद्वयाचें दुसरें । हें निःसंगाचे सोयरे । हे निरांळेंसि घरें । नांदत असे ॥९७॥ इयेतें येतुंला-वरी । सौभाग्यव्याप्तीची थोरी । म्हणौनि तया आवेरी । अनावरातें ॥९८॥ तयाच्या तंव ठायीं । निपटूनि कांहींचि नाहीं । कीं तया आघवेंही । आपणचि होय ॥९९॥ तया स्वयंभाची संभूती । तया अमूर्ताची मूर्ती । आपण होय स्थिती । ठाँवो तया ॥१०००॥ तया अनंताची आर्ती । तया पूर्णाची तृप्ती । तया अकुळाची जाती-। गोत होय ॥ १ ॥ तया अचर्चाचें चिन्ह । तया अपारांचें मांन । तया अमनस्काचें मन । बुद्धीही होय ॥२॥ तया निराकाराचा आकारु । तया निर्व्यापाराचा व्यापारु । निरहंकाराचा अहंकारु । होऊनि ठाके ॥ ३ ॥ तया अनामाचें नाम । तया अंजाचें जन्म । आपण होय कर्म-। क्रिया तया ॥ ४ ॥ तया निर्गुणाचे गुण । अचरणाचे चरण । तया अश्रवणाचे श्रवण । अचक्षूचे चक्षु ॥ ५ ॥ तया भावातीताचे भाव । तया निरवयवाचे अवयव । किंबहुना होय सर्व । पुरुषाचें हे ॥ ६ ॥ ऐसेनि इया प्रकृती । आपुलिया सर्व व्याप्ती । तया अविकारातें विकृती-। मार्जी कीजे ॥ ७ ॥ तेथ पुरुषत्व जें असे । तें ये इये प्रकृतिदशे । चंद्रमा अंवसे । पडिला जैसा ॥ ८ ॥ विदेंळ बहु चोखैं । मीनलिया वाला एका । कसु होय पांचैंका । जयापरी ॥९॥ कां साधूतें गोंधेंळी । संचरोनि सुये मैळीं । नाना सुदिनाचा आभाळीं । दुर्दिनुं कीजे ॥ १०१० ॥ जेवीं पय पशूच्या पोटीं । कां वन्हि जैसा काष्ठीं । गुंडूनि घेतला पटीं । रत्नदीपु ॥ ११ ॥ राजा पराधीनु जाहला । कीं सिंहु रोगें रुंधेंला । तैसा पुरुष प्रकृती आला । स्वतेजा मुके ॥ १२ ॥ जागता नरु सहसा । निद्रा पाडूनि जैसा । स्वप्नींचिया सोसां । वश्यु कीजे ॥ १३ ॥ तैसें प्रकृति जालेपणें । पुरुषा गुण भोगणें । उदास अंतुरीगुंणें । आतुंडे जेवीं ॥ १४ ॥ तैसें अजौं नित्या होये ।

मोठे बेटच आहे. स्वयमेव मूर्तिमंत व्याप्तिच आहे व हिनेंच अमर्याद, अगणित विकार निर्माण केले आहेत ९१. ही कामरूप वेलीचा मांडव आधार आहे व मोहरूप वनाचा वसंत ऋतू आहे व ही 'दैवी माया' या नांवानें शास्त्रांत प्रसिद्धच आहे ९२. ही शब्द-सृष्टीची वा शब्दमय शास्त्राची वाढ हिच्यामुळें झाली आहे. ही निराकाराला आकार देणारी आहे व जीवावर प्रपंचाची सतत धाड घालणारी आहे ९३. सर्व कला हिच्यापासून उत्पन्न झालेल्या आहेत, सर्व विद्याहि हिनेंच केलेल्या आहेत आणि हीच इच्छा, ज्ञान व क्रिया यांसहि व्यायली, प्रसवली आहे ९४. ही नादाची [ ध्वनीची वा छंदाची ] टांकसाळ आहे; ही चमत्काराचें घर आहे. फार काय सांगावें! हा सर्व खेळ हिचाच आहे ९५. जगाचें उत्पत्ति आणि प्रळय जे आहेत ते हिचेच प्रातःकाल व सायंकाळ होत. हें असो; ही जगाला अद्‌भुत मोह घालणारी आहे ९६. ही अद्वयब्रह्माची पुरुषाची दुसरी जोडीदारीण आहे; ही संगरहिताची संबंधी सोबतीण आहे, आणि हिचें वास्तव्य शून्यांत [ निर्विशेष चैतन्याश्रित ] असून त्या ठिकाणीं ही नांदते ९७. याप्रमाणें हिच्या सौभाग्याचा महिमा आहे. म्हणूनच अनावर असें जे ब्रह्म त्याला ही आवरल्यासारखे दाखविते ९८. वस्तुतः ब्रह्माचे ठिकाणीं विशेष असा मुळीच कांहींहि नाहीं; परंतु त्याचे ठिकाणीं ही आपण स्वतचः सर्व कांहीं बनते ९९. त्या स्वयंभू ब्रह्माची उत्पत्ति, त्या निराकाराचा आकार, स्थिति, राहणे व ठिकाण आपणच बनते १०००. त्या इच्छारहिताची इच्छा, त्या पूर्णाची तृप्ति, त्या कुलरहिताची जात व गोतहि ही प्रकृति आपणच होते १. त्या अवर्णनीयाचें लक्षण, त्या अपरिमिताचे परिमाण—माप आणि अमनस्काचें मन व बुद्धीहि, ही आपणच होते २. त्या निराकाराचा आकार होते, निर्व्यापाराचा व्यापार होते व निरहंकाराचा अहंकारहि आपणच स्वतः होऊन राहते ३. त्या नामरहिताचें नांव हीच, व त्या जन्मरहिताचें जन्म हीच होते आणि त्याचे कर्म व त्याची क्रियाहि आपणच होऊन राहते ४. त्या निर्गुणाचे गुण ही होते. त्या अचरणाचे चरण होते, त्या श्रवण रहिताचे कान ही होते व अचक्षूचे नेत्र आपणच होऊन रहाते ५. त्या भावातीताचे भाव, ही निरवयवाचे अवयव होते, किंबहुना!! माया आपण स्वतःच त्या ब्रह्मस्वरूप पुरुषाचे सर्व कांहीं बनते ६. याप्रमाणें प्रकृति ही आपल्या सामर्थ्यानें त्या अविकारी ब्रह्माला विकारवश करिते ७. ज्याप्रमाणें अमावास्येच्या दिवशीं चंद्राचें तेज लोपतें. त्याप्रमाणें ब्रह्माचें विशेष तेज या प्रकृतीकडून आच्छादिले जाते ८. उत्तम प्रकारच्या सोन्यांत जर वालभरच अन्य हिणकस धातु मिसळली तर त्या सर्व सोन्याचा कस जसा पांचावर येतो म्ह. कमी लागतो ९. अथवा सदाचारी मनुष्यहि संध्याकाळीं अपवित्र जागेंत गेला असतां पिशाच्च हे त्याचे अंगांत संचार करून त्यास जसा वेडा करते. अथवा ढग जसे दोन प्रहरच्या वेळीं स्वच्छ आकाशांत प्रकाशास आच्छादित करून सुदिनाचा दुर्दिन करतात १०१०. ज्याप्रमाणें गाईचे पोटांत दूध असते किंवा लांकडांत अग्नि असतो अथवा उत्तम तेजस्वी रत्नाचें तेज वस्त्रांत गुंडाळून घेतल्यावर बाहेर पडत नाहीं ११. राजा पराधीन झाल्यावर निस्तेजित होतो किंवा सिंह रोगग्रस्त झाल्यावर ज्याप्रमाणें निस्तेजित होतो. त्याप्रमाणें पुरुष प्रकृतीच्या आधीन झाल्यावर स्वतःच्या विशेष तेजाला मुकतो १२. झोंप जशी जागृत अवस्थेंत असलेल्या पुरुषाला निद्रेनें आपल्या आधीन केले असतां सहज स्वप्नांतील सुखदुःख भोगावयास लावते १३. त्याप्रमाणें प्रकृतीच्या आधीन झाल्यामुळें पुरुषाला गुण भोगणे भाग पडते. ज्याप्रमाणें उदासीन पुरुष असला तरी एकदां कां स्त्रीच्या आधीन झाला, म्हणजे तिच्या नादानें अगदी वेडाच होऊन जातो १४. त्याप्रमाणें तें ब्रह्म स्वभावतः जन्मरहित आणि नित्य

१ अतिशय. २ मंडपी. ३ वसंत ऋतु. ४ सभाग्य. ५ शब्दमय वस्त्राची. ६ धाड. ७ ध्वनीची. ८ घर. ९ शून्यांत. १० येथवर. ११ आटोपते, आकळिते. १२ अजिवात. १३ उत्पत्ति. १४ स्थान. १५ इच्छारहिताची. १६ अनिर्वचनीयाचें. १७ अपरिमिताचें १८ इयत्ता. १९ मनोविकाररहिताचें. २० जन्मरहिताचें. २१ प्रकृतिस्थितींत. २२ डांक, हीण. २३ सोनें. २४ पांच नंबरी कसांचें, हलक्या किंमतीचें. २५ भ्रमवितो. २६ वेडा होतो. २७ मळवटीचा दिवस, मेघाच्छादित दिवस. २८ झांकून, गुंडाळून. २९ व्यापला. ३० सुखदुःखभोगास. ३१ स्त्रीच्या योगानें. ३२ अडकतो, आधीन होतो. ३३ जन्मरहिताला.

आंगीं जन्ममृत्यूचे घाये । वाजती जैं लाहे । गुणसंगातें ॥ १५ ॥ परी तें ऐसें पंडुसुता । तातलें लोह पिटितां । जेवीं वन्हिसीचि घातां । बोलती तया ॥ १६ ॥ कां आंदोळलिया उदक । प्रतिभा होय अनेक । तें नानात्व म्हणती लोक । चंद्रीं जेवीं ॥ १७ ॥ दर्पणाचिया जवळिका । दुजेपण जैसें ये मुखा । कां कुंकुमें स्फटिका । लोहितत्वें ये ॥ १८ ॥ तैसा गुणसंगमें । अजन्मा हा जन्मे । पावतु ऐसा गमे । एऱ्हवीं नाहीं ॥ १९ ॥ अधमोत्तमा योनी । यासि ऐसिया मानी । जैसा संन्यासी होय स्वप्नीं । अंत्यजादि जाती ॥ १०२० ॥ म्हणौनि केवळा पुरुषा । नाहीं होणें भोगणें देखा । येथ गुणसंगुचि अशेखा- । लागीं मूळ ॥ २१ ॥

उपद्रष्टाऽनुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः । परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥

हा प्रकृतिमाजीं उभा । परी जुई जैसा बोथंबा । इया प्रकृति पृथ्वी नभा । तेतुला पाडु ॥ २२ ॥ प्रकृतिसरितेच्या तटीं । मेरु होय हा किरीटी । माजीं बिंबे परी लोटीं । लोटों नेणे ॥ २३ ॥ प्रकृति होय जाये । हा तो असतुचि आहे । म्हणौनि आब्रह्माचें होये । शासन हा ॥ २४ ॥ प्रकृति येणें जिये । याचिया सत्ता जग बिये । इयालागीं इये । वरयेतु हा ॥ २५ ॥ अनंतें काळें किरीटी । जिया मिळती इया सृष्टी । तिया रिगती ययाच्या पोटीं । कल्पांतसमयीं ॥ २६ ॥ हा महद्ब्रह्मगोसावी । ब्रह्मगोळ लाघवी । अपारपणें मवी । प्रपंचातें ॥ २७ ॥ पैं या देहामाझारीं । परमात्मा ऐसी जे परी । बोलिजे तें अवधारीं । ययातेंचि ॥ २८ ॥ अगा प्रकृतिपरौता । एकु आथी पंडुसुता । ऐसा प्रवादु तो तत्त्वता । पुरुष हा पैं ॥ २९ ॥

य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह । सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥

जो निखळपणें येणें । पुरुषा यया जाणे । आणि गुणांचें करणें । प्रकृतीचें तें ॥ १०३० ॥ हें रूप हे छाया । पैल जळ हे माया । ऐसा निवाडु धनंजया । जेवीं कीजे ॥ ३१ ॥ तेणें पांडें अर्जुना । प्रकृतिपुरुषविवेचना । जयाचिया मना । गोचर जाहली ॥ ३२ ॥ तो शरीरांचेनि मेळें । करूं कां कर्में सकळें । परी आकाश धुंई न मैळे । तैसा असे ॥ ३३ ॥ आथिलेनि देहें । जो न घेपे देहमोहें । देह गेलिया नोहे । पुनरपि तो ॥ ३४ ॥ ऐसा तया एकु । प्रकृति

आहे, तरीपण तें प्रकृतीच्या आधीन होऊन त्याला गुण-संग झाला म्हणजे त्याच्या अंगावर जन्ममृत्यूचे घाव बसूं लागतात १९. परंतु अर्जुना! तें असें आहे कीं, तापलेल्या लोखंडावर घणाचे घाव घालतेवेळीं ते घाव अग्नीवर बसतात असें जसें लोक म्हणतात १६. किंवा पाणी हालले म्हणजे त्यांत चंद्राचीं अनेक प्रतिबिंबें दृष्टीस पडतात व त्यावेळीं अज्ञानी लोक चंद्राचे ठिकाणीं जसें अनेकत्व कल्पितात १७. आरशांत तोंड पाहिल्या-वर त्या सान्निध्यामुळें ज्याप्रमाणें एकाच मुखाला दुसरे-पणा आल्याचे दृष्टीस पडते किंवा केशरावर वा कुंकवा-वर स्फटिक मणि ठेवला म्हणजे त्या सान्निध्यामुळें स्फटि-कांस जसा लालपणा आलेला दिसतो १८. त्याप्रमाणें, गुणांच्या संगतीनें, जन्मरहित जो पुरुष तो जन्म घेतो असें वाटतें, परंतु खरोखर पाहूं गेलें असतां त्याला जन्म वगैरे कांहीं नाहीं १९. ज्याप्रमाणें एखादा संन्यासी स्वप्नांत, आपण अंत्यजादि जातींत प्रविष्ट झालों आहों असें पाहतो, त्याप्रमाणें या पुरुषाच्या ह्या उत्तम, अधम योनी आहेत, असें तूं समज १०२०. म्हणून केवळ [ प्रकृतिरहित ] पुरुषाला जन्मणे, व सुखदुःख भोगणें यांतील कांहीं नाहीं असें समजा या सर्वांचे मूळ कारण प्रकृतीच्या गुणांचा [ अध्यासिक ] संबंधच होय २१.

**अन्वयार्थ**--**उपद्रष्टा**-समीप राहून पाहणारा-**अनुमन्ता**-अनुमोदन देणारा-**च**--आणि--**भर्ता**--भरण पोषण करणारा-**भोक्ता**-भोग घेणारा-**महेश्वरः**-सर्व ईश्वरांचाहि ईश्वर-**परमात्मा इति च अपि**-परमात्मा असेंहि पण-**उक्तः**-बोललेला-**अस्मिन् देहे**-या देहांत-**परः पुरुषः**-पर पुरुष आहे २२.

हा पुरुष प्रकृतीचे ठिकाणीं स्थित आहे, पण तो जुईच्या वेलीला टेंका देण्याकरितां उभा केलेला खांब, ज्याप्रमाणें त्या वेलीच्या सर्व विकारांपासून अलिप्त असतो त्याप्रमाणें पुरुष प्रकृतीस आश्रय असून तत्त्वतः अलिप्त आहे आणि प्रकृती व पुरुष यांत जमीन आकाशाइतकें अंतर आहे २२. अर्जुना! प्रकृतिरूप नदीच्या तीरा-वर मेरु पर्वताप्रमाणें हा अचल उभा असतो आणि याचें प्रतिबिंब जरी त्या नदींत पडलेलें असतें तरी तिच्या प्रवाहानें हा वाहून जात नाहीं २३. प्रकृतीची कार्यें उत्पन्न होतात व प्रकृतिसह लयहिं पावतात तथापि हा [ पुरुष ] कायमच असतो. म्हणून मुंगीपासून तो थेट ब्रह्मदेवापर्यंतच्या सर्वांचा हा शास्ता आहे २४. प्रकृति याचे योगानें जगते व याच्याच सत्तेनें ती जगास निर्माण करिते म्हणून हा प्रकृतीचा भर्ता-पति होय २५. हें किरीटी अनंत कालापासून चालत आलेली सृष्टि कल्पांत-समयीं याचेच पोटांत लय पावते २६. हा प्रकृतीचा स्वामी आहे व या ब्रह्मांडाचा सूत्रधार आहे व आपल्या थोर निरपेक्ष व्यापकपणानें प्रपंचाला अजमावणारा आहे २७. व या देहांत परमात्मा आहे म्हणून जे म्हणतात, तो हाच होय, असें समज २८. हें पंडुसुता! प्रकृतीच्या पलीकडे एक पुरुष आहे, असे जें म्हणतात तो खरोखर हाच पुरुष होय २९.

**अन्वयार्थ**--**यः**-जो-**एवं**-या प्रकारें-**पुरुषं**-पुरुषाला **च**-व-**गुणैः सह प्रकृतिं**-गुणांसह प्रकृतीला-**वेत्ति**-जाणतो-**सः**-तो-**सर्वथा वर्तमानः अपि**-कसाहि जरी वागत असला तरी-**भूयः**-पुनरपि-**न अभिजायते**-उत्पन्न होत नाहीं, जन्म घेत नाहीं २३.

जो या पुरुषाला याप्रमाणें पूर्णपणें शुद्धस्वरूपानें जाणतो आणि तसेंच, सर्व गुण व कर्में प्रकृतीचीच आहेत असें जाणतो १०३०. अरे! धनंजया! हें रूप, व ही त्याची छाया, हें पलीकडील दिसणारे सत्यजल आहे व हें पलीकडील दिसणारे मृगजल आहे, असा निर्णय ज्याप्रमाणें शहाणा मनुष्य करितो ३१. त्याप्रमाणें अर्जुना! प्रकृति व पुरुष यांच्या स्वरूपांतील यथार्थ विचार ज्याच्या मनाला कळला आहे ३२. तो शरीराच्या साह्यानें सर्व कर्में करीना कां! तरीपण आकाश जसें धूळ उंच उडाल्यानें मळत नाहीं, तसा तो प्रकृतीच्या कर्मानें मुळींहि लिप्त होत नाहीं ३३. जिवंतपणीं देह असतांना तो देहाच्या मोहांत पडून प्रकृतीच्या आधीन होत नाहीं, तो देह गेल्यावर पुनः जन्म पावत नाहीं, म्हणजे जन्ममरणापासून मुक्त होतो ३४. अशा तऱ्हेचा प्रकृतिपुरुषांच्या यथार्थ

१ तापलेलें. २ घाव. ३ हालले असतां. ४ प्रतिबिंब. ५ अनेकत्व. ६ आरक्तता, तांबडेपणा. ७ मान, समज. ८ टेंका. ९ सर्व जगाचें. १० शास्ता. ११ भर्ता. १२ मायेचा स्वामी. १३ ब्रह्मांडगोलकाचा सूत्रधार, ब्रह्मांड-चालक. १४ गणना करितो. १५ एकविधी. १६ बोली, भाषा, चर्चा. १७ शुद्धपणें. १८ मृगजळ. १९ निर्णय. २० त्याप्रमाणें. २१ शरीरानें २२ धुरळ्यानें २३ प्राप्त झालेल्या, असल्या.

पुरुषविवेकु । उपकारु अलौकिकु । करी पैं गा ॥ ३५ ॥ परी हाचि अंतरीं । विवेक भानूचिया परी । उदैजे तें अवधारीं । उपाय बहुत ॥ ३६ ॥

ध्यानेनाऽऽत्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना । अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥

कोणी एकु सुभटा । विचाराचा आगिटां । आत्मानात्मकिटा । पुटें देउनी ॥ ३७ ॥ छत्तीसही वानी भेद । तोडोनियां निर्विवाद । निवडिती शुद्ध । आपणपें ॥ ३८ ॥ तया आपणपयाच्या पोटीं । आत्मध्यानाचिया दिठी । देखती गा किरीटी । आपणपेंचि ॥ ३९ ॥ आणिक पैं दैवेंबगें । चित्त देती सांख्ययोगें । एक ते अंगलगें । कर्माचेनी ॥ १०४० ॥

अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वाऽन्येभ्य उपासते । तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥

येणें येणें प्रकारें । निस्तरती साचोकारें । हें भंवा भेउरें । आघवेंचि ॥ ४१ ॥ परी ते करिती ऐसें । अभिमानु दवडूनि देशें । एकाचिया विश्वासें । टेंकती बोला ॥ ४२ ॥ जे हिताहित देखती । हानि कणवा घेपति । पुसोनि शिणु हरिती । देती सुख ॥ ४३ ॥ तयांचेनि मुखें जें निघे । तेतुलें आदरें चांगें । ऐकोनियां आंगें । मनें होती ॥ ४४ ॥ तया ऐकणेयाचि नांवें । ठेविती गा आघवें । तया अक्षरांसीं जीवें । लोण करिती ॥ ४५ ॥ तेही अंतीं कपिध्वजा । इया मरणार्णव-समाजा- । पासूनि निघती वोजा । गोमटिया ॥ ४६ ॥ ऐसेसे हे उपाये । बहुवस एथें पाहें । जाणावया होये । एकी वस्तु ॥४७॥ आतां पुरे हे बहुत । पैं सर्वार्थांचें मथित । सिद्धांतनवनीत देऊं तुज ॥ ४८ ॥ येतुलेनि पंडुसुता । अनुभव लाहाणा आयिता । येर तंव तुज होतां । सायास नाहीं ॥ ४९ ॥ म्हणौनि ते बुद्धि रचूं । मतवाद हे खांचूं । सोलीव निर्वचूं । फलितार्थुची ॥ १०५० ॥

यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावर जंगमम् । क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥

तरी क्षेत्रज्ञ येणें बोलें । तुज आपणपें जें दाविलें । आणि क्षेत्रही सांगितलें । आघवें जें ॥ ५१ ॥ तया येरयेरांच्या मेळीं । होईजे भूतीं सकळीं । अनिलसंगें सलिलीं । कल्लोळ जैसे ॥ ५२ ॥ कां तेजा आणि उखरा । भेटी जालिया वीरा । मृगजळाचिया पूरा । रूप होय ॥ ५३ ॥ नाना धाराधरधारीं । झळंबलिया वसुंधरी । उठिजे जेवीं अंकुरीं । नानाविधीं ॥ ५४ ॥ तैसें चराचर आघवें । जें कांहीं जीवु नांवें । तें तों उभययोगें संभवे । ऐसें जाण ॥ ५५ ॥ इयालागीं अर्जुना । क्षेत्रज्ञा प्रधाना- । पासूनि न होती भिन्ना । भूतव्यक्ती ॥ ५६ ॥

यथार्थ विचार जो करील त्या पुरुषावर एक लोकोत्तर उपकार तो करतो ३५. आतां अन्तःकरणामध्यें हाच विचार सूर्याप्रमाणें उदय पावेल असे उपाय पुष्कळ आहेत ते ऐक ३६.

**अन्वयार्थ—केचित्**—कांहीं योगी—**आत्मानं**—प्रत्यगात्म्याला—**आत्मनि**—बुद्धींत—**ध्यानेन**—ध्यानानें—**आत्मना**—सुसंस्कृत झालेल्या अन्तःकरणानें—**पश्यन्ति**—पाहतात—**अन्ये**—दुसरे—**सांख्येन योगेन**—सांख्य योगानें—**च**—आणि—**अपरे**—दुसरे कित्येक—**कर्मयोगेन**—ईश्वरार्पण बुद्धीनें केलेल्या कर्मानुष्ठानानें—[ **पश्यन्ति** ] त्याला पाहतात २४.

हे सुभटा ! कोणी विचाररूप अग्नींत श्रवणमननिदिध्यासरूपी पुटें देऊन, आत्म्यावरील अनात्मरूप किटाळ काढून टाकून आत्मरूप सुवर्ण शुद्ध करतात ३७. अनात्मरूप छत्तीसहि भेदरूपी हिणकस जाळून [ विचाराने निरास करून ] आपले शुद्ध तत्त्व निवडून घेतात ३८. मग अर्जुना ! त्या आत्मस्वरूपाचे पोटांत आत्मज्ञानाच्या, ध्यानाच्या दृष्टीनें आपलेच आत्मस्वरूप पाहतात ३९. आणि कोणी भक्तिमार्गानें, कोणी सांख्ययोगानें म्हणजे वरील विचाराच्या योगानें; तर कोणी कर्मयोगाच्या आधारानें [ आत्म्याकडे ] चित्त देतात व आत्मस्वरूपाची ओळख करून घेतात १०४०.

**अन्वयार्थ—तु**—पण-**एवं**—वर सांगितलेल्या उपायांतील एकाहि उपायानें—**अजानन्तः**—आत्म्याला न जाणणारे—**अन्ये** – दुसरें—कांहीं साधक—**अन्येभ्यः** – दुसऱ्या आचार्यांपासून—**श्रुत्वा**—याचेंच चिंतन करा, असें ऐकून—**उपासते**—श्रद्धेनें उपासना करितात—**ते श्रुतिपरायणाः अपि—ते** श्रवणपरायण असलेले साधकहि—ज्यांच्या मोक्षमार्गप्रवृत्तीचें श्रवण हेंच परम साधन आहे ते सुद्धां—**मृत्युं**—मृत्युयुक्त संसारास—**अतितरन्ति एव च**—उल्लंघून जातातच २५.

अशा प्रकारानें खरोखर या संसाररूप भ्रांतिसागरांतून सर्व तरून जातात ४१. पण तें असें करितात; कोणी अभिमान टाकून, श्रद्धेनें एका सज्जनाच्या किंवा श्रीगुरूंच्या शब्दावर विश्वास ठेवतात ४२. कोणाच्या शब्दावर विश्वास ठेवतात असें म्हणशील तर जे पुरुष प्राणिमात्रांचें हित कशांत आहे व अहित कशांत आहे हें यथार्थ जाणून आणि शिष्याची हानी होणार म्हणून कळकळीनें व्यापिले जातात व त्यांची ज्यांत हानि असेल ती आपण होऊन विचारून नाहींशी करितात व त्यांस सुख देतात ४३.

मग त्या पुरुषाच्या मुखांतून जे जेवढे शब्द निघतील ते तेवढे सर्व उत्तम रीतीनें आदरपूर्वक श्रवण करून आपलें तन व मन त्यांचे ठिकाणीं अर्पण करून ते तसेंच होतात ४४. आणि त्या श्रवण करण्यालाच दान, धर्म, तप इत्यादि सर्व कर्तव्याची नांवें ठेवतात. फार काय सांगावें ! ! त्या सत्पुरुषाच्या मुखांतून निघणाऱ्या अक्षरांवरून जिवाचें लिंबलोण उतरून, ओवाळून टाकतात ४५. हे कपिध्वजा ! अशा रीतीनें जे वागतात, ते देखील अंतीं ह्या मृत्युरूप समुद्रसमुदायापासून [ जन्ममरणात्मक अनर्थ परंपरेंतून ] उत्तम प्रकारें पार पडतात ४६. याप्रमाणें एकमेव ब्रह्मवस्तु जाणण्याचे या मृत्युलोकीं पुष्कळ मार्ग आहेत ४७. पण आतां हे बहुत उपाय राहूं दे. त्या सगळ्यांचें मंथन करून सिद्धांतरूप नवनीत तुझ्या हातांत देतों ४८. त्यामुळें अर्जुना ! तुला सहज, आयता अनुभव येईल व तुला ब्रह्मरूप होण्यास श्रम पडणार नाहींत ४९. म्हणून इतर मतवाद्यांचे खंडन करून विचारानें सिद्धांत ठरवून, व्यवस्थित मंडन करून केवळ शुद्ध तत्त्व, तात्पर्यार्थ तुला विस्तारानें सांगतों १०५०.

**अन्वयार्थ—भरतर्षभ**—हे भरतश्रेष्ठा !—**यावत् किंचित्**—जेवढें कांहीं—**स्थावरजंगमम्**—अचर किंवा चर—**सत्त्वं**—प्राणिजात—**संजायते**—उत्पन्न होतें—**तत्**—तें सर्व तूं—**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्**—क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून होतें, असें—**विद्धि**—जाण २६.

तरी 'क्षेत्रज्ञ' या शब्दानें जें तुला आम्हीं आत्मतत्त्व म्हणून सांगितलें आणि 'क्षेत्र' म्हणून जें सर्व कांहीं अनात्मा म्हणून सांगितलें ५१. त्या परस्परांच्या ऐक्याध्यासापासून या सर्व सृष्टीची, भूतांची उत्पत्ति होते; वाऱ्याच्या संयोगानें ज्याप्रमाणें उदकांत लाटा उत्पन्न होतात ५२. किंवा हे वीरा ! प्रखर सूर्यकिरणें व उखर भूमी यांचा संबंध झाला असतां जसा मृगजळाच्या महापुरामध्यें लाटावर लाटा निर्माण होतात ५३. अथवा पावसाच्या धारा पृथ्वीवर पडून त्यानें भिजलेल्या जमिनीवर ज्याप्रमाणें कोट्यवधि अंकूर उगवलेले दिसतात ५४. त्याप्रमाणें सर्व चराचर—ज्याला ज्याला म्हणून 'जीव' असें नांव आहे, तें सर्वहि या दोघांच्या संयोगापासून उत्पन्न होतें, असें समज ५५. यास्तव अर्जुना ! या प्रत्यक्ष गोचर सर्व भूतव्यक्ति पुरुष व प्रकृति यांहून भिन्न नाहींत ५६.

१ ज्ञान. २ आगींत, शेगडींत. ३ आत्म्यावरील अनात्मरूपी हीणाला. ४ कसाचे भेद. ५ नाहींसे करून. ६ देवयोगानें. ७ आश्रयानें. ८ तरून जातात. ९ खरेपणानें. १० संसार. ११ भ्रांति, भय.

समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् । विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥

पैं पटत्व तंतु नव्हे । तरी तंतूसीचि तें आहे । ऐसें खोलीं डोळां पाहें । ऐक्य हें गा ॥ ५७ ॥ भूतें आघवींचि होती । एकाचीं एक आहाती । परी तूं प्रतीती । यांची घे पां ॥ ५८ ॥ यांची नामेंही आनानें । अनारिसीं वर्तनें । वेषही सिनानें । आघवेयांचे ॥ ५९ ॥ ऐसें देखोनि किरीटी । भेद सूसी हन पोटीं । तरी जन्माचिया कोटी । न लाहसी निघों ॥ १०६० ॥ पैं नानाप्रयोजनशीळें । दीर्घें वक्रें वर्तुळें । होती एकाचींच फळें । तुंबिणीयेचीं ॥ ६१ ॥ होतु कां उजू वांकुडें । परी बोरींचे हें न मोडे । तैसीं भूतें अवघडें । परी वस्तु उजू ॥ ६२ ॥ अंगारकणीं बहुवसीं । उष्णता समान जैशी । तैसा नाना जीवराशीं । परेशु असे ॥ ६३ ॥ गगनभरी धारा । परी पाणी एकचि वीरा । तैसा या भूताकारा । सर्वांगीं तो ॥ ६४ ॥ हे भूतग्राम विषम । परी वस्तु ते एथ सम । घटमठीं व्योम । जियापरी ॥ ६५ ॥ हा नाशतां भूताभासु । एथ आत्मा तो अविनाशु । जैसा केयुरादिकीं कसु । सुवर्णाचा ॥ ६६ ॥ एवं जीवधर्महीनु । जो जीवेंसीं अभिन्नु । देख तो सुनयनु । ज्ञानियांमाजीं ॥ ६७ ॥ ज्ञानाचा डोळा डोळसां- । माजीं डोळसु तो वीरेशा । हे स्तुति नोहे बहुवसा । भाग्याचा तो ॥ ६८ ॥

समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् । न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८ ॥

हे गुणेंद्रिय धोकोटी । देह धातूंची त्रिकुटी । पांचमेळावा वोखटी । दारुण हे ॥ ६९ ॥ हे उघड पांचवेउली । पंचधां आगी लागली । जीवपंचानना सांपडली । हरिणकुटी हे ॥ १०७० ॥ ऐसा असोनि इये शरीरीं । कोण नित्यबुद्धीची सुरी । अनित्यभावाच्या उदरीं । दाटीचिना ॥ ७१ ॥ परी इये देहीं असतां । जो नयेचि आपणया घाता । आणि शेखीं पंडुसुता । तेथेंचि मिळे ॥ ७२ ॥ जेथ योगज्ञानाचिया प्रौढी । वोलांडूनियां जन्मकोडी । न निगों इया भाषा बुडी । देती योगी ॥ ७३ ॥ जें आकाराचें पैल तीर । जें नादाची पैल मेर । तुर्येचें माजघर । परब्रह्म जें ॥ ७४ ॥ मोक्षासकट गती । जेथें येती विश्रांती । गंगादि आपांपती । सरिता जेवीं ॥ ७५ ॥ तें सुख येणेंचि देहें । पाय पाखाळणिया लाहे । जो भूतवैषम्यें नोहे । विषमबुद्धी ॥ ७६ ॥

**अन्वयार्थ**—**यः**–जो–**विनश्यत्सु**–विनाश पावणाऱ्या –**सर्वेषु भूतेषु**–सर्व भूतांमध्यें–**समं तिष्ठन्तं**–सम असलेल्या–**अविनश्यन्तं**–विनाश न पावणाऱ्या–**परमेश्वरं** –परमेश्वराला–**पश्यति**–पाहतो–**सः**–तो–**पश्यति**–यथार्थपणें पाहतो २७.

हें पहा, वस्त्रत्व हें जरी तंतु नव्हे, तरी तें तंतूवरच आधारलेलें आहे, याप्रमाणें विवेकपूर्ण दृष्टीनें पुरुष आणि प्रकृति यांच्यामधील ऐक्य तूं पहा! ५७. हीं सर्व भूतें एकापासून एक निर्माण झालेलीं आहेत, पण तूं यांचा अनुभव असा घे ५८. त्याचप्रमाणें त्यांचीं नांवें निरनिराळीं आहेत त्यांची वर्तनेंहि भिन्न भिन्न आहेत आणि सर्वांचें वेषहि तऱ्हेतऱ्हेचे आहेत ५९. असें पाहून जर तूं आपल्या मनांत द्वैत कल्पनेचा शिरकाव होऊं देशील म्ह. आत्मा व भूतें याच्या ठिकाणीं भेद आहे, असा निश्चय करशील तर अर्जुना! तूं या संसारांतून कोट्यवधि जन्मापर्यंत पार पडणार नाहींस १०६०. ज्याप्रमाणें एकाच भोपळ्याच्या वेलाला अनेक कार्यास उपयोगी असणारे व आकारानेंहि लांब, वाटोळे व वांकडे असे भोपळे येतात ६१. बोरीच्या झाडाची फांदी सरळ असो किंवा–वांकडी असो पण ती बोरीचीच आहे, यांत अन्यथा नाहीं. त्याप्रमाणें जीव मात्र जरी भिन्न भिन्न प्रकारचें असले तरी त्यांतील आत्मा म्हणून जी वस्तु आहे ती सरळच, समानच आहे ६२. विस्तवाच्या ठिणग्या जरी पुष्कळ असल्या तरीहि–त्यांची उष्णता एकच असते त्याप्रमाणें पुष्कळ जीवराशी जरी असल्या तरी त्यांतील [ अधिष्ठान ] परमात्मा एकच आहे ६३. वीरा अर्जुना! पावसाच्या धारा जरी सर्व आकाशभर असल्या, तरी त्यांतील पाणी जसे एकच आहे, त्याचप्रमाणें हे भूतांचे आकार जरी निरनिराळे असले तरी सर्वांचें ठिकाणीं परमात्मा म्हणून जो आहे तो एकच आहे ६४. घट अथवा मठ यांतील आकाश जरी निरनिराळ्या आकारांचें दिसत असलें तरी तें आकाशरूपानें एकच असतें, त्याप्रमाणें भूतसमूह जरी निरनिराळे असले, तरी त्यांतील आत्मा म्हणून जी वस्तु आहे ती मात्र एकच आहे ६५. सुवर्णाचें बाहुभूषणें इत्यादि अलंकार जरी पुष्कळ असले तरी सर्वांतील सोन्याचा कस एकच असतो, त्याप्रमाणें हा भूतांचा भास नाशवंत आहे व त्या सर्वांतील आत्मा हा अविनाशी आहे ६६. याप्रमाणें व्यावहारिक जीवधर्माहून वेगळा आणि पारमार्थिक जीवाशीं अभिन्न असा परमात्मा आहे, असें जो ज्ञानी लोकांत वागतो, तोच ज्ञान्यांमध्यें उत्तम डोळस होय ६७. असें ज्ञानाच्या दृष्टीमुळें जे डोळस आहेत, त्यांच्यांतीलहि हाच मुख्य डोळस होय. अर्जुना! ही त्याची मी स्तुति करितों, असें मुळींच नाहीं. फार काय सांगूं!! तोच परम भाग्यवान् पुरुष आहे ६८.

**अन्वयार्थ**—**हि**–कारण–**सर्वत्र**–सर्व भूतांमध्यें–**समवस्थितं** समानत्वानें–एकरूपानें अवस्थित असलेल्या–**ईश्वरम्**–ईश्वराला **समं**–सम–**पश्यन्**–पाहाणारा **आत्मना आत्मानम्**–आपणच आपल्याला–**न हिनस्ति**–मारीत नाहीं–हिंसा–करीत नाहीं–**ततः**–त्यामुळें–**परां गतिं**–परमगतीला–**याति**–जातो २८.

[ आतां अनात्म पदार्थांची स्थिति पहा ] हें शरीर म्हणजे गुण व इंद्रियें यांची एक धोकटी आहे वात, पित्त व कफ या धातूंनीं हें बनलेलें आहे. अर्थात् वाईट अशा पंचतत्त्वांनीं बनलेलें असून हें भयंकर आहे ६९. हें उघड उघड पांच नाग्यांची इंगळीच होय; याला पांच प्रकारचे अग्नि लागले आहेत किंवा जीवरूप सिंहाला शरीररूपी हरिणाचे एक खोपटच सांपडलें आहे १०७०. वास्तविक सिंहाला ज्याप्रमाणें हरिणाच्या खोपटीचा नाश करून टाकण्यास कांहींच प्रयास नाहीं, त्याप्रमाणें जीवानें अनित्य शरीरादिकांचा बाध करून टाकण्यास कांहींच अडचण नाहीं तथापि काय चमत्कार सांगावा! जीव हा तत्त्वतः नित्य [ ज्ञानस्वरूप, असंग ] आहे, तशी नित्य उपलब्धिस्वरूप बुद्धिरूपी सुरी अनित्य जे देहादिक यांच्या पोटांत घालून त्याचा बाध करीतच नाहींत ७१. तथापि अर्जुना! जो ज्ञानी आहे, तो मात्र या देहांत असूनहि [ देहात्मत्व भ्रांतीनें आपला ] घात करून न घेतां शेवटीं तेथेंच–ब्रह्मपदालाच जाऊन मिळतो ७२. योगीजन योग व ज्ञान यांच्या बलानें कोट्यवधि जन्म–ओलांडून 'आतां पुनः माघारें वळणें नाहीं' अशा प्रतिज्ञेनें ज्या [ ब्रह्मस्वरूपाच्या ] ठिकाणीं बुडी देऊन राहतात ७३. तें ठिकाण कोणाचें म्हणशील तर जें आकारजातरूपी–नदीचें पैलतीर [ निराकार ] आहे व नदीचीहि पलीकडील कड आहे व तुर्यावस्थेचें जे माजघर आहे, ज्याला 'परब्रह्म' असें म्हणतात ७४. आणि ज्याप्रमाणें गंगादि नद्या निरंतर विश्रांतीसाठीं समुद्राला जाऊन मिळतात, त्याप्रमाणें मोक्षासहवर्तमान सर्व गती, साध्यें ज्या ब्रह्माचें ठिकाणीं विश्रांतीला येतात ७५. जो भूतांच्या वैषम्यामुळें विषमबुद्धि होत नाहीं, त्याला तें सुख याच देहांत पाय धुवावयास सांपडतें, [ तें सुख लोटांगण घालीत आपण होऊन त्याच्या पायांपाशीं येतें ] ७६. पुष्कळ दिवे जरी

दीपांचिया कोडी जैसें । एकचि तेज सरिसें । तैसा जो असतुचि असे । सर्वत्र ईशु ॥ ७७ ॥ ऐसेनि समत्वें पंडुसुता । जिये जो देखतं साता । तो मरण आणि जीविता । नागवे फुडा ॥ ७८ ॥ म्हणौनि तो दैवांगळा । वानीत असो वेळोवेळां । जे साम्यसेजे डोळां । लागला तया ॥ ७९ ॥

प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः । यः पश्यति तथाऽऽत्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥

आणि मनोबुद्धिप्रमुखें । कर्मेंद्रियें अशेखें । करी प्रकृतीचि हें देखे । साच जो गा ॥ १०८० ॥ घरींचीं राहटती घरीं । घर कांहीं न करी । अभ्र धांवे अंबरीं । अंबर तें उगें ॥८१॥ तैसी प्रकृति आत्मप्रभा । खेळे गुणीं विविधारंभा । येथ आत्मा तो वोथंबा । नेणे कोण ॥ ८२ ॥ ऐसेनि येणें निवाडें । जयाच्या जीवीं उजिवडें । अकर्तयातें फुडें । देखिलें तेणें ॥ ८३ ॥

यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति । तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥

एऱ्हवीं तैंचि अर्जुना । होईजे ब्रह्मसंपन्ना । जैं या भूताकृती भिन्ना । दिसती एकी ॥ ८४ ॥ लहरी जैसिया जळीं । परमाणुकणिका स्थळीं । रश्मीकरमंडळीं । सूर्याच्या जेवीं ॥ ८५ ॥ नातरी देहीं अवेव । मनीं आघवेचि भाव । विस्फुलिंग सावेव । वन्हीं एकीं ॥ ८६ ॥ तसे भूताकार एकाचे । हें दिठी रिगे जैं साचें । तैंचि ब्रह्मसंपत्तीचें । तारूं लागे ॥ ८७ ॥ मग जया तयाकडे । ब्रह्मेचि दिठी उघडे । किंबहुना जोडे । अपार सुख ॥ ८८ ॥ येतुलेनि तुज पार्था । प्रकृतिपुरुष-व्यवस्था । ठायें ठावो प्रतीतिपथा- । माजीं जाहली ? ॥८९॥ अमृत जैसें ये चुळा । कां निधान देखिजे डोळां । तेतुला जिव्हाळा । मानावा हा । ॥ १०९० ॥ जी जाहलिये प्रतीती । घर बांधणें जें चित्तीं । तें आतां ना सुभद्रापती । इयावरी ॥ ९१ ॥ तरी एक दोन्ही ते बोल । बोलिजती सखोल । देईं मनातें वोल । मग तें घेईं ॥ ९२ ॥ ऐसें देवें म्हाणितलें । मग बोलों आदरिलें । तेथें अवधानाचेचि केलें । सर्वांग येरें ॥ ९३ ॥

अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्माऽयमव्ययः । शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥

तरी परमात्मा म्हाणिपे । तो ऐसा जाण स्वरूपें । जळीं जळें न लिंपे । सूर्यु जैसा ॥ ९४ ॥ कां जे जळा आदीं पाठीं । तो असतुचि असे किरीटी । माजीं बिंबें तें दृष्टी । आणिकांचिये ॥ ९५ ॥ तैसा आत्मा देहीं । आथि म्हणिपे हें

असले, तरी त्या सर्वांचें तेज जसे एकच असतें, त्याप्रमाणें पूर्वीपासून [ अनादि, अनंत असा ] जो परमात्मा तो सर्वत्र ओतप्रोत भरलेला आहे ७७. हे पंडुसुता ! याप्रमाणें जीवन असतानांच ज्याचे जीव व आत्मा याविषयीं जो समत्व-एकत्व आहे असें पाहतो. तो जन्ममरणाच्या सपाट्यांत खरोखर सांपडत नाहीं ७८. म्हणून तो मोठा भाग्यवान् आहे अशी त्याची आम्ही वारंवार स्तुति करतों, कारण त्यास तो साम्यरूपी, ब्रह्मभावरूपी शय्येवर डोळा लागलेला असतो ७९.

**अन्वयार्थ—यः** – जो-**कर्माणि**-सर्व कर्मे-**प्रकृत्या एव च**-प्रकृतीकडूनच-ईश्वराच्या शरीरेंद्रियाकार बनलेल्या मायेकडून-**सर्वशः**-सर्व प्रकारें-**क्रियमाणानि**-केलीं जाणारीं-**पश्यति**-पाहतो-**तथा**-त्याचप्रमाणें-**आत्मानम् अकर्तारम्**-आत्म्याला अकर्ता- **पश्यति** -पाहतो – **सः** [ **पश्यति** ]-तोच वास्तविक तत्त्व पाहतो २९.

आणि मन, बुद्धि ही ज्यांत प्रमुख आहेत अशीं पांच कर्मेंद्रियें व यांचेपासून होणारीं कर्में हीं प्रकृतीच करतें, असें जो पूर्णपणें खरे जाणतो १०८०. घरांतील रहाणारीं माणसें आपापलें सर्व व्यवहार करतात, परंतु घर कांहीं एक करीत नाहीं, तसेंच आकाशांत ढग धांवताना दृष्टीस पडतात; तरीपण आकाश ज्याप्रमाणें स्थिर असतें ८१. त्याप्रमाणें प्रकृति आत्म्याचें प्रकाशानें, गुणांनी युक्त होऊन पुष्कळ कर्मांचा आरंभ करून खेळ खेळते तथापि आत्मा हा खांबाप्रमाणें केवळ आधारभूत असून अचल असतो. ही कर्में कोणी केली हे तो जाणत नाहीं ८२. अशा निर्णयानें अनुभव घेऊन ज्यानें आपल्या हृदयांत आत्मज्ञानाचा प्रकाश पाडला आहे त्यानेंच अकर्त्या आत्म्याला पूर्णपणें खरोखर जाणलें असें समज ८३.

**अन्वयार्थ—यदा**- जेव्हां – **भूतपृथग्भावं**-भूतांचा पृथक्पणा-**एकस्थम्**-एका आत्म्यामध्येंच स्थित आहे असें-**अनुपश्यति**-शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाप्रमाणें पाहतो-**च**-आणि-**ततः एव**-त्या एक आत्म्यापासूनच-**विस्तारं**-भूतांचा विस्तार-[ **पश्यति** ]-पाहतो -**तदा**-त्यावेळीं-**ब्रह्मसंपद्यते**-साधक ब्रह्म बनतो ३०.

सहज विचार करून पाहिले तर अर्जुना ! ज्या वेळेस आकारानें भिन्न भिन्न असलेलीं भूतें तत्त्वतः एकच आहेत असें पाहील त्या वेळेसच त्यांस ब्रह्मसंपन्न होता येईल असें जाण ८४. ज्याप्रमाणें पाण्यावरील लाटा किंवा जमिनीवरील परमाणूंचे कण, अथवा सूर्यमंडळांतील सूर्यकिरणें ८५. अथवा देहांतील सर्व अवयव, मनांतील सर्व भावभावना व विस्तवापासून निघणाऱ्या सर्व ठिणग्या, या सर्व गोष्टी आपल्या उत्पत्तिस्थानापासून भिन्न दिसल्या, तरी ज्या भूमिकेपासून त्या उत्पन्न झाल्या आहेत, त्यांच्याशीं त्या साम्यत्वानेंच-एकरूपच असतात. ८६. त्याप्रमाणें खऱ्या विचार दृष्टीनें पाहिले असतां [ विश्व प्रपंचांतील ] भिन्न भिन्न भूताकार [ अखिल विश्व ] एकाचाच आहे. किंबहुना ! ! एकमेव परमात्मरूपच आहे असें जेव्हां दृष्टींत भरेल [ अनुभवास येईल ] त्यालाच ब्रह्मरूप संपत्तीचें जहाज सांपडेल ८७. मग तो जिकडे पाहील तिकडे त्याला सर्वत्र ब्रह्मच दिसेल. फार काय सांगावें ! ! त्याला अपार सुख होतें ८८. पार्था ! याप्रमाणें तुला प्रकृति व पुरुष यांची व्यवस्था-विचार अनुभव सिद्ध दाखले देऊन सांगितला तो यथार्थ समजला ना ? ८९. अरे ! ज्याप्रमाणें चूळ भरण्यास अमृतच हातांत यावें किंवा ठेवा जसा दृष्टीस पडावा, तेवढ्याच योग्यतेचा हा [ प्रकृति-पुरुष विवेक ] लाभ आहे असें मान १०९०. हे सुभद्रापते ! या प्रतिपादनानें आलेल्या अनुभवावरून तूं त्या प्रतीतीविषयीं आपल्या मनांत जो एक कायम, ठाम निश्चय करणार असशील, तर तो इतक्यांत करू नकोस कारण यावर ९१. तुला आणखी एक दोन गहन-गूढ विचार मी सांगणार आहें, ते तूं आपल्या मनाला जामीन म्हणून दे व मग तो विचार घे ९२. याप्रमाणें भगवंतांनीं बोलून सांगण्यास प्रारंभ केला. तेव्हां आपलें सर्वांग अवधानमय करून अर्जुन ऐकण्यास तयार झाला ९३.

**अन्वयार्थ—अयं परमात्मा**-हा परमात्मा-**अनादित्वात्**-अनादित्वामुळें व **निर्गुणत्वात्**-निर्गुणत्यामुळें-**अव्ययः**-अक्षय आहे-**कौन्तेय**-हे कुंतीपुत्रा ! हा-**शरीरस्थः अपि**-शरीरांत स्थित असलेलाहि-**न करोति**-कांहीं करीत नाहीं व-**न लिप्यते**-कर्मफलानें लिप्त होत नाहीं ३१.

अर्जुना ! ज्याप्रमाणें सूर्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडलें असतां ते सूर्यबिंब त्याजपासून अलिप्त असतें, पाण्यानें ओलें होत नाहीं. त्याप्रमाणें परमात्मा म्हणून ज्याला म्हणतात, तो असा शरीरांत असूनहि प्रकृति गुणांनी लिप्त न होतां शुद्ध स्वरूपच असतो, असें जाण ९४. कारण, हे किरीटी ! सूर्य, पाणी उत्पन्न होण्याचें पूर्वी, अगोदर व नंतरहि होता त्याप्रमाणें कायमच असतो. पाण्यांत तो प्रतिबिंबित झाल्याचें दृष्टीस पडतें. परंतु इतर अज्ञानी लोकांच्या दृष्टीनें त्यांस ते प्रतिबिंब, सूर्यच भासतें ९५. त्याप्रमाणें आत्मा देहांत आहे असें हें म्हटलें जातें.

१ वांचतो. २ पहात असतां. ३ सांपडत नाहीं. ४ खरोखर. ५ दैववान्. ६ वर्णन करितो. ७ घरांतील माणसें.

कांहीं । साचें तरी नाहीं । तो जेथिंचा तेथें ॥ ९६ ॥ आरिसां मुख जैसें । बिंबलिया नाम असे । देहीं वसणें तैसें आत्मतत्त्वा ॥ ९७ ॥ तयां देहा म्हणती भेटी । हे सर्पांयी निर्जीव गोठी । वारिया वाळुवे गांठी । कैंही आहे? ॥ ९८ ॥ आगी आणि कापुसा । दोरा सुवावा कैसा । केउता सांदो आकाशा । पाषाणेंसीं? ॥ ९९ ॥ एक निघे पूर्वेकडे । एक तें पश्चिमेकडे । तिये भेटीचेनि पाडें । संबंधु हा ॥ ११०० ॥ उजियेडा आणि अंधारेया । जो पांडु मृता उंभेयां । तोचि गा आत्मया । देहा जाण ॥ १ ॥ रात्री आणि दिवसा । कनकां आणि कापुसा । अपाडु कां जैसा । तैसाचि यासी ॥ २ ॥ देह तंव पांचांचें जालें । हें कर्माचें गुणीं गुंथलें । भंवतसें चाकीं सूंदलें । जन्म-मृत्यूच्या ॥ ३ ॥ हें कळानळाच्या तोंडीं । घातली लोणियाची उंडी । माशी पांखु पाखडी । तंव हें सरे ॥ ४ ॥ हें विपांयें आगींत पडे । तरी भस्म होऊनि उडे । जाहलें श्वांना वेंरपडें । तरी ते विष्ठा ॥ ५ ॥ या चुके दोहीं काजा । तरी होय कृमींचा पुंजा । हा परिणामु कपिध्वजा । कश्मळु गा ॥ ६ ॥ या देहाची हे दशा । आणि आत्मा तो एथ ऐसा । पैं नित्य सिद्ध ओपैसा । अनादिपणें ॥ ७ ॥ सकळु ना निष्कळु । आक्रियु ना क्रियाशीळु । कृश ना स्थूळु । निर्गुण-पणें ॥ ८ ॥ आभासु ना निराभासु । प्रकाशु ना अप्रकाशु । अल्प ना बहुवसु । अरूपपणें ॥ ९ ॥ रिता ना भरितु । रहितु ना सहितु । मूर्तु ना अमूर्तु । शून्य-पणें ॥ १११० ॥ आनंदु ना निरानंदु । एक ना विविधु । मुक्त ना बद्धु । आत्मपणें ॥ ११ ॥ येतुला ना तेतुला । आइता न राचिला । बोलता ना उंगला । अलक्षपणें ॥ १२ ॥ सृष्टीचा होणां नें रचे । सर्वसंहारें न वेंचे । आथी नाथी या दोहींचें । पंचत्वें तो ॥ १३ ॥ मवे ना चर्चे । वाढे ना खांचे । विटे ना वेंचे । अव्ययपणें ॥ १४ ॥ एवं रूप पैं आत्मा । देहीं जें म्हणती प्रियोत्तमा । तें मठा-कारें व्योमा । नाम जैसें ॥ १५ ॥ तैसें तयाचिये अनुस्यूती । होती जाती देहा-कृती । तो घे ना सांडी सुमती । जैसा तैसा ॥ १६ ॥ अहोरात्रें जैशीं । येती जाती आकाशीं । आत्मसत्तें तैसीं । देहें जाण ॥ १७ ॥ म्हणौनि इयें शरीरीं । कांहीं करवीं ना करी । आयताही व्यापारीं । सज्ज न होय ॥ १८ ॥ यालागीं

ते कांहीं खरें नाहीं तर देह उत्पन्न होण्याचे पूर्वीपासून तो आत्मा जेथें होता तेथेंच आहे नंतर देह गेल्यावरहि असतो ९६. ज्याप्रमाणें आरशांत आपलें मुख बिंबलें असतां त्यास 'प्रतिबिंब' अशी संज्ञा येते, त्याप्रमाणें आत्मा देहांत वास करतो म्हणजे प्रतिबिंबरूपानें अंतःकरणांत असतो ९७. त्या देहाचा व आत्म्याचा संबंध आहे हें म्हणणें सर्वथैव, निर्जीव–व्यर्थ होय, हें पहा, वारा व वाळू यांची कधीं गांठ मारणें, हें कोठे आहे काय ! ९८. तसेंच अग्नि आणि कापूस हीं दोन्हीं दोऱ्यांत कशी ओंवतां येतील ! आणि आकाश व पाषाण यांचा सांधा जोडून कसा बसवितां येईल ! ९९. एकाच ठिकाणाहून निघून एक मनुष्य पूर्वेकडे जावयास निघाला आणि एक पश्चिमेकडे जावयास निघाला, मग त्यांची गांठ पडावी कशी ! त्याप्रमाणें देह व आत्मा यांचा संबंध आहे ११००. उजेड व अंधार यांचा जसा संबंध, मेलेला व जिवंत मनुष्य यांचा एकमेकांशीं जितका संबंध, त्याचप्रमाणें आत्मा व शरीर यांचा संबंध आहे असें समज. १. रात्र व दिवस, सोने आणि कापूस यांचें ज्याप्रमाणें असाम्य [अंतर] आहे त्याचप्रमाणें आत्मा व देह यांचें असाम्य आहे २. खरे पाहूं गेले असतां शरीर पंचमहाभूतात्मक तत्त्वांचें बनलेलें आहे व कर्मांच्या दोऱ्यांत गोवलेले व जन्ममृत्यूच्या, भवचक्रावर घातले असून गरगरा फिरत आहे ३. कालरूपी अग्नीच्या तोंडांत लोण्याच्या गोळ्याप्रमाणें हे शरीर घातलेलें असून माशी आपले पंख फडफडावते त्यास जितका वेळ लागतो तितक्या थोड्या वेळांत हें शरीर नाहींसे होते ४. त्याचा परिणाम काय आहे तो पहा. हा देह कदाचित् अग्नींत पडला तर त्याची राख होऊन उडून जातो व कोल्ह्या कुत्र्यांच्या तावडींत हा देह सांपडला तर त्याची विष्ठा बनते ५. हे कपिध्वजा या दोन प्रकारांतून जर देह चुकला तर ज्या ठिकाणीं हा देह पडेल त्या ठिकाणीं यांमध्यें किडे व आळ्या यांचें पुंजकेच्या पुंजके होतात. अशा रीतीनें या देहाचा वाईट परिणाम होतो ६. या देहाची ही अशी दशा होते, परंतु आत्मा तर असा आहे कीं, 'नित्यसिद्ध' व अनादि अशा स्वरूपानें सहज सिद्ध आहे ७. तो निर्गुण असल्यामुळें सावयव नाहीं व तत्सापेक्ष निरवयवहि नाहीं, क्रिया करणारा नाहीं व क्रिया न करणाराहि नाहीं, तसेंच रोडका नाहीं व लठ्ठहि नाहीं ८. तो निराकार असल्यामुळें दृश्य नाहीं व अदृश्यहि नाहीं, तो प्रकाशमान् नाहीं, तेजहीनहि नाहीं आणि थोडा–परिच्छिन्न नाहीं व पुष्कळहि–अपरिच्छिन्नहि नाहीं व ९. तो शून्य म्ह० अत्यंत निर्विशेष असल्यामुळें रिकामा नाहीं व तत्सापेक्ष भरलेलाहि नाहीं, कशा विरहित नाहीं व तत्सापेक्ष कशा सहितहि नाहीं, आणि तो साकार नाहीं व तत्सापेक्ष निराकारहि नाहीं १११०. तो आत्मरूपानें असल्यामुळें त्याला आनंदहि नाहीं व आनंदरहितहि [ दुःखहि] नाहीं. तो एकहि नाहीं व अनेकहि नाहीं आणि तो मुक्त नाहीं व बद्धहि नाहीं ११. तो लक्षणरहित असल्यामुळें एवढा आहे किंवा तेवढा आहे असा निर्देश करता येत नाहीं. आयता किंवा तयार केलेला नाहीं आणि बोलका नाहीं किंवा मुका असाहि नाहीं १२. सृष्टीच्या होण्याबरोबर हा होत नाहीं व सृष्टीचा संहार झाला तरीहि लय पावत नाहीं आणि हा असणें व नसणें या उभयांहून अतीत व दोन्ही स्थितींचें लयस्थान होय १३. हा अव्यय असल्यामुळें मोजतां व त्याचे वर्णनहि करितां येत नाहीं, हा वाढत अथवा कमीहि होत नाहीं आणि हा विटत नाहीं किंवा खर्चहि होत नाहीं १४ हे प्रियोत्तमा असें ज्या आत्म्याचें स्वरूप आहे तो देहांत आहे, असें जे म्हणतात, त्यांचें तें म्हणणे मठांत असलेल्या आकाशाला आकार मानून 'हे मठाकाश आहे' ह्या म्हणण्याप्रमाणें आहे १५. तसेंच आत्म्याच्या व्यापक, अखंड अस्तित्वावर देहाकृति उत्पन्न होतात व जातात, तरीपण देह उत्पन्न झाला म्हणून तो देह धारण करीत नाहीं व देह नाश पावला असतां तो देह टाकीत नाहीं, तो आपल्या स्वरूपानें जसा आहे तसाच असतो १६. ज्याप्रमाणें आकाशांत दिवस व रात्र येतात व जातात, त्याप्रमाणें आत्म्याच्या सत्ता-स्फूर्तीच्या आश्रयावर देह-देहांतरें येतात व जातात, परंतु त्यापासून तो लिप्त होत नाहीं असें समज १७. म्हणून या शरीरांत तो कांहीं करीत नाहीं व करवीतहि नाहीं. [ म्ह० आत्म्यास स्वतः कर्तृत्व वा प्रयोजक कर्तृत्वहि नाहीं ] व शरीराच्या सहज होणाऱ्या कोणत्याहि व्यापारांत कर्तेपणा आपल्याकडे घेण्यास तयार होत नाहीं १८.

१ आरशांत. २ त्या आत्म्याचा व देहाचा. ३ संबंध. ४ सर्वथैव. ५ घालावा. ६ जोड. ७ प्रमाणें. ८ संबंध. ९ उभ्याला, जिवंताला. १० सुवर्णाला. ११ असाम्य, असंबंध. १२ दोऱ्यांत गुंफलेलें. १३ चढविलेलें. १४ कुंडांत. १५ गोळा. १६ पंख झाडी. १७ नाहींसें होतें. १८ कदाचित्. १९ कुत्र्याच्या. २० प्राप्त, स्वाधीन. २१ वाईट. २२ सहज. २३ पूर्ण. २४ अपूर्ण. २५ दृश्य. २६ अदृश्य. २७ मौनी. २८ होण्यानें. २९ होत नाहीं.

स्वरूपें । उणा पुरा न घेपे । हें असो तो न लिंपे । देहीं देहा ॥ १९ ॥

यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते । सर्वत्रावस्थितो देहे तथाऽऽत्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥

अगा आकाश कें नाहीं ? । हें न रिघेचि कवणे ठायीं ? । परी कायिसेनि कहीं । गांदिजेना ॥ ११२० ॥ तैसा सर्वत्र सर्व देहीं । आत्मा असतुंचि असे पाहीं । परी संगदोषें एकेंही । लिप्त नोहे ॥ २१ ॥ पुढतपुढती एथें । हेंचि लक्षण निरुतें । जे जाणावें क्षेत्रज्ञातें । क्षेत्रविहिनों ॥ २२ ॥ संसर्गें चेष्टिजे लोहें । परी लोहं भ्रामकु नोहे । क्षेत्रक्षेत्रज्ञां आहे । तेतुला पाडु ॥ २३ ॥ दीपकाची अंर्ची । रहाटी वाहे घरींची । परी वेगळीक कोंडीची । दीपा आणि घरा ॥ २४ ॥ पैं काष्ठाच्या पोटीं । वन्हि असे किरीटी । परी काष्ठ नोहे या दृष्टी । पांहिजे हो ॥ २५ ॥ अंपाडु नभा आभाळा । रवि आणि मृगजळा । तैसाचि हाही डोळां । देखसी जरी ॥ २६ ॥

यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः । क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥

हें आघवेंचि असो एकु । गगनौनि जैसा अर्कु । प्रगॅटवी लोकुं । नांवें नांवें ॥ २७ ॥ एथ क्षेत्रज्ञु तो ऐसा । प्रकाशकु क्षेत्राभासा । यावरुतें हें न पुसा । शंका नेघा ॥ २८ ॥

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा । भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥ ३४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगोनाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

शब्दतत्त्वसारज्ञा । पैं देखणें तेचि प्रज्ञा । जे क्षेत्र क्षेत्रज्ञा । अपाडु देखे ॥ २९ ॥ इया दोहींचें अंतर । देखावया चतुर । ज्ञानियांचें द्वार । आराधिती ॥ ११३० ॥ याचिलागीं सुमती । जोडिती शांतिसंपत्ती । शास्त्रांचीं दुभेंतीं । पोसिती घरीं ॥ ३१ ॥ योगाचिया आकाशा । वळंघिजे येवढाचि धिंवसा । याचियाचि आशा । पुरुषासि गा ॥ ३२ ॥ शरीरादि समस्त । मानिताति तृणवत । जीवें संतांचे होत । वाहणधेरु ॥ ३३ ॥ ऐसैसियापरी । ज्ञानाचिया भॅरोवरी । करूनियां अंतरीं । निरुतें होती ॥ ३४ ॥ मग क्षेत्रक्षेत्रज्ञांचें । जें अंतर देखती साचें । ज्ञानें उन्मेख तयांचें । ओवाळूं आम्ही ॥ ३५ ॥ आणि महाभूतादिकीं । प्रभेदलीं अनेकीं । पसरलीसे लटिकी । प्रकृति जे हे ॥ ३६ ॥ जे शुकनळिकान्यायें । न

यास्तव तो [ आत्मा ] स्वरूपानें कर्मीपणास अगर पुरेपणास वश होत नाहीं, इतकेच नव्हे तर तो देहांत असूनहि देहाच्या सर्व व्यापारांपासून मुळींहि लिप्त होत नसतो १९.

**अन्वयार्थ**--**यथा**-ज्याप्रमाणें-**सर्वगतम् आकाशं**-सर्वव्यापी आकाश-**सौक्ष्म्यात्**-सूक्ष्मत्वामुळें--**न उपलिप्यते**-कोणत्याहि लेपानें लिप्त होत नाहीं-**तथा**-त्याप्रमाणें-**देहे सर्वत्र**-देहांत सर्व ठिकाणीं-**अवस्थितः आत्मा**-अवस्थित असलेला- व्यापून राहिलेला आत्मा देहधर्मांनी-**न उपलिप्यते**-संबद्ध होत नाहीं ३२.

अर्जुना! आकाश कोठें नाहीं? व त्याचा कोठें रिघाव, प्रवेश होत नाहीं? म्हणजे हे सर्वत्र व्याप्त आहे; परंतु तें आकाश कशानेंहि व कधींहि लिप्त होत नाहीं ११२०. त्याप्रमाणें सर्वत्र सर्व देहांत आत्मा जरी व्याप्त आहे, तरी देहाच्या कोणत्याहि उपाधीच्या संगदोषापासून तो लिप्त होत नाहीं २१. तर वारंवार शुद्ध तत्त्वाचें हेंच खरें लक्षण तूं ध्यानांत ठेव कीं, क्षेत्र म्हणजे शरीर किंवा त्याचे धर्म, याहून क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा अगदीं निराळा आहे २२. आत्म्याच्या सत्तेच्या संबंधानें शरीरादिकांच्या ठिकाणीं चेष्टा दिसल्या, तरी देह आत्मा नव्हे, लोहचुंबकाच्या संसर्गानें लोहखंड हालतें, परंतु लोखंड हें लोहचुंबक नव्हे, तोच न्याय आत्मा व देह यांस लागू आहे २३. दीपज्योती आपल्या उजेडानें घरांतील सर्व व्यवहार चालवीत असते, परंतु दिवा आणि घर यांत वास्तविकदृष्ट्या कोटिशः अंतर आहे २४. हे किरीटी, लांकडाच्या पोटांत अग्नि आहे, परंतु तोच अग्नि म्ह० लांकूड नव्हे, अशा दृष्टीनें देह व आत्मस्वरूप यांस पहा २५. तसेंच आकाश व अभ्र किंवा सूर्य व मृगजळ यांच्यांत ज्या मानानें अंतर आहे, अर्थात् अत्यंत भिन्नत्व आहे त्याच मानानें देह आत्मा यांमधील अंतर, भिन्नत्व आहे २६. मागें दिलेल्या दृष्टांतद्वारां बुद्धीच्या डोळ्यानें पहाशील, तर—

**अन्वयार्थ**—**भारत**-**हे अर्जुना!**-**यथा**-ज्याप्रमाणें-**एकः रविः**-एक सूर्य-**कृत्स्नम् इमं लोकं**-या सर्व लोकांला-**प्रकाशयति**-प्रकाशमान करतो-**तथा**-त्याप्रमाणें **क्षेत्री**-क्षेत्रज्ञ आत्मा-**कृत्स्नं क्षेत्रं**-सर्व क्षेत्राला-**प्रकाशयति**-प्रकाशित करतो ३३.

हे असो, गगनांत सूर्य एकटाच असून वेळोवेळीं निरनिराळ्या सर्व लोकांना प्रकाशित करतो २७. त्याप्रमाणें येथें क्षेत्रज्ञ जो आत्मा हा सर्व देहांचा-क्षेत्राभासाचा प्रकाशक आहे, असें कळून येईल. या उपर आत्मा व देह याविषयीं पुनः कांहीं शंका घेऊन विचारूं नकोस २८.

**अन्वयार्थ**—**ये**-जे-**एवं**-याप्रमाणें-**क्षेत्रक्षेत्रज्ञयोः**-क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्यामधील-**अन्तरं**-परस्पर विलक्षणता, फरक-**च**-व-**भूतप्रकृतिमोक्षं**-भूतांच्या प्रकृतीचा ज्ञानानें होणारा अभाव-**ज्ञानचक्षुषा**-ज्ञानदृष्टीनें-**विदुः**-जाणतात ते-ते ज्ञानी-**परं**-परमात्मतत्त्वास-**यान्ति**-प्राप्त होतात ३४.

हे शब्दतत्त्वज्ञा, तीच बुद्धि जाणती-डोळस म्हणावी कीं, जिच्या योगानें क्षेत्र-शरीर व क्षेत्रज्ञ-आत्मा या दोहोंमधील अंतर म्ह. अत्यंत भिन्नत्व समजतें २९. यादोहोंमधील अंतर समजण्याकरितां चतुर [ मुमुक्षु ] लोक हे ज्ञानीजनांच्या घरांचे उंबरठे झिजवितात; म्ह० त्यांची सेवा करतात ११३०. आणि अर्जुना! हेंच समजण्याकरितां जिज्ञासु लोक शांतिरूप संपत्ति स्वाधीन करून घेऊन शास्त्ररूपी दुभत्या गाई घरीं पाळतात. [ नेहमीं शास्त्राध्ययन-विचार करितात ] ३१. हेंच समजण्याच्या आशेनें पुरुष योगरूप आकाशावर चढून जाण्याची, मनांत एवढी मोठी हांव, धैर्यवृत्ति धरितात ३२. शरीर आदिकरून सर्व तृणप्राय मानतात आणि जीवभावापासून संतांच्या पादुका आपल्या डोक्यावर घेतात ३३. याप्रमाणें ज्ञानाची साधनें करून अंतर्यामीं आत्मा व देह यांच्या भिन्नत्वाविषयीं निश्चित खात्री करून घेतात ३४. नंतर शरीर व आत्मा म्ह० क्षेत्र-क्षेत्रज्ञ यांमधील खरें अंतर आपल्या यथार्थ दृष्टीनें पाहतात तेव्हां भगवान् म्हणतातः-आम्ही आपलें ज्ञानानें त्यांच्या ज्ञानाला ओवाळूं इतकें त्याचे मला कौतुक वाटते ३५. आणि या पंचमहाभूतादि अनेक पदार्थांच्या व प्राण्यांच्या भिन्न भिन्न रूपानें जी ही लटकी प्रकृति माया पसरलेली आहे ३६.

---

१ दोष विकार पावत नाहींत. २ असूनहि. ३ उपाधीनें. ४ आत्म्याला. ५ देहापासून निराळा. ६ आकर्षणानें, सांनिध्यानें. ७ लोहचुंबक. ८ ज्योतीनें. ९ व्यवहार चालतो. १० कोटिपट. ११ पहावा. १२ आत्मा. १३ फार अंतर, वैलक्षण्य. १४ – १५ भू-आदिलोकांवर प्रकाश पाडतो. १६ वेगवेगळे. १७ शब्दतत्त्वाचें सार जाणणाऱ्या. १८ फार अंतर, वैलक्षण्य. १९ दुभत्या गाई. २० चढावें. २१ धैर्यानें. २२ पादुकाधारक. २३ सामुग्री मिळवून. २४ ज्ञान.

लगती लागली आहे । हें जैसें तैसें होये । ठाउवें जयां ॥ ३७ ॥ जैसी माळ ते माळा । ऐसीचि देखिजे डोळां । सर्पबुद्धि टवाळां । उखी होउनी ॥ ३८ ॥ कां शुंक्ति ते शुक्ती । हे साच होय प्रतीती । रुपेयाची भ्रांती । जाऊनियां ॥ ३९ ॥ तैसी वेगळी वेगळेपणें । प्रकृति जे अंतःकरणें । देखती ते मी म्हणें । ब्रह्म होती ॥ ११४० ॥ जें आकाशाहूनि वाडें । जें अव्यक्ताची पैल कड । जें भेटलिया अपाडो पाड । पंडों नेदी ॥ ४१ ॥ आकारु जेथ सरे । जीवत्व जेथ विरे । द्वैत जेथ नुरे । अद्वय जें ॥ ४२ ॥ तें परम तत्त्व पार्था । होती ते सर्वथा । जे आत्मानात्मव्यवस्था । राजहंसु ॥ ४३ ॥ ऐसा हा जी आघवा । श्रीकृष्णें तया पांडवा । उगाणा दिधला जीवा । जीवाचिया ॥ ४४ ॥ येरें कलशींचें येरीं । रिचविजे जयापरी । आपणपें तया श्रीहरी । दिधलें तैसें ॥ ४५ ॥ आणि कोणा देता कोण । तो नर तैसा नारायण । वरी अर्जुनातें श्रीकृष्ण । हा मी म्हणे ॥४६॥ परी असो तें नोथिलें । न पुसतां कां मी बोलें । किंबहुना दिधलें । सर्वस्व देवें ॥ ४७ ॥ कीं तो पार्थु जी मनीं । अझुनी तृप्ती न मनी । अधिकाधिक उतान्ही । वाढवीतु असे ॥ ४८ ॥ स्नेहाचिया भरोवरी । आंबुथिला दीपु घे थोरी । चाड अर्जुना अंतरीं । परिसतां तैसी ॥ ४९ ॥ तेथ सुगरिणी आणि उदारे । रसज्ञ आणि जेवणारे । मिळती मग अवतरे । हातु जैसा ॥ ११५० ॥ तैसें जी होतसे देवा । तया अवधानाचिया लवलेवा । पाहतां व्याख्यान चढेलें थांवा । चौगुणें वरी ॥ ५१ ॥ सुवायें मेघु सांवरे । जैसा चंद्रें सिंधु भरे । तैसा मातला रसु आदरें । श्रोतयांचेनि ॥ ५२ ॥ आतां आनंदमय आघवें । विश्व कीजेल देवें । तें रायें परिसावें । संजयो म्हणे ॥ ५३ ॥ एवं जें महाभारतीं । श्रीव्यासें अप्रांतमती । भीष्मपर्वसंगतीं म्हणितली कथा ॥ ५४ ॥ तो श्रीकृष्णार्जुनसवाद्दु । नागेरी बोलीं विशेद्दु । सांगोनि दाऊं प्रबंधु । वोवियेचा ॥ ५५ ॥ नुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वांक्पथा । जें शृंगाराच्या माथां । पाय ठेवी ॥ ५६ ॥ दाऊं वेल्हाळे देशी[१२] नवी । जे साहित्यातें वोजावी । अमृतातें चुकी ठेवी । गोडिसेपणें ॥ ५७ ॥ बोल ओल्हावतेनि गुणें । चंद्रासि घे उमाणे । रसरंगीं भुलवणें । नाद्दु लोपी

ती [ प्रकृति ] शुकनलिकान्यायानें जीवांच्या मागे वस्तुतः लागली नसली तरी, ती आपल्या मागे लागली आहे, असें अज्ञानी जीवास भ्रमानें वाटतें मात्र खरें; अशी ही वस्तुस्थिति माहीत असून तसा ज्यांच्या निश्चय झाला आहे ३७. तो असा कीं, ज्याप्रमाणें फुलांच्या मालेवरील लटकी सर्पबुद्धि नष्ट झाली म्हणजे माळ ती माळ आहे, असे जो डोळ्यांनी पाहतो ३८. अथवा शिंपीच्या यथार्थ ज्ञानानें तिजवरील रुप्याचा भ्रम जाऊन शिंप ही केवळ शिंपच आहे, असें खरे प्रत्ययास यावें ३९. त्याप्रमाणें आत्म्यापासून प्रकृति वेगळी आहे, असें जे आपल्या अंतकरणांत निःसंदेह पाहतात, ते ब्रह्मरूप होतात असें मी म्हणतो ११४०. तें ब्रह्म कसें आहे असें म्हणशील तर जें ब्रह्म आकाशाहूनहि व्यापक आहे ' जें प्रकृतीरूप नदीची पैलथडी आहे व जें प्राप्त झालें असतां आपल्यापासून कधींहि दूर करीत नाहीं साम्यासाम्य राहूं देत नाहीं ४१. ज्या ब्रह्माचे ठिकाणीं प्रकृतीच्या अनुरोधानें आलेला आकार संपतो. जीवपणा विसरून, विरघळून जातो आणि द्वैतभावहि उर्वरित राहत नाहीं असें जे अद्वय एकाकी आहे ४२. पार्था ! असें हें परमतत्त्व ब्रह्म तेंच पुरुष स्वतः होतात, कीं जे दूध व पाणी निराळें करणाऱ्या राजहंसाप्रमाणें, आत्मा व प्रकृति यांचा निवाडा करून वेगळेपणा जाणतात ! ४३. महाराज म्हणतात:- याप्रमाणें श्रीकृष्णांनीं जीवाचा जीव अशा अर्जुनाला प्रकृति व आत्मा यांविषयींचा प्रत्यक्ष अनुभव आणून दिला ४४. ज्याप्रमाणें एका घागरींतील सर्व पाणी दुसऱ्या घागरींत ओतावें त्याप्रमाणें श्रीहरींनी आपल्या हृदयांतील जें ज्ञान तें अर्जुनाच्या हृदयांत ओतलें ४५. आणि यांत विशेष तें काय झालें ? कारण, अर्जुन [ हा ] नर [ अवतार ] होय तसाच श्रीकृष्ण नारायण [ अवतार ] असल्यामुळें दोवे विष्णूचेच अंश होत. ज्ञान हे कोणी व कोणास दिलें ? असें असूनहि श्रीकृष्ण अर्जुनाकडे बोट दाखवून ' हा तो मीच आहे ' असें म्हणाले ४६. परंतु नसती ही गोष्ट राहूं द्या. मला कोणी विचारल्याशिवाय अर्थात सांगण्याचे कारण नसतां मी कां बोलतो आहे ? फार काय सांगावें ! ! देवांनीं अर्जुनास आपलें सर्वस्व दिलें ४७. परंतु भगवंतांनी इतके जरी सांगितलें तरीहि अर्जुन अजून आपल्या मनांत तृप्ति तर मानीत नव्हताच उलट त्यांनी अधिक सांगावें अशी [ श्रवणाची ] जास्त जास्तच इच्छा वाढवूं लागला ४८. प्रदीप्त दिव्यांत जों जों भरपूर तेल घालावें, तों तों अधिकाधिक प्रकाश पडतो. त्याप्रमाणें श्रीकृष्ण जों जों जास्तीं सांगूं लागले तों तों ते श्रवण करीत असतां अर्जुनाचे मनांत ऐकण्याविषयीं इच्छा अधिक वाढतच चालली ! ४९. ज्याप्रमाणें एखादी सुगरण, उत्तम स्वयंपाकीण असून तीच वाढण्यांत उदार-सढळ हाताची असली व जेवणारे रसमर्मज्ञ-चतुर असलेले मोक्के मिळाले असले म्हणजे मग तेथें वाढण्यासाठीं व जेवण्यासाठीं दोघांचेहि हात पुढे सरसावतात ११५०. त्याप्रमाणें अर्जुनाची ऐकण्याची चळवळ व उत्सुकता पाहून देवांचीहि स्थिति झाली व त्यांचें व्याख्यान चौपटीपेक्षां जास्त बळानें वाढलें ५१. ज्याप्रपाणें अनुकूल वाऱ्यानें मेघ सांवरून जमून येऊन चांगली वृष्टि होते, किंवा [ पौर्णिमेचा ] चंद्रोदय झाला म्हणजे समुद्रास भरती येते. त्याप्रमाणें ऐकणाराच्या आदरबुद्धीनें वक्त्याचे व्याख्यानास रसाविष्काराचे भरते आले आहे ५२ संजय म्हणतो:-धृतराष्ट्र राजा ! याप्रमाणें अर्जुनाची ऐकण्याची तीव्र इच्छा पाहून, देव हे ज्या आपल्या वक्तृत्वानें सर्व विश्व आनंदभरित, करतील ते वक्तृत्व ऐकावे ५३. [ श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात ] याप्रमाणें महाभारतांत भीष्मपर्वाच्या संगतींत श्रीव्यासमुनींनीं आपल्या अमर्याद-विशाल बुद्धीनें जी शांतरसपूर्ण कथा सांगितली आहे ५४. तो श्रीकृष्णार्जुनांचा संवाद उत्तम व स्पष्ट मराठी भाषेंत ओवीबद्ध काव्यांत, छंदानें सांगून दाखवूं ५५. मी आतां नुसती शांतिरसपूर्ण कथा बोलण्यांत सांगेन, पण ती शृंगारादि रसांच्याहि वरचढ अशी होईल ५६. हीं माझी मराठी देशभाषा खरी पण साहित्याला सजवील, धडे देईल व आपल्या गोडीपणानें अमृतालाहि फिकें पाडील, मागे सारील अशी अपूर्वसुंदर मराठी भाषा उपयोगांत आणूं ५७.

१ लटकी. २ नाश. ३ शिंपी. ४ मोठें. ५ प्रकृतीची. ६ साम्यासाम्य. ७ होऊं देत नाहीं. ८ आत्मा व अनात्मा यांची निवड करणारे. ९ दूध व पाणी वेगळें करणारें हंस. १० ज्ञाता, प्रत्यक्ष, अनुभव. ११ एका. १२ घागरींतील. १३ दुसऱ्यांत. १४ ओतावें. १५ व्यर्थ. १६ इच्छा, तृष्णा. १७ तेलाच्या. १८ भरवण्यानें. १९ पेटविलेला. २० उत्सुकता. २१ भराला, आलें, बळास चढलें. २२ चौपटीनें. २३ अनुकूल वाऱ्यानें. २४ स्फुरण येतें. २५ अगाध बुद्धीने. २६ उत्तम शब्दानें. २७ स्पष्ट. २८ छंदात. २९ केवळ. ३० बोलण्यांत. ३१ आवडती. ३२ देश भाषा, मराठी भाषा. ३३ शिकवील, दाखवील. ३४ शांत करणाऱ्या-भिजविणाऱ्या-आर्द्र करणाऱ्या गुणांनीं.

॥ ५८ ॥ खेचरांचियाही मना । आणीन सात्त्विकाचा पान्हा । श्रवणासवें सुमंना । समाधि जोडे ॥ ५९ ॥ तैसा वाग्विलास विस्तारू । गीतार्थेसी विश्व भरूं । आनंदाचे आवारूं । मांडूं जगा ॥ ११६० ॥ फिटो विवेकाची वाणी । हो कानामनाची जिणी । देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ६१ ॥ दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा । रिघो महाबोध सुकाळा- । माजीं विश्व ॥ ६२ ॥ हें निफजेल आतां आघवें । ऐसें बोलिजेल बरवें । जें अधिष्ठिला असें परमदेवें । श्रीनिवृत्तीं मी ॥ ६३ ॥ म्हणौनि अक्षरीं सुभेदीं । उपमा श्लोकें कोंदाकोंदी । झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासी ॥ ६४ ॥ हो ठावोवरी मातें । पुरतया सारस्वतें । केलें असे श्रीमंतें । श्रीगुरुरायें ॥ ६५ ॥ तेणें जी कृपासांवायें । मी बोलें तेतुलें सामाये । आणि मी तुमचिये सभे लाहें । गीता म्हणों ॥ ६६ ॥ वरी तुम्हां संतांचे पाये । आजि मी लाधलों आहें । म्हणौनि जी नोहे । अटकु कांहीं ॥ ६७ ॥ प्रभु काश्मिरीं मुकें । नुपजे हें काय कौतुकें । नाहीं उणीं सामुद्रिकें । लक्ष्मीयेसी ॥ ६८ ॥ तैसी तुम्हां संतांपासीं । अज्ञानाची गोठी कायसी । यालागीं नवरसीं । वरुषेन मी ॥ ६९ ॥ किंबहुना आतां देवा । अवसरु मज देयावा । ज्ञानदेव म्हणे बरवा । सांगेन ग्रंथु ॥ ११७० ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥ श्लोक ३४, ओंव्या ११७०.



माझे बोल श्रोतृजनरूपी चंद्रकान्तास पाझर फोडण्याचें, शांत करण्याचें बाबतींत चंद्राची बरोबरी करतील व माझे शब्द आपल्या रसरंगामध्यें असणाऱ्या मोहकतेनें नादब्रह्मासहि लोपवितील ५८. पिशाचादि अज्ञान्यांच्या मनास देखील माझे शब्द सात्त्विकतेचा पान्हा फोडतीलच आणि जर ऐकणारा शुद्ध मनाचा अधिकारी असेल तर त्याला शब्द ऐकण्याबरोबर समाधिच लागेल ! ५९. मी गीतेचा अर्थ, वाणीच्या विलासाचा विस्तार करून असा सांगेन कीं, तो अर्थ जगभर सर्वत्र पसरून यच्चयावत् जगाला जणुं आनंददायक एक अवार–कोटच होईल ११६०. त्यामुळें आत्मनात्मविचाराचें दैन्य, उणेपण फिटून जाईल व मन आणि श्रवण ह्यांचें जीवन सार्थक–धन्य होईल. फार काय सांगावें ! ! आज वाटेल त्यास ही ब्रह्मविद्येची जणुं खाणीच पाहता येईल ६१. परब्रह्मतत्त्व डोळ्यांनीं पाहो व सुखाचा सोहळा, उरसव दृष्टीस पडावा व जग ब्रह्मात्मैक्यज्ञानाच्या सुकाळामध्यें प्रवेश करील, असें मी करीन ६२. कारण, मजवर परमश्रेष्ठ श्रीनिवृत्तीमहाराजांचा अनुग्रह असल्यामुळें मी आतां असें भाषण करीन कीं, या उपर्युक्त सर्व गोष्टी आपल्या अनुभवास येतील ६३. म्हणून प्रत्येक अर्थवाहक सुबोध अक्षरांच्या ठिकाणीं कवित्व आणि उपमा यांची गर्दी करून सोडीन आणि ग्रंथाच्या प्रत्येक पदांतील तात्पर्याचा झाडा देईन, विषयाची स्पष्टता करीन एक पदहि सोडणार नाहीं ६४. इतक्या समर्थ विद्येनें मला आमच्या श्रीमंत अशा गुरूंनीं सर्व शास्त्रांत निपुण केलें आहे ६५. अर्थात् त्या कृपेच्या ऐश्वर्यपूर्ण साह्यानेंच मी जें जें भाषण करितों तें तें आपणांस मान्य होत आहे व आपणांसारख्या संतमंडळींच्या सभेंत गीतेचा अर्थ सांगण्याची मला योग्यता आली आहे ६६. त्यांतहि तुमच्यासारख्या संतांचें पाय आज माझ्या दृष्टीस पडले आहेत, म्हणून मला कसलीहि अडचण राहिलीच नाहीं ६७. प्रभो ! सरस्वती जी सर्वांस बोलण्याची शक्ति देणारी आहे, तिला मूकें मूल सहजहि होणार नाहीं ह्यांत कांहीं कौतुक का आहे ? लक्ष्मीच्या हातावर सामुद्रिक चिन्हांची उणीव असूं शकणार नाहीं हे स्वाभाविक आहे ६८. त्याप्रमाणें तुम्हां संतांच्या पुढें कोणीहि आला असतां तो अज्ञानी राहील अशी गोष्ट होईल कशी ? तेव्हां मी आतां बोलण्यांत नवरसांचा वर्षाव करून रेलचेल करीन ६९. फार तर काय सांगावें ! ! तर हे प्रभो ! आतां मला बोलण्यास थोडा वेळ–वाव द्या. म्हणजे मी उत्तम रीतीनें ग्रंथार्थ सांगेन, असें श्रीज्ञानदेव म्हणाले ११७०.

१ पिशाच्चांच्या. २ निर्मल मनाला. ३ गांवकुस, बांध, भिंत. ४ दुष्काळ, दैन्य, उणीव. ५ ऐक्य, तन्मय. ६ पाहिजे तो. ७ उत्पन्न होईल. ८ अनुग्रह केला. ९ प्रत्येक. १० कवित्व. ११ गर्दी, खिचाखिच. १२ येथपर्यंत. १३ परिपूर्ण. १४ विद्येनें. १५ कृपेच्या साहाय्यानें. १६ मान्य करतां. १७ योग्यता आली आहे.



# अध्याय संगति व तेराव्या अध्यायाचें तात्पर्य

क्षेत्र आणि क्षेत्रज्ञातें । जाणणें जें निरुतें ।
ज्ञान ऐसें तयातें । मानूं आम्ही ।। अ. १३-९

मागील बाराव्या अध्यायांत भक्ताचे महात्म्य वर्णन करतांना, भक्तांचा दुःखरूपी संसारांतून उद्धार करण्याकरितां मी बद्धपरिकर आहे, असें "तेषामहम् समुद्धर्ता" या श्लोकांत सांगितलें आहे; अर्थात् संसार दुःखांतून त्यांची मुक्तता होण्यासाठीं त्यांना जीवब्रह्मैक्यज्ञान असण्याची जरूरी आहे. कारण, जीवब्रह्मैक्यज्ञानानेंच मोक्ष होतो असा श्रुतिसिद्धांत आहे. म्हणून मी स्वतः त्या अनन्य भक्तांचें गुरुत्व स्वीकारून त्यास जीवब्रह्मैक्यज्ञानाचा उपदेश करतो. त्याकरितांच हा तेरावा अध्याय आहे.

अर्थात् तत्त्वतः एकमेवाद्वितीय ब्रह्मच आहे, त्याविना दुसरें कांहींहि नाहींच; परमार्थतः ब्रह्मचैतन्यच; पण अज्ञानामुळें त्याचे ठिकाणीं दृष्टि-वृत्ति-ज्ञान उत्पन्न होऊन ते दृश्यरूप देहाशीं तादात्म्य पावते म्हणजे भ्रमानें जीवकोटींत प्रविष्ट होते. पुढें तो दृष्टीच्या उपाधीनें द्रष्टा होतो, दृश्यास प्रकाश्य, सत्य व भोगसाधन मानतो, स्वतःस शुभाशुभ कर्मांचा कर्ता मानतो, सुखदुःखाचा भोक्ता मानतो. अहम्-ममाभिमान धारण करतो, यांत विशुद्ध चैतन्यरूप आत्मा व जड दृश्यरूप असा अनात्मा, असें एकाचेच दोन पृथक् विभाग अंश आहेत. त्यांपैकीं दृश्यरूप अनात्मवर्गास केवळ दृष्टिमात्र सत्ता आहे. दृष्टिपूर्वी मायिक, दृश्यरूप अनात्म वर्गास सत्ताच नाहीं. ती दृष्टि-वृत्तिज्ञानहि द्रष्ट्याच्याच सत्तेनें राहते. दृष्टीच्या उपाधीमुळेंच 'दृङ्मात्र' ब्रह्मचैतन्यास द्रष्टृत्व आहे. तत्त्वतः नाहीं. 'दृष्टि' उपाधि नसला कीं, तो ब्रह्मकोटींत अंतर्भूत होतो; नव्हे मूळचा असतोच. तत्त्वतः दृश्य-द्रष्टा-दृष्टि याहून अतीत एकमेव 'दृङ्मात्र' ब्रह्मचैतन्यच आहे. अशी साक्षात्कारात्मक अनुभूति भक्तानें मिळवून मूळच्या नित्यसिद्ध सत्-चित्-आनदघन ब्रह्मस्थितीस पोचणें [ प्राप्ताचीच प्राप्ति करून घेणें ] हाच खरा भक्तांचा उद्धार, हीच संसारदुःखांतून भक्तांची मुक्तता होय. म्हणून आत्मानात्मविवेकपूर्वक उपर्युक्त स्वरूपाचें जीवब्रह्मैक्यज्ञान होण्याकरितां "**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि**" असा महावाक्योपदेश या अध्यायांत भगवंत गुरुत्व स्वीकारून करीत आहेत. अर्जुनाच्या प्रश्नावांचून केवळ भक्तवात्सल्यामुळें देवांनी सांगण्यास आरंभ केला आहे. म्हणून हा ज्ञानकांडांतील एक महत्त्वाचाच अध्याय आहे.

अर्थात् देह हा अनात्मा, जड असल्यामुळें स्वतः सत्तास्फूर्तिशून्य आहे. तो ज्याच्या सत्तेनें चालतो त्या चैतन्याचा विचार या अध्यायांत केला आहे. यासच 'क्षेत्रक्षेत्रज्ञ विवेक' म्हणतात. आरंभीं ज्याच्या केवळ स्मरणमात्रेंकरून शब्दसृष्टि स्वाधीन होऊन, वक्तृत्व हे नवरसपूर्ण व भावार्थग्राहक होते. त्या श्रीगुरु निवृत्तिनाथांना थोडक्यांत वंदन करून श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं या अध्यायाचें व्याख्यानास आरंभ केला आहे [ १ ते ६ ].

अर्जुना ! देह म्हणजे क्षेत्र व देहरूपी क्षेत्रास जो जाणतो तो क्षेत्रज्ञ; असा जो 'क्षेत्रज्ञ तो मी आहे' हे पक्के समज. तसेंच क्षेत्र-क्षेत्रज्ञास यथार्थ जाणणें त्यास 'ज्ञान' असें आम्ही समजतों [ क्षेत्रज्ञ जो जीवात्मा तो परमात्मरूपच आहे, असा औपनिषदिक जीव-शिवैक्य सिद्धांत सांगणारें, हें वाक्य म्हणजे श्रीमद्‌भगवद् गीतेंतील '**महावाक्यच**' होय. चेतन व अचेतन मिळूनच सारे विश्व होय. चेतन हे अचेतनाच्या साह्याविना कोणतीहि क्रिया करूं शकत नाहीं; तर अचेतन हे चेतनाधिष्ठानाविना स्वतः सत्ता-स्फूर्ति शून्य असल्यानें राहूंच शकत नाहीं. चेतनाचेतनाचा आध्यासिक संबंध म्हणजेच सृष्टि. जड अध्यस्त असल्यामुळें तेंहि तत्त्वतः अधिष्ठानरूपच म्ह० चिद्रूपच आहे. चेतनाविना दुसरें कांहीं नाहीं, हाच अद्वैत सिद्धांत आहे. ]

या शरीरास 'क्षेत्र' म्हणतात, ते कां म्हणतात ? ते कशा प्रकारचें आहे ? त्याचे विकार व कार्य कोणते ! त्याच्यावर सत्ता कोणाची आहे ? या विषयींचें ज्ञान हर-एकास असणें जरूर आहे. कारण, ब्रह्मदेव व श्रीशंकर या थोरांनीहि या क्षेत्राचा निर्णय लावण्यासाठीं मोठा अट्टाहास केला आहे. देव म्हणतात या शरीरावर कोणाची सत्ता आहे. याचा निर्णय करतांना साही दर्शनें हात टेकीस आलीं. एकाचा निर्णय दुसऱ्याचे निर्णयाशीं जुळतां मिळतां

असा येत नाहीं. अद्यापवेरी याच्या संबंधानें निश्चित निर्णय झालेला नाहीं. या बाबतींत जीववादी, प्रकृतिवादी, संकल्पवादी, स्वभाववादी आणि काळवादी या सर्वांनी आपल्या परीनें 'क्षेत्र निर्णय' देण्याचा प्रयत्न केला आहे. परपक्ष खंडनपूर्वक माझेच निर्णायक मत आहे, असें प्रत्येकानें अट्टाहासपूर्वक प्रतिपादिले आहे; परंतु हे 'क्षेत्र' कशा प्रकारचे आहे व ते कोणाच्या मालकीचे आहे, हे त्या वादांपैकीं निश्चित असें कोणासच कळलें नाहीं. नैमिषारण्यांत ऋषींनीं या क्षेत्रासंबंधी बराच तर्कसुसंगत परपक्ष खंडणपूर्वक तर्कसुसंगत स्वपक्ष मंडणात्मक उहापोह केला, याविषयीं पुराणेंहि साक्षीभूत आहेत. वेदांतील जे बृहत्सामसूत्र, ते ज्ञानदृष्ट्या पवित्र आहे; तथापि त्यासहि क्षेत्र निर्णय समजला नाहीं. ते क्षेत्र जसें आहे तसें, साबंत मी तुला सांगतों [ ७ ते ७१ ].

हे शरीर एकूण छत्तीस तत्त्वांचें मिळून बनलेलें आहे. तीं छत्तीस तत्त्वें अशीं:-१ पृथ्वी, २ आप, ३ तेज, ४ वायु आणि ५ आकाश हीं 'पंचमहाभूतें' ६ अहंकार-देहतादात्म्य म्हणजे अहंकार. वरील पंचमहाभूतांची पंचीकरण होऊन गांठ पडली असतां देहाकृति स्पष्ट होते. हा अहंकार प्रकृतीच्या पोटांत सूक्ष्मरूपानें गुप्त राहतो, देहाला चोहींकडे नाचवितो. तो विशेषेंकरून अज्ञान्यांच्या पाठीशीं लागत नाहीं; पण ज्ञान्यांच्या कंठास झोंबतो व नाना संकटांत नाचवितो. ७ बुद्धि-म्हणजे निश्चयात्मिका अंतःकरणवृत्ति. हे सुख, हे दुःख, हे पुण्य, हे पाप, हे शुद्ध, हे अशुद्ध अशी निवड करते. जी सत्वगुणाची वाढती अवस्था असून आत्मा व जीव यांच्या संधींत राहते. ८ अव्यक्त-सांख्य सिद्धांतांत जिला प्रकृति म्हणतात व परा-अपरा प्रकृतींपैकीं परा प्रकृति म्हणजे 'जीवदशा' संज्ञक जीं प्रकृति, तिलाच येथें 'अव्यक्त' नांव आहे. पंचमहाभूतांपासून निर्माण झालेले प्राणिसमुदाय स्थूलधर्म टाकून सूक्ष्म होऊन जेथें लीन होऊन असतात. ९ कान, १० नाक, ११ डोळे, १२ त्वचा, १३ जिव्हा हीं पांच ज्ञानेंद्रियें व १४ हात, १५ पाय, १६ वाणी, १७ उपस्थ व १८ गुद हीं पांच कर्मेंद्रियें. १९ मन-मन म्हणजे संकल्प विकल्पात्मक वृत्ति. मूर्तिमंत केवळ कल्पनाच होय. हे मन इन्द्रिय व बुद्धि यांच्या संधींत रजोगुणाच्या खांबांवर चंचलपणानें असते आशा वाढविते, भयाचा पाठपुरवठा करते, ज्याच्यामुळें द्वैत प्रतीति येते, अविवेक बळकटी येते, जे इन्द्रियांना विषयांत लोटते व जे ज्ञानाचे द्वार झांकून टाकते, तें मन. २० शब्द, २१ स्पर्श, २२ रूप, २३ रस आणि २४ गंध या पंचविषयामुळें वृत्तिज्ञान बाहेर धांवते. तसेंच २५ चालणें, २६ बोलणें, २७ देणें-घेणें, २८ मलत्याग करणें, २९ मूत्राचा त्याग करणें हे त्या पंच कर्मेंद्रियांचें पांच विषय आहेत. ३० इच्छाः-पूर्वानुभूत विषयाची आठवण झाल्यानें किंवा एखाद्या विषयाचें कान भरून वर्णन ऐकल्यावर जी वृत्ति निर्माण होते ती इच्छा, ज्या वृत्तीमुळें विषयाची आवड निर्माण होते ती इच्छा. ३१ द्वेष-ज्यावेळीं इच्छित विषय मिळत नाहीं त्या वेळीं जी वृत्ति निर्माण होते, तोच 'द्वेष'. ३२ सुख-जे सुख झाले असतां इतर वस्तूंचा विसर पडतो, प्राण पांगळा होतो सात्त्विक वृत्ति वाढते. किंबहुना ! ! जीवाला आत्मलाभ झाल्यावर जी स्थिति प्राप्त होते त्यासच किंवा ज्या सुखाची प्राप्ति म्हणजे जीवाला आत्मलाभच होणें होय या स्थितीसच 'सुख' संज्ञा आहे. ३३ दुःख-उपर्युक्त अशी स्थिति प्राप्त न होतां जें जगणें, तेंच दुःख होय. ३४ चेतना-असंग-साक्षीभूत चैतन्याची देहांत जी सत्ता तीच 'चेतना' होय. ३५ पंचमहाभूतें परस्परांतील उघड स्वभाववैर टाकून या देहांत जिच्यामुळें एकोप्यानें, मैत्रीनें, एकमेकांस पोषकरूपानें राहतात, ती 'धृति' होय. ३६ या उपर्युक्त पस्तीस तत्त्वांच्या समुदायास, मेळ्यांस 'संघात' असें म्हणतात. या छत्तीस तत्त्वांचे मिळून शरीर तयार होते. या क्षेत्रांत क्षेत्रज्ञ पापपुण्यात्मक पीक पिकवितो व म्हणूनच सुखदुःखांचा उपभोग घेतो. म्हणून त्यास कौतुकानें 'क्षेत्र' म्हणतात, तर कोणी 'देह' म्हणतात. अशी या क्षेत्रास अनंत नांवें आहेत. क्षेत्राची व्याप्ति एवढी मोठी आहे कीं, परब्रह्माच्या अलिकडे तों थेट सर्व स्थावरा-अखेरपर्यंत या दोहोंच्या दरम्यान उत्पत्ति विनाशशील असलेल्या चराचरात्मक सृष्टीचा क्षेत्रांतच अंतर्भाव होतो. [ या श्रीज्ञानेशांनीं केलेल्या छत्तीस तत्त्वांच्या व्याख्या साधकाच्या पक्षीं खरोखरीच अत्यंत उपयुक्त व उद्बोधक आहेत. तसेंच सर्वांचें देह क्षेत्रच; पण गुणकर्म यांच्या संगतींत सांपडल्यामुळें क्षेत्राचे अनेक प्रकार होतात, त्यांत वैचित्र्य निर्माण झाल्याचे दिसून येतें. तो गुणविचार पुढच्या चौदाव्या अध्यायांत सांगूं असें येथें केवळ दिग्दर्शन मात्र केलें आहे [ ७२ ते १६० ].

आतां प्रस्तुत अत्यंत गूढ असणाऱ्या ज्ञानाचें स्वरूप तुला सांगतों. हें ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं तपी, योगी, मुनी, वेदाध्ययनी, हे आपापल्या परीनें त्या त्या साधनांची पराकाष्ठा करून झटत आहेत. कारण, ज्या ज्ञानाचा केवळ प्रवेश अविवेकाचा नाश करतो, अर्थात जें ज्ञान संसाराला मुळासकट उपटून टाकतें. जीवाला साक्षात

परब्रह्माची भेट करून देते. जीव-शिवैक्य करते; पण त्या ज्ञानाचे शब्दद्वारां वर्णन करतां येत नाहीं. डोळ्याला दिसत नाहीं; तरीपण तें ज्ञान हृदयांत अभिव्यक्त झाले म्हणजे त्याच्या देहेंद्रियाचें ठिकाणीं जी लक्षणें उमटतात, त्या लक्षणांवरून तें ज्ञान जाणले जाऊं शकते. म्हणून ती लक्षणें सांगतों ऐक [ १६१ ते १८३ ].

[ १ ] **अमानित्व**—अंगीं विद्वत्ता, बृहस्पतीच्या तोडीची सर्वज्ञता असूनहि 'हा एक अमुक मनुष्य आहे' अशी आपली लोकांस आठवणहि होऊं नये व महिमेच्या भीतीनें 'वेडिवेमाजीं दडे.' आपले नाम-रूप, विद्वत्ता लोकांसमोर येऊं नये, असा वागतो. मान-सन्मानाची ज्यास मुळींच वृत्ति नसते.

[ २ ] **अदंभित्व**—धर्मध्वजित्व मिरविण्याची अजिबात वृत्ति नसते. प्राण जाण्याचा प्रसंग आला तरी आपले सुकृत स्वतःच्या वाणीनें लोकांस बोलून दाखवित नाहीं.

[ ३ ] **अहिंसा**—अहिंसेविषयीं बहुत मतें आहेत. या मतांचा विचार पाहूं गेले असतां असे समजते कीं, कोणी केवळ हिंसा पेरून अहिंसेचे पीक काढूं पाहतात, तर कोणी अहिंसा करण्याच्या निमित्तानें हिंसाच करतात. या प्रकारें यज्ञाच्या नांवानें पशुहत्या करण्यापासून तों थेट पाणी गाळून पिणाऱ्यापर्यन्त सर्वांची प्रचलित असलेलीं मतें कशी हास्यास्पद आहेत, ते श्रीज्ञानेशांनीं सांगून स्वमतानें खरें अहिंसेचे स्वरूप सांगितलें आहे. ते असें-'अहिंसा' म्हणजे केवळ बाह्याचार, बाह्यकृति नसून आन्तरिक विवेकाधिष्ठित एक वृत्ति आहे. त्या वृत्तीवरच बाह्यकृतिरूप अहिंसा अवलंबून आहे. किंबहुना !! कोणत्याहि विषयाविषयींची 'वृत्ति' सुरवातीस मनांत उत्पन्न होत असते. नंतर त्या शुभाशुभ प्रवृत्तीस साधारण कारण असणाऱ्या मनाच्या वृत्तीला अनुसरूनच ज्ञानेंद्रियांची व कर्मेंद्रियांची आपापल्या व्यवहारास सुरुवात होत असते. या न्यायानुसार चित्तांत खऱ्या ज्ञानाचा उदय होतो अर्थात् ज्ञान-मनाची भेट होतांच आन्तरिक वृत्तिरूप 'अहिंसा' मूर्तिमन्त प्रगट होते व अशी खरी अहिंसा मनांत उत्पन्न झाली कीं, त्याच्या सर्वच्यासर्व बाह्यकृति अहिंसात्मक अशाच घडतात. त्याचे बोलणे सत्य, कोणासहि झोंबणार नाहीं असें मवाळ, शुद्ध, प्रेमळ, मोजके असून जणुं नादब्रह्मच आकारास आले कीं काय ? तसें ते अमृतमधुर असते. त्या ज्ञानी पुरुषाची दृष्टिहि कासवीच्या दृष्टीपेक्षांहि अधिक प्रेमळ असते. तो भूतमात्रांत परब्रह्मच पाहतो. त्याची दृष्टि ज्याच्यावर पडेल त्याचे समाधान होते. किंबहुना !! त्या ज्ञान्याच्या सर्व क्रियेंत खरी अहिंसा दिसून येते. अहिंसेचें हे खरें स्वरूप न जाणतां केवळ बाह्याचाराविषयीं विवेकशून्य 'हटवाद' करणाऱ्या लोकांचें करणें मूळ अहिंसेच्या तत्त्वास लोपविणारें असल्यामुळें बैल विकून गोठा बांधावा किंवा पोपट विकून पिंजरा घ्यावा त्याप्रमाणें हास्यास्पद आहे, हे अहिंसेचे व्याख्यान वाढले म्हणून त्याचा परिहार दिला कीं, आपलें व्याख्यान श्रोत्यास पटून निःसंदेह प्रतिपादनामुळें श्रोते प्रसन्न व्हावेत, असें वाटत असेल तर वक्त्यानें प्रचलित मतांतरांचे युक्तिपूर्ण निरसन करणें अवश्य आहे. म्हणूनच मीहि येथें विस्तार केला आहे [ १८४ ते ३३८ ].

[ ४ ] **क्षान्ति**—त्रिविध दुःख जरी अंगावर कोसळलें तरी जो डगमगत नाहीं; तर ते सर्व आपले स्वरूपच आहे, असें समजून ते 'कष्टावांचून' सहन करतो, तरीहि आपण लोकोत्तर असें कांहीं सहन करतो असा अभिमान किंवा त्याची जाणीवहि त्यास नसते.

[ ५ ] **आर्जव**—अमृत धारेप्रमाणें अंतःकरणाची सरलता असते. अर्थात् त्यामुळें अंतःकरण शुद्ध व निष्कपट असते आणि त्यामुळें सर्वांशीं होणारें वर्तनहि अतीव सरळ व प्रामाणिकपणाचें असते. असा जो आर्जवाची मूर्ति आहे. तेथेंच ज्ञानानें आपले वसतीस्थान केलें असे समज [ ३३९ ते ३६७ ].

[ ६ ] **गुरुभक्ति**—श्रीगुरुसेवा ही अवघ्या दैवाची जन्मभूमि असून ती शोकग्रस्त जीवाला ब्रह्मस्थिति प्राप्त करून देते. गुरुभक्तानें आपल्या स्वतःला श्रीगुरुसेवेस विकून घेऊन गुरुभक्तीचे घरच केलेले असते. श्रीगुरुंचे घर, गांव, देश यांच्या प्रेमानें तो भारावून वेडा झालेला असतो. श्रीगुरुंच्या देशाकडून येणाऱ्या वाऱ्यालाहि धांवून सामोरा जातो व त्यास "आपण माझ्या घरीं यावे" अशी प्रार्थना करतो. श्रीगुरुसेवेविना त्यास इतर कांहींहि गोड लागत नाहीं तो साधनचतुष्टय संपत्तीनें युक्त होऊन श्रीगुरुचरणाचा आश्रय केलेला असल्यामुळें माया, चिदचिद्ग्रंथीरूपी बंधनांतून केव्हां मुक्त होईल ! मला ब्रह्मात्मैक्य ज्ञानोपदेश करणारें श्रीगुरु केव्हां भेटतील अशी त्याला तळमळ लागलेली असते. श्रीगुरूंच्या वियोगांत जाणाऱ्या एका निमिषासहि युगाहून मोठे मानतो. त्याच्या ध्यानीं मनीं श्रीगुरु व श्रीगुरुसेवाच

असते. श्रीगुरूंची सर्वप्रकारची सेवा सर्वभावानें करावी, अशीच मनोवृत्ति असते. वस्तुमात्र मी होऊन श्रीगुरूंची बाह्यसेवा जोपर्यन्त देह उभा आहे तोपर्यन्त करीन देह पडल्यावरहि त्यांची सेवा करीन, देह पडल्यावरहि या मृत देहांतील पंचमहाभूतेंहि श्रीगुरुसेवेंतच समर्पित व्हावीत व जन्मोजन्मीं श्रीगुरुचरणसेवा घडावी; अशी त्याची खरी इच्छा असते. श्रीगुरु हेंच क्षेत्र, श्रीगुरु हीच देवता, माता-पिता असून श्रीगुरुविना दुसरा मार्ग जाणत नाहीं. त्या गुरुभक्ताच्या ठिकाणीं जगाला पुरेल इतके ज्ञान उबल्या दारानें नांदत असतें. माझ्या मनांत श्रीगुरुभक्तिविषयीं नितांत प्रेम असल्यामुळें इतकें विस्तृत व्याख्यान केले, असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. [ ३६८ ते ४६० ].

[ ७ ] **शुचित्व**--अंतरांत विशुद्ध ब्रह्मात्मैक्यज्ञान व बाह्यशुद्ध-कर्माचरण असल्यामुळें अंतर्बाह्य शुचिर्भूत झालेला असतो. ज्ञानानें समूळ वासना गेल्यावरच खरें शुचित्व लाभते ते त्यास लाभलेले असल्यामुळें स्फटिकाच्या तावदानांत ठेवलेल्या दिव्याप्रमाणें तो पावित्र्यानें सुशोभित दिसतो [ ४६१ ते ४८३ ].

[ ८ ] **स्थैर्य**--दैववशात् दुःख शोकांच्या उर्मीच्या लाटा कितीहि आल्या गेल्या तरी त्याच्या मनाची बैसका मुळींहि चळत नाहीं किंवा ढळतांहि नाहीं [ ४८४ ते ५०० ].

[ ९ ] **अन्तःकरणनिग्रहः**—यम-दमादि साधनांच्या साह्यानें ज्यानें आपल्या अंतःकरणाला इंद्रियांच्या तडाक्यांतून सोडविलें आहे व चित्त आणि चैतन्य यांच्या समरसतेंत जो रममाण असतो [ ५०१ ते ५११ ].

[ १० ] **वैराग्य**--ऐहिक व पारत्रिक अनुकूल मानलेल्या भोग्य विषयसुखाविषयीं त्यागाच्या इच्छेंतच खरें-विषय वैराग्य असतें कीं, जे आत्मप्राप्तीचें दैवच होय. आणि ज्यामुळें साधक ब्रह्मानंदाएवढ्या मोठ्या लाभास-पात्र होतो. [ वैराग्य म्हणजे उद्वेग नव्हे, कारण, उद्वेग वाहणाऱ्याच्याच पदरीं शेवटीं केवळ दुःखच प्राप्त होतें. कधीं विषयांतील अशुचित्व पाहून-वैराग्य निर्माण होते. तर कधीं विषयांतील सातिशयत्व, साधनाधीनत्व, इत्यादि दोष दर्शनानें वैराग्य निर्माण होते. पण त्याहिपेक्षां अनित्यत्व दोष जाणून निर्माण होणारें वैराग्य तीव्रतर स्वरूपाचे असते. कारण, संसारास अनित्यत्व जाणून निर्माण झालेल्या वैराग्यास घालवून दिलें तरीहि वैराग्य आपण होऊन साधकाच्या पाठी लागते. तसेच ऐहिक, पारत्रिक भोग्यविषयाविषयीं मिथ्यात्व ज्ञानमूलक होणारें वैराग्य हे तर उपर्युक्त वैराग्यापेक्षांहि तीव्रतम-स्वरूपाचें असते. की, जे वैराग्य "अतोऽन्यदार्तं", "यदल्पं तन्मर्त्यं, नाल्पेसुखमस्ति" इत्यादि श्रुतिद्वारां-परमात्म व्यतिरिक्त सर्व दुःखरूप परिच्छिन्न-प्रातिभासिक असल्याचे जाणून मिथ्यात्व दोष-ज्ञानमूलक, ज्ञानफल-पर्यवसायी असते. अशा-वैराग्यानेंच विषयवासनेनें मलीन झालेलें अंतःकरण खरें शुद्ध होत असतें व अशा शुद्ध अंतःकरणांतच ब्रह्मात्मैक्य बोध रुजतो, अंकुरित होतो, सुपल्लवित होतो, सुपुष्पित होतो; किंबहुना ! ! अप्रतिबद्ध-ब्रह्मानंदाभिव्यक्तरूप फलानें सुफलित होतो [ ५१२ ते ५२३ ].

[ ११ ] **अनहंकार**—उत्तम रीतीनें वर्णाश्रमपोषक अशीं नित्यनैमित्तिक कर्में करून 'हे कर्म मी केलें' असा यत्किंचितहि अभिमान मनांत नसतो त्यासच-निरहंकारता म्हणतात [ ५२४ ते ५३४ ].

[ १२ ] **जन्ममृत्युजराव्याधि, दुःख व दोष यांचे अनुदर्शन**—मागील जन्माचे दुःख विसरत नाही. तसेंच मृत्यु, म्हातारपण, रोग हे प्राप्त होण्यापूर्वींच जो सावध असतो. पुढील दुःखें पुनः प्राप्त होऊं नयेत म्हणून ऐन तारुण्याच्या उमेदींत चोखड्या आत्मज्ञानाचा विचार करून ठेवतो, ज्या स्नेहामुळें वियोग दुःख, विपात्ति, शोक हीं पोसली जातात. तो स्नेह टाकून जो उदासीन वृत्तींत राहतो. इंद्रियनिग्रहपूर्वक समाधान वृत्तींत राहणारा ज्ञान-संपत्तीचा-मालकच आहे, असें तूं समज. आणखीहि एक लोकोत्तर लक्षण सांगतों ऐक [ ५३५ ते ५९३ ].

[ १३ ] **असक्ति**—देहेंद्रिय-उपाधि व तत्संबंधीं स्त्री, मुलें वरदार इत्यादिकांत वावरत असूनहि वांटसरूप्रमाणें उदास असतो. त्या अलिप्त वृत्तीसच 'असक्ति' म्हणावे [ ५९४ ते ५९९ ].

[ १४ ] **समचित्तत्व**—प्रिय व अप्रिय वस्तूंच्या प्राप्तीनें चित्ताच्या समतेस मुळींहि उणेपणा येत नाहीं व जो सुखदुःखाचे प्रसंगीं अंतःकरणानें सुखी वा दुःखी अशा अवस्थेनें बदलत नाहीं; त्याचे ठिकाणीं ज्ञान आहे, असें तूं समज [ ६०२ ].

[ १५ ] **अव्यभिचारी भक्ति**—माझ्या-[ परमेश्वरा-] पेक्षां अधिक चांगले कांहीं नाहीं, अशा दृढनिश्चयानें

माझ्याशीं एकरूप होऊन जे माझी भक्ति करतात ते ज्ञानी भक्त ' मीचि होऊन माझी सेवा करीत ' असतात. या अद्वैत-भक्तींत, पाणी व तरंग हे असे एकरूप असतात तसा जो परमेश्वराशीं अनन्ययोगानें म्हणजे वेगळा न राहतां एकरूप होतो. तो ज्ञानी भक्त—म्हणजे केवळ ज्ञानाचीच मूर्ति असतो [ ६०३ ते ६१० ].

[ १६ ] **एकान्त प्रियता**—त्याला लोकांचा कंटाळा—लौकिक त्रास असून एकांतावर, एकांतवासावर बहुत प्रीति असते " तो मनुष्याकारे ज्ञानाची मूर्ति " च जाण [ ६११ ते ६१३ ].

[ १७ ] **अध्यात्मज्ञाननित्यत्व**—ज्या ज्ञानामुळें परमात्मवस्तु आत्मत्वानें अनुभवास येतें त्या अध्यात्मज्ञानाविना भव व स्वर्ग विषयक जी ज्ञानें, ती अज्ञानें आहेत, असा तो मनानें दृढनिश्चय करतो. सदा अध्यात्म चिंतन करतो. [ ६१४ ते ६२२ ].

[ १८ ] **तत्त्वज्ञानार्थदर्शन**—शुद्ध बुद्धींत जीवब्रह्मैक्यज्ञानाचा उदय झाल्याबरोबर ज्याची चोख मती ज्ञेय परब्रह्माला जाऊन भिडते. तो हातोहात परब्रह्मतत्त्वास आत्मत्वानें भेटतो [ ६२३ ते ६३१ ].

[ **ही ब्रह्मात्मैक्यानुभूतीची, ब्रह्मात्मैक्यसाक्षात्काराची** आदर्शभूत लक्षणें आहेत त्यास येथें ' ज्ञान ' म्हटले आहे. मागे दुसऱ्या अध्यायांत ' स्थित प्रज्ञाची ' व बाराव्या अध्यायांत ' भक्तांची ' जीं लक्षणें सांगितलीं तशीच येथें हीं लक्षणें सांगितलीं आहेत. यापुढें ' गुणातीताची ' हि अशीच कांहीं लक्षणें चौदाव्या अध्यायांत सांगितलीं आहेत. या बाबतींत ' **सिद्धस्य लक्षणानि–साधकस्य साधनानि भवंति** " अर्थात् ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारी सिद्धाची पूर्णरूप लक्षणें असतात, ती साधकाची प्रयत्नसाध्य साधनें म्हणूनच या अध्यात्मशास्त्रांत सांगितलेली असतात, असा हा ' न्याय ' किंवा " संकेत " लक्षांत असणें जरूर आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं या लक्षणांचे केलेलें वर्णन नितान्त–रमणीय, निरुपम, रसभरित, गौरवपूर्ण आणि ' यथार्थ अर्थवाहक ' शब्दांच्याद्वारां केलें आहे. त्याचे अंतर्मुखवृत्तीनें चिंतन केल्यास हीं लक्षणें केवळ पुस्तकी ज्ञानानें किंवा शब्दज्ञानानें उमटणारी नाहींत; तर ती लक्षणें साक्षात्कारात्मक ब्रह्मात्मैक्य–अनुभूतीचींच द्योतक आहेत, असें सहज लक्षांत येईल ].

अशी ज्ञानाची अठरा लक्षणें स्पष्ट वर्णन करून नितान्त सुंदरपणानें सांगितली. तीं लक्षणें ऐकून श्रोते आनंदित झाले आहेत, असें पाहून पुढील व्याख्यान करण्यास श्रीज्ञानेशांना अधिकच स्फूर्ति आली " अज्ञान म्हणजे ज्ञान लक्षणांत जी स्थिति–सांगितली त्याच्या उलट स्थिति " असें भगवंतासारखें श्रीज्ञानेशांनाहि सांगता आले असते, परंतु त्याचे श्रीज्ञानेशांनीं मुद्दाम सविस्तर वर्णन केले आहे कारण, त्याज्य वस्तूचें ज्ञान झाल्यास त्याग करणें सुलभ होते, त्याचा थोडक्यांत सारांश असा कीं,–गर्वानें फुगुन जातो, सत्कारानें संतोष पावतो, धर्मध्वजित्व मिरवितो अर्थात् दांभिक असतो, जगाला पीडा व दुःख देतो, मानापमान सहन होत नाहींत. तो बाह्यप्रामाणिकपणाचा आव आणतो पण आंतील डाव घातक असतो, असा आंतल्या गांठीचा असतो. गुरुभक्तीची आवड तर नसतेच उलट श्रीगुरुपासून विद्या घेऊन त्यांच्यावरच उलटतो. त्याचे मन अशुचि, अमंगळ असते. क्रियाहि शास्त्र निषिद्ध असते. यत्किंचित् वैषयिक लाभासाठीं नियमापासून ढळतो त्याचा आंतरिक मनाचा निग्रह नसतो, स्वच्छंद असें तें मन हिंडत असते, आजन्म विषयसेवन करूनहि त्याचा त्यास त्रास वा कंटाळा येत नाहीं. देहतादात्म्यभ्रांतीनें अभिनिविष्ट होऊन इतरांचा मत्सर करतो, विद्येचा गर्व ठेवून राहतो. जन्म दुःख वा गर्भव्यथा तो जाणत नाहीं, तसा मृत्यु आला कीं, देह पडून जाईल, याची त्यास कल्पनाहि नसते. त्यामुळें तो धन पुत्रादिकांच्या मोहांत गुंतून जातो, त्यास मृत्यु चिंता नसते. पुढील म्हातारपण, रोग दुःखें याविषयीं मुळींहि विचार करीत नाहीं. [ व्यभिचारी भक्ति अर्थात् भक्ति कशी नसावी ते ज्ञानेशांनीं येथें सागितलें आहे ] धन मिळविण्यासाठीं ठक लोक जसे विरक्तीचे सोंग घेऊन नटतात. त्याचप्रमाणें कांहींतरी फलप्राप्ती व्हावी अशा इच्छेनें माझी भक्ति करितात. त्या लोभी लोकांस भक्तीपासून अपेक्षित असें फल मिळाले नाहीं, तर ते दैव देवाची भक्ति, हे सर्वकांहीं टवाळ आहे; म्हणून सोडून देतात. त्याचा पाषाण प्रतिमेवर बहुत भर असतो; पण प्राणिजातांशीं अति निष्ठुरपणें वागणुक असते. त्याची भक्ति असते; पण त्यांत त्यांची एकनिष्ठता अशी नसतेच. माझी मूर्ति करतो व ती घराच्या कोपऱ्यांत बसवितो व आपण मात्र दुसऱ्या एखाद्या देवाच्या किंवा देवीच्या यात्रेस जातो एकादशीच्या दिवशीं जितका मान आम्हांस, तितकाच मान नागपंचमीस नागांचाहि करतो. संकष्टी चतुर्थीस गणेशाचा होतो तर चतुर्दशीस " हे आई दुर्गे ! मी तुझाच आहे " असें म्हणतो. विहित नित्यनैमित्तिक कर्में सोडतो व नवचंडीच्या अनुष्ठानास बसतो. नंतर सोमवार आला कीं, बेल

घेऊन लिंगार्चनाला धांवतो, असा हा सर्व देवांचा भक्त असतो. तो अज्ञानाचा मूर्तिमन्त अवतार समज. [ यांत श्रीज्ञानेशांनीं जगत्कारण परमेश्वरास सोडून प्रतिमा किंवा इतर नाना क्षुद्र देव-देवतांची भक्ति करणें म्हणजेच 'व्यभिचारी भक्ति' होय. इतर जीवदशेंतील देवतांची किंवा विशिष्ट क्षेत्रांतच देव देवता आहेत, असें समजून त्यांचीं पूजा, भक्ति, यात्रा करणें हा-'व्यभिचार' आहे, अशी अज्ञानमूलक सकाम वेदबाह्य केलेली भक्ति अतिशय तिरस्करणीय असल्याचें श्रीज्ञानेशांनीं वेश्येच्या दृष्टान्तानें सांगितले आहे. कारण, कामवासना, दंभ, पाप, व्यभिचार इत्यादि दोषांनीं रहित होऊन सर्वव्यापक परमेश्वराची वेदविहित स्वकर्म कुसुमांनीं केलेली जी भक्ति ती खरी 'शुद्ध व देवास आवडणारी भक्ति होय. ] त्या अज्ञान्यास एकांत मुळींच आवडत नाहीं. सदा लोकांच्या गजबजांत राहतो व त्यांचेच त्याला कौतुक वाटते, लौकिक मिळवून देणाऱ्या शास्त्रविवेकडे त्यास ओढ असते, आत्मदर्शन करून देण्यास समर्थ असणाऱ्या उपनिषदांकडे चुकूनहि पहात नाहीं. अर्थातच तत्त्वज्ञानानें प्रतिपादिलेल्या अर्थाचें म्हणजे परब्रह्माचें त्यास दर्शन होत नसते [ ६२२ ते ८४८ ].

या श्रीज्ञानेशांच्या सविस्तर व्याख्यानांवर श्रोते संतोष पावून 'देवाचे मनोगत । तूं दावित आहासी मूर्त ॥' असें म्हणाले. आतां यानंतर देव निर्गुण ज्ञेयस्वरूपाचें कथन करतात [ ८४९ ते ८५६ ].

निर्गुण परब्रह्मवस्तूला 'ज्ञेय' म्हणतात. ते एवढ्याच करितां कीं, ती परब्रह्मवस्तु ज्ञानाविना कोणत्याच उपायानें प्राप्त होत नाहीं. जे ज्ञेय जाणल्यावर कर्तव्य असें कांहींच उरत नाहीं. जें जाणले असतां ज्ञाता, ज्ञेयस्वरूपच होतो. ज्ञेय आत्मत्वानें जाणले असतां संसाराचा निरास होऊन जाणणारा नित्यानंद स्वरूप होतो. तें अनादि म्हणजे अनुत्पन्न स्वरूपाचें आहे. अशा 'ज्ञेय परब्रह्मास', 'नाहीं' म्हणता येत नाहीं. कारण विश्वाकारानें तोच प्रगट झालेला दिसतो. बरे! ते परब्रह्म म्हणजे हे आकारवान् विश्वच आहे, असें म्हटलें तर 'विश्वाकार' ही तर 'माया' आहे. कारण, विश्वाकार विनाशीं, चंचल आहे. ज्ञेय परब्रह्म साक्षात्कारांत रूप, वर्ण, व्यक्ति, दृश्य-द्रष्टा-दर्शन या त्रिपुटींचा पूर्णतया लय होऊन आश्रय-विषयरहित केवळ ब्रह्मच उर्वरित राहते. त्याचे ज्ञानमात्रस्वरूप व त्याची सर्व व्यापकता समजून सांगण्याकरितां त्यास श्रुति 'विश्वतश्चक्षु' म्हणजे त्यास सर्व बाजूंनीं डोळे आहेत असें म्हणते. वास्तविक त्यास हात, पाय, डोळे हें कांहीं नाहींत; पण आकाररहित परमात्मा सर्वान्तर्यामी व सर्वव्यापक आहे. 'सर्वशून्यत्वाचा निष्कर्षु जें न साहे' म्हणजे ते अत्यंत निर्विशेष सत्‌सामान्य स्वरूपाचे आहे. म्हणून 'नामरूप संबंधु । जाति क्रिया भेदु । हा आकारासी प्रवादु । वस्तूसी नाहीं ॥' म्हणून ज्ञेय परब्रह्म शब्दास अविषय आहे. त्याचे कोणत्या शब्दानें वर्णन करणार? ज्ञेय परब्रह्मवस्तूचा कोणत्याहि शब्दानें नामनिर्देश, जातिनिर्देश, रूपनिर्देश, गुणनिर्देश, क्रियानिर्देश यापैकीं कोणताहि निर्देश करतां येत नाहीं; करतां येणें शक्य नाहीं, नव्हे! निर्विशेष ब्रह्मासंबंधीं शब्दद्वारा निर्देश कसा संभवेल? असें असूनहि श्रुति 'विश्वांत ब्रह्म व्यापक आहे' असा 'विश्व' व 'ब्रह्म' यांच्यांत जो 'व्याप्यव्यापक' भाव सांगतें; तो सर्व प्रमाणास उपजीव्यभूत स्वयंप्रकाश परब्रह्मवस्तु शब्दास व मनास अविषय आहे, हेंच अचूकपणें समजून देण्याकरितां, क्षणभर मिथ्याद्वैत पत्करूनच सांगते. असें पहा कीं, "शून्य" म्हणजे "कांहीं नाहीं" तरीपण "कांहीं नाहीं" हा अर्थ अचूक दाखविण्यासाठीं कागदावर एक वाटोळे 'बिंदुले' करावे लागते. तशीच अद्वय निर्विशेष ब्रह्म सत्‌शिष्यास सांगण्याचाच प्रसंग आला तर मिथ्या द्वैत स्वीकारूनच सांगावे लागेल. याच हेतूनें श्रुतीनें "द्वैतभावें अद्वैतीं। निरुपणाची 'वाहती । वाट' केली" ॥ व 'गुरुशिष्य सत्पथा'चा अडसर सदाचाच काढून टाकला [ ८५७ ते ८९० ].

निर्गुण ब्रह्म, गुणांचा उपभोग घेते, असें म्हणणे रंकानें स्वप्नांत राज्य करावे तसें आहे. म्हणून त्याचा ब्रह्माशीं संबंध आहे, असें बोलूहि नये. पंचमहाभूतांतील गुण, विकार व इन्द्रियें हीं सर्व त्याच्याच सत्तास्फूर्तीवर सत्तावान् व प्रकाशित होतात, ते सर्वांस व्यापून राहिले आहे. अर्थात् निर्गुणावर सगुण-साकाराचा भास होतो, ते ब्रह्म सर्वांपासून सर्वतोपरि अलिप्त आहे. त्रिगुणांचा निरास झाला तरी ते उर्वरित राहतेच. जगताच्या उत्पत्ति-स्थिति-लय या अवस्था-भेदाप्रमाणें लोक त्यास अनुक्रमें 'ब्रह्मा', 'विष्णु' आणि 'रुद्र' अशी तीन नावें देतात; पण ते गुणत्रयांचा लोप झाला तरी "श्रुतिवचन संमत-महाशून्य" म्हणजे अत्यंत निर्विशेष अखंडैकरस ब्रह्म उर्वरित राहते. त्या परब्रह्मास जे आत्मत्वानें जाणतात तेहि दृश्य-द्रष्टा-दर्शन या त्रिपुटीविरहित स्थितीस प्राप्त होतात. "सर्वच आत्मा किंवा ब्रह्म आहे" एवढेंच सांगितलें तर त्यामुळें श्रुतिसंमत अद्वैत सिद्धांताचा यथार्थ बोध होत नाहीं. म्हणून क्षेत्र, ज्ञान,

अज्ञान आणि ज्ञेय असें चार प्रकार करून सांगून एक अद्वय ब्रह्मच आहे, असें दाखविले. तुझी ऐकण्याची तीव्र इच्छा पाहून ह्याच विचार श्रीकपीलमुनींच्या सांख्यशास्त्रांतील "प्रकृति-पुरुष" इत्यादि परिभाषेंत सांगतो [८९१ ते ९९८].

आतांपर्यंत जें 'क्षेत्र-क्षेत्रज्ञा 'चे विवेचन सांगितलें. त्यांसच सांख्यशास्त्रांच्या परिभाषेंत 'प्रकृति-पुरुष' असें म्हणतात. दोन्ही 'अनादि सिद्ध' आहेत. बुद्धि, इन्द्रियें, अंतःकरण, सत्त्वादिगुण इत्यादि सर्व विकारसमुदाय प्रकृतिपासूनच उत्पन्न झाला आहे व त्यापासूनच सर्व कर्मांची उभारणी होते. सत्त्वादिक गुणांच्या न्यूनाधिक्तेनुसार या कर्मास 'सत्कर्म' व 'निषिद्धकर्म' असें म्हणतात. त्यांत सत्कर्मापासून सुख व असत्‌कर्मापासून दुःख उत्पन्न होते. असें जोंवर सुखदुःखें उत्पन्न होतात तोंवर 'प्रकृति उद्यमु करी। पुरुषु भोगी' असा त्या प्रकृति-पुरुषांत 'संगति' किंवा कोणताच मेळ नसतो. पण प्रकृति जग प्रसवते, हे एक आश्चर्य ऐक [९९९ ते ९७९].

तत्त्वतः 'पुरुष' निर्गुण, निरुपाधिक, निराकार, निरवयव असून अकर्ता व अभोक्ता आहे; तो-निर्विशेष असल्यामुळें त्याचें ठिकाणीं विशेष असा कांहींच नाहीं; तरीपण ही गुणमयी, त्रिगुणात्मक प्रकृतिच त्याचे सर्व कांहीं बनून त्यास संसार करावयास लावते व ती अघटित घटना घडविण्यांत पटु असल्यामुळें "भलतैसा खेळु। लेखा आणी" एवढेच नव्हे, तर त्या त्रिगुणात्मक प्रकृतीच्या केवळ [आध्यासिक] संगामुळें पुरुषास गुणभोग भोगणें भाग पडते व जन्म-मृत्यूची अनर्थपरंपराहि भोगावी लागते; असें आपणांस प्रकृतीच्या त्रिगुणामुळेंच वाटते; तो भोग व गुणसंग हा केवळ भ्रम आहे, वास्तविक पाहिले तर तो त्याच्यावर खोटाच आळ आला आहे. तत्त्वतः तो प्रकृतीचा आधार व साक्षी आहे. त्या असंग पुरुषास तत्त्वतः जन्ममरणहि नाहीं व गुणभोगहि नाहीं. असा हा "प्रकृति-पुरुष विवेक" ज्यांनीं यथार्थ-अचूकपणें जाणला, ते पुरुष देहेंद्रियादि उपाधींत वावरत असतांना दिसले तरी ते देहमोहानें भुलविले जात नाहींत. हा प्रकृति-पुरुष विवेक म्हणजे 'आत्मा' व 'अनात्मा' यांच्यातील सत्यमिथ्यारूपीं भेद कळणें, यासच 'विवेक' म्हणतात. आत्मानात्म्याच्या म्हणजेच सत्यानृताच्या-मिश्रणांतून 'आत्म्यास' निवडून काढण्यासाठीं सांख्ययोग, ध्यानयोग, आणि कर्मयोग हे असें व अनेक मार्ग प्रचलित आहेत, पण ते मार्ग अवघड आहेत; पण ज्यांना ही सत्यानृताच्या मिश्रणाला निवडून वेगवेगळें काढण्याची सूक्ष्म निरीक्षणक्षमदृष्टि नसेल अशा अज्ञानी जीवासहि एक तरणोपाय आहे आणि तो म्हणजे त्यांनीं जर निरभिमान होऊन हिताहित जाणणारे, करुणावंत, अनुभवी तत्त्वज्ञ संत आहेत त्यांचें पायीं नितान्त विश्वास ठेवून, त्यांची सर्वभावानें सेवा करून त्यांच्या उपदेशानुसार त्यांनीं साधनानुष्ठान केलें तर तेहि निश्चितपणें जन्म-मरण परंपरेंतून विमुक्त होतात. [९८० ते १०४६].

सारांश, क्षेत्र-क्षेत्रज्ञांच्या संयोगानें निर्माण होणारे चराचरात्मक प्रपंचाकार, व पांचभौतिक देह विनाशी असून त्या देहांत जे अविनाशी तत्त्व आहे, ते मात्र सर्व भूतांमध्यें सारखे भरलेले आहे. भूतांची नांवें, रूपें, वर्तनें ही चित्रविचित्र-भिन्न भिन्न आहेत. त्यांत सम असणारे अविनाशीं तत्त्व एकच आहे, असें जे जाणतात त्यांनाच ब्रह्माचें खरें ज्ञान होतें, पण असें भाग्यवान् फार विरळे!!

ज्याप्रमाणें एकाच दुध्या भोपळ्याच्या वेलीचीं फळें कांहीं लांब, तर कांहीं वाकडी, तर कांहीं वाटोळी, अशा भिन्नभिन्न आकाराची असतात. त्याचा संन्याशाचा कमंडलु, गवयाचा तंबोरा, इत्यादि कार्यासाठीं उपयोग केला जात असल्यामुळें 'प्रयोजनें 'ही भिन्न भिन्न आहेत. किंवा विस्तवाच्या ठिणग्या जरी अनेक व लहान मोठ्या असल्या तरी त्या सर्वांत उष्णता जशी समान असते किंवा घट-मठ या दोन उपाधींमध्यें भेद असून त्यांचे आकार व उपयोगहि भिन्न भिन्न आहेत; तरीपण त्यांतील आकाशमात्र एकच आहे. त्याप्रमाणें या विश्वांत किंवा भूत समुदायांत उपाधितः अर्थात् नाम, रूप, संबंध, जाति, क्रिया, यामुळें किंवा सत्त्व-रज-तम या त्रिगुणामुळें 'विषमता' असली तरी त्या विषम भूतसमुदायांत व सर्व विश्वांत परब्रह्म वस्तु 'सम' व्याप्त आहे. सर्व भूतांचा भास नाश पावला तरी 'जीवधर्महीन' पण स्वरूपानें जीवाशीं अभिन्न असलेली त्यांतील परब्रह्म वस्तु त्रिकालाबाधित सत्य, अविनाशी आहे. विश्व वैषम्यांत व भूत वैषम्यात ब्रह्मवस्तु एक व सर्वत्र अधिष्ठानरूपानें सम व्याप्त आहे, अशी 'समदृष्टि' ज्यास प्राप्त झाली 'तो ज्ञानियांमाजीं सुनयनु' जाण. त्या ज्ञान्यास सर्वत्र ओतप्रोत भरलेले एकमेव ब्रह्मच दिसते. अशा दैवागळ्या पुरुषास 'साम्यसेजें डोळा। लागला तया' असे समर्पक दृष्टान्तपूर्वक श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात [१०४७ ते १०८२].

देह व आत्मा यांत यत्किंचितहि सादृश्य नाहीं; उलट तमप्रकाशाप्रमाणें ते निराळे आहेत. देह त्रिगुणात्मक, पांचभौतिक, जन्ममरणवान्, विनाशी, दुःखरूप आहे. त्यांत राहणारा परमात्मा 'अनादि' व निर्गुण असल्यामुळें त्रिकालाबाधित सत्य-अव्यय आहे. आत्म्याचें 'नित्यसिद्धत्व' सिद्ध करण्यासाठीं निरनिराळ्या 'हेतूं'चा उपयोग करून श्रीज्ञानेशांनीं सात आठ चिंतनीय अशी अनुमानें लिहिली आहेत. जे जे 'अत्यंत निर्विशेष' असते ते ते 'सत्य' असते, म्हणून श्रीज्ञानेशांनी "निर्गुणपणें, अरूपपणे, शून्यपणे, आत्मपणें आणि अलक्ष्यपणें" या हेतूं वरून आत्म्याचें 'अत्यंत निर्विशेषत्व' सिद्ध केले आहे. 'सकळु' व तत्सापेक्ष 'निष्कळु', नाही, 'क्रियाशील' नाहीं व तत्सापेक्ष 'अक्रिय' हि नाहीं, 'अल्प' म्हणजे परिच्छिन्न नाहीं व तत्सापेक्ष 'बहूवसु' म्हणजे अपरिच्छिन्नहि नाहीं. कारण, आत्मा किंवा ब्रह्म 'व्यापक आहे' असें म्हणणेंहि अव्यापक पदार्थांच्या व्यावृत्त्यर्थच आहे. तो आत्मा देह धर्माकडून मुळींहि लिप्त होत नाहीं. तो देहाचा प्रकाशक आहे. देह व आत्मा यांच्यातील भेद-वेगळीक जाणून घेण्यासाठीं साधक तत्परतेनें प्रयत्न करतात जेथें आकार संपतो, जेथें जीवत्व विरून जाते, जेथें द्रष्टा-दृश्यात्मक द्वैत उरत नाहीं व जे स्वगतादि भेदरहित अद्वय आहे, असें जें परब्रह्म तें जे सत्पुरुष राजहंसाप्रमाणें आत्मा व अनात्मा विवेकानें पृथक् जाणतात, ते पूर्णपणें ब्रह्म होत [ १०८३ ते ११४२ ].

या प्रमाणें भगवान् श्रीकृष्णांनीं "प्रकृति-पुरुष-विवेक" अर्जुनास संपूर्णतया सांगितला. दिव्यांत भरपूर तेल घातल्यानें तो जसा अधिकच प्रज्वलित होतो, त्याप्रमाणें अर्जुनाची ज्ञान श्रवणाची उत्कंठा अधिकाधिक वाढतच होती. श्रीकृष्णांनाहि आपल्या सांगण्याचे सार्थक होत असल्याचे पाहून आनंद झाला. किंबहुना ! ! व्याख्यानांस रसभरितपणाचे भरते आले, आतां देवाकडून संपूर्ण विश्व आनंदमय केले जाईल, असें संजय धृतराष्ट्रास म्हणाला [ ११४३ ते ११५२ ].

श्रीज्ञानेशांनाहि त्यामुळें गीतेवरील भाष्य करण्यास अधिकाधिक स्फूर्ति आली. केवल शांतरसपूर्ण कथाच शब्दांकित करून सांगेन; पण ती शृंगाररसासहि मागे टाकील. आपल्या माधुर्यानें अमृतासहि मागे सारील. अशा शब्दद्वारां उपमा, अलंकार यांनी युक्त असेंच विवेचन मी यापुढें करीन. त्यामुळें खेचरवृत्तीच्या लोकांसहि सात्त्विकतेचा पान्हा फुटेल. सुमन, उत्तम अधिकाऱ्यास तर शब्दश्रवणाबरोबर समाधि लागेल. वाग्विलास विस्तारद्वारां गीतार्थानें विश्वभरूं व साऱ्या "जगास आनंदाचे आवार तयार करूं." अखिल विश्वास ज्ञानचक्षूनें परतत्त्वाचा साक्षात्कार होऊन महाबोधाच्या विपुलतेंत विश्व प्रवेश करील आणि महानंद अनुभवास येईल अशी ज्ञानेशांनीं प्रतिज्ञा केली. श्रेष्ठ व ज्येष्ठ अशा श्रीगुरु निवृत्तिदेवांनी माझा अंगीकार केला असल्यामुळें ती प्रतिज्ञा तेच पूर्ण करतील. किंबहुना ! ! हे श्रीगुरुराया ! मजवर अनुग्रह असावा म्हणजे मी हा ग्रंथ चांगल्या रीतीनें सांगेन, असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात [ ११५३ ते ११७० ].

[ या संपूर्ण तेराव्या अध्यायाचा नकाशा क्रमांक १६ पहावा. ]



# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय चौदावा

जय जय आचार्या । समस्तसुरवर्या । प्रज्ञाप्रभासूर्या । सुखोदया ॥ १ ॥ जय जय सर्व विसांवया । सोऽहंभावसुहावया । नाना लोक हेलावया । समुद्रा तूं ॥ २ ॥ आइकें गा आर्तबधू । निरंतरकारुण्यसिंधू । विशदविद्यावधू- । वल्लभा जी ॥ ३ ॥ तूं जयांप्रति लपसी । तया विश्व हें दाविसी । प्रकट तैं करिसी । आघवेंचि तूं ॥ ४ ॥ कीं पुढिलाची दृष्टि चोरिजे । हा दृष्टिबंधु निफजे । परी नवल लाघव तुझें । जें आपणपें चोरें ॥ ५ ॥ जी तूंचि तूं सर्वां यया । मा कोणा बोधु कोणा माया । ऐसिया आपेंआप लाघविया । नमो तुज ॥ ६ ॥ जाणों जगीं आप वोलें । तें तुझिया बोला सुरस जालें । तुझेनि क्षमत्व आलें । पृथ्वीयेसी ॥ ७ ॥ रविचंद्रादि शुक्ती । उदय करिती त्रिजगतीं । तें तुझिया दीप्ती । तेज तेजां ॥ ८ ॥ जें चळवळिजे अनिळें । तें दैविकेनि जी निजबळें । नभ तुजमाजीं खेळे । लपीथपी ॥ ९ ॥ किंबहुना माया असोस । ज्ञान जी तुझेनि डोळस । असो वानणें सायास । श्रुतीसि हे ॥ १० ॥ वेद वानूनि तंवचि चांग । जंव न दिसे तुझें आंग । मग आम्हां तया मूग । एके पांती ॥ ११ ॥ जी एकार्णवाचे ठाईं । पाहतां थेंबाचा पाडु नाहीं । मा महानदी काई । जाणिजती ॥ १२ ॥ कां उदयालिया भास्वतु । चंद्र जैसा खद्योतु । आम्हां श्रुति तुज आंतु । तो पाडु असे ॥ १३ ॥ आणि दुजया थांवो मोडे । जेथ परेशीं वैखरी बुडे । तो तूं मा कोणें तोंडें । वानावासी ॥ १४ ॥ यालागीं आतां । स्तुति सांडूनि निवांता । चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें ॥ १५ ॥ तरी तूं जैसा आहासि तैसिया । नमो जी श्रीगुरुराया । मज ग्रंथोद्यमु फळावया । वेव्हारा होईं ॥ १६ ॥ आतां कृपाभांडवल सोडीं । भरीं मति माझी पोतडी । करीं ज्ञानपद्य जोडी । थोरा मातें ॥ १७ ॥ मग मी संसरेन तेणें ।

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय चौदावा

हे श्रीगुरो! तुम्ही सकल देवांत श्रेष्ठ असून आनंदोदय करणारे व [आत्मविषयक] बुद्धीरूप प्रातःकाळाचा उदय करणारे सूर्य आहां! तुमचा जयजयकार असो! १. तुम्ही सर्वांचें विश्रांतिस्थान असून सर्वांच्या हृदयांत 'अहं ब्रह्म' हें तत्त्व अभिव्यक्त करणारे आहांत किंवा तुम्ही समुद्ररूपी असून तुमच्यांत चौदा लोक लाटा-प्रमाणें हेलकावे खातात. त्या तुमचा जयजयकार असो! २. तुम्ही दीनदयाळ बंधु आहांत, निरंतर करुणेचे सागर आहांत आणि ब्रह्मविद्यावधूचे वर म्ह० पति आहांत ऐका महाराज ३. जे कोणी तुमच्या यथार्थ स्वरूपाला जाणत नाहींत त्यांना हे सर्व विश्व खरेंच आहे, असें भासते व जे कोणी ब्रह्मरूपानेंच तुम्हाला जाणतात त्यांना सर्व विश्वांत तूंच आहेस म्ह. तुमच्याशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं ४. नजरबंद खेळांत गारोडी दुसऱ्याची दृष्टि प्रतिबद्ध करीत असला तरी त्याला स्वतःची नजर लपविता येत नाहीं. परंतु आपला प्रकार मात्र निराळा आहे. आपण आपल्याला चोरून राहणें म्हणजे आपलें स्वतःचें स्वरूप तिरोहित करून म्ह० लपवून [जीवांना जगदाभास दाखविण्याचें] आपलें चातुर्य म्हणजे विलक्षण अद्भूत जादू आहे ५. महाराज! या सर्व जगाला तूंच तूं आहेस, कोणाला त्यांत तुझे ज्ञान–बोध आहे, तर कोणाला तुझे अज्ञान आहे ते मायेच्या सपाट्यांत गुंतलें आहेत. असा ज्या आपल्याच ठिकाणीं सहज खेळ सुरू आहे, अशा तुम्हाला नमस्कार असो ६. जगतांत ज्याला पाणी असें म्हणतात, त्याला जी द्रवरूपता व गोडी आहे ती तुमच्या सान्निध्यामुळें आली आहे व पृथ्वीला जी सहन करण्याची शक्ति आहे तिला तुमचीच शक्ति कारण आहे ७. चंद्र व सूर्य हे केवळ मोठ्या शिंपल्याप्रमाणें स्वरूपानें निस्तेजच आहेत; परंतु त्यांचा जो तिन्ही लोकांवर उजेड पडतो, तो तुमच्या तेजाच्या शक्तीच्या सान्निध्याचाच प्रभाव आहे ८. चहूं-कडे फिरणारा वायु हाहि तुमच्याच शक्तीमुळें फिरत असतो व आकाश जरी मोठें दिसतें, तरी त्याचा समा-वेश तुमच्यांत होऊन तें लपंडावाप्रमाणें तुमच्या कोठें तरी एका कोपऱ्यांत लपतें, तात्पर्य आपण आकाशा-पेक्षांहि व्यापक आहांत ९. फार काय सांगावें!! सर्व माया ही तुमच्या एक देशाच्या ठिकाणीं असून ज्ञानहि तुमच्याच शक्तीनें चहूंकडे प्रकाशन करते; इतकेंच नव्हे, तर तुमच्या स्वरूपाचा पार न लागल्यामुळें श्रुतीला तें वर्णन करण्याचें श्रम मात्र झाले १०. वेद, ईश्वरस्वरूप वर्णन करण्यांत चतुर खरा, परंतु जोपर्यंत तुमच्या शुद्ध ब्रह्मस्वरूपाचें दर्शन झाले नाहीं तोपर्यंतच. मग वेदहि शुद्ध स्वरूपाचें वर्णन करूं लागला तेव्हां त्यालाहि आमच्या पंक्तीला बसून मूग खावे लागतात. म्हणजे मौन धारण करून दोघासहि स्वस्थ बसावे लागते ११. सर्व जलमय झाल्यावर त्यांत एका थेंबाची खिसगणती नसतेच नसते. परंतु मोठी नदी तरी ओखळतां येईल काय? [तर नाहीं] १२. किंवा सूर्य उगवल्यावर चंद्र जसा काजव्याप्रमाणें होतो म्हणजे सूर्यापुढें चंद्र आणि काजवा ह्यांची किंमत एकच. त्याप्रमाणें तुझ्या स्वरूपापुढें माझी आणि श्रुतीची तशीच अवस्था होते १३. आणि ज्या ठिकाणीं द्वैताचें सामर्थ्य नाहींसे होते व परेसह वैखरी वाणी स्तब्ध राहते त्या तुमचे मी कोणत्या वाणीनें वर्णन करावे? म्हणजे कोणालाहि, शब्दास अविषय आहांत म्हणून वर्णन करतां येणार नाहीं १४. म्हणून आतां तुमची स्तुति करण्याचें सोडून देऊन मुकाट्यानें आपल्या चरणांवर मस्तक ठेवावें हेच उत्तम, चांगले होय १५. तर हे श्रीगुरुराया! तुम्ही जसें आहां तशाच तुम्हांला मी नम-स्कार करितो. कृपेनें तुम्ही माझ्या गीतार्थकथनरूपी व्यापारांत मला नफा करून देण्याकरितां माझे सावकार व्हा १६. तर आतां आपल्या कृपारूपी भांडवलाच्या थैलीची गांठ सोडून माझी मतिरूपी पिशवी भरा; आणि आपण थोर आहां, तेव्हां मला ज्ञानपदाची, ज्ञानपूर्ण कवित्वाची व ज्ञानरूपतेची जोड करून द्या १७. मग मी या व्यापारावरच्या

करीन संतांसी कर्णभूषणें । लेववीन सुलक्षणें । विवेकाचीं ॥ १८ ॥ जी गीतार्थ-निधान । काढू माझें मन । सुयीं स्नेहांजन । आपलें तूं ॥ १९ ॥ हे वाक्सृष्टि एके वेळे। देखतु माझे बुद्धीचे डोळे । तैसा उदैजो जी निर्मळें । कारुण्यबिंबें ॥ २० ॥ माझी प्रज्ञावेली वेल्हाळ । काव्यें होय सफळ । तो वसंतु होई स्नेहाळ- । शिरोमणी ॥ २१ ॥ प्रमेय महापूरें । हे मतिगंगा ये थोरें । तैसा वरिषें उदारें । दिठीवेनी" ॥ २२ ॥ अगा विश्वैकधामा । तुझा प्रसाद चंद्रमा । करूं मज पूर्णिमा । स्फूर्तीची जी ॥ २३ ॥ जी अवलोकिलिया मातें । उन्मेषसागरीं भरितें । "वोसंडेल स्फूर्तीतें । रसवृत्तीचें ॥ २४ ॥ तंव संतोषोनि श्रीगुरुराजें । म्हणितलें विनति-व्याजें । मांडिलें देखोनि दुजें । स्तवनमिषें ॥ २५ ॥ हें असो आतां वांजटा । तो ज्ञानार्थ करूनि गोमटा । ग्रंथु दावीं उत्कंठा । भंगों नेदीं ॥ २६ ॥ हो कां जी स्वामी । हेंचि पाहत होतों मी । जे श्रीमुखें म्हणा तुम्ही । ग्रंथु सांग ॥ २७ ॥ सहजें दुर्वेचा डिरुं । आंगेंचि तंव अमरु । वरी आला पूरु । पीयूषाचा ॥ २८ ॥ तरी आतां येणें प्रसादें । विन्यासें विदग्धें । मूळशास्त्रपदें । वाखाणीन ॥ २९ ॥ परी जीवा आंतुलीकडे । जैसी संदेहाची डोणी" बुडे । ना श्रवणीं तरी चोंडे । वाढी दिसे ॥ ३० ॥ तैसी बोली साचारी । अवतरो माझी माधुरी । मोले मागूनि घरीं । गुरुकृपेच्या ॥ ३१ ॥ तरी मागां त्रयोदशीं । अध्यायीं गोठी ऐसी । श्रीकृष्ण अर्जुनेंसी । चावळले ॥ ३२ ॥ जे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगें । होईजे येणें जगें । आत्मा गुणसंगें । संसारिया ॥ ३३ ॥ आणि हाचि प्रकृतिगतु । सुख-दुःख भोगीं हेतु । अथवा गुणातीतु । केवळु हा ॥ ३४ ॥ तरी कैसा पां असंगा संगु । कोण तो क्षेत्रक्षेत्रज्ञायोगु । सुखदुःखादि भोगु । केवीं तया ? ॥ ३५ ॥ गुण ते कैसे किती । बांधती कवणे रीती । नातरी गुणातीतीं । चिन्हें" काई ? ॥ ३६ ॥ एवं इया आघवेया । अर्था रूपें करावया । विषो एथ चौदाविया । अध्यायासि ॥ ३७ ॥ तरि तो आतां ऐसा । प्रस्तुत परियेसा । अभिप्रायो विश्वेशा । वैकुंठाचा ॥ ३८ ॥ तो म्हणे गा अर्जुना । अवधानाची सर्व सेना । मेळऊनि इया ज्ञाना । झोंबावें हो ! ॥ ३९ ॥ आम्हीं मागां तुज बहुतीं । दाविलें हें उपपत्ती । तरी आझुनी प्रतीती- । कुशीं न निघे ॥ ४० ॥

योगानें सांवरेन व संतांच्या कानांत सुंदर अशीं सुविचाररूप कर्णभूषणें तयार करून ती घालीन. [ सुविचार प्रचुर व्याख्यानानें संतांना श्रवणसुख देईन ] १८. महाराज, गीतार्थरूपी ठेवा बाहेर काढण्याविषयीं माझ्या मनांत जी इच्छा उत्पन्न झाली आहे, ती सफल करण्याकरितां मी समर्थ व्हावें म्हणून तुम्ही आपलें स्नेहरूप अंजन माझ्या बुद्धिरूपी डोळ्यांत घाला १९. ज्यामुळें माझ्या बुद्धिरूप डोळ्यांना एकाच वेळी ही शब्दमय सृष्टि पाहतां येईल, आकलन होईल अशा तन्हेच्या आपल्या करुणारूप निर्मल सूर्यबिंबानें प्रकाशार्थ उदयास यावें २०. माझी बुद्धिरूप वेली पुष्कळ वाढून तिला काव्यरूपी चांगली फळें येण्याकरितां वेलींना प्रफुल्लित करण्याची कृपा करण्यामध्यें श्रेष्ठ असा जो वसंत ऋतु, तो हे श्रीगुरो आपण व्हा २१. आपल्या कृपादृष्टीचा इतका औदार्यानें वर्षाव करा कीं, त्यानें माझ्या बुद्धिरूप गंगेस अर्थरूपी [ सिद्धांतरूपी ] महापूर यावा २२. हे विश्वैकधामा श्रीगुरो ! आपला प्रसन्नतात्मक प्रसादचंद्रमा मला स्फूर्तीची पौर्णिमा करो. [ माझ्या बुद्धींत पूर्ण प्रसन्नतारूपी चंद्रोदयानें पौर्णिमा उदयास येऊन आपल्या कृपेनें मला पूर्ण स्फूर्ति येवो ] २३. ती पौर्णिमा मी अवलोकन केली [ आपला कृपाप्रसाद झाला ] म्हणजे माझ्या बुद्धिरूपी समुद्राला भरतें येईल आणि शान्ताद्भुतादि नवरस हे स्फूर्ति सांडूं लागतील २४. असें श्रीज्ञानदेवाचें भाषण ऐकून श्रीगुरु निवृत्तिनाथ महाराज संतोष पावून म्हणाले कीं, ' ज्ञानदेवा ! तूं विनंति व स्तुती करण्याच्या मिषानें, निमित्तानें द्वैत व्यर्थ वाढवितोस, असें दिसतें २५. तर आतां ही व्यर्थ स्तुति राहूं दे; जो गीतेंतील जाणण्याचा विषय, ज्ञानार्थ आहे तो चांगला स्पष्ट करून गीताग्रंथ सांग म्हणजे झालें. श्रोत्याच्या उत्कंठेचा, तीव्र श्रवणेच्छेचा भंग होऊं देऊं नकोस २६. तेव्हां महाराज म्हणाले, प्रभो ! अशी कां आपली इच्छा आहे ! व मीहि याचीच वाट पहात होतों कीं, तुम्ही आपल्या मुखानें " ग्रंथ सांग " असें म्हणावें २७. अगोदर सहजच हरळीची मुळी अंगानें अमर, त्यांत तिजवर अमृताचा वर्षाव होऊन पूर आला, तर मग तिच्या अमरत्वाविषयीं काय विचारता ! २८. तर आतां या श्रीगुरुप्रसादामुळें गीतेंतील मूळ शास्त्रांच्या प्रत्येक पदाचें मी कुशलतेनें सविस्तर व स्पष्ट वर्णन करीन २९. कीं, जे श्रोत्यांनी ऐकल्यामुळें त्यांची संशयहोडी बुडेल म्ह. सर्व संशय नाहीसे होतील; एवढेंच नव्हें तर श्रवणाची इच्छा दुणावलेली दिसेल ३०. श्रीगुरुकृपेच्या घरीं भिक्षा मागून एवढेंच विनवितो कीं, माझ्या वाणींतून अमृतमधुर व सत्य शब्दसंहिती प्रगट होवो ३१. असो; अध्याय संगती अशी आहे कीं, पूर्वी तेराव्या अध्यायांत श्रीकृष्णांनीं अर्जुनास अशी कथा सांगितली ३२. कीं, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगानें हें जग निर्माण होतें व गुणांच्या तादात्म्यानें-अध्यासिक संबंधानें आत्मा-संसारी झाला आहे ३३. आणि हाच मायोपाधीशीं तादात्म्य पावल्यामुळें त्यास सुखदुःख भोगावें लागतें व तोच तत्त्वतः केवळ गुणसंगरहित झाला म्हणजे निरुपाधिक मुक्त होतो; ३४. तर असंग-संगरहित असा जो आत्मा, त्याला प्रकृतीचा संग कसा झाला ! आत्मा व प्रकृति यांचा संयोग होतो तो संबंध कोणता ! व त्याला सुखदुःखादिभोग कसे प्राप्त होतात ३५. गुण ते कसे व किती आहेत ! ते गुण [आत्म्याला] कोणत्या प्रकारानें बांधतात त्या गुणांची बाधा कशा रितीनें होते ! आणि पुरुष गुणातीत झाला म्हणजे त्यांचीं लक्षणें कोणतीं ३६. अशा प्रकारें या सर्व गोष्टींचा अर्थ यथार्थ वर्णन करणें, हाच या चौदाव्या अध्यायाचा ' प्रतिपाद्य विषय ' आहे ३७. तर आतां त्या वैकुंठनिवासी त्रिभ्वेशाचा तत्त्वतः अभिप्राय असा आहे, तो ऐका ३८. ते म्हणाले:- अर्जुना ! श्रवणाची अवधानात्मक सेना म्ह. सर्व सामग्री जमवून तूं या ज्ञानाला झोंबावें बरें का ३९. पूर्वी मागच्या अध्यायांत तुला आम्ही हे ब्रह्मज्ञान अनेक प्रकारें युक्तींनी स्पष्ट करून सांगितलें, परंतु तुझ्या अंतःकरणांतील प्रतीतीची-अनुभवाची कुस बाहेर निघालेली दिसत नाहीं म्हणजे तुला अजून निःसंदेह दृढ-अपरोक्ष-आत्मत्वानें ब्रह्मज्ञान झालें नाहीं, असें दिसतें ४०.

---

१ धारण करवीन. २ गीतार्थरूपी ठेवा. ३ घाल. ४ स्नेहरूप अंजन. ५ शब्दसृष्टी. ६ बुद्धीरूप वेली. ७ विस्तारलेली, सुंदर. ८ सिद्धांत. ९ बुद्धीरूप गंगा. १० वृष्टि कर. ११ कृपादृष्टीनें. १२ स्फुरणाची. १३ ज्ञानसमुद्राला. १४ भरून सांडेल, येईल. १५ रसिकपणाचें. १६ विनंतीच्या व स्तुतीच्या मिषानें द्वैत मांडलेलें पाहून. १७ निष्फळ, व्यर्थ. १८ जाणावयाचा विषय. १९ आशा, उत्सुकता. २० अंकुर. २१ प्रशस्तपणें, विस्तारानें. २२ स्पष्ट. २३ आंत. २४ नौका. २५ इच्छा. २६ प्रगट करो. २७ मधुर वाणी. २८ भिक्षा, खंडोबाचे माले [ गळ्यांत नांगर घालून भिक्षा मागणें. ] २९ बोलले. ३० संसारी. ३१ मायोपाधिक. ३२ कारण. ३३ मुक्त. ३४ लक्षणें. ३५ उपक्रम.

श्रीभगवानुवाच :—

परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् । यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १ ॥

म्हणौनि गा पुढती । सांगिजैल तुजप्रती । परं म्हण म्हणौनि श्रुतीं । डोंहारिलें जें ॥ ४१ ॥ एऱ्हवीं ज्ञान हें आपुलें । परी पर ऐसेनि जालें । जें आवडोनि घेतलें । भवस्वर्गादिक ॥ ४२ ॥ अगा याचि कारणें । हें उत्तम सर्वांपरी मी म्हणें । जे वन्हि हें तृणें । येरें ज्ञानें ॥ ४३ ॥ जियें भवस्वर्गातें जाणती । यागचि चांग म्हणती । पांरखी फुडी आथी । भेदीं जया ॥ ४४ ॥ तियें आघवींचि ज्ञानें । केलीं येणें स्वप्नें । जैशा वांतोर्मी गगनें । गिळिजती अंतीं ॥ ४५ ॥ कां उदितें रश्मिराजें । लोपिलीं चंद्रादि तेजें । नाना प्रळेयांबुमाजें । नदी नद ॥ ४६ ॥ तैसें येणें पाहलेया । ज्ञानजात जाय लया । म्हणौनियां धनंजया । उत्तम हें ॥ ४७ ॥ अनादि जे मुक्तता । आपुली असे पंडुसुता । तो मोक्षु हातां येता । होय जेणें ॥ ४८ ॥ जयाचिया प्रतीती । विचारवीरीं समस्तीं । नेदिजेचि संसृती । माथां उंधऊं ॥ ४९ ॥ मनें मन घालूनि मागें । विश्रांति जालिया आंगें । ते देहीं देहाजोगे । होतीचि ना ॥ ५० ॥ मग तें देहाचें बेळें । वोलांडूनि एकेचि वेळे । सर्वेतुकी कांटाळें । माझें जालें ॥ ५१ ॥

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः । सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥ २ ॥

जे माझिया नित्यता । तेणें नित्य ते पंडुसुता । परिपूर्ण पूर्णता । माझियाची ॥ ५२ ॥ मी जैसा अनंतानंदु । जैसाचि सत्यसिंधु । तैसेचि ते भेदु । उरेचि ना ॥ ५३ ॥ जें मी जेवढें जैसें । तेंचि ते जाले तैसें । घटभंगीं घटाकाशें । आकाश जेवीं ॥ ५४ ॥ नातरी दीपमूळकीं । दीपशिखा अनेकीं । मीनलिया अवलोकीं । होय जैसें ॥ ५५ ॥ अर्जुना तयापरी । सरली द्वैताची वारी । नांदे नामार्थ एकाहारीं । मीतूंविण ॥ ५६ ॥ येणेंचि पैं कारणें । जैं पाहिलें सृष्टीचें जुंपणें । तेंही तया होणें । पडेचिना ॥ ५७ ॥ सृष्टीचिये सर्वादी । जयां देहाची नाहीं बांधी । ते कैचें प्रळयावधी । निमतील पां ? ॥ ५८ ॥ म्हणौनि जन्मक्षयां- । अतीत ते धनंजया । मी जालें ज्ञाना इया । अनुसरोनी ॥ ५९ ॥ ऐसी ज्ञानाची वाढी । वानिली देवें आवडी । तेवींचि पार्थाही गोडी । लावावया ॥ ६० ॥ तंव तया जालें आन । सर्वांगीं निघाले कान । सणई अवधान । आतला पां ॥ ६१ ॥ आतां देवाचिया ऐसें । जाकळीजत असे वोरसें ।

**अन्वयार्थ**-**भूयः**-पुनरपि-**ज्ञानानाम् उत्तमं परं ज्ञानं**-सर्व ज्ञानांतील उत्तम व परम ज्ञान-**प्रवक्ष्यामि**-मी तुला सांगेन-**यत्**-जें ज्ञान-**ज्ञात्वा**-जाणून-**सर्वे मुनयः**-सर्व मुनि-**इतः**-या शरीराच्या नाशानंतर- **परां सिद्धिं**-सर्वोत्तम सिद्धीला-**गताः**-प्राप्त झाले आहेत १.

म्हणून अर्जुना! श्रुतीनें 'पर' असें म्हणून ज्या ब्रह्मज्ञानाचा महिमा वारंवार प्रसिद्ध-वर्णन केला आहे तें ब्रह्मज्ञान तुला आम्ही पुनः सांगतों ४१. सहज विचार करून पाहिल्यास 'ज्ञान' म्ह. चिद्घन परब्रह्म हेंच जीवाचें-आपलें स्वरूप असूनहि अविद्येमुळें 'पर' म्ह. परके झाले. कारण, संसार व स्वर्ग हेंच आपल्या स्वरूपाप्रमाणें आवडलें म्हणून ब्रह्मास 'पर' म्हणणें भाग झालें ४२. अरे, याच कारणास्तव आत्मज्ञान भव-स्वर्गादि सर्व ज्ञानांपेक्षां उत्तम, अत्यंत श्रेष्ठ असें मी म्हणतों. कारण, ब्रह्मज्ञान हें अग्निस्वरूप असून इतर ज्ञानें ह्याच्यापुढें तृणासारखी आहेत ४३. कारण, ज्या ज्ञानाची विषय करण्याची मजल संसार व स्वर्ग या सुखापलीकडे नसते, ज्याला यज्ञयागादि कर्मच उत्तम वाटतात, ज्याला द्वैताशिवाय दुसऱ्या कशाचीहि ओळख म्ह. परीक्षा नसते ४४. तीं इतर सर्व ज्ञानें या आत्मज्ञानानें स्वप्नवत्-मिथ्या केली. ज्याप्रमाणें गगनांत उत्पन्न झालेला वायु कितीहि मोठा असला तरी शेवटीं त्याचा त्यांतच लय होतो ४५. किंवा सूर्य उगवल्यावर जसें चंद्रादि नक्षत्रांचीं तेजें लोपतात अथवा प्रलयकालाचें पाणी वाढल्यावर ज्याप्रमाणें नदी, नद हा भेद उर्वरित राहात नाहीं ४६. त्याप्रमाणें आत्मज्ञानाचा उदय झाला असतां इतर सर्व ज्ञानें लय पावतात, म्हणून अर्जुना! या ज्ञानाला आम्हीं 'उत्तम' असें म्हणतों ४७. हें पंडुसुता! अनादिकालापासूनची आपल्याजवळ सहज असणारी जी आपली मुक्तता किंवा मोक्ष तो ह्याच ज्ञानाच्या प्राप्तीपासून आपल्या [ नित्य प्राप्ताची प्राप्ति ] ज्ञातास येतो ४८. ज्याचा अनुभव आला असतां, सर्व विचारशूर ज्ञाते संसाराला वर डोकें काढूंच देत नाहींत ४९. ते आपल्या मनाची विषयांकडे जाणारी धांव मनानेंच मागें हटवून त्याला जागच्या जागीं बसविल्यावर सहज विश्रांति प्राप्त होते, [ स्वतः ब्रह्मस्थिति लाभते ] असें झाल्यावर ते देहांत असूनहि देहासारखें परिच्छिन्न आपण आहोत, असें समजत नाहींत ५०. नंतर तें स्थूल सूक्ष्म देहद्वयाचें दुबळकें एकदम ओलांडून, निरास करून बोधदृष्ट्या माझ्याच योग्यतेस पात्रतात ५१.

**अन्वयार्थ**-**इदं ज्ञानं**-या ज्ञानाचा-**उपाश्रित्य**-आश्रय करून-**मम**-माझ्या-**साधर्म्यं**-सारुप्यास-**आगताः**-आलेले ज्ञानी-**सर्गे अपि**-सृष्टीच्या वेळींहि-**न उपजायन्ते**-उत्पन्न होत नाहींत-**च**-आणि-**प्रलये**-प्रलयाच्या वेळीं-**न व्यथन्ति**-व्यथा-नाश पावत नाहींत २.

कारण, अरे! अर्जुना! जे [ ज्ञाते ] माझ्या नित्यतेनें नित्य आहेत आणि माझ्याच परिपूर्णतेनें परिपूर्ण आहेत ५२. आणि मी जसा नेहमीं अनंत असून महानंदरूप असतों, जसा मी सहज सिद्ध, सत्यसमुद्र असतों, तसेंच तें असतात; त्यांच्यात व माझ्यांत भेद मुळींच शिल्लक राहात नाहीं ५३. कारण, ज्याप्रमाणें घटाचा नाश झाल्यावर घटाकाश महाकाशरूप होतें, त्याप्रमाणें मी जसा व जेवढा आहे; तसेंच व तेवढेंच तेहि होतात ५४. किंवा मूळच्या दिव्यापासून लावलेल्या पुष्कळ दिव्यांच्या ज्योति एकत्र केल्या म्हणजे त्यांचें तेज त्या मूळ दिव्यांतच मिळतें, तसें समज ५५. अर्जुना! त्याप्रमाणें त्या ब्रह्मज्ञ पुरुषाचे ठिकाणीं द्वैताची येरझार संपली व आतां मी व तूं असा वास्तव भेद उर्वरित राहात नाहीं. नामाची अर्थरूप जी स्वरूपें एका पंक्तीला-एक स्वरूपानें [ भक्ति सिद्ध्यर्थ, नाममात्र कल्पित भेद असल्याचे दिसून कदाचित् ] नांदतात ५६. याच कारणामुळें, ज्या वेळीं मूळ सृष्टीला आरंभ होतों, त्या वेळींहि त्याला जन्म घ्यावा लागत नाहीं ५७. मग ज्यांना सर्व सृष्टीच्या उत्पत्तीबरोबर देह घ्यावा लागत नाहीं [ ते ब्रह्मज्ञ ] प्रलयकाळीं तरी कसें बरें मरण पावतील? ५८. म्हणून धनंजया! जे या आत्मज्ञानाला अनुसरून मद्रूप झाले आहेत, ते जन्ममरणातीत असेंच आहेत ५९. याप्रमाणें आत्मज्ञानाचा महिमा देवांनीं आपल्या आवडीनें वर्णन केला आणि अर्जुनालाहि त्या ज्ञानाविषयीं आवड उत्पन्न व्हावी अशा हेतूनें ही ज्ञान महती वर्णन केली ६०. तों अर्जुनाची निराळीच स्थिति झाली, ती ही कीं त्याच्या सर्वांगालाच कान फुटले, अधिक काय सांगावे!! अर्जुन नखशिखांत अवधानरूप, अवधान मूर्तिच बनला ६१.

---

१ सर्वाहून निराळें. २ प्रसिद्ध केलें. ३ पलीकडे. ४ कारण. ५ संसार व स्वर्गादिक. ६ अग्नि. ७ इतर. ८ पारखी-परीक्षा, ओळख. ९ भेदांमध्यें. १० वाऱ्याच्या लहरी. ११ सूर्यानें. १२ जलप्रलयानें. १३ उगवल्यानें, उदय झाल्यानें. १४ मोक्ष. १५ ज्ञात्यांनीं. १६ जन्ममरणफेरा, संसार. १७ डोकें वर करूं. १८ ते मुनि. १९ बेळकें, दुगेळे. २० समतोल. २१ वजनांत, ताजव्यांत, काटयांत. २२ सत्यप्रतिज्ञा. २३ मूळ ज्योतींत. २४ दिव्याच्या ज्योती.

जें निरूपण आकाशें । वेंटाळेना ॥ ६२ ॥ मग म्हणे गा प्रज्ञाकांता । उजवेली आजि वक्तृत्वंता । जे बोलायेवढा श्रोता । जोडलासी ॥ ६३ ॥ तरी एकु मी अनेकीं । गोंविजे देहपाशकीं । त्रिगुणीं लुब्धकीं । कवणेपरी ॥ ६४ ॥ कैसा क्षेत्र-योगें । वियें इयें जगें । तें परिस सांगें । कवणेपरी ॥ ६५ ॥ पैं क्षेत्र येणें व्याजें । यालागीं हें बोलिजे । जे मत्संगबीजें । भूतीं पिके ॥ ६६ ॥

मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् । संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥

एऱ्हवीं तरी महद्ब्रह्म । यालागीं हें ऐसें नाम । जे महदादिविश्राम । शालिका हें ॥ ६७ ॥ विकारां बहुवस थोरी । अर्जुना हेंचि करी । म्हणौनि अवधारीं । महद्ब्रह्म ॥ ६८ ॥ अव्यक्तवादमतीं । अव्यक्त ऐसी वदंती । सांख्या-चिया प्रतीती । प्रकृति हेचि ॥ ६९ ॥ वेदांतीं इयेतें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञ-राया । असो किती बोलों वायां । अज्ञान हें ॥ ७० ॥ आपला आपणपेयां । विसरु जो धनंजया । तेंचि रूप यया । अज्ञानासी ॥ ७१ ॥ आणिकही एक असे । जें विचारावेळे न दिसे । वातीं पाहतां जैसें । अंधारें कां ॥ ७२ ॥ हालविलिया जाय । निश्चळीं तरी होय । दुधीं जैसी साय । दुधाची ते ॥ ७३ ॥ पैं जागरु ना स्वप्न । ना स्वरूप अवस्थान । ते सुषुप्ति कां घन । जैसी होय ॥ ७४ ॥ कां न वियतां वायूतें । वांझें आकाश रितें । तया ऐसें निरुतें ॥ अज्ञान गा ॥ ७५ ॥ पैल खांबु कां पुरुखु । ऐसा निश्चयो नाहीं एकु । परी काय नेणों आलोकु । दिसत असे ॥ ७६ ॥ तेवीं वस्तु जैसी असे । तैसी कीर न दिसे । परी कांहीं अनारिसें । देखिजेना ॥ ७७ ॥ ना राती ना तेज । ते संधि जेवीं सांज । तेवीं विरुद्ध ना निज । ज्ञान आथी ॥ ७८ ॥ ऐसी कोण्ही एकी दशा । तिये वाढु अज्ञान ऐसा । तया गुंडलिया प्रकाशा । क्षेत्रज्ञु नाम ॥ ७९ ॥ अज्ञान थोरिये आणिजे । आपणपें तरी नेणिजे । तें रूप जाणिजे । क्षेत्रज्ञाचें ॥ ८० ॥ हाचि उभय योगु । बुझें बापा चांगु । सत्तेचा नैसर्गु । स्वभावो हा ॥ ८१ ॥ आतां अज्ञानासारिखें । वस्तु आपणपांचि देखे । परी रूपें अनेकें । नेणों कोणें ॥ ८२ ॥ जैसा रंकु भ्रमला । म्हणे जारे मी रावो आला । कां मूर्च्छितु गेला । स्वर्गलोकां ॥ ८३ ॥ तेवीं लचकलिया दिठी । मग देखणें

त्यामुळें अर्जुन सर्व व्याख्यान आकलन व धारण करीत आहे असें पाहून आतां देवाचें प्रेमात्मक पान्ह्यानें केलेलें व्याख्यान इतकें विस्तृत होऊं लागलें कीं तें आकाशाच्याहि कवळींत मावणार नाहीं. ते खरें व्याख्यान अर्जुनानें आत्मसात केलें ६२. मग भगवान् म्हणाले:–अर्जुना! माझ्या वक्तृत्वरूपी कन्येस तूं बुद्धिरूप वर मिळाल्यामुळें ती आज उजवली! विवाहित झाली! कारण, माझें जेवढें म्हणून व्याख्यान तेवढेच अवधान व धारणशक्ति असणारा तूं उत्तम श्रोता मिळालास! ६३. तर आतां मी एक असून, त्रिगुणरूपी जें पारधी त्यांच्याकडून देहरूपी पाश टाकून मला अनेक रूपें कशी घेवविली जातात. मी त्यांत कसा गोंवला जातो ६४. व क्षेत्राच्या उपाधीनें माझ्यापासून हें जग कसें व कां उत्पन्न होतें तें सांगतों, ऐक ६५. हें पहा! प्रथमच माझ्या अध्यासिक संगरूपी बीजापासून प्रकृतिरूपी जमिनींत प्राणिमात्ररूपी पीक उत्पन्न होते. याच कारणामुळें प्रकृतीला म्ह. मायेला 'क्षेत्र' असें आम्हीं म्हटलें आहे ६६.

**अन्वयार्थ—मम**–माझी–**योनिः**-त्रिगुणात्मिका प्रकृति [ हें सर्व भूतांचें कारण आहे ]–**महत् ब्रह्म**–ती सर्व कार्याहून मोठी असल्यामुळें महती–मोठी व आपल्या विकारांचें भरण–पोषण करीत असल्यामुळें ब्रह्म आहे–**तस्मिन्**–त्या महत् ब्रह्मांत म्ह० भूतांच्या कारणांत–**अहं**–मी–**गर्भं**–सर्व–भूतांच्या जन्माचें कारण–बीज–**दधामि**–स्थापितों–**हे भारत**–हे अर्जुना!– **ततः**–त्यापासून—**सर्वभूतानां**–सर्व भूतांची–**संभवः**–उत्पत्ति–**भवति**–होते ३.

सहज विचार करून पाहतां ही माया महत्तत्त्वादिकांचें मूळ विश्रामस्थान म्हणजे लयस्थान आहे. अर्थात् कार्यात्मक जगापेक्षां मोठी व्यापक आहे, म्हणून हिला 'महद्ब्रह्म' असें नांव दिलें आहे ६७. तसेंच अर्जुना! हिच्या योगानें विकार व गुण हे बऱ्याच वाढीस पावतात, म्हणूनहि हिला 'महद्ब्रह्म' असें म्हटलें आहे, असें समज ६८. अव्यक्त मतवाद्यांच्या मतें हिला 'अव्यक्त' असें नांव आहे व सांख्यांच्या दृष्टीनें हिलाच 'प्रकृति' असें म्हणतात ६९. हे प्राज्ञशिरोमणे! वेदांती लोक हिला 'माया' असें म्हणतात. असो; उगीच फार किती बोलावें! अज्ञान म्हणून जें म्हणतात तें हेंच होय ७०. हे धनंजया! आपल्या आत्मस्वरूपाचा आपल्यास जो विसर पडतो, तेंच या अज्ञानाचें स्वरूप आहे ७१. आणखी एक अज्ञानाचें स्वरूप आहे, तें असें कीं, ज्याप्रमाणें हातांत दिवा घेऊन अंधार शोधूं लागलें असतां तो दिसत नाहीं, त्याप्रमाणें आत्मस्वरूपाचा विचार केला तर त्यावेळीं तें अज्ञान दिसेनासें होतें ७२. दूध घोंटीत, ढवळीत बसलें म्हणजे जशीं त्यावर साय दिसून येत नाहीं व तेंच घोंटलें नाहीं तर स्थिर झालेल्या दुधावर साय दिसून येतें ७३. किंवा मनुष्य ज्या वेळेस जागृत अवस्थेंत नसतो अथवा स्वप्नावस्थेंत नसतो, किंवा समाधिस्थ नसतो, त्या वेळेस जशीं गाढ झोंप–सुषुप्त्यवस्था असते ७४. किंवा वायु उत्पन्न झालेला नसतो, त्यावेळीं आकाशमात्र जसें एकटें रिकामें असतें, त्याप्रमाणें इतर अवस्थांशिवाय जी निर्वात निद्रावस्था, तेंच खरोखर अज्ञान होय ७५. ज्यावेळेस आपल्यासमोर एखादा झाडाचा बुडखा, असतो तेव्हां पलीकडे दिसत आहे तो खांब आहे किंवा पुरुष आहे असा एक कोणताहि निश्चय होत नाहीं, काय भासते हेहि कळत नाहीं; परंतु 'कांहीं तरी आहे' असें दिसते मात्र खरें ७६. त्याप्रमाणें आत्म्याचें निव्वळ सच्चिदानंद स्वरूप आहे, तसें ज्यावेळेस खरोखर दिसत नाहीं व दुसरी कांहीं देहादिक वस्तु आहे यांपैकीं कांहींच निश्चय होत नाहीं; अशा स्थितीसच अज्ञान म्हणतात ७७. रात्र नाहीं व दिवसहि नाहीं या दोहींच्या संधीला जसा सायंकाळ, सांजवेळ म्हणतात, त्याचप्रमाणें निजात्म्याचें व विरुद्ध म्ह. जगताचेंहि ज्ञान होत नाहीं ७८. अशी जी कोणी एक दोहोंमधील अनिर्वचनीय स्थिती तिला 'अज्ञान' असें म्हणतात व त्यामुळें गुंडाळलेला चित्प्रकाश म्ह. अज्ञानाचें आवरणयुक्त झालेले जें चैतन्य, त्यालाच 'क्षेत्रज्ञ' अशी संज्ञा आहे ७९. आपलें शुद्ध स्वरूप तर जाणले जाऊं नये व अज्ञान मात्र वाढावे तेच अज्ञानोपहित चैतन्याचें–क्षेत्रज्ञाचे [ जीवात्म्याचें ] रूप होय ८०. हा माया व चैतन्य यांचा अनिर्वचनीय संयोग नीट लक्षांत आण. कारण, मूळ शुद्ध स्वरूपावर मायेचा आध्यासिक संबंध असणें असा स्वभावच आहे ८१. याप्रमाणें मायेच्या अनुरोधानें शुद्ध चैतन्य आत्मस्वरूप विसरून अनेक रूपें घेतें असें दिसते ८२. ज्याप्रमाणें दरिद्री मनुष्य भ्रमिष्ट झाला असतां तो रस्त्यानें जाऊं लागला म्हणजे इतर लोकांस म्हणतो कीं, जारे! मी राजा आलो आहे! किंवा मूर्च्छा आलेला एखादा मनुष्य ज्याप्रमाणें आपण 'स्वर्गास गेलो आहोत' असें भ्रमानें म्हणतो ८३.

१ बुद्धिमते अर्जुना. २ विवाहित झाली. ३ भाषाशैली. ४ देहरूपी पाशामध्यें. ५ पारध्यांनीं. ६ मिषानें, निमित्तानें. ७ मूळ माया. ८ महत्तत्त्वादिकांचें विश्रांतिस्थान. ९ अव्यक्तवाद्यांच्या मतें. १० दिष्यानें. ११ समाधि.

जें जें उठी । तया नाम सृष्टी । मीचि विये पैं गा ॥ ८४ ॥ जैसें कां स्वप्नमोहा । तो एकाकी देखे बहुवा । तोचि पाडु आत्मया । स्मरणेंवीण असे ॥ ८५ ॥ हेंचि आनीभ्रांति । प्रमेय उपलवूं पुढती । परी तूं प्रतीती । याचि घे पां ॥ ८६ ॥ तरी माझी हे गृहिणी । अनादि तरुणी । अनिर्वाच्यगुणी । अविद्या हे ॥ ८७ ॥ इये नाहीं हेंचि रूप । ठाणें हें अति उमप । हें निद्रितां समीप । चेतां दुरी ॥ ८८ ॥ पैं माझेनिचि आंगें । पहुडल्यां हे जागे । आणि सत्तासंभोगें । गुर्विणी होय ॥ ८९ ॥ महद्ब्रह्मउदरीं । प्राकृतीं आठै विकारीं । गर्भाची करी । पेलोवेली ॥ ९० ॥ उभय-संगु पहिलें । बुद्धितत्त्व प्रसवलें । बुद्धितत्त्वें भारेलें । होय मन ॥ ९१ ॥ तरुणी ममता मनाची । ते अहंकार तत्त्व रची । तेणें महाभूतांची । अभिव्यक्ति होय ॥ ९२ ॥ आणि विषयेंद्रियां गोसी । स्वभावें तंव भूतांसी । म्हणौनि येती सरिसीं । तियेंही रूपा ॥ ९३ ॥ जालेनि विकारक्षोभें । पाठीं त्रिगुणाचें उभें । तेव्हां ये वासना-गर्भें । ठायेंठावों ॥ ९४ ॥ रुखाचा आवांका । जैसी बीजकणिका । जीवीं बांधे उदका-भेटे तरवो ॥ ९५ ॥ तैसी माझेनि संगें । अविद्या नाना जगें । आर घेवों लागे । आणि-येंची ॥ ९६ ॥ मग गर्भगोळा तया । कैसें रूप तें ये आया । तें परियेसें राया । सुजनां चिया ॥ ९७ ॥ पैं मणिजें स्वेदजें । उद्भिजें जारजें । उमटती सहज । अवयव हें ॥ ९८ ॥ व्योमवायुवशें । वाढलेनि गर्भरसें । मणिजु उससे । अवयव तो ॥ ९९ ॥ पोटीं सूनि तमरजें । आगळिकां तोय तेजें । उठितां निपजे । स्वेदजु गा ॥ १०० ॥ आपपृथ्वी उत्कटें । आणि तमोमात्रें निकृष्टें । स्थावरु उमटे । उद्भिजु हा ॥ १ ॥ पांचां पांचही विरंजीं । होती मनबुद्ध्यादि साजीं । हीं हेतु जारजीं । ऐसें जाण ॥ २ ॥ ऐसे चारी हे सरळ । करचरणतळ । महाप्रकृति स्थूळ । तेंचि शिर ॥ ३ ॥ प्रवृत्ति पेलले पोट । निवृत्ति ते पाठी नीट । सुर योनी आंगें आठ । ऊर्ध्वाचीं ॥ ४ ॥ कंठु उल्हासता स्वर्गु । मृत्युलोकु मध्यभागु । अधोदेशु चांगु । नितंबु तो ॥ ५ ॥ ऐसें लेंकरूं एक । प्रसवली हें देख । जयाचें तिन्ही लोक । बाळसें गा ॥ ६ ॥ चौऱ्यांयशीं लक्ष योनी । तियें कांडीं पेरां सांदणी । वाढे प्रतिदिनीं । बाळक हें ॥ ७ ॥ नाना देह अवयवीं । नामाचीं लेणीं लेववी । मोहस्तन्यें वाढवी । नित्य नवें ॥ ८ ॥ सृष्टी वेगवेगळीया । तिया करांग्रीं आंगोळियां । भिन्नाभिमान सूदलिया । मुदिया

त्याप्रमाणें एकदां दृष्टि आत्मस्वरूपावरून चळली म्हणजे कल्पनेनें जें जें दृश्य मांडले जाते त्यांचेच नांव मी सृष्टि-प्रसवतो असें म्हणतात ८४. मनुष्य एकटा निजलेला असून स्वप्नांच्या भ्रांतीनें पुष्कळ वस्तु रूपानें आपणांस पाहतो, तोच प्रकार चैतन्याला आत्मस्वरूपाचा विसर पडला म्हणजे होतो ८५. शुद्ध स्वरूपावर आलेली हीच भ्रांति पुनः अन्य प्रकारानें तुला पुढें सांगूं; परंतु मूळ स्वरूपावर मिथ्या मायेचें रूप अध्यस्त आहे, ही गोष्ट तूं विसरूं नकोस ८६. तर ही माझी भार्या असून अनादि व तरुण, अलौकिक अनिर्वचनीय व गुणवान् अशी आहे. ८७. हिचे स्वरूप तरी काय आहे, असें पाहूं गेले असतां 'कांहीं नाहीं' हेंच हिचे खरें स्वरूप आहे; पण हिची आकृती मात्र फार व्यापक आहे, ही निजलेल्यास म्ह. अज्ञान्याच्या सन्निध असते, व जागृतास म्ह. ज्ञात्यापासून दूर राहते ८८. परंतु ही माया माझ्या आत्मस्वरूपावर राहते मी आपल्या स्वरूपाचे निरोधान केलें म्हणजे ही जागी असते म्हणजे जगद्रूप कार्य करण्यास समर्थ होते. म्हणजे आत्मसत्तेच्या संभोगानें-आश्रयानें गर्भ धारण करते ८९. महद्ब्रह्मरूप प्रकृतीच्या उदरीं प्राकृत अष्ट विकारांनीं जगद्रूपी गर्भाची ही वाढ करिते ९०. आत्मा व प्रकृति या उभयांच्या संयोगा-पासून प्रथम बुद्धितत्त्व जन्मास आले व तीच बुद्धि [ रजोगुणानें ] बळावल्यावर मन तयार होते ९१. मनाची तरुण स्त्री जी ममता ती आपल्यापासून अहंकार तत्त्वास तयार करते व त्याच्या योगानें पंचमहाभूतांची स्पष्टता होते ९२. आणि विषय व इंद्रियें यांचा भूतांसह संबंध असल्यामुळें त्यांचीहि या महाभूतांचेबरोबरच स्पष्टता होते ९३. पंचभूत, विषय व इंद्रियें यांचा क्षोभ झाल्यावर पाठोपाठ त्यांच्यांत सत्त्व, रज व तम हे तीन गुण असावयाचेच. त्या योगानें वासना होईल, त्या वासनेनुरूप जीव हा अनेक योनींत जन्म घेतो ९४. ज्याप्रमाणें बीजाचा दाणा व पाणी यांची गांठ पडल्या-बरोबर त्यास अंकुर फुटून झाडास अवसान व आकार येतो ९५. त्याप्रमाणें माझ्या संगानें मायेला अनेक प्रकारचे अणकुचीदार विश्वांकुर फुटूं लागतात ९६. हे सुजनश्रेष्ठा, मग त्या गर्भगोलाचा आकार कसा रूपास-व्यक्त दशेस येतो, तें ऐक ९७. हें पहा अंडज, स्वेदज, उद्भिज्ज, आणि जारज असे अंकुर तिला साहजिकच फुटतात ९८. आकाश व वायु यांचा ज्यांत अधिक अंश असतो; असा जो गर्भरस वाढतो त्याना 'मणिज' असें नांव आहे, हा एक त्याचा अवयव होय ९९. अरे ! तम व रज या दोन गुणांना पोटांत घालून ज्यांत जल व तेज यांचा अधिक-अंश असतो, त्यापासून 'स्वेदज' हा अवयव उत्पन्न होतो १००. जल व पृथ्वी यांचा विशेष अंश असून, त्यांत केवळ निकृष्ट तमोगुण दृष्टीस पडतो, तेव्हां 'उद्भिज्ज' उत्पन्न होतात १. पंचभूतांच्या सत्त्वगुण व रजोगुणापासून पंचज्ञानेंद्रियें व पंचकर्मेंद्रियें ही निर्माण होऊन परस्पर सहकारिता देतात व मन बुद्धि यांचीहि त्याला जोड असते. तेव्हां हीं मानवादि 'जारज' निर्माण होतात २. याप्रमाणें हे जारज, अंडज, स्वेदज, उद्भिज्ज असे चार देह म्हणजे दोन हात व दोन चरणतळ असून स्थूल अशी महाप्रकृति हें ज्याचें मस्तक आहे ३. 'प्रवृत्ति' हें ज्याचें मोठें पोट असून, 'निवृत्ति' ही ज्याची सरळ पाठ आहे व कमरेच्या वरील भागांत आठ 'देवयोनी' आहेत ४. वरील आनंदभरित स्वर्गलोक हा ज्याचा कंठ आहे मृत्युलोक हा मध्यभाग आहे व पाताळलोक हा कमरेखालील भाग होय ५. अशा स्वरूपाचे एक लेंकरूं ही माया प्रसवली आहे. तीन लोकचा विस्तार हेंच या मुलाचें बाळसें होय. ६. चौऱ्यांशीं लक्ष योनी म्हणजे त्याच्या बोटांचीं पेरीं व सांधे आहेत, हें बालक प्रतिदिनीं वृद्धिंगत होत आहे ७. नानाप्रकारचे देह, अवयव व नामें हे अलंकार घालून व माया ही त्या मुलाला मोहरूपी स्तनपान देऊन नित्य नवेपणानें वाढविते ८.

१ स्वप्नभ्रांतिनें. २ दुसरी भ्रांति. ३ तात्पर्य, सिद्धांत. ४ विस्तारानें सांगतों. ५ अभाव हेंच जिचें रूप. ६ आकृति. ७ अत्यंत मोठी. ८ अज्ञानकाळीं. ९ जागें असतां. १० स्वरूपीं. ११ मी स्वतः निजल्यावर. १२ ही माया. १३ आत्मसत्ता भोगानें. १४ गरोदर. १५ मूळ मायेच्या पोटांत. १६ वृद्धि. १७ उत्पत्ति. १८ परस्परसंबंध, सांखळी. १९ विकार वाढल्यानंतर. २० वासनेप्रमाणें. २१ तत्काळ. वास्तविक. २२ वृक्षाचा. २३ आकार. २४ भेटतांच. २५ अंकुर. २६ टोंक, अग्र. २७ आकारास. २८ अंड्या-पासून उत्पन्न होणारें. २९ घामापासून होणारें. ३० जमिनिपासून होणारें. ३१ वाऱ्यापासून होणारें. ३२ जीवन वाढतो, बाहेर पडतो. ३३ घालून. ३४ आधिक्यानें. ३५ पुष्कळ अंशानें. ३६ हलक्या प्रतीच्या. ३७ साह्य करणारी. ३८ सज्ज, सिद्ध. ३९ मैथुनापासून उत्पन्न होणारा. ४० प्रपंच. ४१ पुढें झालें, दोंद वाढलें. ४२ बेंबीवरील भागांत. ४३ पाताळ. ४४ कमरेखालील पाठीमागचा भाग. ४५ बाळपणींची पुष्टता. ४६ बोटें. ४७ पेरी. ४८ सांधे. ४९ करंगळींत. ५० अंगुळीं, बोटें. ५१ घातल्या.

तेथें ॥ ९ ॥ हें एकलौतें चराचर । अविचारित सुंदर । प्रसवोनि थोर । थोरावली ॥ ११० ॥ पै ब्रह्मा प्रातःकाळु । विष्णु तो माध्यान्ह वेळु । सदाशिव सायंकाळु । बाळा यया ॥ ११ ॥ महाप्रळयसेजे । खेळोनि निवांत निजे । विषमज्ञानें उमंजें । कल्पोदयीं ॥ १२ ॥ अर्जुना इयापरी । मिथ्यादृष्टीच्या घरीं । युगानुवृत्तीचीं करी । चोज पांउलें ॥ १३ ॥ संकल्पु जयाचा इष्टु । अहंकारु तो विनेंटु । ऐसिया होय शेवंटु । ज्ञानें यया ॥ १४ ॥ आतां असो हे बहु बोली । ऐसें विश्व माया व्याली । तेथ साह्य जाली । माझी सत्ता ॥ १५ ॥

सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः संभवन्ति याः । तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥

या कारणें मी पिता । महद्ब्रह्म हे माता । अपत्य पंडुसुता । जगडंबरु ॥ १६ ॥ आतां शरीरें बहुतें । देखोनि न भेदें हो चित्तें । जें मनबुद्ध्यादि भूतें । एकेंचि येथें ॥ १७ ॥ हां गा एकाचि देहीं । काय अनारिसें अवयव नाहीं ? । तेवीं विचित्र विश्व पाहीं । एकचि हें ॥ १८ ॥ पैं उंचा नीचा डाहाळिया । विषमा वेगळालिया । येकाचि जेवीं जालिया । बीजाचिया ॥ १९ ॥ आणि संबंधु तोही ऐसा । मृत्तिके घटु लेंकु जैसा । कां पटत्व कापुसा । नातू होय ॥ १२० ॥ नाना कल्लोळपरंपरा । संतती जैसी सागरा । आम्हां आणि चराचरा । संबंधु तैसा ॥ २१ ॥ म्हणौनि वन्हि आणि ज्वाळ । दोन्ही वन्हीचि केवळ । तेवीं मी गा सकळ । संबंधु वावो ॥ २२ ॥ जालेंनि जगें मी झांकें । तरी जगत्वें कोण फांके ? । किळेवरी माणिकें । लोपिजे काई ? ॥ २३ ॥ अळंकारातें आलें । तरी सोनेंपण काइ गेलें ? । कीं कमळ फांकलें । कमळत्वा मुके ? ॥ २४ ॥ सांग पां धनंजया । अवयवीं अवयाविया । आच्छादिजे कीं तया । तेंचि रूप ? ॥ २५ ॥ कीं विरूढलिया जोंधळा । कणिसाचा निर्वाळा । वेंचला कीं आगळा । दिसतसे ॥ २६ ॥ म्हणौनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें । तैसा नोहें उखितें । आघवें मीचि ॥ २७ ॥ हा तूं साचोकारा । निश्चयाचा खरा । गांठीं बांध वीरा । जीवाचिये ॥ २८ ॥ आतां मियां मज दाविला । शरीरीं वेगळाला । गुणीं मीचि बांधिला । ऐसा आवडें ॥ २९ ॥ जैसें स्वप्नीं आपण । उठूनियां आत्ममरण । भोगिजे गा जाण । कपिध्वजा ॥ १३० ॥ कां कवळातें डोळे । प्रकाशूनि पिंवळे । देखती तेंही कळे । तयांसीचि ॥ ३१ ॥ नाना सूर्यप्रकाशें । प्रकटी तें अभ्र भासे । तो

वेगवेगळ्या सृष्टि ह्या त्याचीं बोटें व करंगळ्या होत आणि हरएक योनींत निरनिराळ्या प्रकारचे देहाभिमान ह्या त्या बोटांमधील आंगठ्या होत ९. असें एकुलतेंएक चराचरात्मक विश्वरूप लेंकरूं कीं, जें अविचारकालीं सुंदर वाटतें त्याला जन्म देऊन आपण भाग्यवान् आहों असें त्या मायेला वाटलें ११०. ब्रह्मदेव हा या बाळाचा प्रातःकाल आहे, विष्णु हा माध्यान्हकाल आहे व सदाशिव हा सायंकाल आहे म्हणजे [ उत्पत्ति, स्थिति व लय हे तीन काल होत] ११. आणि महाप्रलय हेच त्या बालकाचें आंथरूण होय. त्या आंथरूणावर खेळ खेळून हें निवांत निजतें व पुनः कल्पाचा उदय झाल्यावर विपरीत-भेद ज्ञानानें जागें होतें १२. अर्जुना! या प्रमाणें मिथ्या ज्ञानाच्या व्यवहाररूपी घरीं एकापुढें एक अशी युगांच्या मालीकांची पाऊलें हे लेंकरूं कौतुकानें टाकूं लागतें १३. ज्या बालकाचा संकल्प हा आवडता स्नेही असून अहंकार ही शोभा आहे, अशा या बालकाचा शेवट-मरण आत्मज्ञानानें होतो १४. असो; आतां विशेष वर्णन न करितां इतकेंच सांगतों कीं याप्रमाणें माया ही विश्वाला माझ्या अधिष्ठान सत्तेच्या साह्यानें जन्म देते. १९.

**अन्वयार्थ—कौन्तेय**—हे अर्जुना!—**सर्वयोनिषु**—देवादि सर्व योनींमध्यें—**याः मूर्तयः**—ज्या मूर्ति—जे आकार—जीं शरीरें—**संभवन्ति**—उत्पन्न होतात—**तासां**—त्या सर्व मूर्तींचें—**महत् ब्रह्म**—माझी प्रकृति—**योनिः**—उत्पत्तिस्थान आहे व—**अहं**—मी—**बीजप्रदः**—बीज देणारा—**पिता**—जनक आहे. ४

यास्तव अर्जुना! मी बाप, महद्ब्रह्म ही आई व हें जगडंबर हेच आमचें लेंकरूं आहे १६. आतां या जगांत पुष्कळ शरीर दृष्टीस पडल्यामुळें, जग माझें अपत्य असून माझें व त्याचें ऐक्य नाहीं अशी शंका तुझ्या मनांत येऊं देऊं नकोस.कारण सर्व पंचमहाभूतांची उत्पत्ति, मन, बुद्धि वगैरे एकरूपच आहेत १७. हें पहा कीं एकाच शरीराला निरनिराळे अवयव नाहींत काय? त्याप्रमाणें या जगांत जरी पुष्कळ चित्रविचित्र विश्व दृष्टीस पडले, तरी ते सर्व एकरूप आहे असे समज १८. हे बघ, ज्याप्रमाणें झाडास वरच्या लांब, आंखूड, खालच्या जाड व बारीक अशा भिन्नभिन्न खांद्या एकाच बीजापासून उत्पन्न झालेल्या असतात १९.

आणि जो जगत व मी यांचा संबंध आहे तोहि असाच आहे. ज्याप्रमाणें मातीपासून उत्पन्न झालेला घट मातीचें लेंकरूं होय, किंवा वस्त्र हें कापसाचें नातवंड होय. कारण, कापसाचा मुलगा तन्तु म्ह. सूत व त्यापासून तयार झालेले वस्त्र हे कापसाचे नातवंड होय १२०. अथवा समुद्रावर उत्पन्न होणाऱ्या असंख्य लाटांची परंपरा ही ज्याप्रमाणें समुद्राची संतती आहे, त्याप्रमाणेंच आमचा व चराचराचा संबंध आहे २१. म्हणून अग्नि, ज्वाला हीं दोन्ही ज्याप्रमाणें केवळ एका अग्निचींच स्वरूपें होत, त्याप्रमाणें मी व जगत् हीं दोन्ही एकच स्वरूप असल्यामुळें मजपासून जगाची उत्पत्ति होते असा संबंध मानणें व्यर्थ होय २२. जगाच्या उत्पत्तीमुळें जर माझें स्वरूपच लोपतें असे म्हटले तर हें स्वतः जड असलेले जगत् कोणाच्या तेजानें प्रकट-प्रकाशित होतें? हें पहा! माणकाच्या तेजानें माणीक झांकलें जातें का? २३. तसेंच सोन्याचे अलंकार बनविल्यानें त्यांतील सुवर्णत्व नाहींसें होतें काय? अथवा कमल उमलल्यावर त्याचें कमलत्व नाहींसे होतें कीं काय? २४. अरे! अर्जुना अवयवी-अवयव धारण करणारा हा आपल्या अवयवानें झांकला जातो किंवा अवयवांसहवर्तमान असणें हेंच त्या अवयवीचे रूप आहे, सांग बरें? २५. जोंधळ्याचें बीं पेरून अंकुर फुटून वाढल्यावर त्याला परिपक्व कणीस आलें म्हणजे तो पेरलेला दाणा कमी झाला म्हणावा का अनेक पटीनें वाढला म्हणावा २६. म्हणून जगाला बाजूस सारून मला पहावे म्हणशील तर तसा मी निराळा दिसणारा नाहीं. कारण, मीच सर्व जगद्रूप आहे. [ विवर्तोपादान रूपानें कारण आहे म्ह. मद्व्यातिरिक्त जगत् सत्ताशून्य आहे ] २७. हे वीरा, या सिद्धांताची तूं आपल्या मनांत खरोखर पूर्णपणें खूणगांठ बांधून ठेव २८. आतां मी जरी पुष्कळ शरीरानें वेगवेगळा दृष्टीस पडतो तरी त्या सर्व शरीरांत गुणांनीं मीच बांधलेला आहे, असें दिसतो २९. हे अर्जुना! जसें स्वप्नामध्यें आपलें मरण आपणच आपले कल्पनेनें तयार करून मग स्वकल्पित असें मरण दुःख आपण स्वतःच भोगतो [ त्याची जागृतींत स्मृति होत असते ] १३०. किंवा कावीळ झालेल्या मनुष्याचे डोळे पिवळे होऊन, तो जी जी वस्तु पहातो ती ती त्यास त्याच डोळ्यांनीं पिवळी दिसते. तेव्हां कावीळ झाल्याचें ज्ञान व पिवळेपणाचे प्रकाशन डोळेच करतात ३१.

१ अज्ञानरूपी. २ प्रकृती. ३ अभिमानानें फुगली. ४ विपरीत. ५ जागें होतें. ६ बरें न दिसणाऱ्या दृष्टीनें.

७ एकापुढें एक युगरूपी पावलानें. ८ आवडता स्नेही ९ शोभा, ऐश्वर्य. १० मरण. ११ माया. १२ पृथक् पृथक्

लोपला हेंही दिसे । सूर्येंचि कीं ॥ ३२ ॥ पैं आपणपेनि जालिया । छाया गा आपुलिया । बिहोनी बिहोलिया । आन आहे ? ॥ ३३ ॥ तैसीं इयें नाना देहें । दाऊनि मी नाना होयें । तेथ ऐसा जो बंधु आहे । तेंही देखें ॥ ३४ ॥ बंधु कां न बंधिजे । हें जाणणें मज माझें । नेणणेनि उपजे । आपलेनि ॥ ३५ ॥ तरी कोणें गुणें कैसा । मजचि मी बंधु ऐसा । आवडे तें परियेसा । अर्जुनदेवा ॥ ३६ ॥ गुण ते किती किंधर्म । कायि ययां रूपनाम । कें जालें हें वर्म । अवधारीं पां ॥ ३७ ॥

सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः । निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥

तरी सत्त्वरजतम । तिघांसि हें नाम । आणि प्रकृति जन्म- । भूमिका ययां ॥ ३८ ॥ येथ सत्त्व तें उत्तम । रज तें मध्यम । तिहींमाजीं तम । सावियाधारें ॥ ३९ ॥ हें एकेचि वृत्तीच्या ठायीं । त्रिगुणत्व आवडे पाहीं । वयसात्रय देहीं । येकीं जेवीं ॥ १४० ॥ कां मीनलेनि कीडें । जंव जंव तूक वाढे । तंव तंव सोनें हीन पडे । पांचिकां कसीं ॥ ४१ ॥ पैं सावधपण जैसें । वाहविलें आळसें । सुषुप्ति बैसे । घणांवोनि ॥ ४२ ॥ तैसी अज्ञानांगीकारें । निघाली वृत्ति विखुरे । ते सत्त्वरजद्वारें । तमही होये ॥ ४३ ॥ अर्जुना गा जाण । ययां नाम गुण । आतां दाखऊं खूण । बांधिती ते ॥ ४४ ॥ तरी क्षेत्रज्ञदशे । आत्मा मोटका पैसे । हें देह मी ऐसें । मुहूर्त करी ॥ ४५ ॥ आजन्ममरणांतीं । देहधर्मीं समस्तीं । ममत्वाची सूती । घे ना जंव ॥ ४६ ॥ जैसी मीनाच्या तोंडीं । पडेना जंव उंडी । तंव गळ आसुडी । जळपारधी ॥ ४७ ॥

तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् । सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ ६ ॥

तेवीं सत्त्वें लुब्धकें । सुखज्ञानाचीं पाशकें । वोढिजती मग खुडके । मृगु जैसा ॥ ४८ ॥ मग ज्ञानें चडफडी । जाणिवेचे खुरखोडी । स्वयं सुख हें धाडी । हातींचें गा ॥ ४९ ॥ तेव्हां विद्यामानें तोखे । लाभमात्रें हरिखे । मी संतुष्ट हेंही देखे । श्लाघों लागे ॥ १५० ॥ म्हणे भाग्य ना माझें ? । आजि सुखियें नाहीं दुजें । विकाराष्टकें फुंजे । सात्त्विकाचेनि ॥ ५१ ॥ आणि येणेंही न सरे । लांकण लागे दुसरें । जें विद्वत्तेचें भरे । भूत आंगीं ॥ ५२ ॥ आपणचि ज्ञानस्वरूप आहे । तें गेलें हें दुःख न वाहे । कीं विषयज्ञानें होयें ।

अथवा सूर्य आपल्या प्रकाशानें आपल्यावर आलेल्या ढगांचें प्रकाशन करतो, तेव्हां ते ढग आपणास दिसतात व तो ढगानेंच अभ्राच्छादित झाला आहे, हेंहि त्याच्याच तेजानें दिसतें ३२. किंवा हें पहा, आपल्या अस्तित्वामुळेंच पडलेली, अस्तित्वास पावलेली आपली छाया पाहून जो भितो, तो त्या छायेला म्याला त्या छायेहून निराळा आहे काय? [ तर नाहीं ] ३३. त्याचप्रमाणें जगांत जरी पुष्कळ देह दृष्टीस दाखवून, प्रकाशित करून, तितक्या अनंत रूपानें मीच बनलों आहें व त्या ठिकाणीं अनेकत्वामुळें [ गुणामुळें ] बंध झाला आहे हें देखील मीच जाणतों ३४. बंध आहे किंवा बंध नाहीं, हे माझ्याच ठिकाणीं व माझ्याच ज्ञानानें जाणले जातात. हें सर्व प्रकार अज्ञानामुळें, आपलें स्वरूप न समजल्यामुळें [ बंध, मोक्ष ] त्याच्याच ठिकाणीं उत्पन्न होतात ३५. अर्जुना! माझ्याच ठिकाणीं आणि मलाच बंध आहेसा वाटतो. तो कोणत्या गुणांनी व कसा वाटतो तें ऐक ३६. आतां अगोदर गुण किती आहेत? त्यांचे धर्म काय आहेत? आणि त्यांचे स्वरूप, नांवें आणि ते कोठें उत्पन्न झालें ह्यावें वर्म सांगतों, ऐक ३७.

**अन्वयार्थ**—**महाबाहो**—हे पराक्रमी अर्जुना!—**सत्त्वं**—सत्त्व—**रजः**—रज व—**तमः**—तम—**इति**—असे हे—**प्रकृतिसंभवाः गुणाः**—प्रकृतीपासून उत्पन्न झालेले गुण—**देहे**—देहांत—**अव्ययं देहिनम्**—अव्यय देहवान् आत्म्याला—**निबध्नन्ति**—बद्ध करितात ५.

तरी सत्त्व, रज, तम अशी ही त्या गुणांची तीन नांवें आहेत. प्रकृति ही यांची जन्मभूमि आहे, अर्थात् मायेंत नित्य असतात ३८. त्यांत सत्त्वगुण हा उत्तम आहे, रजोगुण हा मध्यम आहे व तमोगुण हा सहजच कनिष्ठ होय ३९. ज्याप्रमाणें एकाच देहास बाल्य, तारुण्य व वार्धक्य या तिन्ही अवस्था येतात; त्याप्रमाणें हे तिन्ही गुण एकाच अंतःकरणवृत्तीच्या ठिकाणीं उत्पन्न होतात म्हणा वा असतात. त्यामुळें अंतःकरणहि त्रिगुणात्मकच आहे असें वाटतें १४०. किंवा उत्तम सोन्यांत किडाळहिणकस सोनें, मिळविल्यावर जों जों त्याचे वजन वाढतें तों तों ते सोनें फिकें दिसून पांच नंबरचे अर्थात् कसास कमी उतरते ४१. ज्याप्रमाणें आळसाने सावधपणा-जागृति नाहींशी होते व त्यामुळें गाढ झोंपेचा अंमल वाढतो ४२. त्याप्रमाणें अज्ञानाचा स्वीकार करून बाहेर पडलेली जी वृत्ति वाढते तेव्हां ती त्रिगुणात्मक होऊन तिला सत्त्व, रज, तम अशी नांवें येतात ४३. अर्जुना! ज्यांच्या योगानें वृत्ति निरनिराळ्या तऱ्हेची होते, त्याला 'गुण' असें म्हणतात. आतां ते आत्म्याला कसें बंधन करितात, ती खूण सांगतों ४४. त्याप्रमाणें आत्मा [ आत्मस्वरूपाच्या विसरामुळें देहात्मत्व भ्रांतीस पावतो अर्थात् ] क्षेत्रज्ञदशेंत—जीवदशेंत कांहींसा प्रवेश करतो न करतो तोंच 'मी देह आहे' असें म्हणण्याचा, समजण्याचा 'कुमुहूर्त' अपशकून आरंभ करतो. [ परिच्छिन्नतेच्या भ्रांतीनें बद्ध होऊन जीवकोटींत अंतर्भूत होतो ] ४५. वाईट शकुनाचें फल काय म्हणशील तर, देहाच्या ठिकाणी देह माझा आहे, म्ह. मीच देह आहे, इतका 'अहम्' अभिमान धारण करतो व जन्मापासून तो थेट मरणापर्यंत सर्व देहधर्मांचे 'ममत्व' धारण करून दुःखें भोगण्याचा प्रसंग येतो. तोच ४६. ज्याप्रमाणें गळास लाविलेले आमिष माशाच्या तोंडांत पडते न पडते तों इतक्यांत मासे धरणारा—धीवर गळाला हिसडा मारतो व प्राण घेतो ४७.

**अन्वयार्थ**—**तत्र**—त्या तीन गुणांतील—**सत्त्वं**—सत्त्व हा गुण—**निर्मलत्वात्**—निर्मळ—स्वच्छ असल्यामुळें—**प्रकाशकं**—प्रकाशक व—**अनामयं**—पीडारहित—उपद्रव रहित [**अस्ति**] —**आहे**—**हे अनघ**—हे निष्पाप अर्जुना!—[ **तत्**—ते सत्त्व ] **सुखसंगेन**—सुखाच्या संगानें—आसक्तीनें—**च**—व **ज्ञानसंगेन** ज्ञानाच्या संगानें—**बध्नाति**—[ आत्म्याला ] बांधतें ६.

त्याप्रमाणें सत्त्वगुण हाच कोणी एक पारधी असून तो सुखरूपी—ज्ञानरूपी अशा उभय पाशांनीं जीवास ओढतो व ज्याप्रमाणें हरिण पारध्याच्या पाशांत सांपडल्यावर तडफडतो ४८. त्याप्रमाणें जीव सत्त्वगुणाच्या सपाट्यांत सांपडल्यावर मी ज्ञानी आहे, अशा वल्गनात्मकतेने चरफडतो आणि माझ्याप्रमाणें कोणी जगांत ज्ञाता नाहीं अशी घमेंडरूपी लाथा झाडतो. या कारणानें कोणी स्वकीय आत्मज्ञानापासून होणारे व आपल्या हातीं सहज असलेले सुख आपणच व्यर्थ दवडतो ४९. मग विद्वान् म्हणून कोणी आपला बहुमान केला असतां आनंद पावतो व थोड्या वैषयिक लाभानेंहि धन्य मानतो १५०. माझ्यासारखा या जगांत दुसरा कोणीहि सुखी नाहीं हें माझें केवढें भाग्य आहे, असें आपणास मानून अष्टसात्त्विकभावांनीं ताठतो—गर्वास चढतो ५१. आणि एवढ्यानेंच आटोपत—संपत नाहीं, तर जगांत काय तो मीच एक विद्वान्, हें अहंकाराचें दुसरें एक भूत संचरते, लचांड, लफडे, बंधन त्याच्या पाटीस लागते ५२. आपण स्वतः

१ भासल्यास. २ वेगळीं वेगळीं. ३ कोणत्या धर्माचें. ४ जन्मस्थान. ५ त्या दोघांत. ६ कनिष्ठ. ७ बाल्य, तारुण्य व वार्धक्य. ८ डांकानें, हिणकटानें. ९ वजन. १० पांच नंबरचें, हालक्या प्रतीचें. ११ वृद्ध होऊन. १२ वाढते.

गगनायेवढा ॥ ५३ ॥ रावो जैसा स्वप्नीं । रंकपणें रिघे धानीं । तो दों दोणां मानी । इंद्रु ना मी ॥ ५४ ॥ तैसें गा देहातीता । जालेया देहवंता । हों लागे पंडुसुता । बाह्यज्ञानें ॥ ५५ ॥ प्रवृत्तिशास्त्र बुझे । यज्ञविद्या उमजे । किंबहुना सुझे । स्वर्गवरी ॥ ५६ ॥ आणि म्हणे आजि आन । मीवांचूनि नाहीं सज्ञान । चातुर्यचंद्रा गगन । चित्त माझें ॥ ५७ ॥ ऐसें सत्त्व सुखज्ञानी । जीवासि लावूनि कानी । बैलाची करी वांनी । पांगुळाचिया ॥ ५८ ॥ आतां हाचि शरीरीं । रजें जियापरी । बांधिजे तें अवधारीं । सांगिजेल ॥ ५९ ॥

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् । तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसंगेन देहिनम् ॥ ७ ॥

हें रज याचि कारणें । जीवातें रंजऊं जाणे । हें अभिलाखाचें तरुणें । सदाचि गा ॥ १६० ॥ हें जीवीं मोटकें रिगे । आणि कामाच्या मदीं लागे । मग वारया वळघे । तृष्णेचिया ॥ ६१ ॥ घृतें आंबुखूनि आगियाळें । वज्राग्नीचें सादुकलें । आतां बहु थेंकुलें । आहे तेथ ? ॥ ६२ ॥ तैसी खवळे चाड । होय दुःखासकट गोड । इंद्रश्रीहि सांकड । गभों लागे ॥ ६३ ॥ तैसी तृष्णा वाढिनलिया । मेरुही हाता आलिया । तऱ्ही म्हणे एखादिया । दारुणा वळघो ॥ ६४ ॥ जीविताची कुरोंडी । वोंवाळूं लागे कवडी । मानी तृणाचिये जोडी । कृतकृत्यता ॥ ६५ ॥ आजि असतें वेंचिजेल । परी पाहे काय कीजेल । ऐसा पांगीं वडील । व्यवसाय मांडी ॥ ६६ ॥ म्हणे स्वर्गा हन जावें । तरी काय तेथें खावें । इयालागीं धांवें । याग करूं ॥ ६७ ॥ व्रतापाठीं व्रतें । आचरे इष्टापूर्तें । काम्यावांचूनि हातें । शिवणें नाहीं ॥ ६८ ॥ पैं ग्रीष्मांतींचा वारा । विसांवो नेणें वीरा । तैसा न म्हणे व्यापारा । रात्र दिवस ॥ ६९ ॥ काय चंचळु मासा ? । कामिनीकटाक्षु जैसा । लवलाहो तैसा । विजूही नाहीं ॥ १७० ॥ तेतुलेनि गा वेगें । स्वर्गसंसारपांगें । आगीमाजीं रिगे । क्रियांचिये ॥ ७१ ॥ ऐसा देहीं देहावेगळा । ले तृष्णेचिया सांखळा । खटाटोपु वाहे गळां । व्यापाराचा ॥ ७२ ॥ हें रजोगुणाचें दारुण । देहीं देहियासी बंधन । परिस आतां विंदाण । तमाचें तें ॥ ७३ ॥

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् । प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥

व्यवहाराचेहि डोळे । मंद जेणें पडळें । मोहरात्रीचें काळें । मेहुडें जें ॥ ७४ ॥ अज्ञानाचें जियालें । जया एका लागलें । जेणें विश्व भुललें । नाचत असे

ज्ञानस्वरूप आहों ते [ ज्ञानरूपत्व ] गेले [ आच्छादित झाले ] त्याचें त्यास दुःख वाटत नाहीं, परंतु उलट विषयज्ञानाच्या भरांत तो गगना एवढा फुगतो. [ स्वतःस श्रेष्ठ समजतो ] ५३. ज्याप्रमाणें एकादा राजा स्वप्नांत आपण भिकारी होऊन भिक्षा मागण्यास नगरींत निघाल्यावर इतरांपेक्षां दोन दाणें जास्त मिळाल्यामुळें त्यांतच "मी इंद्रच नाहीं काय !" म्हणजे आपण मोठें भाग्यवान् आहों असें मानीत असतो ५४. त्याप्रमाणें, अर्जुना ! देहातीत आत्म्यानें देहाचा तादात्म्याभिमान धरल्यावर बाह्यज्ञानानें त्याची तशीच स्थिति होते ५५. प्रवृत्तिशास्त्रांत तो निपुण होतो, यज्ञविद्येंत तो निष्णात बनतो, अधिक काय सांगावें ! ! तो स्वर्गांतीलहि बातमी जाणतो ५६. आणि सांप्रत माझ्याशिवाय या जगांत दुसरा कोणीहि ज्ञानवान् नाहीं व चातुर्यरूपी चंद्रास प्रकाश करण्यास माझें चित्त हेंच गगनरूपी आधार आहे, असें म्हणतो ५७. याप्रमाणें सत्त्वगुण हा जीवात्म्यास सुखरूपी व ज्ञानरूपी यांच्या दोऱ्या कानास लावून पांगुळ जसा 'नंदीबैलास' ओढतो त्याप्रमाणें आपल्या ताब्यांत आणतो ५८. आतां रजोगुणहि या जीवास शरीराचे ठिकाणीं कसें बंधन करतो, तीं लक्षणें सांगण्यांत येतील ऐक ५९.

**अन्वयार्थ**—**तृष्णासंगसमुद्भवं**-विषयतृष्णा व विषयासक्ति यांचें कारण असें-**रजः**-रज-रजोगुण-**रागात्मकं**-रंजनात्मक आहे असें-**विद्धि**-जाण-**कौन्तेय**-हे कुंतीपुत्रा !-**तत्**-तें रज-**देहिनं**-देही आत्म्याला-**कर्मसंगेन**-कर्माच्या आसक्तीनें-**निबध्नाति**-बद्ध करितें ७.

या गुणापासून जीवाचें नेहमीं रंजन होतें व अभिलाषा-लोभीवृत्ति सदैव जागृत राहते. ह्यास्तव त्यास रजोगुण असें म्हणतात १६०. जीवाच्या अंतरांत रजोगुणाचा थोडा शिरकांव होतां क्षणीं हा रजोगुण त्याला कामाच्या नादीं लावतो, मग जीव तृष्णारूपी वाऱ्यावर स्वार होतो व वाऱ्याप्रमाणेंच वाहूं लागतो ६१. मग अग्निकुंडांत पेटलेल्या अग्निवर तूप घातलें आणि सहसात त्यास वज्राग्नीचें सहाय्य झालें, मग जाळण्यास त्याला लहान मोठी वस्तु आहे काय ! ६२. त्याप्रमाणेंच या जीवाची इच्छा प्रबल होते व दुःखदायक गोष्टीहि त्याला सुखदायक वाटतात व इंद्रलोक वैभव जरी प्राप्त झालें, तरीहि तें थोडेंच वाटून त्याची तृप्ति होत नाहीं ६३. अशा प्रकारें विषयवासना वाढल्यावर मेरु पर्वतहि त्याच्या हस्तगत झाला, तरीहि त्यापेक्षां अधिक मोठी वस्तु प्राप्त व्हावी असें म्हणून त्याच्या भयंकर खटपटीस लागूं असें त्यास वाटतें ६४. एका कवडीवरूनहि आपलें जीवित ओंवाळून टाकण्यास तो मागेंपुढें पहात नाहीं; आणि तृणाइतकी जरी वस्तु प्राप्त झाली, तरी तो आपल्यास कृतकृत्यता लाभली म्हणून धन्य मानतो ६५. आपल्याजवळ असलेलें द्रव्य जर आज खर्च करून संपविलें, तर उद्यां आपली काय वाट होणार, असें मानून अति तृष्णेच्या जोरावर मोठमोठ्या उद्योगास सुरू करितो ६६. आणि म्हणतो कीं, जर कदाचित् आपल्यास स्वर्गप्राप्ती झाली, तर त्या ठिकाणीं काय खावें ? आपल्यास खावयास काय मिळणार ? याकरितां यज्ञयागादि क्रिया करण्यास धांवतो ६७. व्रतानंतर व्रतें आचरण करतो, इष्टापूर्त [ विहिरी, तलाव वगैरे बांधणें, यज्ञयागादि करणें ] कर्में करितो; काम्यकर्माविना किंवा व्रतावांचून इतर कोणत्याहि कर्मास हातानें स्पर्शहि करीत नाहीं ६८. ज्याप्रमाणें ग्रीष्मऋतूंतील अखेरचा आषाढ महिन्यांतला वारा विश्रांतिविना रात्रंदिवस सारखा वाहतो, त्याप्रमाणें अर्जुना ! अशा प्रकारच्या व्यापारांत हा रजोगुणी रात्रंदिवस खपत असतो ६९. यांच्यापुढें मासा कसला चंचल ? जसा कामिनी स्त्रीचा नेत्रकटाक्ष हा चंचल असतो तसा हा चंचल असतो व विजेला तर अति चंचल असें म्हणतात; परंतु त्यांची रजोगुणाच्या चंचलतेशीं तुलना केली असतां तीं गति कमी भरेल १७०. अशा अतिवेगानें स्वर्ग व संसार यांच्या प्राप्तीकरितां तीव्रेच्छेनें हा कर्माच्या अग्नींत उडी टाकण्यास मागेंपुढें पहात नाहीं ७१. याप्रमाणें देहांत असून देहावेगळा असणारा जो जीवात्मा तो तृष्णेच्या सपाट्यांत सांपडल्यावर आपल्या गळ्यांत व्यापाराचा साखळदंड अडकवून घेऊन वागवितो ७२. अशा रीतीनें देहांत राहणारा जो जीवात्मा, त्याला रजोगुणाचें बळकट भयंकर बंधन असतें. आतां तमोगुणांचें कौशल्य व लक्षण ऐक ७३.

**अन्वयार्थ**—**तु**-परंतु-**सर्वदेहिनां मोहनं**-सर्व देहवानांना मोह पाडणारे-अविवेकी करणारें-**तमः**-तम [ म्ह. तिसरा तमोगुण ]-**अज्ञानजम्**-अज्ञानापासून झालेलें आहे, असें-**विद्धि**-तूं जाण-**हे भारत**-हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना ! -**तत्**-तें तम-**प्रमादालस्यनिद्राभिः**-प्रमाद आलस्य व निद्रा यांच्या योगानें प्राण्याला-**निबध्नाति**-बद्ध करितें ८.

तमोगुणाच्या पडद्यानें मनुष्याची व्यवहाराकडील दृष्टिहि मंद होतेच व जें मोहरूप रात्रीचें काळेभोर असें जणुं आभाळच होय ७४. जो तमोगुण केवळ अज्ञानानें जगतो,

१ भिक्षा मागण्यास. २ दोन दाण्यांनीं. ३ जाणतो. ४ समजे. ५ स्वर्गांतील बातमी. ६ दोरी काढणी. ७ सारखे.

॥ ७५ ॥ अविवेकमहामंत्र । जें मौढ्यमद्याचें पात्र । हें असो मोहनास्त्र । जीवांसि जें ॥ ७६ ॥ पार्था तें गा तम । रचूनि ऐसें वर्म । चौखुरी देहात्म- । मानियातें ॥ ७७ ॥ हें एकचि कीर शरीरीं । माजों लागे चराचरीं । आणि तेथ दुसरी । गोठी नाहीं ॥७८॥ सर्वेंद्रिया जाड्य । मनामाजीं मौढ्य । माल्हाती जे दार्ढ्य । आलस्याचें ॥ ७९ ॥ आंगें आंग मोडामोडी । कार्यजाती अनावडी । नुसती परवडी । जांभयांची ॥ १८० ॥ उघडियाची दिठी । देखणें नाहीं किरीटी । नाळवितांचि उठी । वो म्हणौनि ॥ ८१ ॥ पडलिये धोंडी । नेणें कानी मुरडी । तयाचि परी मुरकुंडी । उकलूं नेणें ॥ ८२ ॥ पृथ्वी पाताळीं जावो । कां आकाशही वरी येवो । परी उठणें हा भावो । उपजों नेणें ॥ ८३ ॥ उचितानुचित आघवें । झांसुरतां नाठवे जीवें । जेथींचा तेथ लोळावें । ऐसी मेधा ॥ ८४ ॥ उभऊनि करतळें । पडिघाये कपोळें । पायाचें शिंरियाळें । मांडूं लागे ॥८५॥ आणि निद्रेविषयीं चांगु । जीवीं आथि लागु । झोंपी जातां स्वर्गु । वावो म्हणे ॥८६॥ ब्रह्मायु होईजे। मा निजेलियाचि असिजे । हे वांचूनि दुजें । व्यसन नाहीं ॥८७॥ कां वाटे जातां वोघें । कल्हातांही डोळा लागे । अमृतही परी नेघे । जरी नीद आली ॥ ८८ ॥ तेवींचि आक्रोशबळें । व्यापारे कोणे एके वेळे । निगालें तरी आंधळें । रोषें जैसें ॥ ८९ ॥ केधवां कैसें राहाटावें । कोणेसीं काय बोलावें । हें ठाकतें कीं नागवे । हेंही नेणें ॥ १९० ॥ वणवा मियां आघवा । पांखें पुसोनि घेयावा । पतंगु पां हांवा । घाली जेवीं ॥ ९१ ॥ तैसा वळघे साहसा । अकरणींच धिंवसा । किंबहुना ऐसा । प्रमादु रुचे ॥ ९२ ॥ एवं निद्रालस्यप्रमादीं । तम इया त्रिबंधीं । बांधे निरुपाधी । चोखटातें ॥ ९३ ॥ जैसा वन्ही काष्ठीं भरे । तैं दिसे काष्ठाकारें । व्योम घटें आवरे । तें घटाकाश ॥ ९४ ॥ नाना सरोवर भरलें । तैं चंद्रत्व तेथें बिंबलें । तैसें गुणाभासीं बांधलें । आत्मत्व गमे ॥ ९५ ॥

सत्त्वं सुखे सञ्जयति रजः कर्मणि भारत । ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे सञ्जयत्युत ॥ ९ ॥
रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत । रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥ १० ॥

पैं हरूनि कफवात । जैं देहीं आटोपे पित्त । तैं करी संतप्त । देह जेवीं ॥९६॥ कां वरिष आतप जैसें । जिणौनि शीताचि दिसे । तेव्हां होय हिंव ऐसें ।

वाढतो, ज्यामुळें सर्व विश्व भ्रमांत-अज्ञानांत, पडून हवें तसें नाचतें ७५. हा तमोगुण अविचाराचा महामंत्र होय व मूढतारूपी मद्याचें हा पात्रच होय. फार काय सांगावें! जीवास मोह घालणारें असें हें एक जणुं अस्त्रच होय ७६. पार्था! या लक्षणासच तमोगुण असें म्हणतात; व जे देहालाच आत्मा मानतात, त्यांना हाच युक्ति प्रयुक्तीनें चहूंकडून ग्रासून टाकतो ७७. हा तमोगुण एकटाच चराचराच्या अंगीं खरोखर वाढूं लागला म्हणजे त्या ठिकाणीं दुसऱ्या कोणाचाहि शिरकाव होऊं देत नाहीं ७८. हा सर्व इंद्रियांना जडत्व आणतो, मनामध्यें मूढत्व आणतो व याच्या योगानें [ मन व इंद्रियें ] दृढ आळसाचा आश्रय करतात ७९. याच्या योगानें मनुष्य नेहमीं अंग आळेपिळें घालून मोडतो, कोणतेंहि काम करण्याविषयीं कंटाळच असतो आणि एकामागून एक अशा नुसत्या जांभयांची रेलचेल होते १८०. अर्जुना! त्या मनुष्याचे डोळे उघडे असूनहि त्याला समोरील वस्तु दिसत नाहींत, आणि हांका मारल्या नाहींत तरी तो मध्येंच 'ओ' म्हणून अंथरुणांतून उठतो ८१. एखादा मोठा धोंडा खालीं जमीनीवर पडल्यावर तो जसा एका बाजूवरून दुसऱ्या बाजूवर फिरणे जाणत नाहीं, त्याप्रमाणें हा मुरकुंडी मारून एकदां निजला म्हणजे ह्या कुशीचा त्या कुशीवर कधींहि होत नाहीं ८२. पृथ्वी पाताळास जावो! अथवा आकाश अंगावर तुटून पडो! परंतु याच्या मनांत उठण्याची म्हणून इच्छा उत्पन्न होत नाहीं ८३. हा आळसामुळें स्वस्थ पडला असतां आपल्या आन्हिक-कर्मांची अर्थात योग्यायोग्य याची सुद्धां त्यास आठवण होत नाहीं; परंतु अंथरुणावरच लोळत पडावें अशी त्याची बळकट बुद्धि असते ८४. दोन्ही तळहात वर करून गाल धरतो, बोटांत बोटें अडकवून व ते डोक्यावर ठेवून हा गुडघ्यांत डोकें घालून बसतो ८५. आणि मनांत निद्रेविषयीं पूर्ण चांगली आवड असते आणि झोंप येऊं लागल्यावर तिच्यापुढें स्वर्गसुख देखील तुच्छ आहे, असें म्हणतो ८६. मला ब्रह्मदेवाचें आयुष्य मिळावें व मी असाच निजला रहावा, याशिवाय त्याला दुसरें कांहींच व्यसन नसतें ८७. अरे! वाटेनें जातांना जर सहज पाय घसरून कलंडून पडला तर त्या ठिकाणींहि डोळा लागतो व त्याला झोंप जर आली असली तर कोणी अमृत देऊं लागल्यास त्याचा देखील तो अव्हेर करतो. ८८. एखादा आंधळा रागानें कामाला म्हणून जाऊं लागला तर कोठें जाईल व कोठें पडेल याचा नेमच नसतो. त्याचप्रमाणें रागानें किंवा द्वेषाच्या आवेशानें एखादा व्यापार करूं लागला, तर काय करील याचा नेम नाहीं. [ कारण, त्याचा व्यापार ज्ञानशून्य असतो ] ८९. कारण, कोणच्या वेळेस कसें वागावें, कोणाबरोबर कसें व काय बोलावें व ज्याच्याबरोबर देवघेव करावयाची तो घरंदाज आहे अथवा कफल्लक आहे ह्याचाहि त्यास विचार कळत नाहीं १९०. ज्याप्रमाणें वणवा लागला असता तो सर्वहि मी आपल्या पंखांनीं पुसून स्वाधीन करून घेईन, अशा अज्ञानमूलक तीव्र इच्छेनें पतंग वणव्यांत उडी घालतो ९१. त्याप्रमाणें साहसी धोक्याचे कर्म करण्यास तो प्रवृत्त होतो व वेदबाह्य कर्में करण्याची त्याला प्रबळ हौस असते; किंबहुना! असले प्रमाद, भलतेच करणें त्याला गोड वाटतें ९२. याप्रमाणें तमोगुण हा निद्रा, आळस व प्रमाद या तीन पाशांनीं उपाधीरहित शुद्ध अशा आत्म्यास बंधन करितो ९३. ज्याप्रमाणें अग्नि काष्ठास लागला असतां तो अग्नि काष्ठाच्याच आकाराप्रमाणें दिसतो, किंवा आकाश हें घटांत सांपडले तर त्या घटाच्या आकाराप्रमाणें भासते ९४. अथवा पाण्यानें भरलेल्या सरोवरांत चंद्राचें प्रतिबिंब दिसतें, त्याप्रमाणें आत्मत्व, गुणांत भासल्यामुळें आत्माच गुणांनीं बद्ध झाल्यासारखा वाटतो ९५.

**अन्वयार्थ**—**हे भारत**—ते अर्जुना!—**सत्त्वं**—सत्त्वगुण **सुखे**—सुखांत—**सञ्जयति**—-संसक्त—-आसक्त—-करतो—**रजः**—रजोगुण—**कर्मणि**—कर्मामध्यें आसक्त करतो—**तु** आणि—**तमः**—तमोगुण—**उत**—**हि**—**ज्ञानम्**-**आवृत्य**-ज्ञानाला आच्छादित करून—**प्रमादे सञ्जयति**—अनवधानांत संयुक्त करतो—**हे भारत**—हे अर्जुना!—**सत्त्वं**—सत्त्वगुण—**रजः च तमः**—रजोगुण व तमोगुण यांना—**अभिभूय**—पराभूत करून—**भवति**—वाढतो—**रजः**—रजोगुण—**सत्त्वं च एव तमः**—सत्त्वगुण व तमोगुण यांनाच—[ **अभिभूय** ] पराभूत करून—[ **भवति** ]—उत्कर्ष पावतो—**तथा**—आणि तसेंच—**तमः**—तमोगुण—**सत्त्वं च रजः**—सत्त्वगुण व रजोगुण यांना—[ **अभिभूय भवति** ]—पराभूत करून स्वतः वृद्धि पावतो ९–१०.

हें पहा! कफ व वात यांस मागें सारून देहांत पित्त वाढलें असतां तें जसें शरीर संतप्त करितें ९६. किंवा उन्हाळा आणि पावसाळा निघून गेल्यावर जेव्हां थंडीच सर्वत्र पडत असल्याची दिसते व आकाश चहूंकडे थंडगार

आकाश हें ॥१७॥ नाना स्वप्न जागृती । लोपूनि ये सुषुप्ती । तैं क्षणु एक चित्तवृत्ती । तेचि होय ॥१८॥ तैसीं रजतमें हारवी । जैं सत्त्व माजु मिरवी । तैं जीवाकरवीं म्हणवी । सुखिया ना मी? ॥१९॥ तैसेंचि सत्त्व रज । लोपूनि तमाचें भोज । वळघे तैं सहज । प्रमादी होय ॥ २०० ॥ तयाचि गा परिपाठीं । सत्त्व तमातें पोटीं । घालूनि जेव्हां उठी । रजोगुण ॥ १ ॥ तेव्हां कर्मावांचूनि कांहीं । आन गोमटें नाहीं । ऐसें मानी देहीं । देहराजु ॥२॥ त्रिगुण वृद्धि निरूपण । तीं श्लोकीं सांगितलें जाण । आतां सत्त्वादि वृद्धिलक्षण । सादर परियेसीं ॥ ३ ॥

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते । ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११ ॥
लोभ: प्रवृत्तिरारम्भः कर्म्मणामशम: स्पृहा । रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥
अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च । तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनंदन ॥ १३ ॥
यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् । तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥
रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते । तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥

पैं रजतमविजयें । सत्त्व गा देहीं इयें । वाढतां चिन्हें तियें । ऐसीं होती ॥ ४ ॥ जे प्रज्ञा आंतुलीकडे । न समाती बाहेरी वोसंडे । वसंतीं पद्मखंडें । द्रुती जैसी ॥५॥ सर्वेंद्रियांच्या आंगणीं । विवेक करी राबणी । साचाचि करचरणीं । होती डोळे ॥६॥ राजहंसापुढें । चांचूचें आगरडें । तोडी जेवीं झगडे । क्षीरनीराचे ॥ ७ ॥ तेवीं दोषादोषविवेकीं । इंद्रियेंचि होती पारखीं । नियमु बा रे पायिकी । वोळगे तैं ॥ ८ ॥ नाइकणें तें कानचि वाळी । न पहाणें तें दिठीचि गाळी । अवाच्य तें टाळी । जीभचि गा ॥ ९ ॥ वाती पुढां जैसें । पळों लागे काळवसें । निषिद्ध इंद्रियां तैसें । समोर नोहे ॥ २१० ॥ धाराधरकाळें । महानदी उचंबळे । तैसी बुद्धि पघळे । शास्त्रजातीं ॥ ११ ॥ अगा पुनवेच्या दिवशीं । चंद्रप्रभा धांवें आकाशीं । ज्ञानीं वृत्ति तैसी । फांके सैंघ ॥१२॥ वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे । मानस विटे । विषयांवरी ॥ १३ ॥ एवं सत्त्व वाढे । तैं हें चिन्ह फुडें । आणि निधनही घडे । तेव्हांचि जरी ॥ १४ ॥ कां पाहालेनि सुयाणें । जालया परगुणें । पढियंतें पाहुणें । स्वर्गौनियां ॥ १५ ॥ तरी जैसीचि घरींची संपत्ती । आणि तैसीचि औदार्यधैर्यवृत्ती । मा परत्रा आणि कीर्ती । कां नोहावें? ॥१६॥ मग गोमटेया तया । जावळी असे धनंजया । तेवीं सत्त्वीं जाणे

होऊन जातें ९७. अथवा जागृती व स्वप्न ह्या अवस्था नाहींतशा होऊन गाढ झोंप लागली असतां जशी क्षणभर चित्तवृत्ति [ जड-मूढ ] होते ९८. त्याप्रमाणें, रज व तम नाहींसे करून त्यापेक्षां जेव्हां सत्त्वगुण अधिक वाढतो, तेव्हां 'मी सुखी आहे ना!' असें तो या जीवाकडून म्हणवित असतो ९९. त्याप्रमाणें, सत्त्व व रज या गुणांचा लोप होऊन जेव्हां तमाचें प्राबल्य होते तेव्हां साहजिकपणेंच प्रमादी–अनवधानतासंपन्न होतो २००. त्याच रीतीनें, सत्त्व व तम या गुणांना पाठीमागे सारून जेव्हां रजोगुण बळावतो १. तेव्हां देहांत राहणारा जो देहाचा राजा जीवात्मा, याला कर्मावांचून दुसरें कांहीं चांगलें असें दिसतच नाहीं २. याप्रमाणें तीन श्लोकांनीं तीन गुणांची वाढ कशी होते याचे निरूपण केलें, आतां ह्या सत्त्वादि गुणांच्या वृद्धीचें लक्षण लक्षपूर्वक ऐक ३.

**अन्वयार्थ—यदा**–ज्या वेळीं–**अस्मिन् देहे**–या देहांत **सर्वद्वारेषु**–श्रोत्रादि सर्व ज्ञानसाधनांच्या निमित्तानें–**प्रकाशः**–प्रकाश म्ह०–**ज्ञानं**–ज्ञान–**उपजायते**–उत्पन्न होतें–**तदा**–त्यावेळीं–**सत्त्वम् उत**–सत्त्वहि–**विवृद्धं**–वृद्धि पावलें आहे–**इति**–असें–**विद्यात्**–जाणावें–**हे भरतर्षभ**–हे भरतश्रेष्ठा अर्जुना!–**रजसि–विवृद्धे** [ **सति** ]–रजोगुणाची अतिशय वृद्धि झाली असतां–**लोभः**–लोभ–**प्रवृत्तिः**–प्रवृत्ति–**कर्मणाम् आरम्भः**–कर्मांचा आरंभ–**अशमः**–अशांति–**स्पृहा**–इच्छा-तृष्णा–**एतानि**–हीं चिन्हें–**जायन्ते**–उत्पन्न होतात–हे **कुरुनंदन**–हे कुरुवंशजा!–**तमसि विवृद्धे** [ **सति** ]–तमोगुण विशेषेंकरून वाढला असतां–**अप्रकाशः**–अविवेक–अज्ञान–**च**–व–**अप्रवृत्तिः**–प्रवृत्तीचा अभाव–**प्रमादः**–अनवधान–**मोहः एव च**–व मोहच–**एतानि**–हीं चिन्हें–**जायन्ते**–होतात–**तु**–परंतु–**यदा**–जेव्हां–**सत्त्वे प्रवृद्धे**–सत्त्वगुणाची अतिशय वृद्धि झाली असतां–**देहभृत्**–देह धारण करणारा आत्मा–**प्रलयं याति**–प्रलयास प्राप्त होतो–मरतो–**तदा**–तेव्हा–**उत्तमविदां**–हिरण्यगर्भादिकांच्या तत्त्वाला जाणणाऱ्या लोकांच्या–**अमलान् लोकान्**–निर्मल-शुद्ध लोकांस–**प्रतिपद्यते**–तो प्राप्त होतो–**रजसि–प्रलयं गत्वा**–रजोगुणांत प्रलयाला प्राप्त होऊन म्ह० रजोगुण वाढला असतां जो मरतो तो–**कर्मसंगिषु जायते**–कर्मांमध्यें आसक्ति ठेवणाऱ्या मनुष्यांमध्यें उत्पन्न होतो–**तथा**–त्याप्रमाणें–**तमसि–प्रलीनः**–तमोगुणांत प्रलीन झालेला–तमोगुण वृद्धि पावला असतां मरण पावलेला–**मूढयोनिषु**–पश्वादि मूढ योनींमध्यें–**जायते**–उत्पन्न होतो ११–१५.

**हें पहा!** रज व तम या गुणांवर विजय मिळवून जेव्हां सत्त्वगुण या देहांत वाढतो, तेव्हां जीं लक्षणें होतात तीं अशी असतात ४. वसंतऋतूमध्यें कमळें फुलल्यावर त्यांचा सुवास आंत न मावता जसा बाहेरहि चहूंकडे पसरतो, त्याप्रमाणें प्रज्ञावृत्ति–ज्ञान हें अंतर्यामी ओतप्रोत भरून न मावतां बाहेर निघतें ५. म्हणजे सर्व इन्द्रियांच्या अंगणांत विचार पहारा करीत असतो व खरोखर हातापायांनाहि डोळे निर्माण होतात म्ह० सत्कर्म कोणतें व दुष्कर्म कोणतें हें त्या इन्द्रियांनाच समजतें, त्याबद्दल त्याला विचार करावयाची आवश्यकताच नसतें ६. राजहंसापुढें दूध व पाणी मिसळून ठेविलें असतां, जसे त्या राजहंसाचे चोंचीचे टोक त्या दोहोंच्या मिश्रणांतील दूध व पाणी यांची वेगळीक करते ७. त्याप्रमाणें बा अर्जुना! इन्द्रियेंच बऱ्यावाईट कर्मांची निवड करण्यांत पारखी होतात व नियम–इन्द्रिय निग्रह, हाच त्यांची आपण होऊन सेवा–चाकरी करितो ८. ज्या ऐकूं नयेत त्या गोष्टी त्याचे कानच वर्ज्य समजून ऐकत नाहींत, जें पाहूं नैये त्या वस्तूचें पाहणें डोळेच टाकून देतात. जें भाषण बोलूं नये तें, बोलणें त्याची जीभच टाळीत असतें ९. काळोख जसा दिव्यासमोर न येतां पळूं लागतो, नाहींसा होतो, त्याप्रमाणें निषिद्ध व्यवहार त्याच्या इन्द्रियांसमोर येतच नाहीं २१०. हें पहा! नदी जशीं पर्जन्यकाळीं पाण्यानें अतीव उचंबळूं लागते, त्याप्रमाणें त्याची बुद्धि सर्व शास्त्रांत पारंगत होऊन वाढते ११. ज्याप्रमाणें चंद्राचा प्रकाश पौर्णिमेच्या दिवशीं सर्वच आकाशांत पसरतो, त्याप्रमाणें त्याची वृत्ती सर्व ज्ञानामध्यें फांकते १२. त्याच्या सर्व वासना एकत्र होतात प्रवृत्ति मार्गाकडे असलेली त्याची मनाची धांव कमी होते, त्याचप्रमाणें त्याचें मन विषयांना विटलेलें असतें १३. याप्रमाणें सत्त्वगुण वाढतो तेव्हांच ही लक्षणें खरोखर दिसत असतात. त्या स्थितींत जर त्याचा मरणकाळ झाला; [ तर त्याचा काय परिणाम होतो तो दृष्टांतपूर्वक ऐक ] १४. किंवा दुष्काळाचे दिवस गेल्यावर उत्तम पाऊन पडून सर्व सुबत्ता झालेली असावी, तशांत एखादा मोठा सण प्राप्त झालेला असावा आणि अशा समयीं जसे आपले जणुंकाय स्वर्गांतील पूर्वजच पाहुणे यावेत, इतक्या प्रीतीचा पाहुणा आल्यास परमानंद [ कां होणार नाहीं? तर ] होतो १५. त्याचप्रमाणें घरांत पुष्कळ विपुल संपत्ति असावी व त्यास दानधर्म करण्याविषयीं औदार्यासह तशी धैर्यवृत्तिहि असावी म्हणजे त्यापासून त्याला इहलोकी कीर्ति आणि स्वर्गलोकांची सुखप्राप्ति कां होणार नाहीं? १६. अर्जुना! मग त्या

देहा। कें आथि गा ?॥१७॥ जे स्वगुणीं उद्भट । घेऊनि सत्त्व चोखट। निगे सांडूनि कोपटें । भोगक्षेम हें ॥ १८ ॥ अवचटें ऐसा जो जाये । तो सत्त्वाचाचि नवा होये । किंबहुना जन्म लाहे । ज्ञानियांमाजीं ॥ १९ ॥ सांग पां धनुर्धरा । रावो रायपणें डोंगरा । गेलिया अपुरा। होय काई ? ॥ २२० ॥ नातरी येथिंचा दिवा। नेलिया सेजियां गांवा। तो तेथें तरी पांडवा । दीपचि कीं ॥ २१ ॥ तैसी ते सत्त्वशुद्धी । आगळी ज्ञानेंसी वृद्धी । तरंगावों लागें बुद्धी । विवेकावरी ॥ २२ ॥ पैं महदादि परिपाठीं । विचारूनि शेवटीं । विचारासकटे पोटीं। जिरोनि जाय ॥ २३ ॥ छत्तिसां सदतिसावें । चोविसां पंचविसावें । तिन्ही नुरोनि स्वभावें । चतुर्थ जें ॥ २४ ॥ ऐसें सर्व जें सर्वोत्तम । जालें असे जया सुगम । तयासवें निरुपम । लाहे देह ॥२५॥ इयाचि परी देख । तमसत्त्व अधोमुख । बैसोनि जें आगळीक । धरी रज ॥२६॥ आपुलिया कार्याचा । धुंमाड गोंवीं देहाचा । माजवी तैं चिन्हांचा । उदयो ऐसा ॥ २७ ॥ पांजरैली वाहटुळी। करी वेगळ वेंटाळी । तैसी विषयीं सैरळी । इंद्रियां होय ॥ २८ ॥ परदारादि पडे । परी विरुद्ध ऐसें नावडे । मग शेळियेचेनि तोंडें । सैंघ चारी ॥२९॥ हा ठायवरी लोभु । करी स्वैरत्वाचा राबु । वेंटाळितां अलाभु । तें तें उरे ॥ २३० ॥ आणि आर्ड पडलिया । उद्यमजाती भलतिया । प्रवृत्ति धनंजया । हातु न काढी ॥ ३१ ॥ तेवींचि एखादा प्रासादु । कां करावा अश्वमेधु । ऐसा अचाट छंदु । घेऊनि उठी ॥ ३२ ॥ नगरेंचि रचावीं। जळाशयें निर्मावीं। महावनें लावावीं। नानाविधें॥ ३३ ॥ ऐसैसां अफाटीं कर्मीं । समारंभु उपक्रमी। आणि दृष्टादृष्टें कामीं। पुरे न म्हणे ॥ ३४ ॥ सागरुही सांडीं पडे। आगी न लाहे तीन कवडे । ऐसें अभिलेषीं जोडे। दुर्भरत्वें ॥ ३५ ॥ स्पृहा मना पुढां पुढां । आशेचा घे दवडा । विश्व धांपे चाडा । पायांतळीं ॥ ३६ ॥ इत्यादि वाढतां रजीं । इयें चिन्हें होतीं सांजीं। आणि ऐशा समाजीं। वेंचे जरी देह ॥ ३७ ॥ तरी आघवाचि इहीं। परिवारला आनी देहीं। रिगे परी योनिही। मानुषीचि ॥३८॥ सुरवाडेंसिं भिकारी। वसो पां राजमंदिरीं । तरी काय अवधारीं। रावो होईल ? ॥ ३९ ॥ बैल तेथें कैरबाडें। हें न चुके गा फुडें। नेईजो कां वऱ्हाडें । समर्थाचेनी ॥ २४० ॥ म्हणौनि ब्यापारा हातीं । उसंतु दिहीं ना रातीं।

चांगल्या वागण्यास दुसरी जोड आहे काय ! त्याचप्रमाणें सत्त्वगुण वाढला असतां मरण आले तर मरणानन्तर तो दुसरीकडे कोठें जाईल ? १७. कारण, जो आपण स्वतः उत्तम आचरण करणारा, तो भोग भोगण्याचें योग्य ठिकाण जें शरीर तें टाकून शुद्ध सत्त्वगुणाला बरोबर घेऊन निघतो १८. अशा रीतीनें जो अकस्मात् देह ठेवतो, तो पुनः केवळ सत्त्वाची नवी मूर्तीच बनतो, फार काय सांगावें ! ! ज्ञानवन्तामध्यें जन्म घेतो १९. हे धनुर्धरा ! राजा आपल्या गादीवर असतांना राजेपणानें डोंगरावर जरी गेला तरी त्याच्या राजेपणांत त्या ठिकाणींहि कांहीं कमी पडतें काय ? सांग बरें ? २२०. किंवा बाबारें ! एका गावांतील दिवा दुसऱ्या शेजारच्या गांवास नेला असतां तेथेंहि त्या दिव्याचा उजेड व दिवा जसा सारखाच–दिवाच असतो २१. त्याप्रमाणें सत्त्वगुणाची वृद्धि झाल्यावर ज्ञानहि अधिक विशेष वाढतें व त्याची बुद्धि विचारांत पोहूं लागतें २२. नंतर महत्तत्त्वादि अनात्मक पदार्थांचा अनुक्रमानें विचार करून शेवटीं तो त्या विचारासह आत्मस्वरूपांत निमग्न–लीन होतो २३. तेराव्या अध्यायांत वर्णन केल्याप्रमाणें ज्यांनीं एकूण छत्तीस तत्त्वें मानली आहेत. त्यांच्या मतें त्या तत्त्वाहून [ जे ब्रह्म ] सदतिसावें आहे, सांख्यमताप्रमाणें चोवीसांहून पंचविसावें [ जे ब्रह्म तत्त्व ] आहे व तिन्हीं गुणांहून निराळें असें स्वभावतःच जें चौथें आहे २४. असें जें सर्वांत उत्तम ब्रह्म तें सर्वरूप असून ज्यांना सहज प्राप्त झालें आहे, अशा ज्ञान्यांच्या कुळांत त्यास सर्वोत्कृष्ट, उपमारहित अशी देहप्राप्ति होते २५. याप्रमाणें पहा कीं, तमोगुण व सत्त्वगुण हे खालीं तोंड करून बसतात–दबतात त्या वेळेस रजोगुण वाढतो २६. व यावेळीं तो रजोगुण शरीररूप गावांत आपली कृति चोहोंकडे प्रगट करून धुमाकूळ घालतो, तेव्हां त्या शरीरांत लक्षणांचा असा उदय होत असतो २७. वावटळ सुटून ती पसरल्यावर ज्याप्रमाणें ती सर्व जिनसा एकत्र करून वर उडवते त्याप्रमाणें इन्द्रियांना विषयामध्यें मोकळीकच असते २८. परस्त्री दृष्टीस पडल्यावर तिचा भोग भोगणें हें निषिद्ध आहे, असें त्यास वाटत नाहीं मग तो शेळीच्या चरण्याप्रमाणें यथेच्छ भोग भोगितो २९. त्याचा लोभ तर इतका वाढतो कीं, स्वेच्छाचारीपणाचाहि धुमाकूळ घालतो, फक्त जी जीं वस्तु याच्या सपाट्यांत सांपडणार नाहीं, तेवढीच काय ती बाजूस उरते २३०. अर्जुना ! हवा तो कोणताहि उद्योग याच्यापुढें आला असतां, तो उद्योग करण्यास हा तयार असतो, माघार अशी घेतच नाहीं ३१. त्याचप्रमाणें एखादें अवाढव्य देऊळ बांधणें किंवा अश्वमेध यज्ञ करणें, अशा अचाट छंदाच्या वृत्ति घेऊन उठतो ३२. शहरेंच वसवावीत किंवा मोठाले तलावच बांधावेत, अथवा विस्तीर्ण अरण्यांत नानाप्रकारच्या बागाच कराव्यात ३३. याप्रमाणें अचाट कृत्यें हातीं घेऊन प्रथम प्रारंभ करतो आणि इहपरलोकप्राप्तीची त्याची इच्छा कधीं कमी होत नाहीं ३४. समुद्र दुर्भर खरा; पण तोहि ज्यापुढें हार घेईल, व तसाच अग्नीहि दुर्भर खरा; पण त्यासहि ज्या दुर्भरतेपुढें तीन कवड्याइतकी देखील किंमत येणार नाहीं. इतक्या या रजोगुणी पुरुषाच्या अभिलाषा प्रबल होऊन बसतात ३५. याच्या वैषयिक इच्छा ही मनाच्याहि पुढें पुढें आशेची धांव घेत असते व सर्व विश्वहि याला पायाखालीं घालण्यास-फिरण्यास पुरेसें होत नाहीं ३६. याप्रमाणें रजोगुण वाढला असतां ही लक्षणें स्पष्ट दिसूं लागतात आणि अशा लक्षणसमुदायाच्या उत्कर्ष स्थितींत जर देहावसान झालें ३७. तर याच सर्व गुणांनी युक्त अशा दुसऱ्या देहांत प्रवेश करतो पण तोहि मनुष्य योनींतच जन्म घेतो ३८. हे पहा एखादा भिकारी सुखानें, चैनीनें जर राजवाड्यांत बसला तर बसेना कां ? तरीपण तेवढ्यानेंच तो राजा होऊं शकेल काय ? ३९. बैलाला जरी श्रीमान् गृहस्थाच्या लग्नाच्या वऱ्हाडाबरोबर [ गाडीला जुंपून ] नेला तरी त्याच्या नशिबीं खरोखर कडबाच खावयाचा असतो. तो चुकत नाहीं २४०. म्हणून ज्या व्यापारांत रात्रं-

१ शरीर खोपट. २ भोग भोगण्याला समर्थ असे. ३ शेजारच्या. ४ पाहूं लागते. ५ महत्तत्त्वादिकांचा क्रम. ६ स्वरूपांत. ७ छत्तीस तत्त्वाला. ८ देहत्रय व अवस्थादित्रय. ९ ब्रह्म. १० वसवून. ११ धामधूम, धुमाकूळ. १२ शरीररूप गांवांत. १३ उठलीं सुटलीं. १४ मोकळीक. १५ पाहिजे तयीं चरूं देतो. १६ आपल्या इच्छा. १७ सांपडत नाहीं. १८ पुढें १९ देवालयें, मंदिर. २० तलाव. २१ प्रारंभ करतो. २२ इहपरलोकांच्या वासनेंत. २३ पराजय, हारी पावे. २४ कवड्या, दमड्या. २५ लोभाविषयीं. २६ अतृप्ति. २७ इच्छा. २८ धांव. २९ घातलें जातें. ३० सिद्ध. ३१ आशा इत्यादिक परिवारासह. ३२ सुखानें. ३३ कडबा. ३४ विश्रांति, विसांवा. ३५ दिवसा.

तैसयाचिये पांतीं। जुंपिजे तो ॥४१॥ कर्मजडाच्या ठायीं । किंबहुना होय देहीं । जो रजोवृत्तीच्या डोहीं । बुडोनि निमे ॥ ४२ ॥ मग तैसाचि पुढती । रजसत्त्ववृत्ती । गिळूनि ये उन्नती । तमोगुण ॥४३॥ तैंचि जियें लिंगें । देहींचीं सबाह्य सांगें । तियें परिस चांगें । श्रोत्रबळें ॥ ४४ ॥ तरी होय ऐसें मन । जैसें रविचंद्रहीन । रात्रीचें का गगन । अंवसेचिये ॥ ४५ ॥ तैसें अंतर अंसोस । होय स्फूर्तिहीन उद्वस । विचाराची भाष । हारपे तैं ॥ ४६ ॥ बुद्धि मेचवेना धोंडीं । हा ठायवरी मवाळें सांडी । आठवो देशधडी । जाला दिसे ॥ ४७ ॥ अविवेकाचेनि माजें । सबाह्य शरीर गाजे । एकलेनि घेपे दीजे । मौढ्य तेथ ॥ ४८ ॥ आचारभंगाचीं हाडें । रुपतीं इंद्रियापुढें । मरे जरी तेणेंकडे । क्रिया जाय ॥४९॥ पैं आणिकही एक दिसे । जे दुष्कृतीं चित्त उल्हासे । आंधारीं देखणें जैसें । डुडुळाचें ॥ २५० ॥ तैसें निषिद्धाचेनि नांवें । भलतेंही भरे हांवे । तियेंविषयीं धांवे । घेती करणें॥५१॥ मदिरा न घेतां डुले । सन्निपातेंवीण बरळे । निष्प्रेमेंचि भुले । पिसें जैसें ॥५२॥ चित्त तरी गेलें आहे । परी उन्मनी ते नोहे । ऐसें माल्हांतिजे मोहें । मांजिरेनि ॥५३॥ किंबहुना ऐसैसीं । इयें चिन्हें तम पोषीं । जैं वाढे आयितीसी । आपुलिया ॥ ५४ ॥ आणि हेंचि होय प्रसंगें । मरणाचें जरी पडे खांगें । तरी तेतुलेनि निगे । तमेंसीं तो ॥ ५५ ॥ राई राईपण बीजीं । सांठवूनियां अंग त्यजी । मग विरूढे तैं दुजी । गोठी आहे ? ॥ ५६ ॥ पैं होऊनि दीपकलिका । येरु आगी विझो कां । कां जेथ लागे तेथ असका । तोचि आहे ॥ ५७ ॥ म्हणौनि तमाचिये लोथें । बांधोनियां संकल्पातें । देह जाय तैं मागौतें । तमाचेचि होय ॥ ५८ ॥ आतां काय येणें बहुवे । जो तमोवृद्धि मृत्यु लाहे । तो पशु कां पक्षी होये । झाड कां कृमी ॥ ५९ ॥

कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम् । रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥

येणेंचि पैं कारणें । जें निपजे सत्त्वगुणें । तें सुकृत ऐसें म्हणे । श्रौत समो ॥ २६० ॥ म्हणौनि तया निर्मळा । सुखज्ञानी सरळा । अपूर्व ये फळा । सात्त्विक तें ॥ ६१ ॥ मग राजसा जिया क्रिया । तया इंद्रावणी फळलिया । जें सुखें चितारूनियां । फळतीं दुःखें ॥ ६२ ॥ कां निंबोळियेचें पिक । वरि

दिवस विसांवा असा मुळींही मिळत नाहीं, अशा लोकांच्या पंक्तीला हा झुंपला जातो [ अशांच्याच कुळांत तो जन्म घेतो ] ४१. फार काय सांगावें ! जो रजोवृत्तीच्या उत्कर्षरूपी डोहांत बुडून मरतो, तो काम्यकर्म करणारांच्या घराण्यांतच जन्म घेतो ४२. त्याप्रमाणें पुढें जेव्हां रजोगुण व सत्त्वगुण यांस नाहींतसे करून तमोगुणवृत्ति उत्कर्षास येते ४३. त्या काळीं देहांत व बाह्यात्कारीं जीं चिन्हें स्पष्ट दिसतात, तीं आतां सांगतो नीट लक्ष देऊन ऐक ४४. त्याचें मन हें अज्ञानरूपी काळोखानें इतकें भरून जातें कीं, जणुं काय चंद्र व सूर्य हे दोन्ही नसलेल्या आमावास्येच्या रात्रीचें आकाशच आहे ४५. त्याचप्रमाणें ज्याचें संपूर्ण अंतःकरण ओसाड, ज्ञानहीन असते, व रिकामें असते त्या अंतःकरणांत सारासार विचाराची गोष्टहि नाहींशी होते ४६. बुद्धि ही जडपणांत दगडालाहि मागें सारते, इतका तिनें मऊपणा टाकलेला असतो आणि स्मृति देशोधडीस लावल्याप्रमाणें दिसते ४७ त्याचे शरीरावर अंतर्बाह्य अविचाराचाच अतिरेक दृष्टीस पडतो व त्याचे देवघेवीचे सर्व व्यापार मूर्खपणाचे असतात ४८. त्याच्या इंद्रियरूपी द्वारांसमोर आचारभ्रष्टतारूपीं हाडें रोंवलेली असतात आणि त्याच्या क्रिया मरेपर्यंत अनाचाराकडेच जात असतात ४९. आणखी एक लक्षण दिसतें तें हें कीं ज्याप्रमाणें घुबडास अंधाऱ्या रात्रींतच स्वच्छ दिसतें, त्याप्रमाणें इतर लोकांपेक्षां वाईट कर्में करण्यांतच त्याच्या चित्ताला फार उल्हास येत असतो २५०. त्याच प्रमाणें निषिद्ध कर्में म्हटलें कीं, वाटेल तीं निषिद्ध कर्में करण्याच्या हांवेच्या भरीस पडतो व त्याची इंद्रियेंहि तिकडेच धांव घेत असतात ५१. हा मद्य न पितांच झोकांड्या खातो, सन्निपात न होतांच बरळूं लागतो आणि प्रेमाशिवाय वेड्याप्रमाणें हा मुलतो ५२. त्याचे चित्त ताळ्यावर नसतेंच; परंतु ती कांहीं उन्मनीअवस्था–समाधि देखील नसते, फक्त उन्मत्तकारक मोहाच्या वाढीनें ज्ञानशून्य, परवश झालेला असतो ५३. फार काय सांगावे ! ! आपल्या सर्व सामुग्रीसह तमोगुण पुरंता वाढला म्हणजे अशीं ही चिन्हें दिसूं लागतात ५४. आणि प्रसंगानुसार अशाच स्थितींत मरण प्राप्त झांले तर दुसऱ्या जन्मींहि तो तेवढ्याच तमोगुणांतच जन्म घेतो ५५. मोहरीचें झाड आपला मोहरीपणा बीजकणिकेंत सांठवून मग जर ती आपले अंग टाकील [ ते मोहरीचें झाड नाहींसे होईल, ] पुनः ते बीज पेरल्यावर त्यापासून जो अंकुर फुटेल, फळें येतील त्यासहि मोहरीपणाविना दुसरी कांहीं गोष्ट आहे काय ? [ तर नाहीं ] ५६. अग्नीमुळें दिव्याची ज्योत पेटल्यावर तो पहिला अग्नि जरी विझला तरी विझेना कां ? कांहीं हरकत नाहीं. कारण, तो ज्या ठिकाणीं लागला असेल त्याठिकाणीं अग्निरूपानें तोच पूर्वींचाच सगळा असतो ५७. म्हणून आपल्या संकल्पाला तमाचें गांठोड्यांत–मोटेंत बांधून जो देह ठेवतो तो देह ठेवल्यावर पुनः जन्म घेणें तो तमोगुणांतच घेतो ५८. फार काय सांगावें ! तमोगुण वाढला असतां जो मृत्यु पावतो, तो पुनः पशु, पक्षी, झाडें किंवा किडे यांचेच जन्म पावतो ५९

**अन्वयार्थ—सुकृतस्य कर्मणः**–पुण्यकर्माचें–**सात्त्विकं निर्मलं फलं**–सात्त्विक, निर्मल फळ मिळतें असें–**आहुः**–सांगतात–**तु**–पण–**रजसः**–रजोगुणाचें–**फलं**–फल–**दुःखं** दुःख आहे–**तमसः फलं**–तमोगुणाचें फल–**अज्ञानम्**–अज्ञान आहे. १६

याच कारणास्तव जें सत्त्वगुणापासून उत्पन्न होतें, तें ' सुकृत '–पुण्यकर्म होय, असें श्रुतिसमुदाय म्हणतो २६०. म्हणून सत्त्वगुणापासून होणाऱ्या निर्मळ सुकृताला सहज सुख व ज्ञान हीं अपूर्व फळें येतात. यास्तव त्यालाच ' सात्त्विक [ सत्कर्म ] फल ' असें म्हणतात ६१. आतां रजोगुणापासून ज्या राजस क्रिया उत्पन्न होतात, त्या पिकलेल्या कडू वृंदावनाप्रमाणें असतात. कारण, त्या क्रिया बाहेरून दिसण्यांतच मात्र सुखानें रंगविलेल्या असून अंतर्यामी अर्थात् केवळ दुःखरूपानें फलद्रूप होतात ६२. अथवा कडुनिंबाच्या निंबोळ्या ज्याप्रमाणें वरून

१ पंक्तीला. २ कर्माविषयीं श्रद्धाळूंच्या. ३ मरतो. ४ चिन्हें. ५ लक्ष देऊन. ६ अंतःकरण. ७ गडद, ओसाड. ८ शून्य, निश्चेतन. ९ उदास. १० बुद्धि. कठीणपणांत दगडालाहि मानीत नाहीं, गणत नाहीं. ११ मृदुपण. १२ घुबडाचें. १३ धांव. १४ इंद्रियें. १५ दारू, मद्य. १६ मनाचा लय जींत होतो ती पांचवी अवस्था. १७ स्वाधीन होतो. १८ माज आणणाऱ्या. १९ सामुग्रीसहित. २० पेर्णे, खळगा, बोलावणें. २१ वाढे. २२ सर्व. २३ गांठोड्यांत, मोटेंत. २४ बहु भाषणानें. २५ सहज. २६ कडू वृंदावनें. २७ दाखवून, रंगवून.

गोड आंत विख । तैसें तें राजस देख । क्रियाफळ ॥ ६३ ॥ तामस कर्म जितुकें । अज्ञान फळेंचि पिके । विषांकुर विखें । जियापरी ॥ ६४ ॥

सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च । प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥

म्हणौनि बा रे अर्जुना । येथ सत्त्वचि हेतु ज्ञाना । जैसा कां दिनमाना । सूर्य हा पैं ॥ ६५ ॥ आणि तैसेंचि हें जाण । लोभासि रज कारण । आपुलें विस्मरण । अद्वैतां जेवीं ॥ ६६ ॥ मोह अज्ञान प्रमादा । ययां मैळेया दोषवृंदा । पुढती पुढती प्रबुद्धा । तमचि मूळ ॥ ६७ ॥ ऐसें विचाराच्या डोळां । तिन्ही गुण वेगवेगळां । दाविले जैसा आंवळा । तळहातींचा ॥ ६८ ॥ तंव रजतमें दोन्हीं । देखिलीं प्रौढपतनीं । सत्त्वावांचूनि नाणीं । ज्ञानाकडे ॥ ६९ ॥ म्हणौनि सात्त्विक वृत्ती । एक जाले गा जन्मव्रतीं । सर्वत्यागें चतुर्थी । भक्ति जैसी ॥ २७० ॥

ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः । जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥ १८ ॥

तैसें सत्त्वाचेनि नेटनाचें । असणें जाणें जयांचें । ते तनुत्यागीं स्वर्गींचे । राय होती ॥ ७१ ॥ इयाचि परी रजें । जिहीं कां जीजे मरिजे । तिहीं मनुष्य होईजे । मृत्युलोकीं ॥ ७२ ॥ तेथ सुखदुःखाचें खिचटें । जेविजें एकेचि ताटें । जेथ इये मरणवाटे । पडिलें नुठी ॥ ७३ ॥ आणि तयाचि स्थिति तमीं । जे वाढोनि निमती भोगक्षमीं । ते घेती नरकभूमी । मूळपत्र ॥ ७४ ॥ एवं वस्तूचिया सत्ता । त्रिगुणासी पंडुसुता । दाविली सकारणता । आघवीचि ॥ ७५ ॥ पैं वस्तु वस्तुत्वें असिकें । तें आपणपें गुणासारिखें । देखोनि कार्यविशेखें । अनुकरे गा ॥ ७६ ॥ जैसें कां स्वप्नींचेनि राजें । जैं परचक्र देखिजे । तैं हारी जैत होइजे । आपणपांचि ॥ ७७ ॥ तैसे मध्योर्ध्व अध । हे जे गुणवृत्तिभेद । ते दृष्टीवांचूनि शुद्ध । वस्तुचि असे ॥ ७८ ॥

नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टाऽनुपश्यति । गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति १९ ॥

परी हे वाहणी असो । तरी तुज आन न दिसो । परिसें तें सांगतसों । मागील गोठी ॥ ७९ ॥ तरी ऐसें जाणिजे । सामर्थ्यें तिन्ही सहजें । होती देहव्याजें । गुणचि हे ॥ २८० ॥ इंधनाचेनि आकारें । अग्नि जैसा अवतरे । कां आंगवे तरुवरें । भूमिरसु ॥ ८१ ॥ नाना दहियाचेनि मिसें । परिणमे दूधाचि जैसें । कां मूर्त होय ऊंसें । गोडी जेवीं ॥ ८२ ॥ तैसें हें स्वांतःकरण । देहचि होती

दिसण्यांत पिवळाधमक, सुंदर असून आंत विषाप्रमाणें कडू असतात, त्याप्रमाणें रजोगुणापासून होणाऱ्या क्रियांची फळें आहेत ६३. ज्याप्रमाणें विषाचा कांदा लावला असतां त्याला विषाचा अंकुर फुटतो, विषच फळ येते, त्याप्रमाणें तमोगुणापासून होणाऱ्या जेवढ्या तामस क्रिया आहेत तेवढ्या अज्ञानमय फळानेंच पिकत असतात ६४.

**अन्वयार्थ**—**सत्त्वात्**–उत्कर्ष पावलेल्या सत्त्वगुणापासून–**ज्ञानं**–ज्ञान–**संजायते**–उत्पन्न होतें–**च**–आणि–**रजसः**–रजोगुणापासून–**लोभ एव**–लोभच उत्पन्न होतो–**तमसः**–तमोगुणापासून–**प्रमादमोहौ**–प्रमाद व मोह–**भवतः**–होतात–**च**–आणि–**अज्ञानम् एव**–अज्ञानच उत्पन्न होतें १७.

म्हणून बाबा अर्जुना! ज्याप्रमाणें दिवसाला सूर्य हाच कारण आहे, त्याप्रमाणें येथें ज्ञानास सत्त्वगुणच कारण आहे ६५. आणि ज्याप्रमाणें अद्वैत[1] चैतन्यास जीवदशा होण्याला आपलें स्वतःचें विस्मरण हेंच कारण आहे, त्याप्रमाणेंच लोभ उत्पन्न होण्यास रजोगुण कारण होतो ६६. हे ज्ञानवंता! मोह, अज्ञान व प्रमाद[2] या मलीन त्रिदोषसमुदायाला वारंवार तमोगुणच कारण आहे ६७. ज्याप्रमाणें तळहातावरील आंवळा एखाद्या मनुष्यास सर्व बाजूंनी प्रत्यक्ष दाखवावा त्याप्रमाणें विचारवंत मनुष्यास विचाराच्या डोळ्यांना तिन्ही गुण वेगवेगळाले [ दिसतील ] असें स्पष्ट करून सांगितलें ६८. तेव्हां रजोगुण व तमोगुण हें दोन्हीं पतनास म्हणजे नरकाचीं मोठीं साधनें मानली आहेत आणि ज्ञानाच्या प्राप्तीकडे सत्त्वगुणावांचून कोणीहि आणीत नाहीं, असें दिसून आले ६९. म्हणून ज्याप्रमाणें इतर भक्तीचा त्याग करून ज्ञानी चौथ्या ज्ञानलक्षणात्मक भक्तीचा स्वीकार करतात, त्याप्रमाणें कोणी आजन्म[3] सात्त्विक वृत्ति धारण करून राहण्याचा निश्चय करतात २७०.

**अन्वयार्थ**—**सत्त्वस्थाः**–सत्त्वगुणवृत्तीमध्यें स्थित असलेले सात्त्विक–**ऊर्ध्वं**–देवादिकांच्या लोकीं–**गच्छन्ति**–जातात.–**राजसः**–राजस लोक–**मध्ये**–मध्यलोकीं म्ह० राजस मनुष्यामध्यें–**तिष्ठन्ति**–राहतात–**जघन्यगुणवृत्तिस्थाः**–शेवटच्या निकृष्ट गुणाच्या वृत्तींत स्थित असलेले–**तामसाः**–तामसवृत्ती जन–**अधः**–अधोलोकीं–**गच्छन्ति**–जातात १८.

अशा प्रकारें जे सात्त्विक वृत्तीचें उत्कर्षांत ज्याचें नेहमीं जगणें वा आचरण असतें व मरणेंहि असतें तें देह ठेवल्यावर स्वर्गांतील राजे होतात ७१. त्याचप्रमाणें, जें राजस वृत्तीनें आचरण करीत जगत असतात व त्यांतच देहत्याग करतात, ते मृत्युलोकीं मनुष्ययोनींत जन्म घेतात ७२. त्या मृत्युलोकांत सुख व दुःख यांची खिचडी देहरूपीं एकाच ताटांत जेवावी लागते, जेथें [ रजोगुणामुळें ] मरणाच्या वाटेंत सांपडलें असतां तेथें कांहीं केल्यानें तो मृत्यु टळत नाहीं ७३. आणि त्याचप्रमाणें तमोगुणाचे भोग भोगल्यानंतर, तमोगुणाच्या उत्कर्षांत जें देह ठेवतात ते देहांतीं नरकभूमीस जाण्याची सनदच मिळवितात ७४. अर्जुना! याप्रमाणें आत्मवस्तूच्या सत्तेनें वाढणारे सत्त्वादिक तिन्ही गुण त्यांच्या लक्षणांसह तुला स्पष्ट सांगितलें ७५. परंतु आत्मवस्तूच्या स्वरूपांत केव्हांहि बदल न होतां ती वस्तुत्वानें पूर्ण असते; तरीपण गुणाच्या उपाधीनें आपणच गुणलक्षणास पाहून त्याच्या कार्य विशेषाप्रमाणें करिते असें दिसतें ७६. आपण राजे झालों आहों व आपल्यावर परचक्र आलें आहे, असें स्वप्नांत पाहणारा मनुष्य ज्याप्रमाणें आपला जय व अपजय आपल्याच ठिकाणीं पाहतो ७७. त्याप्रमाणें उत्तमगति, मध्यमगति व अधोगति हे गतिभेद हे गुणांच्या वृत्तीचे भेदामुळेंच आहेत, ती गुणदृष्टि बाजूस ठेवून पाहिलें असतां आत्मस्वरूप शुद्ध ब्रह्मवस्तूच जशीच्या तशी विशुद्धच आहे ७८.

**अन्वयार्थ**—**यदा**–ज्या वेळीं–**द्रष्टा**–विद्वान्–**गुणेभ्यः अन्यं कर्तारं**–शरीर, इन्द्रियें व विषय यांच्या आकारानें परिणत झालेल्यावर गुणांहून दुसरा कोणी कर्ता–**न अनुपश्यति**–पहात नाहीं–**च**–आणि–**गुणेभ्यः**–गुणांहून–**परम्**–अगदीं विलक्षण असलेल्या साक्षिभूत आत्म्याला–**वेत्ति**–जाणतो–तेव्हां–**सः**–तो विद्वान्–**मद्भावं**–माझ्या ईश्वरभावाला–माझ्या स्वरूपास–**अधिगच्छति**–प्राप्त होतो १९.

पण हा विषय आतां राहूं दे. तूं मात्र एवढें लक्षांत ठेव कीं, आत्मवस्तूवांचून दुसरें कांहीं नाहीं. विषयांतर झाले नसून आतां तुला मागील गुणासंबंधीं विषय पुढें सांगतो तो ऐक ७९. तर तूं असें पक्कें समज कीं, आत्मवस्तूच्या सामर्थ्यानें हे तिन्ही गुण सहज समर्थ होऊन देहाच्या निमित्तानें, रूपानें उत्पन्न होतात २८०. लांकडें पेटल्यावर जसा अग्नि त्या लांकडाच्या आकारासारखा दिसतो, किंवा भूमींतील पाणी व इतर रस हाच जसा झाडांत दृष्टीस पडतो ८१. अथवा दूध विरजलें असतां जसें दह्याच्या आकारानें दूधच परिणाम पावलेलें दिसतें किंवा उंसाच्या आकारानें जशी गोडीच व्यक्त होते ८२.

१ द्वैत भासण्याला. २ प्रमाद–असावधपणा. ३ आजन्म. व्रताचरण करणारे. ४ संन्यासभक्ति. ५विकसितपणाचे वृत्तीनें.

त्रिगुण । म्हणौनि बंधासि कारण । घडे कीर ॥ ८३ ॥ परी चोज हें धनुर्धरा । जे एवढा हा गुंफिरा । मोक्षाचा संसारा । उंणा नोहे ॥ ८४ ॥ त्रिगुण आपुलालेनि धर्मे । देहींचें माघुत साउमें । चाळितांही न खोमें । गुणातीतता ॥ ८५ ॥ ऐसी मुक्ति असे सहज । ते आतां परिसऊं तुज । जे तूं ज्ञानांबुज-। द्विरेफु कीं ॥८६॥ आणि गुणीं गुणाजोगें । चैतन्य नोहे मागें । बोलिलों तें खागें । तेंवींचि हें ॥ ८७ ॥ तरी पार्था जें ऐसें । बोधलेनि जीवें दिसें । स्वप्न कां जैसें । चेइलेनी ॥८८॥ नातरी आपण जळीं। बिंबलों तीरोनी न्याहळी । चळण होतां कल्लोळीं । अनेकधा ॥ ८९ ॥ कां नटलेनि लाघंवें । नटु जैसा न झकवे । तैसें गुणजात देखावें । न होनियां ॥ २९० ॥ पैं ऋतुत्रय आकाशें । धरूनियांहि जैसें । नेदिजेचि येवां वोसें । वेगळेपणा ॥ ९१ ॥ तैसें गुणीं गुणापरौतें । जें आपणपें असे आयितें । तिये अहं बैसे अहंतें । मूळकेचिये ॥ ९२ ॥ पैं तेथूनि मग पाहतां । म्हणे साक्षी मी अकर्ता । हे गुणचि क्रियाजातां । नियोजितें ॥ ९३ ॥ सत्त्व-रजतमांचा । भेदीं पसरु कर्माचा । होत असे तो गुणांचा । विकारु हा ॥ ९४ ॥ ययामाजीं मी ऐसा । वनीं कां वसंतु जैसा । वनलक्ष्मीविलासा । हेतुभूतें ॥ ९५ ॥ कां तारांगणीं लोपावें । सूर्यकांतीं उद्दीपावें । कमळीं विकासावें । जावें तमें ॥ ९६ ॥ ये कोणाचीं काजें कहीं । सवितिया जैसी नाहीं । तैसा अकर्ता मी देहीं । सत्तारूप ॥ ९७ ॥ मी दाऊनि गुण देखे । गुणता हे मियां पोखे । ययाचेनि निःशेखें । उरे तें मी ॥ ९८ ॥ ऐसेनि विवेकें जया । उदो होय धनंजया । ये गुणातीतत्व तया । अर्थपंथें ॥ ९९ ॥

गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् । जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥

आतां निर्गुण असे आणिक । तें तो जाणें अचुक । जे ज्ञानें केलें टीकें । तया-चिवरी ॥ ३०० ॥ किंबहुना पंडुसुता । ऐसी तो मांझी सत्ता । पावे जैसी सरिता । सिंधुत्व गा ॥ १ ॥ नळिकेवरूनि उठिला । जैसा शुक शाखे बैसला । तैसा मूळेंअहंतें वेठिला । तो मी म्हणौनि ॥ २ ॥ अगा अज्ञानाचिया निंदा । जो घोरेंत होता बदबदा तो । स्वस्वरूपीं प्रबुद्धा । चेईला कीं ॥३॥ पैं बुद्धिभेदाचा आरिसा । तया हातोनि पडिला वीरेशा । म्हणौनि प्रति-मुखाभासा । मुकला तो

त्याप्रमाणें अंतःकरणासह स्थूल-सूक्ष्म देहच हे तिन्ही गुण बनतात म्हणून जीवात्म्याच्या बंधास हेच कारण घडते, तो बद्ध होतो ८३. परंतु अर्जुना ! हें केवढें आश्चर्य आहे कीं, सूक्ष्म देहाची व गुणाची ही गुंतागुंत झाली असतांहि ज्ञान्यांना ज्ञानदृष्टीनें मोक्षाच्या व्यवहारास मुक्तस्थितीस कमीपणा येत नाहीं ८४. म्हणजे तिन्ही गुण आपापल्या धर्माप्रमाणें देहाच्याच आश्रयावर त्याच्या मागचे पुढचें संपूर्ण व्यवहार वा कर्में करीत असतांहि ज्ञात्याच्या वा आत्म्याच्या गुणातीततेस कमीपणा येऊन त्यास धक्का लागत नाहीं ८५. अशा प्रकारची आत्म्याची सहज नित्य सिद्ध असणारी मुक्ति ती तुला आतां ऐकवूं, कारण, तूं ज्ञानरूपी कमळावरील भ्रमर आहेस, म्हणजे ऐकण्यास योग्य आहेस ८६. आणि चैतन्य गुणांत असून गुणांप्रमाणें वा गुणाधीन न होतां त्यापासून अलिप्त असतें, असें जें तत्त्व तुला मागें सांगितलें आहे, तें हेंच होय ८७. तर पार्था ! अंतःकरणांत ज्ञानाचा बोध अभिव्यक्त झाल्यावर गुण मिथ्या असून त्या गुणांपासून चैतन्य वेगळें आहे, असें दिसते. जसें जागृत झाल्यावर स्वप्न मिथ्या ठरतें ८८. किंवा नदीच्या कांठीं उभा राहिलेला मनुष्य आपलें प्रतिबिंब पाण्यांत पाहतो व पाणी हालविल्यावर तेंच प्रतिबिंब जसें पुष्कळ ठिकाणीं-त्याची अनेकता दृष्टीस पडतें ८९. कुशल नटवेशधारी आपण घेतलेल्या कोणत्याहि सोंगानें तो स्वतः जसा फसत नाहीं, आपण खरें कोण आहों हें विसरत नाहीं त्याप्रमाणें स्वस्वरूपीं सत्यबुद्धि कायम ठेवून गुणांचा व्यवहार कौतुकानें, साक्षित्वानें नुसता पहावा २९०. ज्याप्रमाणें आकाशाच्या आश्रयावर तिन्ही ऋतु येतात व जातात, परंतु त्याजपासून तें आपल्या अलिप्तपणास कमीपणा येऊं देत नाहीं ९१. गुणाचे व्यवहार चालत असतांनाहि गुणांहून पलीकडे आत्मरूप स्वतः सिद्ध आहे, त्या मूळ आत्मा स्वरूपावरच ज्याचा अहंकार जाऊन बसतो; म्ह० 'मी ब्रह्मरूप आहें' असा त्याचा निश्चय होतो ९२. मग त्या ठिकाणाहून पाहूं लागला असतां तो म्हणतो कीं, मी कर्मकर्ता नसून अकर्ता व फक्त साक्षीभूत आहें आणि सर्व क्रियांना हे गुणच खरें कारण आहेत ९३. सत्त्व, रज व तम या गुणांपासून निरनिराळीं जीं जीं कर्में होतात, तीं आपण न करतां त्याला गुणच कारण आहेत ९४. वनांतील वनशोभेच्या विलासाला जसा वसंतऋतुच कारण असतो, परंतु अलिप्त असतो तसा मी सर्व क्रियांमध्यें साक्षीभूत असूनहि त्याहून अलिप्त आहे ९५. अथवा नक्षत्र समुदायानें लोप पावावें, सूर्यकांत मण्यानें अग्नि उत्पन्न करावा, सूर्यविकासी कमलानें विकसित व्हावें; अंधारानें नाहींसें व्हावें, ह्या सर्व गोष्टी एका सूर्योदयापासून होतात हें खरें ९६. परंतु सूर्याला त्यांत कोणाचीच कारणता नव्हे नुसती दादहि नसते, त्याप्रमाणें माझ्याच सत्तेनें कर्में होत असूनहि मी या देहांत अधिष्ठान सत्तारूप साक्षीभूत मात्र असून अकर्ता आहे ९७. माझ्या प्रकाशानेंच गुण दृष्टीस पडतात, त्यास प्रकाशन करून मीच पाहतों. माझ्याच सत्तेनें गुण वाढतात व गुणांचा निरास झाल्यावर जें कांहीं बाकी उर्वरित राहतें, तेंहि मीच होय ९८. धनंजया ! याप्रमाणें ज्याच्या हृदयांत विवेक–ज्ञानाचा उदय झाला आहे, त्यास अर्थात् श्रेष्ठ गुणातीतपणा उत्तम मार्गानें प्राप्त होतो ९९.

**अन्वयार्थ**––**देही**– देहवान् आत्मा –**देहसमुद्भवान् एतान् त्रीन् गुणान्**–देहाच्या उत्पत्तीचें बीज अशा या तीन गुणांस–**अतीत्य**–उल्लंघून–**जन्म–मृत्यु–जरा–दुःखैः**–जन्म, मृत्यु, जरा व दुःखें–यांजकडून–**विमुक्तः सन्**–सोडला गेलेला असा होत्साता–**अमृतम्**–अमृतभावास–**अश्नुते** प्राप्त होतो–अमृताचा–मोक्षाचा अनुभव घेतो २०.

मग निर्गुण असें जें एक ब्रह्म तें तो अचूकपणें जाणतो कारण ज्ञानाच्या योगानें त्यानें तेथेंच स्थिति केलेली असतें व तेंच ज्ञानाचें भूषणस्थान आहे ३००. फार काय सांगावें ! ! अर्जुना ! नदी ज्याप्रमाणें समुद्रत्वास पावतें, त्याप्रमाणें तो माझीच सत्ता पावतो १. ज्याप्रमाणें राघू नलिकेवरून उठून झाडाच्या दुसऱ्या फांदीवर बसल्यावर बंधरहित होतो, त्याप्रमाणें गुणातीत होतो म्ह० तो देहाहंता–देहतादात्म्य टाकून, गुणतादात्म्य सोडून 'मी ब्रह्म आहें' अशा स्वरूपानें मूळ अहंतेनें तो निश्चित वेष्टिला जातो २. हे ज्ञानवंता ! जो अज्ञानरूप निद्रेंत मोठमोठ्यानें घोरत पडलेला होता तोच स्वस्वरूपाच्या ठिकाणीं असा जागा झाला ३.

---

१ नवल. २ गुंतागुंत. ३ कमी. ५ ज्ञानकमलावरचा भ्रमर. ५ तात्पर्य, प्रमेय. ६ लाटांमध्यें. ७ कौशल्यानें. ८ कमीपणा. ९ सर्व कर्माला. १० योजितात. ११ विस्तार. १२ वनश्रीच्या शोभेला. १३ कारण. १४ सूर्यकांत मण्यानें. १५ प्रकाशावें, पेटावें. १६ पोसली जाते. १७ नाहींसे होण्यानें. १८ उत्तम मार्गानें. १९ भूषण. २० मद्भाव, माझा अधिकार. २१ मूळ अहंतेचे ठिकाण (अहं ब्रह्म) २२ निद्रेनें. २३ मी आणि माझे इत्यादिरूप घोरणें. २४ जागा झाला.

॥ ४ ॥ देहाभिमानाचा वारा । आतां वाजो ठेला वीरा । तैं ऐक्य वीचिसागरां । जीवेशां हें ॥ ५ ॥ म्हणौनि मद्भावेंसी । प्राप्ति पाविजे तेणेंसरिसी । वर्षांतीं आकाशीं । घनंजात जेवीं ॥ ६ ॥ तेवीं मी होऊनि निरुतां । मग देहींचि ये असतां । नांगवे देहसंभूतां । गुणांसि तो ॥ ७ ॥ जैसा भिंगाचेनि घरें । दीपप्रकाशु नोवरे । कां न विझेचि सागरें । वडवानळु ॥ ८ ॥ तैसा आलेगेला गुणांचा । बोधुं नं मैळे तयाचा । तो देहीं जैसा व्योमींचा । चंद्र जळीं ॥ ९ ॥ तिन्ही गुण आपुलालिये प्रौढी । देहीं नाचविती बांगडीं । तो पाहोंही न धाडी । अहंतेतें ॥ ३१० ॥ हा ठायवरी । नेहेंटोनि ठेला अंतरीं । आतां काय वर्ते शरीरीं । हेंही नेणे ॥ ११ ॥ सांडूनि आंगींची खोळी[१२] । सर्प रिगालिया पाताळीं । ते त्वचा कोण सांभाळी । तैसें जालें ॥ १२ ॥ कां सौरभ्यं जीर्णु जैसा । आमोदु मिळोनि जाय आकाशा । माघारा कमळकोशा । नयेचि तो ॥ १३ ॥ पैं स्वरूपसंमरसें । ऐक्य गा जालें तैसें । तेथ किं धर्म हें कैसें । नेणें देह ॥१४॥ म्हणौनि जन्मजरामरण । इत्यादि जे साही गुण । ते देहींचि ठेले कारण । नाहीं तया ॥१५॥ घटाचिया खापरिया । घटभंगीं फेडिलिया । महदाकाश अपैसया । जालेंचि असे ॥ १६ ॥ तैसी देहबुद्धी जाये । जैं आपणपां आंठौ होये । तैं आन कांहीं आहे । तेंवांचुनी ? ॥ १७ ॥ येणें थोर बोधलेपणें । तयासि गा देहीं असणें । म्हणूनि तो मी[१८] म्हणें । गुणातीत ॥ १८ ॥ यया देवाचिया बोला । पार्थु अति सुखावला । मेघें संबोखिलें । मोरु जैसा ॥ १९ ॥

अर्जुन उवाच :—

**कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो । किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥ २१ ॥**

तेणें तोषें वीर पुसे । जी कोण्ही चिन्हीं तो दिसे । जयामाजीं वसे । ऐसा बोधु ॥ ३२० ॥ तो निर्गुण काय आचरे । कैसेनि गुण निस्तरे । हें सांगिजो माहेरें । कृपेचेनि ॥ २१ ॥ यया अर्जुनाचिया प्रश्ना । तो षड्गुणांचा राणा । परिहारुं आकर्णा । बोलतु असे ॥ २२ ॥ म्हणे पार्था तुझी नैवाई । हें येतुलेंचि पुससी काई । तें[२१] नामचि तया पाहीं । सत्य लटिकें ॥ २३ ॥ गुणातीत जया नांवें । तो गुणाधीन तरी नव्हे । ना होय तरी नांगवे । गुणां यया ॥ २४ ॥ परी अधीन कां नांगवें ।

हे वध अर्जुना, बुद्धिभेदरूपी हाच कोणी एक आरसा तो त्याच्या हातून खालीं पडून फुटल्यामुळें त्यांत दिसणाऱ्या जीवपणाच्या प्रतिबिंबाला [ व सुखदुःखाला ] तो मुकला ४. मग हे वीरा देहाहंकाराचा वारा वहावयाचा बंद झाल्यामुळें त्याच्यावरील जीव व ईश एतद्रूपी लाटांचे अधिष्ठान ब्रह्मचैतन्यरूपी सागराशीं ऐक्य होते ५. म्हणून असे होण्याबरोबर त्यांना मद्रूपतेची प्राप्ति होते ज्याप्रमाणें वर्षाकाळाचे अखेरीस आकाशांत उत्पन्न होणारे ढग आकाशांतच लय पावतात, पर्जन्यवृष्टि करीत नाहींत ६. त्याप्रमाणें तत्त्वतः मद्रूप झाल्यावर, तो जरी देहांत असला तरी देहारंभक गुणांच्या तावडींत सांपडून लिप्त होत नाहीं ७. ज्याप्रमाणें दिवा भिंगाच्या घरांत ठेवला असतां त्याचा उजेड आवरत नाहीं, बाहेर येतोच अथवा वडवानल हा समुद्राच्या पाण्यानेंहि विझला जातच नाहीं ८. याप्रमाणें गुणांच्या येण्याजाण्यानें त्याचें शुद्ध ज्ञान मुळींहि मलीन होत नाहीं; आणि आकाशांतील चंद्राचें पाण्यांत बिंब पडलें, असें वाटले तरी तो तत्त्वतः जसा पाण्यापासून वेगळाच असतो, त्याप्रमाणें तो देहांत असूनहि गुणांशीं तादात्म्य नसल्यामुळें तो बद्ध होत नाहीं ९. तिन्ही गुण त्याच्या देहांत आपापल्या इच्छेप्रमाणें, सामर्थ्यानें अनेक चेष्टा करून धुमाकूळ घालीत असले तरी आपल्या अहंतेला तो त्यांकडे ढुंकूनहि पाहण्यास धाडीत नाहीं ३१०. इतक्या स्थितीपर्यंत तो अंतर्यामी दृढनिश्चयानें राहत असतो. अशा स्थितींत तें शरीर व्यवहार करितें, हेंहि तो जाणत नाहीं ११. साप आपल्या अंगावरची कांत टाकून बिळांत निघून जातो, त्यावेळेस जसें आपल्या कांतीला कोण सांभाळील ! इकडे लक्षहि देत नाहीं; तसें ज्ञानी आपल्या शरीराविषयीं निष्काळजी असतात १२. अथवा कमल उमलल्यावर त्याचा परिपक्व झालेला सुवास आकाशांत निघून मिळून जातो आणि तो पुनः ज्याप्रमाणें माघारा कमलकोशांकडे येतच नाहीं, १३. त्याप्रमाणें अर्जुना ! ब्रह्मस्वरूपांत ऐक्य झाल्यावर तशीच स्थिति होते. मग हा देह कोणत्या धर्मानें वागतो, व कसा काय आहे हें तो ज्ञानी जाणतच नाहीं १४. म्हणून जन्म, जरा, मरण, इत्यादि जे देहाचे सहा गुण, त्याचा संबंध त्याच्याच ठिकाणीं असतो; त्याचा ज्ञान्याच्या आत्मस्वरूपाशीं कांहीं एक संबंध नसतो १५. घट फुटून त्याच्या ठिकऱ्या-खापऱ्या झाल्या व त्या खापऱ्या फेंकून दिल्या म्हणजे त्यांतील आकाश [ घटाकाश ] जसें सहजच महदाकाशरूप होते १६. तशी देहबुद्धि नाहींशी झाल्यावर जेव्हां आपल्याला आपल्या आत्मस्वरूपाची आठवण होते, तेव्हां अशा स्थितींत आत्मस्वरूपाशिवाय दुसरे असें कांहीं तरी आहे काय ! १७. अशा थोर बोध संपन्नतेनें युक्त असें, त्याचें या देहांत राहणें असते म्ह० तो जरी देहधारी असला तरी तत्त्वतः तो गुणातीत आहे, असे मी म्हणतो १८. मेघाच्या गर्जनेनें पाचारिलेला मोर जसा सुखावला जातो तसा श्रीकृष्णाच्या भाषणानें पार्थ फारच संतुष्ट झाला १९.

**अन्वयार्थ**--**हे प्रभो**-हे प्रभो !-**कैः लिङ्गैः**-कोणत्या लिंगांनीं-**एतान् त्रीन् गुणान्**-या तीन गुणांना-**अतीतः**-उल्लंघिलेला असा हा पुरुष-**भवति**-होतो ! **किमाचारः**-याचा आचार कसा असतो !-**च**-आणि-**एतान् त्रीन् गुणान्**-या तीन गुणांना-तो-**कथं**-कोणत्या प्रकारें-**अतिवर्तते**-उल्लंघितो ! २१.

अशा हर्षयुक्त अंतःकरणानें तो वीर अर्जुन श्रीकृष्णास म्हणतो "देवा ! ज्याच्या अंतःकरणांत असा बोध वास्तव्य करून आहे तो कोणत्या लक्षणांनीं ओळखला जातो ! ३२०. तो गुणातीत कशा रीतीनें आचरण करतो ! व तो गुणांचें निवारण कसें करतो ! निरस्तगुण कसा होतो ! देवा, आपण कृपेचें माहेरघर आहांत तेव्हां हे सर्व मला स्पष्ट करून सांगावें" २१. या अर्जुनाच्या प्रश्नास षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीकृष्णपरमात्मा काय उत्तर देतात, ते ऐका २२. श्रीभगवान् म्हणाले, अर्जुना ! तुझी प्रश्न करण्याची पद्धत अगदीं नवलाचीच वाटते [ गुणातीत काय आचरतो व निरस्तगुण कसा होतो ? ] हें एवढेच विचारतोस काय ! 'गुणातीत' हे त्याचें नांव वा लक्षण उच्चारल्याबरोबर हे 'सत्य' व 'लटिके' असें उभय एकत्र आहेत, असें हे विचारणें होय. २३. कारण ज्याला 'गुणातीत' असें म्हणतात, तो गुणाधीन खास नसतोच अथवा तो जरी गुणांत रहाटत आहे असा दिसत असला तरी तो गुणांच्या सपाट्यांत, तादात्म्य भ्रांतींत सांपडत नाहीं हें खास २४.

१ बंद पडला. २ तरंगाला व समुद्राला. ३ मेघसमूह. ४ खरा. ५ आवरत नाहीं. ६ येण्याजाण्यानें. ७ शुद्ध ज्ञान. ८ मिळत नाहीं. ९ आकाशांतील. १० सोंगें. ११ निश्चयानें १२ कांत. १३ वाळून सुगंध नाहींसा झालेल्या वस्तूंतील. १४ सुगंध. १५ स्वरूपांत मिसळल्यानें. १६ आपोआप. १७ स्मरण, आठवण. १८ श्रीकृष्ण. १९ तृप्त केला, पाचारिला. २० निवारितो. २१ उत्तर. २२ ऐका. २३ नवल. २४ गुणातीत हें नांव. २५ सांपडत नाहीं.

हेंचि कैसेनि जाणावें । गुणांचिये रवरवे- । माजीं असतां ॥ २५ ॥ हा संदेह जरी वाहसी । तरी सुखें पुसों लाहसी । परिस आतां तयासी । रूप करूं ॥ २६ ॥

श्रीभगवानुवाच :—

प्रकाशं च प्रवृत्तिंच मोहमेव च पांडव । न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति ॥ २२ ॥

तरी रजाचेनि माजें । देहीं कर्माचें आणोजें । प्रवृत्ति जैं घेईजे । वेंटाळुनि ॥२७॥ तैं मीचि कां कर्मठ । ऐसा न ये श्रीमाठ । कां दरिद्रालिये बुद्धि वीट । तोही नाहीं ॥२८॥ अथवा सत्त्वेंचि अधिकें । जैं सर्वेंद्रियीं ज्ञान फांके । तैं सुविद्यता तोखें । उभजेही ना ॥ २९ ॥ कां वाढिन्नलेनि तमें । न गिळिजेचि मोहभ्रमें । तैं अज्ञानत्वें न श्रमे । घेणेंही नाहीं ॥ ३३० ॥ पैं मोहाच्या अवसरीं । ज्ञानाची चाड न धरी । ज्ञानें कर्में नादरी । होतां न दुःखी ॥ ३१ ॥ सायंप्रातर्मध्यान्हा । या तिन्ही काळांची गणना । नाहीं जेवीं तपना । तैसा असे ॥ ३२ ॥ तया वेगळाचि काय प्रकाशें । ज्ञानित्व यावें असें । कायि जळार्णव पाउसें । साजा होय ? ॥ ३३ ॥ ना प्रवर्तलेनि कर्में । कर्मठत्व तयां कां गमे । सांगें हिमवंतु हिमें । कांपे कायी ? ॥३४॥ नातरी मोह आलिया । काइ पां ज्ञाना मुकिजेल तया । हो मा आगीतें उन्हाळेया । जाळवत असे ? ॥ ३५ ॥

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते । गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते॥ २३ ॥

तैसें गुणागुणकार्य हें । आघवेंचि आपण आहे । म्हणौनि एकेका नोहे । तडातोडी ॥ ३६ ॥ येवढे गा प्रतीती । तो देहा आलासे वस्ती । वाटे जातां गुंती- । माजीं जैसा ॥ ३७ ॥ तो जिणता ना हारवी । तैसा गुण नव्हे ना करवी । जैसी कां श्रोणवी । संग्रामींची ॥ ३८ ॥ कां शरीराआंतील प्राणु । घरीं आतिथ्याचा ब्राह्मणु । नाना चोहटांचा स्थाणु । उदासु जैसा ॥ ३९ ॥ आणि गुणाचा यावाजावा । ढळे चळे ना पांडवा । मृगजळाचा हेलावा । मेरु जैसा ॥ ३४० ॥ हें बहुत कायि बोलिजे । व्योम वारेनि न वचिजे । कां सूर्य ना गिळिजे । अंधकारें ? ॥ ४१ ॥ स्वप्न कां गा जियापरी । जागतयातें न सिंतरी । गुणीं तैसा अवधारीं । न बंधिजे तो ॥ ४२ ॥ गुणांसि कीर नातुडे । परी दुरूनि जैं पाहे कोडें । तैं गुणदोष सायिखेंडें । सभ्यु जैसा ॥ ४३ ॥ सत्कर्में सात्विकीं । रज तें रजोविषयकीं । तम मोहादिकीं । वर्तत असे ॥ ४४ ॥

पण तो गुणातीत या गुणांच्या-संबंधांत हालचालींत वावरत असतां गुणांच्या आधीन आहे, किंवा गुणांच्या आधीन नाहीं हे कसें जाणावें ! २५. हाच विचारण्याचा आशय वा हाच जर तुझ्या मनांत संशय असेल तर तो प्रश्न खुशाल विचारतां येईल. त्याचें उत्तर अर्थात् त्याचीं लक्षणें सांगतों, ऐक २६.

**अन्वयार्थ—हे पांडव-हे** अर्जुना !-**प्रकाशं**-सत्त्वगुणाचें कार्य ज्ञान व सुख-**प्रवृत्ति**-रजोगुणाचें कार्य लोभ, दुःख वगैरे-**च मोहम् एव च**-आणि तमोगुणाचें कार्य अविवेक वगैरे हीं - **संप्रवृत्तानि** - प्रवृत्त-झाली असतां त्यांचा-**न द्वेष्टि**-करीत नाहीं व-**निवृत्तानि** निवृत्ति झाली असतां त्यांची-**न कांक्षति**-आकांक्षा करीत नाहीं २२.

तर जेव्हां रजोगुणाचा जोर होऊन देहांत कर्मांचे अंकुर फुटून तो प्रवृत्तिमार्गांत गढून गेला आहे, असें दिसते २७. तेव्हां मीच कर्मठ-कर्म करणारा आहें, असा सत्यत्वानें अभिमान-मद ज्याला उत्पन्न होत नाहीं, अथवा कर्म नाहींसें झाल्यावर वा करण्याचे राहिल्यावर त्याच्या बुद्धीस त्याचा खेद तोही वाटत नाहीं २८. किंवा सत्त्वगुणाच्या आधिक्यानें ज्या वेळेस सर्व इंद्रियांत ज्ञान फांकतें, त्यावेळेस माझ्यासारखा दुसरा कोणीहि विद्वान् नाहीं, अशा संतोषांत तो गढून, चढून जात नाहीं २९. अथवा तमोगुण वाढल्यावर जो मोह व भ्रम याजकडून ग्रासला जात नाहीं व अज्ञानामुळें मनांत खेदहि बाळगून दुःखी कष्टी होत नाहीं ३३०. किंवा मोह उत्पन्न झाला असतां त्यावेळीं ज्ञानाची इच्छा करीत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानवान् झाला तरी त्यामुळें मुद्दाम कर्मांचा आदर, प्रारंभहि करीत नाहीं व सहज हातून कर्म घडलें असतां दुःखहि मानीत नाहीं ३१. प्रातःकाळ, माध्यान्हकाळ व सायंकाळ या तिन्ही कालाची सूर्याला जशी गणना नसते, तसा तो गुणातीत देहावर उत्पन्न होणाऱ्या गुणांकडे लक्ष देत नाहीं ३२. असा जो ज्ञानी आहे, त्याला आत्मभिन्न दुसऱ्याच्या-प्रकाशानें-ज्ञानानें ज्ञानपणा यावयाचा असतो काय ! [ तर नाहीं-कारण तो चालते ज्ञानाचें बिंबच असतो ] ३३. अथवा तो कर्म करण्यांत प्रवृत्त झाला असतां मी हे कर्म करणारा आहे, असा कर्मठत्वाचा अभिमान होईल काय ! हें पहा, हिमालय पर्वत आपल्यास थंडी होईल म्हणून भीतीनें थरथर कांपतो काय ! ३४. अथवा समोर मोह उत्पन्न झाला असतां त्याचें ज्ञान नष्ट होईल का ! हें बघ ! अग्नि हा उन्हाळ्याकडून जळला जातो काय ! ३५.

**अन्वयार्थ—उदासीनवत्**-उदासीनाप्रमाणें-**आसीनः**-राहणारा-**यः**-जो **गुणैः**-गुणाकडून-**न विचाल्यते**-विशेषेंकरून विवेकदर्शनावस्थेपासून ढळविला जात नाहीं-आत्मतत्त्वापासून दूर केला जात नाहीं, तर—**यः**- जो-**गुणाः**-शरीर व इंद्रियें यांच्या आकारानें परिणत झालेले गुण-**वर्तन्ते**-एकमेकांमध्यें राहतात-**इति एव**-अशा प्रकारेंच-असे समजूनच-**अवतिष्ठति**-स्वरूपांत राहतो-**न इङ्गते**-तत्त्वापासून चलन पावत नाहीं २३.

त्याचप्रमाणें गुण व गुणकार्य शरीरादि सर्व आत्मदृष्टीनें आपणच असल्यामुळें तें एकेक गुण आलें किंवा गेलें तरी त्यापासून सुख किंवा दुःख होऊन त्याचे चित्त डळमळित होत नाहीं ३६. एवढी ज्याची अनुभूति दृढ स्वरूपाची असते, तो वाटसरू वाटेनें जातांना संध्याकाळ वगैरे होऊन प्रतिबंध झाला असतां मुक्कामापुरता उतरतो, त्याप्रमाणें उदासीनवृत्तीनें देहांत वसतीसाठीं म्हणून आलेला असतो ३७. ज्याप्रमाणें रणाची भूमि ही कोणाचाहि जय अथवा अपजय झाला असतां तज्जन्य हर्षशोकापासून अलिप्त असते, त्याप्रमाणें हा गुणांना जिंकणारा नसतो, गुणांकडून हरणारा नसतो व तो गुणस्वरूप नसतो व त्या गुणाकडून कांहीं करवीतहि नसतो ३८. किंवा देहांतील प्राण हा [ रक्षणापुरते मिष्ट किंवा कसलेंहि अन्न घातलें असतां त्याची चव न पाहतां ] जसा उदास असतो किंवा चव्हाट्यावरील खांब जसा कोणीहि आला गेला तरीहि तो उदासीन असतो ३९. अर्जुना ! मृगजलाच्या हेलकाव्यांनीं मेरु पर्वत जसा-यत्किंचितहि चळत-ढळत नाहीं, तसा जो मिथ्या गुणांच्या येण्याजाण्यानें अंतर्यामी मुळींहि चळत-ढळत, गडबडत नाहीं ३४०. हे फार बोलून काय करावयाचे ! असें पहा कीं, आकाशांत जरी वायु नेहमीं फिरत असतो, तरी तें वाऱ्यानें कधींहि हालत नाहीं किंवा सूर्य हा अंधःकाराकडून कधींहि गिळला जात नाहीं ४१. ज्याप्रमाणें जागृतावस्थेंत असलेल्या मनुष्यास स्वप्न भ्रमांत पडून फसवीत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानवान् पुरुष गुणविकारांकडून बांधला जात नाहीं ४२. त्याप्रमाणें गुणदोषांचे उत्कर्षापकर्षात्मक खेळ जो गुणातीत-दुरून-साक्षीरूपानें कौतुकानें-रागद्वेष-तादात्म्यरहित होऊन पाहतो ४३. मग सात्त्विक गुण सत्कर्मांचेंच आचरण-करतो रजोगुण विषयांची आशा ठेवून कर्में करतो, किंवा तमोगुण मोहादिक व तामस कर्म उत्पन्न करतो [ तरी त्यापासून तो अतीत, असंग असतो ] ४४.

परिस तयाचिया गा सत्ता । होती गुणाक्रिया समस्ता । हें फुडें जांणे सविता । लौकिकीं जेवीं ॥ ४५ ॥ समुद्रचि भरती । सोमकांतचि द्रवती । कुमुदें विकासती । चंद्रु तो उगा ॥ ४६ ॥ कां वाराचि वाजे विझे । गगनें निश्चळ असिजे । तैसा गुणाचिये गजबजे । डोलेना जो ॥४७॥ अर्जुना येणें लक्षणें । तो गुणातीतु जाणणें । परिस आतां आचरणें । तयाचीं जीं ॥ ४८ ॥

समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः । तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः २४ ॥

तरी वस्त्रासि पाठीं पोटीं । नाहीं सुतावांचूनि किरीटी । ऐसें सुये दिठी । चराचर मद्रूपें ॥ ४९ ॥ म्हणौनि सुखदुःखासरिसें । कांटाळें आचरे ऐसें । रिपुभक्तां जैसें । हरीचें देणें ॥ ३५० ॥ एऱ्हवीं तरी सहजें । सुखदुःख तैंचि सेविजे । देहजळीं होईजे । मासोळी जैं ॥ ५१ ॥ आतां तें तंव तेणें सांडिलें । आहे स्वस्वरूपेंसीचि मांडिलें । सस्यांतीं निवाडिलें । बीज जैसें ॥ ५२ ॥ कां वोघ सांडूनि गांग । रिघोनि समुद्राचें आंग । निस्तरली लगबग । खळाळाची ॥ ५३ ॥ तेवीं आपणपांचि जया । वस्ती जाली गा धनंजया । तया देहीं अपैसया । सुख तैसें दुःख ॥५४॥ रात्रि तैसें पाहलें । हें धारणा जेवीं एक जालें । आत्माराम देहीं आतलें । द्वंद्व तैसें ॥ ५५ ॥ पैं निद्रिताचेनि आंगेशीं । साप तैशी उर्वशी । तेवीं स्वरूपस्था सारिशीं । देहीं द्वंद्वें ॥ ५६ ॥ म्हणौनि तयाच्या ठायीं । शेणा सोनया विशेष नाहीं । रत्ना गुंडेया कांहीं । नेणिजे भेदु ॥ ५७ ॥ घरा येवो पां स्वर्ग । कां वरिपडो वाघ । परी आत्मबुद्धीसि भंग । कदा नोहे ॥ ५८ ॥ निवटलें न उपवडे । जळिनलें न विरूढे । साम्यबुद्धि न मोडे । तयापरी ॥ ५९ ॥ हा ब्रह्मा ऐसेंनि स्तविजो । कां नीच म्हणानि निंदिजो । परी नेणें जळों विझों । राखोंडी जैसी ॥ ३६० ॥ तैसी निंदा आणि स्तुति । नये कोण्हेचि व्यक्ती । नाहीं अंधारें कां वांती । सूर्या घरीं ॥ ६१ ॥

मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः । सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥

ईश्वर म्हणौनि पूजिला । कां चोरु म्हणौनि गांजिला । वृषगजीं वेढिला । केला रावो ॥ ६२ ॥ कां सुहृद पासीं आले । अथवा वैरी वरपंडे जाले । परी नेणें राती पाहालें । तेज जेवीं ॥ ६३ ॥ साही ऋतु येतां आकाशें । लिंपिजेचि ना जैसें ।

पहा की, जशा सर्वेच्या सर्व लोकांचे क्रिया-व्यवहार सूर्याच्या प्रकाश-सत्तेनें चालतात [ पण त्याहून तो अलिप्त असतो. ] आपल्याच सत्तेनें या गुणांच्या चेष्टा होत आहेत असें जो समजतो ४५. समुद्रासच भरती येते, सोमकांत मण्यासच पाझर सुटतो व चंद्रविकासी कमलेंच उमलतात, ह्या क्रिया जरी चंद्रापासून होतात हे खरे; तरीपण चंद्र जसा अलिप्त, क्रियारहित असतो ४६. किंवा गगनांत वाराच पुष्कळ वाहतो अथवा वाहण्याचे थांबतो तथापि आकाश ज्याप्रमाणें निश्चळ असते, त्याप्रमाणें गुणांनीं जरीं पुष्कळ गडबड केली तरी त्यांच्या सपाट्यांत न सांपडता तो निश्चलच असतो ४७. अर्जुना ! या गुणातीतांच्या लक्षणांनी तो गुणातीत पुरुष ओळखावा. आतां त्याची जी आचरणपद्धति ती कशी असतें तें सांगतों ऐक ४८.

**अन्वयार्थ--समदुःखसुखः**-ज्याला सुख व दुःख सम आहे-**स्वस्थः**-जो स्वात्म्यामध्यें स्थित-प्रसन्न आहे **समलोष्टाश्मकांचनः**-मातीचें ढेंकूळ, दगड व सोनें ज्याला सम आहे-**तुल्यप्रियाप्रियः**-ज्याला प्रिय व अप्रिय समान आहे-**धीरः**-धीमान्-**तुल्यनिंदात्मसंस्तुतिः**-ज्याला निंदा व आत्मस्तुति तुल्य आहे २४.

अर्जुना ! ज्याप्रमाणें वस्त्राच्या आंत बाहेर सुतावांचून दुसरें कांहींहि नसते. त्याप्रमाणें जो मद्रूप झाला आहे. म्हणून सर्व चराचरात्मक विश्व मत्स्वरूपच आहे असें तो पाहतो ४९. म्हणून ज्याप्रमाणें श्रीहरीचे [मुक्ति] देणे हे आपल्या शत्रूंस व भक्तांस सारखेच असते त्याप्रमाणें सुख व दुःख प्राप्त झालें असतां ज्याचें मन ताजव्या-प्रमाणें समतोल राहतें ३५०. बाकी देहरूपी जलांत मनरूपी मासोळी होऊन खेळावें [ पूर्ण देहतादात्म्य धारण करावें ] म्हणजे मगच सुख व दुःखें भोगावी लागतात ५१. जसे शेतांतील परिपक्व धान्याची मळणी केली असतां शेवटीं भरीव बीजकण हें कोंड्यापासून अगदीं वेगळें काढावेत त्याप्रमाणें आतां तो देहाभिमान, ते तादात्म्य त्यानें टाकले आहे व तो आपल्या आत्मरूपानें चिरस्थिर होऊन राहिला आहे ५२. किंवा गंगा आपला ओघ प्रवाह सोडून समुद्रांत प्रवेश करून मिसळून गेल्यावर जशी तिची खळखळ वाहण्याची लगबग आपोआप बंद होते ५३. त्याप्रमाणें अर्जुना ! ज्याची आपल्या स्वरूपांत निरंतरची वस्ती झाली तो देहांत असला तरी तो सहजच सुखदुःख समान मानितो ५४. घराच्या खांबास ज्याप्रमाणें रात्र किंवा दिवस उजाडणें हीं दोन्हीं सारखीच असतात त्याप्रमाणें आत्मस्वरूपीं रममाण झालेल्या गुणातीत पुरुषास देहांत प्राप्त होणारी सुख व दुःख हीं दोन्हीं सारखीच आहेत ५५. ज्या-प्रमाणें निजलेल्या मनुष्याचे एका अंगास साप व दुसऱ्या अंगास उर्वशी जरी असली तरी त्या दोघांची [ अनुकूल प्रतिकूल ज्ञानाच्या अभावीं ] सारखीच योग्यता असते, त्याप्रमाणें जो आत्मरूपीं निरंतरचा राहणारा [ तद्रूप ] झाला आहे, त्यांस देहांत सुख व दुःख हीं द्वंद्वें सारखींच असतात ५६. म्हणून त्याच्या ठिकाणीं शेण व सोनें यांत विशेषता अशी नाहीं तर त्याची सारखीच किंमत आहे, आणि रत्न व धोंडा यांतहि तो कांहीं भेद जाणत नाहीं ५७. स्वर्गसुख त्याच्या घरीं चालत येवो, अथवा त्यास खाण्याकरितां वाघ त्याच्या अंगावर धांवून येवो; परंतु त्याच्या आत्मस्वरूपाच्या बुद्धीस केव्हांहि भंग होत नाहीं ५८. मेलेला मनुष्य जसा जिवंत होत नाहीं आणि जळालेलें बीज पुनः रुजत वा उगवत नाहीं, त्याप्रमाणें त्याची ब्रह्मात्मैक्य स्वरूपाविषयीं जी साम्यबुद्धि झाली आहे, तिचा कशानेंहि भंग होत नाहीं ५९. 'हा ब्रह्मदेव आहे' असें म्हणून त्याची कोणी स्तुति करो, किंवा 'नीच आहे' म्हणून कोणी निंदा करो ! परंतु राख झाल्यावर तिला जशी जळण्याची अगर विझण्याची भीति रहात नाहीं ३६०. त्याप्रमाणें निंदा किंवा स्तुति केली असतां त्यापासून त्याला विषाद अथवा हर्ष उत्पन्न होत नाहीं. हें पहा ! सूर्याच्या घरीं अंधार किंवा दिवा बत्ती यांची गोष्टच बोलण्यास नको. कारण, तो सदोदित स्वयंप्रकाशच आहे ६१.

**अन्वयार्थ--मानापमानयोः तुल्यः**-मान व अपमान याविषयीं तुल्य-त्यांना सम मानणारा-**मित्रारिपक्षयोः**-**तुल्यः**-मित्रपक्ष व शत्रुपक्ष या दोन्ही पक्षीं समान-**सर्वारंभ-परित्यागी**-सर्व कर्मांचा सर्व प्रकारें त्याग करणारा असा जो पुरुष असतो-**सः**-तो-**गुणातीतः**--गुणातीत-**उच्यते**-म्हटला जातो २५.

अरे ! ज्ञात्याची कोणी ईश्वर समजून पूजा केली, अथवा तो चोर आहे असे समजून त्याला छळलें. किंवा हत्ती, घोडे, रथ वगैरेंनीं वेष्टित करून त्याला राजा बनविला ६२. अथवा आप्त इष्ट जवळ येऊन बसले किंवा वैरी अंगाजवळ येऊन प्राप्त झाले तरीपण तो त्याला जाणत नाहीं ज्याप्रमाणें सूर्याचे तेजास रात्र किंवा दिवस मुळीच माहींत नसतात ६३. आकाशावर सहा ऋतु

१ समज, जाण. २ लोकव्यवहाराला. ३ चंद्रविकासी कमलें. ४ पडतो, बंद होतो. ५ घालतो. ६ दृष्टि.

तेवीं वैषम्य मानसे । जाणिजेना ॥ ६४ ॥ आणीकही एकु पाहीं । आचारु तयाच्या ठायीं । तरी व्यापारासि नाहीं । जालें दिसे ॥ ६५ ॥ सर्वारंभा उटकलें । प्रवृत्तीचें तेथ मावळलें । जळती गा कर्मफळें । ते तो आगी ॥ ६६ ॥ दृष्टोदृष्टाचेनि नांवें । भावचि जीवीं नुगवे । सेवी जें कां स्वभावें । पैठें होय ॥ ६७ ॥ सुखे ना शिणे । पाषाणु कां जेणें मानें । तैसीं सांडीमांडी मनें । वर्जिली असे ॥ ६८ ॥ आतां किती हा विस्तारु । जाणें ऐसा आचारु । जयातें तोचि साचारु । गुणातीतु ॥ ६९ ॥ गुणांतें अतिक्रमणें । घडे उपायें जेणें । तो आतां आईक म्हणे । श्रीकृष्णनाथु ॥ ३७० ॥

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते । स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥

तरी व्यभिचाररहित चित्तें । भक्तियोगें मातें । सेवी तो गुणातें । जाकळूं शके ॥ ७१ ॥ तरी कोण मी कैसी भक्ती । अव्यभिचारा काय व्यक्ती । हे आघवीचि निरुती । होआवी लागे ॥ ७२ ॥ तरी पार्था परियेसा । मी तंव येथ ऐसा । रत्नीं किळौवो जैसा । रत्नचि कीं तो ॥ ७३ ॥ कां द्रवपणचि नीर । अवकाशचि अंबर । गोडी तेचि साखर । आन नाहीं ॥ ७४ ॥ वन्हि तेचि ज्वाळ । दळांचि नांव कमळ । रुंख तेंचि डोळ- । फळादिक ॥ ७५ ॥ अगा हिम जें आकर्षलें । तेंचि हिमवंत जेवीं जालें । नाना दूध मुरालें । तेंचि दहीं ॥ ७६ ॥ तैसें विश्व येणें नांवें । हें मीचि पैं आघवें । घेईं चंद्रबिंब सोलावें । न लगे जेवीं ॥ ७७ ॥ घृताचें थिजलेंपण । न मोडितां घृतचि जाण । कां नाटितां कांकण । सोनेंचि तें ॥ ७८ ॥ न उकलितां पटु । तंतुचि असे स्पष्टु । न विरवितां घटु । मृत्तिका जेवीं ॥ ७९ ॥ म्हणौनि विश्वपण जावें । मग तैं मातें घेयावें । तैसा नव्हे आघवें । सकटचि मी ॥ ३८० ॥ ऐसेनि मातें जाणिजे । ते अव्यभिचारी भक्ति म्हणिजे । येथ भेद कांहीं देखिजे । तरी व्यभिचारु तो ॥ ८१ ॥ याकारणें भेदातें । सांडूनि अभेदें चित्तें । आपणा सकट मातें । जाणावें गा ॥ ८२ ॥ पार्था सोनियाची टिका । सोनियासी लागली देखा । तैसें आपणपें आणिका । मानावें ना ॥ ८३ ॥ तेजाचा तेजौनि निघाला । परी तेजींचि असे लागला । तया रश्मी ऐसा

जरी येऊन गेले तरी तें आकाश ज्याप्रमाणें त्याच्याकडून लिप्त होत नसतें त्याप्रमाणें त्याच्या मनानें वा बुद्धीनें विषमता ही कधींहि जाणत नसतो ६४. त्याचे ठिकाणीं आणखी एक आचार असल्याचा दिसतो कीं, त्याचे ठिकाणीं यच्चयावत् कर्म व्यापार अजिबात नाहीं, असें दिसतें ६५. तो कोणतीहि गोष्ट आरंभीत नाहीं, प्रवृत्तिमार्गापासून दूर असला तरी प्रारब्धानें त्याच्या हातून कांहीं कर्में झाल्यास तो ज्ञानवान् ज्ञानाग्निस्वरूप असल्यामुळें त्याच्या कर्मांचीं फळें जळून जातात ६६. इहलोकींचे अथवा परलोकींचे भोगाविषयीं ज्यांच्या अंतःकरणांत कधीं विचारहि येत नाहींत, परंतु दैववशात् सहजानुसार जें जें प्राप्त होईल, तें तें तो सेवन करितो ६७. पाषाण जसा कधींहि द्रवत नाहीं तसा तो ज्ञानी सुख झालें असतां आनंद मानीत नाहीं व दुःख झालें असतां शीण मानीत नाहीं; त्याचप्रमाणें जो मनानेंहि त्याग स्वीकारात्मक असा कांहींएक व्यापार करीत नाहीं ६८. आणखी तुला यापेक्षां गुणातीताचीं चिन्हें किती स्पष्ट सांगूं! असो, असें ज्याचें आचरण असेल तोच खरोखर गुणातीत आहे असें जाण ६९. श्रीकृष्ण म्हणतात—ज्या उपायांनीं तो गुण किंवा गुणाचे धर्म यांना उल्लंघन करतां येते तो उपाय तुला आतां सांगतों, ऐक ३७०.

**अन्वयार्थ**—**च**—आणि—**यः**-जो-**मां**-मला-**अव्यभिचारेण भक्तियोगेन**—अव्यभिचारी भक्तियोगानें-**सेवते**—सेवितो-माझी सेवा करतो-**सः**-तो-**एतान् गुणान्**-या गुणाचें-**समतीत्य**-उल्लंघन करून- **ब्रह्मभूयाय** -ब्रह्मभावास-**कल्पते**-समर्थ होतो २६.

जो अभेदबुद्धीनें, एकविधनिष्ठेनें माझी भक्ति करतो तो या भक्तिमार्गद्वारां गुणांचें उल्लंघन करून त्याचा बाध करूं शकतो! ७१. आतां मी कोण आहे? माझी ती भक्ति कशी असते व अव्यभिचाराचें, एकनिष्ठेचे स्पष्ट स्वरूप तरी काय? या सर्व गोष्टी तुला प्रथम स्पष्ट करून सांगितल्या पाहिजेत ७२. तर अर्जुना! ऐक. मी या जगांत असा आहे कीं, रत्नाचें तेज व रत्न हें जसें तत्त्वतः एकच आहे ७३. अथवा पातळपणाच जसा पाणी आहे, अवकाशच आकाश आहे, गोडी तीच जशी साखर आहे अर्थात् ती जशी भिन्न नसून एकच आहेत ७४. तसेंच विस्तव तोच जसा ज्वाला आहे, कमळाच्या पाकळ्यांचेच नांव कमळ आहे. झाड हेंच फांद्या, फळें व पानें वगैरे आहे ७५. ज्याप्रमाणें अर्जुना! थंडीमुळें गोठून एकत्र झालेले पाणी तोच [ बर्फ ] हिमालय पर्वत होय; अथवा दूध विरजलें म्हणजे ज्याप्रमाणें त्यालाच दहीं असें म्हणतात ७६. त्याप्रमाणें 'विश्व विश्व' या नांवानें जें म्हटलें जातें तें सर्व मीच आहे म्ह० मद्रूपच आहे. पहा कीं, चंद्राची कला पहाणे झाल्यास त्या जशा चंद्रापासून सोडून काढाव्या लागत नाहींत; कां कीं, दोन्ही एकच आहेत ७७. तूप जरी थिजले, म्हणजे त्याचा घट्टपणा न मोडतां त्या त्या स्थितींतहि तें तूपच असतें; किंवा कंकण आटवून जरी त्याची लगड केली नाहीं, तरी तें सोनेंच असते ७८. वस्त्र फाडून त्यांतील तंतु उकलून निराळे केलें नाहींत तरी तें जसें उबड उबड तंतुमयच आहे व मडकें फोडून विरवलें नाहीं, तरी ती घागर ज्याप्रमाणें मातीच होय ७९. त्याप्रमाणें विश्व एका बाजूला सारून दूर करावें व मग मला घ्यावे तसा मी नसून [हा अशांतला प्रकारहि नाहीं. तर] सरसकट विश्वासहित सर्वहि मीच आहें ३८०. अशा प्रकारें ऐक्यबुद्धीनें—व्यापक अन्वयात्मक बोधानें जें मला जाणणें त्यालाच माझी 'अव्यभिचारी भक्ति' म्हणजे 'अभेदभक्ति' असें म्हणतात आणि मी व विश्व ह्यांत यत्किंचितहि भेदबुद्धि झाली, तर तोच व्यभिचार होय ८१. याकरितां भेदाला टाकून देऊन एकनिष्ठ चित्तानें, अभेदबुद्धीनें तूं आपल्या स्वरूपासुद्धां मीच आहे, असें समज; [ म्हणजे भक्तपणानें तूं माझ्यांहून निराळा राहूं नकोस ] ८२. पार्था! सोन्याचीच टीक करून जरी ती सोन्याच्या दागिन्यावर बसविली, तरी त्या दोहोंत ज्याप्रमाणें भेद नसतो, त्याप्रमाणें आपल्यापासून विश्व किंवा माझ्याहून तुझें स्वरूप वेगळें आहे, असें समजूं नकोस ८३. सूर्यापासून निघालेले किरण जसे तेजोमय असून त्या

१ दूर झालें. २ इहलोक व स्वर्ग. ३ हेतू, विचार. ४ प्राप्त. ५ ज्याप्रमाणें, ६ ग्रहण, त्याग, व्यापार. ७ उलंघणें. ८ एकनिष्ठेनें. ९ जिंकूं, व्यापूं. १० लक्षण. ११ निश्चय, व्याख्या. १२ तेज. १३ आकाश. १४ कमलपत्रालाच, पानालाच, पाकळीलाच. १५ वृक्ष. १६. फांदी. १७ सोडून. १८ आटविलें नाहीं तरी. १९ वस्त्र. २० मला.

भला । बोधु होआवा ॥ ८४ ॥ पैं परमाणु भूतळीं । हिमकणु हिमाचळीं । मजमाजीं न्याहाळीं । अहं तैसें ॥ ८५ ॥ हो कां तरंगु लहानु । परी सिंधूसी नाहीं भिन्नु । तैसा ईश्वरीं मी आनु । नोहेचि मा ॥ ८६ ॥ ऐसेनि बा समरसें । दृष्टि जे उल्हासे । ते भक्ति पैं ऐसे । आम्ही म्हणों ॥ ८७ ॥ आणि ज्ञानाचें चांगावें । इयेचि दृष्टि नांवें । योगाचेंही आघवें । सर्वस्व हें ॥ ८८ ॥ सिंधू आणि जळधरा- । माजीं लागली अखंड धारा । तैसी वृत्ति वीरा । प्रवर्तें ते ॥ ८९ ॥ कां कुहेसीं आकाशा । तोंडीं सांदा नाहीं जैसा । तो परमपुरुषीं तैसा । एकवटे गा ॥ ३९० ॥ प्रतिबिंबौनि बिंबवरी । प्रभेची जैसी उंजरी । ते सोऽहंवृत्ती अवधारीं । तैसी होय ॥ ९१ ॥ ऐसेनि मग परस्परें । ते सोऽहं- वृत्ति जैं अवतरे । तैं तियेहि सकट सरे । अपैसया ॥ ९२ ॥ जैसा सैंधवांचा रवां । सिंधूमाजीं पांडवा । विरालेया विरवावा । हेंही ठाके ॥ ९३ ॥ नातरी जाळूनि तृण । वन्हिही विझे आपण । तैसें भेदु नाशूनि जाण । ज्ञानही नुरे ॥ ९४ ॥ माझें पैलपण जाये । भक्त हें ऐलपण ठाये । अनादि ऐक्य जें आहे । तेंचि निवडे ॥ ९५ ॥ आतां गुणातें तो किरीटी । जिणे[२५] या नव्हती गोष्टी[२६] । जे एकपणाही मिठी । पडों सरली ॥ ९६ ॥ किंबहुना ऐसी दशा । तें ब्रह्मत्व गा सुदर्शा । हें तो पावें जो ऐसा । मातें भजे ॥ ९७ ॥ पुढती इहीं लिंगीं[२७] । भक्तु जो माझा जगीं । हे ब्रह्मता तयालागीं । पतिव्रता ॥ ९८ ॥ जैसें गंगेचेनि वोघें । डळमळीत जळ जें निघे । सिंधुपद तयाजोगें । आन नाहीं ॥ ९९ ॥ तैसा ज्ञानाचिया दिठी । जो मातें सेवी किरीटी । तो होय ब्रह्मतेच्या मुकुटीं । चूडारत्न ॥ ४०० ॥ यया ब्रह्मत्वासीचि पार्था । सायुज्य ऐसी व्यवस्था । याचि नांवें चौथा । पुरुषार्थु गा ॥१॥ परी माझें आराधन । ब्रह्मत्वीं होय सोपान । तेथ मी[२५] हन साधन । गमेनें हो ॥ २ ॥ तरी झणीं ऐसें । तुझ्या चित्तीं पैसे[२८] । पैं ब्रह्म आन नसे । मीवांचूनि ॥ ३ ॥

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाऽहममृतस्याव्ययस्य च । शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ॥ २७ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः॥१४॥

पासून निराळे झालेलें नसतात, त्या सूर्य किरणासारखाच मी व विश्व याबद्दल चांगला ऐक्य बोध असावा [ माझ्या-पेक्षां तूं वेगळें न राहतां आपला अहं माझ्या स्वरूपीं विलीन कर ] ८४. भूमीवरील परमाणु-रजःकण पृथ्वी-रूप आहे आणि हिमालयावरील हिमकण; बर्फकण हा ज्याप्रमाणें हिमालय स्वरूपच आहे त्याहून निराळा नाहीं. त्याप्रमाणें हें सर्व विश्व तूं आपला 'अहम्' वेगळा न पाहतां मद्रूपच आहे असें जाण ८५. लाट किती जरी लहान असली, तरी ती जशी समुद्राहून निराळी नाहीं, तसा ईश्वराहून मीहि निराळा नाहीं ८६. अशा प्रकारें सर्वत्र ऐक्यता [ व्यापक ब्रह्मभाव लाभला ] आहे, अशी दृष्टी जेव्हां फांकते, विकसित होते तेव्हां तिलाच आम्ही 'भक्ति' असें म्हणतों; ८७. आणि याच दृष्टीला आम्ही सर्वांत उत्तम ज्ञान असेंहि समजतों व योगाचेंहि सार सर्वस्व हेंच आहे ८८. समुद्र आणि मेघ यांच्यामध्यें पाऊस पडूं लागल्यावर ज्याप्रमाणें अखंड धारा पडत असतात. त्याप्रमाणें अर्जुना ! भक्ति, भक्त व भजन या त्रिपुटींत परमात्माच ओतप्रोत भरलेला आहे. अशी त्याची वृत्ति असते ८९. आडाच्या तोंडाशीं असलेल्या आकाशाचा व महाकाशाचा जसा जोड दिलेला सांधा नाहीं तसा तो आपल्यांत व परमात्मस्वरूपांत भेद न मानतां त्या उत्तम पुरुषाशीं नित्यसिद्ध ऐक्य आहे असें जाणतो; ३९०. त्याला सूर्याची प्रभा प्रतिबिंबापासून सूर्यबिंबापर्यंत जशी एकासारखी सरळपणें नटलेली असते, त्याप्रमाणें 'सोऽहं वृत्ति' अभिव्यक्त होते [ अशी वृत्ति बनल्यावर ब्रह्म व विश्व यांत अंतर दिसत नाहीं ] ९१. याप्रमाणें 'सोऽहम्' [ ते ब्रह्म मी आहें ] अशी मनाची वृत्ति प्रगट होते ती 'सोऽहम्' वृत्तिहि पुढें आपोआप संपते अधिष्ठानांत लय पावते ९२. हे पांडवा ! ज्याप्रमाणें मिठाचा खडा समुद्रांत टाकला असतां तो विरघळल्यावर त्याचे विरणें, तो विरघळला हेहि आपोआपच राहतें ९३. किंवा गवत जळल्यावर जसा विस्तवहि स्वतः आपोआप विझून जातो, त्याप्रमाणें ज्या ज्ञानानें आत्म्याचें ब्रह्माशीं ऐक्य होतें [ अज्ञान व तत्कार्य ] भेदाचा नाश करून तें ज्ञानहि मागून [ निवर्त्य असें कांहींच नसल्यामुळें ] शिल्लक राहात नाहीं ९४. मी मायोपाधीच्या पलीकडे, श्रेष्ठ, फार मोठा देव आहे व भक्त मायेच्या अलीकडे-दीन कनिष्ठ आहेत हें अज्ञान वा मायोपाधिकृत देव-भक्तांचा भेद नष्ट होऊन देवभक्ताचें जें अनादि स्वाभाविक ऐक्य आहे, तेंच केवळ अभिव्यक्त होते ९५. हे किरीटी ! अशा विशुद्ध ब्रह्मस्थितींत ऐक्य आहे हें बोलणेंसुद्धां संभवत नाहीं. तर मग त्या ठिकाणीं गुणांना तो जिंकतो, असें म्हणणेंहि उरत नाहीं. कारण द्वैतसापेक्ष एकपणाहि सरला आहे ९६. किंबहुना ! ! हें मर्मज्ञा, याच विशुद्ध दशेस ब्रह्मत्वास, ब्रह्मस्थिति असें म्हणतात आणि जो माझी उपर्युक्त स्वरूपाची अव्यभिचारी भक्ति करितो त्यालाच हे विशुद्ध ब्रह्मत्व प्राप्त होतें ९७. अशा लक्षणांनीं या जगांत जो माझा भक्त होतो, त्याची ब्रह्मता ही पतिव्रता स्त्री आहे ९८. ज्याप्रमाणें गंगेचे पाणी प्रवाहानें वहात हेलकावे खात चालल्यावर त्याला समुद्रस्थान हमखास मिळतेच. कारण त्यास समुद्राशिवाय गत्यंतरच नसतें ९९. त्याप्रमाणें अर्जुना ! ज्ञानाच्या दृष्टीनें जो माझी सेवा-भक्ति करतो. तो या ब्रह्मतेच्या-ब्रह्मस्थितीच्या मुगुटावरील अग्रभागीं असणारा मणि होतो ४००. पार्था, या ब्रह्मत्व प्राप्तीलाच, विशुद्ध अद्वयब्रह्मस्थितीलाच "सायुज्य मुक्ति" म्हणतात व हिलाच चौथा पुरुषार्थ [ मोक्ष ] असेंहि म्हणतात १. परंतु ब्रह्मत्व पावण्याकरितां माझी आराधना, माझी भक्ति हा जिना-साधन होय. यावरून त्या ब्रह्मत्वास पोचण्याचे 'मी' हि साधन आहे, असें तुला कदाचित वाटेल हो ! २. तर अशी कल्पना कदाचित् तुझ्या मनांत येईल; तशी ती कल्पनाहि येऊं देऊं नकोस हो ! कारण, माझ्यावांचून ब्रह्म निराळें नाहीं ३.

**अन्वयार्थ**—**हि**–कारण-**अहं**–मी–प्रत्यगात्मा-**अमृतस्य**– **च**–**अव्ययस्य**–अविनाशी व विकार न पावणाऱ्या –**च**–आणि **शाश्वतस्य धर्मस्य**–नित्य धर्मरूप–**च**–आणि–**ऐकान्तिकस्य सुखस्य**–अव्यभिचारि–नित्य सुख अशा–**ब्रह्मणः**–ब्रह्माची परमात्म्याची–**प्रतिष्ठा**–प्रतिष्ठा आहे २७.

---

१ मीपण. २ फांकते. ३ ज्ञानाची अत्युच्च स्थिती. ४ ह्या दृष्टीनें मानून घ्यावें. ५ सार. ६ मेघ. ७ भक्ति, भक्त व भजन ह्या त्रिपुटींत परमात्माच आहे अशी वृत्ति. ८ विहिरीला. ९ प्रतिबिंबापासून. १० उत्कर्षे. ११ अहं-ब्रह्मवृत्ति. १२ लय पावते. १३ मिठाचा. १४ कण. १५ नाहींसें होतें. १६ जिंकणें. ही भाषाच रहात नाहीं. १७ मर्मज्ञा. १८ यानंतर. १९ लक्षणांनीं. २० वाहात. २१ त्यास सिंधुपदच योग्य, दुसरें योग्य नाहीं. २२ मुकुटमणि. २३ नांव २४ जिना. २५ ब्रह्मप्राप्तीचें मी केवळ साधन आहे असें वाटेल. २६ वाटेल. २७ कदाचित् २८ कल्पना येईल.

अगा ब्रह्म या नांवा । अभिप्रायो मी पांडवा । मीचि बोलिजे आघवा । शब्दीं इहीं ॥ ४ ॥ पैं मंडळ आणि चंद्रमा । दोन्ही नव्हती सुवर्मा । तैसा मज आणि ब्रह्मा । भेदु नाहीं ॥ ५ ॥ अगा नित्य जें निष्कंपें । अनावृत्त धर्मरूप । सुख जें उमपें । अद्वितीय ॥ ६ ॥ विवेकु आपलें काम । सारूनि ठाकी जें धाम । निष्कर्षाचें निःसीमे । किंबहुना मी ॥ ७ ॥ ऐसेसें हो अवधारा । तो अनन्यांचा सोयरा । सांगतसे वीरा । पार्थासी ॥ ८ ॥ येथ धृतराष्ट्र म्हणे । संजया हें तूतें कोणें । पुसलेनिविण वायाणें । कां बोलसी ? ॥ ९ ॥ माझी अवंसरी ते फेडी । विजयाची सांगें गुढी । येरु जीवीं म्हणे सांडीं । गोठी थिया ॥ ४१० ॥ संजयो विस्मयो मानसीं । आहा करूनि रेंसरसी । म्हणे कैसें पां देवेंसी । द्वंद्व यया ? ॥ ११ ॥ तरी तो कृपाळु तुष्टो । यया विवेकु हा 'घोंटो । मोहाचा फिटो । महारोगु ॥ १२ ॥ संजयो ऐसें चिंतितां । संवादु तो सांभाळितां । हरिखांचा येतु चित्ता । महापूर ॥ १३ । म्हणौनि आतां येणें । उत्साहाचेनि अवतरणें । श्रीकृष्णाचें बोलणें । सांगिजैल ॥ १४ ॥ तया अक्षराआंतील भावो । पाववीन मी तुमचा ठांवो । आइका म्हणे ज्ञानदेवो । निवृत्तीचा ॥ ४१५ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां गुणत्रयविभागयोगोनाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥ श्लोक २७, ओव्या ४१५



हे पांडवा ! 'ब्रह्म' म्हणून ज्याला म्हणतात तो मीच होय. आणि या [ सत्य, ज्ञान, अनन्त, अव्यय, ब्रह्म ] सर्व शब्दांनी श्रुति–स्मृतिद्वारां मीच बोलला–वर्णिला जातो ४. पहा कीं, चंद्र व त्याचे मंडळ–बिंब ही ज्याप्रमाणें दोन नाहींत, एकच आहेत. त्याप्रमाणें हे मर्मज्ञ अर्जुना ! मी व ब्रह्म यांत भेद नाहीं. [ सगुण साकार कृष्णरूप मी व निर्गुण निराकार ब्रह्म हे भिन्न नसून एकच आहे ] ५. तें ब्रह्म नित्य, निष्कंप, आवरण नसणारें, धर्मरूप व अपार सुखस्वरूप असें व अद्वितीय [स्वगत–सजातिय–विजातिय भेदरहित ] आहे ६. विवेक–ज्ञान, अज्ञान निवृत्त करण्याचें आपलें काम करून ज्या स्वरूपीं लय पावतें, ते स्थान मी आहे. किंबहुना ! ! तें सिद्धांतानें ठरलेलें शेवटचें, पराकोटीचें स्थान म्हणजे ब्रह्मस्वरूप मीच होय ७. एकनिष्ठ भक्तांचा जो आवडता परमात्मा, तो शूर पार्थास याप्रमाणें सांगता झाला ८. तेव्हां धृतराष्ट्र संजयास म्हणाला कीं, या गोष्टी तुला कोणी पुसल्या होत्या ? व तूं त्या मला उगीच विचारल्यावांचून व्यर्थ कां सांगतोस ? ९. माझ्या मुलांच्या विजयाची गोष्ट मला सांगून माझी शंका फेड. चिंता दूर कर. संजय मनांत म्हणतो कीं, ह्या तुझ्या विजयाच्या गोष्टी आतां सोडून दे ४१०. धृतराष्ट्राच्या बोलण्यानें संजय आपल्या मनांत विस्मय पावून मोठ्या कळवळ्यानें म्हणाला, अरेरे ! याची दैवगती काय विचित्र आहे पहा कीं, याला अजूनहि पांडवांशी व देवाशी विरोध करणेंच आवडते ११. तरी कृपाळु भगवान् संतुष्ट होवो व धृतराष्ट्राच्या मनांत आत्मानात्म विवेकरूपी औषध सेवन करण्याचें सामर्थ्य येवो आणि त्याचा मोहरूपीं महारोग नाहींसा होवो १२. संजय अशाप्रकारें आपल्या मनांत विचार करतो आहे, इतक्यांत कृष्णार्जुनांच्या संवादाचें लक्षपूर्वक चिंतन करीत असतां त्याच्या चित्तांत आनंदाचा महापूर आला १३. म्हणून आतां उत्साहाच्या भरांत, हर्षयुक्त होऊन श्रीकृष्ण काय म्हणाले, तें तो सांगेल १४. श्रीनिवृत्तिनाथांचें शिष्य श्रीज्ञानदेव म्हणतात त्यांच्या त्या अक्षरांतील भावार्थ मी शब्दांकित करून तुमच्या हृदयापर्यंत पोचवीन तो ऐका १५.

१ मर्मज्ञा. २ अचल. ३ न आवडणारें. ४ अपार. ५ सिद्धांताचें. ६ शेवटचें. ७ एकनिष्ठेचा; अनन्य भक्ताचा. ८ व्यर्थ बडबड. ९ शंका. १० उत्तम रस. ११ गिळला जावो. १२ हर्षाचा. १३ ठिकाण.



# अध्याय संगति व चौदाव्या अध्यायाचें तात्पर्य

गुण ते कैसे किती । बांधती कवणे रीती ।
नातरी गुणातीती । चिन्हें काई ? ।। अ. १४–३६

मागील तेराव्या अध्यायांत 'क्षेत्र' स्वरूप वर्णनाच्या शेवटीं "हेचि गुण विवंचना । पुढा म्हणिपैल अर्जुना" असें म्हटलें आहे. त्याप्रमाणें या अध्यायांत तें गुण किती आहेत? कसें वा कोणापासून उत्पन्न झालें? ते जीवांस बंधांत कसें घालतात? त्या गुणांच्या बंधनापासून सुटण्याचा उपाय काय? आणि त्या गुणांच्या बंधनांतून सुटलेल्या जीवाची म्हणजे गुणातीत पुरुषाची स्थिति व चिन्हें कोणती आहेत? या सर्व गोष्टी या अध्यायांत सविस्तर रूपानें सांगितल्या आहेत. त्या प्रतिपाद्य विषयाचें व्याख्यान सुरूं करण्यापूर्वी श्रीज्ञानेश्वर महाराज श्रीगुरु निवृत्तिनाथांच्या ऐश्वर्याचे वर्णन करतातः—

हे प्रज्ञा प्रभात सूर्या! सुखोदय करणाऱ्या श्रीगुरु आचार्या!! आपला जयजयकार असो! तुझ्या विषयींच्या अज्ञानकालांत जगाची प्रतीति मात्र होते व तुझ्या यथार्थ ज्ञानकालांत जगताचा बाध होऊन तूंच सर्वत्र ओतप्रोत भरलेला दिसतोस. तूं स्वयंप्रकाश असल्यामुळें अन्य प्रमाणास तर विषय होत नाहींसच; पण स्वतः स्वतःस विषय होत नाहींस. विषय–विषयीभावरहित आहेस. हे 'नवल लाघव तुझें' आहे. तूं इतका निरुपाधिक व्यापक आहेस कीं, "नभ तुजमाजी खेळे । लपीयपी" तुझ्या यथार्थ निर्विशेष स्वरूपाचें वर्णन करावयाचा प्रसंग आला म्हणजे वेदांस व आम्हांस एक पंक्तीला बसून मूग गिळावे लागतात म्हणजे शब्दास तूं अविषय आहेस. म्हणून स्तुति करण्याचें सोडून आपल्या चरणीं मस्तक ठेवावें 'हेंचि भले' मजवर आपण एवढी कृपा करा कीं, माझा ग्रंथोद्यम सफल होण्यास आपण सावकार व्हा व कृपारूपी भांडवल सोडून माझी मतीची पोतडी भरा. ज्ञानपूर्ण काव्यलाभानें मला थोर करा. तेव्हां श्रीगुरु संतोष पावून म्हणाले, गीताग्रंथांतील ज्ञानार्थ स्पष्ट करून सांग. मागे तेराव्या अध्यायांत क्षेत्र–क्षेत्रज्ञ संबंधांत हे जग उत्पन्न होते व गुणसंगानें आत्मा संसारी झाला. तत्त्वतः आत्मा गुणातीत असंग आहे. त्यास हा गुणसंग झाला कसा? तो संबंध तरी कोणता? ते गुण कसें किती आहेत? ते कोणत्या रीतीनें आत्म्यास बांधतात व गुणातीताचीं लक्षणें काय आहेत! या सर्व विषयांचा अर्थ स्पष्ट करणें हाच या चौदाव्या अध्यायाचा "प्रतिपाद्य विषय" आहे.

देव म्हणाले–हे अर्जुना! आतांपर्यंत हा विचार तुला पुष्कळ समजावून सांगितला; तरीपण तुझी अनुभूतीची कूस भरून आलेली अजून दिसत नाहीं [ १ ते ४० ].

भगवान् सांगतात–'ज्ञान हें कांहीं अप्राप्त असून ते प्राप्त होणारे आहे, असें नाहीं, तर ज्ञान हें आपलें स्वरूपच आहे; पण भव–स्वर्गांतील अनित्य विषय आवडून घेतले. त्या विषयासक्तीमुळेंच ते आपले स्वरूप असलेलें ज्ञान 'परके' म्हणजे अप्राप्तवत् झालें. जर जीवानें विषयासक्तीची त्याग करून 'मनें मन मागे घालून' देहनिरासपूर्वक सर्वोत्तम ज्ञानाकडे तें मन लावले, तर तें जन्ममरणाच्या परंपरेंतून सदाचेच मुक्त होतील. ज्ञानद्वारां मी 'जसा' व 'जेवढा' आहे 'तसा' व 'तेवढा' जो तत्त्वतः जाणतो तो जसा म्हणजे मी सत्–चित्–आनंदरूप आहे व जेवढा म्हणजे 'अनन्त' देश–काळ–वस्तु परिच्छेदरहित आहे, "तसा व तेवढा' अर्थात् मत्स्वरूप होतो. म्हणजेच तो जन्माभावरूप मोक्षास प्राप्त होतो.

आपल्या ज्ञानस्वरूपाचा आपल्यालाच जो विसर पडतो, त्यासच शास्त्रांत 'अज्ञान' म्हणतात. "वेदांती यातें माया ऐसे म्हणीजे" तर सांख्याच्या मतें हिला 'प्रकृति' म्हणतात. तसेंच अव्यक्त–अविद्या व महद्ब्रह्म हीं पदें अज्ञानवाचकच आहेत. महत्तत्त्व–अहंकारादि सर्व कार्यवर्गांत मायेची व्याप्ति असल्यामुळें किंवा 'ब्रह्माची' उपाधि असल्यामुळेंच मायेलाच 'महद्ब्रह्म' असें म्हटलें आहे. ती माया–अविद्या आपल्या यथार्थ ज्ञानस्वरूपास आच्छादन करते. त्यामुळें स्वरूपाचे यथार्थ ज्ञानहि नसतें व विपरीत ज्ञानहि नसतें. अर्थात् त्या अज्ञानामुळें गुंडाळलेला–आवृत जो 'चिद्–प्रकाश' त्यासच 'क्षेत्रज्ञ' अशी संज्ञा आहे. आपण तत्त्वतः कोण आहो! हे जाणूं न देतां अज्ञानासच

महत्त्वास आणावें, हेंच त्या क्षेत्रज्ञाचे रूप आहे. हाच 'क्षेत्र–क्षेत्रज्ञा'चा संबंध आहे, असें चांगलें समज. सामान्य चैतन्यसत्तेचा अज्ञानाशीं विरोध नसून संबंध [ अध्यासिक संबंध ] असणें हा सहज स्वभाव आहे. या स्वभावामुळें आपल्या यथार्थ स्वरूपास जाणूं शकत नाहीं; पण ती अज्ञानोपाधीच्या निमित्तानें आत्माज्ञानरूपी गाढ निद्रा आली व मग आपणासच अनेक रूपांनी अर्थात् हे विश्वस्वप्न दिसूं लागते. आपल्या आत्मस्वरूपावरून एकदां 'दृष्टि लचकली' म्हणजे मग जें जें कांहीं दृश्य पुढें मांडले जाते त्याचेच नांव 'मी सृष्टि प्रसवतो'. ही अविद्या अनादि, त्रिगुणात्मक अनिर्वचनीय आहे. हिचे 'नाहीं' म्हणजे स्वतः सत्ता–स्फूर्तिशून्य, हेंच स्वरूप होय. स्वस्वरूपीं निजले-ल्याच्या ही जवळ आहे व स्वस्वरूपीं जागृत असणाऱ्यास दूर आहे. परमात्मस्वरूपाच्या अज्ञानांत अविद्येचे कार्यास सुरुवात होते. तिला केवळ माझ्या 'सत्तेचा' आश्रय असतो. पुढें तिच्यापासून मन–बुद्धि–चित्त–अहंकार इत्यादि आठ विकारांची उत्पत्ति होते. त्या विकारांच्या साह्यानें ती त्रिगुणात्मक अशी अनंत ब्रह्मांडें निर्माण करते. केवळ माझ्या सत्तेच्या आश्रयावर ही माया या विशाल विश्वाला प्रसवते [ ४१ ते ११९ ].

या दृश्यमान् अखिल विश्वांत सर्वत्र मीच ओतप्रोत भरून राहिलों आहे. सागर व तरंग किंवा वन्ही व ज्वाला यांचा जसा संबंध वा अभेद आहे. तसाच माझा [ परमात्म्याचा ] व चराचराचा संबंध वा अभेद आहे. म्हणूनच तर "जग परौते । सारूनि पाहिजे माते । तैसा नोहे उखितें । आघवे मीचि". जग म्हणून कांहींएक भिन्न पदार्थ असतां, आणि त्याच्याकडून मी परमात्मा झांकला गेलों असतो; तर मात्र जगाचा निरास करून मला पहावे लागले असतें; पण तसा मी नाहीं. सरसकट अवघे विश्व म्हणजे माझ्याहून भिन्न [ स्वतंत्र सत्तासंपन्न ] नसून 'मीच' आहे.

[ यांत चराचरात्मक विश्वाचे व परमात्म्याचें जें एकरूपत्व सांगितलें आहे. येथें "विश्वाची" स्वतंत्रत्वानें, भिन्नत्वानें सिद्धि करावयाचा हेतू नसून परमात्म्याव्यतिरिक्त दुसरें असें कांहींच नाहीं, असें सांगावयाचें आहे. असें परस्परैक्य, विश्वाचे 'मिथ्यात्व' 'प्रतीतिमात्र अस्तित्व' लक्षांत घेऊनच सांगितलें जातें; पण त्याचा खरा अभिप्राय लक्षांत न आल्यामुळें फारांचा गैरसमज वा गोंधळ होतो. नाम व रूप म्हणजे स्थूल आकार 'मिथ्या' आहे. म्हणजे विनाशी, चंचल आहे. त्या नाम व स्थूलाकारामुळें आपल्याला परमात्म्याहून विश्व भिन्न आहे, असा आभास मात्र होतो. तत्त्वतः अनिर्वचनीय मिथ्या पदार्थ स्वतः सत्ता स्फूर्तिशून्य असल्यामुळें अधिष्ठानरूपच असतो; या न्यायानें संपूर्ण मिथ्या विश्व अधिष्ठान परमात्मरूप आहे, असें ज्ञान झाले म्हणजे नामरूपात्मक विश्वाचे आभासिक भिन्नत्व नाहींसें होतें. किंबहुना ! ! एकमेवाद्वितीय परब्रह्माव्यतिरिक्त दुसरें असें यत्किंचितहि नसल्यामुळें एकत्व सांगण्यापुरतेंहि द्वैत नाहीं, हें विवर्तवादांतील रहस्य लक्षांत आले म्हणजे निवर्त्य असें जग किंवा अज्ञान कांहींहि उरत नसल्यामुळें "हें सर्व परमात्माच आहे" असा "अन्वयात्मक" अन्तिम साध्यरूप बोध होतो. ] तेव्हां भिन्नत्वानें होणारा विश्वाभास मावळतो; पण सारासार विवेकविहीन जीव आपल्या यथार्थ स्वरूपास जाणत नाहीं. तेव्हां अज्ञानवशतेनें देह–तादात्म्य–भ्रांतीस प्राप्त होतो. देह मी आहे, जन्ममरणादि देहाचे धर्म तेहि माझे आहेत, अशा विपरीत भावनेंत सांपडतो. सत्त्व–रज–तम या त्रिगुणांशींहि तादात्म्य ठेवून त्या गुणांकडून बांधला जातो. त्यामुळें जन्ममरणाची अनर्थ परंपराहि भोगावी लागते, आपण ज्ञानस्वरूप आहों, याचा विसर पडला, त्याचे त्यास दुःख होत नाहीं; पण विषयज्ञानानें मात्र गगनाएवढा स्वतःला श्रेष्ठ समजतो. अंतःकरणांत सत्त्वगुणांची वाढ झाली तर त्याची विषयांत गुंतलेल्या बहिर्मुख मनाची धांव कमी होते; पण तो सत्त्वगुणाच्या 'सुख' व 'ज्ञान' या उभय पाशांनीं बांधला जातो. त्यामुळें त्यास पुनः जन्म घ्यावा लागतो तो लागतोच. [ सत्त्वगुण हा रजोगुण व तमोगुण यापेक्षां बरा आहे. कारण, त्यांतच '**ब्रह्मजिज्ञासा**' निर्माण होण्याची शक्यता आहे; तरीपण खरी कृतार्थता 'गुणातीत' होण्यांत आहे. म्हणून तशी ब्रह्मजिज्ञासा व ब्रह्मात्मैक्यानुभूति लाभली नाहीं तर मग सत्त्वगुणहि बंधकच आहे ] तरीपण जो सत्त्वगुण उत्कर्षांत शरीर टाकून आकस्मात जातो त्यास ज्या कुळांत ब्रह्मप्राप्ति सहजीं सुलभ आहे. अशा ज्ञानी पुरुषाच्याच कुळांत निरुपम जन्म प्राप्त होतो. जेव्हां बुद्धींत रजोगुणांचा उत्कर्ष असतो तेव्हां स्वैर विषयसेवनाकडे प्रवृत्ति असते. अफाट कर्मांना आरंभ करतो. ऐहिक–पारलौकिक भोग मिळावेत म्हणून सकाम कर्मे करण्यासाठीं सारखी धडपड करीत असतो, 'पुरे' म्हणतच नाहीं. त्याच्या अभिलाषेच्या ठिकाणीं अग्नीपेक्षाहि जास्त दुर्भरत्व असते. अशा लक्षणाच्या समुदायांत त्याचा देह पडला तर पुनः जेथें व्यापारामुळें रात्रंदिवस उसंत नाहीं, अशा सकाम कर्मे करणाऱ्यांच्या कुळांत जन्माला येतो. यांत तृष्णा व कर्म या पाशांत '**वृक्षबीजन्यायानें**' गुंतल्यामुळें

ब्रह्मात्मैक्य बोधास मुकतो. जेव्हां तमोगुणाचा उत्कर्ष असतो तेव्हां "विचाराची भाष हरपे तैं" त्यास आळस असतो. अनवधानता असते, बुद्धि तर धोंड्यासहि जडपणाचे बाबतींत मागे सारील अशी असते. देहतादात्म्य भ्रांतीचा कळस असल्यामुळें भ्रष्टाचारांतच सारें आयुष्य जाते. मदिरा न घेतां डोलतो, सन्निपाताविना बरळतो, प्रेमाविना वेड्यासारखा मुलतो, असा जो तमोगुणाच्या उत्कर्षांत मरण पावतो. त्यास पशू, पक्षी, झाड किंवा कृमी यांपैकीं कोणती तरी अधम योनी प्राप्त होते [ ११६ ते १५९ ].

सत्त्वगुणापासून पुण्यकर्म होते व त्या निर्मळ सुकृताला सरळ सुख व ज्ञान असें लोकोत्तर फल प्राप्त होत. रजोगुणापासून होणारी कर्मे जरी सुरुवातीस वरवर सुखाची प्राप्ति करून देणारी वाटतात; पण शेवटीं त्याचे दुःख हेंच फल पदरीं पडतें. तमोगुणापासून पुढील परिणामांचा विचार न करतां घातक कर्मे केली जातात. ते कर्म अज्ञान-रूपी फळानें पिकते. प्रमाद-मोह-अज्ञान या व्यतिरिक्त तमोगुणांचे कांहींहि फळ मिळणार नाहीं. विवेकी पुरुष या तीन गुणांस त्याच्या क्रियांना व फळास जाणून आमरणान्त सत्त्वसंपन्न वृत्तीनें राहतात [ २६० ते २७० ].

सारांश, वस्तु ही वस्तुत्वानें कोणत्याहि अवस्थेंत आपल्या ठिकाणीं परिपूर्णत्वानें आहेच, पण आपल्या स्वरूपाचा जर विसर पडला, तर ती आपणांस वस्तुरूपानें न पाहतां अनेक पदार्थ व त्यांतील त्या त्या गुणांच्या विशेष कार्याप्रमाणें पाहतें. या तीन गुणांपैकीं ज्या गुणाचे आधिक्य असेल त्याप्रमाणें सुखाचा अगर दुःखाचा भोग मिळतो व देहपातानंतर स्वर्गलोक, मृत्युलोक किंवा नरक अशी त्या त्या गुणानुगुण 'गती' प्राप्त होते. ती गुणांची दृष्टि टाकली तर परब्रह्मवस्तु शुद्ध 'आहे तशीच आहे.' हे तीन गुण 'सान्तःकरण देहरूपानें' अज्ञानी जीवाच्या बंधाला कारण होतात. असंग आत्मा त्याहि स्थितींत मुक्तच असतो. मी या देहांत अकर्ता व अभोक्ता सत्तास्वरूप आहे. या त्रिगुणाचा प्रकाशक साक्षी मी असून गुणातीत आहे. त्रिगुणांचा निरास झाल्यावर जे स्वतःसिद्ध तत्त्व उरते ते मी आहें, अशा विचाराचा चित्तांत उदय झाला तर त्यास 'गुणातीतता' याच देहांत लाभते.

निर्गुण परब्रह्मास जो अचूक जाणतो, तो माझी सत्ता पावतो. त्यांस देहाहंता बाधित होऊन 'मी ब्रह्म आहें' असा अनुभव आला म्हणजे अज्ञानाच्या निद्रेंत जो अहम्-ममरूपानें मोठमोठ्यानें घोरत होता तो आतां आत्म-स्वरूपीं जागा झाला आहे. देहाहंकार बाधित झाल्यामुळें जीवेश्वरैक्य झाले. असा अनुभवानें मत्स्वरूप झाला आहे. तोच गुणातीत समजावा. तो देहेंद्रियादि उपाधींत वा त्रिगुणांत वावरत असला तरीहि बोधानें गुणांशीं तादात्म्य नसल्यामुळें त्रिगुणांहून अलिप्त असतो. देहेंद्रियादि उपाधीद्वारां प्रकृति ही गुणानुरूप क्रिया करते. त्यांत मग कोणत्याही गुणाचा उत्कर्ष वा अपकर्ष झाला तर त्यामुळें त्याचा आंतरिक अकर्तृत्वात्मबोध यत्किंचितहि मळत नाहीं. एवढेंच नव्हे तर जन्ममरणादि देहाच्या धर्मांचाहि त्याच्याशीं कांहींएक संबंध राहत नाहीं. अर्थात् "शरीराचे तयाठायीं आडनांवहि उरलें नाहीं" अशा थोर बोधामुळें तो देहांत असूनहि गुणातीत जाणावा, असें मी म्हणतों [ २७१ ते ३१९ ]

अर्जुन म्हणतो "देवा! गुणातीत पुरुष कोणत्या लक्षणांनीं ओळखला जातो? गुणातीत पुरुषाचे आचरण कसें असते? तो तीन गुणांतून कसा मुक्त होतो? हे आपण मला कृपेनें सांगावे!" हें तेव्हां अर्जुनाच्या प्रश्नाची सुधारणा केली तीं अशी कीं, "गुणातीत पुरुष गुणांच्या गुंताड्यांत वावरत असतांना तो गुणांच्या आधीन आहे कां? गुणाहून अतीत आहे? हे कसे ओळखावे? असा संदेह असेल तर त्याचे स्पष्ट उत्तर देतों ऐक." त्रिगुणाचें परिणाम हें अज्ञानकार्य स्थूल-सूक्ष्म संघातावर होत असतात. जो स्वानुभवानें परमात्मरूप झाला आहे, अर्थात् ज्यानें अज्ञान व तत्कार्य देहद्वयाचे तादात्म्य सोडले आहे म्हणजे त्रिगुणाचेंहि तादात्म्य सोडलेच आहे. म्हणून त्या विशिष्ट गुणांचे उत्कर्षानुसार देहेंद्रिय व अंतःकरण उपाधिद्वारां व्यवहार होत असतांना जो 'मी अकर्ता आहे' अशा बोधांत असतो, तो गुणातीत समजावा. सत्त्वगुणामुळें स्वतःला ज्ञानी व सुखी, रजोगुणामुळें कर्मठ, तमोगुणामुळें मोहग्रस्त असें समजत नाहीं हें सर्व सर्व अंतःकरणाचें धर्म आहेत. त्यामुळें त्या त्रिगुणापासून निर्माण होणाऱ्या 'अंतःकरण धर्मा' विषयीं कुठल्याच प्रकारचा आग्रह नसल्यामुळें त्या गुणातीतास सुखदुःखहि नसते. त्रिगुणाच्या गजबजीमुळें जो "चळे 'ना' ढळे." या लक्षणांनीं युक्त असतो तो गुणातीत जाणावा.

सारांश, गुणातीत पुरुषाचे ठिकाणीं देहतादाम्याचा समूळ अभाव असतो. त्यामुळें सुख दुःख, मान-अपमान, निंदा-स्तुति, हीं द्वंद्वेंहि आपोआपच त्याचेवर कांहीं परिणाम करूं शकत नाहींत. बोधानें अज्ञान निवृत्त होऊन

तत्कार्य देहतादात्म्य भ्रांतीहि नाहींशीं झालेली असते. म्हणून ऐहिक किंवा पारत्रिक भोग मिळवावेत अशी इच्छाच त्याचे चित्तांत निर्माण होत नाहीं. अर्थात् 'कर्म प्रवृत्तीहि त्याचे चित्तांत निर्माण होत नाहीं. आतां ज्या उपायांनीं त्रिगुणांचे उल्लंघन करतां येतें तो उपाय सांगतो असें श्रीकृष्णनाथ म्हणाले [ ३२० ते ३७० ].

गुणातीत होण्याचा निश्चित उपाय म्हणजे माझी 'अव्यभिचारी भक्ति करणे' हा होय. अर्थात् जो व्यभिचार-दोषरहित चित्तानें, भक्तियोगद्वारां माझी सेवा करील तो त्रिगुणातीत होऊं शकेल. ज्याला विश्व म्हणतात ते आघवे मीच आहे ते स्वतः सत्ता-स्फूर्तिशून्य असल्यामुळें ते माझ्याशीं 'विजातीय भेद' करूं शकत नाहीं. 'विश्व' म्हणून कांहीं वेगळे असावे व त्यांनीं मला आच्छादित करावें. तर मग 'विश्वपण' बाजूला सारून त्यास घ्यावे असें म्हणतां आले असते; पण सरसकट आघवे विश्व मीच आहे, असें मला यथार्थ अभेदरूपानें जाणून होणारी भक्ति हीच 'अव्यभिचारी' भक्ति होय. जर येथें मी वेगळा व विश्व वेगळें असा कोणी भेद पाहील तर तोच 'व्यभिचार' होय. आपणासकट-संपूर्ण विश्व हें परमात्मस्वरूपच आहे; अशा सामरस्याच्या बोधानें उल्हसित झालेली जी दृष्टि " ते भक्ति पैं ऐसे। आम्ही म्हणो " माया व अविद्या उपाधीनें भासणारा जो देव-भक्तांचा व जगत्-देवाचा भेद भासत होता तो उपर्युक्त-व्यापक ज्ञानानें नाहींसा झाला म्हणजे जसा तृण जाळून त्यास जाळणारा अग्निहि आपोआप विझतो. त्याप्रमाणें अज्ञान व तत्कार्य भेदभ्रांतीचा नाश करून, निवर्त्य असें कांहींच नसल्यामुळें अज्ञान सापेक्ष जें ज्ञान तेंहि उरत नाहीं. देव व भक्त यांचा औपाधिक भेद नाहींसा होऊन देव भक्तांचे अनादि असलेलें ऐक्य अभिव्यक्त होणें किंवा ज्ञात होणें व द्वैतनिरपेक्ष एकमेवाद्वितीय म्हणजे 'जे-एकपणाहि मिठी। पडो सरली " अशी विशुद्ध अद्वय ब्रह्मस्थिति उर्वरित राहणें, या ब्रह्मत्वासच 'सायुज्य'; 'मोक्ष' असें म्हणतात व सायुज्यासच चौथा 'पुरुषार्थ' म्हणतात. ब्रह्म होण्याचे मी 'साधन' आहे. असें कदाचित् तुला वाटेल; पण तसें वाटूं देऊं नकोस हो! तर माझी ऐक्य बोधानें होणारी 'पराभक्ति' ही ब्रह्मस्थिति प्राप्तीचे साधन आहे. मी व नित्य अचल अद्वय, सुखरूप ब्रह्म एकच आहो निराळे नाहीं. [ येथें श्रीज्ञानेशांनीं सायुज्य मोक्षाची व्याख्या सांगून " **सगुण व निर्गुण यांत भेद नसून ते एकच आहे** हा एक महत्त्वपूर्ण, परमसत्य सिद्धान्त सांगितला आहे. यावरून द्वैती वाद्यांचा भेदगर्भ असलेला 'सायुज्यमोक्ष' किंवा सगुण-निर्गुणांतील भेद श्रीज्ञानेशांना मुळींच मान्य नाहीं, हें सिद्ध होते. वेदांतहि सगुण-निर्गुण अशा दोन स्वरूपानेंच देवाचे वर्णन केले आहे. ते असेः—' **यः सर्वज्ञः सर्ववित्** ", " **यतो वा ईमानि भूतानि जायन्ते** " " **सत्यकामः सत्यसंकल्पः** " या श्रुतींनीं देवाच्या सगुण स्वरूपाचें प्रतिपादन केलें आहे आणि ' **निर्गुणम्** ' ' **सत्यंज्ञानमनंतम् ब्रह्म** ' इत्यादि श्रुतींनीं देवाच्या या उभय स्वरूपांपैकीं निर्गुण स्वरूप वास्तव, त्रिकाला बाधित आहे व सगुण स्वरूप मायिक आहे. देवाच्या निर्गुण स्वरूपाचे प्रतिपादन केले आहे निर्गुण-अद्वय ब्रह्म प्रतिपादनांतच सर्व वेदांचे मुख्य महातात्पर्य आहे. तरीपण मन-बुद्धि-अगोचर निर्गुण ब्रह्माचा बोध सर्व सामान्यांच्या बुद्धीला एकदम होणें अवघड आहे. म्हणून त्या निर्गुण ब्रह्माच्याच ज्ञानाचें साधन म्हणून श्रुतीनें सगुणाचें प्रतिपादन केलें आहे निर्गुण ब्रह्म, मायोपाधिविशिष्ट ईश्वर आणि राम-कृष्णादि अवतार, यांत ईश्वर व अवतार यांच्यातील भेद औपाधिक असून त्या सगुण निराकार ईश्वराचे व सगुण साकार अवतारांचे अधिष्ठान ब्रह्माशी मूळचे ऐक्यच आहे. कारण, त्या उपाधिकल्पित उभय 'सगुण' स्वरूपांत 'निर्गुण' ब्रह्मचैतन्य साधारण व्याप्त आहे. सारांश, सगुण-निर्गुण एक गोविंदच आहे, हा वैदिक संप्रदायांतील आध्यात्मिक-परमसत्य सिद्धान्त आहे. तोच येथें श्रीज्ञानेशांनीं प्रतिपादिला आहे. ]

श्रीकृष्ण व अर्जुन यांचा अपूर्वसुंदर संवाद संजय आनंदभरित होऊन धृतराष्ट्रास सांगत होता. पण धृतराष्ट्र हा पुत्रस्नेहानें मोहित झाला होता. म्हणून धृतराष्ट्र म्हणाला " संजया हे, तुला कोणी विचारल्याविना तूं व्यर्थ कां बोलतोस ? " त्यामुळें संजय आश्चर्ययुक्त होऊन व धृतराष्ट्राची कींव येऊन मनांत म्हणाला तो भगवान् संतुष्ट होवो व या धृतराष्ट्राचा आत्मानात्म विवेकानें मोहरूपी महारोग निवृत्त होवो. असा विचार करीत असतां संजयाच्या चित्तास आनंदाचा महापूर आला होता. आतां तो त्या उत्साहाच्या भरांत श्रीकृष्णाचे बोलणें सांगेल. त्या अक्षरांतील भावार्थ आपणांस सांगेन तो ऐका; असें श्रीनिवृत्तिनाथांचें शिष्य श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात [ ४०८ ते ४१९ ].

[ या संपूर्ण चौदाव्या अध्यायाचा नकाशा क्रमांक १७ पहावा. ]



# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय पंधरावा

आतां हृदय हें आपुलें । चौफाळूनियां भलें । वरी बैसऊं पाउलें । श्रीगुरूचीं ॥ १ ॥ ऐक्यभावाची अंजुळी । सर्वेंद्रिय कुड्मुळीं । भरूनियां पुष्पांजुळी । अर्घ्यु देवों ॥ २ ॥ अनंन्योदकें धुवटें । वासना जे तन्निष्ठ । तें लागलेंसे अबोट । चंदनाचें ॥ ३ ॥ प्रेमाचेनि भांगारें । निर्वाळूनि नूपुरें । लेवऊं सुकुमारें । पदें तियें ॥ ४ ॥ घणावेली आवडी । अंव्यभिचारें चोखडी । तिये घालूं जोडी[१२] । आंगोळियां ॥ ५ ॥ आनंदामोदबहळें । सात्त्विकाचें[११] मुकुळ । तें उमललें अष्टदळ । ठेऊं वरी ॥ ६ ॥ तेथें अहं हा धूप जाळूं । नाहं तेजें[१८] वोवाळूं । सामरस्यें पोटाळूं । निरंतर ॥ ७ ॥ माझी तनु आणि प्राण । इया दोनी पाउवा लेऊं श्रीगुरुचरण । करूं भोगमोक्ष निंबलोण । पायां तयां ॥ ८ ॥ इया श्रीगुरुचरणसेवा । हों पात्र तया देवा । जे सकळार्थमेळावा । पाटु बांधे ॥ ९ ॥ ब्रह्मींचें विसवणेंवरी । उन्मेख लाहे उजरी । जें वाचेतें इयें करी । सुधासिंधु ॥ १० ॥ पूर्णचंद्राचिया कोडी । वक्तृत्वा घापें कुरोंडी । तैसी आणी गोडी । अक्षरांतें ॥ ११ ॥ सूर्यें अधिष्ठिली प्राची । जगा राणीव दे प्रकाशाची । तैसी वाचा श्रोतयां ज्ञानाची । दिवाळी करी ॥ १२ ॥ नादब्रह्म खुजें । कैवल्यही तैसें न सजे । ऐसा बोलु देखिजे । जेणें दैवें ॥ १३ ॥ श्रवणसुखाच्या मांडवीं । विश्व भोगी माधवीं । तैसी सासिन्नली बरवी । वाचावल्ली ॥ १४ ॥ ठावो न पवता जयाचा । मनेंसी मुरडली वाचा । तो देवो होय शब्दाचा । चमत्कारु ॥ १५ ॥ जें ज्ञानासि न चोजवे । ध्यानासिही जें नागवे । तें अगोचर फावे । गोठीमाजीं ॥१६॥ येवढें एक सौभग । वळघे वाचेचें आंग । श्रीगुरुपादपद्मपराग । लाहे जैं कां ॥ १७ ॥ तरी बहु बोलूं काई । आजि तें आनी ठाईं । मातेंवांचूनि नाहीं । ज्ञानदेवो म्हणे ॥ १८ ॥ जे तान्हेनि मियां अपत्यें । आणि माझे गुरु एकलौतें । म्हणौनि कृपेंसि एकहातें । जालें तियें ॥१९॥ पाहा पां भेंरोवरी आघवी ।

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय पंधरावा

आतां आपलें हृदय चांगलें स्वच्छ, शुद्ध करून त्यावर श्रीगुरूंच्या पादुकांची स्थापना करूं १. नंतर ऐक्य निश्चयरूपी ओंजळींत सर्वेंद्रियरूपी पुष्पांच्या कळ्या भरून घेऊन श्रीगुरूंस अर्घ्य देऊं २. अनन्यभावरूपी स्वच्छ उदकानें स्नान घालून त्यांच्याच ठिकाणीं असणाऱ्या एकनिष्ठ वासनारूप चंदनाचें श्रीगुरूंस अनामिका संज्ञक बोटानें गंध लावूं ३. प्रेमरूपी सोने, शुद्ध करून त्या सोन्याच्या घागऱ्या करून श्रीगुरूंच्या सुकुमार पायांत घालूं ४. अनन्यतेनें शुद्ध झालेलें श्रीगुरूंच्या विषयींचे एकनिष्ठ प्रेम व सर्वोत्तम दृढ आवडीचीं रणजोडवी करून श्रीगुरूंच्या आंगठ्यांत घालूं ५. आनंदरूपी सुवासानें युक्त अशी अष्टभावरूपी आठ पाकळ्या उमलेल्या आहेत, असें सात्त्विकभावरूपी कमळ त्यांच्या चरणांवर वाहूं ६. देहादिकांच्या ठिकाणीं असणारा अहंकार हाच कोणी एक धूप तो जाळूं निरभिमानात्मक दीप तेजानें ओवाळूं व निरंतर सहज असणाऱ्या ऐक्य भावानें श्रीगुरूंस आलिंगन देऊं ७. माझें शरीर व प्राण या दोन पादुका करून श्रीगुरूंच्या दोन्ही चरणांत घालूं व श्रीगुरूंच्या चरणांवरून ऐहिक पारत्रिक भोग व मोक्ष यांचें लिंबलोण करून अर्थात उतारा म्हणून ओवाळून टाकूं ८. या प्रकारची श्रीगुरूंच्या चरणाची सेवा; जो कोणी परम भाग्यवान् असेल त्यालाच ती प्राप्त होईल. ज्या सेवेचें फल मोक्षासकट सर्व अर्थांची यथेच्छ प्राप्ती करून देते ९. इतकेंच नाहीं, तर तो उपासक ब्रह्मस्वरूपीं विश्रांतीला प्राप्त होईपर्यन्त त्याचे ज्ञान उत्कर्षास-परिपक्वतेस पावते व जे दैव त्याच्या वाणीला अमृताचा सागरच करते १०. फार काय सांगावें! त्याच्या वक्तृत्वांतील अक्षरांना इतकी गोडी येते कीं, आल्हाद देणारे पौर्णिमेचे कोट्यवधि पूर्ण चंद्र त्याच्या वक्तृत्वावरून ओवाळून टाकावे ११. तसेंच सूर्यानें पूर्व दिशेचा अंगीकार केला म्हणजे तो सर्व जगाला प्रकाशाची राज्यसंपन्नता देतो. त्याप्रमाणें त्याची वाणी त्याच्या तोंडातून निघणाऱ्या भाषणद्वारां श्रोत्यांना ज्ञानाची दिवाळी करते १२. नादब्रह्म म्ह. मधुर गायन त्याच्या बोलण्याच्या माधुर्यापुढें फिकें पडतें व तसेंच मोक्षसुखहि त्याची योग्यता पावत नाहीं. याप्रमाणें उत्तम असें जें भाषण तेंहि ज्या भाग्यानेंच स्फुरत असते १३. श्रवणरूपी मांडवांत सर्व जगाला वसंत ऋतूचा उपभोग घेतां येईल, अशा प्रकाराच्या व्याख्यानानें त्याचा वाचारूप वेल चहूकडे पसरतो १४. काय चमत्कार सांगावा! ज्या परमात्म्याचा ठाव-पत्ता लागत नाहीं म्हणून मनासह वाणी माघारीं फिरते. असाहि जो देव, परमात्मा तो गुरुचरणउपासकाच्या मुखावाटें जीं अक्षरें निघतील त्या शब्दांचा विषय होतो १५. जें ज्ञानासहि जाणण्यास कठीण व ध्यानासहि सांपडण्यास कठीण असे जें न कळणारे निर्विशेष ब्रह्म तें त्याच्या सहज बोलण्यांत सांपडते १६. एवढें जें एक चांगलें ऐश्वर्य त्याच्या वाणीला प्राप्त होतें, तें केवळ श्रीगुरुपदकमलपरागाच्या प्राप्तीनेंच येत असते १७. श्रीज्ञानेश्वर महाराज अभिमानानें नव्हे; पण सद्गदित होऊन सोज्वळ आत्मविश्वासानें म्हणतात, फार काय सांगूं!! अशा-प्रकारचें ते भाग्य आज माझ्यावांचून दुसऱ्या ठिकाणीं नाहींच १८. याचें कारण असें कीं, मी माझ्या श्रीगुरूंचें एकुलतें एक तान्हें लेकरूं असल्यामुळें आणि माझे गुरु एकपुत्री असल्यामुळें त्यांच्या कृपेस दुसरीकडे जाण्यास जागाच नाहीं. म्हणून मी एकटाच त्या कृपेस पात्र झालों १९. असें पहा! मेघ हा एका चातक पक्ष्यास

---

१ स्वच्छ करून. २ फुलांच्या कळ्यांनीं. ३ एकनिष्ठभावरूपी उदकानें. ४ शुद्ध. ५ श्रीगुरुनिष्ठ. ६ सोन्यानें. ७ गाळून. ८ घागऱ्या. ९ दृढ झालेली. १० एकनिष्ठतेनें. ११ चांगली. १२ जोडवीं १३ आंगठ्यांत. १४ आनंदरूपी सुवासानें भरलेलें. १५ अष्टसात्त्विकभावांनीं विकसलेलें आठ पाकळ्यांचें कमळ. १६ अहंकार. १७ निरभिमान. १८ दीपें.

मेघ चातकांसी रिचंवी । मजलागीं गोसांवी । तैसें केलें ॥ २० ॥ म्हणौनि रिकामें तोंड । करूं गेलें बडबड । कीं गीता ऐसें गोड । आतुंडलें ॥२१॥ होय अदृष्ट आपैतें । तैं वाळूचि रत्नें परेते । उंजू आयुष्य तैं मारितें । लोभु करी ॥ २२ ॥ आधणीं घातलिया हरळ । होती अमृताचे तांदुळ । जरी भुकेची राखे वेळ । श्रीजगन्नाथु ॥ २३ ॥ तयापरी श्रीगुरु । करिती जैं अंगीकारु । तैं होऊनि ठाके संसारु । मोक्षमय आघवा ॥ २४ ॥ पाहा पां श्रीनारायणें । तया पांडवांचें उणें । कीजेचि ना पुरोणें । विश्ववंद्यें ? ॥ २५ ॥ तैसें श्रीनिवृत्तिराजें । अज्ञानपण हें माझें । आणिलें वोजें[२२] । ज्ञानाचिये ॥ २६ ॥ परी हें असो आतां । प्रेम रुळतैसे बोलतां । कें गुरुगौरव वर्णितां । उन्मेष असे ? ॥ २७ ॥ आतां तेणेंचि पसायें । तुम्हां संतांचे मी पायें । बोलेंगेन अभिप्रायें । गीतेचेनि ॥२८॥ तरी तोचि प्रस्तुतीं । चौदाविया अध्यायाच्या अंतीं । निर्णयो कैवल्यपंती । ऐसा केला ॥ २९ ॥ जें ज्ञान जयाच्या हातीं । तोचि समर्थु मुक्ति । जैसा शतमख संपत्ती । स्वर्गींचिये ॥ ३० ॥ कां शत एक जन्मां । जो जन्मोनि ब्रह्मकर्मा । करी तोचि ब्रह्मा । आनु नोहे ॥ ३१ ॥ नाना सूर्याचा प्रकाशु । लाहे जेवीं डोळसु । तेवीं ज्ञानेंचि सोरसु । मोक्षाचा तो ॥ ३२ ॥ तरी तया ज्ञानालागीं । कवणा पां योग्यता आंगीं । हें पाहतां जगीं । देखिला एकु ॥ ३३ ॥ जें पाताळींचेंही निधान । दावील कीर अंजन । परी होआवे लोचन । पायाळाचे ॥ ३४ ॥ तैसें मोक्ष देईल ज्ञान । येथें कीर नाहीं आन । परी तेंचि थांरे ऐसें मन । शुद्ध होआवें ॥ ३५ ॥ तरी विरक्तीवांचूनि कहीं । ज्ञानासि तेंगणेंचि नाहीं । हें विचारूनि ठाईं[२२] । ठेविलें देवें ॥ ३६ ॥ आतां विरक्तीची कवण परी । जे येऊनि मनातें वरी । हेंही सर्वज्ञें श्रीहरी । देखिलें असे ॥ ३७ ॥ जे विषें रांधिली रसेंसोये । जैं जेवणारा ठाउवी होये । तैं तो ताटचि सांडूनि जाये । जयापरी ॥३८॥ तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता । तैं वैराग्य दवडितां । पाठी लागे ॥ ३९ ॥ आतां अनित्यत्व या कैसें । तेंचि वृक्षाकारमिषें । सांगिजत असे विश्वेशें । पंचदशीं ॥ ४० ॥ उपडिलें कवतिकें । झाड येरिमोहरा ठाके । तें वेगें जैसें सुके । तैसें हें नोहे ॥ ४१ ॥ यातें एकेपरी । रूपकाचिया कुसरी । सांरीतसे वैरी । संसाराची ॥४२ ॥ करूनि संसार वोंवो । स्वरूपीं

पाणी मिळावें, म्हणून आपल्याजवळ असलेल्या संपूर्ण पाण्याचा वर्षाव करितो. त्याप्रमाणें श्रीगुरूंनीं एकट्या मजवर कृपा केली; [ त्यांत जगाचें स्वाभाविकच कल्याण होतें ] २०. म्हणून कृपेची खूण ही आहे कीं, माझें रिकामें तोंड सहज बडबड करूं लागलें असतां त्यांत गीतेवरील गोड व्याख्यान सहज झाले २१. यांत तरी विशेष आश्चर्य काय ? अहो ! प्रारब्ध अनुकूल झाले तर वाळू हातांत घेतली असतां तिचीं रत्नें होतात; आणि आयुष्याची दोरी बळकट असल्यावर मारण्यास आलेलाहि लोभ करितो २२. ज्या वेळीं ईश्वराच्याच इच्छेंत अन्न देऊन एखाद्याची भुकेची वेळ भागवावयाची असते, त्या वेळीं आधणांत बारीक बारीक वाळू वैरिली, घातली असतांहि तिचें अमृततुल्य तांदुळ होतात २३. त्याप्रमाणें जेव्हां एखाद्याचा श्रीगुरु अंगीकार करितात, तेव्हां त्याचा सर्व दुःखरूप संसारच मोक्षरूप म्हणजे सुखमय, आनंदरूप होऊन राहतो २४. पहा कीं, पांडवांचें सर्व प्रकारें सर्व प्रसंग उणें, वैगुण्यें असूनहि त्यांत भगवान् श्रीकृष्णाचा संबंध होता म्हणून त्यानें योग्यता आणून तीं सर्व जगास वंद्य अशी पुराणें करून ठेविली नाहींत कां ? २५. त्याप्रमाणें श्रीगुरु निवृत्तिमहाराजांनीं माझ्या अज्ञानपणासच ज्ञानाच्या योग्यतेस आणून बसविलें २६. परंतु हें वर्णन असो, अशा बोलण्यानें प्रेम अधिकच मलीन होत जातें आणि श्रीगुरुमाहात्म्य वर्णन करणाऱ्या [ मला तरी ] एवढें ज्ञान आहे कोठें ! २७. म्हणून आतां त्याच श्रीगुरूंच्या प्रसादबळानें व गीतेचा अभिप्राय, भावार्थ वर्णन करण्याच्या साधनानें तुम्हां संतांच्या पायांची सेवा करीन २८. चौदाव्या अध्यायाच्या शेवटीं, मोक्षदातें असे जे भगवान् श्रीकृष्ण त्यांनीं जो निर्णय केला तोच अभिप्राय आतां असा कीं २९. ज्यास ब्रह्मात्मैक्यज्ञान हस्तगत झालें आहे, तोच मोक्ष प्राप्त करून घेण्यास समर्थ [ अधिकारी ] होतो. ज्याप्रमाणें शंभर यज्ञ करणारा पुरुषच स्वर्गांतील संपत्ति [ इंद्रपद ] प्राप्त करून घेण्यास समर्थ होतो ३०. किंवा जो लागोपाठ शंभर ब्राह्मण जन्म प्राप्त होऊन तीं सारी जन्में ब्रह्मकर्म करण्यांत घालवितो, तोच काय तो निःसंशय ब्रह्मदेव होतो दुसरा कोणी होत नाहीं ३१. किंवा सूर्याचे प्रकाशाचा उपयोग जसा एका डोळसासच होतो, त्याप्रमाणें ज्ञानानेंच [ जो ज्ञानी आहे, त्याला ] मोक्षप्राप्तीचें सामर्थ्य वा सुख मिळतें ३२. तर तें ज्ञान मिळविण्यासाठींहि कोणाच्या ठिकाणीं योग्यता आहे, हें विचारानें पाहूं गेलें असता तशी योग्यता असणारा जगांत एकच पुरुष दृष्टीस पडला ३३. ज्याप्रमाणें खोल भूमिगत असलेले द्रव्यहि अंजन घातलें असतां तें निश्चयानें दाखवील, परंतु तें अंजन घालण्यास पायाळू मनुष्याचेच डोळे असावयास पाहिजेत ३४. त्याप्रमाणें ज्ञान मोक्ष देईल यांत खरोखर शंकाच नाहीं; परंतु तें ज्ञान टिकेल, अशी अंतःकरणाची भूमिका मात्र शास्त्रीय शुद्ध असली पाहिजे ३५. ह्याचा स्पष्ट अर्थ असा आहे कीं, वैराग्यवांचून कोठेंहि ज्ञान टिकून राहणारच नाहीं, असा हा देवांनीं आपल्याशींच विचार करून तसा निर्णय करून ठेविला आहे ३६. आतां वैराग्य आपण होऊन येऊन साधकाच्या मनाला माळ घालून वरील असा कोणता साधन प्रकार आहे, याबद्दल सर्वज्ञ श्रीहरींनीं विचार करून पाहिले आहे ३७. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य भोजनास बसल्यावर ' हें अन्न विष घालून तयार केलेले आहे ' असें त्यास समजतांच तो ते समोर असलेलें ताटच टाकून उठून निघून जातो, म्ह० त्यास भोजनाविषयीं विरक्ति उत्पन्न होतेच ३८. त्याप्रमाणें सर्व संसारास अनित्यता आहे. [ खरोखर संसार रज्जुसर्पवत् मिथ्या आहे ] असा ज्या वेळेला कळेल व तसा दृढनिश्चय होईल, त्या वेळेस वैराग्याला नको नको म्हणून घालवून दिले तरी, तें वैराग्य पाठीशीं लागेल अंतःकरणांत आपण होऊन प्रवेश करीलच ३९. आतां त्या संसाराला अनित्यत्व, क्षणिकत्व कसें आहे, तेंच या पंधराव्या अध्यायांत वृक्षाच्या रूपकानें विश्वनियामक भगवान् सांगत आहेत ४०. इतर झाडें स्वभावतः उन्मळून पडली असतां त्याचा शेंडा खालीं व त्यांचीं बुडें वरतीं येऊन तीं जशीं लवकर सुकतात, त्याप्रमाणें हा संसारवृक्ष ऊर्ध्वमूल असला तरी तसा सुकणारा नाहीं ४१. याप्रमाणें संसाराविषयीं झाडाचें कुशलतेनें रूपक करून भगवान् श्रीकृष्ण मुमुक्षूंस अनर्थरूप जन्ममरणात्मक संसाराच्या येरझारापासून सोडवितात ४२. संसाराचें मिथ्यात्व [ युक्तीनें, प्रमाणानें, अनुभवानें ]

१ ओततो. २ सद्गुरूनें. ३ सांपडले. ४ प्रारब्ध ५ अनुकूल. ६ परिणाम पावे. ७ सबल, सरळ, नीट. ८ मारणारें. ९ खडे. १० होतो. ११ अनादिपुरुषानें. १२ चांगुलपणास, किंमतीला. १३ भरून वाहतें. १४ उल्हास, ज्ञान. १५ प्रसादानें. १६ सांगेन. १७ श्रीकृष्णानें. १८ शंभर यज्ञ करणारा. १९ गोडी, कारण. २० स्थिर होईल. २१ स्थिर राहणें. २२ तयार करून ठेविलें, निश्चित केलें. २३ स्वयंपाक. २४ ठाऊक, माहीत. २५ उलट बाजूनें. २६ चतुराई. २७ दूर करितो. २८ येरझार, फेरी. २९ मिथ्या.

अहंते ठावो । होआवया अध्यावो । पंधरावा हा ॥ ४३ ॥ आतां हेंचि आधवें । ग्रंथगर्भींचें चांगोवें । उपलविजेल जीवें । आकर्णिजे ॥ ४४ ॥ तरी महानंद समुद्र । जो पूर्ण पूर्णिमा चंद्र । तो द्वारकेचा नरेंद्र । ऐसें म्हणे ॥ ४५ ॥ अगा पैं पंडुकुमरा । येतां स्वरूपाचिया घरा । करीतसे आडवारा । विश्वाभासु जो ॥ ४६ ॥ तो हा जगडंबरु । नोहे येथ संसारु । हा जाणिजे महातरु । थांवला असे ॥ ४७ ॥ परी येरां रुखांसारिखा । हा तळीं मूळें वरी शाखा । तैसा नोहे म्हणौनि लेखां । नयेचि कवणा ॥ ४८ ॥ आगी कां कुऱ्हाडी । होय रिगांवा जरी बुडीं । तरी हो कां भलतेवढी । वरिचीलें वाढी ॥ ४९ ॥ जे तुटलिया मूळापाशीं । उलंडेल कां शाखांशीं । परी तैशी गोठी कायशी । हा सोपा नव्हे ॥ ५० ॥ अर्जुना हें कवतिक । सांगतां असे अलौकिक । जे वाढी अधोमुखें । रुखा यया ॥ ५१ ॥ जैसा भानू उंची नेणों कें । रश्मिजाळ तळीं फांके । संसार हें कावरुखें । झाड तैसें ॥ ५२ ॥ आणि आथी नाथी तितुकें । रुंधलें असे येणेंचि एकें । कल्पांतींचेनि उदकें । व्योम जैसें ॥ ५३ ॥ कां रवीच्या अस्तमानीं । आंधारेनि कोंदे रजनी । तैसा हाचि गगनीं । मांडला असे ॥ ५४ ॥ यया फळ ना चुंबितां । फूल ना तुरंबितां । जें कांहीं पंडुसुता । तें रुखुचि हा ॥ ५५ ॥ हा ऊर्ध्वमूळ आहे । परी उन्मूळिला नोहे । येणेंचि[२] हा होये । शाड्वळु गा ॥ ५६ ॥ आणि ऊर्ध्वमूळ ऐसें । निर्गुंदिलें[३] कीर असे । परी अधींही असोसें । मूळें यया ॥ ५७ ॥ प्रबळला चौमेरी[४] । पिंपळा कां वडाचिया परी । जे पारंबियांमाझारीं । डहाळिया असती ॥ ५८ ॥ तेवींचि गा धनंजया । संसारतरु यया । अधींचि आथी खांदिया । हेंही नाहीं ॥ ५९ ॥ तरी ऊर्ध्वांहीकडे । शाखांचे मांदोडे[५] । दिसताति अपाडें । सासिन्नलें ॥ ६० ॥ जालें गगनचि पां वेलिये । कां वारा मांडला रुखाचेनि आयें । नाना अवस्थात्रयें । उदयला असे ॥ ६१ ॥ ऐसा हा एकु । विश्वाकार विटंकु । उदयला जाण रुखु । ऊर्ध्वमूळु ॥ ६२ ॥ आतां ऊर्ध्व या कवण । येथें मूळ तें किं लक्षण । कां अधोमुखपण । शाखा कैसिया ॥ ६३ ॥ अथवा द्रुमा यया । अधीं जिया मूळिया । तिया कोण कैसिया । ऊर्ध्व शाखा ॥ ६४ ॥ आणि अश्वत्थु हा ऐसी । प्रसिद्धि कायसी । आत्मविदविलासीं । निर्णयो केला ॥ ६५ ॥ हें

सिद्ध करून 'मी ब्रह्मच आहें' अशा दृढनिश्चयानें आपली 'अहंता' स्वस्वरूपीं चिरस्थिर व्हावी एवढाच या अध्यायांतला प्रतिपाद्य विषय आहे ४३. आतां मी हाच उत्तम विषय विस्तारानें व या गीताशास्त्रांतील सर्व सिद्धान्त कक्षा चांगल्या उकलून दाखवून सांगतों; आपण मनःपूर्वक ऐका. अशी महाराज संतांना प्रार्थना करतात ४४. महानंदाचा-ब्रह्मानंदाचा समुद्र, सिद्धांचा पौर्णिमेचा पूर्णचंद्र व द्वारकेचा राजा जो भगवान् श्रीकृष्ण तो अर्जुनास असें म्हणाला ४५. अरे अर्जुना! आत्मस्वरूपाच्या घराला जात असतां म्हणजे स्वस्वरूप प्राप्तीचा यथार्थ निश्चय करूं लागलें असतां मध्येंच जो दृश्यरूप विश्वाभास प्रतीत होतो, तो त्या निश्चयास अडथळा निर्माण करतो ४६. तो हा दृश्यात्मक विश्वाभास म्हणजे 'संसार' नाहीं तर हा एक मोठा बळावलेला कोणी वृक्षच आहे, अशी कल्पना कर ४७. पण इतर सर्वसामान्य झाडांची मूळें खालीं असून वर फांद्या असतात तसा हा वृक्ष नाहीं. म्हणून व्यवहारांत याचें वर्णन कोणीहि केले नाहीं, कारण याचा कोणास अंतच लागत नाहीं ४८. सामान्य वृक्षाच्या मुळाशीं कुऱ्हाडीचा शिरकाव झाला किंवा अग्नि लावला, तर वृक्षाचा वरचा विस्तार केवढा कां असेना! तरीपण ४९. तो सामान्य वृक्ष मूळापाशीं तुटला असतां शाखांसहवर्तमान उलथून, उन्मळून पडतो; तसा हा वृक्ष पडला असतां; परंतु अशा प्रकारांनीं उलथून पडण्याची गोष्ट कोठली! कारण, हा वृक्ष तितका सोपा नाहीं ५०. या संसार वृक्षाचें कौतुक सांगावयास लागले तर हा लोकविलक्षण आहे. कारण, त्याचे मूल वरच्या बाजूस आहे. व या वृक्षाची वाढ ही खालच्या बाजूला आहे ५१. ज्याप्रमाणें सूर्याची उंची किती आहे हें कळत नाहीं, पण त्याचा किरण समुदाय मात्र खालच्या बाजूला पसरतो, त्याप्रमाणें संसाररूपी वृक्ष मोठा आश्चर्यकारक आहे ५२. ज्याप्रमाणें कल्पांत समयींच्या उदकानें सर्व आकाश व्यापिलें जातें; त्याप्रमाणें आणखीहि या जगतांत जेवढें कांहीं आहे, नाहीं, तेवढें सर्वच्या सर्व या एकमेव संसार वृक्षानें अडविलें आहे, म्हणजे या झाडानें सर्व व्यापून टाकले आहे ५३. किंवा सूर्य अस्तास गेल्यावर ज्याप्रमाणें रात्र अंधारानें कोंदलेली असते, त्याप्रमाणें हा वृक्ष [ शुद्ध चैतन्याचेंच आश्रयावर ] सर्व गगनांत भरलेला आहे ५४. या संसार वृक्षाचे फळ [ सुखादि ] खावे, चाखावे म्हणून पाहूं गेले तर याला फळ नाहीं, सुगंधास हुंगावें म्हणून पाहूं गेले तर याला फूलहि नाहीं, तात्पर्य जें कांहीं आहे तें सर्व हा वृक्षच आहे ५५. याचें मूळ वर आहे, तथापि हा उपटून टाकलेला असा नाहीं. अर्जुना! याच कारणास्तव हा नेहमीं टवटवीत हिरवागार असतो ५६. आणि याचें मूळ वर आहे असें आरंभीं म्हटलें आहे खरें, तरीपण याला खालीहि पुष्कळ मूळें आहेत ५७. हा सभोंवार विस्तारला आहे तसाच हा पिंपळाप्रमाणें किंवा वडाच्या वृक्षाप्रमाणें आहे. कारण, वडाप्रमाणें याच्या पारंब्यांमध्येंहि डाहाळ्या पसरलेल्या असतात ५८. त्याप्रमाणें या संसाररूपी वृक्षास खालींच फांद्या आहेत, असाहि प्रकार नाहीं ५९. तर वरच्याहि बाजूस याला अपार फांद्यांचे समुदाय असून तेहि बरेंच विस्तार पावलेलें आहेत ६०. हा संसार वृक्ष म्हणजे आकाशाच जणुं काय या वेलरूपानें नटलें आहे किंवा या वृक्षाच्या रूपानें जणुं हा वाराच विस्तारला आहे, किंवा जागृति, स्वप्न, सुषुप्ति या अवस्थांचा किंवा उत्पत्ति, स्थिति लय यांना जणुं आश्रयरूपानें उत्पन्न झालेला हा संसार वृक्ष आहे ६१. याप्रमाणें वरच्या बाजूला मूळ असलेला व खालच्या बाजूला शाखा असलेला असा हा एक विश्वाच्या आकारानें विलक्षण वनदाट पसरलेला वृक्ष उदयास आलेला आहे, असें समज ६२. आतां या वृक्षाचा 'ऊर्ध्व' वरचा भाग काय आहे! याचे जे मूळ आहे त्या मुळाचें लक्षण काय आहे! हा अधोमुखपणानें कां वाढतो! आणि खालच्या बाजूच्या शाखा कशा आहेत! ६३. अथवा या वृक्षाला ज्या मुळ्या आहेत, त्या कोणत्या व त्यापासून वरच्या फांद्या कोणत्या व कशा आहेत! ६४. आणि या वृक्षाची 'अश्वत्थ' या नांवानें जी प्रसिद्धि आहे ती कशावरून प्राप्त झाली आहे ! या सर्वांचा, आत्मवेत्त्यांशीं विलास करणारा भगवान् श्रीकृष्ण यांनीं जो कांहीं निर्णय केला आहे. ते अर्जुनास म्हणतातः–६५. अर्जुना! या सर्व गोष्टी तुझ्या प्रतीतीस चांगल्या प्रकारानें येतील

१ मीपणाचा. २ चांगुलपण. ३ स्पष्ट केला जाईल. ४ ऐकावें. ५ पूर्णतेचा, इच्छारहितांचा. ६ राजा. ७ प्रतिबंध. ८ काढला, पसरलेला. ९ समजुतीस. १० प्रवेश. ११ केवढीहि. १२ बरील. १३ उपडेल. १४ खालीं. १५ आश्चर्यकारक. १६ व्यापलें. १७ चोखण्यास. १८ वास घेण्यास. १९ उपटलेला. २० ऊर्ध्वमूलानेंच. २१ हिरवागार. २२ सांगितलें. २३ खालीहि. २४ पुष्कळ. २५ सभोंवार २६ खालीं. २७ जुंबाडें. २८ विस्तारलें. २९ सामर्थ्यानें.

आघवेंचि बरवें । तुझिये प्रतीतीसि फावे । तैसेंनि सांगों सोलिवें । विन्यासें गा ॥ ६६ ॥ परी ऐकें गा सुभगा । हा प्रसंगु असे तुजचि जोगा । कानचि करीं हो सर्वांगा । हियें आथिलिया ॥ ६७ ॥ ऐसें प्रेमरसें सुरफुरें । बोलिलें जंव यादववीरें । तंव अवधान अर्जुनाकारें । मूर्त जालें ॥ ६८ ॥ देव निरूपिती तें थेंकुलें । येवढें श्रोतेपण फांकलें । जैसे आकाशा खेंव पसरिलें । दाही दिशीं ॥ ६९ ॥ श्रीकृष्णोक्तिसागरा । हा अगस्तीचि दुसरा । म्हणौनि घोंटु भरों पाहे एकसरा । अवघेयाचा ॥ ७० ॥ ऐसी सोय सांडूनि खवळिली । आवडी अर्जुनीं देवें देखिली । तेथ जालेनि सुखें केली । कुरवंडी तया ॥ ७१ ॥

श्रीभगवानुवाच :—

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् । छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥

मग म्हणे धनंजया । तें ऊर्ध्व गा तरू यया । येणें रुखेंचि कां जयां । ऊर्ध्वता गमे ॥ ७२ ॥ एऱ्हवीं मध्योर्ध्व अध । हे नाहीं जेथ भेद । अद्वयासीं एकवद । जया ठायीं ॥ ७३ ॥ जो नाइकिजतां नादु । जो असौरभ्य मकरंदु । जो आंगाथिला आनंदु । सुरतेविण ॥ ७४ ॥ जया जें आन्हां परौतें । जया जें पुढें मागौतें । दिसतेनविण दिसतें । अदृश्य जें ॥ ७५ ॥ उपाधीचा दुसरा । घालितां वोपसरा । नामरूपाचा संसारा । होय जयातें ॥ ७६ ॥ ज्ञातृज्ञेयाविहीन । नुसधेंचि जें ज्ञान । सुखा भरलें गगन । गाळींव जें ॥ ७७ ॥ जें कार्य ना कारण । जया दुजें ना एकपण । आपणयां जें जाण । आपणचि ॥ ७८ ॥ ऐसें वस्तु जें साचें । तें ऊर्ध्व गा यया तरूचें । तेथ आर घेणें मूळाचें । तें ऐसें असे ॥ ७९ ॥ तरी माया ऐसी ख्याती । नसतीच यया आथी । कां वांझेची संतती । वानणें जैशी ॥ ८० ॥ तैसी सत् ना असत् होये । जे विचाराचें नाम न साहे । ऐसेया परीची आहे । अनादि म्हणती ॥ ८१ ॥ जे नानातत्त्वांची मांदुस । जे जगदभ्राचें आकाश । जे आकारजाताचें दुस । घडी केलें ॥ ८२ ॥ जे भवद्रुमबीजिका । जे प्रपंचचित्र भूमिका । विपरीत ज्ञानदीपिका । सांचली जे ॥ ८३ ॥ ते माया वस्तूच्या ठायीं । असे जैसेनि

असें स्वच्छ उद्‌बोधक, विस्तारानें, तुला सांगतों ६६. हे भाग्यवंता ! हे निरूपण ऐकण्यास अधिकारसंपन्न असा तूंच आहेस. एवढ्याकरितां हे व्यवस्थित–अंतःकरणसंपन्न अर्जुना ! तूं आपल्या सर्व अंगाला कानच कर, म्हणजे एकाग्र चित्त होऊन ऐक ६७. यादववीर जो श्रीकृष्ण भगवान् त्यानें याप्रमाणें नितान्त प्रेमरसानें भरलेले असें भाषण केले. त्या वेळीं अर्जुनाच्या आकारानें अवधान हेंच मूर्तिमंत प्रगट झाले ६८. ज्याप्रमाणें आकाश एवढे मोठे असूनहि त्यास जसे दाही दिशांनीं आलिंगनानें कवटाळलें आहे, त्याप्रमाणें अर्जुनाचा श्रोतेपणा एवढा वाढला कीं, त्याच्या अवधानापुढे देवांनी कितीहि विस्तृत निरूपण केलें तरी तें थोडेच झाले ! ६९. श्रीकृष्णाच्या निरूपणरूपी समुद्रास अर्जुनाचें अवधान हाच कोणी एका आचमनांत संपविणारा दुसरा अगस्ती ऋषिच होय. म्हणूनच तर आतां श्रीकृष्ण जें सांगतील त्या सर्वांचा एकच घोंट भरण्यास अर्जुन प्रवृत्त झाला ७०. अर्जुनाच्या ठिकाणीं ऐकण्याची अशी अमर्याद इच्छा उत्पन्न झालेली पाहिली तेव्हां श्रीकृष्णांनीं आपल्यास झालेलें जें सुख–समाधान त्या सुखाची त्याच्यावरून ओवाळणी केली ७१.

**अन्वयार्थ––ऊर्ध्वमूलं**–सर्वोत्तम ब्रह्म ज्याचे मूळ आहे **अधःशाखं**–ज्याच्या शाखा त्या मूळाच्या आपेक्षेनें खालीं आहेत म्ह० अगदीं निकृष्ट आहेत,–**अव्ययं**–जो कधींहि क्षय पावत नाहीं असा–**अश्वत्थं**–वृक्ष–क्षणभंगुर संसार-वृक्ष–**प्राहुः**–सांगतात–**यस्य**–ज्या संसारवृक्षाची–**पर्णानि** पानें–**छन्दांसि**–वेद आहेत–**यः**–जो–**तं**–त्या वृक्षाला–**वेद**–जाणतो **सः**–तो–**वेदवित्**–वेदवेत्ता–वेदाला जाणणारा आहे १.

मग श्रीकृष्णभगवान् अर्जुनास म्हणतातः–धनंजया ब्रह्म हे या संसार वृक्षाचे ऊर्ध्व–वर आहे; [ येथें ऊर्ध्व म्हणजे उंच, उंच म्हणजे श्रेष्ठ, श्रेष्ठ म्हणजे सर्वोत्तम, सर्वोत्तम म्हणजे ब्रह्म असा ऊर्ध्व शब्दाचा मुख्य अर्थ आहे ] आणि खालीं असलेल्या या संसारवृक्षामुळेंच त्या ब्रह्मास ऊर्ध्वता वाटत आहे असें म्हणावें लागतें ७२. नाहींतर वास्तविक ज्या ब्रह्माच्या ठिकाणीं मध्य, ऊर्ध्व व अध [ मध्यें, वर व खालीं ] हे भेद कोठून असणार ? तर नाहींत;. किंबहुना ! ! ज्याचे ठिकाणीं दुसरें वा द्वैत असें कांहींच नाहीं; या बाबतींत एक-वाक्यता आहे ७३. तें ब्रह्म म्हणजे तंतुवाद्यापासून उत्पन्न होऊन, कानाला विषय होऊन ऐकूं येणाऱ्या नादाच्या पूर्वीचा जो मूळ नाद, तसेंच नाकाला विषय न होणाऱ्या सुगंधाच्या मूळचा जो मकरंद–सुगंध व जो विषयसेवनाशिवाय, भोग्य साधन निरपेक्ष असलेला, मूर्तिमन्त, सोलीव स्वरूपानंद आहे ७४. जे अलिकडे व पलिकडे, पुढें व मागें अशा मर्यादेविना सर्वव्यापक आहे व जे पाहाणारा वांचून, जे पाहणें म्हणजे स्वयंप्रकाश आहे आणि जे अदृश्य–सर्व प्रमाणास अविषय आहे ७५. ज्या ब्रह्माच्या ठिकाणीं मायारूप कल्पित उपाधीचा ओपसरा [ आध्यासिक संबंध ] घातला, मानिला असतां नामरूपादि प्रपंचाचा विस्तार, व्यवहार होतो, [ तें ब्रह्म होय ] ७६. जें ब्रह्म, ज्ञाता व ज्ञेय या दोही वांचून केवळ शुद्ध भरीव ज्ञानमात्र आहे व जें सर्व जगात निरुपाधिक गगनांतून गाळलेलें म्हणजे त्याहीपेक्षां सूक्ष्म व सुखानें भरलेले आहे ७७. तसेंच जें कोणापासून उत्पन्न झालेलें नाहीं म्हणून कार्य नाहीं व ज्याच्यापासूनहि कांहीं होत नसल्यामुळें कारणहि नाहीं, ज्याला दुसरें वा दुसरेपण नाहीं व त्यासापेक्ष येणारे एकपणहि नाहीं व जें स्वयंप्रकाश असून आपणच आपल्या महिमेंत असते, असें समज ७८. याप्रमाणें जें सत्य ब्रह्म तत्त्व तें या संसार तरूचें ऊर्ध्वमूळ अधिष्ठान आहे. ऊर्ध्वाचें ठिकाणीं या वृक्षाचें मूळ जी माया ती आरंभीं कशी अंकुरित होते ते पुढें सांगतो ते असे ७९. आतां 'माया' अशी जिला नसतीच ख्याति लाभली आहे ती वस्तुतः नाहींच, परंतु 'आहे' अशी तिची प्रसिद्धि आहे. बाकी जगत तिचा विस्तार आहे इत्यादि नुसत्या पोकळ गोष्टी आहेत, जशी वांझेची संतति वर्णन करणे पोकळ शब्दमात्र आहे ८०. [ आतां जगद्रूपी कार्याच्या संगतीकरितां कारण माया मानावी लागली, तर सतासताहून विलक्षण अनिर्वचनीय मानली पाहिजे ] ती अनिर्वचनीय कशी ? असें विचारशील तर माया विचारानें नाश पावते, बाधित होते म्हणून 'सत्' नाहीं. जग हे तिचे कार्यरूपानें प्रतीत होते, म्हणून 'असत्' नाहीं. विचाराचें जिला नांव सहन होत नाहीं. अशा प्रकारें ही सतासताहून विलक्षण आहे. तिला 'अनादि' असें म्हणतात ८१. शिवाय जी पंचभूतादि अनेक तत्त्वांची जणुं पेटीच होय, जी जगद्‌रूप अभ्राला आधार-भूत आकाश होय व अखिल विश्वाकाररूपी वस्त्राची जणुं घडीच होय ८२. असें असल्यामुळें जी संसाररूप वृक्षाची बीज आहे, जी माया प्रपंचरूप चित्र काढण्याची भूमिका आहे व जी परब्रह्मज्ञानाशिवाय इतर विपरीत ज्ञानाच्या प्रकाशानें युक्त अशी भडकती, खडी दिवटीच, मशालच आहे ८३. याप्रमाणें वर्णन केलेली जी माया

नाहीं। मग वस्तुप्रभाचि पाही। प्रगट होये ॥ ८४ ॥ जेव्हां आपणया आली निद। करी आपणपें जेवीं मुग्ध । कां काजळी आणि मंद । प्रभा दीपीं ॥ ८५ ॥ स्वप्नीं प्रियापुढें तरुणांगी । निदेली चेववूंनि वेगीं । आलिंगिलेनिवीण आलिंगी । सकामु करी ॥ ८६ ॥ तैसी स्वरूपीं जाली माया । आणि स्वरूप नेणे धनंजया । तेंचि रुखा यया । मूळ पहिलें ॥ ८७ ॥ वस्तूसी आपुला जो अबोधु । तो ऊर्ध्वीं आंठुळैजे कंदु । वेदांतीं हाचि प्रसिद्धु । बीजभावो ॥ ८८ ॥ घनं अज्ञान सुषुप्ती । तो बीजांकुरभावो म्हणती । येर स्वप्न हनं जागृती । हा फळभावो तियेचा ॥ ८९ ॥ ऐसी यया वेदांतीं । निरूपणभाषाप्रतीती । परी तें असो प्रस्तुतीं । अज्ञान मूळ ॥ ९० ॥ तें ऊर्ध्व आत्मा निर्मळें। अधोर्ध्व सूचिंती मूळें। बळिया बांधोनि आळें । मायायोगाचें ॥ ९१ ॥ मग आंधिलीं सदेहांतरें । उठती जियें अपारें । ते चौपांसी घेऊनि आगारें । खोलावेंती ॥ ९२ ॥ ऐसें भवद्रुमांचें मूळ। हें ऊर्ध्वीं करी बळ। मग आणियांचें बेंचेंळ । अधीं दावी ॥ ९३ ॥ तेथ चिद्वृत्ती पहिलें । महत्तत्त्व उमलेंलें। तें पान वाल्हेंदुल्हें। एक निघे ॥ ९४ ॥ मग सत्त्वरजतमात्मकु। त्रिविध अहंकारु जो एकु । तो तिवंणा अधोमुखु । डिरुं फुटे ॥ ९५ ॥ तो बुद्धीची घेऊनि आगेंारी। भेदाची वृद्धि करी । तेथ मनाचे डाळ धरी । सोंजेपणें ॥ ९६ ॥ ऐसा मूळाचिया गोंढिका । विकल्पेंरस कोंवाळिका । चित्तचतुष्टेंय डाहाळिका। कोंभैजे तो ॥ ९७ ॥ मग आकाश वायु द्योतकें । आप पृथ्वी हें पांच फोंक। महाभूतांचें सरोख । सरळे होती ॥ ९८ ॥ तैसीं श्रोत्रादि तन्मात्रें । तियें अंगवसां गर्भपत्रें। लुव्ल्लुळितें विचित्रें। उमळती गा ॥ ९९ ॥ तेथ शब्दांकुर वरिपडी। श्रोत्रा वाढी देव्हडी। होता करित कांडीं। आकांक्षेचीं ॥ १०० ॥ अंगत्वचेचे वेलपल्लव । स्पर्शांकुरीं घेती धांव । तेथ बांबळ पडे अभिनव । विकारांचें ॥ १ ॥ पाठीं रूपपत्र पालोवेलीं । चक्षु लांब तें कांडें घाली । ते वेळीं व्यामोहता भली । पाहाळीं जाय ॥ २ ॥ आणि रसाचें आंगवसें। वाढतां वेगें बहुवसें । जिव्हे आर्तीची असोसें । निघती बेंचें ॥ ३ ॥ तैसेंचि कोंभैलेनि गंधें । घ्राणाची डिरी थांवु बांधे । तेथ तळु घे स्वानंदें। प्रलोभाचा ॥ ४ ॥ एवं महदहंबुद्धि । मनें महाभूतसमृद्धी । इये संसाराचिया अवधी । सासनिजे ॥ ५ ॥ किंहुबना इहीं आठें । आंगीं हा अधिक फांटे । परी

ती ब्रह्मवस्तूच्या ठिकाणीं नसल्यासारखीच आहे. मग जितका ज्ञानव्यवहार दिसतो, तितका परमात्मवस्तूचाच प्रकाश प्रकट होतो, असें समज ८४. तसें ज्ञान कां होत नाहीं, असें म्हणशील तर, जेव्हां आपल्याला निद्रा आली असतां ती जशी आपल्याला ज्ञानशून्य–मूढ करते किंवा दिव्याच्या ज्योतीला काजळी येते तेव्हां त्याच्याच आश्रयानें असणारी काजळी दिव्याच्या प्रभेला मंद करिते ८५. अथवा स्वप्नांत एखाद्या मनुष्याजवळ त्याच्याच कल्पनेनें उत्पन्न होऊन निजलेली तरुण स्त्री स्वप्नांतच त्यास चट्कन् जागा करून त्यास खरोखर आलिंगन दिल्यावांचून, आलिंगन देऊन त्या पुरुषाला खरोखर सकाम करिते ८६. त्याप्रमाणें अर्जुना! ब्रह्मस्वरूपाच्याच आश्रित ही माया असून आवरणशक्तीनें ती ब्रह्माच्याच आनंदाद्वय रूपाला आच्छादन करते. [ मायेला शास्त्रांत स्वाश्रया–स्वविषया असें म्हटलें आहे, त्याचेंच हें व्याख्यान आहे. ] त्या वेळीं ही माया आपला आश्रय जें ब्रह्मस्वरूप त्याचें नेणणें म्हणजे अज्ञान निर्माण करते आणि ते अज्ञान या संसारवृक्षाचें ऊर्ध्व जें ब्रह्म त्याच्या ठिकाणीं पहिलें मूळ आहे ८७. ब्रह्मवस्तूचे ठिकाणीं [ लोकदृष्टया ] मायेच्या आवरणानें होणारें जें आपलें अज्ञान तेंच ऊर्ध्व जें ब्रह्म त्याच्या ठिकाणीं प्रथम संसारवृक्षाचा कंद बळकट होतो, व त्यालाच वेदांतशास्त्रामध्यें संसाररूप वृक्षाचा '**बीजभाव**' [ कारणाध्यास ] असें नांव प्रसिद्ध आहे ८८. निबिड, केवळ अज्ञान अशी जी सुषुप्ति तिला '**बीजांकुरभाव**' वस्तूच्या अबोधरूपी बीजाची अंकुरितदशा म्हणतात आणि तिचाच परिणाम असणाऱ्या स्वप्न व जागृति या इतर दोन अवस्था त्यांना '**फलभाव**' [ कार्याध्यासरूप अवस्था ] म्हणतात ८९. अशा रीतीनें मायेचें वर्णन भिन्नभिन्न प्रकारानें वेदान्तशास्त्रांत केल्याचा अनुभव आहे; परंतु ते असो. सध्या या संसाररूप वृक्षाचें 'मूळ' म्ह० कारण अज्ञान आहे, असें समज ९०. निर्मळ निरुपाधिक ब्रह्मरूप आत्म्याचे ठिकाणीं सहज असणारी जी माया, तिचा [ आध्यासिक ] संबंध दृढ होणें हें आळें तयार होऊन त्यांत खालच्या व वरच्या बाजूस मुळें निघून तीं मुळेंहि बळकट होतात ९१. मग खालच्या बाजूस निरनिराळें अनंत देह उत्पन्न होतात. ते चार प्रकारचे अंकुर घेऊन जोरावतात ९२. याप्रमाणें संसाररूपी झाडाचें जें मूळ, [ माया ] ते वर म्ह० ब्रह्माच्या ठिकाणीं बळकट होतें, नंतर लागलींच अग्राचे झुपकेच्या झुपके जोराऊन खालीं येतात ९३. त्या अंकुराच्या झुपक्यांत पहिली ज्ञानरूप वृत्ति जी माया तिच्यापासून महत्तत्त्व हेंच उमललेलें पहिल्या प्रथमचें एक कोंवळें लुसलुशीत पान निघते ९४. नंतर सत्त्वरजतमात्मक जो तीन प्रकारचा अहंकार, तो एक तीन पानांचा व खालीं मुख असलेला अंकुर खालच्या बाजूस फुटतो ९५. तो [ अहंकार ] सत्त्वापासून निर्माण होणारी बुद्धिरूप दुसरी डाहाळी फुटून भेदाची वृद्धि करतो; त्या योगानें मनरूपी डाहाळीस ओलावा मिळून ती टवटवीत होऊन वाढूं लागते ९६. त्याप्रमाणें 'मूळ' नितान्त बळकट झाल्यावर, विकल्परूपी रसाच्या कोंवळेपणानें भरलेल्या अशा त्याला चित्तचतुष्टय ह्या चार लहान लहान डाहाळ्या फुटतात ९७. मग [ तामस अहंकारापासून ] आकाश, वायु, तेज, पाणी व पृथ्वी हे पंचमहाभूतांचे पांच फोंक वेगानें, जोरानें व सरळ निघतात ९८. त्याप्रमाणें त्या फोंकाला श्रोत्रादि पंचज्ञानेंद्रियें व त्यांचे सूक्ष्म तन्मात्रा शब्दादि विषय हीं कोंवळी, पूर्ण न उमललेली, चित्रविचित्र पालवी फुटते ९९. नंतर शब्दरूपी अंकुरापर्यंत कानाची [ वृत्ति ] व्याप्ति, मोठी वाढ होत असतां ऐकण्याची इच्छारूपी कांडे पूर्ण करते १००. मग शरीरांतील त्वगिंद्रियात्मक हीं वेल आणि पानें फुटून ती स्पर्शरूपी अंकुरापर्यंत धांव घेतात आणि मग नानाप्रकारच्या नवनवीन विकारांचें आधिक्य होतें १. पुढें रूप विषयात्मक पानें फुटून वाढली असतां तेथपर्यंत लांबलचक कांडे घालते म्हणजे डोळा हा भ्रमानें त्याची गोडी घेण्याविषयीं धांव घेतो २. रसरूपी फांदी अतीव वेगानें फुटून जिभेस अपार इच्छारूपी पानांतली पानें उत्पन्न होतात ३. त्याचप्रमाणें 'गंध' विषयरूपी कोंब येऊन नाकाचा इच्छारूपी अंकुर फार प्रबळ होतो. घ्राणेंद्रियास अतिशय लोभ उत्पन्न होतो ४. याप्रमाणें महत्तत्त्व, मन, बुद्धि, अहंकार व पंचमहाभूतांचा समुदाय अशी जी अष्टधाप्रकृति, ती या मायेपासून प्रपंचाच्या शेवटापर्यंतचा असीम विस्ताररूपानें तयार होते ५. फार काय सांगावें ! ! परंतु हा वृक्ष ह्या आठ प्रकारांनीं अधिकाधिकच वाढतो,

१ जागी करून. २ ब्रह्माचें ठिकाणीं. ३ बनतो. ४ माया. ५ गाढ. ६ आणि. ७ निघतात. ८ प्रथम. ९ अंकुर. १० चार प्रकारचे. ११ अंकुर. १२ खालीं जातात. १३ संसाररूपी झाडानें. १४ झुपके. १५ ज्ञानरूपी वृत्ति. १६ अंतःकरण. १७ उत्पन्न झालें, फुललें. १८ अतिप्रिय, कोंवळें. १९ तीन पानी. २० अंकुर. २१ डहाळी. २२ टवटवीतपणानें. २३ दृढतेनें. २४ भेदरूपी. २५ बुद्धि, मन, अहंकार व चित्त. २६ अंकुर घेतो. २७ तेज.

शिंपीचियेवढें उमटे । रुपें जेवीं ॥ ६ ॥ कां समुद्राचेनि पैसारें । वरी तरंगता आसारे । तैसें ब्रह्मचि होय वृक्षाकारें । अज्ञानमूळ ॥ ७ ॥ आतां याचा हाचि विस्तारु । हाचि यया पैसारुं । जैसा आपणपें स्वप्नीं परिवारु । येकाकिया ॥ ८ ॥ परी तें असो हें ऐसें । कांवरें झाड उसंसे । यया महदादि ओरवसें । अधोशाखा ॥ ९ ॥ आणि अश्वत्थु ऐसें ययातें । म्हणती जे जाणते । तेंही परिस हो येथें । सांगिजैल ॥ ११० ॥ तरी श्वः म्हणिजे उखां । तोंवरी एकसारिखा । नाहीं निर्वाहो यया रुंखा । प्रपंचरूपा ॥ ११ ॥ जैसा न लोटतां क्षणु । मेघु होय नाना वर्णु । कां विजु नसे संपूर्णु । निमेषभरी ॥ १२ ॥ ना कांपतया पद्मदळा । वरीलिया बैसका नाहीं जळा । कां चित्त जैसें व्याकुळा । माणुसाचें ॥ १३ ॥ तैसीचि ययाची स्थिती । नासत जाय क्षणक्षणाप्रती । म्हणौनि ययातें म्हणती । अश्वत्थु हा ॥ १४ ॥ आणि अश्वत्थु येणें नांवें । पिंपळु म्हणती स्वभावें । परी तो अभिप्राय नोहे । श्रीहरीचा ॥ १५ ॥ एऱ्हवीं पिंपळु म्हणतां विखीं । मियां गति देखिली असे निकी । परी तें असो काय लौकिकीं । हेतु काज ॥ १६ ॥ म्हणौनि हा प्रस्तुतु । अलौकिकु परियेसा ग्रंथु । तरी क्षणिकत्वेंचि अश्वत्थु । बोलिजे हा ॥ १७ ॥ आणीकुही येकु थोरु । यया अव्ययत्वाचा डगरु । आथी परी तो भीतरु । ऐसा आहे ॥ १८ ॥ जैसा मेघांचेनि तोंडें । सिंधु एके आंगें काढे । आणि नदी येरीकडे । भरितीच असती ॥ १९ ॥ तेथ वोहटे ना चढे । ऐसा परिपूर्णचि आवडे । परी ते फुली जंव नुघडे । मेघानदींची ॥ १२० ॥ ऐसें या रुखाचें होणें जाणें । न तर्के होतेनि वहिलेपणें । म्हणौनि ययातें लोकु म्हणे । अव्ययु हा ॥ २१ ॥ एऱ्हवीं दानशीळु पुरुषु । वेंचकपणेंचि संचकु । तैसा व्ययेंचि हा रुखु । अव्ययो गमे ॥ २२ ॥ जातां वेगें बहुवसें । न वचे कां भूमीं रुतलें असे । रथाचें चक्र दिसे । जियापरी ॥ २३ ॥ तैसें काळातिक्रमें जे वाळे । ते भूतशाखा जेथ गळे । तेथ कोडीवरी उमाळे । उठती आणिक ॥ २४ ॥ परी येकी केधवां गेली । शाखाकोडी केधवां जाली । हें नेणवे जेवीं उमललीं । आषाढअभ्रें ॥ २५ ॥ महाकल्पाच्या शेवटीं । उदेलिया उमळती सृष्टी । तैसेंचि आणिखींचें दांग उठी । सासिन्नलें ॥ २६ ॥ संहारवातें प्रचंडें । पडती प्रळयांतींचीं सालडें । तंव कल्पादीचीं जुंबाडें । पाल्हेजती ॥ २७ ॥ रिगे

तरीपण भासलेलें रूपें जसें आपलें अधिष्ठान असलेल्या शिंपीच्या आकाराएवढेंच भासतें [ संसार कितीहि वाढला तरी त्याचें अधिष्ठान ब्रह्मापेक्षां अधिक वाढत नाहीं. किंतु ज्ञात अशा सामान्य एकांशावर तेवढाच भासतो] ६. किंवा समुद्रावर उत्पन्न होणाऱ्या लाटा ज्याप्रमाणें समुद्राएवढ्या असून पोकळ केवळ भासत असतात, त्याप्रमाणें, अज्ञानमूलक जो हा जगद्रूपी वृक्ष, तो ब्रह्मच तत्त्वतः अधिष्ठानरूपानें व्यापून बनतो ७. ज्याप्रमाणें स्वप्नांत एकादा मनुष्य एकटाच असून जें जें कांहीं पाहतो, तो सर्व परिवार आपणच होतो त्याप्रमाणें एकमेव जें ब्रह्म त्याच्याच हा सर्व संसारवृक्ष विस्तार आहे. [ संसार वृक्षात्मक भ्रमाचें अधिष्ठान ब्रह्मचैतन्य असून त्याचाच विशाल विश्वरूपानें अतात्त्विक परिणाम संभवतो, त्यामुळें ब्रह्म विवर्तोपादान कारण आहे ] त्यावरच हा विस्तार भासतो ८. परंतु यावरील सर्व गोष्टी बाजूस ठेव. याप्रमाणें हा आश्चर्यकारक भ्रमात्मक संसारवृक्ष वाढतो व याला महत्तत्त्वादि अंकुरापासून खालच्या बाजूस फांद्या फुटतात ९. आणि या झाडाला ज्ञाते लोक 'अश्वत्थ' असें जें म्हणतात, [ ते कां ! ] त्याबद्दलहि तुला येथे सांगतों तें ऐक ११०. तर श्व [ श्वः ] याचा अर्थ 'उद्या' तोपर्यंत वा तसें म्हणेतोपर्यंतहि या प्रपंचरूपी झाडाचें एक स्वरूप टिकून रहात नाहीं. म्हणून याला 'अश्वत्थ' असें म्हणतात. [ संस्कृतांत क्षणभरहि ज्यास एकसारखें टिकणें नाहीं तों 'अश्वत्थ' होय ] ११. ज्याप्रमाणें फक्त एक क्षण लोटला नाहीं तोंच मेघाचे नानातऱ्हेचें रंग बदलतात, किंवा वीज संपूर्ण एक निमिषमात्र देखील पूर्णपणें टिकत नाहीं १२. कमलाच्या हलणाऱ्या पानावर जसें पाणी मुळींहि ठरत नाहीं, किंवा व्याकुळ झालेल्या मनुष्याचें चित्त ज्याप्रमाणें स्थिर नसतें १३. त्याचप्रमाणें या संसाररूपी झाडाची स्थिति आहे. अर्थात् हा वृक्ष प्रत्येक क्षणास नाश पावतो, म्हणूनच याला ज्ञाते 'अश्वत्थ' असें म्हणतात १४. आणि व्यवहारांत 'अश्वत्थ' म्हणजे पिंपळ असें म्हणतात खरे; परंतु तसा पिंपळ सांगण्याचा श्रीहरीचा या ठिकाणीं अभिप्राय नाहीं १५. नाहींतर या झाडास 'पिंपळ' या अर्थानें 'अश्वत्थ' म्हटलें असतें तर ती उपमाहि लौकिक दृष्टीनें बरी आहे असें मलाहि वाटलें असतें; परंतु लौकिक अर्थ प्रतिपादन करण्याशीं मला काय करावयाचे आहे १६. म्हणून सध्या हा या वृक्षासंबंधींचा अलौकिक व्याख्यान ग्रंथ ऐका. तर संसाररूपी वृक्ष हा क्षणिक आहे, याच अभिप्रायानें देवांनीं याला 'अश्वत्थ' असें म्हटलें आहे १७. आणखीहि या वृक्षाला 'अव्यय' म्हणजे नित्य या नांवानें खोटीच मोठी प्रसिद्धि आहे, परंतु ह्याच्या [ अव्ययत्वाचा ] गर्भित-अर्थ असा आहे १८. कीं, ज्याप्रमाणें समुद्र एका अंगानें मेघांच्या तोंडांनीं उपसला जाऊन आटत असतो, आणि दुसरीकडून त्यास नद्या एकसारख्या भरीतच असतात १९. म्हणून तो समुद्र आटतहि नाहीं व वाढतहि नाहीं, असा निरंतर परिपूर्णच आहे, असा दिसतो; परंतु जोंपर्यंत मेघांचें शोषण करणें किंवा नद्यांचें समुद्रास मिळणें या दोहोंचा, उपर्युक्त एकमेकांच्या संबंधाचा उकल होत नाहीं, तोंपर्यंतच तो पूर्ण होय १२०. त्याप्रमाणें, या संसाररूपी झाडाचे उत्पन्न होणें व लयास जाणें हीं अतित्वरेनें होतात, म्हणून त्याविषयीं निश्चित तर्कच करितां येत नाहीं. यास्तव लोक याला 'अव्यय' असें म्हणतात २१. एऱ्हवीं जसा दानशील पुरुष हा जरी दानधर्म करून सर्व पैसा खर्च करून टाकितो असें दिसते, तरी तो तसा खर्च करींत नसून त्या खर्चाच्या रूपानें पुढील जन्मीं आपल्यास पुण्यात्मक ठेवच जोडतो, त्याचप्रमाणें हा वृक्ष अति वेगानें उत्पत्ति, स्थिति व लय पावत असल्यामुळें लोकांस 'नित्य' असा भासतो २२. रथाचें चाक भूमीवर न टेकतां अति वेगानें फिरत असतां त्याची गति लोकांस दिसत नाहीं, त्यामुळें ज्याप्रमाणें तें फिरत नाहीं, स्थिर व जमिनींत रोवलेलें आहे असें भासतें २३. त्याप्रमाणें कालाच्या अतीव वेगामुळें ह्या झाडाची जी एक प्राणिरूप शाखा वाळते व त्यामुळें गळून पडते, तोंच पुनः तीस त्या ठिकाणीं कोट्यवधि अंकुर फुटतात २४. आषाढ महिन्यांत सारखीं अभ्रांवर अभ्रें येत असलीं म्हणजे कोणचीं अभ्रे केव्हां आलीं व कोणचीं केव्हां गेलीं हें जसें कळत नाहीं, त्याप्रमाणें या संसार वृक्षाची एक खांदी केव्हां गळाली व तेथेंच कोट्यवधि दुसऱ्या फांद्या केव्हां फुटल्या हें कळत नाहीं २५. त्याप्रमाणें प्रलय-कालाचें शेवटीं ह्या संसाररूपी वृक्षाच्या उत्पन्न झालेल्या सृष्टीरूपी शाखा गळून पडतात व पुनः जगदोत्पत्तीच्या वेळीं नव्या पुष्कळ शाखा समुदाय फुटतात २६. संहारकालाच्या प्रचंड वाऱ्यानें प्रलयाच्या अंतीं जीर्ण शरीरेंरूपी साली गळून पडतात न पडतात तोंच कल्पाच्या सुरवातीस पुनः सृष्टिसमुदायात्मक झुबक्यांचें झुबके उगवतात २७. मग एका मन्वंतरापुढें

१ विस्तारानें. २ पसरते. ३ पसारा. ४ भ्रमात्मक, आश्चर्यकारक. ५ प्रगट होतें. ६ अंकुर. ७ उद्या. ८ वृक्षाला.

मन्वंतर मनूपुढें । वंशावरी वंशांचे मांडे । जैसी इक्षुवृद्धी कांडेंनकांडें । जिंकें जेवीं ॥ २८ ॥ कलियुगांतीं कोरडी । चहूं युगांचीं सालें सांडी । तंव कृतयुगाची पेली देव्हेडी । पडे पुढती ॥ २९ ॥ वर्ततें वर्ष जाये । तें पुढिला मुळंहारी होये । जैसा दिवसु जात कीं येत आहे । हें चोजवेना ॥ १३० ॥ जैशा वारियाचा झुळका । सांदा ठाउवां नव्हे देखा । तैसिया उठती पडती शाखा । नेणों किती ॥ ३१ ॥ एकी देहाची डिरी'' तुटे । तंव देहांकुरीं बहुवी फुटे । ऐसेनि भवतरु हा वाटे । अव्ययो ऐसा ॥ ३२ ॥ जैसें वाहतें पाणी जाय वेगें । तैसेंचि आणिक मिळे मागें । येथ असंताचि असिजे जगें । मानिजे संत ॥ ३३ ॥ कां लागोनि डोळां उघडे । तंव कोडीवरी घडे मोडे । नेणतया तरंगु आवडे । नित्यु ऐसा ॥ ३४ ॥ वायसा एकें बुबुळें दोहींकडे । डोळा चाळितां अपाडें । दोन्ही आथी ऐसा पडे । भ्रमु जेवीं जगा ॥ ३५ ॥ पैं भिंगोरी निधियें पडली । ते गमे भूमीसी जैसी जडली । ऐसा वेगातिशयो भुली । हेतु होय ॥ ३६ ॥ हें बहु असो झडती । आंधारें भोवंडितां कोलती । ते दिसे जैसी आयती । चक्राकार ॥ ३७ ॥ हा संसारवृक्षु तैसा । मोडतु मांडतु सहसा । न देखोनि लोकु पिसा । अव्ययो मानी ॥ ३८ ॥ परी ययाचा वेगु देखे । जो हा क्षणिक ऐसा वोळखे । जाणे कोडीवेळां निमिखें । होत जात ॥ ३९ ॥ नाहीं अज्ञानावांचूनि मूळ । ययाचें असिलेंपण टवाळ । ऐसें झाडचि सिनसाळ । देखिलें जेणें ॥ १४० ॥ तयातें गा पंडुसुता । मी सर्वज्ञुही म्हणें जाणता । पैं वाग्ब्रह्म सिद्धांता । वंद्यु तोची ॥ ४१ ॥ योगजाताचें जोडलें । तया एकासीचि उपेगा गेलें । किंबहुना जियालें । ज्ञानही त्याचेनी ॥ ४२ ॥ हें असो बहु बोलणें । वानिजैल तो कवणें । जो भवरुखु जाणें । उखि ऐसा ॥ ४३ ॥

अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।
अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ॥ २ ॥

मग ययाचि प्रपंचरूपा । अधोशाखिया पादपा । डाहाळिया जाती उमपा । ऊर्ध्वाही उजू ॥ ४४ ॥ आणि अधीं फांकली डाळें । तिये होती मूळें । तयाही तळीं पघळे । वेल पालवु ॥ ४५ ॥ ऐसें जें आम्हीं । म्हाणितलें उपक्रमीं । तेंही परिसें सुगमीं । बोलीं सांगों ॥ ४६ ॥ तरी बद्धमूळ अज्ञानें । महदादिकीं सासिनें । वेदांचीं थोरवनें । घेऊनियां ॥ ४७ ॥ परी आधीं तंव स्वेदज । जारज

दुसरें मन्वंतर, याप्रमाणें सूर्यवंश, चंद्रवंश असा वंश वृद्धीचा विस्तार होतो व ऊंस ज्याप्रमाणें पेऱ्यापेऱ्यानें वाढत जातो, त्याप्रमाणें हें सर्व विश्व वाढतें २८. कलियुगाच्या अंतीं चारी युगांतील शरीररूपी जीर्णसालीं गळून पडतात न पडतात इतक्यांत कृतयुगाची ओली साल बरीच वाढते. म्हणजे पुनः सृष्टीची उत्पत्ति होऊन ती जास्त वाढते २९. चालू असलेलें जें वर्ष तें संपून जातें तें जसें पुढील वर्षास मूळ–आमंत्रण होते. किंवा ज्याप्रमाणें दिवस जातो किंवा येतो, हें त्याच्या नित्य येण्याजाण्यानें कळत नाहीं १३०. ज्याप्रमाणें वाऱ्याच्या एकसारख्या झुळकावर झुळका येऊं लागल्या म्हणजे कोणची झुळुक संपली व कोणची आली त्यांचा जोड केव्हां आहे हें समजत नाहीं, त्याप्रमाणें शरीररूपी शाखा किती उत्पन्न होतात व लय पावतात, हें कांहीं समजत नाहीं ३१. एक शरीररूपी डिरी तुटून पडली न पडली तोंच दुसऱ्या शेंकडों शरीररूपी डिऱ्या फुटतात, त्या योगानें हा भवरूपी वृक्ष अव्यय, नित्य आहे असा भासतो ३२. नदीचें वाहतें पाणी वेगानें चाललेलें असते व त्याला ज्याप्रमाणें मागून वाहत येणारें पाणी एकसारखे–वरचेवर मिळत असतें त्या योगानें जसा त्याच्या ठिकाणीं स्थिरतेचा भास होतो, त्याप्रमाणें हें जग वस्तुतः नसून, अध्यस्त आहे असें मानिलें तरी तें नाशिवंत–अस्थिर असून त्याला त्याचा वेगातिशय न जाणतां स्थिर असें समजतात ३३. किंवा डोळ्याचे पाते लवते न लवतें तोंच कोट्यवधि लाटांची समुद्रावर घडामोड होते; परंतु ते ज्यास कळत नाहीं त्यास त्या लाटा 'नित्य' अशाच भासतात, त्याप्रमाणें अज्ञान्याला प्रवाहरूप असणारा संसार नित्य भासतो ३४. कावळा आपलें एकच बुबुळ एका क्षणांत अति वेगानें आपल्या दोन्ही डोळ्यांत फिरवितो आणि त्या योगानें त्याला एकच बुबुळ असताहि दोन आहेत, असें लोकांस भ्रमानें भासतें, त्याप्रमाणें जग अनित्य असून नित्य आहे, असा भ्रम होतो ३५. किंवा भिंगोरी किंवा भोंवरा अतिवेगानें फिरूं लागला म्हणजे तो फिरत असून जमिनीवर चिकटून स्थिर आहे, असा भास होतो, त्यास तो वेगातिशयच कारण आहे त्याप्रमाणें या जगाचा प्रकार आहे ३६. हे पुष्कळ दाखले राहूं दे; परंतु एखादा मनुष्य हातांत कोलती घेऊन अंधारात आपल्या भोंवतीं वेगानें फिरवूं लागला म्हणजे ती ज्याप्रमाणें अति वेगामुळें मोठ्या अखंड चक्राच्या आकाराप्रमाणें स्थिर दिसते ३७. त्याप्रमाणें हा संसाररूपी वृक्ष नेहमीं मोठ्या झपाट्यानें नाश पावतो व उत्पन्न होतो, हें न समजल्यामुळें लोक वेडेपणानें यास नित्य मानतात ३८. परंतु जो या संसाररूपी वृक्षाचा वेग पाहून हा क्षणिक आहे असें जाणतो व हा एका निमिषांत कोट्यवधि वेळां उत्पन्न होतो व लय पावतो असेंहि ज्यास ज्ञान असते ३९. आणि ह्याला अज्ञानावांचून दुसरें मूळकारण नाहीं व याचें अस्तित्वहि मिथ्याच आहे याप्रमाणें जो या संसाररूपी वृक्षास मूळापासून शेवटापर्यंत पूर्णपणें क्षणिकरूपानें जाणतो १४०. अर्जुना! मी सर्वज्ञ असूनहि त्यालाच जाणता असें म्हणतों आणि वैदिक सिद्धांतालाहि तोच पूज्य आहे ४१. सर्व प्रकारच्या योगापासून मिळणारें फळहि त्याच्याच उपयोगास जातें. फार काय सांगावें!! त्याच्याच योगानें ज्ञानालाहि जगण्यास जीवन मिळते ४२. हें पुष्कळ बोलणें असो अशा प्रकारें हा संसाररूपी वृक्ष अनित्य आहे, प्रतीति मात्र सत्तावान् आहे असें ज्यानें जाणलें त्याचें कोणाच्यानें वर्णन करवेल? ४३.

**अन्वयार्थ–तस्य**–त्या संसारवृक्षाच्या **शाखाः**–शाखा–**अधः च ऊर्ध्वं**–मनुष्यलोकांच्या खालीं व वर–**प्रसृताः**–पसरल्या आहेत–**गुणप्रवृद्धाः**–त्या सत्त्व, रज व व तम यांच्या योगानें विशेषेंकरून वाढलेल्या आहेत–**विषयप्रवालाः**–विषय हेच त्या शाखांचे कोमल पल्लवांकुर आहेत–**मनुष्यलोके**–या मनुष्य शरीरांत **कर्मानुबंधीनि**–कर्मांना कारण होणारीं–**मूलानि**–वासनारूप मुळें–**अधः च [ ऊर्ध्वं ]** खालीं व वरहि–**अनुसन्ततानि**–परंपरेनें–संतत पसरलेलीं आहेत २.

मग याच प्रपंचरूपी वृक्षास खालीं शाखा येऊन त्या जमिनींत जातात. शिवाय या संसावृक्षास वरहि सरळ शाखा उत्पन्न होतात ४४. व ज्या डहाळ्या खालीं येतात त्यांनाहि मूळ फुटून त्यास खालच्या बाजूस वेल वाढून पानेंहि येतात ४५. याप्रमाणें जें आम्हीं आरंभीं म्हटलें आहे, तेंच अधिक स्पष्ट करून सोप्या भाषेंत सांगतों, ऐक ४६. तर या वृक्षाचे बलवान् मूळ अज्ञान असून, त्याच्यापासून महत्तत्त्वादिक अष्टधा प्रकृति तयार होऊन ज्ञानरूप किंवा वेदरूप मोठाली पानें उत्पन्न होतात ४७. पण आधीं या झाडाच्या बुडापासून स्वेदज,

१ सूर्य व चंद्र वंश. २ विस्तार होतो. ३ वाढतें. ४ साली, शरीरें. ५ ओली साल, उत्पत्ति. ६ दुप्पट. ७ मूळ कारण. ८ जाणवत नाहीं, कळत नाहीं. ९ जोड, सांधा. १० माहीत, ठाऊक, कळत नाहीं. ११ अंकूर.

उद्भिज अंडज । हे बुडौनि महाभुजें । उठती चारी ॥ ४८ ॥ यया एकैकाचेनि आंगवटें । चौऱ्यांशीं लक्षधा फुटे । ते वेळीं जीवशाखीं फांटे । सैंघांचि होती ॥ ४९ ॥ प्रसवती शाखा सरळिया । नानासृष्टि डाहाळिया । आड फुटती माळियां । जातिचिया ॥ १५० ॥ स्त्री पुरुष नपुंसकें । हे व्यक्तिभेदांचे टकें । आंदोळती आंगिकें । विकारभारें ॥ ५१ ॥ जैसा वर्षाकाळु गगनीं । पाल्हेजे नवघनीं । तैसें आकारजात अज्ञानीं । वेलीं जाय ॥ ५२ ॥ मग शाखांचेनि आंगभारें । लवोनि गुंफिती परस्परें । गुणक्षोभाचे वारे । उदयजती ॥ ५३ ॥ तेथ तेणें अचाटें । गुणांचेनि झडझडाटें । तिहीं ठायीं हा फांटे । उर्ध्वमूळ ॥ ५४ ॥ ऐसा रजाचिया झुळुका । झडाडितां आगळिका । मनुष्यजाती शाखा । थोरावती ॥ ५५ ॥ तिया ऊर्ध्वीं ना अधीं । माझारींचि कोंदाकोंदी । आड फुटती खांदी । चतुर्वर्णाच्या ॥ ५६ ॥ तेथ विधिनिषेध सपल्लव । वेद-वाक्यांचें अभिनव । पालव डोलती बरव । नीच नवे ॥५७॥ अर्थु कामु पसरे । अग्र-वर्नें घेती थारे । तेथ क्षणिकें पेंदांतरें । इहभोगाचीं ॥५८॥ तेथ प्रवृत्तीचेनि वृद्धि-लोभें । खांकरेंजैती शुभाशुभें । नानाकर्मांचे खांबे । नेणों किती ॥ ५९ ॥ तेवींचि भोगक्षीणें मागिलें । पडती देहांतींचीं बुडसेंळें । तंव पुढां वाढी पेले । नवेया देहांची ॥१६०॥ आणि शब्दादिक सुहांवें । सहज रंगें हेंवावे । विषयपल्लव नवे । नित्य होती ॥६१॥ ऐसे रजोवातें प्रचंडें । मनुष्यशाखांचे मांदोडे । वाढती तो एथ रूढे । मनुष्यलोकु ॥६२॥ तैसाचि तो रजाचा वारा । नांवेक धरी वोसरा । मग वाजों लागे घोरां । तमाचा तो ॥६३॥ तेधवां याचिया मनुष्यशाखा । नीच वासना अधीं देखा । पाल्हेजती डाहाळिका । कुकर्माचिया ॥ ६४ ॥ अप्रवृत्तींचे खणु-वोंळे । कोंभ निघती सरळे । घेत पान पालव डाळे । प्रमादाचीं ॥६५॥ बोलती निषेधनियमें । जिया ऋचा यजुःसामें । तो पाला तया धुंमें । टकेयोवरी ॥६६॥ प्रतिपादिती अभिचार । आगम जे परमार । तिहीं पानीं घेती प्रसर । वासना वेली ॥ ६७ ॥ तंव तंव होतीं थोराडें । अकर्माचीं तळेंबुडें । आणि जन्मशाखा पुढें पुढें । घेती धांव ॥६८॥ तेथ चांडाळादि निकृष्टा । दोषजातीचा थोर फांटा । जाळ पडे कर्मभ्रष्टां । भुलोनियां ॥ ६९ ॥ पशु पक्षी सूकर । व्याघ्र वृश्चिक विखार । हे

जारज, उद्भिज्ज व अंडज अशा चार मोठाल्या फांद्या फुटतात ४८. ह्यांपैकीं एक एक खाणीरूप फांदी बळावली म्हणजे त्यांच्या मूळापासून एकंदर मिळून चौऱ्यायशीं लक्ष योनिरूप फांद्या फुटतात व त्या वेळीं जीवरूपी फांदीस पुष्कळ फांटे फुटतात ४९. या [ चार खाणीरूप ] सरळ फांद्यापासून ज्या आणखी सृष्टिरूपी डाहाळ्या आडव्या माळेसारख्या फुटतात, त्या निरनिराळ्या जाति होत १५०. मग स्त्री, पुरुष व नपुंसक असे व्यक्तींचे भेदरूपी घोंस उत्पन्न होऊन त्या विषयांच्या अंगभूत अशा विकारभारानें एकमेकांवर आदळतात ५१. ज्याप्रमाणें वर्षाकाळ हा आकाशामध्यें नवीन मेघ उत्पन्न होण्याच्या रूपानें पसरतो त्याप्रमाणें अज्ञानामुळें पुष्कळ जातींच्या यच्चयावत् आकाररूपी वेली उत्पन्न होऊन विस्तार पावतात ५२. मग गुणक्षोभरूपी वारे सुटल्यावर खांद्या आपल्या आंगभारानें लवून एकमेकांत गुंततात ५३. तें गुण अति वाढल्यामुळें, त्या गुणक्षोभात्मक वाहणाऱ्या वाऱ्याच्या बळानें ऊर्ध्वमूलाच्या वृक्षास खालीं, वर व मध्यें असे तीन भेद होऊन फांटे फुटतात ५४. याप्रमाणें रजोगुणाची झुळूक सुटून ती अधिक जोरानें वाहूं लागल्यावर मनुष्यजातिरूपी शाखाहि जोरानें वाढतात ५५. त्या शाखा वरहि नसतात व खालींहि नसतात. त्या शाखा मध्येंच [ मृत्युलोकीं ] चार वर्णांच्या चार आडव्या फांद्या दाटीनें फुटतात ५६. त्या फांद्यास विधिनिषेधरूपी कोंवळी पानें असलेली वेदवाक्यें हीच डोलत असलेली पालवी नित्य अपूर्व शोभा आणते ५७. आणि अर्थ व काम यांचा जोरानें विस्तार होऊन इहलोकींच्या क्षणिक भोग्यसुखाचे कोंब वाढतात ५८. नंतर प्रवृत्तिमार्ग वाढावा, या लोभात्मक हेतूनें शुभाशुभ कर्मांचे फांटे किती फुटतात, हें समजत नाहीं ५९. त्याचप्रमाणें कर्मभोगांचा क्षय झाला म्हणजे मागलीं देहरूपी शुष्क काष्ठें खालीं गळून पडतात, तोंच पुढें दुसरीकडे नव्या देहांचे फांटे फुटतात १६०. आणि निसर्गतः आकर्षक अशा शब्दादि पंचविषयांच्या साह्यानें सुशोभित होऊन म्ह० इच्छा उत्पन्न होऊन विषयरूपी नवीं नवीं पानें नित्य येतात ६१. याप्रमाणें रजोगुणाचा मोठा प्रचंड वारा सुटल्यामुळें मनुष्यरूपी शाखांचे समुदाय ज्या ठिकाणीं वाढतात, त्याला त्या वृक्षाचे ठिकाणीं **"मनुष्यलोक"** म्हणण्याचा प्रघात आहे ६२. त्याचप्रमाणें हा रजोगुणरूपी वारा क्षणभर वाहण्याचा थांबल्यावर तमोगुणरूपी भयंकर वारा मोठ्या सपाट्यानें वाहूं लागतो ६३. मग याच मनुष्यरूपी शाखांना खालच्या बाजूस वाईट वासनारूपी लहान फांद्या उत्पन्न होऊन कुकर्मांच्या डाहाळ्या फुटूं लागतात ६४. अप्रवृत्तीचें [ निषिद्ध मार्गाचे ] बळकट सरळ सोंट निघून त्यास प्रमादरूपी पानें, पाला व डाहाळ्या उत्पन्न करीत फुटतात ६५. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांच्यांतील ऋचांत नियमानें निषिद्ध म्हणून जी कर्में सांगितलीं आहेत, तीं मंत्रात्मक पालवी त्या शाखांच्या अग्रभागीं वाजूं लागते ६६. अथर्वणवेदांत जे जारणमारण सांगितलें आहे व ज्यांत परपीडा ही मुख्य धरली आहे, अशा तीन पानांचा वासनारूपी वेल अतोव पसरतो ६७. नंतर वाईट कर्मांचीं तळांतील मूळें मोठीं होतात आणि त्यामुळें जन्मरूपी शाखा पुढें पुढें धांव घेतात [ अधम योनी प्राप्त होते ] ६८. त्या वाईट कर्माला तमोगुणामुळें मुद्दन गेल्यानें त्या कर्मभ्रष्टाला चांडालादि नीच योनींचा मोठा फांटा फुटून तशाच कर्मभ्रष्टांचें जातींत जन्मावें लागते ६९. पशु, पक्षी,

१ फांद्या. २ शरीरांतून, अंगांतून. ३ बहुत. ४ अडव्या फांद्या. ५ ठसे. ६ आंगचा, स्वाभाविक. ७ युक्त होतो. ८ मेघांत. ९ सर्व आकार. १० विस्तार पावतो. ११ सविस्तर, विस्तारयुक्त. १२ अपूर्व, नवीन. १३ शोभा, सौंदर्य, चांगुलपणा. १४ पुढचीं पानें. १५ अन्य स्थानें. १६ उत्पन्न होतात. १७ शुष्क काष्ठें. १८ फांटे फुटतात. १९ पंच विषय. २० साह्यानें. २१ मोहक, आकर्षक. २२ समुदाय, २३ क्षणभर. २४ ओहट, थांबणें. २५ भयंकर. २६ खालीं. २७ कुमार्गाचे. २८ कठीण, खडखडीत, बळकट. २९ डाहाळ्या. ३० असावरणाची. ३१ फुटतो. ३२ अग्रभागीं. ३३ जारण-मारण. ३४ मुख्य. ३५ परपीडा. ३६ तीन पानांचा. ३७ बुंधे. ३८ जाणें. ३९ डुक्कर. ४० सर्प.

आडशाखा प्रकार । पैसु घेती ॥ १७० ॥ परी ऐशा शाखा पांडवा । सर्वांगींही नित्य नवा । निरयभोग यावा । फळाचा तो ॥ ७१ ॥ आणि हिंसाविषयपुढारी । कुकर्मसंगें धुरें धरी । जन्मवरी आगारीं । वाढतीचि असे ॥ ७२ ॥ ऐसे होती तरु तृण । लोह लोष्टें पाषाण । इया खांदिया तेवीं जाण । फळेंही हेंची ॥ ७३ ॥ अर्जुना गा अवधारीं । मनुष्यालागोनि इयापरी । वृद्धि स्थावरांतवरी । अधोशाखांची ॥ ७४ ॥ म्हणौनि जीं मनुष्यडाळें । तियें जाणावीं अधींचिं मूळें । जे एथूनि हा पघंळे । संसारतरु ॥ ७५ ॥ एऱ्हवीं ऊर्ध्वींचें पार्था । मुद्दल मूळ पाहतां । अधींचिया मध्यस्था । शाखा इया ॥ ७६ ॥ परी तामसी सात्त्विकी । सुकृतदुष्कृतात्मकी । विरूढती या शाखीं । अधोर्ध्वींचिया ॥७७॥ आणि वेदत्रयाचिया पाना । नये अन्यत्र लागों अर्जुना । जे मनुष्यावांचूनि विधाना । विषय नाहीं ॥ ७८ ॥ म्हणौनि तनु मानुषा । इया ऊर्ध्वमूळौनि जरी शाखा । तरी कर्मवृद्धीसि देखा । इयेंचि मूळें ॥ ७९ ॥ आणि आनीं तरी झाडीं । शाखा वाढतां मूळें गाढीं । मूळ गाढें तंव वाढी । पैस आथी ॥१८०॥ तैसेंचि इया शरीरा । कर्म तंव देहां संसारा । आणि देह तंव व्यापारां । ना म्हणोंचि नये ॥ ८१ ॥ म्हणौनि देहें मानुषें । इयें मूळें होती न चुके । ऐसें जगज्जनकें । बोलिलें तेणें ॥ ८२ ॥ मग तमाचें तें दारुण । स्थिरावलेया वाउधांणे । सत्त्वाची सुटे सत्राणें । वाहुटळी ॥८३ ॥ तैं याचि मनुष्याकारा । मुळीं सुवासना निघती आरां । घेऊनि फुटती कोंबारां । सुकृतांकुरीं ॥८४॥ उकलतेनि उन्मेखें । प्रज्ञाकुशलतेंची तिखें[19] । डिरिया निघती निमिखें । बाबळैजुंनी ॥८५॥ मतीचे सोटें वांवे । घालिती स्फूर्तीचेनि थांवें[20] । बुद्धि प्रकाश घे धांवे । विवेकावरी ॥८६॥ तेथ मेधारसें[21] सगर्भ । अस्थापैत्रीं सैंबोंब । सरळ निघती कोंभ । सद्वृत्तीचे ॥८७॥ सदाचाराचिया सहसा । टेंका उठती बहुवसा । घुमघुमिती घोषा । वेदपद्यांच्या ॥ ८८ ॥ शिष्टागमैविधानें । विविधयागवितानें । इये पानावरी पानें । पालेजंती ॥८९॥ ऐशा यमदमीं घोंसाळियें । उठती तपाचिया डाहाळिया । देती वैराग्यशाखा कोंवळिया । वेल्हाळपणें ॥१९०॥ विशिष्टां व्रतांचे फोक । धीराच्या ओणगटी तिख । जन्मवेगें ऊर्ध्वमुख । उंचावती ॥ ९१ ॥ माजीं वेदांचा पाला दाट । तो करी सुविद्येचा झडझडाट । जंव वाजे अचाट । सत्त्वानिळु तो

वाघ, डुक्कर, विंचू, सर्प याप्रमाणें आडव्या फांद्याहि पुष्कळ फुटतात १७०. अर्जुना! याप्रमाणें त्या वृक्षाच्या अशा शाखांच्या सर्वांगावर नित्य नव्या फांद्या फुटून त्यांना नरकभोगरूपी फलाची प्राप्ती होते ७१. आणि तेथें हिंसा आणि विषय यांस मुख्यत: पुढें करून वाईट संगति हीच जेथें अग्रणी आहे यांच्या योगानें कुकर्मांकुर अनेक जन्म घेण्याचे रूपानें वाढीसच लागतो ७२.अशा अवस्था भोगतां भोगतां शेवटीं झाडें, गवत,लोखंड, माती व दगड या जड योनींत जन्मावें लागते, तेथें शाखाहि त्याच व फळेंहि तींच होत ७३. अर्जुना! ऐक याप्रमाणें मनुष्यापासून स्थावरापर्यंत सगळ्या शाखांची वाढ खालींच होत असते ७४. म्हणून मनुष्यरूपी खांदीच खालीं जाणाऱ्या खांद्यांचे मूळ आहे असें जाण. कारण या मनुष्यरूपी खांदीपासूनच हा संसारवृक्ष वाढतो ७५. येऱ्हवीं पार्था, वर असलेलें मुख्य अज्ञानरूपीं मूळ पाहूं गेलें असतां, वर व खालीं वाढलेल्या ज्या खांद्या आहेत त्यांत खालच्या बाजूची मनुष्यजन्मरूपी मध्यावरची एक शाखाच होय ७६. परंतु तमोगुण व सत्त्वगुण यांच्यामुळें दुष्कर्म व सत्कर्म यांनीं भरलेल्या ज्या खालच्या व वरच्या शाखा आहेत त्या मधल्या या मनुष्यरूपी शाखेपासून खालीं व वर जातात ७७. अर्जुना! वेदत्रय-[ ऋक् यजुः साम ] रूपी पानें मनुष्यात्मक शाखेविना इतर दुसऱ्या कोणालाहि लागत नाहींत. कारण, त्यांतील विधिविधानात्मक वेदाज्ञेला केवल मनुष्ययोनीखेरीज दुसरें कोणीं विषय म्ह. पात्र-अधिकारी नाहीं ७८. म्हणून, मनुष्यरूप खांदी ही जरी संसारवृक्षाच्या वरच्या मूळाच्या दृष्टीनें खालीं वाढलेली एक शाखाच आहे, तरी कर्मवृद्धिरूप शाखा हिच्यापासूनच उत्पन्न होतात; म्हणून याच शाखा 'मूळें 'हि आहेत ७९. आणि दुसऱ्या सामान्य झाडांची तरी हीच तऱ्हा आहे कीं, जसजशा फांद्या वाढतात तसतशीं त्यांची पाळेंमुळें जमीनींत खोलवर दृढ होतात व मुळें बळकट झाली म्हणजे तसा फांद्यांचाहि विस्तार अधिकाधिकच होत जातो. १८०. त्याचप्रमाणें या शरीराची गोष्ट होय; म्हणजे कर्मविशेष आहे तोंपर्यंत शरीराचे अस्तित्व आहे; आणि शरीर आहे तोंपर्यंत कर्म करणार नाहीं, असें म्हणण्याची मुळींहि सोय नाहीं. [ कर्म हे घडणारच ] ८१. म्हणून मनुष्यदेह हा अन्य [ खालच्या व वरच्या शाखांचीं ] अर्थात् कर्मरूपी खांद्यांचीं मूळें होत यांत संशय वा चूक नाहीं; असे त्या जगज्जनक श्रीकृष्णांनीं सांगितलें ८२. मग म्हणतात:-नंतर तमोगुणाची तीं भयंकर वादळी वाहुटळ स्थिर झाल्यावर सत्त्वगुणाची वाहुटळ जोरानें सुटतें ८३. तेव्हां मात्र याच मनुष्याकाररूपी मूळास सद्वासनारूपी अंकुर फुटून त्याला सुकृतरूपी कोंब येतात ८४. मग विकसणाऱ्या ज्ञानाच्या योगानें बुद्धिचातुर्याचें तीक्ष्ण अशा जोरानें एका क्षणांत बुद्धीला विस्तारून डिऱ्या फुटतात ८५. नंतर बुद्धिरूपी फोंक स्फूर्तीचे बळानें विस्तार पावतात त्या योगानें बुद्धींत प्रकाश पडून सुविचार सुचतो ८६. त्या ठिकाणीं जे आंतून मेधारसानें [ धारणाशक्तिनें ] भरलेले आहेत आणि निष्ठारूपी पानांनी सुशोभित आहेत असे सत्त्ववृत्तीचे कोंबहि सरळ निघतात ८७. सदाचाररूपी पुष्कळ अंकुर सहज एकदम निघून त्या योगानें वेदपद्य घोषद्वारां चहूंकडे गर्जना केली जाते ८८. शिष्टाचार, व वेदोक्त आचरण व नानाप्रकारचीं यज्ञयागादि कर्मांचा विस्तार, अशी पानांवर पानें विस्तारून फुटतात ८९. याप्रमाणें यमदमरूपी घोंस व तपाच्या डाहाळ्या फुटतात आणि वैराग्यरूपीं कोंवळ्या शाखा पुष्कळ फुटतात१९०.विशिष्ट व्रतांचें फोंक धैर्याच्या तीक्ष्ण अणकुच्या फुटून, उत्पत्तीच्या योगानें वर टोंक असलेले वाढत वाढत उच जातात. [ श्रेष्ठ व्रताचरणानें वरचेवर उत्तम जन्म लाभतात] ९१. मध्यंतरी [ मनुष्यरूपी शाखेमध्यें ] वेदरूपी दाट पानें फूटून, त्या योगानें, सत्त्वरूपी प्रचंड, वारा वाहात आहे, तोंपर्यंत सुविद्येचा झडझडाट वाजतो म्ह. चहूंकडे प्रचार

१ आडशाखारूपी समूह. २ पुढें करून. ३ पुढें. ४ अंकुर. ५ मातीचें ढेंकूळ. ६ डाहाळया. ७ पसरतो. ८ वरचें. ९ दृढ. १० देहाचा प्रसार, वाढ. ११ कर्माला. १२ वादळ. १३ मोठें, थोर. १४ अंकुर. १५ कोंभ. १६ तीक्ष्ण. १७ विस्तारून. १८ फोंक. १९ वांव वांव लांबीचे, चार हात लांबीचे. २० बळ. २१ बुद्धिरसानें युक्त. २२ निष्ठा. २३ सुशोभित २४ अंकुर. २५ वेदवाक्याच्या. २६ शिष्टाचार व वेदोक्त आचरण. २७ नाना प्रकारच्या यज्ञादि कर्मांचा विस्तार. २८ फुटतात. २९ घोंस. ३० कोंवळया. ३१ विस्तार. ३२ अणकुचीदार टोंकाचें.

॥ १२ ॥ तेथ धर्मडाळ बाहाळी । दिसती जन्मशाखा सरळी । तिया आड फुटती फळीं । स्वर्गादिकीं ॥ १३ ॥ पुढां उपरति रांगें लोहिवी । धर्ममोक्षाची शाखा पालवी । पाल्हांजत नित्य नवी । वाढतीचि असे ॥ १४ ॥ पैं रविचंद्रादि ग्रहवर । पितृ ऋषि विद्याधर । हे आडशाखा प्रकार । पैसु घेती ॥ १५ ॥ याहीपासून उंचवडें । गुंढले फळाचेनि बुडें । इंद्रादिक ते मांदोडे । थोर शाखांचे ॥ १६ ॥ मग तयांही उपरी डाहाळिया । तपोज्ञानीं उंचावलिया । मरीचि कश्यपादि इया । उपरी शाखा ॥ १७ ॥ एवं माळोवाळी उत्तरोत्तरु । ऊर्ध्वशाखांचा पैसारु । बुडीं सांना अग्रीं थोरु । फळाढ्यपणें ॥ १८ ॥ वरी उपरिशाखाही पाठीं । येती फळभार जे किरीटी । ते ब्रह्मेशांत अंणगटीं । कोंभ निघती ॥ १९ ॥ फळाचेनि वोझेपणें । ऊर्ध्वीं वोवांडें दुणें । जंव माघौतें बैसणें । मूळींचि होय ॥ २०० ॥ प्राकृताही तरी रुखा । जें फळें दाटलीं होय शाखा । ते वोवांडैली देखा । बुडासि ये ॥ १ ॥ तैसें जेथूनि हा आघवा । संसारतरूचा उठावा । तियें मूळीं टेंकती पांडवा । वाढतेनि ज्ञानें ॥ २ ॥ म्हणौनि ब्रह्मेशांनापरौतें । वाढणें नाहीं जीवातें । तेथूनि मग वरौतें । ब्रह्मचि कीं ॥ ३ ॥ परी हें असो ऐसें । ब्रह्मादिक ते आंगवेसें । ऊर्ध्वमूळांसरिसें । नें तुकती गा ॥ ४ ॥ आणीकही शाखा उंपरता । जिया सनकादिक नामें विख्याता । तिया फळीं मूळीं नाडळतां । भरलिया ब्रह्मीं ॥ ५ ॥ ऐसी मनुष्यापासूनि जाणावी । ऊर्ध्वीं ब्रह्मादिशेषें पालवी । शाखांची वाढी बरवी । ऊंचावे पैं ॥ ६ ॥ पार्था ऊर्ध्वींचिया ब्रह्मादि । मनुष्यत्वचि होय आदि । म्हणौनि इयें अधीं । म्हाणितलीं मूळें ॥ ७ ॥ एवं तुज अलौकिकु । हा अधोर्ध्वशाखु । सांगितला भवरुखु । ऊर्ध्वमूळु ॥ ८ ॥ अधींचीं हीं मूळें । उंपरती परिसैंविली सैंविवळें । आतां परिस उंन्मूळें । कैसेनि हा ॥ ९ ॥

न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेण दृढेन छित्वा ॥ ३ ॥

परी तुझ्या हन पोटीं । ऐसें गमेल किरीटी । जे येवढें झाड उंत्पाटी । ऐसें कायि असे ? ॥ २१० ॥ कीं ब्रह्मयाच्या शेवटवरी । ऊर्ध्व शाखांची थोरी । आणि मूळ तंव निराकारीं । ऊर्ध्वीं असे ॥ ११ ॥ हा स्थावराही तळीं । फांकत असे

व प्रसार होतो ९२. मग जेव्हां धर्मरूपी एक सरळ वाढलेली शाखा दिसते व तिला स्वर्गादिक फळांनी युक्त अशा आडफांद्या फुटतात ९३. दुसरी उपरतिरूप रंगानें लाल तेजस्वी शाखा फुटून तिला धर्म व मोक्षरूपी नित्य नवी पालवी फुटून ती वाढतच राहते ९४. पुढें याच धर्मशाखेला रविचंद्र इत्यादि श्रेष्ठ श्रेष्ठ ग्रह व पितर, ऋषि, विद्याधर एतद्रूपी आणखी आडव्या फांद्या विस्तारून फुटतात ९५. या शाखांपेक्षांहि उंच अशा दुसऱ्या बऱ्याच शाखा फुटून त्यांना इंद्रादि लोकरूपी पुष्कळ फळें येतात व त्यामुळें त्यांची बुडें झांकली जातात ९६. मग त्या खांद्यावर तपानें व श्रेष्ठ ज्ञानानें अशा मरीचि, कश्यप इत्यादिरूप दुसऱ्या उंच वर वाढलेल्या शाखा येतात ९७. अशा प्रकारें शाखोपशाखीं वरचेवर शाखांचा वरच्या बाजूस अधिकाधिक विस्तार होऊन हा वृक्ष बुडाशीं लहान असूनहि वर शेंड्यास मोठालीं फळें येत असल्यामुळें हा थोर आहे ९८. त्यावरहि आणखी ज्या दुसऱ्या फांद्या येतात त्यास फलभारहि येतो अर्थात् त्यांना अर्जुना! ब्रह्मदेव व शिव यांपर्यंत वर अणकुचीदार कोंब फुटतात ९९. या शाखांना इतकीं फळें येतात कीं, त्या फळांचा भार वरच्या बाजूस सहन न होऊन त्या फांद्या लवतात व पुनः खालीं मुळाशीं येऊन टेकतात २००. इतर सामान्य झाडांचीहि अशीच स्थिति असते कीं, ज्या फांद्या पुष्कळ फळांनीं लगडलेल्या असतात. त्या वांकून पुनः बुडाकडे येऊं लागतात १. त्याचप्रमाणें हा संसाररूपी वृक्ष ज्या ठिकाणाहून विस्तारासह उत्पन्न होतो, त्याच मुळाशीं वाढणाऱ्या ज्ञानाच्या योगाने पुनः लवून टेकत असतो २. म्हणून ब्रह्मदेव व शिव यांच्या पलिकडे जीवांस वाढणें नाहीं. तेथून पुढें वरतीं केवळ शुद्ध ब्रह्मच असतें ३. परंतु हें तूर्त असूं दे. या ब्रह्मादिक खांद्या कितीहि मोठ्या असल्या तरी ऊर्ध्वमूळ [ अधिष्ठान ] जें ब्रह्म त्याची बरोबरी करूं शकत नाहींत ४. आणखी कांहीं निवृत्ति मार्गाच्या वरच्या सनकादिक नावांनीं प्रसिद्ध शाखा आहेत. त्या फळांत [ कार्याध्यासांत ] व मुळांत [ कारणाध्यासांत ] न सांपडतां ब्रह्मरूपींच भरलेल्या आहेत ५. याप्रमाणें मनुष्यरूप खांदीपासून तों थेट वरच्या बाजूस ज्या ब्रह्मदेवादिरूप शेवटच्या खांद्या आहेत, त्या तेथपर्यंत चांगल्या उंच वाढत जातात ६. पार्था! ब्रह्मदेवादिरूप ज्या वरच्या उंच खांद्या आहेत त्यास मनुष्यत्वरूप खांदीच मूळकारण असून त्यापासूनच उत्पन्न झाल्या आहेत, म्हणून तिला [ मनुष्यत्वरूप खांदीस ] आम्ही वरच्या खांद्यांची खालची मूळें आहेत असें म्हटलें आहे. ७. याप्रमाणें जो हा अलौकिक संसाररूपी वृक्ष कीं जो ऊर्ध्वमूल असून, ज्याला खालीं आणि वर अशा शाखा फुटलेल्या आहेत, त्यांचें वर्णन तुला सांगितलें ८. याप्रमाणें या झाडाला ही अशी खालचीं व वरचीं मूळें असून त्यांविषयीं सर्व विवेचन तुला स्पष्ट सांगितलें. आतां असा जो हा बळकट संसारवृक्ष तो कोणत्या उपायानें उपटून टाकतां येतो, तें ऐक ९.

**अन्वयार्थ**— **इह**—या संसारांत असलेल्या प्राण्यांना **अस्य रूपं**—या संसारवृक्षाचें रूप—**तथा**—तेथें जसें वर्णिलें आहे तसें—**न उपलभ्यते**—उपलब्ध होत नाहीं—**न अन्तः**—याचा अन्त कळत नाहीं—**च आदिः न**—आणि याचा आरंभ कोठून झाला आहे तें कळत नाहीं.—**च संप्रतिष्ठा न**—आणि याची स्थिति कळत नाहीं—**सुविरूढमूलं**—ज्याचीं मुळें फार खोल गेलीं आहेत अशा—**एनम् अश्वत्थं**—त्या क्षणभंगुर संसारवृक्षाला—**दृढेन**—**असंगशस्त्रेण**—अत्यंत दृढ—मजबूत अशा असंगरूप शस्त्रानें—**छित्वा**—तोडून ३.

परंतु अर्जुना! तुझ्या मनांत कदाचित् असें वाटेल कीं, याप्रमाणें हा एवढा प्रचंड वाढलेला जो संसाररूपी वृक्ष, त्याला उपटून टाकील असें एवढे कांहीं साधन आहे काय? २१०. कारण, त्याच्या वरच्या बाजूच्या शाखांची वाढ कोठें शेवट ब्रह्मलोकापर्यंत आहे आणि ज्याचें मूळ वर निराकार ब्रह्माच्या ठिकाणीं आहे ११. या वृक्षाच्या खालीं येणाऱ्या फांद्या वृक्षादि स्थावरापर्यंत

१ धर्मरूपी फांदी. २ मोठी, विस्तारयुक्त. ३ रंगानें. ४ लाल. ५ पालवून. ६ विस्तार. ७ झांकले. ८ झुबाडे, झुबके. ९ रांगेनें, शाखोपशाखीं. १० लहान. ११ ब्रह्मदेव व शिव या पर्यंत. १२ अणकुचीदार टोंकाचें. १३ लवतात, ओथंबतात. १४ लवली. १५ ब्रह्म व शिव यापलीकडे, १६ शरीरसामर्थ्यानें. १७ ऊर्ध्वमूळ जें ब्रह्म त्याच्या बरोबरीनें. १८ गणले जात नाहींत. १९ वरच्या. २० अडकल्यावांचून, शिवल्यावांचून. २१ सत्यलोकापर्यंत. २२ खालची. २३ फोड, विवेचन. २४ सांगितलें. २५ सविस्तर. २६ उपडेल. २७ उपटील. २८ ब्रह्मलोकापर्यंत.

अर्धीच्या डाळीं । माजीं धांवतसे दुजा मूळीं । मनुष्यरूपीं ॥ १२ ॥ ऐसा गोंढा आणि अफाटु । आतां कोण करी यया शेवटु । तरी झणीं हा हळुवटु । धरिसी भावो ॥ १३ ॥ तरी हा उन्मूळावया दोषें । येथ सायासचि कायिसे । काय बाळा बोगुल देशें । दवडावा आहे ? ॥ १४ ॥ गंधर्वदुर्ग कायी पाडावे । काय शशविषाण मोडावें । होआवें मग तोडावें । खपुष्प कीं ? ॥ १५ ॥ तैसा संसारु हा वीरा । रुख नाहीं साचोकारा । मा उन्मूळणीं दरारा । कायिसा तरी ? ॥ १६ ॥ आम्हीं सांगितली जे परी । मूळडाळांची उजरी । ते वांझेचीं घरभरी । लेंकुरें जैशीं ॥ १७ ॥ काय कीजती चेइलेपणीं । स्वप्नींचीं तिये बोलणीं । तैशी जाण ते काहाणी । दुगळींचि ते ॥ १८ ॥ वांचूनि आम्हीं निरूपिलें जैसें । ययाचे अचळ मूळ असे तैसें । आणि तैसाचि जरी हा असे । साचोकारा ॥ १९ ॥ तरी कोणाचेनि संतानें । निपजती तया उन्मूळणें । कायं फुंकिलिया गगनें । जाइजेल गा ! ॥ २२० ॥ म्हणौनि पैं धनंजया । आम्हीं वानिलें रूप तें माया । कासवीचेनि तुपें राया । वोगरिलें जैसें ॥ २१ ॥ मृगजळाचीं गा तळीं । तिये दिठी दुरूनि न्याहाळीं । वांचूनि तेणें पाणियें साळी केळी । लाविसी काई ? ॥ २२ ॥ मूळ अज्ञानाचि तंव लटिकें । मा तयाचें कार्य हें केतुकें । म्हणौनि संसाररुख सतुकें । वावोचि गा ॥ २३ ॥ आणि अंतु यया नाहीं । ऐसें बोलिजे जें कांहीं । तेंही साचचि पाहीं । येकें परी ॥ २४ ॥ तरी प्रबोधु जंव नोहे । तंव निद्रे काय अंतु आहे ? । कीं रात्री न सरे तंव न पोहे । तया आरौतें ? ॥ २५ ॥ तैसा जंव पार्था । विवेकु नुधवी माथा । तंव अंतु नाहीं अश्वत्था । भवरूपा या ॥२६॥ वाजतें वारें निवांत । जंव न राहे जेथिंचें तेथ । तंव तरंगतां अनंत । म्हणावीचि कीं ॥२७॥ म्हणौनि सूर्यु जैं हारपे । तैं मृगजळाभासु लोपे । कां प्रभा जाय दीपें । मालवलेनि ॥ २८ ॥ तैसें मूळ अविद्या खाये । तें ज्ञान जैं उभें होये । तैंचि यया अंतु आहे । एऱ्हवीं नाहीं ॥२९॥ तेवींचि हा अनादी । ऐसी ही आथी शाब्दी । तो आळु नोहे अनुरोधी । बोलातें या ॥ २३० ॥ जें संसारवृक्षाच्या ठायीं । साचोकार तंव नाहीं । मा नाहीं तया आदि काई । कोण होईल ? ॥ ३१ ॥ जो साच जेथूनि उपजे । तयातें आदि हें साजे । आतां नाहींचि तो म्हणिजे । कोठूनियां ? ।

तळांत विस्तृत झाल्या आहेत आणि याचा मध्यभाग मनुष्यरूपी मुळांनीं भरलेला आहे १२. असा हा संसार-वृक्ष अति बळकट व अफाट-अमर्याद आहे आतां याचा नाश कोणाच्यानें करवेल ! अशी क्षुद्र भावना कदाचित् तूं आपले मनांत धरशील हो ! पण धरूं नकोस १३. तर हे बघ, हा वृक्ष उपटून टाकण्याचा उद्देश असेल तर याला उपटून टाकण्यास श्रम ते कसले आहेत ! तर नाहींतच. अरे ! लहान मुलाला जो बागुलबुवा दाखवितात तेव्हां त्याची भीति घालविण्याकरितां त्यास हांकून देशोधडीस लावण्यास दुसऱ्या देशांत कां घालवावा लागतो ! १४. आकाशांत ढगांचे आकृतींत दिसणारे किल्ले काय पाडावे लागतात ! तसेंच सशाच्या शिंग्रास काय मोडावें लागते ! अरे ! आकाशास मुळांत फूल असावें तरच मग तें तोडावें ! [ पण तें जर मुळीं नाहींच मग तोडण्याचें श्रम कसले ! ] १५. त्याचप्रमाणें अर्जुना ! हा तुला सांगितलेला संसाररूपी वृक्ष जर खरा नाहीं तर मग तो उपटून टाकण्यास भीति तरी कसली आली आहे ? १६. आम्हीं त्या झाडाचीं मूळें व डाहाळ्या यांच्या विस्ताराविषयीं जो प्रकार मागे सांगितला तो वांझेच्या घरांत जशी कांहीं पुष्कळ मुलें, घर भरून लेकरें आहेत असें सांगण्यापैकींच होय १७. स्वप्नांत ज्या व्यवहाराविषयीं आपण भाषणें, बडबडी करतो, त्यांचा जागें झाल्यावर कांहीं खरेपणा प्रत्ययास येतो कां ? त्याचप्रमाणें या संसाररूपी वृक्षाची पोकळ कहाणी म्हणजे स्वप्नाचें सख्खे जुळे भावंडच आहे १८. नाहींतर ज्याप्रमाणें आम्हीं या झाडाचे वर्णन केले, त्याप्रमाणें जर याचीं मूळें दृढ-भक्कम असती आणि हा विस्तार पावलेला वृक्ष स्वरूपानें खरा असता १९. तर असा कोणता मायेचा पूत आहे कीं, जो आपल्या सामर्थ्यानें त्याला मूळापासून उपटून टाकील ? हे पहा ! नुसता फुंकर घातल्यानें आकाश कोठें नाहींसें होते काय ? [फारतर कांहींसे आभाळ जाईल ] २२०. म्हणून हे धनंजया ! कासवीच्या तुपाची राजास मेजवानी करणें जसे असंभवनीय आहे, तसेंच आम्हीं जें या ससाररूपी वृक्षाच्या स्वरूपाचें वर्णन केलें, तें सर्व मिथ्या आहे २१. बाबारे ! मृगजळाची तळीं-तलाव आहेत ती दुरूनच दृष्टीनें पाहण्यास योग्य आहेत; त्याखेरीज त्यांच्या पाण्यावर तुला किंवा कोणालाहि कधीं साळी, केळी लावतां येतील काय ! २२. अगोदर या संसारवृक्षाचे मूळ अज्ञान हेंच जर मिथ्या आहे तर मग त्यापासून होणारें त्याचे कार्य ते केवढें म्ह० काय किंमतीचें सत्य असणार ? म्हणून संसाररूपी वृक्ष हा सर्वथैव मिथ्याच आहे; २३. आणि 'या वृक्षाला अंत नाहीं' असें जें कांहीं म्हणणें आहे, तेंहि एका प्रकारानें खरेंच आहे, असें समज २४. तर जोपर्यंत मनुष्यास जाग-जागृति येत नाहीं, तोंपर्यंत निद्रेला कोठें अंत शेवट आहे काय ? किंवा रात्र सरली नाहीं, तोपर्यंत त्याच्या आधीं उजाडत नाहीं २५. त्याप्रमाणें हे पार्था ! आत्मानात्मविवेकानें डोके वर काढले नाहीं म्ह० जोपर्यंत ब्रह्मज्ञान आत्मत्वानें झालें नाहीं, तोपर्यंत या संसाररूपी अश्वत्थास अंत नाहीं २६. अरे ! जोपर्यंत वाहणारा वारा जागच्या जागीं स्थिर राहिला नाहीं, तोंपर्यंत समुद्रावरील लाटांना, तरंगतेस शेवट नाहीं, असेंच म्हणावें लागतें २७. म्हणून ज्या वेळेस सूर्य मावळतो, अस्तास जातो, त्या वेळेस मृगजळाचा भास नाहींसा होतो किंवा दिवा मालवल्यावर सहजच दिव्याचा प्रकाश नाहींसा होतो; २८. याप्रमाणें या संसाररूपी वृक्षाचें मूळ असलेलें जें अज्ञान त्यास खाणारे, बाधित करणारें जें ब्रह्मज्ञान तें [ अंतःकरणांत ] उदय पावेल तेव्हांच या वृक्षाला शेवट आहे; एऱ्हवीं नाहीं २९. त्याचप्रमाणें संसारवृक्ष अनादि आहे असें जें लोक म्हणतात; ते जर खरोखर पाहूं गेलें असतां हा त्याच्यावर अनादिपणाचा आळ आलेला नसून, ते म्हणणेंहि एका दृष्टीनें त्याच्या लक्षणांस म्ह० अनादित्वास अनुसरूनच आहे २३०. कारण, संसारवृक्षाचे ठिकाणीं जर मुळीं तत्त्वतः खरेपणाच नाहीं, म्हणजे जो मुळांतच स्वरूपानें नाहीं, तर मग त्याचा आरंभ कसा व कोण होईल ! ३१. जो खरोखर सत्यरूपानें एखाद्या ठिकाणाहून कोठून तरी उत्पन्न होतो, त्याला आदि-उत्पत्ति आहे हें म्हणणें योग्य व शोभतें; पण जो वस्तुतः स्वरूपेंकरून नाहींच त्याला 'आदि'-आरंभ कोठून

१ मध्यभागांत. २ बळकट. ३ कदाचित्. ४ हलकट, क्षुद्र. ५ उपटण्याकरितां. ६ बागुलबुवा. ७ ढगांत दिसणारे किल्ले. ८ सशाचें शिंग. ९ आकाशाचें फूल. १० खरा. ११ मुळांची व फांद्यांची. १२ जागेपणांत. १३ समज. १४ दुर्बल. १५ कोणाच्या लेंकाच्यानें. १६ मेजवानी केली. १७ कोठून, कितीसें. १८ संसारवृक्ष. १९ खरेपणानें. २० जागृति. २१ प्रातःकाल. २२ अलीकडे. २३ वर न करी, उचलीत नाहीं. २४ भाषा, वार्ता. २५ आळ. २६ अनुरूप, योग्य. २७ सत्यता, खरेपणा. २८ मग.

॥ ३२ ॥ म्हणौनि जन्मे ना आहे। ऐसिया सांगों कवण माये। यालागीं नाहींपणेंचि होये। अनादि हा ॥ ३३ ॥ वांझेचिया लेंका। कैंची जन्मपत्रिका। नभीं निळी भूमिका। कें कल्पूं पां ॥ ३४ ॥ व्योमकुसुमांचा पांडवा। कवणें देंठु तोडावा। म्हणौनि नाहीं ऐसिया भवा। आदि कैंची? ॥ ३५ ॥ जैसें घटाचें नाहींपण। असतचि असे केलेनिवीण। तैसा समूळ वृक्षु जाण। अनादि हा ॥ ३६ ॥ अर्जुना ऐसेनि पाहीं। आद्यंतु ययासि नाहीं। माजीं स्थिती आभासे कांहीं। परी टवाळ तें ॥ ३७ ॥ ब्रह्मगिरीहूनि न निगे। आणि समुद्रींही कीर न रिगे। माजीं दिसे वाउगें। मृगांबु जैसें ॥ ३८ ॥ तैसा आद्यंतीं कीर नाहीं। आणि साचचि नोहे कहीं। परी लटिकेपणाची नवाई। पडिभासे गा ॥ ३९ ॥ नाना रंगीं गंजबजे। जैसें इंद्रधनुष्य देखिजे। तैसा नेणतया ऑपजे। आहे ऐसा ॥ २४० ॥ ॥ ऐसेनि स्थितीचिये वेळे। भुलवी अज्ञानाचे डोळे। लाँघवी हरी" मेखळे। लोकु जैसा ॥४१॥ आणि नसतीचि श्यामिका। व्योमीं दिसे तैसी दिसो कां। तरी दिसणेंही क्षणा एका। होय जाय ॥ ४२ ॥ स्वप्नींही मानिलें लटिकें। तरी निर्वाहो कां एकसारिखें। तेवीं आभासु हा क्षणिकें। रिताचि गा ॥ ४३ ॥ देखतां आहे आवडे। घेऊं जाइजे तरी नातुडे। जैसा टिकु कीजे माकडें। जळामाजीं ॥ ४४ ॥ तरंगभंगु सांडीं पडे। विजूही न पुरे होडे। आभासासि तेणें पाडें। होणें जाणें गा ॥ ४५ ॥ जैसा ग्रीष्मशेषींचा वारा। नेणिजे समोर कीं पाठीमोरा। तैसी स्थिती नाहीं तरुवरा। भवरूपा यया ॥ ४६ ॥ एवं आदि ना अंतु स्थिती। ना रूप ययासि आथी। आतां कायसी कुंथाकुंथी। उन्मूळणी गा ॥ ४७ ॥ आपुलिया अज्ञानासाठीं। नव्हता थांवला किरीटी। तरी आतां आत्मज्ञानाच्या लोटीं। खांडेनि गा ॥ ४८ ॥ वांचूनि ज्ञानेवीण एकें। उपाय करिसी जितुके। तिहीं गुंफसि अधिकें। रुखीं इये ॥ ४९ ॥ मग किती खांदोखांदीं। यया हिंडावें उर्ध्वीं अधीं। म्हणौनि मूळचि अज्ञान छेदीं। सम्यक्ज्ञानें ॥ २५० ॥ एऱ्हवीं दोरीचिया उरगा। डांगा मेळवितां पैं गा। तो शिणुचि वाउगा। केला होय ॥ ५१ ॥ तरावया मृगजळाची गंगा। डोणीलागीं धांवतां दांगा-। माजीं वोहळें बुडिजे पैं गा। साच जेवीं ॥ ५२ ॥ तेवीं नाथिलिया संसारा। उपाई

वा कोणापासून असणार ? ३२. म्हणून ज्याला जन्म वा अस्तित्व नाहीं त्याची आई कोण म्हणून सांगावी ? वास्तव हा संसारवृक्ष नाहींपणानेंच म्हणजे अभावरूपानें 'अनादि' आहे असें म्हटलें आहे इतकेंच ! ३३. अरे ! वांझेच्या मुलाची जन्मपत्रिका कोठून असणार ? त्याचप्रमाणें, आकाशांत निळा रंग, निळी जमीन आहे अशी कल्पना कशी करतां येईल ? ३४. अर्जुना ! आकाशाच्या फुलाचा देंठ कोणी तोडावा ? म्हणून ज्या संसाररूपी वृक्षास स्वरूपेंकरून अस्तित्वच नाहीं त्या संसाराला मूलारंभ कोठून असणार ? ३५. ज्याप्रमाणें घटोत्पत्तीच्या पूर्वी असणारा घटाचा 'नाहींपणा'–प्रागभाव, कोणी निर्माण केल्यावांचून 'अनादि' आहेच आहे, त्याप्रमाणें संसारवृक्षाचें मूळ जी माया, तिच्यासहवर्तमान हा संसारवृक्ष 'नाहींपणानेंच अनादि' आहे, असें जाण ३६. अर्जुना ! अशा रीतीनें हा अभावरूप आहे; म्हणून याला आदि नाहीं व अंतहि नाहीं. असें असूनहि मध्यस्थितिकालीं व्यवहारदशेंत हा प्रत्यक्ष जो कांहीं भासतो; तथापि तें त्याचे भासणें मृगजळाप्रमाणें मिथ्या होय ३७. कारण, मृगजळाची एखाद्या ब्रह्मगिरी पर्वतापासून उत्पत्ति होऊन ते निघत नाहीं आणि शेवटीं खरोखर समुद्रांतहि मिळत नाहीं असें असूनहि मध्यंतरी मिथ्या दिसतें, म्हणून त्याहि वेळेला [ प्रतीतिकालींहि ] तें वास्तविक नाहींच ३८. त्याप्रमाणें संसारवृक्ष हा आदिकालीं नाहीं, व अंतींहि खरोखर नाहीं आणि मध्यें दिसला तरीहि तो नाहींच. तात्पर्य, कोणच्याहि कालीं हा नाहीं नव्हे ह्याचें तत्त्वतः अस्तित्वच नाहीं; परंतु याच्या लटकेपणाचा काय चमत्कार सांगावा कीं, हा नसून 'आहे असा' भासतो म्हणून मिथ्या आहे ३९. इंद्रधनुष्य ज्याप्रमाणें नानाप्रकारच्या रंगांनीं भरलेलें दिसतें, त्याप्रमाणें हा संसाररूपी वृक्ष नेणत्यास–अज्ञान्यासच 'आहे असा' भासतो २४०. असा हा संसारवृक्ष आपल्या स्थितीच्या वेळेस अज्ञान्यांच्या डोळ्याला आपल्या सत्यत्वाची भूल पाडून चकवितो. जसा बहुरूपी हा कफनी, सोंग धारण करून लोकांच्या डोळ्याला आपल्या चातुर्यानें भुलवितो ४१. आणि आकाशाच्या ठिकाणीं नसलेलाच निळेपणा दिसतो. तसा दिसेना कां ? त्यांत तरी खरेपण आहे काय ? तें दिसणेंहि एका क्षणांत होते व नष्टहि होऊन जाते ४२. स्वप्नांतले पदार्थ वस्तुतः लटके असून सत्य आहेत असें मानले तरी ते एकसारखें टिकून राहून कायमचा निर्वाह होतो का ? तर नाहीं. त्याप्रमाणें हा आभासमात्र संसारवृक्ष, वस्तुतः नाहीं. दिसला तरी तो क्षणिक स्वरूपाचा असल्यामुळें तत्त्वतः क्षणभरहि एकरूपानें राहात नाहीं ४३. हा संसार वृक्षाचा आभास चांगला 'आहे' असा वाटतो आणि म्हणून विचार करून वस्तुतः ध्यायला गेलें असतां तो कोठेंच आढळत नाहीं. जसें माकड चेष्टा करितें, त्याप्रमाणें जलांत दिसणाऱ्या त्याच्या प्रतिबिंबाचें ठिकाणींहि चेष्टा दिसतात म्हणून त्यास धरण्याकरितां माकडानें प्रयत्न करावा ४४. लाटांचें एकामागून एक होणें व जाणें ही त्वरा कमीच आहे व विजेचे चमकणेंहि कमीच आहे तर यांच्यापेक्षांहि या विश्वाभासरूपी झाडाचें होणें आणि जाणें अति जलद, वेगानें आहे ४५. ग्रीष्म ऋतूच्या शेवटचा वारा हा जसा समोरून वाहतो किंवा पाठीमागून वाहत येतो. हें कांहीं समजत नाहीं, तशी नसणाऱ्या संसाररूपी वृक्षाची एक क्षणभरहि सारखी स्थिति नाहीं [ तर तो सतत परिवर्तनशील आहे ] ४६. याप्रमाणें या वृक्षास आदि, अंत, स्थिति हीं नाहींत व याला रूपहि नाहीं. मग हा उपटून टाकण्यांत परिश्रम–खटाटोप तरी कशाला पाहिजे ? ४७. अर्जुना ! आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळें हा नसलेला संसार वृक्ष बळावला आहे. तर आतां आत्मज्ञानरूप शस्त्रानें हा तोडून टाक, म्हणजे झालें ४८. नाहींतर [ कारण जें ज्याच्या अज्ञानेंकरून भासतें तें त्याच्याच ज्ञानेंकरून निवृत्त होतें; अन्य कशानेंहि होत नाहीं. असा नियम आहे ]. एका ब्रह्मज्ञानावांचून संसार वृक्षास छेदण्याचें जेवढें म्हणून उपाय तूं करशील, तितके सर्व उपाय बंधकारक असल्यानें या वृक्षांत–संसारांत अधिकाधिक तूं गुंतूनच पडशील ४९. मग या संसार वृक्षाच्या तूं किती खांद्यावरून हिंडशील ? आणि तसाच वरच्या किंवा खालच्या अशा अगणित खांद्यावर हिंडत बसशील तेहि किती ? याचा नेम नाहीं. म्हणून या संसार वृक्षाचें मूळच जें अज्ञान तें तूं यथार्थ ज्ञानानें छेदून टाक. दुसरा उपाय नाहीं २५०. एऱ्हवीं अरे ! दोरीवर भासलेला सर्प मारण्याकरितां पुष्कळ, भली मोठी कांठी प्रयत्नानें मिळविली म्हणजे तो जसा व्यर्थ शीणच केल्याप्रमाणें होतो ५१. किंवा मृगजलांच्या मोठ्या नदींतून तरून जाण्याकरितां नाव शोधण्याची रानोमाळ धांवाधांव करीत असतां अरण्यांतील एखाद्या खऱ्या ओहोळांतच जसें एखाद्यानें बुडून जावें ५२. त्याचप्रमाणें वीरा अर्जुना !

१ आई. २ आकाशपुष्पांचा. ३ मिथ्या. ४ स्थिति. ५ ब्रह्मगिरी-त्रिंबकेश्वराचा पर्वत. ६ मृगजळ. ७ खचित. ८ कधीं. ९ नवल. १० प्रतिभासे. ११ भरे. १२ उत्पन्न होईल, दिसेल. १३ सोंगाडी, बहुरूपी. १४ फसवी, हरण करी.

जाचतया वीरा । आपणपें लोपे वारा । विकोपीं जाय ॥ ५३ ॥ म्हणौनि स्वप्नींचिया घाया । ओखद चेवोचि धनंजया । तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ॥ ५४ ॥ परी तेचि लीला परजंवे । तैसें वैराग्याचें नवें । अभंगबळ होआवें । बुद्धीसी गा ॥५५॥ उठिलेनि वैराग्यें जेणें । हा त्रिवर्गु ऐसा सांडणें । जैसें वमुनियां सुणें । आतांचि गेलें ॥ ५६ ॥ हा ठायवरी पांडवा । पदार्थजातीं आघवा । विटवी तो होआवा । वैराग्य लाठु ॥ ५७ ॥ मग देहाहंतेचें दळें । सांडूनि एकेचि वेळे । प्रत्यक्‌बुद्धी करतळें । हातवसावें ॥ ५८ ॥ निसळें विवेकसाहणें । जे ब्रह्माहमस्मिबोधें सणाणें । मग पुरतेनि बोधें उटणें । एकलेचि ॥ ५९ ॥ परी निश्चयाचें मुष्टिबळ । पाहावें एकदोनी वेळ । मग तुळावें अति चोखाळ । मननवरी ॥ २६० ॥ पाठीं हतियेरां आपणयां । निदिध्यासें एक जालिया । पुढें दुजें नुरेल घाया- । पुरतें गा ॥ ६१ ॥ तें आत्मज्ञानाचें खांडें । अद्वैत प्रभेचेनि वाडें । नेदील उरों कवणेकडे । भववृक्षासी ॥ ६२ ॥ शरदागमींचा वारा । जैसा केरु फेडी अंबरा । कां उदयला रवी आंधारा । घोंटु भरी ॥ ६३ ॥ नाना उपवढ होतां खेंवो । नुरे स्वप्नसंभ्रमाचा ठावो । स्वप्रतीतिधारेचा वाहो । करील तैसें ॥ ६४ ॥ तेंव्हां ऊर्ध्वींचें मूळ । कां अधींचें हन शाखाजाळ । तें कांहींचि न दिसे मृगजळ । चांदिणा जेवीं ॥ ६५ ॥ ऐसेनि गा वीरनाथा । आत्मज्ञानाचिया खड्गलता । छेदूनियां भवाश्वत्था । ऊर्ध्वमूळातें ॥ ६६ ॥

ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्तन्ति भूयः
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥

मग इदंतेसि वाळलें । जें मीपणेंवीण डाहारलें । तें रूप पाहिजे आपलें । आपणचि ॥६७॥ परी दर्पणाचेनि आधारें । एकचि करूनि दुसरें । मुख पाहाती गव्हारें । तैसें नको हो ! ॥६८॥ हें पाहाणें ऐसें असे वीरा । जैसा न बोडलिया विहिरा । मग आपलिया उगमीं झरा । भरोनि ठाके ॥ ६९ ॥ नातरी आटलिया अंभ । निजबिंबीं प्रतिबिंब । निहटे कां नभीं नभ । घटाभावीं ॥ २७० ॥ नाना इंधनांशु सरलेया । वन्हि परते जेवीं आपणपयां । तैसें आपेंआप धनंजया । न्याहाळणें जें गा ॥ ७१ ॥ जिव्हे आपली चवी चाखणें । चक्षु निज बुबुळ देखणें । आहे तया ऐसें निरीक्षणें । आपुलें पैं ॥ ७२ ॥ कां प्रभेसि प्रभा

या लटक्या संसाराच्या निवृत्तीचा ज्ञानाशिवाय अन्य उपाय करीत असतां मनुष्य भ्रम पावतो, आणि त्यावेळीं आपल्या खऱ्या ज्ञानाचा लोप होऊन त्यामुळें त्याच्या अंगांत 'संसार सत्य आहे' असें जें वारें भरलेलें असतें, तें अधिकच वाढून तो स्वतः मृत्यु पावतो ९३. हें धनंजया, स्वप्नांत लागलेल्या तरवारीच्या घावास ज्याप्रमाणें जागृत होणें हेंच औषध आहे, त्याप्रमाणें ज्या संसाराची अज्ञानापासून उत्पत्ति आहे, त्या अज्ञान मूळाचा छेद करण्यास ब्रह्मज्ञान हेंच खड्ग पाहिजे ९४. परंतु तेंच ज्ञानखड्ग सहज धारण करतां-फिरवितां येईल असें बुद्धीस वैराग्याचें नित्य नवे व अ-भंग, न खचणारे बळ असावें लागतें ९५. जें वैराग्य उत्पन्न झाल्याबरोबर आतां ओकून गेलेल्या कुत्र्याच्या ओकीला पाहून जितकी किळस उत्पन्न होते त्या प्रकारानें त्रैलोक्यांतील सर्व अनुकूल भोगांवर त्यागबुद्धि झाली पाहिजे ९६. म्हणजे अर्जुना ! पदार्थमात्राबद्दल अशा तऱ्हेचा वीट उत्पन्न करणारा वैराग्याचा दांडगा जोर असावा लागतो ९७. मग देहाची अहंतारूपी म्यान वैराग्यरूप खड्गावरून एकदम काढून, देहाहंतेचा त्याग करून तें विचारवंत प्रत्यगात्मरूप बुद्धिरूपी हातांत घ्यावें ९८. मग तें खड्ग विवेकरूप सहाणेवर पाजळून त्यास 'अहं-मी ब्रह्म आहें' या बोधाची तीक्ष्ण अशी धार लावावी, मग त्यास पूर्ण अद्वैतबोधरूपी पाणी द्यावें ९९. इतके झाल्यावर ते खड्ग आत्मनिश्चयरूपी मुठीचे बळानें हातांत घेऊन एक दोन वेळ फिरवून अजमावून पहावें व शुद्ध मनन पूर्ण होईपर्यंत तोलून धरावे २६०. नंतर ज्ञानखड्गाचें व आपलें निदिध्यासानें ऐक्य झाल्यावर मग आपल्यापुढें घांव मारण्यापुरतासुद्धां तो द्वैतरूपी वृक्ष उरणारच नाहीं ६१. तें आत्मज्ञानरूप शस्त्र अद्वैत प्रभेच्या वाढीनें म्ह. तेजानें भवरूपी वृक्षास कोठेंहि अजिबात उरूं देणार नाहीं ६२. शरद् ऋतूच्या सुरवातीचा वारा ज्याप्रमाणें आकाशांतील सर्व अभ्राचा केरकचरा नाहींसा करतो, अथवा सूर्योदय झाल्यावर सर्व अंधार जणुं एक घोंट भरून नाहीसा केला जातो ६३. किंवा जागे होण्याबरोबर स्वप्नांतील गोष्टीचे ठावठिकाणहि उर्वरित रहात नाहीं त्याप्रमाणें आत्मज्ञानानुभवरूपी धारेचा प्रहार केला तर त्याच्या तिखटपणामुळें संसाररूप तरूचा नाश होतो ६४. त्यावेळेस ज्याप्रमाणें चांदणें पडल्यावर त्यांत मृगजल दिसतच नाहीं, त्याप्रमाणें संसाररूपी वृक्षाची वरचीं व खालचीं मुळें अथवा खालीं वाढलेला सर्व विस्तार हीं नाहींतशीं बाधित झाल्यानें मुळींहि दिसणार नाहींत ६५. याप्रमाणें हे वीरोत्तमा अर्जुना ! आत्मज्ञानरूपी खड्गानें हा वर मूळ असलेला संसाररूपी अश्वत्थवृक्ष मूळासुद्धां छेदून टाकून म्हणजे विवेकानें त्या संसाराचा निरास करून ६६.

**अन्वयार्थ**—**ततः**--त्यानंतर--**यस्मिन् गताः**-ज्या पदीं गेलेले-**भूयः**-पुनरपि-**न निवर्तन्ति**-निवृत्त होत नाहींत-**तत् पदं**-त्या पदाला-[ शोधावें, त्याला जाणावें ] **यतः**--ज्याच्यापासून ही--**पुराणी**--अनादि-**प्रवृत्तिः**-संसारप्रवृत्ति-**प्रसृता**-पसरली आहे-**तम् एव च**-त्याच-**आद्यं-पुरुषं**-आद्य पुरुषाला-**प्रपद्ये**-मी शरण आहें-[ **इति**-अशा भावनेनें- ] **परिमार्गितव्यं**-सर्व प्रकारें शोधावें, जाणावें ४.

त्यानंतर जेथें 'इदंता' म्ह. 'इदम्' स्फुरण नाहीं म्ह. 'इदम्' प्रतीतीचा आत्मा विषय नाहीं. अतएव इदम् स्फुरण सापेक्ष 'अहम्' स्फुरणहि जेथें नाहीं अर्थात् "अहम्-इदम्" अशा उभयविध वृत्तींनी रहित, नित्य उपलब्धि स्वरूप असलेलें आपले जें आत्मस्वरूप तें आपणच आत्मत्वानें पहावें [ त्याचें साक्षात्काररूप ज्ञान संपादन करावें ] ६७. परंतु समोर आरसा-उपाधी घेऊन एकाच मुखास दुसरें म्ह. स्वभिन्न करून [ बिंब व आरशां- तील प्रतिबिंब असें द्वैत भावानें ] अज्ञानी लोक आपलेच मुख आपण पाहतात, तसें हें आत्मस्वरूपास [ दृश्य- द्रष्टारूपानें द्वैतभाव करून ] पाहणें नको हो ! ६८. अर्जुना ! आपल्या आत्मस्वरूपाचें पाहणें असें आहे कीं, ज्याप्रमाणें विहीर न उकरतांना-उकरण्यापूर्वी तिच्यांत असलेला झरा आपल्या उगमाच्या ठिकाणीं भरलेलाच असतो. [ तेव्हां व्यक्त झाला नाहीं, तरी स्वस्वरूपानें असतोच ] ६९. किंवा पाणी आटल्यावर त्यांतील प्रतिबिंब मुख्य बिंबाशीं जसे ऐक्य पावतें, अथवा घट फुटल्यावर जसें घटांतील आकाश महदाकाशास मिळतें; २७०. किंवा जळणारी लांकडें पूर्णतया नाहींतशीं झाल्यावर त्यांतील अग्नि जसा मूळ स्वस्वरूपीं परतून लय पावतो, तसें अर्जुना ! आपले स्वरूप हें आपल्याला सहज स्वरूपानें पहावें लागते [ विषय-विषयी भाव रहित, संशय रहित - सत्ता - स्वयंप्रकाशरूप आत्मा आहे ] ७१. जिव्हेनें आपली स्वतःची चव चाखून पहावी. किंवा डोळ्यांनीं आपलें बुबुळ पहावे तसें आपलें स्वरूप आपण पाहाणें, हें होय ७२. किंवा प्रभा जशी प्रभेस मिळावी किंवा आकाशानें जसें आकाशावर लोळावें

१ जागें होणें. २ ज्ञानखड्ग. ३ धारण करतां यावें.

४ धर्म, अर्थ आणि काम. [ स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ ].

मिळे । गगन गगनावरी लोळे । नाना पाणी भरलें खोळे । पाणियाचिये ॥ ७३ ॥ आपणचि आपणयातें । पाहिजे जें अद्वैतें । तें ऐसें होय निरुतें । बोलिजतु असे ॥ ७४ ॥ जें पाहिजतेनवीण पाहिजे । कांहीं नेणणाचि जाणिजे । आद्यपुरुष कां म्हणिजे । जया ठायातें ॥ ७५ ॥ तेथही उपाधीचा वोथंबा । घेऊनि श्रुति उभविती जिभा । मग नामरूपाचा वडंबा । करिती वायां ॥ ७६ ॥ पैं भवस्वर्गा उबगले । मुमुक्षु योगज्ञाना वळघले । पुढती न यों इया निगाले । पैजा जेथ ॥ ७७ ॥ संसाराचिया पायां पुढां । पळती वीतराग होडा । ओलांडोनि ब्रह्मपदाचा कर्मकडा । घालिती मागां ॥ ७८ ॥ अहंतादिभावां आपुलियां । झाडा देऊनि आघवेया । पत्र घेती ज्ञानिये जया । मूळघरासी ॥ ७९ ॥ पैं जेथुनी हे एवढी । विश्वपरंपरेची वेलांडी । वाढती आशा जैसी कोरडी । निर्दैवाची ॥ २८० ॥ जिये कां वस्तूचें नेणणें । आणिलें थोर जगा जाणणें । नाहीं तें नांदविलें जेणें । मी तूं जगीं ॥ ८१ ॥ पार्था तें वस्तु पहिलें । आपणपें आपुलें । पाहिजे जैसें हिंवलें । हिंव हिंवें ॥ ८२ ॥ आणीकही एक तया । वोळखण असे धनंजया । तरी जया कां भेटलिया । येणेंचि नाहीं ॥ ८३ ॥ परी तया भेटती ऐसे । जे ज्ञानें सर्वत्र सरिसे । महाप्रळयांबूचें जैसें । भरलेपण ॥ ८४ ॥

निर्मानमोहा जितसङ्गदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।
द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥

जया पुरुषांचें कां मन । सांडोनि गेलें मोह मान । वर्षांतीं जैसें घन । आकाशातें ॥ ८५ ॥ निकवड्या निष्ठुरा । उबगिजे जेवीं सोयरा । तैसें नागवती विकारां । वेटाळू जे ॥ ८६ ॥ फळली केळी उन्मूळे । तैसी आत्मलाभें प्रबळे । तयाची क्रिया ढाळेंढाळें । गळती आहे ॥ ८७ ॥ आगी लागलिया रुखीं । देखोनि सैरा पळती पक्षी । तैसें सांडिलें अशेखीं । विकल्पीं जे ॥ ८८ ॥ आइकें सकळ दोषतृणीं । अंकुरिजती जिये मेदिनी । तिये भेदबुद्धीची काहाणी । नाहीं जयातें ॥ ८९ ॥ सूर्योदयासरिसी । रात्री पळोनि जाय अपैसी । गेली देहअहंता तैसी । अविद्येसवें

अथवा पाणी ज्याप्रमाणें पाण्याचेच खोलींत–पदरांत भरावें ७३. त्याप्रमाणें अद्वैतदृष्टीनें आपणच आपलें स्वरूपास जें पहावयाचे त्या पहाण्याची रीत ती अशी आहे. हें मी तुला निश्चयपूर्वक खरें सांगतों ७४. ती अशी कीं पाहणेपणा घेतल्याविना म्हणजे पाहाणारा [ द्रष्टा ] पहाण्याचा पदार्थ [ दृश्य ] यांच्या सापेक्ष भावावांचून जे आत्मस्वरूप पहावें, ज्ञान संपादन करावें म्हणजे कांहीं विशेष भावानें न जाणणें आणि ज्ञातृज्ञेयाविना नुसतेच दृङ्मात्रत्वानें असणें; याचेच नांव आत्मस्वरूपाचें जाणणें होय. आत्मरूप ब्रह्मालाच ‘ आद्य पुरुष ’ असें म्हणतात. त्या ब्रह्माच्या निर्विशेष स्वरूपासंबंधीं तत्त्वतः श्रुतीस कांहीं एक बोलतां येत नाहीं ७५. पण त्याच्या ठिकाणीं माया उपाधीचा वा जगत् कारणत्वादि उपाधिगुणांचा आश्रय वा साह्य घेऊन श्रुति जिभा उभविते–वर्णन करण्यास प्रवृत्त होते मग नामरूपांचा व्यर्थ गलबला करितें असो २७६. परंतु अशा आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं प्राप्त होण्याकरितां स्वर्ग व संसार ह्यांना कंटाळून जें मुमुक्षु ‘ पुनः स्वर्गास वा संसारास माघारे येणार नाहीं ’ अशा पैजेनें योग व ज्ञान यांचा आश्रय करून निघाले ७७. ते असें कीं संसाराच्या हातावर हात मारून त्याच्यापुढें ते वैराग्य-संपन्न ज्ञानी धूम ठोकीत पळत असतां, कर्मानें प्राप्त होणारें अत्यंत मोठें अंतिम ऐश्वर्य किंवा जें ब्रह्मपद, [ सत्यलोक ] हाच कोणी कडा ओलांडून मार्गे टाकतात ७८. अशा स्थितींतहि वैराग्य किंवा ज्ञानसंपन्न आपण आहोंत अशा तऱ्हेचा सूक्ष्म अभिमान, अहंभाव राहण्याचा संभव आहे; त्या सर्वांचाहि झाडा देऊन जे विचारवान् मुमुक्षु आपल्या मूळच्या घराप्रत म्हणजे निजस्वरूपाप्रत प्राप्त होण्याकरितां दाखला घेतात ७९. ज्या निजस्वरूपापासून एवढा विश्वपरंपरेचा वेल वाढला आहे, असें सामान्य शास्त्रें किंवा लोक म्हणतात. परंतु तें म्हणणें व्यर्थ आहे. ज्याप्रमाणें भाग्यहीन रुषाच्या पोकळ आशेचा वेल व्यर्थ वाढत असतो, त्याप्रमाणें निजस्वरूपाच्या ठिकाणींही विश्वपरंपरेच्या वाढीची कहाणी आहे २८०. कारण, ज्या परमात्मवस्तूचें न जाणणें म्हणजे अज्ञान त्यानेच या विश्वाच्या ज्ञानास थोरपणा आणला आहे आणि त्या अज्ञानानेंच तत्त्वतः कालत्रयीं नसणारा मीतूंपणा जगतांत नांदविला, प्रसिद्धीस आणिला आहे ८१. अर्जुना ! ह्या रीतीनें विश्वाच्याहि पूर्वीं असलेली जी ब्रह्म वस्तु तीच आपलें निजस्वरूप आहे तें आपणच आपले ठिकाणीं पाहिलें पाहिजे. तें पाहणें म्हणजे ज्याप्रमाणें थंडीनें थंडीलाच थंडवावें म्ह. विषय करावा त्याप्रमाणें होय ८२. हे धनंजया ! त्या निजपदास [ आत्मस्वरूपास ] ओळखण्याचीं आणखी एक खूण आहे ती अशी कीं, ज्या स्वरूपाची आत्मत्वानें भेट झाली असतां त्या ठिकाणाहून पुनः परत येणें [ पुनर्जन्म ] घडत नाहीं ८३. तरीपण महाप्रलयकालीं जसें पाण्यानें सर्वत्र सारखे [ भरलेपण ] जलमय होतें, तसें जें ज्ञानाच्या योगानें सर्वच परिपूर्ण सच्चिदानंद परब्रह्मास आत्मरूपानें भेटतात. त्यांना सर्वत्र व्यापक समभाव व्याप्त असलेला दिसतो तद्व्यतिरिक्त दुसरी प्रतीति त्यांना होतच नाहीं, अशारीतीनें ब्रह्मस्वरूपास ऐक्य भावानें भेटतात. ८४.

**अन्वयार्थ––निर्मानमोहाः**–ज्यांच्यापासून मान म्ह० अहंकार–गर्व व मोह म्ह० अविवेक हे दोन्ही दोष निघून गेले आहेत–**जितसङ्गदोषाः**–संग म्ह० आसक्ति हाच दोष ज्यांनीं जिंकला आहे–**अध्यात्मनित्याः**–परमात्म्याचें स्वरूप पहाण्यामध्यें जे तत्पर आहेत–**विनिवृत्तकामाः**–ज्यांचें सर्व काम विशेषतः निवृत्त झाले आहेत–**सुखदुःखसंज्ञैः द्वंद्वैः**–सुख व दुःख या नांवाच्या द्वंद्वांनीं ज्यांना–**विमुक्ताः**–सर्वथा सोडलें आहे, असें–**अमूढाः**–विवेकी अनादि–अज्ञानरहित–**तत् अव्ययं पदं**–त्या अव्यय पदाला–**गच्छन्ति**–प्राप्त होतात ५.

वर्षाऋतूच्या अखेरीस ज्याप्रमाणें मेघ, ढग आकाशास टाकून, सोडून जातात, त्याप्रमाणें ज्या पुरुषाच्या मनाला मोह व अभिमान आपण स्वतः होऊन सोडून जातात ८५. निर्धन व निर्दय अशा मनुष्यास ज्याप्रमाणें त्याचे आप्त, नातेवाईक कंटाळतात व सोडतात, त्याप्रमाणें जे पुरुष विकारांच्या सपाट्यांत सांपडत नाहींत ८६. केळीला केळीं आल्यावर ती जशी उन्मळून पडते, तशा प्रबल [ निःसंदेह यथार्थ ] आत्मस्वरूप लाभामुळें ज्यांच्या क्रिया आपोआप हळूहळू सुटत जाऊन बंद पडूं लागतात ८७. वृक्षाला आग लागली असे पाहून त्यावर बसणारे पक्षी ज्याप्रमाणें तो सोडून जिकडे रस्ता सांपडेल तिकडे पळून जातात, त्याप्रमाणें ज्या पुरुषांना सर्व विकल्प आपण होऊन सोडून जातात ८८. ज्या भेदबुद्धीरूप पृथ्वीवर सर्व प्रकारचे दोषरूपी तृणाचे अंकुर फुटतात, वाढतात त्या भेदबुद्धीची ज्याला गोष्ट सुद्धां माहीत नाहीं ८९. सूर्योदय होण्याबरोबर रात्र जशी आपोआप पळून जाते, नाहींशी होते, तसा आत्मस्वरूपाचा लाभ झाल्यावर ज्यांची देह–अहंता, देहविषयक अभिमान अविद्येसह पळून जातो.

॥ २९० ॥ पैं आयुष्यहीना जीवातें । शरीर सांडी जेवीं अवचितें । तेवीं निद्सुरें द्वैतें । सांडिले जे ॥ ९१ ॥ लोहाचें सांकडें परिसा । न जोडे अंधारु रवि जैसा । द्वैतबुद्धीचा तैसा । सदा दुकाळ जया ॥ ९२ ॥ अगा सुखदुःखाकारें । द्वंद्वें देहीं जियें गोचरें । तियें जयां कां समोरें । होतीचिना ॥ ९३ ॥ स्वप्नीं राज्य कां मरण । नोहे हर्षशोकांसि कारण । उपवढलिया जाण । जियापरी ॥ ९४ ॥ तैसें सुखदुःखरूपीं । द्वंद्वीं जे पुण्यपापीं । न घेपिजती सर्पीं । गरुड जैसें ॥ ९५ ॥ आणि अनात्मवर्गनीर । सांडूनि आत्मरसाचें क्षीर । चरताति जे सविचार । राजहंसु ॥ ९६ ॥ जैसा वर्षोनि भूतळीं । आपला रसु अंशुमाळी । मागौता आणी रश्मिजाळीं । बिंबासीचि ॥ ९७ ॥ तैसें आत्मभ्रांतीसाठीं । वस्तु विखुरली बारावाटीं । ते एकवटिती ज्ञानदृष्टी । अखंड जे ॥ ९८ ॥ किंबहुना आत्मयाचा । निर्धारीं विवेकु जयांचा । बुडाला वोघु गंगेचा । सिंधूमाजीं जैसा ॥९९॥ पैं आघवेंचि आपलेंपणें । नुरेचि जया अभिलाषणें । जैसें येथूनि पर्‍हां जाणें । आकाशा नाहीं ॥३००॥ जैसा अग्नीचा डोंगरु । नेघे कोणी बीज अंकुरु । तैसा मनीं जयां विकारु । उदेजेना ॥ १ ॥ जैसा काढिलिया मंदराचळु । राहे क्षीराब्धि निश्चळु । तैसा नुठी जयां सळू । कामोर्मीचा ॥ २ ॥ चंद्रमा कळीं धाला । न दिसे कोणें आंगीं वोसावला । तेवीं अपेक्षेचा अवखळा । न पडे जयां ॥ ३ ॥ हें किती बोलूं असांगडें । जेवीं परमाणु नुरे वायूपुढें । तैसें विषयांचें नावडे । नांवचि जयां ॥४॥ एवं जे जे कोणी ऐसे । केले ज्ञानाग्नि हुताशें । ते तेथ मिळती जैसें । हेमीं हेम ॥५॥ तेथ म्हणिजे कवणें ठाईं । ऐसेंही पुससी कांहीं । तरी तें पद गा नाहीं । वेंचु जया ॥ ६ ॥ दृश्यपणें देखिजे । कां ज्ञेयत्वें जाणिजे । अमुकें ऐसें म्हाणिजे । तें जें नव्हे ॥ ७ ॥

न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः । यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥

पैं दीपाचिया बंबाळीं । कां चंद्र हन जें उजळी । हें काय बोलों अंशुमाळी । प्रकाशी जें ॥ ८ ॥ तें आघवेंचि दिसणें । जयाचें कां न देखणें । विश्व भासतसे जेणें । लपालेनी ॥ ९ ॥ जैसें शिंपीपण हारपे । तंव तंव खरें होय रुपें । कां दोरी लोपतां सापें । फार होइजे ॥ ३१० ॥ तैसीं चंद्रसूर्यादि थोरें । इयें तेजें

बाधित होतो; २९०. हें पहा आयुष्यहीन जीवास ज्याप्रमाणें शरीर अचानक, एकदम टाकून देते, त्याप्रमाणें मोह पाडणारें अज्ञानकार्य द्वैत ज्यांना सोडून जातें ९१. परिसाला जसा लोखंडाचा दुष्काळ असतो किंवा सूर्याला अंधकार केव्हांहि मिळत नाहीं, त्याप्रमाणें द्वैतबुद्धीचा ज्यांच्यापाशीं सदोदित तोटा, दुष्काळच असतो ९२. अरे ! या देहाचा अभिमान धरल्यावर सुखदुःखाकाररूपी जी द्वंद्वें या देहांत अनुभवास येतात तीं ज्यांच्या समोरहि येतच नाहींत ९३. ज्याप्रमाणें जागें झालें असतां स्वप्नांत मिळालेलें राज्य अथवा प्राप्त झालेलें मरण हीं हर्षास किंवा शोकास कारण होत नाहींत ९४. ज्याप्रमाणें सर्पाकडून गरुड पक्षी धरला जात नाहीं, त्याप्रमाणें सुखदुःखरूपी द्वंद्वांकडून आणि पुण्यपापात्मक द्वंद्वांकडून किंवा त्यांस उत्पन्न करणाऱ्या द्वैताकडून जें वेढिलें वा जिंकलें जात नाहींत ९५. आणि अनात्म पदार्थमात्ररूपी पाणी टाकून आत्मानात्म विचारसंपन्न मुमुक्षुरूपी राजहंस ज्याप्रमाणें आत्मरसरूपी [ सद्वस्तुरूप ] दुधाचें सेवन करितात ९६. किंवा सूर्य जसा आपल्याच रसाचा–पाण्याचा पृथ्वीवर पाऊस पाडून पुनः तेंच पाणी आपल्या किरण–समुदायद्वारां आपल्या बिंबाचें ठिकाणींच शोषण करून घेतो ९७. त्याप्रमाणें खऱ्या आत्मस्वरूपाविषयींची भ्रांति पडल्यामुळें जो ब्रह्मात्मभाव, देहादि व जगद्रूपादि अनात्म वस्तूंच्या ठिकाणीं चहूंकडे पसरलेला असतो तो ब्रह्मात्मभाव ज्ञानदृष्टिद्वारां जे सत् पुरुष आपल्या स्वरूपांत नेहमीं ऐक्यरूपानें पाहतात ९८. फार काय सांगावें ! ! ज्याप्रमाणें गंगेचा ओघ समुद्रास मिळाल्यावर तेथें बुडून तद्रूपच होतो, त्याप्रमाणें आत्मस्वरूपाचा निर्धार करणारा जो सत्पुरुष त्याचा विचार तोहि त्या ब्रह्मात्मैक्य निर्धारांत म्हणजे आत्मस्वरूपांत तद्रूपतेनें सदाचाच लीन होतो ९९. ज्याप्रमाणें आकाशाची सर्वत्र व्याप्ति असल्यामुळें त्याला एका गांवाहून दुसऱ्या गांवास जाणें शक्य नाहीं. [ कारण व्यापक पदार्थांत क्रियाच संभवत नाहीं ] त्याप्रमाणें सर्वच आपलें स्वरूप झाल्यामुळें [ स्वभिन्न अशा ] अमुक एका पदार्थाचा अभिलाष करावा असें कारणच त्यास उरत नाहीं ३००. ज्याप्रमाणें अग्नीच्या डोंगरावर कसलेंहि बीं पेरलें असतां तें बीज रुजत वा उगवत नाहीं, त्याप्रमाणें ज्याच्या मनांत [ ज्ञानाचा उदय झाला आहे, तेथें ] कोणतेहि विकार [ सत्यत्वानें ] उद्भवतच नाहींत १. समुद्रमंथनसमयीं क्षीरसमुद्रांत रवी म्हणून घातलेला मंदराचल त्यांतून काढून घेतल्यावर तो क्षीरसमुद्र जसा स्थिर झाला, याप्रमाणें आत्मप्राप्ति झाल्यामुळें ज्याच्या मनांत सत्यत्वानें कामवासनारूपी लाटेची उसळी उत्पन्न होत नाहीं २. ज्याप्रमाणें चद्र षोडश कलांनीं पूर्ण झाल्यावर कोणत्याहि बाजूनें न्यून असलेला दिसत नाहीं, त्याप्रमाणें आत्मप्राप्ति झाल्यामुळें जो स्वस्थ झाला आहे ज्याच्या मनांत कोणतीच इच्छा सत्यत्वानें उत्पन्न होणे, ही न्यूनता ज्याचें ठिकाणीं नाहींच ३. अशा निरुपम गोष्टी तुला किती म्हणून सांगूं ? ज्याप्रमाणें वायूच्या पुढें परमाणु टिकत नाहीं त्याप्रमाणें विषयाचें नांवहि ज्याला आवडत नाहीं ४. अशा प्रकारें हुत भक्षण करणारा जो आत्मज्ञानरूपी अग्नि त्यांत ज्यांनीं सर्व विषय उपर्युक्त रीतीनें जाळून टाकले आहेत, ते पुरुष सुवर्णांत सुवर्ण मिळाल्याप्रमाणें त्या आत्मस्वरूपाचे ठिकाणीं प्राप्त होतात ५. त्या ठिकाणीं म्हणजे कोठें असें म्हणशील तर ज्या पदाचा केव्हांहि नाश होत नाहीं, अशी जी परमात्मवस्तु तेथें प्राप्त होतात ६. दृश्यत्वानें पाहण्याचा विषय म्हणून पाहावें, किंवा ज्ञेयत्वानें जाणावें, किंवा हें अमुक विशेष प्रकारचें आहे असा हा किंवा अशा प्रकारचे निर्देशात्मक व्यवहार ज्याच्या ठिकाणीं होतात, असें जें जें आहे त्यांपैकीं जें नाहीं, अशी ती ब्रह्मवस्तु त्याला कोणीहि दाखवूं शकत नाहीं ७.

**अन्वयार्थ—सूर्य**–सूर्य–**तत्**–त्या तेजोरूप पदाला–**न भासयते**–प्रकाशित करीत नाहीं–**शशांकः न**–चंद्र त्याला प्रकाशित करीत नाहीं–**पावकः न**–अग्नि त्याला प्रकाशित करीत नाहीं–**यत्**–ज्याला–**गत्वा**–प्राप्त होऊन [ **यतयः** ]–**न निवर्तन्ते**-संसारांत परत येत नाहींत–**तत्**–तें **मम**–माझें–**परमं**–परम श्रेष्ठ–**धाम**–पद–स्वरूप तेज आहे ६.

परंतु दिव्याच्या मोठ्या भडक उजेडानें जें प्रकाशलें जाते अथवा जें चंद्राच्या प्रकाशानें प्रकाशित होते, फारतर काय ! परंतु ज्या सूर्यापासून जे सर्व जग प्रकाशित होते ८. त्या त्रिविध प्रकाशानें जगांतील सर्व वस्तूचें दिसणें म्ह० परमात्म्यास न पाहणें होय अर्थात् हा सर्व व्यवहार परमात्मस्वरूपाचे अज्ञान कालांतच होत असतो; वस्तुतः तर संपूर्ण विश्वहि परमात्म्याचे प्रकाशानेंच प्रकाशित होतें ९. अरे ! जसजसा शींपीचे शिंपीपणाचा लोप होतो तसतसा रुप्याचा मिथ्याभास वाढतो; तें खरें आहे असें भासूं लागते किंवा दोरीच्या विशेषरूपाचा अज्ञानानें लोप झाल्यावर सापाची प्रतीति अधिक दृढ होऊं लागते ३१०. त्याप्रमाणें चंद्रसूर्यादिकांची

जियें फारें । तियें जयाचेनि आधारें। प्रकाशती ॥ ११ ॥ ते वस्तु कीं तेजोराशी । सर्वभूतात्मक सरिसी । चंद्रसूर्यांच्या मानसीं । प्रकाशे जे ॥ १२ ॥ म्हणौनि चंद्रसूर्य कडवेसां । पडती वस्तूच्या प्रकाशा । यालागीं तेज जें तेजसा । तें वस्तूचें आंग ॥ १३ ॥ आणि जयाच्या प्रकाशीं । जग हारपे चंद्रार्केसीं । सचंद्र नक्षत्रें जैसीं । दिनोदयीं ॥ १४ ॥ नातरी प्रबोधलिये वेळे । ते स्वप्नींची डिंडिमा मावळे । कां नुरेचि सांजवेळे । मृगेतृष्णिका ॥ १५ ॥ तैसा जिये वस्तूच्या ठायीं । कोण्हीच कां आभासु नाहीं । तें माझें निजधाम पाहीं । पाटांचें गा ॥ १६ ॥ पुढती जे तेथ गेले । ते न घेतीच माघौतीं पाउलें । महोदधीं कां मिनले । स्रोत जैसे ॥ १७ ॥ कां लवणाची कुंजरी । सूदलिया लवणसागरीं । होयचि ना माघारी । परती जैसी ॥ १८ ॥ नाना गेलिया अंतराळा । न येतीचि वन्हिज्वाळा । नाहीं तप्तलोहौनि जळा । निघणें जेवीं ॥ १९ ॥ तेवीं मजसीं एकवट । जे जाले ज्ञानें चोखट । तयां पुनरावृत्तीची वाट। मोडली गा ॥ ३२० ॥ तेथ प्रज्ञापृथ्वीचा रावो । पार्थु म्हणे जी जी पसावो। परी विनंती एकी देवो । चित्त देतु ॥२१॥ तरी देवेंसि स्वयें एक होती। मग माघौते जे न येती । ते देवेंसि भिन्न आथी। कीं अभिन्न जी ॥२२॥ जरी भिन्नचि अनादिसिद्ध । तरी न येती हें असंबद्ध । जे फुलां गेलें षट्पद । ते फुलेंचि होती पां ॥ २३ ॥ पैं लक्ष्याहुनि अनारिसे। बाण लक्ष्यीं शिवोनि जैसें। मागुते पडती तैसे। येतीचि ते ॥२४॥ नातरी तूंचि ते स्वभावें। तरी कोणें कोणासि मिळावें । आपणयासी आपण रुपावें । शस्त्रें केवीं ? ॥२५॥ म्हणौनि तुजसी अभिन्नां जीवां। तुझा संयोगवियोगु देवा । नये बोलों अवयवां । शरीरेंसीं ॥२६॥ आणि जे सदां वेगळे तुजसीं। तयां मिळणीं नाहीं कोणे दिवशीं। मा येती न येती हे कायसी । वायबुद्धि? ॥ २७ ॥ तरी कोण गा ते तूंतें। पावोनि न येती माघौते। हे विश्वतोमुखा मातें । बुझावीं जी ॥२८॥ इये आक्षेपीं अर्जुनाच्या। तो शिरोमणी सर्वज्ञांचा। तोषला बोध शिष्याचा। देखोनियां ॥२९॥ मग म्हणे गा महामती । मातें पावोनि न येती पुढती । ते भिन्नाभिन्न रीती। आहाती दोनी ॥ ३३० ॥ जैं विवेकें खोलें पाहिजे । तरी मी तेचि ते सहजें । ना आहाचवाहाच तरी दुजे । ऐसेंही गमती ॥ ३१ ॥ जैसे पाणियावरी वेगळ ।

जी प्रखर तेजें आहेत तीं ज्या परमात्म स्वरूपाच्या अंधकारांत अज्ञान–कालांत प्रकाशित होत असतात ११. अशी जी वस्तु ती अति तेजस्वी, केवळ तेजाची रास असून ती सर्व भूतांना अधिष्ठानरूपानें साधारण व्यापून चंद्र व सूर्य यांच्याहि मनांत प्रकाश देते १२. म्हणून या वस्तूच्या प्रकाशापुढें चंद्र व सूर्य यांचें तेज याच्या कवडशासारखें आहे. याकरितां सर्व तेजस्वी वस्तूंस तेजरूपानें साह्य देणारे असें या ब्रह्मवस्तूचें तेज आहे १३. ज्याप्रमाणें सूर्योदय झाल्यावर चंद्रासह नक्षत्रें निस्तेजित होऊन लोपतात त्याप्रमाणें या आत्मवस्तूच्या [ ज्ञान-कालांत ] प्रकाश झाला असतां चंद्रसूर्यांसह अखिल जगाचा लोप होतो १४. किंवा जागें झाल्यावर स्वप्नांतील भासलेला सर्व पसारा मावळतो अथवा संध्याकाळ झाल्यावर जसें मृगजळ आपोआप नाहींसें होतें १५. त्याप्रमाणें ज्या वस्तूच्या ठिकाणीं कसलाच भास राहात नाहीं, तें माझें श्रेष्ठ व मुख्य स्थान म्ह० स्वरूप होय १६. त्या ठिकाणीं जे लोक गेले ते, ज्याप्रमाणें पाण्याचा ओघ समुद्रास मिळाल्यावर माघारे येत नाहींत, त्याप्रमाणें पुनः मागे पाऊल घेत नाहींत [ जन्म घेत नाहींत ] १७. किंवा मिठाची तयार केलेली हत्तीण समुद्रांत बुडविल्यावर ती जशी परत माघारी येत नाहीं १८. किंवा आकाशांत गेलेल्या अग्नीच्या ज्वाळा जशा खालीं परतून येत नाहींत; किंवा तापलेल्या लोखंडावर टाकलेलें पाणी जसें नाहींसें होतें [ त्यांतून त्यास परत माघारीं येणें नाहीं ] १९. तसें शुद्धज्ञान झाल्यामुळें जे माझे स्वरूपाशीं ऐक्य पावतात, त्यांना पुनर्जन्माचा मार्ग मोडला. [ पुनरावृत्तींतून मुक्त होतात, जन्मास येत नाहींत ] ३२०. [ येथपासून ३४२ ओंवींपर्यंतच्या ओंव्या पुढच्या श्लोकाचें अवतरण म्हणून महाराजांनीं दिल्या आहेत ]. भगवंताचें बोलणें ऐकून बुद्धिरूप पृथ्वीचा राजा जो अर्जुन, तो म्हणाला, “ प्रभो ! [ आज ब्रह्मात्मैक्य बोध सांगण्यानें] आपला आज मजवर एक मोठा प्रसादच झाला आहे; परंतु एक माझी विनंती आहे तिकडे देवांनीं लक्ष द्यावें २१. जे पुरुष देवाच्या स्वरूपांत जाऊन स्वतः एकरूप होतात ते मग परतून माघारी येत नाहींत, ते पुरुष पूर्वी मूळचे देवाच्या स्वरूपापासून भिन्न होतें किंवा अभिन्न म्ह० एकरूपच होते ? २२. जर ते स्वरूपेंकरून अनादिसिद्ध, मूळचे भिन्नच असतील, तर ते माघारी येत नाहींत, हे आपले म्हणणें असंभवनीय–विसंगत होय. कारण, हे म्हणणें जर खरें असेल तर मग भ्रमर फुलांतील मकरंद सेवन करण्यास गेलें असतां खरोखर तें फुलेंच व्हावयास पाहिजेत पण होतात काय ? तर नाहीं २३. दुसरें असें पहा, लक्ष्याहून स्वरूपानेंच वेगळे असलेले जे बाण ते सोडल्यावर ज्याप्रमाणें लक्ष्यास भेदून पुनः खालीं वेगळे पडतातच [ लक्ष्य पदार्थाशीं ऐक्य पावत नाहींत ], त्याप्रमाणें ते साधक देवाशीं एकरूप न होतां परत येतातच. [ म्हणून तुमच्या स्वरूपांत मिळाले असतांहि माघारे येत नाहींत, हें म्हणणें युक्त नाहीं ] २४. नाहींतर ते पुरुष जर स्वभावतः तूंच म्ह० एकरूपच आहेत असें वस्तुतः असेल तर मग कोणीं कोणास मिळावयाचें ! असें पहा ! शस्त्रानें शस्त्रासच [ आपल्या स्वतःस ] कसें रुपावें वा छेद कसा काय करावा ? २५. म्हणून देवा ! तुमच्या स्वरूपाशीं ज्याचें ऐक्य आहे, त्यांना तुमचा संयोग किंवा वियोग होतो, असें कसें म्हणतां येईल ? कारण, शरीराचें अवयव आणि शरीर यांचा कधीं एकमेकांशीं संयोग किंवा वियोग होतो असें म्हणतांच येत नाहीं, त्याप्रमाणें २६. बरें ! जें नेहमीं तुमच्या स्वरूपापासून भिन्न आहेत. ते केव्हांहि कोणत्याहि दिवशीं तुमच्या स्वरूपांत ऐक्य पावावयाचे नाहींत; मग ते तुझ्या स्वरूपाहून माघारी येतात किंवा येत नाहींत, हें व्यर्थ समजूतीचें बोलणें तरी कशाला हवें ? २७. तर श्रीकृष्णा! ज्या तुम्हाला सर्वत्र मुखें आहेत, अशा देवा! तुमच्या स्वरूपांत एकरूपतेनें मिळाल्यावर कोण माघारी येत नाहींत, तें मला नीट समजावून सांगा ” २८. अर्जुनाची ही शंका ऐकून आपण सांगितलेलें त्याच्या मनांत पूर्णपणें बिंबलें, असा आपल्या शिष्याचा बोध पाहून सर्वज्ञशिरोमणि भगवान् श्रीकृष्ण यांस फार संतोष झाला २९. मग भगवान् म्हणतात :–हे महामते अर्जुना ! मला एकरूपतेनें प्राप्त झाल्यानंतर जे जीव पुनः माघारी येत नाहींत, [ तेव्हां ते जीव माझ्याशीं भिन्न आहेत कीं अभिन्न आहेत; असा तुझा प्रश्न आहे. त्याचें उत्तर असें कीं ], ते जीव माझ्या स्वरूपाशीं अभिन्नहि आहेत व भिन्नहि आहेत असें दोन्हीं प्रकार संभवतील ३३०. कसें तर अरे ! जर खोल विचारदृष्टीनें–स्वरूपदृष्ट्या पूर्ण लक्ष देऊन पाहिलें तर माझ्या व त्यांच्या स्वरूपांत स्वभावतःच ऐक्य असतें, ते मत्स्वरूपच आहेत आणि वरवर [देहादिकाच्या स्थूल दृष्टीनें] विचार करून पाहिलें तर ते माझ्यापासून भिन्न आहेत असेंहि वाटतात ३१. ज्याप्रमाणें पाणी हाललें असतां त्यावर येणाऱ्या लाटा

१ समान. २ कवडसा. ३ तेजवंतास. ४ जागृतीनंतर. ५ हवारी. ६ मृगजळ. ७ मुख्य, अधिकाराचें. ८ मिळाले.

तळपतां दिसती कल्लोळ। येऱ्हवीं तरी निखिळ। पाणीचि तें ॥ ३२ ॥ कां सुवर्णाहुनि आनें । लेणीं गमती भिन्नें । मग पाहिजे तंव सोनें । अवघेंचि तें ॥ ३३ ॥ तैसें ज्ञानाचिये दिठी। मजसीं अभिन्नचि ते किरीटी । येर भिन्नपण तें उठी। अज्ञानास्तव ॥ ३४ ॥ आणि साचोकारेंनि वस्तुविचारें । कैंचें मज एकासि दुसरें । जें भिन्नाभिन्नव्यवहारें। उमसिजेल ॥ ३५ ॥ आघवेंचि आकाश सूनि पोटीं। बिंबचि जैं आते खोटी । तैं प्रतिबिंब कें उठी। कें रश्मि शिरे ? ॥ ३६ ॥ कां कल्पांतींचिया पाणिया । काय वोत भरिती धनंजया ? । म्हणौनि कैंचें अंश अविक्रिया । एका मज ॥ ३७ ॥ परी ओघाचेनि मेळें । पाणी उजू परी वांकुडें जालें । रवी दुजेपण आलें । तोयँबगें ॥ ३८ ॥ व्योम चौफळें कीं वाटोळें । हें ऐसें कायिसयाही मिळे । परी घटमठीं वेंटाळें । तैसेंही आथी ॥ ३९ ॥ हां गा निद्रेचेनि आधारें । काय एकलेनि जग न भरे ? । स्वप्नींचेनि जैं अवतरे । रायपणें ॥ ३४० ॥ कां मिनलेनि किडाळें । वानिभेदासि ये सोळें । तैसा स्वमायें वेंटाळें । शुद्ध जैं मी ॥ ४१ ॥ तैं अज्ञान एक रूढे । तेणें कोऽहंविकल्पाचे मांडें । मग विवरूनि कीजे फुडें। देहो मी ऐसें ॥ ४२ ॥

ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः । मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥

ऐसें शरीराचि येवढें । जैं आत्मज्ञान वेगळें पडे । तैं माझा अंशु आवडे। थोडेपणें ॥ ४३ ॥ समुद्र कां वायुवशें । तरंगाकार उल्हसें । तो समुद्रांशु ऐसा दिसे। सानिवा जेवीं ॥ ४४ ॥ तेवीं जडातें जीवविता। देहअहंता उपजविता। मी जीव गमें पंडुसुता। जीवलोकीं ॥ ४५ ॥ पैं जीवाचिया बोधा । गोचरु जो हा धांदा। तो जीवलोकशब्दा । अभिप्रावो ॥ ४६ ॥ अगा उपजणें निमणें। हें साचचि जे कां मानणें । तो जीवलोकु मी म्हणे । संसारु हन ॥ ४७ ॥ एवंविध जीवलोकीं । तूं मातें ऐसा अवलोकीं। जैसा चंद्रु कां उदकीं। उदकातीत ॥ ४८ ॥ पैं काश्मीराचा रवा। कुंकुमावरी पांडवा । आणिका गमे लोहिवा । तो तरी नव्हे ॥ ४९ ॥ तैसें अनादिपण न मोडे । माझें अक्रियत्व न खंडें । परी कर्ता भोक्ता ऐसें आवडे । ते जाण गा भ्रांती ॥ ३५० ॥ किंबहुना आत्मा चोखटु । होऊनि प्रकृतीसी एकवटु । बांधे

पाण्यापासून वेगळ्या आहेत असें दिसते, सहज विचार करून पाहिले तर वस्तुतः त्या लाटा म्हणजे निव्वळ पाणीच आहेत ३२. किंवा सोन्याचे दागिने [ नाम व आकार दृष्टीनें ] सोन्याहून भिन्न असल्याचे दिसतात, पण मग विचारपूर्वक पाहिलें असतां तें दागिने सर्व सोनेंच असतें ३३. त्याप्रमाणें हें किरीटी! ज्ञानदृष्टीनें पाहिलें असतां ते मद्रूपच–जीव माझ्याशीं अभिन्न आहेत; एव्हवीं त्यांच्यांत व माझ्यांत जो भिन्नपणा–वेगळेपणा वाटतो तो अज्ञानामुळें उत्पन्न होऊन वाटतो ३४. आणि वस्तुविचाराने म्ह. परमात्मदृष्टीनें खरोखर विचार केला तर मी जो स्वगतादि भेदरहित एकमेवाद्वितीय आहे त्या मला दुसरें म्हणजे द्वैत असें कोठलें! कीं जे जीव माझ्याशीं भिन्न आहेत किंवा अभिन्न आहेत! असा प्रश्न प्रतिवचनात्मक व्यवहार होऊन तद्द्वारां स्पष्ट करतां येईल! [ असे निरपेक्ष अद्वय आहे ] ३५. सूर्यबिंबानें सर्वच्या सर्व आकाश पोटांत घालून ब्रह्मांडगोल व्यापून टाकला तरमग त्याचें प्रतिबिंब कोठें उत्पन्न होणार! त्याची किरणें तरी कोठवर शिरतील–पडतील! ३६. किंवा अर्जुना! कल्पांतींच्या पाण्यानें सर्वच जलमय करून टाकल्यावर खाड्या भरल्या जातात किंवा अनेक लहान प्रवाहांचें पाणी भरून ती जलमयता झाली आहे असा व्यवहार होतो कां! म्हणून अविक्रिय, अखंडैकरस जो मी त्या मला अंश कोठून असणार! ३७. परंतु भिन्न दिसतात याचें कारण, ओघाच्या–पात्राच्या अनुरोधानें जसें पाणी सरळ असूनहि वांकडे होते किंवा पाण्याच्या उपाधिसंबंधानें जसा सूर्याच्या बिंबास त्याच्या प्रतिबिंबाचे दृष्टीनें दुजेपणा येतो ३८. आकाश हें चौकोनी किंवा वाटोळे आहे हें कोणत्या बरें रीतीनें ठरवितां येणार आहे! परंतु तेंच आकाश घट व मठ या उपाधींनें वेष्टिले–व्यापलें असतां तसेंहि झाल्याचें दिसत असते ३९. अरे, हें पहा, निद्रेच्या आधारानें–उपाधीनें भासलेल्या स्वप्नांत ज्यावेळीं मनुष्य राज्यपदावर आरूढ होऊन अवतीर्ण होतो, त्यावेळीं राजा, प्रजा इत्यादि सर्व जग त्या एकट्यानेंच भरले, व्यापले जात नाहीं काय! ३४०. किंवा सोळाच्या दराच्या उत्तम सोन्यांत किडाळ–हिणकस मिळाल्यावर तें सोनें जसे कसास कमी उतरतें त्याप्रमाणें शुद्धस्वरूप असा जो मी तो जेव्हां आपल्या मायेनें परिवेष्टित होतों, [ तेव्हां माझ्या ठिकाणीं मायेच्या उपाधीसंबंधानें जीव व ईश्वर हे कल्पित भाव उत्पन्न होतात ] ४१. त्यावेळीं एक अज्ञानच चहूंकडे रूढ होते आणि त्या योगानें 'मी कोण' असा विकल्प–संशय उत्पन्न होतो आणि मग विचार करून त्या विचारा–अंतींहि देहच मी आहे, असा निश्चय केला जातो ४२.

**अन्वयार्थ**—**जीवलोके**–या जीवलोकांत म्ह० संसारांत–**जीवभूतः**–कर्ता–भोक्ता म्हणून प्रसिद्ध असलेला–**मम एव**–माझाच–**सनातनः**–पुरातन–**अंशः**–[ **अस्ति** ]–अंश आहे–[ **सः**–तो माझा जीवभूत अंश ] **प्रकृतिस्थानि** आपापल्या कर्मादि प्रकृतींत स्थित असलेल्या–**मन षष्ठानि इंद्रियाणि**–मनासह सहा इंद्रियांना–**कर्षति**–आकर्षण करितो ७.

असें जेव्हां आपल्या स्वस्वरूपविषयकज्ञान म्हणजे 'शरीर' हाच वा एवढाच आत्मा आहे इतकें मर्यादित [ परिच्छिन्नत्व भ्रांती ] होऊन दृढ होते. तेव्हां ते आत्मज्ञान सर्व व्यापक आत्मस्वरूपाहून वेगळे होते. तेव्हां त्याच्या मर्यादितपणाच्या धर्मावरून [ मत्स्वरूप असूनहि तो जीव माझा एक अंश–भाग आहे असें वाटतें ४३. वाऱ्यामुळें समुद्रच जेव्हां लाटांच्या आकारानें अभिव्यक्त होतो, तेव्हां त्या लाटांचा आकार जसा समुद्राचा एक लहानसा अंश आहे असें दिसतें ४४. त्याप्रमाणें हे पंडुसुता! जड देहासंबंधीचा परिच्छिन्नत्व भ्रांतिरूप अहंकार उत्पन्न व धारण करणारा, त्या जडदेहाचा चालक जो मी, तोच मी या जीवलोकांत जीवरूप आहे, असा वाटतो ४५. त्याच जीवाच्या ज्ञानदृष्टीला जो हा अखंड व्यापार चालत असलेला दिसतो तोच "**जीवलोक**" शब्दाचा अर्थ म्ह० "विशाल सृष्टि" असा आहे ४६. अर्जुना! देहाच्या उत्पत्तिवरोबर आपण जन्मास आलो व देहाच्या नाशाबरोबर आपणहि मरणार किंवा मेलो या व्यवहारासच [ जन्म–मरण सत्य समजणें ] सत्य मानणे–समजणें तोच जीवलोक आहे वा तोच संसारहि आहे, असे मी म्हणतों ४७. अशा प्रकारच्या या जीवलोकांत ज्याप्रमाणें चंद्र हा पाण्यापासून वेगळा असतांहि पाण्यांत प्रतिबिंब पडल्यावर त्यांत आहे असा भासतो, त्याप्रमाणें मी आहे [ सर्वत्र व्याप्त असून सर्वांहून अलिप्त आहे ] असें तूं मला पहा ४८. अर्जुना! स्फटिकमणि कुंकुमावर, केशरावर ठेविला असतां तो पाहाणाराला तांबड्या रंगाचा आहे असा दिसतो, तथापि तो स्वरूपानें खरा कांहीं तांबडा नव्हे ४९. त्याप्रमाणें माझें अनादिपण नाहीसें होत नाहीं. आणि माझें अक्रियत्वहि भंगत नाहीं; तथापि [ उपाधि संबंधामुळें ] तो मी कर्ता आहे, भोक्ता आहे असें जे वाटते ती केवळ त्यांची भ्रांति आहे, असें समज ३५०.

प्रकृतिधर्माचा पाटु । आपणपयां ॥ ५१ ॥ पैं मनादि साही इंद्रियें । श्रोत्रादि प्रकृतिकार्यें । तियें माझीं म्हणौनि होये । व्यापारारूढ ॥ ५२ ॥ जैसें स्वप्नीं परिव्राजें । आपणपयां आपण कुटुंब होईजे । मग तयाचेनि धांविजे । मोहें सैरां ॥ ५३ ॥ तैसा आपलिया विस्मृती । आत्मा आपणचि प्रकृती - । सारिखा गमोनि पुढती । तियेसीचि भजे ॥ ५४ ॥ मनाच्या रथीं वेंळघे । श्रवणाच्या द्वारें निघे । मग शब्दाचिया रिघे । रानामाजीं ॥ ५५ ॥ तोचि प्रकृतीचा वेगोरा । त्वचेचिया मोहरां । आणि स्पर्शाचिया घोरा । वना जाय ॥ ५६ ॥ कोणे एके अवसरीं । रिघोनि नेत्राच्या द्वारीं । मग रूपाच्या डोंगरीं । सैरा हिंडे ॥ ५७ ॥ कां रसने-चिया वाटा । निघोनि गा सुभटा । रसाचा दरकुटा । भरोंचि लागे ॥ ५८ ॥ नातरी येणेंचि घ्राणें । जैं देहांशु करी निघणें । मग गंधाची दारुणें । आंडवें लंघी ॥ ५९ ॥ ऐसेनि देहेंद्रियनायकें । धरूनि मन जवळिकें । भोगिजती शब्दादिकें । विषयभरणें ॥ ३६० ॥

शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः । गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥ ८ ॥

परी कर्ता भोक्ता ऐसें । हें जीवाचे तैंचि दिसे । जैं शरीरीं कां पैसे" । एकाधिये ॥ ६१ ॥ जैसा आथिला आणि विलासिया । तैंचि वोळखों ये धनंजया । जैं राजसेव्या ठाया । वस्तीसि ये ॥ ६२ ॥ तैसा अहंकर्तृत्वाचा वाढु । कां विषयें-द्रियांचा धुमाडु । हा जाणिजे तैं निवाडु । जैं देह पाविजे ॥ ६३ ॥ अथवा शरीरातें सांडी । तऱ्ही इंद्रियांची तांडी । आपणयांसवें काढी । घेऊनि जाय ॥ ६४ ॥ जैसा अपमानिला अतिथी । ने सुकृताचि संपत्ति । कां साइखडेयाची गती । सूत्रतंतू ॥ ६५ ॥ नाना मावळतेनि तपनें । नेइजेती लोकांचीं दर्शनें । हें असो द्रुती पवनें । नेईजे जैसी ॥ ६६ ॥ तेवीं मनःषष्ठां ययां । इंद्रियांतें धनंजया । देहराजु ने देहा- । पासूनि गेला ॥ ६७ ॥

श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च । अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥

मग येथ अथवा स्वर्गीं । जेथ जे देह आपंगी । तेथ तैसेंचि पुढती पांगी । मनादिक ॥ ६८ ॥ जैसा मालवलिया दिवा । प्रभेसि जाय पांडवा । मग उजळिजे तेथ तेधवां । तैसाचि फांके ॥ ६९ ॥ तरी ऐसैसिया राहाटी । अविवेकियांचे दिठी । येतुलें

अधिक काय सांगावें ! विशुद्ध असा जो हा आत्मा तो प्रकृतीशीं म्ह० देहादि अनात्म्याशीं तादात्म्य भ्रांतीनें ऐक्य पावून देहादिकांचें [ जन्ममरणादि ] उपाधिगत धर्म बळेंच आपल्या ठिकाणीं मानून औपाधिक धर्मौघांत आपल्याला बांधून घेतो ५१. मग मन व श्रोत्रादि पांच इंद्रियें मिळून एकूण हीं सहा वास्तविक प्रकृति कार्य असतांना तीं माझी आहेत, असें म्हणून व्यापार करावयास प्रवृत्त होत असतो ५२. ज्याप्रमाणें स्वप्नांत एखाद्या संन्याशानें आपणच आपलें कुटुंब व्हावें आणि मग संसार थाटावा व त्या बायकापोरांच्या मोहानें सैरावैरा चोहोंकडे धांवावें [ व संसारातील सुखदुःख भोगावें ] ५३. त्याप्रमाणें मूळ आपल्या आत्मस्वरूपाची विस्मृति झाल्यावर आत्मा हा आपलें स्वरूपहि प्रकृतिसारखेंच आहे, देहच आत्मा आहे असें मानून तिच्याच अनुरोधानें, विषयोपार्जनात्मक तिचींच कार्यें करून देहास भजतो ५४. जीवात्मा हा मनरूपी रथावर आरूढ होऊन श्रवणेंद्रियाच्या द्वारानें शरीराबाहेर निघतो व मग शब्दविषयरूपी रानांत प्रवेश व संचार करतो ५५. तोच जीवात्मा प्रकृतीचा लगाम हातांत धरून त्वचेच्या द्वारानें-रोखानें वळवून स्पर्शविषयरूपी घोर वनांत जातो ५६. एखाद्या वेळेस नेत्रांच्या द्वारानें बाहेर पडून रूपविषयाच्या डोंगरावर स्वच्छंदानें, हवा तसा हिंडतो ५७. किंवा हे सुभटा ! जिव्हेच्या द्वारानें बाहेर पडून रसविषयाच्या गुहेंत हिंडतो; रसाची दरी-पोट भरावयास लागतो ५८. किंवा माझा अंश जो हा जीव, तो नाकाच्याद्वारानें बाहेर निघतो व मग गंध विषयाची भयंकर अरण्यें ओलांडतो ५९. याप्रमाणें देहस्वामी जो जीव तो इंद्रियें व त्यांचा सत्ताधारी-अध्यक्ष जें मन तें हाताशीं धरून पंचेंद्रियांच्या शब्दादिक विषय समुदायांचा उपभोग घेतो ३६०.

**अन्वयार्थ—यत् च अपि**-आणि ज्या वेळीं-**ईश्वरः**-तो ईश्वर-**उत्क्रामति**-शरीर सोडून जातो व-**यत्**-जेव्हां--**शरीरं**--शरीराला--**अवाप्नोति**--प्राप्त होतो-[ **तदा**-त्यावेळीं- ] -**एतानि**-या मनासह सहा इंद्रियांना-**गृहीत्वा**--घेऊन -**वायुः**--वारा--**आशयात्**-पुष्पादिकांपासून-**गंधान् इव**-गंधाना घेऊन जसा जातो तसा [ तो ]-**संयाति**-जातो ८.

पण जीवाचें कर्तृत्व किंवा भोक्तृत्व तेव्हांच दृष्टीस पडतें कीं, जेव्हां तो जीव [ प्राक्कर्मानुसार ] एखाद्या स्थूल शरीरांत प्रवेश करितो ६१. ज्याप्रमाणें एखाद्या ऐश्वर्यसंपन्न व विलासी पुरुषाचें महत्त्व तेव्हांच ओळखण्याजोगें दृष्टीस पडतें कीं, जेव्हां तो एखाद्या प्रसिद्ध राजनगरांत किंवा राजवाड्यांत राहावयास येतो ६२. त्या वेळेसच जीवाच्या कर्तृत्वाहंकाराची वाढ किंवा विषयें आणि इंद्रियें यांची धामधूम-धुमाकूळ स्पष्ट दिसण्यांत येतें कीं, ज्यावेळेस जीव एखादा स्थूल देह धारण करतो ६३. अथवा जेव्हां जीव एका शरीरास टाकतो तेव्हां जीव आपल्याबरोबर नेहमीं असणारें मन व इंद्रिययांचा तांडा, समुदाय हीं आपली संपत्ति त्या शरीरांतून काढून आपल्या बरोबरच घेऊन अन्य शरीरांत जातो ६४. ज्याप्रमाणें अतिथि भोजनास आला असतां त्याचा अपमान करून त्यास माघारा लावल्यावर जातांना नुसता जात नाहीं तर तो त्याचा अपमान करणाऱ्या यजमानांची पुण्यरूप संपत्तिहि घेऊन जातो किंवा दोऱ्या काढून घेतल्यावर कळसूत्री बाहुल्यांची गति घेऊन जातात त्यामुळें त्याचा तो खेळ नाहींसा होतो ६५. अथवा सूर्य मावळला असतां तो लोकाच्या दृष्टिहि आपल्याबरोबर घेऊन जातो, फार काय सांगावें ! ! वारा ज्याप्रमाणें आपल्याबरोबर पुष्पांतील सुवासहि घेऊन जातो ६६. त्याप्रमाणें हे धनंजया ! देहराज जो जीव तो जेव्हां या देहाला सोडून जातो तेव्हां तो आपल्याबरोबर पांच ज्ञानेंद्रियें व सहावें मन यांनाहि नेत असतो ६७.

**अन्वयार्थ-अयं**-हा जीव-**श्रोत्रम्**-ऐकण्याचें साधन -**चक्षुः**-पाहण्याचें साधन-**स्पर्शनं**-स्पर्श जाणण्याचें साधन-**रसनं**-रस चाखण्याचें साधन-**च**-आणि-**घ्राणम् एव च**-वास घेण्याचें साधन-**मन च अधिष्ठाय** -आणि त्या पांची इंद्रियांशीं संबद्ध होणारें मन, यांचा अधिष्ठाता होऊन--**विषयान्**--शब्दादि विषयांचें-**उपसेवते**-सेवन करतो-उपभोग घेतो ९.

मग या लोकांत अथवा स्वर्गलोकांत ज्या ज्या ठिकाणीं तो जीव ज्या ज्या देहाचा अंगीकार करील, त्या त्या देहाच्या ठिकाणीं मनादिकासह इंद्रियांचा पुनः तसाच ऐसपैस पसारा घालतो ६८. अर्जुना ! दिवा मालवल्यावर तो जसा आपल्या तेजासह नाहींसा होतो, तसाच तो फिरून लाविला असतां आपल्या तेजासह लावलेल्या ठिकाणीं तसाच [ पूर्वीसारखाच ] प्रकाशतो ६९. तर अर्जुना ! अशा प्रकारच्या व्यवहारांत

१ आपल्या स्वतःवर प्रकृतीचा अंमल बसवून घेतो. २ प्रकृतीपासून झालेली. ३ संन्यासनें. ४ चोहोंकडे ५ चढतो, बसते. ६ लगाम. ७ मार्गानें. ८ दरी, गुहा. ९ माझा अंश, जीव. १० अरण्यें. ११ प्रवेशतो. १२ संपन्न.

हें किरीटी । गमेंचि गा ॥ ३७० ॥ जे आत्मा देहासि आला । आणि विषयो येणेंचि भोगिला । अथवा देहोनि गेला । हें साचचि मानिती ॥ ७१ ॥ एऱ्हवीं येणें आणि जाणें । कां करणें हन भोगणें । हें प्रकृतीचें तेणें । मानियेलें ॥ ७२ ॥

उत्क्रामन्तं स्थितं वाऽपि भुंजानं वा गुणान्वितम् । विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥
यतन्तो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम् । यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥ ११ ॥

परी देहाचें मोटकें उभें । आणि चेतना तेथ उपलभे । तिये चळवळेचेनि लोभें । आला म्हणती ॥ ७३ ॥ तैसेंचि तयां संगती । इंद्रियें आपुलाल्या अर्थीं वर्तती । तया नांव सुभद्रापती । भोगणें जया ॥ ७४ ॥ पाठीं भोगक्षीण आपैसे । देह गेलिया ते न दिसे । तेथें गेला गेला ऐसें । बोभाती गा ॥ ७५ ॥ पैं रुखु डोलतु देखावा । तरी वारा वाजतु मानावा । रुख नसे तेथें पांडवा । नाहीं तो गा ? ॥ ७६ ॥ कां आरिसा समोर ठेविजे । आणि आपणपें तेथ देखिजे । तरी तेधवांचि जालें मानिजे । काय आधीं नाहीं ? ॥ ७७ ॥ कां परता केलिया आरिसा । लोपु जाला तया आभासा । तरी आपणपें नाहीं ऐसा । निश्चयो करावा ? ॥ ७८ ॥ शब्द तरी आकाशाचा । परी कपाळीं पिटे मेघाचा । कां चंद्रीं वेगु अभ्राचा । आरोपिजे ॥ ७९ ॥ तैसें होइजे जाइजे देहें । तें आत्मसत्ते अविक्रिये । निष्टंकिती गा मोहें । आंधळे ते ॥ ३८० ॥ येथ आत्मा आत्मयाच्या ठायीं । देखिजे देहींचा धर्मु देहीं । ऐसें देखणें तें पाहीं । आन आहाती ॥ ८१ ॥ ज्ञानें कां जयाचे डोळे । देखोनि न राहती देहींचे खोळे । सूर्यरश्मी आणियाळे । ग्रीष्मीं जैसें ॥ ८२ ॥ तैसे विवेकाचेनि पैसें । जयांची स्फूर्ती स्वरूपीं बैसे । ते ज्ञानिये देखती ऐसें । आत्मयातें ॥ ८३ ॥ जैसें तारांगणीं भरलें । गगन समुद्रीं बिंबलें । परी तें तुटोनि नाहीं पडलें । ऐसें निवडे ॥ ८४ ॥ गगन गगनींचि आहे । हें आभासे तें वायें । तैसा आत्मा देखती देहें । गंवसिलाही ॥ ८५ ॥ खळाळाच्या लगबगीं । फेडूनि खळाळाच्या भागीं । देखिजे चंद्रिका कां उगी । चंद्रीं जेवीं ॥ ८६ ॥ कां नाडरचि भरे शोषें । सूर्यु तो जैसा तैसाचि असे । देह होतां जातां तैसें । देखती मातें ॥ ८७ ॥ घटु मठु घडले । तेचि पाठीं मोडले । परी आकाश तें संचलें । असताचि असे ॥ ८८ ॥ तैसें अखंडे आत्मसत्ते । अज्ञानदृष्टि कल्पितें । हें देहचि

अविचारी लोकांच्या दृष्टीला पुढें सांगितल्याप्रमाणें एवढें हें वाटूं लागतें ३७०. की, आत्माच यां देहाला [ जन्मास ] आला आणि या आत्म्यानेंच विषयांचा उपभोग घेतला अथवा तो आत्माच हा देह सोडून गेला, [ मरण पावला ] हेंच खरें असें मानितात ७१. एऱ्हवीं जन्मास येणें अथवा मरणें किंवा कर्म करणें अथवा विषयांचा अथवा कर्मफलांचा उपभोग घेणें हें सर्व वास्तविक प्रकृतीचे धर्म असून भ्रमानें ते धर्म आत्म्याचे आहेत, असें अविचारी लोक मानतात ७२.

**अन्वयार्थ**—**उत्क्रामन्तं**-देहांतून निघून जाणाऱ्या-**अपि वा**-किंवा-**स्थितं**-देहांत असलेल्या-**भुंजानं**-शब्दादि विषयांचा उपभोग घेणाऱ्या-**वा**-किंवा **गुणान्वितं**-सुख-दुःखमोहसंज्ञक गुणांनीं युक्त असलेल्या या जीवाला-**विमूढाः**-नाना प्रकारें मूढ झालेले जन-**न अनुपश्यन्ति**-पहात नाहींत-**ज्ञानचक्षुषः**-ज्ञानदृष्टि जन-**पश्यंति**-पहातात-**यतन्तः**-यत्न करणारे-**योगिनः**-**च**-योगी-**एनं**-याला-**आत्मनि**-बुद्धींत-**अवस्थितम्**-असलेला-**पश्यन्ति**-पहातात पण-**यतन्तः अपि**-यत्न करणारेहि-**अकृतात्मनः**-असंस्कृत चित्त-**अचेतसः**-अविवेकी-पुरुष-**एनं**-या आत्म्याला-**न पश्यन्ति**-पहात नाहींत १०-११.

अरे! परंतु मोजका देह परिच्छिन्न उत्पन्न होऊन त्यांत चलनवलनात्मकतेनें चेतना दिसूं लागली कीं, त्यावरून आत्मा [ जन्माला ] आला असें म्हणतात ७३. त्याप्रमाणें हे सुभद्रापते त्या चेतनेच्या संगतीनें इंद्रियें आपापले विषय सेवनात्मक व्यवहार करूं लागले असतां जीव उपभोग घेतो, असें सामान्य लोक म्हणतात ७४. अरे! नंतर भोग क्षीण होऊन भोग घेणें आपोआप राहिल्यावर चेतना दिसत नाहीं त्यावेळीं जीवात्मा गेला असा एकच बोभाटा करितात ७५. काय वेडेपणा हा! अरे! झाड हालत असलेलें पहावें म्हणजेच वारा वाहतो आहे असें मानावें आणि ज्या ठिकाणीं वृक्षच नाहीं, त्या ठिकाणीं तो वारा मुळींच नाहीं असें समजावें काय? ७६. किंवा आरसा समोर ठेवावा आणि आपले प्रतिबिंब त्यांत पहावें तेव्हांच आपण निर्माण झालों असें मानावें, त्याच्या आधीं नव्हतो काय? ७७. अथवा तो आरसा बाजूस केल्यावर प्रतिबिंबाचा लोप झाला म्हणजे मग आपण स्वतः या जगांतून नाहींसे झालों असा निश्चय करावा काय? ७८. तात्त्विक विचारानें शब्द हा जरी खरोखरी आकाशाचा गुण आहे तरीपण तो आकाशांत होणारा गडगडाट मेघापासून होतो, असा लोक त्या मेघाच्याच कपाळी आरोप करतात, अथवा ढग वेगानें इकडून तिकडे जाऊं लागले म्हणजे त्यांतून दिसणारा चंद्र जरी स्थिर आहे, तरी तोच वेगानें धांवतो आहे, असा लोक चंद्रावर आरोप करतात ७९. त्याप्रमाणें मोहानें आंधळे झालेले ते लोक देहानें उत्पन्न व्हावें व नाश पावावें, पण त्याचा आत्मसत्तेवर आरोप करून आत्माच उत्पन्न होतो किंवा नाहींसा होतो, असा भ्रमात्मक निश्चय करतात ३८०. खरें पाहिलें तर या व्यवहारांत आत्मा आत्मपणानें-आत्म्याचें ठिकाणीं [ आत्मा ब्रह्मरूप निर्विकार आहे असा ] पाहावा. कर्तृत्व-भोक्तृत्व, जन्ममरण हे धर्म स्थूल-सूक्ष्म-देहाचेच आहेत, असें पाहणारें विचारवान् निराळेच आहेत असें समज ८१. ज्याप्रमाणें ग्रीष्म ऋतूंत पुष्कळ घनमेघमाला दाटून आल्या तरी त्यास भेदून त्यांतून सूर्याची अणकुचीदार-प्रखर किरणें बाहेर आल्याशिवाय राहात नाहींत, त्याप्रमाणें ज्यांची नेत्रदृष्टि देहात्मक खोळ दिसत असूनहि ज्ञानप्रकाशाच्या साह्यानें त्या देहाकारावर थांबत नाहीं, तर देहाचा निरास करून अधिष्ठान आत्म्याला जाणत असते ८२. त्याप्रमाणें विवेकाच्या प्रकाशानें ज्यांची स्फूर्ति, ती दृष्टि आत्मस्वरूपाच्या ठिकाणापर्यंत पोहोंचली आहे, ते ज्ञानी आत्म्याला [ अकर्ता आहे ] असेंच पाहतात ८३. ज्याप्रमाणें नक्षत्रांनीं भरलेलें आकाश जेव्हां प्रतिबिंबित होऊन समुद्रांत दिसते, परंतु तेव्हां तें खरोखर वरून सुटून गळून खालीं पडलें नाहीं, असे खचीतच ओळखतां येते ८४. आकाश आकाशाचेच जागीं आहे व हें जें समुद्रांत भासते ते त्याचे प्रतिबिंब मिथ्या आहे. त्याप्रमाणें आत्मा देहोपाधींत सांपडल्यामुळें कर्ता-भोक्ता आहे असा दिसला, तरीहि ते ज्ञानी, आत्मा देहाहून भिन्न अकर्तृत्व रूपानेंच आहे असें समजतात ८५. खळखळ वाहणाऱ्या पाण्याची लगबग, चंचलता खळाळाच्या वाहत्या पाण्याच्याच ठिकाणीं आहे असे ओळखून चांदिणें चंद्राचें ठिकाणीं जसें स्वस्थ, स्थिर आहे असें पाहावें ८६. किंवा डबक्यांत पाणी सांचल्यावर त्यांत सूर्य प्रतिबिंब दिसते व तेंच पाणी आटल्यावर ते दिसत नाहीं; डबकेच पाण्याने भरते व कोरडे होते परंतु सूर्य आपल्या ठिकाणीं तसाच असतो, त्या प्रमाणें, उत्पन्न व नाहींसा होत असतांना त्याबरोबर मी उत्पन्न होत नाहीं व मरतहि नाहीं त्यांत मी अविनाशी आहे तसाच आहे, अशा दृष्टीनें ते [ ज्ञानी ] मला पाहतात ८७. मातीचे घट अथवा मठ हे तयार केले व नंतर पुनः जरी ते मोडून टाकले, तरी पण त्या घटमठांत दिसणारे आकाश हें न होतां न मोडतां जसेंच्या तसेंच कायम असतें ८८. त्याप्रमाणें

होतें जातें । जाणती फुडें ॥ ८९ ॥ चैतन्य चढे ना वोहटे । चेष्टवी ना चेष्टे । ऐसें आत्मज्ञानें चोखटें । जाणती ते ॥ ३९० ॥ आणि ज्ञानही आपैतें होईल । प्रज्ञा परमाणुही उगाणा घेईल । सकळ शास्त्रांचें येईल । सर्वस्व हातां ॥ ९१ ॥ परी ते व्युत्पत्ति ऐसी । जरी विरक्ति न रिगे मानसीं । तरी सर्वात्मका मजसीं । नव्हेचि भेटी ॥ ९२ ॥ पैं तोंड भरो कां विचारा । आणि अंतःकरणीं विषयांसि थारा । तरी नातुडें धनुर्धरा । त्रिशुद्धी मी ॥ ९३ ॥ हां गा वोसणतयांच्या ग्रंथीं । काई तुटती संसारगुंती ? । कीं परिवसिलिया पोथी । वाचिली होय ? ॥ ९४ ॥ नाना बांधोनियां डोळे । घ्राणीं लाविजती मुक्ताफळें । तरी तयांचें काय कळे । मोल मान ? ॥ ९५ ॥ तैसा चित्तीं अहंते ठावो । आणि जिभे सकळशास्त्रांचा सरावो । ऐसेनि कोडी[१०] एक जन्म जावो । परी न पविजे मातें ॥ ९६ ॥ जो एक मी कां समस्तीं । व्यापकु असें भूतजातीं । ऐक तिये व्याप्ती । रूप करूं ॥ ९७ ॥

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् । यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥

तरी सूर्यासकट आघवी । हे विश्वरचना जे दावी । ते दीप्ति[१२] माझी जाणावी । आद्यंतीं आहे ॥ ९८ ॥ जल शोषूनि गेलिया सविता । ओलांश पुरवीतसे जे माघौता । ते चंद्रीं पंडुसुता । ज्योत्स्ना[१३] माझी ॥ ९९ ॥ आणि दहनें[१४]-पाचनासिद्धी । करीतसे जे निरवधी । ते हुताशीं तेजोवृद्धी । माझीचि गा ॥ ४०० ॥

गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा । पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥ १३ ॥

मी रिगालों असें भूतळीं । म्हणौनि समुद्र महाजळीं । हे पांसूंचि ढेंपुळी । विरेचिना ॥ १ ॥ आणि भूतेंही चराचरें । हे धरितसे जियें अपारें । तियें मीचि धरी धरे । रिगोनियां ॥ २ ॥ गगनीं मी पंडुसुता । चंद्राचेनि मिसें अमृता । भरला जालों चालता । सरोवरु ॥ ३ ॥ तेथूनि फांकती रश्मिकर । ते पोट पेलूनि अपार । सर्वौषधींचे आगर । भरित असें मी ॥ ४ ॥ ऐसेनि सस्यादिकां सकळां । करीं धान्यजाती सुकाळा । हें अन्नद्वारां जिव्हाळा । भूतजातां ॥ ५ ॥ आणि निपजविलें अन्न । तरी तैसें कैचें दीपन । जेणें जिरूनि समाधान । भोगिती जीव ॥ ६ ॥

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः । प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥ १४ ॥

अखंड [ एकरस त्रिकालाबाधित ] जी आत्मसत्ता, त्या सत्तेच्या आधारावर, अज्ञानदृष्टीनें कल्पिलेले हे देहच उत्पन्न होतात व जातात, नाश पावतात असे ते ज्ञानी स्पष्ट, अगदीं पक्के समजतात ८९. आत्मचैतन्य हे वाढत नाहीं व ओहोटहि पावत नाहीं, कोणा करवीं चेष्टा करवीतहि नाहीं वा स्वतः कर्म करीतहि नाहीं, असे ज्यांना निःसंदेह यथार्थ आत्मज्ञान झालें आहे, तेच जाणतात ३९०. या शिवाय [ व्यावहारिक ] ज्ञानहि आपल्या स्वाधीन होईल, बुद्धिहि एकंदर परमाणूंचाहि झाडा-हिशोब घेईल व तो सकळ शास्त्रांतील सारसर्वस्व जाणण्यांत निपुणहि होईल; ९१. परंतु इतका शास्त्रसंपन्न होऊनहि जर त्याच्या मनांत [ ज्ञानफल-पोषक ] वैराग्याचा प्रवेश, लेश-जिव्हाळा नसेल तर सर्वव्यापक सर्वांतर्यामी असा जो मी, त्या माझ्याशीं अशा विद्वत्तेनें भेट-आत्मत्वानें प्राप्ति त्याला होणार नाहीं ९२. त्याचप्रमाणें विचारानें कितीहि तोंड भरलेलें असेना कां ? सर्व शास्त्रें मुखोद्गत असेनात कां ? पण तसें असूनहि अंतःकरणांत जर विषयांना चिंतन रूपानें आश्रय असेल, तर अर्जुना ! खचीत खचीत त्याला मी निश्चयेंकरून आत्मत्वानें सांपडणार नाहीं ! ९३. अरे ! असें पहा, स्वप्नांत सर्व ग्रंथ जरी मुखोद्गतपणें बरळलें तरी त्या योगानें संसार बंधन तुटेल काय ? किंवा घरांत असलेलें वडिलोपार्जित ग्रंथ रक्षण करून ठेविल्यानें, त्यास स्पर्श केल्यानें, [ पूजा केल्यानें ] ते वाचल्यासारखे होईल काय ? [ वाचल्याचें श्रेय लाभेल काय ? ] ९४. अथवा डोळे बांधून मोतीं जर नाकास लावलीं तर त्यास त्यांचें पाणी व किंमत कळेल का ! ९५. याचप्रमाणें चित्तांत अभिमान बाळगला आहे आणि जिव्हेला शास्त्राभ्यास असल्यानें सर्व शास्त्रें जरी पाठ म्हटलीं, अशा प्रकाराने कोट्यवधि जन्म गेले, तरी त्यास माझी प्राप्ती होणार नाहीं, हे खास ९६. जो मी एकच असून सर्व प्राणिमात्रांत व्यापून राहिलों आहे, त्या माझी सर्व भूतांत कशी व्याप्ति आहे, तें तुला स्पष्ट करून सांगतों, ऐक ९७.

**अन्वयार्थ**--**यत्**-जें-**आदित्यगतम्**-आदित्यांतील-**तेजः**-तेज-**अखिलं जगत्**-सर्व जगाला-**भासयते**-प्रकाशित करतें-**यत्**-जें-**चंद्रमसि**-चंद्रामध्यें-**च** **यत्** **अग्नौ**-व जें अग्नींत तेज आहे-**तत्**-तें-**तेजः**-तेज-**मामकं**-माझें आहे असें-**विद्धि**-जाण १२.

तर सूर्यासकट ही सारी विश्वरचना, जो प्रकाश दाखवितो तो प्रकाश माझा आहे व तो प्रकाश विश्वाच्या आरंभीं व अंतीं असा सदाच आहे ९८. हे पंडुसुता, सूर्याच्या तेजानें पाणी, पृथ्वींतील ओलावा शोषण करून घेतल्यावर पुनः पृथ्वीस जो ओलावा येतो, तो ओलावा पुरविणारी-आणणारी जी चंद्राच्या ठिकाणची प्रभा, ती माझीच होय ९९. आणि दहन करणें किंवा पाचन करणें, ही जी अग्नीच्या ठिकाणीं असलेली अमर्याद प्रखर तेजोवृद्धि ती माझीच आहे ४००.

**अन्वयार्थ**-**च**-आणि-**अहं**-मी-**गां**-पृथ्वींत-**आविश्य** प्रवेश करून-**ओजसा**-बलानें-स्वसामर्थ्यानें-**भूतानि**-सर्व प्राण्यांना-**धारयामि**-धारण करतों-**च**-त्याचप्रमाणें [ मी ]-**रसात्मकः**-रसरूप-**सोमः**-चंद्र-**भूत्वा**-होऊन **सर्वाः** **औषधीः**-सर्व औषधींना-**पुष्णामि**-पोसतों १३.

मी पृथ्वीमध्यें शिरून तिला आधारभूत झालों आहे म्हणूनच ही जरी रजःकणांची बनलेली मोठी ढेप-ढेकूळ आहे तरी समुद्राच्या अपार पाण्यांत असूनहि विरघळून जातच नाहीं १. आणि ही पृथ्वी आपल्या पृष्ठभागावर अपरिमित असंख्य चराचर भूतें धारण करिते, तीं भूतेंहि मीच तिच्यामध्यें शिरून धारण करितों २. अर्जुना ! ! मीच आकाशांत चंद्राच्या रूपानें जणुं काय अमृतानें भरलेलें चालतें सरोवरच झालों आहे ३. आणि तेथून [ चंद्रापासून ] चंद्राचीं जीं किरणें फांकतात तीच कोणी अगणित ओघ, त्या ओघांना धारण करून सर्व वनस्पतींचें भरणें भरीत आहे व त्यांचे पोषणहि मीच करितों ४. अशाप्रकारें सर्व धान्यादिकांचें पोषणहि मीच करून व नानाप्रकारच्या सर्व धान्यांची समृद्धि करून अन्नद्वारां प्राणिमात्रांचें रक्षणहि मीच करितों ५. आणि अन्न जरी उत्पन्न केलें-शिजवून तयार केलें तरी प्राणिमात्रांस ते असें कसें पचेल ? कीं ते पचून ज्याच्या योगानें जीवास समाधान होईल. अशीं जठराग्निची सतेजता आणणार कोठून ? ६.

**अन्वयार्थ**-**अहं**-मी-**प्राणिनां**-प्राण्यांच्या-**देहं**-देहाचा-**आश्रित**:-आश्रय केलेला-**वैश्वानरः**-जठर-अग्नि-**भूत्वा**-होऊन-**प्राणापानसमायुक्तः**-प्राण व अपान यांनीं युक्त होत्साता-**चतुर्विधं**-चार प्रकारचें--**अन्नम्**-अन्न-**पचामि**-पचवितो १४.

१. स्पष्ट. २ व्रक्षा. ३ यथार्थ. ४ प्राप्त. ५ झाडा. ६ स्वप्नांत बोलणाऱ्याच्या. ७ स्पर्श केल्यानें. ८ मोती. ९ अभ्यास. १० कोट्यवधि. ११ स्पष्ट करूं. १२ प्रकाश. १३ उजेड, कांति. १४ भाजणें. १५ अमर्याद. १६ अग्नींत. १७ रजःकणांची ढेप, पृथ्वी. १८ पृथ्वींत, जमिनींत. १९ ओघ करून. २० धान्यादिकाला.

म्हणौनि प्राणिजातांच्या घटीं । करूनि कंदांवरी आगिठी । दीप्ति जठरींही किरीटी । मीचि जालों ॥ ७ ॥ प्राणापानाच्या जोडभातीं । फुंकफुंकोनियां अहोराती । आटीतसें नेणों किती । उदरामाजीं ॥ ८ ॥ शुष्कें अथवा स्निग्धें । सुपक्कें कां विदग्धें । परी मीचि गा चतुर्विधें । अन्नें पचीं ॥ ९ ॥ एवं मीचि आघवें जन । जना निरवितें मीचि जीवन । जीवनीं मुख्य साधन । वन्हिही मीचि ॥ ४१० ॥ आतां ऐसियाहीवरी काई । सांगों व्यापीची नवाई । येथ दुजें नाहींचि घेईं । सर्वत्र मी गा ॥ ११ ॥ तरी कैसेनि पां वेखें । सदा सुखियें एकें । एकें तियें बहुदुःखें । क्रांत भूतें ॥ १२ ॥ जैसी सगळिये पाटणीं । एकेंचि दीपें दिवेलावणी । जालिया कां नं देखणी । उरलीं एकें ॥ १३ ॥ ऐसी हन उखिविखी । करित आहासी मानसीं कीं । तरी परिस तेही निकी । शंका फेडूं ॥ १४ ॥ पैं आघवा मीचि असें । येथ नाहीं कीर अनारिसें । परी प्राणियांचिया उल्लासें । बुद्धि ऐसा ॥ १५ ॥ जैसें एकचि आकाशध्वनी । वाद्यविशेषीं आनानीं । वाजावें पडे भिन्नीं । नादांतरीं ॥ १६ ॥ कां लोकचेष्टीं वेगळाला । जो हा एकुचि भानु उदेला । तो आनानी परी गेला । उपयोगासी ॥ १७ ॥ नाना बीजधर्मानुरूप । झाडीं उपजविलें आप । तैसें परिणमलें स्वरूप । माझें जीवां ॥ १८ ॥ अगा नेणां आणि चतुरा । पुढां निळयांचा दुसरा । नेणा सर्पत्वें जाला येरा । सुखालागीं ॥ १९ ॥ हें असो स्वातीचें उदक । शुक्तीं मोतीं व्याळीं विख । तैसा सज्ञानांसी मी सुख । दुःख तों अज्ञानांसी ॥ ४२० ॥

सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥ १५ ॥

एऱ्हवीं सर्वांच्या हृदयदेशीं । मी अमुका आहें ऐसी । जे बुद्धि स्फुरे अहर्निशीं । ते वस्तु गा मी ॥ २१ ॥ परी संतांसवें वसतां । योगज्ञानीं पैसतां । गुरुचरण पासितां । वैराग्येंसी ॥ २२ ॥ येणेंचि सत्कर्में । अशेषही अज्ञान विरमे । जयांचें अहं विश्रामे । आत्मरूपीं ॥ २३ ॥ ते आपेआप देखोनि देखीं । मियां आत्मेनि सदा सुखी । येथें मीवांचून अवलोकीं । आन हेतु असे ? ॥ २४ ॥ अगा सूर्योदयो जालिया । सूर्यें सूर्यचि पहावा धनंजया । तेवीं मातें मियां

याच कारणाकरितां अर्जुना ! प्राणिमात्रांच्या शरीरांत नाभिकंदावर शेगडी तयार करून, पेटवून जठरामध्यें मीच प्रदीप्त अग्नि झालों ! ७. प्राण व अपान या वायूंच्या जोडभात्याच्या वाऱ्यानें फुंक फुंकून रात्रंदिवस तो जठराग्नि पेटवून मी या उदरांत किती अन्न पचवितो याचा पत्ताहि लागत नाहीं ! ८. कोरडी, स्निग्ध, चांगली शिजलेली व परिपक्व अशीं चतुर्विध अन्नें आहेत; पण त्या अन्नांचें पचनहि मीच करितों ९. अशा प्रकारें सर्वजन मीच आहे व जगाचा निर्वाह ज्यावर होतो तें अन्नधान्यहि मीच आहे व जीवनाचें [ अन्न पचविण्याचें ] मुख्य साधन जो जठराग्नि तोहि मीच आहें ४१०. आतां यापेक्षां अधिक माझ्या व्यापकपणाची अपूर्वाई तुला काय सांगूं ! तर अर्जुना ! तूं हे पक्कें लक्षांत ठेव कीं, या जगांत [ माझ्याविना दुसरें म्ह० ] द्वैत असें नाहींच; सर्वत्र मीच घनदाट भरलेला आहे, असें समज ११. यावर अशी शंका येतें कीं, मग, " या जगांत कांहीं प्राणी सदा सर्वदा सुखी असें दिसतात व कांहीं अतीव दुःखानें अगदीं व्याप्त व व्याकूळ झालेले दिसतात ते कां दिसावेत ? [ भोगांत वैषम्य, वैचित्र्य कोणत्या कारणानें निर्माण झालें ? ] १२. जसें एकाद्या सगळ्या शहरांत एकाच दिव्यानें सर्व दिवे लावले असतां त्यांपैकीं कांहीं दिवे प्रकाश करतात व कांहीं करीत नाहींत, असें कसें होईल ? १३. अशा प्रकारचे तर्कवितर्क जर तूं आपल्या मनांत करीत बसला असशील, तर त्या शंकांचेंहि चांगलें निवारण करतों, ऐक १४. हे पहा ! सर्वत्र मीच ओतप्रोत भरलेला आहे, हें तर अगदीं निर्विवाद खरें आहे. त्यांत मुळींहि अन्यथा नाहीं; परंतु प्राण्यांच्या बुद्धिरूप उपाधीच्या अनुरोधानें मी त्यांस भासतो. बुद्धि पवित्र वा अपवित्र असेल तसा मी अभिव्यक्त होतो १५. ज्याप्रमाणें एकच एक आकाशध्वनि निरनिराळ्या विशेष वाद्यांच्या अनुरोधानें त्यांतून निरनिराळ्या नादाच्या रूपांनीं बाहेर पडून अभिव्यक्त होतो १६. किंवा हा जो सूर्य तो एकच आहे, पण तो उगवल्यावर लोकांच्या वेगवेगळ्या व्यापारांत निरनिराळ्या प्रकारें उपयोगास गेला १७. अथवा पाणी एकच असून, बीजांच्या निरनिराळ्या धर्माप्रमाणें निरनिराळ्या झाडांमध्यें भेद उत्पन्न होतात [ निरनिराळ्या रसांच्या परिणामास प्राप्त होतो ]. त्याप्रमाणें मी एकच असून निरनिराळ्या प्राण्यांच्या ठिकाणीं त्यांच्या त्यांच्या बुद्ध्यादि उपाधिधर्माप्रमाणें माझें स्वरूप भिन्न भिन्न परिणामास पावलें आहे १८. अरे ! एक अज्ञानी व एक चतुर–ज्ञानी अशा दोघां वाटसरूंना दोन सरांचा नीलमण्यांचा एक हार दृष्टीस पडला; तेव्हां जो अज्ञानी होता त्याला तो ' सर्प आहे ' असें वाटून भीति उत्पन्न करण्यास कारण झाला व दुसरा जो चतुर–ज्ञानी होता, त्यास तोच ' हार आहे ' असें यथार्थ ज्ञान होऊन सुखास कारण झाला १९. हें असो, स्वाती नक्षत्राचें पाणी एकच असून तें शिंपल्यांत पडलें असतां त्यांचीं मोती होतात व सर्पाच्या तोंडांत पडलें असतां विष उत्पन्न होतें, त्याप्रमाणें जे ज्ञानी आहेत, त्यांना मी सुख [ स्वरूप ] आहे व अज्ञानी आहेत, त्यांना दुःख [ स्वरूप ] आहे ४२०.

**अन्वयार्थ**––**अहं**–मी––**सर्वस्य**––सर्वांच्या––**हृदि**––बुद्धींत–**संनिविष्टः**–उत्तम प्रकारें आत्मरूपानें प्रवेश केला आहे–**च मत्तः**–आणि मज आत्म्यापासून–**स्मृतिः ज्ञानं**–स्मरण, ज्ञान–**च**–व–**अपोहनं**–त्याची निवृत्ति होते–**च सर्वे वेदैः**–व सर्व वेदांनीं–**अहम् एव**–मीच–**वेद्यः**–जाणण्यास योग्य आहे–**वेदान्तकृत्**–वेदान्ताच्या विषयाचा संप्रदाय करणारा–**च**–व–**वेदवित्**–वेदार्थवेत्ता –**अहम् एव**–मीच आहें १५.

अरे ! अर्जुना ! तात्त्विक विचार करून पाहिलें तर सर्व प्राण्यांच्या हृदयांत, ' मी अमुक आहें ' अशी जी बुद्धि [ ज्ञान ] रात्रंदिवस स्फुरण पावत असतें ती स्फुरण पावणारी वस्तु मीच आहे २१. परंतु [ एवढें समजल्यानें तूं आपणास कृतार्थ समजूं नकोस तर त्या ज्ञानाचा निश्चय होण्यास वैराग्यपूर्वक ] साधूंच्या समागमानें ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचा व योगाचा अभ्यास केला असतां आणि श्रीगुरूंच्या चरणाची सेवा केली असतां २२. म्हणजे ह्याच एका सदाचरणानें त्याचें सर्व अज्ञान नाहींसें होते व त्याचा ' मी 'पणा आत्मस्वरूपांत चिर विश्राम पावतो २३. अशारीतीनें आपलें आत्मस्वरूप आपणच यथार्थ ज्ञानानें जाणून त्याचा आत्मा जो मी त्या मज आत्म्याच्या योगानें तो नेहमीं सुखांतच राहील, अशी स्थिति वा असा साक्षात्कार होण्यास माझ्याशिवाय दुसरा कोणी कारणीभूत आहे काय ? २४. हें धनंजया ! सूर्य उगवल्यावर सूर्याच्या तेजानेंच सूर्य पहावा लागतो, त्याप्रमाणें

१ नाभिस्थानावर. २ शेगडी. ३ पचवितो. ४ कच्चें. ५ निर्वाहक. ६ व्यापकपणाची अपूर्वता. ७ वेषानें. ८ व्याप्त. ९ नगरांत. १० एकाच दिव्यानें. ११ न पाहणारीं. १२ तर्कवितर्क, वाटाघाट. १३ वेगळें. १४ कल्पनेनें. १५ बुद्धिसारखा. १६ निरनिराळ्या, भिन्नभिन्न. १७ उदक. १८ निर्माण झालें. १९ अज्ञान्याला, नेणत्याला, मूढाला.

जाणावया । मीचि हेतु ॥ २५ ॥ ना शरीरपरातें सेवितां । संसारगौरवचि ऐकतां । देहीं जयांची अहंता । बुडोनि ठेली ॥ २६ ॥ ते स्वर्गसंसारालागीं । धांवतां कर्ममार्गीं । दुःखाच्या सेलभोगीं । विभागी होती ॥ २७ ॥ परी हेंही होणें अर्जुना । मजचिस्तव तया अज्ञाना । जैसा जागताचि हेतु स्वप्ना । निद्रेतें होय ॥ २८ ॥ पैं अभ्रें दिवसु हरपला । तोहि दिवसेंचि जाणों आला । तेवीं मी नेणोनि विषयो देखिला । मंजचिस्तव भूतीं ॥ २९ ॥ एवं निद्रा कां जागणिया । प्रबोधुचि हेतु धनंजया । तेवीं ज्ञाना अज्ञाना जीवां यां । मीचि मूळ ॥ ४३० ॥ जैसें सर्पत्वा कां दोरा । दोरुचि मूळ धनुर्धरा । तैसा ज्ञाना अज्ञानाचिया संसारा । मियांचि सिद्धु ॥ ३१ ॥ म्हणौनि जैसा असें तैसया । मातें नेणोनि धनंजया । वेदु जाणों गेला तंव तया । जालिया शाखा ॥ ३२ ॥ तरी तिहीं शाखाभेदीं । मीचि जाणिजे त्रिशुद्धी । जैसा पूर्वापरा नदी । समुद्रचि ठी ॥ ३३ ॥ आणि महासिद्धांतोपासीं । श्रुति हारपतीं शब्देंसीं । जैसिया सुगंधा आकाशीं । वातलहरी ॥ ३४ ॥ तैसें समस्तही श्रुतिजात । ठाके लाजिले ऐसें निवांत । तें मीचि करीं यथावत । प्रकटोनियां ॥ ३५ ॥ पाठीं श्रुतिसहित अशेष । जग हारपे जेथ निःशेष । तें निजज्ञानही चोख । जाणता मीचि ॥३६॥ जैसें निदेलिया जागिजे । तेव्हां स्वप्नींचें कीरं नाहीं दुजें । परी एकत्वही देखों पाविजे । आपलेंचि ॥३७॥ तैसें आपलें अद्वयपण । मी जाणतसें दुजेनवीण । तयाही बोधाकारण । जाणता मीचि ॥ ३८ ॥ मग आगी लागलिया कापुरा । ना काजळी ना वैश्वानरा । उरणें नाहीं वीरा । जयापरी ॥ ३९ ॥ तेवीं समूळ अविद्या खाये । तें ज्ञानही जैं बुडोनि जाये । तऱ्ही नाहीं कीरं नोहे । आणि न साहे असणेंही ॥ ४४० ॥ पैं विश्व घेऊनि गेला मार्गेसीं । तया चोरातें कवण कें गिवसी ? । जे कोणी एकी दशा ऐसी । शुद्ध ते मी ॥ ४१ ॥ ऐसी जडाजडव्याप्ती । रूप करितां कैवल्यपती । ठी केली निरुपहितीं । आपुल्या रूपीं ॥ ४२ ॥ तो आघवाचि बोधु सहसा । अर्जुनीं उमटला कैसा । व्योमींचा चंद्रोदयो जैसा । क्षीरार्णवीं ॥ ४३ ॥ कां प्रतिभिंतीं चोखटे । समोरील चित्र उमटे । तैसा अर्जुनें आणि वैकुंठें । नांदतसे

मला जाणण्यास मीच कारण आहें २५. नाहींतर व्यावहारिक देहतादात्म्यवान् लोकांची सेवा करून त्यांच्या संगतीनें व संसाराचाच चांगुलपणा, गौरव ऐकत असतांना ज्यांची अहंबुद्धि देहाच्या ठिकाणींच गढून गेली आहे २६. ते देहासक्त स्वर्ग व संसार याच सुखांच्या प्राप्तीकरितां कर्ममार्गाचें अचरण करीत असतांनाच ते दुःखाचा शेलका वांटा घेणारे–वाटेकरी होतात २७. परंतु अर्जुना! हीहि स्थिति त्या अज्ञानी लोकांस प्राप्त होण्यास कारण मीच आहें. [ ते कसें तर ] ज्याप्रमाणें जागा असणारा मनुष्यच स्वप्न व निद्रा या अवस्थांस कारण असतो २८. किंवा दिवसा ढगांनीं आकाश व्यापिलें म्हणजे सूर्याचा उजेड कमी होतो, सूर्य आच्छादिला जातो हेंहि दिवसाच्या–सूर्याच्या उजेडानेंच जसें समजतें, त्याप्रमाणें मला न जाणून प्राणीमात्रांनी विषय पाहिला म्हणजे विषयांचें सेवन केले हेंहि माझ्याच सत्तेनें होतें २९. ज्याप्रमाणें प्राण्यांच्या निद्रेला व तत्सापेक्ष जागृत होण्याला मूळचा[प्रबोध-झोपेच्या निरपेक्ष असणारा ] जागेपणाच कारणीभूत आहे, त्या प्रमाणें या जीवांच्या ज्ञानास व अज्ञानास मीच मूळ [ ज्ञानस्वरूप अधिष्ठानभूत वा कारण ] आहे ४३०. हे धनुर्धरा! ज्याप्रमाणें [ दोरीच्या अज्ञानद्वारां ] सर्पत्वाला किंवा दोरीला [ दोराच्या यथार्थ ज्ञानाला ] मूळदोरीच [ मूळ स्वरूपानें ] कारण आहे, त्याप्रमाणें ज्ञानाच्या वा अज्ञानाच्या सर्व व्यवहारांस मीच [ सत्तारूपानें ] कारण आहे, हें सिद्ध आहे ३१. म्हणून हे धनंजया! जसा मी खरा स्वरूपानें आहे तसा न समजतां वेद मला जाणण्याकरितां खटपट करूं लागला, तों त्याच्या शाखा झाल्या ३२. तथापि त्या वेदांच्या वेगवेगळ्या तीनहि शाखांकडून [ ऋक्, यजुष, व साम यांकडून ] मीच एक खरोखर जाणला जातो. ज्याप्रमाणें पूर्व–पश्चिमवाहिनी नद्यांस शेवटीं एकमेव समुद्रच प्राप्यस्थान होय ३३. आणि ज्याप्रमाणें [ "एकमेवाद्वितीयम् ब्रह्म" ] या महासिद्धांताजवळ श्रुति शब्दासहवर्तमान लय पावतात, ज्याप्रमाणें वाऱ्याच्या झुळका गंधासहवर्तमान आकाशांत लय पावतात ३४. त्याप्रमाणें सर्व श्रुति ज्या ठिकाणीं लाजल्यासारख्या निवांत स्तब्ध रहातात, तें ब्रह्मस्वरूप मीच अंतःकरण वृत्तिद्वारां यथार्थ प्रकट करतों ३५. नंतर श्रुतीसह सर्व जग ज्या ठिकाणीं संपूर्णतया लय पावतें तें शुद्ध आत्मज्ञान जाणणारा मीच आहें ३६. ज्याप्रमाणें निजलेल्या मनुष्यास जागा केले असतां त्याचवेळीं स्वप्नांत भासलेल्या वस्तु आपण झालों होतों, तो द्वैताभास परिपूर्ण नाहींसा होतो; एवढेंच नव्हे तर जागृतावस्थेंतहि आपण एकटेच आहोंत हेंहि तो समजतो ३७. त्याप्रमाणें जे माझें अद्वयपण, यथार्थ आत्मस्वरूप त्याचा बोध होण्यास द्वैतनिरपेक्ष दुसऱ्या कोणाशिवायहि मीच कारण आहे व अशा त्या आत्मस्वरूप बोधालाहि कारण ज्ञानस्वरूप असा मीच आहें ३८. मग वीरा अर्जुना! ज्याप्रमाणें कापुरास अग्नि लागल्यावर मागे त्याची काजळी रहात नाहीं व अग्नीहि शिल्लक राहात नाहीं ३९. त्याप्रमाणें अविद्येला समूळ नाहींसे करणारें जें ज्ञान, तेंहि ज्या वेळेस लय पावतें, त्या वेळेस 'कांहीं नाहीं' [ असा अत्यंताभाव, शून्य ] असेंहि म्हणतां येत नाहीं व त्याला 'नाहीं'च्या सापेक्षतेनें 'आहे' असेंहि म्हणणें ज्या स्थितीमध्यें सहन होत नाहीं. [ म्हणजे ज्ञानाज्ञानाचा लय झाल्यावर जें उर्वरित शुद्ध दृङ्मात्र स्वरूप राहते, सत् सामान्य अत्यंत निर्विशेष स्वरूपाच्या ठिकाणीं शब्दाचा साक्षात् प्रवेश होत नाहीं म्हणून आहे किंवा नाहीं, अशा शब्दानें ती स्थिति सांगतां येत नाहीं ] ४४०. हें पहा! विश्वाचें कारण जें अज्ञान त्यासहवर्तमान, मागासह–सर्व विश्वाला घेऊन गेला त्या चोराला [ परमात्मा आहे त्याला ] त्याचा विश्वांतर्गत साधनांनीं कोण व कोठें पत्ता लावणार! अशा तऱ्हेची जी कांहीं एक सत्सामान्य स्थिति आहे ते माझे शुद्ध स्वरूप आहे ४१. [ या नंतर श्रीज्ञानेश्वर महाराज पुढच्या श्लोकांच्या अवतरणाची रचना करतात] कैवल्यपती भगवान् यांनीं जडाजड पदार्थांमध्यें आपल्या व्याप्तीचें रूप वर्णन करीतां करीतां आपल्या निरुपाधिक स्वरूपांत त्या व्याख्यानाचे पर्यवसान केलें व तेथें मजल पोंचविली ४२. ज्याप्रमाणें आकाशांत चंद्रोदय झाल्यावर क्षीरसमुद्रांत त्याचें पूर्ण प्रतिबिंब पडलेलें दिसतें, त्याप्रमाणें श्रीकृष्णांनीं केलेला हा सर्वहि बोध अर्जुनाच्या अंतःकरणांत एकदम प्रतिबिंबित होऊन प्रगट झाला ४३. चित्रें काढलेल्या भिंतीच्या समोरील भिंत घोटून प्रतिबिंब ग्रहणास योग्य, गुळगुळीत आरशासारखी स्वच्छ केल्यावर तींत ज्याप्रमाणें त्या चित्रांचें प्रतिबिंब स्वच्छ उमटते त्याप्रमाणें वैकुंठनायक जो श्रीकृष्ण परमात्मा, त्याच्या हृदयांतील जो बोध तोच

१ शेलक्या वांट्यास. २ माझ्याच सत्तेनें. ३ मूळ ज्ञान. ४ खरोखर. ५ विभाग, फांद्या. ६ खरोखर. ७ पूर्वेकडे व पश्चिमेकडे वाहणाऱ्या. ८ शेवट. ९ ब्रह्माजवळ. १० सुगंधयुक्त. ११ खचित. १२ अग्नि. १३ खचित.

बोधु ॥ ४४ ॥ तरी बापें वस्तुस्वभावो । फावे तंव तंव गोडिये थांवो । म्हणौनि अनुभवियांचा रावो । अर्जुन म्हणे ॥ ४५ ॥ जी व्यापकपण बोलतां । निरुपाधिक जें आतां । स्वरूप प्रसंगता । बोलिले देवो ॥ ४६ ॥ तें एक वेळ अव्यंगवाणें । कीजो कां मजकारणें । तेथ द्वारकेचा नाथु म्हणे । भलें केलें ॥ ४७ ॥ पैं अर्जुना आम्हांहि वाडेंकोडें । अखंड बोलों आवडे । परी काय कीजे न जोडे । पुसतें ऐसें ॥ ४८ ॥ आजि मनोरथांसि फळ । जोडलासि तूं केवळ । जे तोंड भरूनि निखळं । आलासि पुसों ॥ ४९ ॥ जें अद्वैताहीवरी भोगिजे । तें अनुभवींच तूं विरंजे । पुसोनि मज माझें । देतासि सुख ॥ ४५० ॥ जैसा आरिसा आलिया जवळां । दिसे आपणपें आपला डोळा । तैसा संवादिया तूं निर्मळा । शिरोमणी ॥ ५१ ॥ तुवां नेणोनि पुसावें । मग आम्ही परिसऊं बैसावें । तो गा हा पांडु नव्हे । सोयरेया ॥ ५२ ॥ ऐसें म्हणौनि आलिंगिलें । कृपादृष्टी अवलोकिलें । मग देवो काय बोलिले । अर्जुनेंसीं ॥ ५३ ॥ पैं दोहीं वोठीं एक बोलणें । दोहीं चरणीं एक चालणें । तैसें पुसणें सांगणें । तुझें माझें ॥ ५४ ॥ एवं आम्ही तुम्ही येथें । देखावें एका अर्थातें । सांगतें पुसतें येथें । दोन्ही एक ॥ ५५ ॥ ऐसा बोलत देवो भुलला मोहें । अर्जुनातें आलिंगूनि ठाये । मग विहाला म्हणे नोहें । आवडी हे ॥ ५६ ॥ जाले इक्षुरसाचें ढाळ । तरी लैंवण देणें किडाळ । जे संवादसुखाचें रसाळ । नासेल थितें" ॥ ५७ ॥ आधींच आम्हां यया कांहीं । नरनारायणासी भिन्न नाहीं । परी आतां जिरो माझ्या ठाईं । वेगु हा माझा ॥ ५८ ॥ इया बुद्धी सहसा । श्रीकृष्ण म्हणे वीरेशा । पैं गा तो तुवां कैसा । प्रश्नु केला ? ॥ ५९ ॥ जो अर्जुन श्रीकृष्णीं विरत होता । तो परतोनि मागुता । प्रश्नावळीची कथा । ऐकों आला ॥ ४६० ॥ तेथ सद्गदें बोलें । अर्जुनें जी जी म्हणितलें । निरुपाधिक आपुलें । रूप सांगा ॥ ६१ ॥ यया बोला शार्ङ्गी । तोंचि सांगावयालागीं । उपाधी दोहीं भोगीं । निरूपीत असे ॥ ६२ ॥ पुसिलिया निरुपँहित । उपाधि कां सांगे येथ । हे कोण्हाही प्रस्तुत । गमे जरी ॥ ६३ ॥ तरी ताकाचें अंश फेडणें । याची नांव लोणी काढणें । चोखाचिये शुद्धी

अर्जुनाच्या शुद्ध अंतःकरणामध्यें [प्रतिबिंबित] नांदत आहे ४४. धन्य! धन्य!! परमात्मवस्तु–स्वभावच! सामर्थ्यच असें आहे कीं, जशी जशी त्याची अनुभूति प्राप्त होईल, तशी तशी आनंदाची प्राप्ति व गोडीहि वाढते, म्हणून अनुभवियांचा राजा जो अर्जुन, तो पुनः देवाला म्हणतो ४५. "देवा! आपल्या व्यापकपणाचें वर्णन करतांना आपण प्रसंगानुसार जें निरुपाधिक स्वरूपाचे वर्णन केलें ४६. तेंच निरुपाधिक स्वरूप पुनः एक वेळ मजकरितां कांहीं न्यून न ठेवतां स्पष्ट करा." तेव्हां द्वारकानाथ आनंदित होऊन म्हणाले, "चांगले विचारलेंस" ४७. हें पहा! अर्जुना! आम्हांलाहि मोठ्या कोडकौतुकानें नेहमीं याविषयीं वा हेच बोलावेसे वाटते, ते आवडते; पण काय करावें? कोणी असें विचारणाराच मिळत नाहीं ४८. तूं मात्र आज तोंडभरून मोठ्या आस्थेनें पुनः निरुपाधिक स्वरूप सांगा, म्हणून विचारण्यास आला आहेस म्हणून मला वाटते कीं, आजपर्यंत माझ्या मनांत, असा विचारणारा कोणी तरी जिज्ञासु भेटावा, अशी फार इच्छा होती; त्या इच्छेस सफळ करणारा आज तूं एकटाच मला प्राप्त झालास ४९. अद्वैत अनुभवानंतरहि जो विलक्षण सुखाचा उपभोग, अनुभव घ्यावयाचा तो अनुभव घेण्यास आज मला तूं साह्य करणारा झाला आहेस. कारण, 'आपले निरुपाधिक स्वरूप मला पुनः सांगा' असें विचारूनच तूं माझेंच मला सुख देत आहेस ४५०. ज्याप्रमाणें आरसा जवळ आला असतां त्यांत पाहिल्यावर आपलें स्वरूप आपल्या नेत्रांनीं आपणांस दिसतें, त्याप्रमाणें तुझ्याबरोबर [तत्त्वबोधजनक] निर्मळ संवाद केल्यामुळें माझेंच मला सुख झालें आहे, म्हणून तूं संवाद करणाऱ्यांत शिरोमणि, श्रेष्ठ आहेस ५१. मित्रा अर्जुना! तुला हें कांहीं समजत नाहीं म्हणून तें, त्वां आम्हांस विचारावेंस आणि मग आम्हीं तुझी समजूत करून देण्याकरितां ऐक्‌णिण्यास प्रवृत्त व्हावें तशांतला हा प्रकार वा तुझी योग्यता नाहीं" ५२. असें म्हणून देवांनीं आनंदातिशयामुळें अर्जुनास आलिंगन दिलें व कृपादृष्टीनें त्याला पाहिलें व मग भगवान् अर्जुनाला असें काय म्हणाले? ५३. कीं, "ओठ जरी दोन असले तरीपण बोलणें जसें एक, पाय दोन असलें तरीपण चालणें जसें एक, त्याप्रमाणें तुझें पुसणें व माझें सांगणें दोन्हीं एकच आहेत. [दोघांचे मुख्य तात्पर्य एकच] ५४. याप्रमाणें अर्जुना! आम्हीं व तूं स्वरूपतः एकच आहोंत असें समज; कारण, या प्रसंगीं मी सांगणारा उपदेशक व तूं पुसणारा श्रोता हे आपण दोघेही तत्त्वतः एकच आहोंत" ५५. असें बोलतां बोलतां प्रेमानें भुलून जाऊन अर्जुनास आलिंगन देऊन देव स्तब्ध राहिले, इतक्यांत पुनः चकित झाले व म्हणाले कीं, हे ऐक्याचे इतकें प्रेम, संवाद सुखांत उपयुक्त-व चांगलें नाहीं! ५६. उंसाच्या रसाची, गुळाची ढेप करतेवेळीं ती नासूं नये म्हणून त्यांत ज्याप्रमाणें हीन अशा क्षाराचें मिश्रण घालावें लागते, त्याप्रमाणें आमच्या संवाद रूपी सुखांत द्वैत उत्पन्न केलें नाहीं, तर आज असलेली प्रेमसुख गोडी नाहींशी होईल ५७. अर्जुन नर व मी नारायण असल्यामुळें आम्हां दोघांमध्यें आधींच मुळांत भेद नाहीं; तरीपण मला आलेलें ऐक्यात्मकतेचे, प्रेमाचे भरते आतां माझ्याच ठिकाणीं परिपूर्ण जिरविलें पाहिजे ५८. असा विचार करून व बुद्धि स्थिर करून श्रीकृष्ण भगवान् एकदम म्हणाले, "हे वीरश्रेष्ठा! तूं मला काय रे प्रश्न केला होतास?" ५९. इकडे अर्जुन जो श्रीकृष्णांच्या स्वरूपांत [देहात्मत्वबुद्धि विरून] लीन होत होता, ती या प्रश्नानें पुनः माघारीं देहभानावर येऊन आपल्या अनेक प्रश्नांची उत्तरें ऐकण्यास तयार झाला ४६०. तेव्हां सद्गदित वाणीनें अर्जुनानें म्हटलें:— "महाराज! आपलें निरुपाधिक स्वरूप कोणते तें आपण सांगा" असे मी म्हटलें होते ६१. अर्जुनाचें हें भाषण ऐकून, तेंच निरुपाधिक स्वरूप सांगण्याकरितां, श्रीकृष्ण. भगवान् अगोदर दोन प्रकारें करून 'उपाधींचे' वर्णन सांगावयास लागले ६२. आपलें निर्गुणरूप सांगा म्हणून अर्जुनानें विचारलें असतां आतां भगवान् येथें उपाधि.. वा उपाधींविषयीं अगोदर वर्णन कां सांगत आहेत, असें जर येथें कोणासहि वाटत असेल ६३. तर असे पहा कीं,

१ धन्य. २ स्वरूप. ३ समजेल. ४ परिपूर्ण, केवळ. ५ आवडीनें. ६ प्रश्नकर्ता, विचारणारे. ७ निव्वळ. ८ निर्मळ स्थान. ९ डोळयानें. १० योग्यता. ११ स्वरूप. १२ भ्याला. १३ गुळाच्या ढेपी. १४ क्षार. १५ प्रेम. १६ प्रकारांनीं. १७ उपाधीरहित. १८ वेगळें करणें.

तोडणें । कीडचि जेवीं ॥ ६४ ॥ बाबुळीचि सारावी हातें । परी पाणी तंव असे आइतें । अभ्रचि जावें गगन तें । सिद्धचि कीं ॥ ६५ ॥ वरील कोंडियाचा गुंडाळा । झाडूनि केलिया वेगळा । कणु घेतां विरंगोळा । असे काई ? ॥६६॥ तैसा उपाधि उपहितां । शेवटु जेथ विचारितां । तें कोणातेंही न पुसतां । निरुपाधिक ॥ ६७ ॥ जैसें न सांगणेंवरी । बाळा पतीसी रूप करी । बोल निमालेपणें विवरी । अचर्चातें ॥ ६८ ॥ पैं सांगणेया जोगें नव्हे । तेथिंचें सांगणें ऐसें आहे । म्हणौनि उपाधि लक्ष्मीनाहे । बोलिजे आदीं ॥ ६९ ॥ पाडिव्याची चंद्ररेखा । निरुती दावावया शाखा । दाविजे तेवीं औपाधिका । बोली इया ॥ ४७० ॥

द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च । क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥

मग तो म्हणे गा सव्यसाची । पैं इये संसारपांटणींची । वस्ती साविया टांची । दुपुरुषीं ॥ ७१ ॥ जैसी आघवांचि गगनीं । नांदत दिवोरात्री दोन्ही । तैसे संसार राजधानीं । दोन्हीचि हे ॥ ७२ ॥ आणिकही तिजा पुरुष आहे । परी तो या दोहींचें नांव न साहे । जो उदेला गांवेंसीं खाये । दोहींतें ययां ॥ ७३ ॥ परी ते तंव गोठी असो । आधीं दोन्हींचीं हे परियेसों । जें संसारग्रामा वसों । आले असती ॥७४॥ एक आंधळा वेडा पंगु । येर सर्वांगें पुरता चांगु । परी ग्रामगुणें संगु । घडला दोघां ॥७५॥ तया एका नाम क्षरु । येरातें म्हणती अक्षरु । इहीं दोहींचि परी संसारु । कोंदला असे ॥ ७६ ॥ आतां क्षरु तो कवणु । अक्षरु तो किं लक्षणु । हा अभिप्रायो संपूर्णु । विवंचूं गा ॥७७॥ तरी महदहंकारा-। लागुनियां धनुर्धरा । तृणांतींचा पांगोरा- । वरी पैं गा ॥७८॥ जें कांहीं सानें थोर । चालतें अथवा स्थिर । किंबहुना गोचर । मनबुद्धींसि जें ॥७९॥ जेतुलें पांचभौतिक घडतें । जें नामरूपा सांपडतें । गुणत्रयाच्या पडतें । कामठां जें ॥ ४८० ॥ भूताकृतींचें नाणें । घडत भांगारें जेणें । काळासि जूं खेळणें । जिहीं कवडां ॥ ८१ ॥ जाणणेंचि विपरीतें । जें जें कांहीं जाणिजेतें । जें प्रतिक्षणीं निमतें । होऊनियां ॥ ८२ ॥ अगा काढूनि भ्रांतीचे दांग । उभवी सृष्टीचें आंग । हें असो बहु जग । जया नाम ॥ ८३ ॥ पैं अष्टधा भिन्न ऐसें । जें दाविलें प्रकृतिमिसें । जें क्षेत्रद्वारां छत्तिसें । भागी केलें ॥८४॥

दह्याचें मंथन करून त्यांतून ताकाचा अंश अगोदर काढून निराळा करणें याचेंच नांव लोणी काढणें होय. किंवा शुद्ध सोनें शोधण्यास वा शुद्ध सोनें पाहिजे असल्यास तें जसें तापवून त्यांतील वाईट धातु निवडून बाहेर वेगळी काढावी लागते; ६४. पाण्यावरील शेवाळ हातानें एका बाजूस काढून टाकलें, म्हणजे मग पाणी आयते सिद्धच असते अथवा अभ्र नाहींसें झाल्यावर आकाश स्वच्छ व स्वतः सिद्धच असते ६५. तांदुळादि धान्यावरील कोंड्याचें आच्छादन झाडून वेगळें काढून टाकल्यावर तांदुळादि शुद्ध धान्य हातीं येण्यास कांहीं हरकत असते काय ? ६६. त्याप्रमाणें विचारानें स्वरूपावरील उपाधी व उपहित या दोहोंचा शेवट जेथें होतो व विचार केला तर जें बाकी उर्वरित रहातें तेंच शुद्ध निरूपाधिक स्वरूप, हें कोणासहि न पुसतां कळत असतें ६७. ज्याप्रमाणें लहान मुलीला तिच्या पतीचें नांव विचारल्यावर, जें नांव घेतलें असतां ती गप्प राहते, तेंच तिच्या पतीचें नांव समजावयाचें, त्याप्रमाणें जेथें शब्दाची गति कुंठित होते, तेंच अवर्णनीय असे निरुपाधिक शुद्ध स्वरूप होय ६८. म्हणून ज्याचे स्वरूप शब्दांनीं सांगतां येण्याजोगें नाहीं; त्याचे स्वरूपाचें ज्ञान करून देण्यासाठीं त्याचे वर्णन असेंच आजूबाजूच्या गोष्टींनेंच करावें लागतें; म्हणून लक्ष्मीपती जे भगवान् ते अगोदर उपाधी सांगूं लागले ६९. शुक्ल पक्षांतील प्रतिपदेच्या चंद्राची कोर निश्चयानें, अचूक दाखवितेवेळीं ज्याप्रमाणें एकाद्या झाडाच्या खांदीच्या आधारानें तीं दाखवावीं लागते, त्याप्रमाणें निरुपाधिक स्वरूपाचें लक्षण सांगतेवेळीं उपाधीचें स्वरूप अवश्य सांगावें लागते. [ म्हणजे मंदप्रज्ञ मुमुक्षूंस निरुपाधिक ब्रह्माचें ज्ञान होतें ] ४७०.

**अन्वयार्थ--लोके**-या संसारांत-**क्षरः**-क्षर-**च**-व -**अक्षरः एव**-अक्षरच-[ **इति** ]-असें-**इमौ द्वौ पुरुषौ** -हें दोन पुरुष आहेत-**सर्वाणि भूतानि**-सर्व भूतें हा-**क्षरः**-क्षर पुरुष आहे-**च**-आणि-**कूटस्थः**-ईश्वराची मायाशक्ति-**अक्षरः**-अक्षर पुरुष आहे, असें-**उच्यते**-सांगितलें जातें १६.

मग श्रीकृष्ण म्हणतातः-हे सव्यसाची ! या संसाररूपी नगरांत खरोखर मोजकी क्षर व अक्षर या दोनच पुरुषांची वस्ती आहे ७१. ज्याप्रमाणें सर्व आकाशांत फक्त दिवस व रात्र हींच दोन नांदतात, त्याप्रमाणें या संसाररूपी राजधानींत हे दोघेच पुरुष राहतात ७२. आणखीहि एक तिसरा पुरुष आहे; परंतु तो या दोघांचें नांव देखील सहन करीत नाहीं. कारण, त्याचा वा त्याच्या ज्ञानाचा उदय झाला असतां तो नगरासह त्या दोन्हीं पुरुषांचा नाश करतो ७३. परंतु त्या तिसऱ्याची गोष्ट सध्यां राहूं दे. अगोदर हे जे दोन या संसाररूपी नगरांत वस्ती करण्याकरितां आले आहेत, त्या दोघांविषयींच तुला ऐकवितो ७४. त्यांपैकीं एक पुरुष हा आंधळा, वेडा व पंगु असा आहे म्ह० सर्व शरीर धर्मरहित आहे आणि दुसरा पुरुष सर्व अवयवांनीं परिपूर्ण चांगला आहे. परंतु हे दोघे एकाच गांवांत रहात असल्यामुळें त्यांची परस्परांमध्यें स्नेहपूर्ण संगत जडली आहे ७५. त्यांतील एकाचें नांव 'क्षर' व दुसऱ्याचें नांव 'अक्षर' आहे तरीपण या दोघांनींच हें संसाररूपी नगर सर्वतोपरी व्यापून टाकलें आहे ७६. आतां 'क्षर' पुरुष तो कोण ? व 'अक्षर' पुरुषाचें लक्षण काय आहे ? हें सर्व अभिप्राय तुला फोड करून स्पष्ट सांगतों. [ ह्या ठिकाणीं शुद्ध परमात्म्यालाच क्षराक्षराची उपाधि संबंधानें संज्ञा केली आहे. क्षर पुरुष संज्ञा करते वेळेस मायाकार्य महत्तत्त्वापासून तृणापर्यंत जो प्रपंच तो 'क्षर' म्हणजे प्रतिक्षणीं नाश पावणारा आहे, ती उपाधी घेऊनच शुद्ध परमात्याला क्षर पुरुष असें म्हटलें आहे; आतां येथून [ शुद्ध परमात्म्याला उपाधीमुळें क्षर हें नांव आले म्हणून त्या उपाधीचेंच ५०० ओवींपर्यंत वर्णन केलें आहे हें पक्कें लक्षांत ठेवलें म्हणजे पुढील ग्रंथ समजण्यास कठीण जाणार नाहीं ] ७७. तर अर्जुना ! महत्तत्त्वापासून तो शेवट गवताच्या काडीपर्यंत सर्व ७८. जें कांहीं लहान व मोठे, जंगम अथवा स्थावर फार काय सांगावें ! जें मन व बुद्धि यांस विषय होऊन समजणारें ७९. जें पंचमहाभूतांनीं बनलेलें आहे, नांव व रूप यामध्यें येणारें आणि जें सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या टांकसाळीपासून उत्पन्न होते ४८०. ज्या सुवर्णरूप पंचमहाभूतांपासून भूताकृतींचें नाणें तयार केले आहे व ज्या शरीररूपीं कवड्यानें काळाला जुगार खेळतां येतो ८१. विपरीत ज्ञानानेंच जें जें कांहीं जाणतां येतें व जें प्रतिक्षणीं उत्पन्न होऊन नाश पावतें ८२. अरे ! भ्रांतिरूप अरण्य [मायेंत] कापून [त्या अरण्यांतील लाकडांनीं] जें सृष्टिरूपी अवयवाकार उभविलें जातात फार काय सांगावें !! ज्याला 'जग' असें म्हणतात ८३. जें सातव्या अध्यायांत वेगवेगळे आठ प्रकारच्या प्रकृतीरूपानें वर्णन केले आहे व तेराव्या अध्यायांत ज्याचे छत्तीस प्रकारांनीं क्षेत्राच्या रूपानें वर्णन केलें आहे ८४. या मागील गोष्टी कशास सांगूं !

हें मागील सांगों किती । अगा आतांचि जें प्रस्तुतीं । वृक्षोकार रूपाकृती । निरूपिलें ॥ ८५ ॥ तें आघवेंचि साकारें । कल्पुनी आपणपयां पुरे । जालें असें तदनुसारें । चैतन्यचि ॥ ८६ ॥ जैसा कुहाँ आपणचि बिंबें । सिंह प्रतिबिंब पाहतां क्षोभे । मग क्षोभला समारंभें । घाली तेथ ॥ ८७ ॥ कां सॅलिलीं असतचि अॅसे । व्योमावरी व्योम बिंबे जैसें । अद्वैत होऊनि तैसें । द्वैत घेपे ॥ ८८ ॥ अर्जुना गा यापरी । साकार कल्पूनि पुरीं । आत्मा विस्मृतीचि करी निद्रा तेथ ॥ ८९ ॥ पैं स्वप्नीं सेजार देखिजे । मग पहुडणें जैसें तेथ कीजे । तैसें पुरीं शयन देखिजे । आत्मयासी ॥ ४९० ॥ पाठीं तिये निद्रेचेनि भरें । मी सुखी दुःखी म्हणत घोरें । अहंममतेचेनि थोरें । वोसणांयें सादें ॥ ९१ ॥ हा जनकु हे माता । हा मी गौर हीन पुरता । पुत्र वित्त कांता । माझें हें ना ॥ ९२ ॥ ऐसिया वेंघोनि स्वप्ना । धांवत भवस्वर्गाचिया राना । तया चैतन्या नाम अर्जुना । क्षर पुरुषु गा ॥ ९३ ॥ आतां ऐक क्षेत्रज्ञु येणें । नामें जयातें बोलणें । जग जीवु कां म्हणे । जिये दशेतें ॥ ९४ ॥ जो आपुलेनि विसरें । सर्व भूतत्वें अनुकरें । तो आत्मा बोलिजे क्षरें । पुरुष नामें ॥ ९५ ॥ जे तो वस्तुस्थिती पुरता । म्हणौनि आली पुरुषता । वरी देहपुरीं निदैजतां । पुरुषनामें ॥ ९६ ॥ आणि क्षरपणाचा नाथिला । आळु यया ऐसेनि आला । जे उपाधींचि आतला । म्हणौनियां ॥ ९७ ॥ जैसी खळाळीचिया उदका- । सरसीं आंदोळे चंद्रिका । तैसा विकारां औपाधिका । ऐसाचि गमे ॥ ९८ ॥ कां खळाळु मोटका शोषे । आणि चंद्रिका तैं सरिसींच भ्रंशे । तैसा उपाधिनाशीं न दिसे । उपाधिकु ॥ ९९ ॥ ऐसें उपाधीचेनि पाडें । क्षणिकत्व यातें जोडे । तेणें खोंकरपणें घडे । क्षर हें नाम ॥ ५०० ॥ एवं जीवचैतन्य आघवें । हें क्षर पुरुष जाणावें । आतां रूप करूं बरवें । अक्षरासी ॥ १ ॥ तरी अक्षरु जो दुसरा । पुरुष पैं धनुर्धरा । तो मध्यस्थु गा गिरिवरां । मेरु जैसा ॥ २ ॥ जे तो पृथ्वी पाताळ स्वर्गीं । इहीं न भेदे तिहीं भागीं । तैसा दोहीं ज्ञानाज्ञानांगीं । पडेना जो ॥ ३ ॥ ना यथार्थज्ञानें एक होणें । ना अन्यथात्वें दुजें घेणें । ऐसें निखिळ जें नेणणें । तेंचि तें रूप ॥ ४ ॥ पांसुता निःशेष जाये । ना घटभांडादि होये । तया मृत्पिंडा ऐसें आहे । मध्यस्थ जें ॥ ५ ॥ पैं आटोनि गेलिया सागरु । मग

अरे ! आतां याच अध्यायांत वृक्षाकार रूपक–कृतीनें कल्पना करून जें कांहीं तुला सांगितलें आहे ८५. तें सर्व साकार जगत् आपल्याला रहाण्याचें गांव आहे, अशी कल्पना करून, त्यांत व्याप्त होऊन त्या त्या आकारानें शुद्ध चैतन्यच बनलें आहे ८६. जसे सिंह आडांत पडलेलें आपले प्रतिबिंब पाहून हा कोणी दुसरा सिंहच आहे असें मानून खवळतो व मग रागानें त्याचा नाश करण्याकरितां तो सिंह त्या आडांत उडी घालतो ८७. किंवा उदकामध्यें मूळचें आकाश व्याप्त असूनहि पुनः त्याच्यावर बाहेरील आकाशाचें प्रतिबिंब पडत असल्याचे दिसते, तसें चैतन्य हे आपण स्वतः मूळचे अद्वैत असूनहि उपाधीच्या योगानें द्वैतरूप बनते ८८. अर्जुना ! याप्रमाणें आकारयुक्त [ स्थूल–सूक्ष्म देह संघातास ] नगरीची कल्पना करून आत्मा त्या ठिकाणीं आपल्या स्वरूपाची विस्मृति हीच कोणी एक झोंप घेत शयन करतो ८९. मग अंथरुणावर निजलेला जसा एखादा मनुष्य स्वप्नात पुनः अंथरुण तयार करून त्यावर निजतो, तसा आत्मा या जगांत [ प्रथम स्वरूपानें व्याप्त असूनहि पुनः उपाधीरूप अंथरुणावर ] स्वस्थ झोंप घेतो. ४९०. मग त्या निद्रेच्या भरांत मी सुखी आहें, मी दुःखी आहे, अशा रूपानें घोरत पडतो आणि अहंकार व ममता यांच्या सपाट्यांत सांपडून 'मी व माझे' या शब्दद्वारां मोठ्यानें बरळतो ९१. पहा ! हा माझा बाप, ही माझी आई, मी गोरा, मी काळा, मी व्यंग असलेला, मी पूर्ण अव्यंग आहे, हा मुलगा ही संपत्ति व ही स्त्री हीं माझी नव्हेत काय ? ९२. याप्रमाणें स्वप्नाच्या आधारानें स्वर्गरूपी व संसाररूपी या रानांत धांवत आहे, असें दिसणारे जें चैतन्य, त्या चैतन्याला अर्जुना, 'क्षर' पुरुष असें नाव आहे ९३. त्याचा स्पष्ट अर्थ असा कीं, आतां ज्याला 'क्षेत्रज्ञ' असें म्हटलें आहे व त्यालाच ज्या दशेंत सर्व जग 'जीव' असें म्हणतें ९४. आणि जो आत्मस्वरूपाच्या विस्मृतीमुळें सर्व भूतांप्रमाणें संचार, व्यवहार करितो, त्याच जीवात्म्याला 'क्षर' पुरुष असें म्हणतात ९५. कारण तो वस्तुतः स्वस्वरूपानें परिपूर्ण आहे म्हणून त्याला 'पुरुष'पणा आला व पुरुष हें नांव प्राप्त झालें. शिवाय तो देहरूपी पुरांत, नगरींत वास वा शयन करितो म्हणूनहि त्याला 'पुरुष' असे नांव आहे ९६. आणि वस्तुतः उपाधीशीं तादात्म्यसंबंध मानून राहिला आहे म्हणून त्याच्यावर 'क्षर'पणाचा खोटा, नसतांच आळ आला आहे इतकेच ९७. ज्याप्रमाणें खळखळ वाहणाऱ्या, हालणाऱ्या पाण्यांबरोबर त्यांतील चंद्राचे प्रतिबिंबहि हालते असे वाटते, त्याप्रमाणें क्षर पुरुष उपाधिकृत विकारांमुळें आत्माच उपाधि–धर्मयुक्त [ क्षरणारा आहे असा भ्रांतीनें ] भासतो ९८. नंतर तेच खळखळ वाहणारे पाणी आटून नाहींसें झाल्यावर त्या बरोबरच त्यांत दिसणारे चंद्रप्रतिबिंबहि नाहींसें होते त्याप्रमाणें उपाधींचा नाश झाल्यावर क्षर चैतन्य [ उपाधीने युक्त म्ह. उपहित चैतन्यहि ] दिसेनासे होतें ९९. याप्रमाणें उपाधींच्या योगानें या चैतन्यास क्षणिकत्व प्राप्त होते आणि असा उपाधिविशिष्टत्वानें, उपाधींच्या नाशवंतपणामुळेंच त्याला 'क्षर' असें नांव फक्त आलें आहे ५००. अशा प्रकारें सर्व जीवचैतन्य हें 'क्षर' पुरुष आहे असें जाणावें आतां अक्षर पुरुषाची लक्षणें कोणतीं तें उत्तम प्रकारें स्पष्ट करून सांगतों:—[ येथून अक्षरपुरुषाचें वर्णन करण्याकरितां ज्ञानावांचून नाश न पावणारी जी माया किंवा अज्ञान, त्यालाच अक्षर असें म्हणतात. अर्थात् त्या उपाधींशीं युक्त जो परमात्मा त्याला 'अक्षर पुरुष' असें म्हटलें आहे. येथून अगोदर त्या उपाधींचें म्ह. अज्ञानाचें वर्णन करतात, हें लक्षांत ठेवावें ] १. तर अर्जुना ! दुसरा जो 'अक्षर पुरुष' आहे तो मध्यस्थ आहे, असें समज. मध्यस्थ म्हणजे काय ? तर ज्याप्रमाणें सर्व पर्वतांत मेरु पर्वत मध्यस्थ आहे, त्याप्रमाणें अधिष्ठान दृङ्मात्र परमात्मा व मायाकार्य प्रपंच यांच्यामध्यें अक्षर पुरुषाची उपाधी जें अज्ञान, तें मध्यें आहे. म्हणून तद्विशिष्ट चैतन्यास अक्षर पुरुषाला 'मध्यस्थ' म्हटलें आहे २. कारण, तो मेरुपर्वत, पृथ्वी, पाताळ व स्वर्ग या तिन्हीं लोकामुळें तीन ठिकाणीं वाटला जात नाहीं. त्याप्रमाणें जो अज्ञानरूप उपाधि, ज्ञान, किंवा अज्ञानकार्य या दोहोंशीं तादात्म्य पावत नाहीं ३. या स्थितींत जीवाला यथार्थ ज्ञानानें ब्रह्माशीं ऐक्य होत नाहीं किंवा विपरीत ज्ञानानें द्वैत व्यवहारहि होत नाहीं या दोन स्थितींमधील जी केवळ निद्रासम अज्ञान स्थिति तेंच अक्षर उपाधीयुक्त पुरुषाचे स्वरूप होय ४. जसे माती भिजवून तिचा गोळा केला म्हणजे मग तिचे भांडे घडण्याचे पूर्वींचा तिचा धूळपणा तर पूर्णतया गेलेला असतो व तिला मडक्याचाहि आकार प्राप्त झालेला नसतो, त्या मध्य स्थितींतल्या चिखलाच्या गोळ्याप्रमाणें या अक्षर पुरुषाची मधली स्थिति आहे ५. समुद्र

१ वृक्षाकार रूपकानें. २ नगर. ३ विहिरींत. ४ पाण्यामध्यें आकाश आहेच आहे. ५ शय्या. ६ निजणें. ७ बरळे.

तरंगु ना नीरु । तया ऐशी अनाकारु । जे दशा गा ॥ ६ ॥ पार्था जागणें तरी बुडे । परी स्वप्नाचें कांहीं न मांडे । तैसिये निद्रे सांगडें । न्याहाळणें जें ॥ ७ ॥ विश्व आघवेंचि मावळे । आणि आत्मबोधु तरी नुजळे । तिये अज्ञानदशे केवळे । अक्षरु नाम ॥ ८ ॥ सर्वां कळीं सांडिलें जैसें । चंद्रपण उरे अंवसे । रूप जाणावें तैसें । अक्षरावें ॥ ९ ॥ पैं सर्वोपाधिविनाशें । हे जीवदशा जेथ पैसे । फळपाकांत जैसें । झाड बीजीं ॥ ५१० ॥ तैसें उपाधी उपहित । थोकोनि ठाके जेथ । तयातें अव्यक्त । बोलती गा ॥ ११ ॥ घन अज्ञान सुषुप्ती । तो बीजभावो म्हणती । येर स्वप्न हन जागृती । फळभावो तयाचा ॥ १२ ॥ जयासी कां बीजभावो । वेदान्तीं केला ऐसा आवो । तो तया पुरुषा ठावो । अक्षराचा ॥ १३ ॥ जेथूनि अन्यथा-ज्ञान । फांकोनि जागृति स्वप्न । नानाबुद्धीचें रान । रिगालें असे ॥ १४ ॥ जीवत्व जेथुनी किरीटी । विश्व उठतचि उठी । ते उभय भेदांची मिठी । अक्षरु पुरुषु ॥ १५ ॥ येरु क्षर पुरुषु कां जनीं । जिहीं खेळे जागृतीं स्वप्नीं । तिया अवस्था जो दोन्ही । वियाला गा ॥ १६ ॥ पैं अज्ञानघनसुषुप्ती । ऐसैसी जे कां ख्याती । या उणी एकी प्राप्ती । ब्रह्माची जे ॥ १७ ॥ साचचि पुढती वीरा । जरी न येतां स्वप्न जागरा । तरी ब्रह्मभावो साचोकारा । म्हणों येता ॥ १८ ॥ परी प्रकृतिपुरुषें दोनी । अभ्रें जालीं जियें गगनीं । क्षेत्रक्षेत्रज्ञु स्वप्नीं । देखिला जियें ॥ १९ ॥ हें असो अधोशाखा । या संसाररूपा रुखा । मूळ तें रूप पुरुषा । अक्षरावें ॥ ५२० ॥ हा पुरुष कां म्हणिजे । जे पूर्णपणेंचि निजें । पैं मायापुरीं पहुडिजे । तेणेंहि बोलें ॥ २१ ॥ आणि विकारांची जे वारी । ते विपरीत ज्ञानाची परी । नेणिजे जिये माझारीं । ते सुषुप्ती गा हा ॥ २२ ॥ म्हणौनि यया आपैसें । क्षरणें या नसे । आणिकेंही हा न नाशे । ज्ञानाउणें ॥ २३ ॥ यालागीं हा अक्षरु । ऐसा वेदान्तीं डगरु । केला देशी थोरु । सिद्धांताच्या ॥ २४ ॥ ऐसें जीवकार्य कारण । जया मायासंगुचि लक्षण । अक्षर पुरुषु जाण । चैतन्य तें ॥ २५ ॥

उत्तम पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः । यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥

आतां अन्यथाज्ञानीं । या दोनी अवस्था जया जनीं । तया हरपती घनीं । अज्ञानतत्त्वीं ॥ २६ ॥ तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया । ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया । जैसा

आटल्यावर मग त्यांत लाटाहि नसतात किंवा पाणीहि नसतें, त्याप्रमाणें ती आकाररहित स्थिति आहे ६. पार्था! जागृतावस्था ही तर पार नाहींशी होते; पण स्वप्नावस्था ही अजून आलेली नसते. अशी जी गाढ निद्रावस्था त्याप्रमाणें [ अक्षर पुरुषाच्या ] त्या अज्ञान उपाधींचे स्वरूप आहे ७. तसेंच अखिल जगाचा भास नाहींसा होतो व यथार्थ आत्मबोधहि अभिव्यक्त होत नाहीं. दोहोंमधील जी केवळ अज्ञानदशा तिलाच 'अक्षर' असें नांव आहे ८. अमावास्येच्या दिवशीं सर्व कलांनीं रहित असें चंद्राचें मूळ स्वरूप जसें असतें, त्याप्रमाणें शुद्ध यथार्थ ज्ञान व विपरीत ज्ञान याविरहित केवळ अज्ञान असें अक्षर-उपाधीचें स्वरूप आहे, असें समज ९. अरे हे पहा! सर्व क्षर उपाधींचा नाश झाल्यावर ज्या अज्ञानांत जीवदशा, जीवत्व लीन रूपानें राहते, ज्याप्रमाणें परिपक्व फळ आल्यावर झाड जसें त्या बीजांत सूक्ष्म रूपानें राहात असतें ५१०. त्याप्रमाणें क्षरपुरुषाचीं कार्यात्मक उपाधि व उपहित म्ह० त्या उपाधीचा स्वीकार करणारा क्षर पुरुष जेथें सूक्ष्म संस्काररूपानें लीन होऊन राहतो त्या स्थानाला 'अव्यक्त' असें म्हणतात ११. पूर्ण दृढ अज्ञानरूप जी निद्रावस्था असतें तिला 'बीजभाव' [ कारणाध्यास ] असें म्हणतात. व त्याहून भिन्न इतर स्वप्नावस्थेस वा जागृतावस्थेस मात्र त्याचाच 'फळभाव' [ म्ह. 'कार्याध्यास' ] असें म्हणतात १२. वेदांतशास्त्रांत ज्या [ कारणाध्यासरूप अव्यक्त ] स्थितीलाच 'बीजभाव' असें म्हणतात. तीच स्थिति म्ह. या 'अक्षर पुरुषाचे' राहण्याचें स्थान होय १३. आणखी जेथून [ ज्या अव्यक्तापासून ] विपरीत ज्ञान हें उत्पन्न होऊन जागृति व स्वप्न या अवस्थांच्या रूपांनीं फांकतें आणि तें ज्ञान अनेक बुद्धितरंगरूपी रानांत प्रवेश करीत असतें १४. अर्जुना! जीवत्व हे जेथून उत्पन्न होते, तसेंच अनंत विश्वें जेथून उत्पन्न होतात आणि त्या जीवत्वाची व विश्वाची प्रलयकालीं जेथें लय होऊन साम्यावस्था होते त्या उपाधीनें युक्त म्हणजे अज्ञानोपहित असणाऱ्या चैतन्याला 'अक्षर पुरुष' म्हणतात १५. दुसरा 'क्षर पुरुष' आहे. तो जगामध्यें जागृत-स्वप्नावस्थेच्या रूपानें खेळतो, त्या जागृत, स्वप्न या दोन अवस्थांस जो [ अक्षर पुरुष ] प्रसवला आहे १६. किंवा जी अवस्था पूर्ण अज्ञानानें भरलेली आहे ती 'अज्ञानघन सुषुप्त्यवस्था' अशा नांवानें प्रसिद्ध आहे. व जिला ब्रह्मस्थिति म्हणण्याला पुढील एकच उणेपणा आहे १७. वीरा अर्जुना! खरोखरच या निद्रावस्थेपासून जर हा [ अक्षर पुरुष वा जीव ] पुनः स्वप्न किंवा जागृति या अवस्थेला येताच ना, तर त्यां सुषुप्तीलाच आम्हास 'ब्रह्मभाव'-ब्रह्मस्थिति असेंच म्हणतां आलें असते १८. पण या घन अज्ञान निद्रारूपी आकाशांत प्रकृति-पुरुषरूपी ढग आले आहेत व क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ असे जिच्या स्वप्नांतील पदार्थ दिसतात; [ म्हणून तिला ब्रह्मभाव म्हणतां येत नाहीं ] १९. हें असो, खालच्या बाजूला विस्तार पावणाऱ्या संसाररूपी वृक्षाचें जें मूळ म्हणजे अज्ञान, होय व त्याच उपाधीनें युक्त ते या 'अक्षर पुरुषा'चें स्वरूप होय ५२०. आतां याला पुरुष कां म्हणावयाचें? तर हा आपल्या रूपानें सदोदित-नित्य परिपूर्णच असल्यामुळें किंवा मायापुरींत-मायारूपी नगरींत शयन करतो म्हणून याला 'पुरुष' म्हणतात २१. आणि ज्या गाढ निद्रेंत, विकारांची येरझाररूपी जो विपरीत ज्ञानाचा प्रकार तो भासत नसतो त्याच उपाधीनें युक्त जें चैतन्य तें या 'अक्षर पुरुषा'चे रूप होय २२. म्हणून ती अज्ञानरूप उपाधी स्वभावतःच गळत-नाश होत नाहीं आणि त्याचा ज्ञानावांचून दुसऱ्या कशानेंहि नाश [ बाध ] होत नाहीं २३. म्हणूनच वेदान्तशास्त्राच्या सिद्धांतांत याची "हा 'अक्षर' आहे" अशीं मोठी प्रसिद्धि केली आहे २४. याप्रमाणें जें चैतन्य जीवरूपी कार्याचें कारण आहे आणि असा हा व्यवहार होण्यास परमात्म्याशीं मायोपाधीचा [ अध्यासिक ] संबंध असणें हेंच ज्याचे स्वरूप आहे, म्हणून त्या मायोपाधीचा संबंध असलेल्या चैतन्यालाच 'अक्षर पुरुष' म्हणतात, असें समज २५.

**अन्वयार्थ**—**तु**-परंतु-**उत्तमः पुरुषः**-उत्तम पुरुष-**अन्यः**-याहून निराळा आहे-**परमात्मा**-देहादि मिथ्या आत्म्यांहून श्रेष्ठ असलेला सर्व भूतांचा आत्मा-पृथक् चेतन-परमात्मा-**इति उदाहृतः**-असें वेदांतांत म्हटलेला आहे. वेदांतांत याला परमात्मा असें म्हटलें आहे-**यः**-**अव्ययः ईश्वरः**-जो अव्यय ईश्वर-**लोकत्रयम् आविश्य**-तीन लोकांत प्रवेश करून-**बिभर्ति**-त्याला धारण करितो १७.

आतां अन्यथा-विपरीत ज्ञानात्मक अशा या लोकामध्यें उत्पन्न होणाऱ्या ज्या जागृति व स्वप्न अवस्था आहेत, त्या पुनः ज्या गाढ अज्ञानतत्त्वांत लय पावतात २६. तें अज्ञान

१. आकाररहित. २ सारखे. ३ प्रवेशे. ४ फळाचा नाश होऊन तें पाकस्थितींत रहातें. ५ उपाधींत सांपडलेले सूक्ष्म.

वन्हि काष्ठ जाळूनियां । स्वयें जळे ॥ २७ ॥ तैसें अज्ञान ज्ञानें नेलें । आपण वस्तु देऊनि गेलें । ऐसें जाणणेंनिवीण उरलें । जाणतें जें ॥ २८ ॥ तें तो गा उत्तम पुरुषु । जो तृतीय कां निष्कर्षु । दोहींहून आणिकु । मोगिला जो ॥ २९ ॥ सुषुप्तीं आणि स्वप्ना- । पासूनि बहुवें अर्जुना । जागणें जैसें आना । बोधाचेंचि ॥५३०॥ कां रश्मी हन मृगजळा- । पासूनि अर्कमंडळा । अफाटु तेवीं वेगळा । उत्तमु गा ॥ ३१ ॥ हें ना काष्ठींचा काष्ठाहुनी । अनारिसा जैसा वन्ही । तैसा क्षराक्षरापासुनी । आनचि तो ॥ ३२ ॥ पैं ग्रासूनि आपली मर्यादा । एक करीत नदीनदां । उठी कल्पांतीं उदांवादा । एकार्णवाचा ॥ ३३ ॥ तैसें स्वप्न ना सुषुप्ती । ना जागराची गोठी आथी । जैसी गिळिली दिवोराती । प्रळयतेजें ॥ ३४ ॥ मग एकपण ना दुजें । असे नाहीं हें नेणिजे । अनुभवु निर्बुजे । बुडाला जेथें ॥३५॥ ऐसें आथि जें कांहीं । तें तो उत्तम पुरुषु पाहीं । जें परमात्मा इहीं । बोलिजे नामीं ॥ ३६ ॥ तेंही एथ नं मिसळतां । बोलणें जीवत्वें पंडुसुता । जैसी बुडणेयाची वार्ता । थेंडियेचा कीजे ॥ ३७ ॥ तैसें विवेकाचिये कांठीं । उभें ठाकलिया किरीटी । परावरांचिया गोठी । करणें वेदां ॥ ३८ ॥ म्हणौनि पुरुषु क्षराक्षरु । दोन्ही देखोनि अंवरु । यातें म्हणती पैरु । आत्मरूप ॥ ३९ ॥ अर्जुना ऐसिया परी । परमात्मा शब्दवरी । सूचिजे गा अवधारीं । पुरुषोत्तमु ॥ ५४० ॥ एऱ्हवीं न बोलणेंचि बोलणें । जेथिंचें सर्व नेणिवा जाणणें । कांहींच न होनि होणें । जे वस्तु गा ॥ ४१ ॥ सोऽहं तेंही अस्तंवलें । जेथ सांगतेंचि सांगणें जालें । द्रष्टृत्वेंसी गेलें । दृश्य जेथ ॥ ४२ ॥ आतां बिंबा आणि प्रतिबिंबा- । माजीं कैंची हें म्हणों नये प्रभा ? । जऱ्ही कैसेनि हे लाभा । जायेचि ना ॥ ४३ ॥ कां घ्राणा फुला दोहीं । दुंती असे जे माझारिलां ठायीं । ते न दिसे तरी नाहीं । ऐसें बोलों नये ॥ ४४ ॥ तैसें द्रष्टा दृश्य हें जाये । मग कोण म्हणे काय आहे । हेंचि अनुभवें तेंचि पाहें । रूप तया ॥ ४५ ॥ जो प्रकाश्येंवीण प्रकाशु । जो ईशितेंव्येंवीण ईशु । आपणेंनीचि अवकाशु । वसवीत असे जो ॥ ४६ ॥ जो नादें ऐकिजता नादु । स्वादें चाखिजता स्वादु । जो भोगिजतसे आनंदु । आनंदेंचि ॥ ४७ ॥ जो पूर्णतेचा परिणामु । पुरुषु गा पुरुषोत्तमु । विश्रांती-

ज्ञानांत बुडून नाहींसें झाल्यावर व कीर्ति मुखाप्रमाणें [ निवर्त्य अज्ञान नसल्यामुळें “ अहं ब्रह्मास्मि ” हे वृत्तिरूप ] ज्ञानहि नाहींसें झाल्यावर, ज्याप्रमाणें अग्नि लांकडांस जाळून मागाहून नाहींसा होतो २७. त्याप्रमाणें [ अहं ब्रह्मास्मित्याकारक वृत्तिज्ञानानें] अज्ञान नाहींसें केलें आणि ब्रह्मस्वरूपाची आत्मत्वानें प्राप्ति करून देऊन तें आपणहि नष्ट झालें. मग असें जें जाणणें-पणाशिवाय [ आश्रय–विषयरहित ] केवळ ज्ञानमात्र उरते २८. तेंच अर्जुना ! तो ‘ उत्तम पुरुष ’ होय कीं, जो शेवटचा तिसरा म्हणून सांगितला आणि जो मागें सांगितलेल्या क्षरांक्षररूप दोघांहून निराळा, तोच शुद्ध पर-मात्मा-उत्तम पुरुष होय २९. अर्जुना! सुषुप्ति आणि स्वप्न यांपेक्षां जागृतावस्था ही जशी बहुपटीनें निराळ्या बोधा-चीच असते ५३०. किंवा सूर्यकिरण आणि मृगजळ याहून जसें सूर्यमंडल अगदींच वेगळें आहे तसा हा उत्तम पुरुष त्या दोघांहून–क्षराक्षरांहून अगदींच वेगळा आहे ३१. इतकेंच नव्हे तर, लांकडांत असलेला सामान्य रूपाचा अग्नि जसा लांकडाहून वेगळाच असतो तसा क्षर व अक्षरांत समव्याप्त असूनहि त्यांहून तो [उत्तम पुरुष ] वेगळाच असतो ३२. कल्पांतसमयीं ज्याप्रमाणें समुद्राचे पूर्णत्व, समुद्राची मर्यादा नाहींशी करून सर्वत्र एक समुद्रच म्हणजे जलमय झालें असतां नदी व नद या सर्वांस एकत्र करीत प्रगट होत असते ३३. त्याप्रमाणें स्वप्न, गाढ झोंप किंवा जागृति यांची जेथें वार्ता [प्रतीति] उरत नाहीं; कशी उरत नाहीं ! तर प्रलयकालच्या तेजानें रात्र व दिवस हीं गिळून टाकावी, त्याप्रमाणें समज ३४. मग जेथें एकपण नाहीं व तत्सापेक्ष दुजे–द्वैत हाहि भाव सहात नाहीं; ‘ असणें ’ व ‘ नसणें ’ हेंहि सापेक्ष भाव उरत नाहींत आणि जेथें अनुभव दिपून, घाबरा होऊन जेथें नाहींसा होतो ३५. असें जें कांहीं तत्त्व आहे, ते म्हणजेच तो उत्तम पुरुष आहे, असें समज व त्यालाच ‘परमात्मा’ असेंहि म्हणतात ३६. पण अर्जुना ! हें बोलणेंहि उत्तम पुरुषाच्या ठिकाणीं पूर्णतया ऐक्यास न मिळतां, त्यापूर्वी जीवदशा पत्करूनच होय. ज्याप्रमाणें नदीच्या कांठावरच उभें असलेल्या मनुष्यानें बुडाल्याची वार्ता सांगावी, [ त्या बुडणाऱ्याबरोबरच जो बुडाला तो काय सांगणार ! ] ३७. त्याप्रमाणें अर्जुना ! विचाररूपी कांठावर जोपर्यंत वेद उभे आहेत, तोपर्यंत अलीकडच्या कांठावरील [ क्षराक्षराविषयींच्या ] किंवा पलीकडच्य कांठावरील उत्तम [ पुरुषाविषयींच्या ] गोष्टी बोलण्यास ते समर्थ झाले ३८. म्हणून ‘ क्षर ’ ‘ व अक्षर ’ पुरुष हे दोन्हीं अलीकडचे [ सोपाधिक ] आहेत, असें पाहून या आत्मस्वरूप उत्तम पुरुषाला पर पुरुष असें म्हणतात ३९. अशा प्रकारें, अर्जुना ! ‘ परमात्मा ’ या शब्दानें त्या ‘ पुरुषोत्तमाला ’ ओळखावे, असें सूचित होत अस-ल्याचे तूं समज ५४०. सहज विचार करून पाहिलें तर, ज्या ठिकाणीं शब्द मावळतो, म्हणून न बोलण्यानें ज्याची स्तुति होते, कांहीं न जाणणें [ सर्व प्रमाण अविषय आहे असें जाणणें ] हेंच ज्याचें खरें जाणणें आहे, इतर कांहींहि [ सापेक्षरूप सामान्य विशेष ] न होऊनच ज्या वस्तूचे [ स्वरूप ] होणें आहे [ असा नित्यसिद्ध, दृङ्मात्र, उत्तम पुरुष आहे ] ४१. ‘अहं ब्रह्म’ हाहि बोध जेथें मावळून जातो, तेथें सांगणाराच जें सांगावयाचें त्याच्याशीं एकरूप होतो म्हणजे द्रष्ट्यासह दृश्य नाहींसें होते, [ असें झाले तरी परमात्मा नाहीं म्हणण्याची सोय नाहीं ] ४२. आतां बिंब व त्याचें पाण्यांत पडलेलें प्रतिबिंब यांच्या दरम्यानमध्यें असणारी जी सामान्य प्रभा ती जरी आपल्यास कोणत्याहि उपायानें दिसली नाहीं, तरी त्यांच्यामध्यें ती प्रभाच नाहीं, असें म्हणतां येत नाहीं ४३. किंवा नाक व फूल या दोहींमध्यें जें अंतर असते त्यांत फुलांचा सुगंध असतोच, तो जरी आपल्यास डोळ्यांनी दिसला नाहीं तरीहि तो नाहीं असें म्हणतां येत नाहीं ! ४४. त्याप्रमाणें द्रष्टा व दृश्य हा भाव नष्ट झाल्यावर अमुक वस्तु आहे असें शब्दानें कोण म्हणेल ! पण हेंच अनुभवानें एकमेव दृङ्मात्र चैतन्य आहेच, असा निश्चय करणें तेंच त्या उत्तम पुरुषाचें रूप होय ४५. जो प्रकाशित होणाऱ्या प्रकाश्य वस्तुशिवाय प्रकाशरूप आहे व जो नियम्य पदार्थाशिवाय नियामक आहे आणि जो सर्वत्र ओतप्रोत भरून स्वमाहिमेंतच, आपल्या स्वरूपांतच आपण असतो ४६. जो नादब्रह्माला ऐकण्याची शक्ति प्रदान करणारा नाद, स्वादाला स्वादाची शक्ति देणारा मूळ स्वाद व जो आनंद आनंदानें भोगावा. [ आनंदरूप व्हावे ] ४७. जो पूर्णत्वाचा शेवट आहे व जो सर्व पुरुषांमध्यें श्रेष्ठ पुरुष आहे व

१ शेवट. २ मागें सांगितलेल्या दोहींहून पूर्वीचा. ३ अधिक, ४ किरण. ५ अगदींच. ६ वेगळा. ७ पूर्णत्व. ८ आहे किंवा नाहीं हेंहि समजत नाहीं. ९ घाबरतो. १० मिळालें नसतां. ११ किनाऱ्यावरच्यानें. १२ पलीकडच्या किंवा अलीकडच्या. १३ अलीकडचें. १४ पलीकडचा. १५ ओळखावा. १६ अस्तास गेलें. १७ अनुभवास येत नाहीं, मिळत नाहीं. १८ दिसत नाहीं. १९ नाकाला. २० सुगंध. २१ प्रकाशक. २२ नियमन करणारा. २३ ईश्वर.

चाही विश्रामु । विराला जेथें ॥ ४८ ॥ सुखासि सुख जोडिलें । जें तेज तेजासि सांपडलें । शून्यही बुडालें । महाशून्यीं जिये ॥ ४९ ॥ जो विकासाहीवरी उरता । ग्रासातेंही ग्रासूनि पुरता । जो बहुतें पाडें बहुतां- । पासूनि बहु ॥ ५५० ॥ पैं नेणतयाप्रती । रुपेपणाची प्रतीती । रुपें न होनि शुक्ती । दावी जेवीं ॥ ५१ ॥ कां नाना अलंकारदशे । सोनें न लपत लपालें असे । विश्व न होनियां तैसें । विश्व जो धरी ॥ ५२ ॥ हें असो जलतरंगा । नाहीं सिनानेंपण जेवीं गा । तेवीं दिसता प्रकाशु जगा । आपणचि जो ॥ ५३ ॥ आपलिया संकोचविकाशो । आपणचि रूप वीरेशा । हा जळीं चंद्र हन जैसा । समग्र गा ॥ ५४ ॥ तैसा विश्वपणें कांहीं होये । विश्वलोपीं कहीं न जाये । जैसा रात्रीं दिवसें नोहे । द्विधा रवि ॥ ५५ ॥ तैसा कांहींचि कोणीकडे । कायिसेनिहि वेंचीं न पडे । जयाचें सांगडें । जयासीचि ॥ ५६ ॥

यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः । अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥

जो आपणपेंचि आपणया । प्रकाशीतसे धनंजया । काय बहु बोलों जया । नाहीं दुजें ॥ ५७ ॥ तो गा मी निरुपाधिकु । क्षराक्षरोत्तमु एकु । म्हणौनि म्हणे वेद लोकुं । पुरुषोत्तमु ॥ ५८ ॥

यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् । स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥

परी हें असो ऐसिया । मज पुरुषोत्तमातें धनंजया । जाणे जो पाहलेया । ज्ञानमित्रें ॥ ५९ ॥ चेइलियां आपुलें ज्ञान । जैसें नाहींचि होय स्वप्न । तैसें स्फुरतें त्रिभुवन । वावो जालें ॥ ५६० ॥ कां हातीं घेतलिया माळा । फिटे सर्पाभासाचा कांटोळा । तैसा माझेनि बोधें टवाळें । नागवे तो ॥ ६१ ॥ लेणें सोनेंचि जो जाणें । तो लेणेंपण तें वावो म्हणे । तेवीं मी जाणोनि जेणें । वाळिला भेदु ॥ ६२ ॥ मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वतःसिद्धु । जो आपणेनसीं भेदु । नेणोनियां जाणे ॥ ६३ ॥ तेणेंचि सर्व जाणितलें । हेंही म्हणणें थेंकुलें । जे तया सर्व उरलें । द्वैत नाहीं ॥ ६४ ॥ म्हणौनि माझिया भजना । उचितु तोचि अर्जुना । गगन जैसें आलिंगना । गगनाचिया ॥ ६५ ॥ क्षीरसागरा परगुणें । कीजे क्षीरसागरचिपणें । अमृतचि होऊनि मिळणें । अमृतीं जेवीं ॥ ६६ ॥ साडेपंधरा मिसळावें । तैं

विश्रांतीच्याहि विसांव्याचे स्थान आहे ४८. जे सुखास प्राप्त झालेले सुखच आहे. जे तेजास प्राप्त झालेलें तेज आहे व [ आकाशादि ] शून्यहि ज्या महाशून्यांत [अत्यंत-निर्विशेष ब्रह्मस्वरूपांत ] लय पावले ४९. जो जगाचा उदय व असीम विस्तार झाल्यावरहि त्यास व्यापून उर्वरित राहात असतो व ग्रासालाहि-ग्रासून लयातीत असून परिपूर्ण असतो, फार काय सांगावें !! वस्तुतः सर्वांहून फारच दूर [ असंग, व्यापक ] आहे ५५०. ज्याप्रमाणें शिंपी ही आपण स्वतः रुपें न होऊन-अज्ञान्याला दिसणाऱ्या रुप्याच्या भासास आश्रय असते ५१. किंवा अलंकाराच्या रूपानें सोनें नाहींसे न होतां अज्ञान्याला झांकलेले असेच असते त्याप्रमाणें उत्तम पुरुष आपण स्वतः विश्व न होतां जो विश्वाला धारण करतो [आधार व अधिष्ठान असतो] ५२. हे असो; पाणी व लाटा यांत कांहीं वेगळापणा आहे कां ? त्याप्रमाणें जग हें [अन्वय-दृष्टीनें ] परमात्मस्वरूपाहून वेगळें नाहीं [ कारण, स्वतः सत्ता-स्फूर्ति शून्य जग ज्या अधिष्ठान उत्तम पुरुषाच्या सत्तेनें सत्तावान् होते व ज्याच्या स्फूर्तीनें प्रकाशित होते ते जग अध्यस्त असून तत्त्वतः अधिष्ठान परमात्मरूपच आहे] ५३.अरे वीरेशा ! जगाच्या संकोचाला व विकासाला जो उत्तम पुरुष आश्रयत्वानें कारण आहे, ज्याप्रमाणें पाण्यांत दिसणाऱ्या प्रतिबिंबास सर्वथैव चंद्रच कारण असतो, ५४. त्याप्रमाणें जगाची उत्पत्ति झाली असतां ज्याच्यांत यत्किंचितहि फरक होत नाहीं, जो कांहींच विशेष होत नाहीं व विश्वाचा लय झाला असतां जो कोठेंहि जात नाहीं, ज्याप्रमाणें रात्र व दिवस हीं आलीं असतां सूर्य हा दोन प्रकारचा होत नाहीं ५५. तसा तो [ उत्तम पुरुष ] कधींहि, कोणीकडेहि, कोणाच्या-नेहि खर्ची-कमी पडत नाहीं आणि ज्यांस उपमा-देण्याला तो स्वतःच योग्य आहे. [ कारण वस्तुतः दुसरा पारमार्थिक सत्य पदार्थच नाहीं ] ५६.

**अन्वयार्थ—यस्मात्**-ज्या अर्थी-**अहं क्षरम् अतीतः** मी क्षरसंज्ञक पुरुषाहून निराळा आहे-**अक्षरात् अपि च** आणि अक्षरसंज्ञक पुरुषाहूनहि-**उत्तमः**- उत्तम आहे-**अतः**-त्या अर्थी-[ **अहं** ] **लोके च वेदे**-लोकांत व वेदांत मी-**पुरुषोत्तमः**—पुरुषोत्तम म्हणून-**प्रथितः अस्मि**-प्रसिद्ध आहे १८.

अरे ! धनंजया ! आपणच आपल्याला प्रकाशितो म्ह० जो [ स्वयंप्रकाश आहे ]. फार काय सांगावें !! ज्याला दुसरें नाहीं म्ह. द्वैतसंबंध असा मुळींच नाहीं ५७. तें माझें निरुपाधिक स्वरूप होय. आणि क्षर व अक्षर या दोन पुरुषाहून मी पलीकडचा-श्रेष्ठ आहे. म्हणून मला वेद आणि सर्व लोक हे ' पुरुषोत्तम ' असें म्हणतात ५८.

**अन्वयार्थ—भारत**-हे अर्जुना ! **यः असंमूढः**-जो संमोहरहित असलेला पुरुष-**एवं**-वर सांगितल्याप्रमाणें **पुरुषोत्तमं मां**-पुरुषोत्तम अशा मला-**जानाति**-जाणतो-**सः**-तो-**सर्वविद्**-सर्वज्ञ-**मां सर्वभावेन**-मला सर्व भावानें-सर्वत्र माझा भाव ठेवून-**भजति**-भजतो १९.

पण हें असो. अर्जुना ! अशा त्या मला पुरुषोत्तमाला तोच पुरुष जाणतो कीं, ज्याच्या अंतःकरणांत परमा-त्मैक्य ज्ञानरूपी सूर्याचा उदय झाला आहे ५९. जसें जागृत आल्यावर आपल्यास स्वप्न भासतच नाहीं. तसें आत्मज्ञानाचा उदय झाल्यावर त्या ज्ञानानें सर्व भासणारे त्रिभुवन बाधित होऊन जाते ५६०. किंवा माळ हातीं घेतली म्हणजे तिचें प्रत्यक्ष-ज्ञानानें तिच्यावर झालेल्या सर्प भ्रमाचा वा भयाचा भास नाहींसा होतो. त्याप्रमाणें माझें आत्मत्वाने प्रत्यक्ष स्वरूपज्ञान झाल्यानें जगाचा मिथ्या भास नाहींसा होतो म्ह० बाधित होतो, [ मिथ्या भासानें तो फसत नाहीं ] ६१. जो सोन्याच्या अलंकाराला सोन्याच्या दृष्टीनें पहातो, तो त्याचें अलंकारत्व [ नामरूप ] मिथ्या-प्रतीतिमात्र मानतो, त्याप्रमाणें ज्याला माझें ज्ञान प्राप्त होतें, त्याला ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही भेदरूप त्रिपुटी नाहींशी-बाधित होते ६२. मग त्या बोधानेंच तो म्हणतो ' मीच ' एक स्वतःसिद्ध सच्चिदानंद सर्वत्र ओतप्रोत व्याप्त आहें' अशा व्यापक अद्वैतदृष्टीनें आपला सुद्धां भेद न ठेवतां जो मला जाणतो ६३. त्यानेंच सर्व जाणलें, हें म्हणणें देखील थोडकेच. कारण त्याला सर्वत्र ब्रह्ममात्रात्मक अनुभूति लाभल्यामुळें सर्व शब्दवाच्य० द्वैत असें उरलेंच नाहीं ६४. म्हणून अर्जुना ! तोच माझें भजन करण्यास योग्य अधिकारी होय. [ येथें अभेद निश्चयाचें नांव भजन असें आहे ] ज्याप्रमाणे आकाशास आलिंगन देण्यास आकाशच योग्य होय ६५. क्षीरसागराला ज्याप्रमाणें क्षीरसागरपणानेंच मेजवानी करणें योग्य होय, अथवा ज्याप्रमाणें अमृतरूप होऊनच अमृतांत मिळावे लागतें ६६. उत्तम शुद्ध सोन्यांत पूर्णतया

१ विस्ताराचा. २ उदय. ३ दूर. ४ वेगळेपणा. ५ अस्तास. ६ उदयास. ७ आकार. ८ नाश. ९ तुलना. १० जन. ११ ज्ञानरूपी सूर्याचा उदय झाल्यावर. १२ जागृत झालों असतां. १३ भासते. १४ व्यर्थ, नाहींसें. १५ भय, त्रास. १६ मिथ्याभासाला. १७ सांपडत नाहीं, फसत नाहीं, व्यर्थ. १८ टाकिला. १९ ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान ही त्रिपुटी. २० अल्प.

साडेपंधरेंचि होआवें । तेवीं मी जालिया संभवे । भक्ति माझी ॥ ६७ ॥ हां गा सिंधूसि आनी होती । तरी गंगा कैसेनि मिळती ? । म्हणौनि मी न होतां भक्ती- । अन्वयो आहे ? ॥ ६८ ॥ ऐसियालागीं सर्व प्रकारीं । जैसा कल्लोळु अनन्यु सागरीं । तैसा मातें अवधारीं । भजिन्नला जो ॥ ६९ ॥ सूर्या आणि प्रभे । ऐकवंकी जेणें लोभें । तो पाडु मानूं लाभे । भजना तया ॥ ५७० ॥

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयाऽनघ । एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे पुरुषोत्तम योगोनाम पंचदशोऽध्यायः ॥१५॥

एवं कथिलयादारभ्य । हें जें सर्व शास्त्रैकलभ्य । उपनिषदां सौरभ्य । कमळ-दळां जेवीं ॥ ७१ ॥ हें शब्दब्रह्माचें मथितें । श्रीव्यासप्रज्ञेचेनि हातें । मथूनि काढिलें आयितें । सार आम्हीं ॥ ७२ ॥ जे ज्ञानामृताचि जान्हवी । जे आनंदचंद्रींची सतरावी । विचारक्षीरार्णवींची नवी । लक्ष्मी जे हे ॥ ७३ ॥ म्हणौनि आपुलेनि पदें वर्णें । अर्थाचेनि जीवेंप्राणें । मीवांचोनि हों[11] नेणें । आन कांहीं ॥ ७४ ॥ क्षराक्षरत्वें समोर जालें । तयांचें पुरुषत्व वाळिलें[12] । मग सर्वस्व मज दिधलें । पुरुषोत्तमीं ॥ ७५ ॥ म्हणौनि जगीं गीता । मियां आत्मेनि पतिव्रता । जे हे प्रस्तुत तुवां आतां । आकर्णिली ॥ ७६ ॥ साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र । पैं संसारु जिणतें[13] हें शस्त्र । आत्मा अवतरविते मंत्र । अक्षरें इयें ॥ ७७ ॥ परी तुजपुढां सांगितलें । तें अर्जुना ऐसें जालें । जें गौप्यधन काढिलें । माझें आजि ॥ ७८ ॥ मज चैतन्य-शंभूचा माथां । जो निक्षेपुं होता पार्था । तया गौतमु जालासि आस्था- । निधी[14] तूं गा ॥ ७९ ॥ चोखंटिवा आपुलिया । पुढिला उंगाणा घेयावया । तया दर्पणाचीचि परी धनंजया । केली आम्हां ॥ ५८० ॥ कां भरलें चंद्रतारांगणीं । नभ सिंधू आपणयामाजीं आणी । तैसा गीतेसीं मी अंतःकरणीं । सूंदला तुवां ॥ ८१ ॥ जे त्रिविधमळिकटा । तूं सांडिलासि सुभटा । म्हणौनि गीतेसीं मज वसौटां । जालासि गा ॥ ८२ ॥ परी हें बोलों काय गीता । जे हे माझी उन्मेष-लतां[15] । जाणे तो समस्ता । मोहा मुके ॥ ८३ ॥ सेविली अमृतसरिता । रोगु दवडूनि पंडुसुता । अमरपण उचितां । देऊनि घाली ॥ ८४ ॥ तैसी गीता हे जाणितलिया । काय विस्मयो मोह जावया । परी आत्मज्ञानें आपणपयां ।

समज. या वृक्षास आत्मवेत्ते ' **अश्वत्थ** ' कां म्हणतात ? याविषयीं जो कांहीं निर्णय केला आहे, तो सर्व खुलासा अर्जुनाच्या ठिकाणची श्रवणाची असीम आवड पाहून श्रीकृष्ण करीत आहेत [ २९ ते ७१].

अद्वय, ' सुरतेविण ' विषयभोग निरपेक्ष ' आंगाथिला ' आनंदरूप, आश्रय विषयरहित, ज्ञातृज्ञेयाविरहित नुसते स्वरूपभूत ज्ञान, सूक्ष्मातिसूक्ष्म सुखरूप जें ' ब्रह्म ' तें याला ' उर्ध्व ' आहे. निर्गुण ब्रह्म तत्त्वत: प्रमाण–अगोचर असल्यामुळें तेथें वेदशास्त्रांचीहि प्रवृत्ति संभवत नाहीं; तरीपण मायोपाधीचा दुसरा आध्यासिक संबंध कल्पून त्या उपाधीच्या आश्रयानें नामरूपाचा व्यवहार होतो. कारण, कार्य–कारणोपाधिरहित अत्यंत निर्विशेष ब्रह्माचा आश्रय घेऊन कल्पित माया त्या ब्रह्माचे ठिकाणीं ' उर्ध्वतारूप ', " जगत् कारणत्वरूप " विशेष निर्माण करते. ती माया ' सदसत्–विलक्षण ' आहे. परमार्थत: माया नाहींच, पण तिला वरीलप्रमाणें नसतीच प्रसिद्धी मिळाली. कारण, जगद्रूपी कार्यावरून ती अनुमेय आहे. वास्तविक मायेचें वर्णन करणें म्हणजे वांझेच्या घरभर संततीचें वर्णन करण्यासारखें आहे. ' **माया** ' ही विचाराचे नांवहि सहन करीत नाहीं अर्थात् विचारापुढें ती सिद्धच होत नाहीं म्हणजे ती अबाधित नसल्यामुळें मायेला ' **सत्** ' म्हणतां येत नाहीं; बरे ! ती जगत्कारण असल्यामुळें तिला ' **असत्** ' हि म्हणतां येत नाहीं " **सत् ना असत् होये** " तशी ती कोणापासूनहि उत्पन्न झालेली नसल्यामुळें तिला " **अनादि म्हणती** ". ही संसारवृक्षाची ' **बीज कणिका** " आहे. प्रपंचरूपी चित्राची आधार भूमिका आहे व विपरीत ज्ञानाची प्रज्वलित अशी मशाल आहे. महत्तत्त्व, अहंकार इत्यादि नाना तत्त्वें ठेवण्याची एक संदुकाच आहे. सर्व आकाराची जणुं घडीच करून ठेवली आहे. ही माया परब्रह्मवस्तूच्या ठिकाणीं तत्त्वत: नाहीं, पण तिला व्यावहारिक सत्ता आहे. कारण, कारणाला सत्ता असल्याविना कार्योत्पत्तिच होत नाहीं. आपल्यास झोंप आली असतां ती आपणासच मोहित करते किंवा दिव्याच्या आश्रयानें असणारी काजळी त्या दिव्याच्या प्रकाशज्योतीसच मंदत्व आणते. किंवा स्वप्नांत आपल्या प्रियापुढें निजलेली तरुण स्त्री स्वप्नांतच प्रियकरास चट्‌कन् जागे करून वास्तविक आलिंगन न देतांच सकाम करते. तशीच परब्रह्माच्या आश्रित असणारी माया परब्रह्माशीं अभिन्न राहून आनंद–अद्वय स्वरूपास आवृत करते व त्यास जगद्रूपानें, इंद्रियगोचर अशा नामरूपात्मक व्यक्तदशेला आणते. अशी ती ' **आवरण विक्षेपशक्तिमती** ' माया, या संसारवृक्षाचें पहिलें मूळ आहे. तीस वेदान्त शास्त्रांत " **बीजभाव**" म्ह० " **कारणाध्यास** " म्हणतात व त्या मायेपासून उत्पन्न होणाऱ्या महत्तत्त्व, अहंकार, बुद्धि इत्यादि जगतास " **कार्याध्यास** " म्हणतात. ती माया त्रिगुणात्मक असून गुणांच्या कारणरूप साम्यावस्थेस ' प्रकृति ' म्हणतात ती साम्यावस्था जावून त्यांत ' वैषम्य ' निर्माण होणे म्हणजेच ' जगदुत्पत्ति ' होणे होय. त्यांत पहिल्यानदां ' **महत्तत्त्व** ' नामक एक लुसलुसित कोंवळें पान निघतें. त्या पानाला त्रिगुणात्मक अहंकाराचा तीन पानांचा शेंडा फुटतो व त्यापासून चित्तचतुष्टयांच्या लहान लहान फांद्या फुटतात. नंतर पंचमहाभूतें, पंचज्ञानेंद्रियें, पंचविषय, उत्पन्न होतात. या प्रकारें-करून एकमेवाद्वितीय ब्रह्मापासून अखिल संसाराची उत्पत्ति होते. या वृक्षाला अश्वत्थ म्हणण्याचे कारण म्हणजे ' **श्वोऽपि न तिष्ठति** ', ' **श्व:** ' म्हणजे उद्या, तोपर्यंतहि हा संसारवृक्ष ' जगत ' नाहीं, तो क्षणभंगुर आहे, हे होय. हाच अभिप्राय ' अश्वत्थ ' शब्दांतून निघतो. हा प्रतिक्षणीं नाश पावतो, पालटतो व हेंच त्याचें न पालटणारें स्वरूप आहे; पण तसें सामान्य दृष्टीस दिसून येत नाहीं. कारण, या वृक्षाचें उत्पन्न होणे व नाहींसें होणे इतक्या वेगानें होत असते कीं, त्याची एक फांदी केव्हां नाश पावली व त्या जागीं कोट्यवधि नवीन शाखा केव्हां उत्पन्न झाल्या, या तर्कानेंहि कळून येत नाहींत. महाकल्पाच्या शेवटींच्या संहारक अशा प्रचंड वाऱ्यानें या संसारवृक्षाची साल गळून जाते न जाते तोंच कल्पाच्या आरंभास सृष्ट्यांचे समुदायच्या समुदाय उत्पन्न होतात. म्हणून हा वृक्ष सदाच टवटवीत हिरवागार अर्थात् अव्यय आहे, असें अज्ञानीजनास वाटते. कारण, त्याचा वेगातिशयच बहुतकाल स्थिरतेच्या भ्रांतीस कारण होतो; पण जे ज्ञानी याचा वेग जाणतात ते मात्र ' हा क्षणिक आहे ' असें ओळखतात. या संसारवृक्षास ' **अज्ञानावांचूनि मूळ नाहीं** ' व " **ययाचे असिलेपण टवाळ**" म्हणजे मिथ्या आहे असें जें जाणतात ते पुरुष ज्येष्ठ व श्रेष्ठ असून ते मला व वाग्ब्रह्मसिद्धांतासहि वंद्य आहेत. त्यांचे कोणाला वर्णन करतां येईल ! [ ७२ ते १४३ ].

असें या संसारवृक्षाचें संक्षेपत: वर्णन करून श्रीभगवान् त्याची वाढ कशी कशी होते ते सांगतात. प्रारंभीं स्वेदज, जारज, उद्भिज व अंडज असें मूळापासून चार मोठे फोंक उत्पन्न होतात व त्यापासून चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी उत्पन्न होतात. गुणक्षोभरूपी वारा भयंकर वेगानें वाहूं लागला म्हणजे हा भववृक्ष तीन ठिकाणीं भेदला

जातो. रजोगुणाचा वारा वाहूं लागला असतां मनुष्यरूपी खांद्यांची मध्यभागींच जोरानें वाढ होते. त्या मनुष्यरूपी शाखांना ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शुद्र अशा चार वर्णांच्या आडफांद्या फुटतात. त्यास वेदवाक्यांची डोलत असलेली सुंदर पालवी अपूर्व शोभा आणते. ही तिन्ही वेदरूपी पालवी मनुष्यशाखांखेरीज इतर ठिकाणीं लागत नाहीं. कारण, वेदाच्या विधानाला मनुष्याविना इतर दुसरें कोणीहि पात्र नाहीं; एऱ्हवीं संसारवृक्षाच्या वरच्या मुख्य मूळाच्या दृष्टीनें पाहिले तर मनुष्यप्राणी ही खालीं वाढलेल्या शाखांपैकीं मध्यावरची शाखा होय; तरीपण [ सर्वयोनींचे मूळ हा मनुष्यदेहच आहे. कारण, या मनुष्य देहांतच देहात्मत्व बुद्धीनें, रागद्वेषमूलक केलेलीं जीं शुभाशुभ कर्में, अर्थात् त्यांचीं सुख दुःखात्मक फळें भोगण्यासाठींच जीवांना 'उत्तम–मध्यम–अधम' योनी प्राप्त होत असतात. त्याला कर्म स्वातंत्र्य आहे. अधोगति अगर सद्‌गति तो आपल्या कर्मानें करून घेतो. मनुष्य जीवाला शुभाशुभ कर्माचरण करण्याचे बाबतींत वाव व स्वातंत्र्य आहे. म्हणूनच तर कांहीं सुसंस्कारसंपन्न माणसें शुभकर्में करीत असल्याचे, तर कांहीं सुसंस्कार विहीन माणसे अशुभकर्में करीत असल्याचें आढळांत येते. असें मानव जीवाला कर्म स्वातंत्र्य असले तरी विहित–निषिद्ध कर्मफल भोगण्यांचे बाबतींत स्वातंत्र्य नाहीं; उलट पूर्ण पारतंत्र्य आहे. त्यास स्वतः केलेल्या कर्मांचें फळ मुळींहि टाळतां येत नाहीं. या मनुष्य देहांत अति पाप केले तर त्यास अधम योनीला जावें लागते, पुण्यातिशयानें उत्तम योनीस जावे लागते, ज्याचे जसें कर्म असेल त्या कर्मानुसार त्या जीवास ती फलें परमेश्वर देतो. त्यांत त्याचेवर वैषम्य दोष येत नाहीं व तेवढ्यानें परमेश्वराच्या स्वातंत्र्याचीहि हानी होत नाहीं. सारांश, शुभाशुभ कर्म करण्याचे बाबतींत जीवाच्या कर्तृत्वास पूर्ण अवकाश व स्वातंत्र्य असल्यामुळें मनुष्याला त्याचा शास्त्रसंवादी उपयोग करून स्वतःची कृतार्थता संपादन करतां येते, हा उपर्युक्त एक सिद्धान्त यांत सूचित केला आहे ] या कर्म स्वातंत्र्यामुळें "मनुष्यमात्र" हे या संसार वृक्षाचें दुसरें खालचे मूळ आहे.

तमोगुणाचा भयंकर वारा वाहूं लागला म्हणजे कुवासनात्मक फांद्या विस्तार पावतात. त्यामुळें दुसऱ्याच्या नाशासाठीं जारण–मारण इत्यादि प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रांवरील श्रद्धारूपी वेल विस्तार पावते व मग त्याचे हातून घातक क्रियाच होऊं लागतात. त्या कुकर्मांचे परिणामीं पर्यवसान म्हणजे चांडाळादि निकृष्ट जातीच्या फांद्या वाढतात व पशुपक्ष्यादि आडफांद्याहि फुटतात. या तामसी क्रियांमुळें मनुष्यरूपी शाखांस नरकभोगरूपी फलांची प्राप्ति होते. तमोगुणाच्या उत्कर्षांत अशी हिंसादि निषिद्ध कर्में होतां होतां अखेरीस वृक्ष, गवत, लोखंड आणि दगड अशा जडयोनी रूपी शाखा वाढतात. फांद्या तरी ह्याच व फलें तरी हींच होत. आतां सत्वगुणाचा वारा वाहूं लागला तर त्यांत सुवासनात्मक, सत्कर्मात्मक अंकुर फुटतात. प्रज्ञाकुशलतेचा अंकुर फुटून स्फूर्तिबलानें व विवेकाच्या साह्यानें बुद्धींत ज्ञान अभिव्यक्त होतें. नानाप्रकारचें श्रेष्ठपरिगृहीत व शास्त्रसंवादी यज्ञांचे प्रकार म्हणजे जणुं पानावर पानें पसरतात. यम–दमांचे घोंस असलेल्या तपरूपी डाहाळ्यांना वैराग्यरूपी शाखा आलिंगन देते. याप्रकारेंकरून धर्मशाखा ही वाढते व त्यासहि स्वर्गादिक फलांनी युक्त अशा आडफांद्या फुटतात. याच धर्मरूपी शाखेला सूर्य, चंद्र, इन्द्र, इत्यादि फांद्यांचे मोठे झुपके येतात. अगदीं वरच्या शाखांना ब्रह्मदेवरूपी–शंकररूपी अणकुचीदार कोंभ येतात. ही मनुष्यरूपी शाखा सत्कर्माच्या फळभारानें मूळास येऊन टेकते. ब्रह्मदेव शंकर यांच्या पलीकडे जीवांना वाढणें नाहीं. मग तेथून वर केवळ ब्रह्मच आहे. आणखी कांहीं निवृत्ति मार्गाच्या सनकादिक नामक वरच्या ज्या सुप्रसिद्ध शाखा, त्या वृक्षाच्या या '**मूळांत**' म्हणजे कारणाध्यासांत व '**फळांत**' म्हणजे कार्याध्यासांत न सांपडता 'नित्यमुक्त' ब्रह्मस्वरूपींच भरलेल्या आहेत, असा हा लोकोत्तर '**संसारवृक्ष**' खुलासेवार सांगितला आतां हा वृक्ष कशानें उपटला जातो, ते ऐका [ १४४ ते २०९ ].

[ आतांपर्यंत भववृक्षाच्या रूपकानें जगताचा 'अध्यारोप' सांगितला. आतां त्याचा 'अपवाद' सांगतात. कारण, मंद मुमुक्षूस सहजीं अत्यन्त निर्विशेष ब्रह्माचा बोध व्हावा म्हणून श्रुतीनेंहि 'अध्यारोप' व 'अपवाद' या प्रक्रीयेचा अवलंब करून प्रथमतः '**आत्मनः आकाशः संभूतः**' यांत परमात्म्यापासून हा आकाशादि प्रपंच उत्पन्न झाला, असा 'अध्यारोप' सांगून '**अशब्दमस्पर्शम्**' इत्यादि वाक्यांत आत्मा शब्दस्पर्शादिरहित, निर्विशेष आहे, असा 'अपवाद' सांगितला आहे. तसाच भगवन्तांहि पहिल्या दोन श्लोकांत प्रपंचाचा अध्यारोप सांगून '**नरूपमस्येह तथोपलभ्यते**' म्हणजे विश्वप्रपंच जसा सत्यत्वानें प्रतीतीस येतो तसा तो सत्यत्वानें उपलब्ध होत नाहीं, असा प्रपंचाचा 'अपवाद' सांगतात. कारण, स्वयंप्रकाश, अत्यंत निर्विशेष परब्रह्मस्वरूपाचा मंदमुमुक्षूस निश्चित बोध करून देणें, हेच उपरिनिर्दिष्ट श्रुतीचे व श्रीभगवद्‌वचनाचें मुख्य तात्पर्य होय.

त्याहिपेक्षां 'अजातवादा'च्या दृष्टीनें जर विचार केला तर 'अध्यारोप' व तत्सापेक्ष 'अपवाद' हे दोन्ही संभवत नाहींत. कारण, निरुपाधिक ब्रह्म अत्यंत निर्विशेष, स्वयंप्रकाश असल्यामुळें त्याचे ठिकाणीं 'जगत आहे' असें ठरेल म्हणजे जगताचा 'अध्यारोप' ठरेल तर त्याचा तत्सापेक्ष निषेधहि संभवेल म्हणजे 'अपवादहि' सिद्ध होईल; पण जगत, हे जड असल्यामुळें स्वतः सत्ता-स्फूर्ति रहित आहे. जगतास जर सत्ताच नाहीं, तर मग त्याचा 'अपवाद' म्ह. निषेध कसा संभवेल ? याविषयीं श्रीज्ञानेश्वरमहाराज दृष्टान्तपूर्वक सांगतात:-- ] गंधर्व दुर्ग पाडून टाकले पाहिजे काय ! शशशृंग मोडून टाकले पाहिजे काय ! आकाशास फूल 'असावें' तर मग ते 'तोडावें' तसा हा संसारवृक्ष 'साचोकारा नाहीं'च [ अध्यारोपच संभवत नाहीं ] तर मग 'उन्मूळणी' उपटून टाकण्याचे बाबतींत कसला दरारा ! [ अपवादहि संभवत नाहीं. ] असा 'अजातवादा'चाच परमसत्य सिद्धान्त श्रीज्ञानेशांनीं मोठ्या उद्‌बोधक व निरुपम रीतीनें प्रतिपादन केला आहे. या दृष्टीनें 'श्रीज्ञानेश भाष्य' वाचले म्हणजे अध्यारोपापवाद रहित, निष्प्रपंच, प्रत्यक्षादि प्रमाण-अगोचर, स्वयंप्रकाश, ब्रह्मस्थिति म्हणजे काय याचे अचूक ज्ञान होईल ].

असा हा लोकोत्तर संसारवृक्ष आहे. खालच्या शाखा वृक्षादिस्थावरापर्यंत असून वरच्या शाखा ब्रह्मदेवापर्यंत वाढलेल्या आहेत आणि मागे सांगितल्याप्रमाणें मनुष्यरूपी खालचे मूळ मध्यभागीं आहे, अशा स्वरूपाचा हा संसार-वृक्ष गाढा व अफाट आहे, असें सकृत्-दर्शनीं वाटतें व आतां याला कोण उपटून टाकणार ! ही गोष्ट केवळ अवघडच नव्हे तर अशक्य आहे, असा तूं 'हळूवटभाव धरशील' पण धरूं नकोस हो ! अर्जुना ! तुला वाटतें तसें तें 'अशक्य' असें मुळींच नाहीं. कारण, त्या वृक्षाचे 'मूळ अज्ञानच जर लटिकें' म्हणजे मिथ्या आहे तर मग त्याचा कार्यरूप जो संसारवृक्ष तो कोठून खरा असणार ? असा संसार मिथ्या असूनहि त्यास 'अनादि अनंत' असें म्हणतात; ते म्हणणेहि एका दृष्टीनें बरोबर आहे. जोपर्यंत 'विवेकानें आपलें डोकें वर काढले नाहीं, तोपर्यंतच या भववृक्षाला 'अन्त' नाहीं. विचाराचा अभाव असणें, हेच ज्याचें जीवन आहे. तो मूळअज्ञान निवर्तक ज्ञान होईल तेव्हांच नाश पावेल 'एऱ्हवीं नाहीं', म्हणून त्यास 'अन्त' नाहीं म्हणतात. जी वस्तु खरोखर कोणत्या तरी कारणापासून उत्पन्न होते त्यास 'आदि' म्ह० उत्पत्ति म्हणणें शोभते पण संसारवृक्ष स्वरूपेंकरून नाहींच; तर मग त्याची उत्पत्ति कोणापासून झाली म्हणावयाची ? या दृष्टीनें "नाहीं 'पणेंचि होये। "अनादि" हा" असें म्हणतात. म्हणून तर सृष्टि परंपरेंत कोणत्याच सृष्टीचे प्रथमत्व सिद्ध होत नाहीं. किंबहुना ! ! या संसारवृक्षास 'आद्यन्त' नाहीं. मध्येंच स्थितिकालीं कांहींसा 'भासतो' पण तेहि मिथ्या आहे. 'मृगजळ' खरोखरी ब्रह्मगिरीहून निघत नाहीं, शेवटीं समुद्रासहि मिळत नाहीं; पण मध्येंच जसे ते 'वाउगे' दिसते. [ तसा हा संसारवृक्ष अज्ञानामुळें भ्रमकालीं 'भासतो' आणि अधिष्ठान परब्रह्म साक्षात्कारानंतर, ज्ञानकालीं नाहींसा होतो. किंबहुना ! ! निर्विशेष परब्रह्म स्वरूपाचें अपरोक्षज्ञान होतें तेव्हां परब्रह्माचे ठिकाणीं संसाराचा त्रैकालिकात्यंताभाव आहे, असा निश्चय होतो, म्हणजे ज्याकालीं तो संसार भासत होता, त्याकालींहि तो तत्त्वतः नव्हताच. अज्ञानामुळें मृगजळाप्रमाणें मध्येंच दृश्यरूपानें 'भासतो' तत्त्वतः त्या कालींहि अधिष्ठानाचे ठिकाणीं संसार नसतोच; पण त्या बरोबरच आपला तसा संसाराविषयींचा 'नाहीं'चा निश्चय नसतो एवढेच. अधिष्ठान परब्रह्माच्या साक्षात्कारात्मक ज्ञानानें, अज्ञान व तत्कार्य भ्रम निवृत्तीनें तसा संसाराच्या अत्यंताभावाचा निश्चयहि होतो. ] अशा 'प्रतीतिमात्र सत्ता' असणाऱ्या म्हणजे 'भासतो' एवढीच ज्याची सत्ता आहे, अशा संसारवृक्षास अर्जुना ! ! उन्मळून टाकण्यास श्रम ते काय ? पण यांत एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे, ती म्हणजे ज्या आत्मस्वरूपाच्या अज्ञानानें हा संसारवृक्ष बळावला आहे, भासतो आहे त्यास समूळ नाहींसे करण्यासाठीं एकमेव उपाय म्हणजे आत्मज्ञानरूपी शस्त्र, हा होय. कारण, संसार वृक्ष अध्यस्त आहे. त्यामुळें अधिष्ठानाच्या ज्ञानावांचून त्या अध्यस्त संसाराच्या निवृत्तिसाठीं इतर जितक्या उपायांचा तूं अवलंब करशील तितकें सर्वच्या सर्व उपाय तुला संसारबंधांत गुंतविण्यासच कारण होतील. तो एक शीणच होईल. ब्रह्मभिन्न संसारवृक्षाची विचारानें स्वतंत्र सत्ताच सिद्ध होत नाहीं, अशा 'नाथिलिया संसारा" साधनांचा खटाटोप तरी हवा कशाला ? ज्ञान-खड्ग लीलेनें फिरवतां येईल, असें नित्यनवें वैराग्याचें अभंग बळ पाहिजे. ज्ञानखड्ग विवेक-साहाणेवर पाजळलेले पाहिजे. त्यास 'अहं ब्रह्मास्मि' अशा बोधाची तीक्ष्ण धार पाहिजे. तसेंच यौक्तिक चिंतनरूपी मनन व निदिध्यासानें विजातीय जगत् सत्यत्वबुद्धि व जीव-ब्रह्मांतील भेदाचे ज्ञान पार नाहींसें होऊन अखंडैकरस ब्रह्माकार वृत्तीमुळें आपणांस एकमेव परब्रह्मवस्तुस्वरूप स्थिति लाभते. त्या स्थितींत

जगत्–प्रतीतिहि संभवत नाहीं, तर मग स्वभिन्न असें पात्र मारण्यापुरते 'दुजे' म्हणजे द्वैत उरत नाहीं, हे कांही निराळें सांगावयास नको. अर्थात् अद्वैत प्रमेच्या वाढीनें ज्ञानखड्ग भववृक्षास "कवणीकडे उरो नेदील" अशा प्रकारें ज्ञानखड्गानें उर्ध्वमूळ असणाऱ्या भवाश्वत्थास छेदून म्ह. त्यास मिथ्या जाणून निरास करावा.

[ मोक्ष हा अज्ञान व तत्कार्य जन्ममरणरूपी बंध निवृत्तिपूर्वकच होतो. ती बंधनिवृत्ति ज्ञानैकसाध्य असल्याचे श्रीज्ञानेशांनीं आवर्जून प्रतिपादन केलें आहे. कारण, जर मोक्ष हा क्रियेचे फल आहे, असें मानिलें म्हणजे मोक्ष "**कर्मसाध्य**" आहे म्हटलें तर यज्ञादि कर्मांची स्वर्गादि फलें जशी अनित्य आहेत, तसा मोक्षहि अनित्यच होईल. कारण, "**यत् कृतकं तदनित्यम्**" जें जें क्रियाजन्य असते तें तें अनित्य असते अशी एक निर्बाध व्याप्तिच आहे. म्हणून मोक्षहि "क्रियासाध्य" मानिला तर तोहि अनित्यच होईल. 'मोक्षा'चे बाबतींत क्रियेचा निषेध साक्षात् श्रुतीनेंच केला आहे. "**नास्त्यकृत कृतेन**" अकृतस्वरूपाचा जो मोक्ष तो कृतेन म्हणजे कर्मानें साध्य होणारा असा नाहीं. शिवाय '**मोक्ष**' जर '**उत्पाद्य**', '**निवर्त्य**', '**प्राप्य**', '**विकार्य**,' किंवा '**संस्कार्य**' यापैकींच असता तर त्यास क्रियाजन्य असेंहि म्हणतां आले असते; पण मोक्षाचे तात्त्विकरूप म्हणजे या उपर्युक्त पांचाहूनहि अत्यन्त विलक्षण आहे. म्हणून "कर्म" हे मोक्षाचें साक्षात् साधन नाहीं. मोक्षास फक्त "ज्ञानच" हेतु आहे. "**ज्ञानादेव तु कैवल्यम्**" ज्ञानानेंच कैवल्याची प्राप्ति होते, असें निश्चयानें श्रुति सांगते. सारांश, बंधनिवृत्तिपूर्वक अद्वय–ब्रह्मस्थितिरूप मोक्षास एकमेव जीव ब्रह्मैक्यज्ञानच कारण आहे.

बंध निवृत्तिपूर्वक मोक्ष हा ब्रह्माच्या अपरोक्ष ज्ञानानेंच होतो म्हणजेच ज्याअर्थी संसारबंध निवृत्ति, ही केवळ ज्ञानानेंच होते त्याअर्थी जगतादि संसार–बंध मिथ्या आहे, हेंहि आपोआपच सिद्ध होते. त्यांतहि तें ब्रह्मात्मैक्यज्ञान परोक्ष स्वरूपाचे असेल, तर त्यानें अविद्या व जगतादि संसार–बंधाची निवृत्ति होणार नाहीं. कारण, जगत्सत्यत्व-भ्रांति ही प्रत्यक्ष आहे व प्रत्यक्ष भ्रांतीचे निवर्तक अधिष्ठान ज्ञानहि प्रत्यक्षच असणें जरूर आहे. म्हणून ब्रह्माच्या अपरोक्ष, साक्षात्कारात्मक प्रत्यक्ष ज्ञानानेंच प्रत्यक्षरूप भासणारा, अद्वय बोधास आडवारा करणारा "**विश्वाभास**" आणि त्यास कारणीभूत असणारी मूलाविद्या यांची निवृत्ति होते. यांतहि श्रीज्ञानेशांनीं 'कारणाध्यासा' चा निर्देश 'बीजभाव' म्हणून केला आहे, तर कार्याध्यासाचा निर्देश "फलभाव" म्हणून केला आहे आणि '**अर्थाध्यास व ज्ञानाध्यास**' या दोन्ही अध्यासांचा निर्देश "**विश्वाभासु**" या एकाच पदानें केला आहे अर्थात् "**विश्व**" म्हणजे अर्थाध्यास व "**आभासु**" म्हणजे विश्व प्रतीतिरूप असा ज्ञानाध्यास होय.

शिवाय एकमेवाद्वितीय परब्रह्माचें ठिकाणीं जीव व नामरूपात्मक वैचित्र्यपूर्ण "विश्वाभास" कां व कसा होतो ? अशी शंका आल्यास त्याचे उत्तर श्रीज्ञानेश्वरमहाराज देतात कीं, "पैं नेणतया प्रती। रुपेपणाची प्रतीति। रुपें न होनि शुक्ति। दावी जेवीं॥" "कां नाना अलंकार दशे। सोनें न लपत लपालें असे। विश्व न होनियां तैसें। विश्व जो धरी"॥ शिंप ही केव्हांच रुपें होत नाहीं; पण नेणत्या लोकांना तिच्यावर रुप्याचा 'आभास' होतो. सोनें कधींच अलंकार होत नाहीं. सोनें हें स्वरूपानें, तत्त्वतः सोनेंच असतें; पण तें नेणत्यास अलंकार झाल्यासारखें दिसतें. तसा अद्वयानंदघन परमात्मा कधींच विश्व होत नाहीं; त्याचे एकमेवाद्वितीयत्व, निर्विकारत्व, केव्हांच नाहींसें होत नाहीं; पण अज्ञानी जीवांना मात्र त्या परमात्म्याचें ठिकाणीं हा "विश्वाचा आभास" होतो. त्या परब्रह्माचें आत्मत्वानें ज्ञान झालें कीं, हा "विश्वाभास मावळतो" किंबहुना।.। तत्त्वमस्यादि महावाक्यांपासून परब्रह्माचें प्रत्यक्ष ज्ञानाचा चित्तांत उदय होतांच कार्यासह अविद्या नव्हती, नाहीं व होणार नाहीं असा जगताविषयींचा त्रैकालिकात्यंताभावाचा निश्चय होतो.

अज्ञानी जीवांच्या दृष्टीनें, त्यांचें अज्ञान लक्षांत घेऊनच विश्वाचा आभास व त्यांचें कारण अज्ञान या उभयांचें निरासार्थ व्यतिरेक मुखानें संपूर्ण विश्वाचे परमात्म्याशीं बाध सामानाधिकरण सांगावें लागते; तर अधिष्ठान दृष्टीनें ज्ञातृ–ज्ञेय विरहित, कार्यकारणातीत, द्वैत व तत्सापेक्ष अद्वैत याहून अतीत जे, केवल आपले आपणच आपल्याच महिमेंत राहणारे दृङ्मात्र चैतन्यच आहे. मग त्या निस्वळ अद्वयावस्थेंत "मी ब्रह्म आहें" किंवा "हे सर्व ब्रह्म आहे" असें म्हणण्यापुरतेंहि म्हणजे सच्चिदानंदघन परमात्मा ज्ञेय, व त्याचें ज्ञातृत्व अशा रूपाचें द्वैतहि उर्वरित राहत नाहीं, असें सांगावें लागते. या दृष्टीनें केवल आपलेंच स्वरूप आपण पाहतो, असें सर्वत्र समव्याप्त परमात्म्याचें एकत्व जाणणारा ब्रह्मवेत्ता "देहेंचि परब्रह्म व्हावें। मानूं येईल॥" असा "जीवन्मुक्ती"स म्ह० देहतादात्म्यरहित ब्रह्मस्थितीस तो प्राप्त होतो.

सर्व प्रपंच वृक्ष हा ज्ञाननिवर्त्य आहे, असें श्रीज्ञानेशांनीं सांगितलें आहे. त्यावरून "व्यावहारिक प्रपंचो मिथ्या, ज्ञाननिवर्त्यत्वात्, यत्र यत्र ज्ञान निवर्त्यत्वम्, तत्रतत्र मिथ्यात्वं यथाशुक्ति रजतादौ" अर्थात् व्यावहारिक प्रपंच केवळ ज्ञाननिवर्त्य असल्यामुळेंच शुक्ति रजतप्रमाणें मिथ्या आहे असें अनुमान प्रमाणानेंहि जगताचे मिथ्यात्व सिद्ध होते. जें जें ज्ञान निवर्त्य असतें तें तें मिथ्या असते. सर्व विश्वाभास ज्ञाननिवर्त्य आहे म्हणून तो मिथ्या आहे किंबहुना ! ! परब्रह्माचे ठिकाणीं "विश्वाभासा" चा अत्यंताभाव असूनहि म्हणौनि नाहीं आणि असे । हे कल्पनेचेनि–सौरसे । जे कल्पना लोपे भ्रंशे । आणि कल्पनेसवें होय ।। "कल्पनेनें भासते तत्त्वतः निरुपाधिक अद्वैत ब्रह्मानुभूतिदृष्टया, जगत्–प्रपंच नाहींच एकमेवाद्वितीय सच्चिदानंदघन ब्रह्मच आहे; यावरून हा श्रुतिसिद्धांतच मुमुक्षूस हितावह, आदरणीय असल्याचे सूचित होते.

सारांश, ज्ञानानेंच मोक्ष होतो. ज्ञानाविना मोक्षासाठीं इतर जें जें उपाय करशील तें तें उपाय बंधनिवृत्ति तर करणार नाहींतच; उलट ते उपाय संसार बंधांत अधिकाधिक गुंतविण्यास कारणीभूत होतील; या म्हणण्यानें श्रीज्ञानेशांनीं मोक्ष हा बंधनिवृत्तिपूर्वक होतो, तो ज्ञाननिवर्त्य आहे, म्हणून मिथ्या आहे. त्याविना उपाय करणें अनुचित आहे, केवळ शिणच आहे "विश्वाभास" हा स्वस्वरूपस्थितीस प्रतिबंधक आहे त्याचा निरास केल्याविना अद्वय ब्रह्माचें ज्ञान होणार नाहीं, इत्यादि गोष्टी सूचित केल्या आहेत. शिवाय परमात्म्याचें यथार्थ असें ज्ञान झालें म्हणजे मग तत्त्वज्ञानाचा शेवट सांगतांना श्रीज्ञानेश म्हणतात "तैसेंचि सर्व जाणितलें । हेंहि म्हणणें थेंकुलें । जे तया सर्व उरलें । द्वैत नाहीं ।।" हीच खरी जीवन्मुक्ति होय व हींच कृतकृत्यता होय व ती एकमेव, ज्ञानैक साध्य आहे, असा शास्त्रसिद्धांत होय ] [ २१० ते २६६ ].

त्यानंतर 'इदंता' म्हणजे 'इंदभाव' व इदंतेच्या सापेक्ष 'मीपणा' म्हणजे 'अहंभाव' या विरहित आत्मा हा अनुत्पन्न स्वरूपाचा असून 'जड नाहीं'. म्हणून तेथें इंद्रियवेद्यता किंवा 'इदंता' अर्थात् इदंस्फुरण नाहीं किंवा 'इदम्' या प्रतीतीचा तो आत्मा विषय नाहीं. आणि 'इदंता' नाहीं म्हणूनच इदंस्फुरण सापेक्ष अहंस्फुरणहि त्या विशुद्ध आत्मस्वरूपाचे ठिकाणीं नाहीं म्हणजे 'आत्मा' नित्य अपरोक्षरूप, स्वयप्रकाश असल्यामुळें जसा परोक्ष नाहीं, तसा तो 'अहम्' या प्रतीतीचाहि विषय नाहीं. 'अहम्–इदम् वृत्तिरहित' सर्व प्रमाणोपजीव्यभूत, द्वैत निरपेक्ष, असें जे आपलें स्वरूप तें आपणच आत्मत्वानें पहावें. म्हणजे त्याचें साक्षात्कारात्मक ज्ञान संपादन करावें; पण ते पाहणें म्हणजे आरशाच्या साह्यानें आपणच आपल्यास दृश्य करून 'बिंब–प्रतिबिंब' या भावानें पाहतात तसें दृश्य–दृष्टा–दर्शन या त्रिपुटीरूपानें आत्मस्वरूपाला पाहूं नकोस. वृत्तिज्ञानरूप दृष्टि, उपाधी विरहित म्हणजे निरुपाधिक 'अद्वयरूपा' नें हे पहाणें आहे. श्रुतिसुद्धां दृश्य–दृष्टा–दर्शन या त्रिपुटीहून अतीत 'दृङ्मात्र' अशा स्वरूपाचें शब्दद्वारां वर्णन करण्याचें बाबतींत असमर्थ आहे. म्हणून श्रुतिही उपाधीचा व उपाधि गुणांचा आश्रय घेऊनच आत्मस्वरूपाचें वर्णन करण्यास समर्थ होते व मग नामरूपाचा वायां गलबला करते. भवस्वर्गास विवेकानें उबगलेले मुमुक्षु ज्ञान–योग यांचा आश्रय घेऊन 'आत्म दर्शन' घेण्यास निघतात. तेव्हां संसारांतील ब्रह्मलोकापर्यन्त सर्व विषय प्रतिबंध करतात; पण हे मुमुक्षु त्या प्रतिबंधाचें उल्लंघन करून पुढे जातात. नंतर ज्या आत्मवस्तूच्या अबोधानें जगाचें विपरीत जाणणे थोरपणास आणले व "नाहीं ते 'मी', 'तूं' जगांत नांदविलें" ती आत्मवस्तु आत्मत्वानें जाणून त्या आत्मस्वरूपास भेटल्यामुळें पुनः जन्मास 'येणेचि नाहीं'; अशा ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचा चित्तवृत्तींत उदय होऊन, त्या ज्ञानाची परिणति 'सर्वत्र' परब्रह्मवस्तु समव्याप्त ओतप्रोत रूपानें भरलेली आहे, अशा व्यापकानुभूतींत होते. अशा सिद्ध पुरुषांची लक्षणें अशीं कीं, मोह, मान, आसक्ति सुख–दुःखादि द्वंद्वें, हीं त्यास आपण होऊन सोडून जातात. प्रबळ आत्मलाभामुळें, ज्यांची व्यापक बोधामुळें क्रिया आपोआप हळू हळू सुटत असते. ज्याचे ठिकाणीं भेदबुद्धि मूळींच नसते. कारण, त्याची 'देह अहंता अविद्येसवें गेलेली' असते. ते पुरुष ज्या परम पदाला प्राप्त होतात, तें परमपद असें आहे कीं, ज्यास 'वेचू नाहीं.' जे 'दृश्यपणें' पाहिले जातें, जें ज्ञेयत्वानें जाणले जाते किंवा ज्याचा अमूक म्हणून शब्दद्वारां निर्देश केला जातो, असें जें जें आहे त्यांपैकीं जे नाहीं. जें ब्रह्म स्वयंप्रकाश आहे. त्याच्या स्वरूपभूत प्रकाशानेंच प्रकाशित होणारे, बाह्य भौतिक चंद्र, सूर्य, अग्नि, हे त्याला प्रकाशित कसें करूं शकतील ? किंबहुना ! ! स्वयंप्रकाश ब्रह्माच्या स्वरूपभूत प्रकाशाच्या साह्यानें प्रकाशित होऊन आपापल्या विषयाकडे प्रवृत्त होणारीं 'प्रमाणें' सर्व प्रमाणोपजीव्यभूत ब्रह्माचे प्रकाशन कसें करूं शकतील ? म्हणून ते ब्रह्म प्रमाण–प्रमेय भावरहित स्वयंप्रकाश आहे,

अशा माझ्या स्वरूपाशीं जे चोखट ज्ञानानें एकरूप होतात. त्यांची पुनरावृत्तीची वाट सदाचीच मोडली जाते. [ २६७ ते ३२० ]

[ ब्रह्मस्वयंप्रकाश, दिक्कालातीत आहे; तरीपण ' स्थान ', ' जाणें ', परत येणें ' किंवा ' पुनरावृत्तीची वाट मोडणें ' इत्यादि हे रूपक आहे. येथें श्री ज्ञानेशांनीं लावलेली श्लोकसंगति मोठी चिंतनीय आहे, ती अशी — ]

त्यावर प्रज्ञावन्त अर्जुन विचारतो कीं, देवा ! जे पुरुष देवाशीं स्वतः एकरूप होतात. मग माघारीं येत नाहींत ते पुरुष मूळचे देवाशीं भिन्न कीं अभिन्न असतात ? जर अनादि सिद्ध मूळचेच देवाहून भिन्न असतील तर ते माघारी येत नाहींत, हे म्हणणे संभवत नाहीं; बरे ! आतां जर ते पुरुष देवाशीं स्वभावतः मूळचे अभिन्नच असतील तर त्यांचा अभिन्न वस्तुविषयीं ' संयोग ' किंवा 'वियोग' म्हणणें कसें संभवेल ? या अर्जुनाच्या आक्षेपाच्या मार्मिकतेमुळें अर्थात् शिष्याचा बोध पाहून सर्वज्ञ शिरोमणि श्रीगुरुदेव त्यास उत्तर देतात. जर विवेकदृष्टीनें खोल पाहिलें तर " मातेचि ते सहजे " म्हणजे ते पुरुष मूळचे स्वरूपानें माझ्याशीं अभिन्नच आहेत; पण वरवरच्या देहोपाधि दृष्टीनें पाहिले तर ते माझ्याहून भिन्न आहेत, असें दिसतात. अर्थात् ज्ञानदृष्टीनें मजसी ते अभिन्नच आहेत, असें दिसेल व अज्ञान असेल तर मात्र " भिन्नपण " दिसेल; पण त्या कल्पित भासमान उपाधिभेदामुळें उपधेयांत मात्र मुळींहि वास्तव भेद निर्माण होत नाहीं. शुद्ध जो मी तो कल्पित मायेमुळें वेटाळला जातो, त्यावेळीं हे एक अज्ञान रूढ होतें त्यामुळें स्वतःच्या अपरिच्छिन्न स्वरूपाचा आवरण शक्तीमुळें विसर पडून ' कोऽहम् ' अशा विकल्पास आरंभ होतो. मग ' मी देहच आहे ' असा परिच्छिन्नतेचा निश्चयरूपी भ्रम होतो; असें आत्मस्वरूपविषयकज्ञान ' शरीराएवढेच ' म्हणून होते, तेव्हां जन्मणें व मरणें इत्यादि हे अविद्याकार्य देहाचे धर्म आपल्यावर ओढून घेऊन त्यासच सत्य समजणें म्हणजेच जीवलोक किंवा संसार होय. देह आणि दशेंद्रिय यांचा स्वामी जो जीव तो मनाला हाताशीं धरून त्याच्या आश्रयानें शब्द–स्पर्शादि विषयांचा उपभोग घेतो. अहं कर्तृत्वाचें, भोक्तृत्वाचें आधिक्य व विषयेंद्रियांचा धुमाकुळ तेव्हांच स्पष्ट दिसून येतो कीं, जेव्हां जीवाला पूर्व कर्मानुसार एकदां स्थूल देहप्राप्त होतो. अज्ञानी सामान्य लोकास सच्चिदानंदात्मविस्मृतीमुळें व देहतादात्म्यामुळें देहाच्या जन्ममृत्युबरोबर आत्माच जन्मतो न मरतो; तो देह क्रियाशील असतांना आत्माच क्रियाशील आहे. आणि देह सुखदुःखें भोगीत असतां आत्माच सुखदुःखें भोगतो, असें वाटते; पण तत्त्वतः जन्मास येणें, मरण पावणें, कर्म करणें, सुखदुःखाचा किंवा विषयांचा उपभोग घेणें सर्व धर्म प्रकृतीचें, देहाचे आहेत, हे फक्त ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारीं महात्म्यासच पूर्णपणें समजते. ते आपल्या बोधदृष्टीनें आत्मा देहांत राहूनहि तो तत्त्वतः असंग असल्यामुळें आत्मचैतन्य वाढत नाहीं व ओहटत नाहीं. चैतन्य कर्म कोणास करावयास लावीत नाहीं व स्वतःहि कर्म करीत नाहीं असें जाणतात. पण हे ज्ञानी म्हणजे केवळ शब्दज्ञानी नव्हेत. जो यथार्थ दृढबोध नसतांनाहि चार अक्षरें पाहिलेला, ज्याचे वाक्पटुत्व चांगलें आहे. त्यामुळें अन्तःकरणांत विषयांना आश्रय देऊन, विषयासक्तीनें ग्रस्त होऊन तोंडानें नुसते शाब्दिक अवडंबरानें वा तोंडानें ज्ञानाच्या गोष्टी सांगण्यानें, मी निश्चयानें त्यास सांपडत नाहीं. अर्थात् चित्तांत अहंता बाळगून, जिव्हेला सकळ शास्त्रांचा सराव झाला असला तरी, अशा पुरुषास कोट्यवधि जन्म जाईनात कां ! पण त्यास माझ्या स्वरूपाची प्राप्ति म्हणजे जीवभाव निवृत्तिपूर्वक परमानंदाची प्राप्ति होणार नाहीं. कारण, बौद्धिकज्ञान, पुस्तकीज्ञान, किंवा शब्दज्ञान, हीं आत्मदर्शन करून देण्याचे बाबतींत असमर्थ आहेत. विवेक वैराग्यपूर्वक इंद्रिय निग्रह, वासनाक्षय, होऊन अहंब्रह्मास्मित्याकारक वृत्तिरहित ब्रह्मस्थिति लाभलेलें तेच खरें ज्ञानी होत. त्यास समस्त भूतमात्रांत मीच व्याप्त आहे, असें व्यापकज्ञान झालेलें असतें [ ३२१ ते ३९७ ].

जसा जीव ब्रह्मरूप आहे, तसेंच सर्व विश्वहि अधिष्ठान ब्रह्मरूप आहे. अर्थात् मी एका जीवापुरता सीमित नसून सर्व चराचरात्मक वस्तूंत घनदाट, ओतप्रोत व्यापकरूपाने भरून राहिलों आहे, असें ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारानेंच अनुभवास येतें. कारण, प्रमातारूप जो मी तो ब्रह्मरूप आहें, असें कळल्याविना अखिल विश्व ब्रह्मरूप आहे, असें कळत नाहीं. सर्व तेजोमय वस्तूंतील तेज, शीतलतेंतील शीतलता, मीच आहें. सर्व भूतांचे धारण–पोषण मीच करतो. किंबहुना ! ! विश्वांत सर्व मीच व्याप्त आहे. देवा ! अशी सर्वत्र तुझीच व्याप्ति आहे, तर मग कांहीं प्राणि सुखी व कांहीं प्राणि दुःखीं दिसतात, असें वैषम्य कां असावे ? असें अर्जुना ! तूं म्हणशील, पण हे म्हणणें बरोबर नाहीं. मी सर्वत्र समव्याप्त आहे. त्यांत मुळींहि न्यूनाधिकता नाहीं; पण अविद्या व तत्कार्य अंतःकरण या उपाधीदोषांमुळें ही वैषम्याची प्रतीति येते. मी एकमेवाद्वितीय असून सर्वांतर्यामी आहे, प्राण्यांची अंतःकरणरूप उपाधि शुद्ध अथवा

अशुद्ध असेल त्याप्रमाणें मी तेथें निरनिराळ्या रूपानें व्यक्त होतो. ज्ञानवानास ऐक्यबोधामुळें मी सुखरूप आहे, तर अज्ञान्यास भेद-भ्रांति असल्यामुळें दुःख प्रतीति येते [ ३९८ ते ४२० ].

यच्चयावत् जीवांस 'मी अमुक आहें' अशा रूपानें जें स्फुरण होतें ती वस्तु मी असून 'मी-मी' या रूपानें होणारें स्फुरण म्हणजे माझ्याच सामान्य स्वरूपाचें प्रत्यक्ष ज्ञान आहे. कारण, ब्रह्मच अविद्या वा अंतःकरण या उपाधितादात्म्यामुळें जीवभावास प्राप्त झालें आहे. म्हणूनच 'मी 'रूपानें वा जीवरूपानें होणारें प्रत्यक्ष म्हणजे माझेंच प्रत्यक्ष आहे. माझ्या ऐक्याचा साक्षात्कारात्मक अनुभव येण्यासाठीं संतसंगतींत राहून, वैराग्य संपन्न होऊन, त्यांच्या आज्ञेनुसार योगज्ञानाचा अभ्यास केला असतां, याच एका सत्कर्मानें आशेषहि अज्ञान नाहींसे होऊन ज्यांचे 'अहम्' आत्मस्वरूपीं सदाचेच विश्राम पावते. त्याची परिणति आत्मविषयक परिच्छिन्नतेची भ्रांति व परमात्म विषयक परोक्षतेची भ्रांति नाहशीं होऊन सर्वत्र ब्रह्मभाव प्रतीत होते; याहून उलट जर देहासक्त लोकांच्या संगतींत राहून, संसार गौरवच ऐकत राहिले असतां ज्यांची 'अहंता' देहाचेंच ठिकाणीं बुडून राहिली आहे. ते इंद्रियरुचि प्रमाणें विषयोपभोग भोगण्यांत प्रवृत्त होतील तर परिणामीं दुःखाचाच अनुभव येईल. या ज्ञानी व अज्ञानीं यांच्या ज्ञानाचे व त्यांच्या व्यवहाराचे प्रकाशन, मात्र मूळ स्वयंप्रकाश, निरुपाधिक अशा माझ्या सत्ता-स्फूर्तीमुळेंच होते. माझ्या यथार्थ स्वरूपास वेद जाणण्यास प्रवृत्त झाला त्यावेळीं त्याचे भाग झाले. वेदाच्या त्या सर्व शाखांकडून मीच जाणला जातो, "एकमेवाद्वितीयम् ब्रह्म" या श्रुतिच्या महासिद्धान्तापाशीं श्रुति शब्दासह हारपते म्हणजे वेदानें अधिकारानुसार बहुत साधनांचे प्रतिपादन केले असले तरीहि वेदाचे महातात्पर्य एकमेव अद्वितीय विशुद्ध परमात्मतत्त्व प्रतिपादनांतच आहे, यांत वाद नाहीं. श्रीगुरूंनीं उपदेशिलेल्या बोधानें ब्रह्माकार वृत्ति निर्माण होते. त्या वृत्ति ज्ञानानें समूळ अविद्या निवृत्ति होते. त्या बरोबरच तें ज्ञानहि बुडून जातें व केवळ स्वरूपभूतज्ञान उर्वरित राहते कीं "जे नाही कीर नोहे । आणि न साहे असणेंहि". कारण, 'आहेपणा' व तत्सापेक्ष "नाहींपणा" याहून विरहित, निरपेक्ष "आहे" हेंच त्याचे दृङ्मात्र "निरुपाधिक" स्वरूप होय. याप्रकारें देवांनीं चराचरांतील आपल्या 'निरुपाधिक' स्वरूपांत त्या व्याख्यानाचे पर्यवसान केले. ते ऐकून निरुपाधिक स्वरूपाविषयीं आणखीहि श्रवण करावयास मिळावे म्हणून उत्कंठित होऊन अर्जुन देवाला म्हणाला. देवा ! आपलें तें निरुपाधिक स्वरूप पुनः एकदां अव्यंगपणें सांगा. देवहि अर्जुनाच्या या प्रश्नानें अतीव आनंदित झाले. प्रेमळ संवादिया शिष्यास आलिंगन दिले व सांगू लागलें; पण देव त्याला दोन प्रकारचा उपाधिच सांगू लागले. वास्तविक अर्जुनास निरुपाधिक स्वरूप विषयक जिज्ञासा असून तसाच त्याचा प्रश्न होता. देवहि निरुपाधिक स्वरूप सांगण्याच्या विवक्षेनें सांगत होते, मग देव उपाधि वा सोपाधिक स्वरूप कां सांगू लागलें ? याची श्रीज्ञानेश्वर महाराज पुढील श्लोकास 'अवतरण' देऊन संगति सांगतात; ती अशी कीं; निरुपाधिक स्वरूप शब्दमर्यादेहून अतीत असल्यामुळें श्रुतिसुद्धां विधीमुखानें निरुपाधिक ब्रह्माचा बोध न करितां 'नेति नेति' मूर्त व अमूर्त स्वरूपाचा निषेध करून, निषेध मुखानें बोध करते, म्हणजे "बोलु निमालेपणें विवरी । अचर्चातें" ज्याप्रमाणें नवीन लग्न झालेल्या लहान मुलीस वेगवेगळ्या पुरुषांची नांवें घेऊन "हा तुझा पति आहे काय ?" असें म्हणून विचारित असतां हरएक नांवास 'नाहीं, नाहीं' म्हणून 'न'कार देणारी ती नववधू ज्या नांवाचा उच्चार केल्याबरोबर 'न'कार व 'हो'कार न देतां लज्जेनें गप्प राहतें, तेच तिच्या पतीचें नांव; हें त्या न बोलण्यांतच ती आपल्या पतीचें नांव दाखवून देतें. त्याप्रमाणेंच स्थूल-सूक्ष्म, मूर्त-अमूर्त प्रपंच हा परमात्मा आहे काय ? असें विचारलें असतां श्रुति "न इति, न इति" स्थूल प्रपंच परमात्मा नाहीं, सूक्ष्म प्रपंच परमात्मा नाहीं. असें निषेधमुखानें सांगतें आणि जेव्हां अत्यंत निर्विशेष, सत्सामान्य सर्व प्रमाण-अविषय असा स्वयंप्रकाश परमात्मरूप सांगण्याची वेळ आली म्हणजे श्रुतिहि मौनावते, गप्प बसते व त्या गप्प बसण्यांतच आपल्याला निर्देश, देशरहित सद्रूप परमात्म्याचें यथार्थ स्वरूप सुचविते. अशा परब्रह्माचें निरुपाधिक स्वरूप मंद जिज्ञासूस एकदम कळणें शक्य नाहीं. प्रथमतः सोपाधिक स्वरूप कळलें कीं, उपधेय-उपाधि-उपहित भाव विचारांतीं जेथें संपतो व मग जे उर्वरित राहते, तें कोणासहि न पुसतां 'निरुपाधिक स्वरूप' आहे असें सहज कळतें. अर्थात् पाडव्याची चंद्रकोर दाखविण्याकरितां प्रथम जशी शाखेची खूण दाखवावी लागते त्या "शाखाचंद्रन्यायानें" देवहि निरुपाधिक ब्रह्मस्वरूपाचें प्रतिपादन 'क्षर-अक्षर' उपाधीचें स्वरूप सांगून करीत आहेत [ ४२१ ते ४७० ].

या संसार पाटणींत 'क्षर' आणि 'अक्षर' अशा दोनच पुरुषांची वस्ती आहे.

**क्षर-पुरुष** :- भ्रांतिरूप अरण्यांतील लाकडांनीं जो महत्तत्त्व, अहंकारापासून तों थेट तृणापर्यंत सृष्टीचा आकार उभारला आहे. ज्याला 'जग' असें नांव आहे. अशा या सृष्टीरूपी नगरींत आत्मा स्वतःच्या यथार्थ स्वरूपाच्या विस्मृतीची निद्रा घेतो म्हणजे "आत्मयासी पुरी शयन जाणिजे" म्हणून त्यास 'पुरुष' म्हणतात. या झोपेंत पडलेल्या दीर्घस्वप्नांत देहादि उपाधींशीं तादात्म्य पावल्यामुळें स्वतःला सुखी, दुःखी म्हणत असतो; देह मी व स्त्री, धन, पुत्रादि माझें, असें "अहम्-मम्" या शब्दांनीं मोठमोठ्यानें बरळतो, विषयसाक्षेप भोग्य सुखासाठीं भवस्वर्गाच्या रानांत धांवतो, त्या धांवत्या चैतन्यास 'क्षर पुरुष' असें नांव आहे. यांसच 'क्षेत्रज्ञ' असेंहि म्हणतात व "जग जीवु कां म्हणे । जिये दशेतें ॥" यासच 'जीव'हि म्हणतात. तत्त्वतः चैतन्य हें अविनाशी आहे. त्याचा क्षय कधींच होत नसतो. म्हणून 'क्षरत्वा'चा त्या चैतन्यावर आलेला एक केवळ 'आळ' आहे. कारण, मायिक, काल्पनिक, नामरूपात्मक सृष्टीला सत्य मानून त्या उपाधीच्या, अज्ञानजन्य अहम्-ममाध्यासामुळेंच तो आळ आला आहे [ ४७१ ते ४९७ ].

**अक्षर-पुरुष** :- मायाविशिष्ट ईश्वर चैतन्यास 'अक्षर पुरुष' म्हणतात. हा 'अक्षर पुरुष' स्थूल सूक्ष्म चराचरात्मक विश्वाच्या उत्पत्ति-स्थिति-लयास कारण आहे. जीवदशा जेथून प्रगट होते, विश्वाची उत्पत्ति होतां होतांच ज्याची विराटरूपेंकरूनहि प्रगटतां होते. जें विशुद्ध ब्रह्मचैतन्य आणि विशाल विश्वप्रपंच यांच्या संधि भागांत आहे. किंबहुना ! ! या संसारवृक्षाचें जे 'मूळ' आहे, जे चराचराचे कारण आहे, ज्याचे 'मायासंग' हेंच लक्षण आहे. असें जें चैतन्य त्यास "अक्षर पुरुष" म्हणतात. शिवाय विश्वभ्रांति मावळली म्हणजे अन्यथा ज्ञान, विपरीत ज्ञान गेलें; पण यथार्थ आत्मबोधमात्र प्रकाशित झालेला नाहीं, अशी जी मधली संधीभागांतील केवळ घन अज्ञानावस्था त्यास 'अक्षर पुरुष' असें म्हणतात [ ४९८ ते ५२४ ].

**उत्तम-पुरुष**:-अत्यन्त निर्विशेष, निरुपाधिक चैतन्य हेंच उत्तम पुरुषाचें स्वरूप होय. अग्नि काष्ठांना जाळून स्वतःहि नाहींसा होतो. त्याप्रमाणें अज्ञान नाहींसें करून स्वतः ज्ञानहि नाहींसें होते. आणि मग शेवटीं "एसें जाणणेवीण उरले । जाणते जें ॥" तें 'स्वरूपभूत ज्ञान' म्हणजेच 'उत्तम पुरुष' होय, बिंब व प्रतिबिंब या दोघांत समानरूपानें असणारी प्रभा ती जरी प्रतीतीस येत नसली तरी ती जशी आहेच किंवा नाक व फूल यांच्या मध्यें सुगंध जसा सामान्यरूपानें असतो, तो डोळ्यांना दिसत नाहीं; तरीपण तो 'नाहीं' असें म्हणतां येत नाहीं. त्याप्रमाणें द्रष्टृत्व व दृश्यत्व साक्षेप धर्म ज्याचे ठिकाणीं नाहींत, अशी भरीव 'दृङ्मात्र' अत्यन्त निर्विशेष सतसामान्य वस्तु जिला 'नाहीं' म्हणता येत नाहीं. जेथें 'सोऽहम्' तेंही मावळले जातें. परमार्थतः द्रष्टा-दृश्य-भावविरहित असलेले, स्वरूपभूत, स्वयंप्रकाश ज्ञान कीं, जें कल्पित द्रष्ट्यांत व दृश्यांत अधिष्ठान रूपानें समान व्याप्त आहे; हे स्वरूपभूत, स्वयंप्रकाश ज्ञान म्हणजेच 'उत्तम पुरुष' होय.

सारांश, जागृति-स्वप्न-सुषुप्ति या अवस्थात्रयाहून अतीत, द्वैत-अद्वैत, आहे-नाहीं या सापेक्ष भावांहून वा द्वंद्वात्मक जाणीवेहून पलीकडे, प्रमाण-प्रमेयभाव विवर्जित, क्षर-अक्षर म्हणजे अनुक्रमें कार्य-कारण यांहून अतीत जी सामान्यज्ञानस्वरूप स्थिति, त्या स्थितीसच 'उत्तम पुरुष' म्हणतात. या विशुद्ध स्वरूपाचें ठिकाणीं बद्धता नाहीं व तत्सापेक्ष मुक्तताहि नाहीं; अध्यारोप नाही व ततसापेक्ष अपवादहि नाहीं. जीव नाहीं व ततसापेक्ष ईश्वरहि नाहीं; दृश्य नाहीं व ततसापेक्ष द्रष्टाहि नाहीं, ही द्वैतात्मक सापेक्ष भाषा या निरपेक्ष अद्वय ब्रह्म स्थितींत मुळींच संभवत नाहीं कारण, द्वैत हे तत्त्वता स्वतंत्र अस्तित्वांत नसून त्याचा तेथे अत्यंताभाव आहे. अशा आश्रय-विषय रहित, त्रिपुटी रहित, शब्दमर्यादेहून अतीत, स्वयंप्रकाश, ब्रह्मचैतन्यासच 'उत्तम पुरुष' म्हणतात.

द्वैत व ततसापेक्ष अद्वैत याहून पलिकडचा म्हणून यास "परमात्मा" म्हणतात. याचे आत्मत्वानें दर्शन झाल्यावर द्रष्टाच नाहींसा होतो, मग त्याचे शब्दद्वारां कोण कसें वर्णन करणार ! कारण, तो स्वयंप्रकाश असल्यामुळें त्यास अज्ञानकृत आवरणरूप प्रमेयत्वच नाहीं त्यामुळें तो उत्तम पुरुष कोणत्याहि प्रमाणाला विषय होत नाहीं. याचा अर्थ, तो 'नाही' किंवा "तो अभाव रूप आहे" म्हणून त्यांस शब्दांकित करून सांगतां येत नाहीं, असा मात्र नाहीं. विश्वाकार विनाश पावला तरी तो नाश पावत नाहीं. संपूर्ण विश्व त्या स्वयंप्रकाश उत्तम पुरुषाच्या सत्तेनें सत्तावान् होते व त्याच्याच प्रकाशानें प्रकाशित होते. तो सदा, सर्वत्र समव्याप्त आहेच. क्षर-अक्षर पुरुषांहून म्हणजे कार्य कारणात्मक उभय उपाधींहून वेगळा, असा जो मी त्या मला वेद व लोक 'पुरुषोत्तम' म्हणतात [ ५२५ ते ५५७ ].

या प्रकारें क्षराक्षरातीत कार्य–कारणोपाधिरहित, निरुपाधिक उत्तम पुरुषाचें आत्मत्वानें 'अपरोक्ष' ज्ञान झालें म्हणजे जागे झाल्यावर जसें स्वप्न पार नाहींसें होतें; त्याप्रमाणें "स्फुरते त्रिभुवन वावो झाले" म्हणजे ब्रह्म-भिन्न भासणारे त्रिभुवन बाधित झाले; किंवा माळच हातीं घेतली म्हणजे अधिष्ठानाचें अपरोक्षज्ञान झालें म्हणजे तिच्यावर झालेला सर्पाभास नाहींसा होतो. [ कारण, जगत् सत्यत्वभ्रांति ही अपरोक्ष प्रत्यक्ष स्वरूपाची आहे. त्यामुळें त्या प्रत्यक्ष–भ्रांतींचें निवर्तक अधिष्ठान ज्ञानहि प्रत्यक्षच असावें लागतें ] त्याप्रमाणें, माझें यथार्थ साक्षात्कारात्मक ऐक्यज्ञान झाल्यावर दृढमिथ्यात्व निश्चय झाल्यानें टवाळ–मिथ्या जगदाभासानें तो फसत नाहीं. असा सच्चिदानंदस्वरूप परमात्मा मीच आहे, असें जीव ब्रह्मात्मैक्यज्ञान चित्तांत उदयास आले म्हणजे सर्व जगत् परमात्म्यानें ओतप्रोत भरलेलें आहे असा व्यापक बोध होतो अर्थात् मग सर्वत्र स्वतः सिद्ध, सच्चिदानंद परमात्माच ओतप्रोत आहे, असें आपण व विश्व हेंहि त्याहून भिन्न न समजतां तो जाणतो, अशी सर्वत्र ब्रह्मभावरूप व्यापक अनुभूति हीच सर्व प्रमाणाचें अन्तिम फल आहे, हीच सर्व साधनाचें अंतिम साध्य आहे. संपूर्ण वेदांचे तात्पर्य व्यासांनीं षड्लिंगपूर्वक विचार करून काढले, गीता ग्रंथांत अथपासून इतिपर्यंत जी एकमेवाद्वितीय वस्तु सांगितली ती उपनिषद्रूप–कमळांतील सुगंध आहे. गीता ही ज्ञानामृताची गंगा आहे, आनंद चंद्राची सतरावी जीवनकला आहे वा विचाररूपी क्षीरार्णवाचे मंथन करून बाहेर काढलेली जणुं दुसरी लक्ष्मीच आहे, म्हणून ही गीतारूपी लक्ष्मी माझ्याशीं [ भगवंताशीं ] अनन्य असणारी पतिव्रता आहे. म्हणून ती आपल्या पदांनीं, वर्णांनीं व आपल्या अर्थाच्या जीवप्राणांनीं माझ्याशिवाय कांहींच जाणत नाहीं. क्षराक्षर हे 'गीतेनें आपणांस वरावे म्हणून समोर आले, पण ते सर्व सोपाधिक असेच आहेत.' म्हणून "तयाचे पुरुषत्व वाळिले" आणि मग पद–वर्ण इत्यादि "सर्वस्व मज दिधलें पुरुषोत्तमीं" [ "संपूर्ण अठरा अध्यायांत विभागलेल्या सातशे श्लोकात्मक गीतेचे मुख्य तात्पर्य 'अद्वयब्रह्म प्रतिपादनांतच असल्याचे लक्ष्मीच्या रूपकानें सांगितले आहे. सर्व गीतेंतील श्लोक, बाह्यतः वेगवेगळे दिसले तरी त्यांतील सिद्धांत, प्रमेय एक ब्रह्मच आहे. म्हणून सर्व श्लोक साक्षात् किंवा परंपरेनें एकमेवा-द्वितीय ब्रह्मरूप, त्रिकालाबाधित तत्त्वार्थाचेच प्रतिपादन करतात, माझ्या निरुपाधिक उत्तम पुरुषाचें ऐक्यज्ञानद्वारां हे सर्व ब्रह्मरूप आहे. अशा व्यापकानुभूतीवर सर्वांनीं आरूढ व्हावे ] या अभेदज्ञान लक्षणात्मक गुरुवीभक्तीचे हे गुह्यतम् शास्त्र आहे. अर्जुना ! ! तूं श्रद्धावान्, एकविधभावाचा, शुद्धमति आहेस. म्हणून तुला हे गुह्यतम शास्त्र सांगितलें माझे "गौप्यधन" तुला दिले. गीता ग्रंथ हा केवळ शाब्दिक चर्चेचा, पाण्डित्याचा ग्रंथ नसून त्यांतील परमात्मतत्त्व अंगानें, आत्मत्वानें जाणून भगवत्स्वरूप होण्याचा ग्रंथ आहे. याप्रमाणें हा यथार्थ जो जाणील तो समस्त मोहापासून मुक्त होऊन कृतकृत्य होईल व चिरस्थिर ब्रह्मस्थितीस प्राप्त होईल [ श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात ] श्रीहरीच्या मुखांतून निघालेली अक्षरें बोधामृतपूर्ण असून ते बोधामृत श्रीव्यासमुनींचे कृपेनें संजयासहि लाभत होते व संजय धृतराष्ट्राला ती बोधामृत पूर्ण अक्षरें सांगत होता; पण धृतराष्ट्र अनधिकारी होता त्यामुळें त्याप्रसंगीं [त्या अक्षराचा] धृतराष्ट्राला उपयोग झाला नाहीं; तरीपण या बोधामृत श्रवणामुळें 'जीवितान्तु तया । नव्हेचि भारी' मीहि तो संवाद मराठी भाषेंत 'ठसें ठोंवसें उन्मेषें' सांगितला. यांत जे शास्त्रसंवादी प्रमेय असतील ते आपण स्वीकारावेत, उणे असेल ते माझ्या पदरीं घावे. मी आपले लेकरूं आहे. मी लडीवाळपणें ग्रंथरूपानें बोलत आहे व त्याचे आपण मोठ्याप्रेमानें कौतुक करीत आहां, हा आपला मायबापांचा स्वभावच आहे. आतां माझा हा विश्वात्मक श्रीगुरु निवृत्तिराजा तो माझी ही शब्दात्मक 'वाङ्पूजा' ऐको । असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात [ ९९८ ते ९९९ ].

[ या संपूर्ण पंधराव्या अध्यायाचा नकाशा क्रमांक १८ पहावा ].



# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय सोळावा

मावळवीत विश्वाभासु । नवल उदयला चंडांशु । अद्वयाब्जिनीविकाशु । वंदूं आतां ॥ १ ॥ जो अविद्याराती रुसोनियां गिळी ज्ञानाज्ञानचांदणिया । जो सुदिनु करी ज्ञानियां । स्वबोधाचा ॥ २ ॥ जेणें विवळतिये सवळे । लाहोनि आत्मज्ञानाचे डोळे । सांडिती देहाहंतेचीं अविसाळें । जीवपक्षी ॥ ३ ॥ लिंगदेहकमळाचा । पोटीं वेंचु तया चिद्भ्रमराचा । बंदिमोक्षु जयाचा । उदैला होय ॥ ४ ॥ शब्दाचिया आसकडीं । भेद नदीच्या दोहीं थडीं । आरडाते विरहवेडीं । बुद्धिबोधु ॥ ५ ॥ तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें समाधान । भोगवी जो चिद्गगन । भुवनदिवा ॥ ६ ॥ जेणें पाहालिये पाहांटे । भेदाची चोरवेळ फिटे । रिघती आत्मानुभववाटे । पांथिक योगी ॥ ७ ॥ जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेखसूर्यकांतु फुणगे । दीपले जाळिती दांगें । संसाराचीं ॥ ८ ॥ जयाचा रश्मिपुंजु निबरु । होता स्वरूप उखरीं स्थिरु । ये महासिद्धीचा पूरु । मृगजळ तें ॥ ९ ॥ जो प्रत्यग्बोधाचिया माथैंया । सोऽहंतेचा मध्यान्हीं आलिया । लपे आत्मभ्रांतिछाया । आपणपां तळीं ॥ १० ॥ ते वेळीं विश्वस्वभासहितें । कोण अन्यथामती निद्रेतें । सांभाळी नुरेचि जेथें । मायाराती ॥ ११ ॥ म्हणौनि अद्वयबोधपाटणीं । तेथ महानंदाची दाटणी । मग सुखानुभूतीचीं घेणीं देणीं । मंदावों लागती ॥ १२ ॥ किंबहुना ऐसैसें । मुक्तकैवल्य सुदिवसें । सदा लाहिजे कां प्रकाशें । जयाचेनि ॥ १३ ॥ जो निजधामव्योमींचा रावो । उदैलाचि उदैजतखेंवो । फेडी पूर्वादि दिशांसि ठावो । उदोअस्तूचा ॥ १४ ॥ न दिसणें दिसणेंनसीं मावळवी । दोहीं झांकिलें ते सैंघ पालवी । काय बहु बोलों ते आघवी । उखाचि आनी ॥ १५ ॥ तो अहोरात्रांचा पैलकडु । कोणें देखावा ज्ञानमार्तंडु । जो प्रकाश्येंवीण सुरवाडु । प्रकाशाचा ॥ १६ ॥ तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती । आतां नमों म्हणों पुढतपुढती । जे

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय सोळावा

श्रीसद्गुरूला सूर्याची उपमा देऊन महाराज म्हणतात- विश्वाच्या आभासास नाहींसा [ बाधित ] करणारा व अद्वैत स्थितिरूप कमलाला सत्वरदळीं, संपूर्णतया उमलविणारा असा अत्यंत आश्चर्यकारक सूर्योदय झाला आहे, त्याला माझा नमस्कार असो ! १. जो श्रीगुरुरूपी सूर्य उगवल्यामुळें अज्ञानरूप रात्रीचा नाश करून व ज्ञान व अज्ञानरूपी चांदण्या नाहींतशा करून ज्ञानी लोकांस विचारवान् मुमुक्षूस आत्मबोधाचा संशय विपर्ययात्मक अभ्ररहित सुदिन करतो; २. जो सूर्य उगवल्यामुळें प्रकाशित होणाऱ्या प्रातःकालीं आत्मज्ञानाची दृष्टि प्राप्त होऊन जीवरूपी पक्षी 'मी देह आहे' अशीं देहाभिमानरूप घरटीं सोडून जातात ३. वासनात्मक लिंगदेह-सूक्ष्मदेहरूपी कमलाच्या पोटांत जीवचैतन्यरूपी भ्रमर जो अविद्येनें अडकलेला असतो, त्याची ज्या श्रीगुरुरूपी सूर्याच्या उदयामुळें लिंगदेहात्मक बंधनापासून मुक्तता होते ४. शब्दरूप शास्त्रादिकांच्या विसंवादात्मक अडचणीमध्यें सांपडतांच अज्ञानरूप सायंकाळ झाल्यामुळें ज्या बुद्धि व बोध हेच कोणी चक्रवाक पक्षी त्या पक्ष्यांच्या जोड्यांची फुटाफूट होऊन तीं उभयतां [जीवेश्वर] भेदरूप नदीच्या दोन्ही काठांवर एकमेकांच्या भेटीकरितां वियोग दुःखानें ओरडत असतात ५. त्या बुद्धि व बोधरूपी चक्रवाक पक्ष्यांचे जोडप्याला चिदाकाशरूपी भुवनांतील ह्या श्रीगुरुरूपी सूर्योदयाच्या प्रकाशामुळें एकत्र मिळवून ऐक्याचें समाधान भोगवितो ६. ज्या श्रीगुरुरूप सूर्योदयामुळें उजाडलेल्या पहाटेच्या वेळीं भेदरूपी चोरवेळाहि नाहींशी होते व योगी, साधक हेच कोणी पांथस्थ ते आत्मानुभवरूप वाट चालावयास लागतात ७. ज्या श्रीगुरुरूपी सूर्याच्या विवेकरूपी किरणांच्या संबंधानें ज्ञानरूपी सूर्यकांत मण्यांतून निघालेल्या ठिणग्या प्रदीप्त होऊन त्या संसाररूपी वनें जाळून टाकतात ८. ज्या श्रीगुरुरूपी सूर्याच्या प्रखर किरणांचा समुदाय ब्रह्मस्वरूपरूपी माळजमिनीवर स्थिर झाला असतां महासिद्धिरूपी मृगजळाचा पूर आलेला दिसतो ९. 'तें ब्रह्म मी आहें' अशा [ वृत्तिज्ञानात्मक ] माध्यान्हकाळीं [ शिष्याच्या ] प्रत्यग् बोधरूपो [ सर्वत्र अंतर्यामीरूपानें समव्याप्त-असणाऱ्या ब्रह्मभावाचा आत्मत्वानें होणाऱ्या बोधात्मक ] माथ्यावर श्रीगुरुरूपी सूर्य आला असतां [ शिष्याची ] आत्मस्वरूप विषयक-भ्रांति [ देहात्मत्व भ्रांति ] हीच कोणी एक छाया ती [ ब्रह्मात्मैक्य बोधरूपी ] पायाखालीं दडून लपते १०. त्यावेळेस अशीं मायारूपी रात्रच उर्वरित राहात नाहीं. तर मग [ त्या रात्रींतील ] विश्वरूपी भास, स्वप्नासह, विपरीत ज्ञानरूपी निद्रेचा सांभाळ-आठवण कोण करणार ! ११. म्हणून त्या अद्वयबोधरूपी नगरांत महानंदाची दाटी-विपुलता होऊन आनंदानुभवाची देववेवहि मंद होऊं लागते १२. किंबहुना ! याप्रमाणें मुक्त कैवल्यरूपी [ भ्रम निवर्तक 'सोऽहम्' वृत्तिरूप बद्धकैवल्यसापेक्ष वृत्तिशून्य दृङ्मात्र ब्रह्मस्थितिरूपी ] उत्तम दिवस नेहमी ज्या श्रीगुरुरूप सूर्याच्या तेजामुळें प्रकाशित होतो १३. जो श्रीगुरुरूपी सूर्य निजात्मस्वरूपरूपी आकाशाचा राजा असून नित्य बोधरूपानें त्याचा उदय सदा असतोच तथापि भ्रमनिवृत्तिनंतर त्याजवर उदय झाल्याचा व्यवहार मात्र होतो. तो उदय झाल्याबरोबर पूर्वादि दिशांसह उदय व अस्त या सापेक्ष धर्मांचे अस्तित्वच नाहींसे करतो १४. न दिसणें-अबोध-अज्ञान दिसण्यासह-ज्ञानासकट नाहीसे करून शेवटीं सर्वत्र आत्मज्ञानाचा उजेड करितो व या दोहोंनीं [ अज्ञान व तत्सापेक्ष त्रिपुटीरूपज्ञानानें ] झांकलेलें ते 'भरीव ज्ञान घन स्वरूप' [ प्रमाण प्रमेय भावरहित स्वयंप्रकाश स्वरूप सर्वत्र प्रगट करतो ] फार काय सांगावे ! ! या श्रीगुरुरूपी सूर्याच्या उदयाचा प्रकार भौतिक सूर्यापेक्षां विलक्षणच आहे १५. जो श्रीगुरुरूपी सूर्य, रात्र व तत्सापेक्ष दिवस यांच्यापलीकडील म्हणजे ज्ञानाज्ञानातीत केवळ चित्स्वरूप आहे. व जो प्रकाश्य-दृश्य पदार्थाविना केवळ प्रकाशमय, प्रकाशाचा सुकाळ आहे तो ज्ञानरूपी सूर्य [ सर्व प्रमाणास अविषय असणारा ] कोणी [ कोणत्या साधनानें ] पाहावा ! [ ओळखावा ! ] १६. असे चैतन्यरूपी सूर्य जे श्रीगुरुनिवृत्तिमहाराज

बाधका येइजतसे स्तुती । बोलाचिया ॥ १७ ॥ देवाचें महिमान पाहोनियां । स्तुती तरी येईजे चांगावयां । जरी स्तव्यबुद्धीसीं लया । जाईजे कां ॥ १८ ॥ जो सर्वनेणिवां जाणिजे । मौनाचिया मिठीया वानिजे । कांहींच न होनि आणिजे । आपणपयां जो ॥ १९ ॥ तया तुझिया उद्देशासाठीं । पश्यंती मध्यमा पोटीं । रिघोनि परेसीहि पाठीं । वैखरी विरे ॥ २० ॥ तया तूतें मी सेवकपणें । लेववीं बोलकेया स्तोत्राचें लेणें । हें उपसाहावेंही म्हणतां उणें । अद्वयानंदा ॥२१॥ परी रंकें अमृताचा सागरु । देखिलिया पडे उचिताचा विसरु । मग करूं धांवे पाहुणेरु । शाकांचा तया ॥ २२ ॥ तेथ शाकुही कीर बहुत म्हणावा । तयाचा हर्षवेगुचि तो घ्यावा । उंजळोनि दिव्यतेजा हौतिवा । ते भक्तीचि पाहावी ॥ २३ ॥ बाळा उचितें जाणणें होये । तरी बाळपणचि कें आहे ? । परी साचचि येरी माये । म्हणौनि तोषे ॥ २४ ॥ हां गा गांवरसें भरलें । पाणी पाठीं पाय देत आलें । तें गंगा काय म्हणितलें । परतें सर ? ॥ २५ ॥ जी भृगूचा कैसा अपकारु । कीं तो मानूनि प्रियोपचारु । तोषेचिना शार्ङ्गधरु । गुरुत्वासीं ? ॥ २६ ॥ कीं आंधारें खेंतेलें अंबर । झालेया दिवसनाथासमोर । तेणें तयातें पऱ्हा सर । म्हणितलें काई ? ॥ २७ ॥ तेवीं भेदबुद्धीचिये तुळे । घालूनि सूर्यश्लेषाचें कांटाळे । तुकिलासि तें येकी वेळे । उपसाहिजो जी ॥ २८ ॥ जिहीं ध्यानाचा डोळां पाहिलासी । वेदादि वाचां वानिलासी । जें उपसाहिलें तयासि । तें आम्हांही करीं ॥ २९ ॥ परी मी आजि तुझ्या गुणीं । लांचावलों अपराधु न गणीं । भलतें करीं परी अर्धधणीं । नुठी कदा ॥ ३० ॥ मियां गीता येणें नांवें । तुझें पसायामृत सुहावें । वानूं लाधलों तें दुणेन थावें । दैवलों दैवें ॥ ३१ ॥ माझिया सत्यवादाचें तप । वाचा केलें बहुत कल्प । तया फळाचें हें महाद्वीप । पातली प्रभु ॥ ३२ ॥ पुण्यें पोशिलीं असाधारणें । तियें तुझें गुण वानणें । देऊनि मज उत्तीर्णें । जालीं आजी ॥ ३३ ॥ जी जीवित्वाच्या आडवीं । आतुडलों होतों मरणगांवीं । ते अवदसाचि आघवी । फेडिली आजी ॥ ३४ ॥ जे गीता येणें नांवें नावाणिगी । जे अविद्या जिणोनि दाटुगी । ते कीर्ती तुझी आम्हांजोगी । वानावया जाली ॥ ३५ ॥ पैं निर्धना घरीं वानिवसें । महालक्ष्मी येऊनि बैसे । तयातें निर्धन ऐसें । म्हणों ये काई ? ॥ ३६ ॥ कां अंधकाराचिया ठाया । दैवें सुर्यु

त्यांना माझा नमस्कार असो ! श्रीज्ञानेश्वरमहाराज आणखी म्हणतातः--त्यांचीं वाणीनें शब्द-द्वारां केलेली स्तुति ही बाधकतेस येते म्हणून ती शोभत नाहीं १७. कारण ज्या वेळेस स्तव्य बुद्धिसह स्तुति करणारा स्तोत्र व स्तव्य ही त्रिपुटीच नाहींशीं होते, तेव्हांच श्रीगुरुदेवाच्या महतीच्या योग्यतेच्या मानाने खरी स्तुति होते १८. कांहीं न जाणणें, सर्व वस्तूंचें ज्ञान नाहींसें होणें, हेंच ज्याला जाणणें होय व मौन धरून [ वा बोलण्याच्या सापेक्ष असें मौन टाकून ] कांहीं एक वर्णन न करणें, हेंच ज्याचें वर्णन करणें होय आणि आपण कांहींच न होऊन ज्या श्रीगुरूंना आपल्या ठिकाणीं आणतां येते म्ह० त्यावेळेसच ज्यांचीं आत्मत्वानें प्राप्ति होते १९. त्या तुमची स्तुति करण्याच्या हेतूनें पश्यंति व मध्यमा ह्या वाचा परेसह वैखरीस पोटांत घालून लय पावतात २०. अशा त्या तुम्हाला, हे अद्वयानंदरूपी गुरो ! मी सेवकपणाच्या नात्यानें शब्दांचें स्तुतिरूपी अलंकार घालतो. हेंहि कमीपणाचें असल्यामुळें तो माझा अपराधच आहे; तरीपण ते सहन करून त्याचा आपण स्वीकार करावा २१. कारण, एखाद्या दरिद्र्यास अमृताच्या सागराचें दर्शन झाल्यावर तो त्याच्या योग्यतेनुसार त्याचा स्वतः आपण पाहुणचार करणार; पण त्याला स्वतःचेच भान न राहतां तो जसा भाजीपाल्याचीच त्यास मेजवानी करण्याचा प्रयत्न करितो २२. त्या ठिकाणीं भाजीपाल्याची किंमत मनांत न आणतां पक्वान्न समजून त्याच्या हर्षनिर्भर होऊन पाहुणचार करण्याच्या पूर्ण उत्कट इच्छेचीच विशेष किंमत मानली पाहिजे अथवा सूर्याला काडवातीनें त्याच्या दिव्य तेजापुढें कोणी ओवाळूं लागला असतां, त्या ठिकाणीं काडवातीच्या उजेडाचा कमीपणा मनांत न आणतां, त्याची भक्तीच विशेष मानून पाहिली पाहिजे २३. लहान बालकाला योग्य काय व अयोग्य काय हें जर समजलें तर मग बाळपण तें काय? पण त्याच्या कृत्यांचेंच त्याची मातुश्री कौतुक मानून खरोखर संतोष पावते २४. असें पहा, पायानें तुडवलेल्या गांवातील नाल्याच्या पाण्याचें लोट गंगेच्या पाण्यावर पाय देऊन आंत घुसले, तर ती त्याला " तूं घाण पाणी आहेस बाजूला हो ! परत जा, " असें कां म्हणतें ? २५. महाराज ! भृगुऋषींनीं श्रीकृष्णाच्या हृदयावर लाथ मारली, हा खरोखर पाहूं गेलें असतां केवढा चीड आणण्यासारखा अन्याय त्यांनीं केला ? परंतु उलटा तोच प्रेमानें दिलेला उपचार, अलंकार समजून श्रीकृष्ण आपल्या हृदयावर श्रीगुरुप्रसाद म्हणून श्रीवत्सलांछन चिन्ह बाळगल्यामुळें संतोष पावलें नाहींत काय ? २६. किंवा अंधारानें भरलेलें जग सूर्यासमोर आल्याबरोबर उजेडानें भरतें, त्या वेळेस सूर्यानें अंधारास वा त्या आकाशास ' मार्गे सर रे ' म्हणून म्हटलें आहे काय ? २७. त्याचप्रमाणें हे श्रीगुरो ! भेदबुद्धीचा तराजू करून त्याच्या एका पारड्यांत तुम्हांला व सूर्याला एका पारड्यांत घालून तुमची त्याच्याशीं तुलना केली, ह्या माझ्या हातून घडलेल्या अपराधाची श्रीगुरो, आपण एकवेळ क्षमा करावी ! २८. अहो ! योग्यांनीं ध्यानाच्या डोळ्यांनीं तुला पाहिले, तुमचीं प्राप्ति करून घेतली व वेदादिकांच्या वाचेकडून तूं वर्णन केला गेला आहेस त्यांस जें जसें तुम्हीं सहन केलें तें आम्हांसहि करा. [ मी जी तुमची तुलना केली, त्याची क्षमा करा; ] २९. परंतु तुमचें गुणानुवाद वर्णन करण्यास मी सवकलों आहे, म्हणून स्तुति केल्यावांचून मला रहावतच नाहीं. तर तो माझा अपराध न समजतां त्याबद्दल आपण काय पाहिजे तें करा; परंतु मी अर्धपोटीं उठणार नाहीं. [ तृप्ति होईपर्यंत आपली स्तुति केल्याशिवाय राहणारच नाहीं ] ३०. मी गीतारूप आपल्या प्रसादामृताचें आवडीनें सेवन करावें म्हणून ते वर्णन करूं लागलों, तों तुमच्या कृपेनें मला दुप्पट बळ आलें यावरून मी मोठा भाग्यवानच झालों ३१. प्रभो ! माझ्या वाचेनें अनंत कल्पपर्यंत परमात्म प्रतिपादनादि सत्यभाषणाचें तप केलें, त्या तपाचें फळ हें गीतानामक महाद्वीप मला मिळालें ३२. मी आजपर्यंत जी लोकोत्तर बहुत पुण्याई केली, तिनें तुमचें गुणानुवाद वर्णन करणें, हेंच फळ मला देऊन तीं माझी पुण्य कर्में आज ऋणांतून उतराई झाली ३३. मी देहसंबंधामुळें जीवदशेच्या अरण्यांतील जन्ममरणरूपीं गांवात सांपडलों होतों; ती सर्व माझी पीडा व दुर्दशा आज [ आपण ] पार दूर केलीत ३४. कारण जी ' गीता ' या नांवानें प्रसिद्ध आहे व अविद्येचा नाश करून बलवान् झाली आहे, ती गीतारूपी तुमची कीर्तिच होय. आम्ही वर्णन करण्यासारखी ती झाली आहे ३५. दरिद्र्याचे घरीं आकस्मात् सहज महालक्ष्मीच जर येऊन बसली तर मग त्याला दरिद्री म्हणतां येईल काय ? ३६. अथवा अंधाराच्या

१ वर्णन करण्यासाठीं. २ स्तुतीचा विषय बुद्धीसह नाहींसा झाला तरी. ३ चार वाणींतील दुसरी. ४ चार वाणींतील तिसरी. ५ पाठीमागें घालून. ६ सहन करावें, स्वीकारावें. ७ भिकाऱ्यानें. ८ योग्यायोग्यतेचा. ९ मेजवानी. १० लावून. ११ सूर्य. १२ काडवात. १३ योग्यायोग्य. १४ नाल्याच्या पाण्यानें. १५ अन्याय. १६ गुरुप्रसादाला. १७ भरलें.

आलिया । तो अंधारुचि जगा यया । प्रकाशु नोहे ? ।। ३७ ।। जया देवाची पाहतां थोरी । विश्व परमाणुही दशा न धरी । तो भांवाचिये संरोभरी । नव्हेचि काई ? ।। ३८ ।। तैसा मी गीता वाखाणी । हे खंपुष्पाची तुरंबणी । परी समर्थे तुवां शिरयोणी । फेडिली ते ।। ३९ ।। म्हणौनि तुझेनि प्रसादें । मी गीतापंद्यें अगाधें । निरूपीन जी विशदें । ज्ञानदेवो म्हणे ।। ४० ।। तरी अध्यायीं पंधरावा । श्रीकृष्णें तया पांडवा । शास्त्रसिद्धांतु आघवा । उगांणिला ।। ४१ ।। जे वृक्षरूपक परिभाषा । केलें उपाधि रूप अंशेषा । सद्वैद्यें जैसें दोषा । अंगेलीना ।। ४२ ।। आणि कूटस्थु जो अक्षरु । दाविला पुरुषप्रकारु । तेणें उपहितेंाही आकोरु । चैतन्या केला ।। ४३ ।। पाठीं उत्तम पुरुष । शब्दाचें करूनि मिष । दाविलें चोख । आत्मतत्त्व ।। ४४ ।। आत्मविषयीं आंतुवटें । साधन जें आंगदटें । ज्ञान हेंही स्पष्ट । चावळेंला ।। ४५ ।। म्हणौनि इये अध्यायीं । निरूप्यें नुरेचि कांहीं । आतां गुरुशिष्यां दोहीं । स्नेहो लाहेणा ।। ४६ ।। एवं इयेविषयीं कीर । जाणते बुझावेले अपार । परी मुमुक्षु इतर । साकोंक्ष जाले ।। ४७ ।। त्या मज पुरुषोत्तमा । ज्ञानें भेटे जो सुवर्मा । तो सर्वज्ञु तोचि सीमा । भक्तीचीही ।। ४८ ।। ऐसें हें त्रैलोक्यनायकें । बोलिलें अध्यायांत श्लोकें । तेथें ज्ञानचि बेंहुतेकें । वानिलें तोषें ।। ४९ ।। भरूनि प्रपंचाचा घोंटु । कीजे देखतांचि देखतया द्रष्टु । आनंदसाम्राज्यीं पोंटु । बांधिजे जीवा ।। ५० ।। येवढेया लाठेपणांचा उपावो । आनु नाहींचि म्हणे देवो । हा सम्यक् ज्ञानाचा रावो । उपायांमाजीं ।। ५१ ।। ऐसे आत्मजिज्ञासु जे होते । तिहीं तोषलेनि चित्तें । आदरें तया ज्ञानातें । वोंवाळिलें जीवें ।। ५२ ।। आतां आवडी जेथ पडे । तयाची अवसेंरी पुढें पुढें । रिगों लागे हें घडे । प्रेम ऐसें ।। ५३ ।। म्हणौनि जिज्ञासूंच्या पैकीं । ज्ञानी प्रेतीति होय ना जंव निकी । तंव योग क्षेमु ज्ञानविखीं । स्फुरेलचि कीं ।। ५४ ।। म्हणौनि तेंचि सम्यक् ज्ञान । कैसेनि होय स्वाधीन । जालिया वृद्धियत्न । घडेल केवीं ।। ५५ ।। कां उपजोंचि जें न लाहे । जें उपजलेंही अव्हांटा सूये । तें ज्ञानीं विरुद्ध काय आहे । हें जाणावें कीं ।। ५६ ।। मग जाणतया जें विरू । तयाची वाट वाहती करूं । ज्ञाना हित तेंचि विचारूं । सर्वभावें ।। ५७ ।। ऐसा ज्ञानजिज्ञासु तुम्ही समस्तीं । भावो जो धरिला असे

जागीं दैवयोगानें सूर्यच पाहुणा आला तर तो अंधकारच जगाला प्रकाशमय होणार नाहीं काय ? ३७. ज्या ईश्वराची योग्यता पाहिली असतां त्यापुढे एवढे अफाट जग हें,परमाणुएवढेंहि दिसत नाहीं तो ईश्वर भक्तीनें भक्तांच्या इच्छेनुरूप पाहिजे तें रूप धारण करीत नाहीं काय? ३८. त्याचप्रमाणें मी गीतेचें व्याख्यान करणे म्हणजे आकाशाच्या पुष्पांचा वास घेण्यासारखी अघटित करणी तर खरीच; परंतु आपण समर्थ असल्यामुळें माझी ती हौस पूर्ण केली ३९. म्हणून महाराज! आतां तुमच्याच प्रसादानें गीतेंतील प्रसन्नगंभीर अशा सर्व श्लोकांचा अर्थ मी स्पष्ट सांगेन, असें श्रीज्ञानदेव म्हणतात ४०. यापुढें अध्याय संगति सांगतात. तरी पंधराव्या अध्यायांत श्रीकृष्णांनीं त्या अर्जुनास सर्व शास्त्रसिद्धांत स्पष्ट करून सांगितला आहे ४१. कारण, ज्याप्रमाणें अंगांत मुरलेल्या रोगाची उत्तम वैद्यानें चिकित्सा करून रोग निदान ठरवावें त्याप्रमाणें [ निरुपाधिक ब्रह्मज्ञान व्हावें म्हणून कार्य कारणात्मक ] उपाधींचें स्वरूपच; पण त्यांची वृक्षाबरोबर रूपकानें संपूर्ण तुलना करून सांगितलें ४२. आणि असा जो देहांतील जीवात्मा तो पुरुष या शब्दानें स्पष्ट करून सांगितला. त्यानें उपाधियुक्त जें [ क्षराक्षर ] चैतन्य त्याचेंही ज्ञान करून दिलें ४३. नंतर पुढे केवळ शुद्ध जें आत्मतत्त्व [ब्रह्म] तें 'उत्तम पुरुष' या शब्दाचे निमित्त करून स्पष्ट केलें आहे ४४.आत्मप्राप्तीकरितां अंतरंग व बळकट [ निश्चित चरमफल पर्यवसायी ] श्रेष्ठ साधन जें ब्रह्मात्मैक्य ज्ञान, तेंहि स्पष्ट करून सांगितले ४५. म्हणून आतां या अध्यायांत निरूपण करण्याचें असें कांहींच उरलें नाहीं हे खरें; तरीपण आतां गुरु व शिष्य यांच्या स्नेहातिशयामुळें बोललेलीच गोष्ट पुनः बोलण्यांत येत आहे ४६. याप्रमाणें पंधराव्या अध्यायांत सांगितलेल्या सर्व गोष्टी असंख्य ज्ञान्यांना पूर्ण रीतीनें समजून आल्या, पटल्या; परंतु त्यांच्याहून इतर जे कांहीं मुमुक्षु होते, ते या विषयीं उत्सुक, तीव्रेच्छावान् झाले ४७. कारण, हे मर्मज्ञ अर्जुना! 'असा जो मी पुरुषोत्तम त्याला जो चतुर पुरुष ब्रह्मज्ञानाच्या साधनानें प्राप्त करून घेऊन आत्मत्वानें भेटतो तोच सर्वज्ञ आहे व तो पुरुषच खरा भक्तश्रेष्ठ वा भक्तीची सीमाहि होय. ४८. असें त्रैलोक्यनायक भगवान् श्रीकृष्णांनीं पंधराव्या अध्यायाच्या शेवटल्या श्लोकांत परमसंतोषानें बोलले. त्या प्रसंगीं त्यांनीं ज्ञानाचेंच विशेष वर्णन केलें आहे ४९. कीं ज्या ज्ञानामुळें संसाराचा घोट घेऊन-निरास करून ब्रह्मदर्शन होण्याबरोबर,पाहाणाऱ्या जीवाला त्याच्या आत्मस्वरूपाचें ब्रह्मरूपानें ज्ञान होते व त्या जीवाला आनंदरूपी साम्राज्यावर पट्टाभिषेक केला जातो ५०. असा साक्षात् ब्रह्मप्राप्तीचा एवढा बलवत्तर[निश्चित फलदायी] दुसरा उपाय नाहींच म्हणून सर्व उपायांत 'यथार्थ-ज्ञाना' चा उपाय हाच राजा आहे, असें श्रीकृष्णदेव म्हणाले ५१. याप्रमाणें आत्मज्ञानप्राप्तीची इच्छा करणारे जे जिज्ञासु होते, त्यांनीं संतोष पावलेल्या चित्तानें व आदरानें आपला प्राण-जीव ज्ञानावरून ओंवाळून टाकला ५२. आतां असें पहा कीं, ज्या वस्तुबद्दल आवड उत्पन्न होते, त्या वस्तुबद्दलच इतर सामान्य इच्छेच्या विषय असणाऱ्या वस्तूंना मागे सारून अधिकाधिक विचार मनांत पुनः पुनः घुसूं लागतात. असें प्रेमाचें लक्षणच आहे ५३. म्हणून एकंदर साकांक्ष जिज्ञासूंपैकीं ज्यांना केवळ शुद्ध संशयविपर्ययरहित ज्ञानाचा अनुभव जोपर्यंत आला नाहीं तोपर्यंत त्यांना ज्ञान कसें प्राप्त करून घ्यावें व प्राप्तीनंतर त्याचें संरक्षण-परिपालन कसें करावें अशा विषयीं काळजी वा विचार उत्पन्न होणें साहजिकच आहे ५४. म्हणून तेंच यथार्थ अपरोक्ष ब्रह्मात्मैक्य ज्ञान आपल्यास कसें प्राप्त होईल व प्राप्त झाल्यावर तें कसें वृद्धिंगत दृढ होईल ? ५५. किंवा जें ज्ञानास उत्पन्नच होऊं देत नाहींत वा उत्पन्न झालें असतांहि त्यास आडमार्गास लावतात. अशा अर्थात् ज्ञानास विघ्न करणाऱ्या विरुद्ध कोणत्या गोष्टी आहेत, हें समजलें; पाहिजे ५६. मग ज्ञानप्राप्तीच्या विरुद्ध जशी जी सामुग्री असेल तिची वाट मोकळी करून म्ह. ती सोडून देऊन ज्ञानप्राप्तीस हितकर, अनुकूल अशी कोणती सामुग्री आहे, तिचाच मनोभावानें विचार करावा ५७. याप्रमाणें ज्ञानप्राप्तीची

१ भक्तीच्या जोरावर. २ भरांत. ३ प्राप्त होत नाहीं कां ! ४ आकाश पुष्पाची. ५ वास घेणें. ६ आवड, हौस. ७ गीतेंतील श्लोक. ८ स्पष्ट. ९ सर्व. १० सांगितला. ११ सर्व. १२ अंगांत मुरलेल्या. १३ देहांतील जीव. १४ अविनाशी. १५ उपाधियुक्त. १६ स्पष्ट केलें, आकारास आणलें. १७ अंतरंग. १८ बळकट, श्रेष्ठ. १९ बोलला. २० न सांगण्याजोगें. २१ प्राप्त झाला. २२ समजाविलें. २३ शंकित. २४ मर्मज्ञा. २५ पराकाष्ठा. २६ विशेषेंकरून. २७ नाश. २८ पहात असतां, पाहणाऱ्याला [ दृष्ट किंजे ] पाहण्याचा विषय केला, पाहणाऱ्याला पाहणारा दिसला,स्वरूपबोध केला. २९ पट्टाभिषेक. ३० बलवत्तर. ३१ खऱ्या, उत्तम. ३२ आत्मज्ञानेच्छु. ३३ प्रसंग. ३४ ज्ञानेच्छूंच्या. ३५ अनुभव.

चित्तीं । तो पुरवावया लक्ष्मीपती । बोलिजेल ॥ ५८ ॥ ज्ञानासि सुजन्म जोडे । आपुली विश्रांतिही वरी वाढे । ते संपत्तीचे पवाडे । सांगिजेल दैवी ॥ ५९ ॥ आणि ज्ञानाचेनि कामांकारें । जे रागद्वेषांसि दे थांरे । तिये आसुरियेहि घोरे । करील रूप ॥ ६० ॥ सहज इष्टानिष्टकरणी । दोघींचि इया कवतुकिणी । हे नवमाध्यायीं उभारणी । केली होती ॥ ६१ ॥ तेथ साउेमा घेयांवया उवांवो । तंव वोडवलो आन प्रस्तांवो । तरी तया प्रसंगें आतां देवो । निरूपीत असे ॥ ६२ ॥ तया निरूपणाचेनि नांवें । अध्याय पद सोळावें । लावेंणी पाहतां जाणावें । मागिलावेंरी ॥ ६३ ॥ परी हें असो आतां प्रस्तुतीं । ज्ञानाच्या हिताहितीं । समर्था संपत्ती । इयाचि दोन्ही ॥ ६४ ॥ जे मुमुक्षु-मार्गींची बोळावी । जे मोहरात्रीची धर्मदिवी । ते आधीं तंव दैवी । संपत्ती ऐका ॥ ६५ ॥ जेथ एक एकातें पोखी । ऐसे बहुत पदार्थ येकीं । संपादिजती ते लोकीं । संपत्ति म्हणिजे ॥ ६६ ॥ ते दैवी सुखसंभवी । तेथ दैवगुणें येकोपंजीवीं । जाली म्हणौनि दैवी । संपत्ति हे ॥ ६७ ॥

श्रीभगवानुवाच :—

अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः । दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥

आतां तयाचि दैवगुणां- । माजीं धुरेचां बैसणा । बैसे तया आकेंर्णा । अभय ऐसें ॥ ६८ ॥ तरी नैं घालूनि महापुरीं । न घेपे बुडणयाची शियारी । कां रोगु न गणिजे घरीं । पथ्याचिया ॥ ६९ ॥ तैसा कर्माकर्माचिया मोहरां । उठूं नेदूनि अहंकारा । संसाराचा दरारा । सांडणें येणें ॥ ७० ॥ अथवा ऐक्य-भावाचेनि पैसें । दुजे मानूनि आत्मा ऐसें । भयवार्ता देशें । दवडणें जें ॥ ७१ ॥ पाणी बुडऊं ये मिठातें । तंव मीठचि पाणी आंतें । तेवीं आपण जालेनि अद्वैतें । नाशे भय ॥ ७२ ॥ अगा अभय येणें नांवें । बोलिजे तें हें जाणावें । सम्यक्ज्ञानाचें आघवें । धांवेंणें हें ॥ ७३ ॥ आतां सत्त्वशुद्धी जे म्हणिजे । ते ऐशा चिन्हीं जाणिजे । तरी जळे ना विझे । राखोंडी जैसी ॥ ७४ ॥ कां पांडिवा वाढी नैं मगे । अंवसे तुंटी सांडूनि मागे । माजीं अतिसूक्ष्म अंगें । चंद्रु जैसा राहे ॥ ७५ ॥ नातरी वार्षियां नाहीं मांडिली । ग्रीष्में

इच्छा करणाऱ्या तुम्हीं सर्व मुमुक्षूंनीं जी मनांत इच्छा धरली आहे, तीच पूर्ण करण्याकरितां श्रीकृष्ण आतां या पुढें उपाय सांगतील ५८. तो म्हणजे शुद्ध ज्ञानाची उत्तम वेळेवर उत्पत्ति होऊन ज्याचे योगानें आपल्या स्वरूप स्थितीची प्राप्ति होईपर्यंत ज्ञान वाढेल अशी जी दैवी संपत्ती तिचें देव वर्णन करतील ५९. आणि जी आसुरी संपत्ति रागद्वेषास थारा आश्रय देऊन उत्पन्न झालेल्या ज्ञानाचा नाश करिते त्या घोर अशा आसुरी संपत्तीचेहि देव वर्णन करतील ६०. शिवाय दैवी व आसुरी संपत्ति कीं, ज्यांचें योगानें इष्ट व अनिष्ट कृत्यें सहजच घडणें हे कौतुक होय. तें सांगण्याची नवव्या अध्यायांत सुरवात केली होतीं ६१. त्या वेळेसच सगळा खुलासेवार विचार प्रत्यक्षतः करावयाचा होता; तितक्यांत दुसरा प्रसंग उद्भवल्यामुळें तो तसाच राहिला होता म्हणून तो प्रसंग आतां देव निरूपण करतील ६२. त्या ब्रह्मज्ञान निरूपणाच्या संबंधानें आतांपर्यंत मागील क्रमानें सांख्यिकदृष्ट्या पंधरा अध्याय झाले त्याच्या पुढचा हा सोळावा अध्याय होय असें जाणावें ६३. परंतु आतां हें असो; याच दोन संपत्ति [ दैवी व आसुरी ] हितावह अशा ज्ञानाची प्राप्ति व हानि करून देण्याचें बाबतींत समर्थ आहेत ६४. जी दैवी संपत्ति मुमुक्षूला मोक्षमार्गांत सोबत करून इष्ट स्थळीं पोचविणारी–पाठीराखी आहे व मोहरूप रात्रींत वाट चालण्यास धर्मरूपी जणुं तेवती मशालच होय, तिचे आधीं वर्णन करतों तें ऐका ६५. ज्या ठिकाणीं एक दुसऱ्याला साह्य करणारे, परस्पर पोषक असे पुष्कळ पदार्थ एके ठिकाणीं मिळविले जातात त्याला लोकांत संपत्ति असे म्हणतात ६६. अशी जी दैवयोगानें एके ठिकाणीं जमलेली, दैवीगुण समुदायरूप संपत्ति व सर्वांस सुख लाभ करून देणारी तिलाच "दैवी संपत्ति" असें म्हणतात ६७.

**अन्वयार्थ**--**अभयं**-शास्त्रानें उपदेशिलेल्या अर्थाचे निर्भयपणें–निःशंकपणें अनुष्ठान करणें–**सत्त्वसंशुद्धिः**–चित्ताची अतिशय–शुद्धि–कपटादिकांचा त्याग करून शुद्ध भावानें व्यवहार करणें–**ज्ञानयोगव्यवस्थितिः**–ज्ञान व योग यांतील तन्निष्ठता–**दानं**–यथाशक्ति अन्नादिक वांटणें–**च**–**दमः**–आणि बाह्य इंद्रियांचा निग्रह–**च यज्ञः**–व श्रौत, अग्निहोत्र आणि स्मार्त–दैवयज्ञ–**स्वाध्यायः**--ऋग्वेदादिकांचे पुण्यासाठीं अध्ययन--**तपः**–कायिक, वाचिक व मानसिक तप–**आर्जवम्**–अंतःकरणाचा सरळपणा १.

[ **अभयम्** ] आतां त्याच दैवीगुणामध्यें ज्याला प्रमुख असल्यामुळें पहिलें आसन प्राप्त होतें, त्या गुणाला 'अभय' असें म्हणतात. ते ऐका ६८. तर जो महापुरांत उडी घालीतच नाहीं, त्याला बुडण्याचें भयहि धरण्याचें कारण नसते; किंवा जो पथ्यानें वागतो, त्याला रोग उत्पन्न होण्याचें भय नसते ६९. त्याप्रमाणें जो कोणतेंहि कर्माकर्मांविषयीं [ बऱ्यावाईट कर्मांविषयीं ] अहंकार उत्पन्न होऊं देत नाहीं. त्याला–संसाराचे भय कोठून असणार ? [ अशा रितीनें संसाराचें भय टाकावें म्ह. अभय ] ७०. अथवा अद्वैत भावाच्या विस्तारानें जो भिन्नत्वानें भासणारे सर्व जग तत्त्वतः आत्मस्वरूप आहे असें [ व्यापकानुभूतीनें ] समजतो त्यास भयाची गोष्टहि ऐकूं येत नाहीं. [ असें भयास हद्दपार करणें म्हणजे अभय ] ७१. पाणी मिठास बुडविण्यास येऊं लागलें असतां जसें तें मिठच पाणी होतें, त्याप्रमाणें आपण अद्वैत स्वरूपच झालों असतां भयाचा आपोआप नाश होतो ७२. अरे ! अभय या नांवानें ज्याचा उल्लेख केला जातो त्याचीच हीं लक्षणें होत व हें 'अभय' सम्यक्ज्ञानाची इच्छा करणाराचें सर्वतोपरी पाठीराखें होय असें समजावें ७३. [ **सत्त्वसंशुद्धिः** ] आता 'सत्त्व शुद्धि' म्हणून जिला म्हणतात, ती अशा चिन्हांनीं ओळखावी. ज्याप्रमाणें राखोंडी जळतहि नाहीं व विझतहि नाहीं ७४. किंवा शुक्ल प्रतिपदेच्या वाढत्या कलेस सुरवात होण्याच्या पूर्वीं व अमावस्येस झालेला कलांचा ऱ्हास मागे टाकल्यावर या दोन्हींच्या मधल्या वेळांत चंद्र जसा अतिशय सूक्ष्म अशा आपल्या मूळ रूपानें असतो ७५.

१ स्वरूपाची प्राप्ति. २ "अभयं सत्त्वसंशुद्धि" इत्यादि. ३ नाहींसें करून. ४ आसरा, ठिकाण. ५ आसुरी संपत्ति. ६ सगळा. ७ व्यावयाचा. ८ विचार. ९ प्राप्त झाला. १० दुसरा प्रसंग. ११ संबंध. १२ मागल्यावरून. १३ पोंचविणारी. १४ धर्मरूपी दिवटी. १५ पोसणारी. १६ एके ठिकाणीं. १७ संपादन केले जातात. १८ विला. १९ एकच आश्रय. २० अग्रभागींचा. २१ ऐका. २२ उडी न घालतां. २३ भय, कंप. २४ मार्गास. २५ विस्तारानें. २६ सर्व जग आत्मस्वरूप आहे असें मानून. २७ होते. २८ पाठीराखे. २९ शुद्ध बुद्धि. ३० प्रतिपदा. ३१ सुरवात झाली नाहीं तोंच. ३२ क्षय. ३३ निजरूप. ३४ वर्षाकतूनें.

नाहीं सांडिली । माजीं निजरूपें निवडली । गंगा जैसी ॥ ७६ ॥ तैसी संकल्पविकल्पाची वोढी । सांडूनि रजतमाची कावडी । भोगितां निजधर्माची आवडी । बुद्धि उरे ॥ ७७ ॥ इंद्रियवर्गीं दाखविलिया । विरुद्धा अथवा भलीया । विस्मयो कांहीं केलिया । नुठी चित्तीं ॥ ७८ ॥ गांवा गेलिया वल्लभु । पतिव्रतेचा विरहक्षोभु । भलतेसणी हानिलाभु । न मनीं जेवीं ॥ ७९ ॥ तेवीं सत्स्वरूप रुचलेपणें । बुद्धी जें ऐसें अनन्य होणें । ते सत्त्वशुद्धी म्हणे । केशिहंतों ॥ ८० ॥ आतां आत्मलाभाविखीं । ज्ञानयोगामाजीं एकीं । जे आपुलिया ठाकी । हांवें भरे ॥ ८१ ॥ तेय सगळिये चित्तवृत्ती । त्यागु करणें या रीती । निष्कामें पूर्णाहुती । हुताशीं जैसी ॥ ८२ ॥ कां सुकुळीनें आपुली । आत्मजा सत्कुळींचि दिधली । हें असो लक्ष्मी स्थिरावली । मुकुंदीं जैसी ॥ ८३ ॥ तैसें निर्विकल्पपणें । जें योगज्ञानींच या वृत्तिकें होणें । तो तिजा गुण म्हणे । श्रीकृष्णनाथु ॥ ८४ ॥ आतां देहवाचाचित्तें । यथासंपन्नें वित्तें । वैरी जालियाही आर्तातें । नें वंचणें जें कां ॥ ८५ ॥ पत्र पुष्प छाया । फळ मूळ धनंजया । वाटेचा नें चुंके आलिया । वृक्षु जैसा ॥ ८६ ॥ तैसें मनौनि धनधान्यवरी । विद्यमानें आल्या अवसरीं । श्रांतांचिये मनोहारीं । उपयोगा जाणें ॥ ८७ ॥ तया नांव जाण दान । जें मोक्षनिधानींचें अंजन । हें असो आइक चिन्ह । दमाचें तें ॥ ८८ ॥ तरी विषयेंद्रियां मिळणी । करूनि घापे वितुटणी । जैसें तोडिजे खड्गपाणी । पैरकेया ॥ ८९ ॥ तैसा विषयजातांचा वारा । वाजों नेदिजे इंद्रियद्वारां । इयें बांधोनि प्रत्याहारा । हातीं वोपी ॥ ९० ॥ आंतुला चित्ताचें अंगवरी । प्रवृत्ति पळे पर बाहेरी । आगी सुयिजे दाहींहि द्वारीं । वैराग्याची ॥ ९१ ॥ श्वासोश्वासाहुनी बहुवसें । व्रतें आचरे खैरपुसें । वोसंतितां रात्रिदिवसें । नाराणुक जया ॥ ९२ ॥ पैं दमु ऐसा म्हणिपे । तो हा जाण स्वरूपें । यागार्थुहि संक्षेपें । सांगों ऐक ॥ ९३ ॥ तरी ब्राह्मण करूनि धुरे । स्त्रियादिक पैल मेरे । माझारीं अधिकारें । आपुलालेनि ॥ ९४ ॥ जया जे सर्वोत्तम । भजनीय देवताधर्म । तें तेणें यथागम । विधी यजिजे ॥ ९५ ॥ जैसा द्विज षट्कर्में करी । शूद्र तयातें नमस्कारी । कीं दोहींसही सरोभरी । निपजे यागु ॥ ९६ ॥ तैसें अधिकारपर्यालोचें । हें यज्ञ करणें सर्वांचें । परी विषय विष

अथवा वर्षाऋतूंतील पूर ओसरला आहे व ग्रीष्मऋतूंतील ओहटीस प्रारंभ झाला नाहीं यांच्या मधल्या संधीकाळांत गंगेच्या पाण्याचें स्वाभाविक स्वरूप ज्याप्रमाणें निवळ स्पष्ट असते ७६ त्याप्रमाणें संकल्प व विकल्प या दोन्हींची ओढ ज्या ठिकाणीं उरली नाहीं व रजोगुण व तमोगुण यांची कावडहि ज्या ठिकाणीं टाकली आहे म्ह० ते नाहींतसे झाले आहेत व ज्या बुद्धीस स्वरूपाचें ध्यान करण्याची आवड उत्पन्न झालेली आहे, अशी ती राहते ७७. इंद्रियवर्गांनीं आवडते किंवा नावडते विषय दाखविले असतांहि ज्या बुद्धीच्या ठिकाणीं इच्छा वा चंचलता उत्पन्न होत नाहीं ७८. पतिव्रता स्त्रीचा पति गांवास गेल्यामुळें ती विरहानें विव्हळ झाली असतां, तिला घरीं पाहिजे तेवढी हानि किंवा लाभ झाला असल्याची वार्ता सांगितली, तरीहि त्याकडे जसें तिचें मन जातच नाहीं ७९. त्रिकालाबाधित आत्मस्वरूपाची आवड, गोडी उत्पन्न झाल्यामुळें बुद्धि त्याविषयीं एकनिष्ठ होणें, याला ‘ सत्त्वसंशुद्धि ’ असें म्हणतात. असें केशी दैत्यास मारणारे श्रीकृष्ण म्हणाले ८०. [ **ज्ञानयोगव्यवस्थितिः** ] आतां आत्मलाभाकरितां ज्ञान किंवा योग दोहोंपैकीं ज्या एका साधनावर आपली बुद्धि अधिकारानुरूप स्थिर होईल ८१. त्या ठिकाणीं आपली संपूर्ण चित्तवृत्ति अशा रीतीनें समर्पण व स्थिर करावी कीं, ज्याप्रमाणें निष्काम पुरुषानें पुढें कोणतीहि आहुति देण्याची शिल्लक राहिली नाहीं, म्हणजे अग्नींत पूर्णाहुति घावी ८२. किंवा सुकुलीन मनुष्यानें आपली कन्या उत्तम कुलांतच अर्पण केली म्हणजे जशी ती त्याच कुलांत स्थिर होते, अथवा हा दृष्टांत राहूं द्या समुद्रमंथन करून लक्ष्मी वर आल्यावर ती जशी एका श्रीविष्णूचेच ठिकाणीं स्थिर झाली ८३. त्याचप्रमाणें विकल्परहित होऊन योग किंवा ज्ञान यांच्या ठिकाणीं जें वतनदार होऊन राहणे, हाच दैवी संपत्तींतील तिसरा गुण ‘ ज्ञानयोग ’ आहे, असें श्रीकृष्ण म्हणाले ८४. [ **दानम्** ] आतां शक्त्यनुसार द्रव्यानें व कायावाचामनेंकरून आपल्यास जें दान करावयाचें तें तो आपला शत्रुहि असेना कां ! पण तो जर खरोखर दुःखपीडित असेल तर त्यासहि वंचना–प्रतारणा न करतां, विन्मुख न लावतां जें अर्पण करणें तेंच खरें दान होय ८५. धनंजया ! वृक्ष ज्याप्रमाणें आपली फुलें, फळें, छाया, मुळ्या, पानें यांपैकीं कांहींहि वाटेनें जाणारापासून लपवून ठेवीत नाहीं. [ पाहिजे त्यास देण्यास चुकत नाहीं म्ह० आपल्या सर्वस्वाचा उपभोग घेण्यास मनाई करीत नाहीं ] ८६. त्याचप्रमाणें मनापासून संपत्तीपर्यंत जें कांहीं आपल्याजवळ प्राप्त असेल त्यांपैकीं प्रसंगानुसार हवे तें देऊन श्रमलेल्याचें मनोरथाप्रमाणें त्यास समाधान होईल असें उपयोगास जाणें ८७. त्यालाच ‘ दान ’ असें म्हणतात, असें समज व तें दान म्हणजे मोक्षरूपी ठेवा दृष्टीस पडण्याचें एक अंजनच आहे. हें असो. [ **दमश्च** ] आतां दमाचीं लक्षणें सांगतों ती ऐक ८८. ज्याप्रमाणें शस्त्र धारण करणारा शत्रूचा नाश करतो, त्याप्रमाणें विषय व इंद्रियें यांचें जें ऐक्य झालेलें असतें त्याची ताटातूट करून जो वियोग करणें ८९. त्याचप्रमाणें इंद्रियद्वारांनीं कोणत्याहि विषयांचा वारा देखील लागूं–वाहूं देत नाहीं व सर्व इंद्रियें नियमानें बांधून कायमचेच प्रत्याहाराच्या ताब्यांत देतो ९०. चित्ताच्या आंतपर्यंत गढून गेलेली जी प्रवृत्ति ती आपण होऊन त्या साधकास सोडून बाहेर पळून जाते व दहाहि इंद्रियांच्या द्वारांमध्यें वैराग्यरूप अग्नि ठेवतो. [ कारण, पुनः प्रवृत्ति निर्माण होऊं नये ] ९१. श्वासोच्छ्वासाहून पुष्कळ व योग्यांची जीं अति कठीण, कष्टप्रदव्रतें त्याचें उत्तमरीतीनें रात्रंदिवस न थकतां न थांबतां आचरण करीत असतां ज्याला मुळींहि विश्रांति मिळत नाहीं ९२. हें ‘ दम ’ म्हणून ज्याला म्हणतात, त्याचें लक्षण आहे असें समज. [ **यज्ञश्च** ] आतां ‘ यज्ञ ’ म्हणजे काय, त्याचाहि अर्थ संक्षेपानें सांगतों, ऐक ९३. तर ब्राह्मणापासून तों शेवट स्त्रियांदिकांपर्यंत यांच्यामधील सर्वांनी आपापल्या अधिकारानुरूप [जें कांहीं करणें] ९४. ज्याला ज्या उक्त दैवतांचें पूजन वगैरे उचित धर्म सांगितलें असतील, त्याचें यथाशास्त्र, विधीनें आचरण करावें ९५. ज्याप्रमाणें ब्राह्मण अध्ययन अध्यापनादि षटकर्मांचे आचरण करीत असतो व शूद्र त्यास वंदन करीत असतो कीं, हाच [ त्यांचा यज्ञ होय ]. त्या दोघांसहि त्याच्या अधिकारानुरूप यज्ञ केल्याचें सारखेंच फल मिळतें ९६. त्याचप्रमाणें आपापल्या अधिकारपरत्वें विचार करून

१ ओढ. २ स्वस्वरूप धारणेची. ३ पति. ४ पाहिजे तेवढी. ५ केशी दैत्यांस मारणारा श्रीकृष्ण. ६ स्थिर होईल. ७ अग्नीमध्यें. ८ कुलवंतानें. ९ वतनदार १० तिसरा ज्ञानयोग. ११ विन्मुख. १२ लपवून ठेवीत नाहीं. १३ मनापासून. १४ प्रस्तुत. १५ प्रसंग. १६ दमलेल्यास त्याचे मनोदयानुरूप. १७ समाधान करणें. १८ मोक्षरूप ठेवा दृष्टीस पडण्याचें. १९ वियोग. २० शस्त्रधारी. २१ निवळीच्या बियांनीं, शत्रूला. २२ नियमनाच्या २३ देतो. २४ स्थानापर्यंत. २५ घालावी. २६ प्रखर, कठीण. २७ आचरितां, करितां. २८ असमाधान, अवकाश नसणें. २९ अग्रभागीं.

फळाशेचें । न घापे माजीं ॥ ९७ ॥ आणि मी कर्ता ऐसा भावो । नेदिजे देहाचेनि द्वारें जावों । नां वेदाज्ञेसि तरी ठावो । होइजे स्वयें ॥ ९८ ॥ अर्जुना एवं यज्ञु । सर्वत्र जाण सोज्ञु । कैवल्यमार्गींचा अभिज्ञु । सांगाती हा ॥ ९९ ॥ आतां चेंडुवें भूमी हाणिजे । नव्हे तो हाता आणिजे । कीं शेतीं बीं विखुरिजे । परी पिकीं लक्ष ॥ १०० ॥ नातरी ठेविलें देखावया । आदर कीजे दिविया । कां शाखा फळें यावया । सिंपिजे मूळ ॥ १ ॥ हें बहु असो आरिसा । आपणपें देखावया जैसा । पुढतपुढती बहुवसा । उटिजे प्रीती ॥ २ ॥ तैसा वेदप्रतिपाद्यु जो ईश्वरु । तो होआवयालागीं गोचरु । श्रुतीचा निरंतरु । अभ्यासु करणें ॥ ३ ॥ तेंचि द्विजां-सीच ब्रह्मसूत्र । येरां स्तोत्र कां नाममंत्र । आवर्तवेणें पवित्र । पावावया तत्त्व ॥ ४ ॥ पार्था गा स्वाध्यावो । बोलिजे तो हा म्हणे देवो । आतां तप शब्दाभिप्रावो । आइक सांगों ॥ ५ ॥ तरी दानें सर्वस्व देणें । वेंचणें तें व्यर्थ करणें । जैसें फळोनि स्वयें सुकणें । इंद्रावंणी जेवीं ॥ ६ ॥ नाना धूपाचा अग्निप्रवेशु । कनकीं तुंकाचा नाशु । पितृपक्षु पोषिता ऱ्हासु । चंद्राचा जैसा ॥ ७ ॥ तैसा स्वरूपाचिया प्रसरा- । लागीं प्राणेंद्रियशरीरां । आटणी करणें जे वीरा । तेंचि तप ॥ ८ ॥ अथवा अनारिसे । तपाचें रूप जरी असे । तरी जाण जेवीं दुधीं हंसें । सूंदली चांचू ॥ ९ ॥ तैसें देहजीवाचिये मिळेणीं । जो उदयजेत सूंये पाणी । तो विवेक अंतःकरणीं । जागवीजे ॥ ११० ॥ पाहतां आत्मयाकडे । बुद्धीचा पैसु सांकडे । संनिद्र स्वप्न बुडे । जागणीं जैसें ॥ ११ ॥ तैसा आत्मपर्यालोचु । प्रवर्ते जो साचु । तपाचा हा निर्वेचु । धनुर्धरा ॥ १२ ॥ आतां बाळाच्या हितीं स्तन्य । जैसें नानाभूतीं चैतन्य । तैसें प्राणिमात्रीं सौजन्य । आर्जव तें ॥ १३ ॥

अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् । दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥

आणि जगाचिया सुखोद्देशें । शरीरवाचामानसें । राहाटणें तें अहिंसे । रूप जाण ॥ १४ ॥ आतां तीख होऊनि मवाळ । जैसें जातीचें मुकुळ । कां तेज परी शीतळ । शशांकाचें ॥ १५ ॥ शके दावितांचि रोगु फेडूं । आणि जिभे तरी नव्हे

---

१ येरव्ही. २ [ शास्त्राच्या ] आज्ञेनुरूप, सशास्त्र. ३ जाणता. ४ पेरावें. ५ घासावा. ६ वरचेवर म्हणणें. ७ अध्ययन. ८ खर्च करणें. ९ कडू वृंदावन. १० वजनाचा ११ कृष्णपक्ष. १२ प्राप्तीसाठीं. १३ वेगळे. १४ घातली. १५ ऐक्यतेंत. १६ जन्मतांच. १७ हात घालणें. १८ कुंठीव होवी. १९ निद्रेसकट. २० आत्मावलोकन. २१ निर्णय.

सर्वांनी आपापले यज्ञ करावेत, परंतु फलाशेचें विष त्यांत घालूं नये ९७. आणि या यज्ञाचा मी कर्ता, असा देहाचे द्वारानें होणाऱ्या कर्मांचा मनांत अहंभाव उत्पन्न होऊं देऊं नये; तरीपण वेदांच्या सर्व आज्ञा आपण स्वतः पाळाव्यात ९८. अर्जुना ! असा उपर्युक्त लक्षणांनीं युक्त सर्वांच्या आचरणांत येणारा, शास्त्रसंवादी, विधिवत् हा 'यज्ञ' होय असें समज. हा यज्ञ म्हणजे मोक्ष मार्गाचें बाबतींत सर्वतोपरी जाणकार असलेला वाटाड्या व सांगाती आहे ९९. [ **स्वाध्याय** ] आतां चेंडू भुईवर आपटावयाचा म्हणजे भूमीला मारावयाचें असें नव्हे तर चेंडूला उशी येऊन तो पुनः आपलें हाताकडें आणावा म्हणून किंवा शेतांत जें धान्य टाकतो तो बीज विखरून नाश करणें नव्हे, ते पिकाकडे लक्ष देऊन जमीनींत बीज पेरणें आहे १००. किंवा अंधारांत ठेवलेली वस्तु दृष्टीस पडावी या हेतूनें जसा हातांत दिवा घ्यावा लागतो अथवा झाडाला फांद्या व फळें यावींत म्हणून जसा कोणी झाडांच्या मुळांशीं पाणी घालतो १. फार काय बोलावें ! परंतु आरशांत आपलें स्वरूप, आपण आपल्याला पाहाण्याच्या हेतूनें तो आरसा जसा वरचेवर प्रीतीनें वराच स्वच्छ पुसतो २. त्याचप्रमाणें वेदांनीं ज्या ईश्वराचें वर्णन केलें आहे, तो आपल्यास आत्मत्वानें प्रत्यक्ष प्राप्त व्हावा म्हणून श्रुतींचा सतत अभ्यास करणें ३. ती पवित्र ब्रह्म तत्त्व प्राप्ति होण्याकरितां ब्राह्मणांनींच वेदांतील ते ब्रह्मसूत्र अभ्यासावे व इतरांनीं स्तोत्र किंवा ईश्वराची नाम मंत्रें हीच वरचेवर म्हणावीत व अभ्यासावीत ४. व देव म्हणतात, पार्था ! ज्याला 'स्वाध्याय' म्हणतात, तो हाच होय असो. [ **तपः** ] आतां तुला तप शब्दाचा अभिप्राय सांगतों, तो ऐक ५. तर आपलें सर्वस्व दान करणें व तेंहि फलाशा टाकून दान करावें यालाच 'दान' म्हणतात; चैनीनें द्रव्य उडविणें तें दान नसून व्यर्थ खर्च करणें होय. ज्याप्रमाणें कडू वृंदावनाचें फळ झाडास लागूनहि कोणाच्या उपयोगास न येतां व्यर्थ सुकून जातें; [ पण औषधरूपानें सर्व जगाच्या उपयोगी पडतें ]६. किंवा धूपाचा अग्नींत प्रवेश झाला तर त्याचा स्वतःचा नाश होतो, [ पण सर्वांस सुगंध देतो, ] किंवा सोनें जों जों शुद्ध करावें तों तों तें वजनांत कमी भरतें. [ पण कसास जास्त चढतें, ] किंवा कृष्णपक्षामध्यें चंद्र एकेक कलेनें कमी होतो, पण कृष्णपक्षाचें पोषण करितो, [ किंवा सर्व औषधींचें पोषण करितो ] ७. त्याप्रमाणें हे वीरा ! ब्रह्मात्मस्वरूपाचा विकास-अभिव्यक्ति होण्याकरितां प्राण, इंद्रिय व शरीर यांची जी [ साधनानुष्ठानांत शरीरादिकांस झिजविणें ] आटणी करणें त्यालाच 'तप' असें म्हणतात ८. अथवा उपर्युक्त तप स्वरूपापेक्षां जर कांहीं तपाचें दुसरें निराळें लक्षण असलें तरी तीं तपें ह्या तपाप्रमाणें शुद्ध नाहींत, म्हणून हंस पक्षी जसें दुधांत आपली चोंच घालून दूध व पाणी वेगळें करतो ९. त्या प्रमाणें जो उत्पन्न झाल्याबरोबर देह व जीव [ आत्मा ] यांच्या [ सत्यानृत्यरूप आत्मानात्म्याच्या ] मिश्रणांत हात घालतो. [ आत्मा व अनात्मा यांच्यांतील सत्य व मिथ्यारूप वेगळिक करतो ] तो आत्मानात्म-विचार आपल्या अंतःकरणांत निरंतर जागृत ठेवावा ११०. असा आत्मानात्मविचार झाला असतां बुद्धीचा विषयांकडें पसरलेला मार्ग कुंठित होतो [ व ती अंतर्मुख होते. ] ते म्हणजे ज्याप्रमाणें मनुष्य जागा झाला असतां निद्रा व स्वप्न हीं दोन्हीं आपोआप नाहींशीं होतात तसे होते ११. त्याप्रमाणें धनुर्धरा ! आत्मप्राप्ति करून घेण्याकरितां खरें प्रवृत्त झाले असतां जो अंतःकरणांत [ आत्मानात्म ] विवेक उत्पन्न होतो, हाच 'तप' शब्दाचा वास्तव निर्णय आहे १२. [ **आर्जवं** ] ज्याप्रमाणें दूध हें मुलांस सर्वतोपरी हितकारक असतें किंवा चैतन्य वा प्राण हा सर्व भूतांच्या ठायीं सारखाच आहे, त्याप्रमाणें ज्याचें प्राणिमात्रांशीं वागण्यांत सौजन्य वा अंतःकरणाचा सरळपणा असतो त्यालाच 'आर्जव' असें म्हणतात १३.

**अन्वयार्थ—अहिंसा**-प्राण्यांना पीडा न देणें **सत्यम्**-अप्रिय व अनृत वर्ज्य करून खरें भाषण करणें-**अक्रोधः**-क्रोध आला असतांहि त्याला शांत करणें-**त्यागः**-संन्यास-**शांतिः**-अंतःकरणाचा उपशम **अपैशुनम्**-एखाद्याची गुप्त गोष्ट दुसऱ्याला न सांगणें-**भूतेषु दया**-दुःखी जीवांवर कृपा करणें-**अलोलुप्त्वं**-विषय समीप असले तरी इंद्रियांचें विकाररााहित्य-**मार्दवं** मृदुत्व—**ह्रीः**-अकार्याविषयीं लोकलज्जा-**अचापलं**-कारणावांचून हात-पाय इत्यादिकांचा व्यापार न करणें २.

[ **अहिंसा** ] आणि कायावाचामनानें जगाला सुख व्हावें याच एकमेव हेतूनें जें वर्तन करणें तेंच 'अहिंसे'चें खरें स्वरूप व लक्षण होय, असे जाण १४. [ **सत्यम्** ] आतां स्वभावतः तीक्ष्ण असून मऊ असते अशी कमळ कळिका जशी पाण्याचा भेद करून वर येतें, परंतु मऊ असतें, किंवा चंद्राचें तेजच पडतें खरें; परंतु तें शीतल असतें १५. जें औषध रोग्याला दाखवितांक्षणींच रोगाचा नाश करूं शकेल आणि खाल्ले

कट्ट । तें वोखट्ट नाहीं मा घड्ड । उपमा कैंची ॥ १६ ॥ तरी मऊपणें बुबुळे । झगडतांही परी नाडळे । एऱ्हवीं फोडी कोंराळें । पाणी जैसें ॥ १७ ॥ तैसें तोडावया संदेह । तीख जैसें कां लोह । श्राव्यत्वें तरी माधुर्य । पायीं घालीं ॥ १८ ॥ ऐकों ठातां कौतुकें । कानातें निघती मुखें । जें साचारिवेचेनि बिकें । ब्रह्महीं भेदी ॥ १९ ॥ किंबहुना प्रियपणें । कोणातेंही झकऊं नेणें । यथार्थ तरी खुपणें । नाहीं कवणा ॥ १२० ॥ एऱ्हवीं गोरी कीर काना गोड । परी साचाचा पाखाळीं कीड । आगीचें करणें उघड । परी जळों तें साच ॥ २१ ॥ कानीं लागतां महूर । अर्थे विर्भांडी जिव्हार । तें वाचा नव्हे सुंदर । लांवचि पां ॥ २२ ॥ परी अहितीं कोपोनि सोप । लालनीं मऊ जैसें पुष्प । तिये मातेचें स्वरूप । जैसें कां होय ॥ २३ ॥ तैसें श्रवणसुख चतुर । परिणमोनि साचार । बोलणें जें अविकार । ते सत्य येथें ॥ २४ ॥ आतां घालितांहि पाणी । पाषाणीं न निघे आणी । कां मथिलिया लोणी । कांजी नेदी ॥ २५ ॥ त्वचा पायें शिरीं । हालेयाही फडे न करी । वसंतींही अंबरीं । न होती फुलें ॥ २६ ॥ नाना रंभेचेनिही रूपें । शुकीं नुठिजेचि कंदर्पें । कां भस्मीं वन्हि न उद्दीपे । घृतेंही जेवीं ॥ २७ ॥ तेवींचि कुमारु क्रोधें भरे । तैसिया मंत्राचीं बीजाक्षरें । तियें निमित्तेंही अपारें । मीनलिया ॥ २८ ॥ पैं धातयाही पायां पडतां । नुठी गतायु पंडुसुता । तैसी नुपजे उपजवितां । क्रोधोर्मी गा ॥ २९ ॥ अक्रोधत्व ऐसें । नांव तें ये दशे । जाण ऐसें श्रीनिवासें । म्हणितलें तया ॥ १३० ॥ आतां मृत्तिकात्यागें घटु । तंतुत्यागें पटु । त्यजिजे जेवीं वटु । बीजत्यागें ॥ ३१ ॥ कां त्यजूनि भिंतिमात्र । त्यजिजे आघवेंचि चित्र । कां निद्रात्यागें विचित्र । स्वप्नजाळ ॥ ३२ ॥ नाना जळत्यागें तरंग । वर्षात्यागें मेघ । त्यजिजती जैसे भोग । धन्यत्यागें ॥ ३३ ॥ तेवीं बुद्धिमंतीं देहीं । अहंता सांडूनि पाहीं । सांडिजे अशेषही । संसारजात ॥ ३४ ॥ तया नांव त्यागु । म्हणे तो यज्ञांगु । हें मानूनि सुभगु । पार्थु पुसे ॥ ३५ ॥ आतां शांतीचें लिंग । तें व्यक्त मज सांग । देवो म्हणती चांग । अवधान देईं ॥ ३६ ॥ तरी गिळोनि ज्ञेयातें । ज्ञाता ज्ञानही मार्गौतें । हारपें निरुतें । ते शांति पैं गा ॥ ३७ ॥ जैसा प्रळयांबूचा उभड्डु । बुडवूनि विश्वाचा पवाडु । होय आपणपें निबिडु ।

तर जिभेसुद्दि कडू लागणार नाहीं, असें औषधच नाहीं, मग मी तसल्या औषधाची त्यांस उपमा तरी कशी द्यावी? १६. तर मऊपणा म्हटला म्हणजे डोळ्यांतील बुबुळावर घासलें असतांहि जें डोळ्यामध्यें खुपत नाहीं व त्याच पाण्याच्या दुसऱ्या पैलूचा विचार केला असतां अर्थात् त्याचा कठोरपणा पाहूं गेलें असतां जें पाणी पर्वताचा कडाहि फोडून बाहेर पडतें १७. त्याप्रमाणें जे सत्यवचन संशयनिवृत्ति करण्याचे बाबतींत लोखंडी शस्त्राप्रमाणें तीक्ष्ण असते व जें ऐकलें असतां [ इतकें अमृत मधुर असते कीं, ] माधुर्यालाहि पायाखाली घालते म्ह. लाजवितें १८. जें सहज ऐकलें असतां कानासहि मुखें उत्पन्न होतात म्ह० त्याचे सेवन करावें, ऐकावें अशी इच्छा निर्माण होते व जे [ सत्य भाषण ] सत्यपणाच्या बळानें ब्रह्मसाक्षात्कारापर्यंत-जाऊन ठेपते १९. फार काय सांगावें ! ! त्याची गोडीहि इतकी असते कीं, ते कोणासहि प्रियपणामुळें फसवूं जाणत नाहीं व त्यांतील अर्थ पाहूं गेलें असतां सत्य असून त्यापासून कोणाच्याहि मनाला खुपत नाहीं. [ धक्का बसावयाचा नाहीं ] १२०. एऱ्हवीं पारध्याचें गाणें वरवरदृष्ट्या पाहतां कानास गोड लागते खरें; परंतु खरेपणाच्या दृष्टीनें पाहिलें असतां तें मृगास अतिशय घातकर असतें; अथवा अग्नि हा आपलें जाळण्याचें कृत्य उघड रीतीनें करतो, परंतु ह्या त्याच्या खरेपणास आग लागो ! २१. जें भाषण कानास मधुर लागणारे असतें, पण अर्थ पाहूं गेलें असतां जें काळीजास शोंबून भेदतें; असें तें भाषण, हें भाषणच नव्हे तर तें भाषण म्हणजे सुंदर रूप धारण करणारी विवशीच होय २२. परंतु रागावल्यावर अहित होण्याचे बाबतींत जे बोलणें पोकळ रागावणारे असून, लालन [ मुलाचें रक्षण ] करण्यांत पुष्पाप्रमाणें मऊ असतें, असें त्या आईचें जसें स्वरूप असतें २३. त्याप्रमाणें जे ऐकलें असतां ज्यापासून श्रवण सुखाची प्राप्ति होते, असे चतुर असून परिणामीं गोड व सत्य असतें व कोणाचाहि मर्मभेद न करणारे रागद्वेषादि विकाररहित असें जे बोलणें, त्यालाच 'सत्य' बोलणें असें म्हणतात २४. [ अक्रोधः ] आतां जसें दगडावर पाणी घातलें असतांहि त्यास अंकुर फुटत नाहींत. किंवा कांजी–ताकाची निवळी घुसळली असतां त्यावर लोणी येणार नाहीं २५. सापाच्या कांतीच्या डोक्यावर पाय हाणिला असतांहि ती जशी फडा वर करीत नाहीं किंवा वसंतऋतु प्राप्त झाला असतांहि आकाशास जशी फुलें येत नाहींत २६. अथवा रंभेच्याहि मोहक स्वरूपाने शुकास ज्याप्रमाणें विषयवासना उत्पन्नच झाली नाहीं किंवा भस्मांत तूप घातलें असतांहि जसा अग्नि प्रदीप्त होत नाहीं २७. त्याप्रमाणें शेलक्या शिव्यांचा वा ज्या अभद्र–अक्षरांनीं लहान मुलासहि काम व क्रोध उत्पन्न होतो, त्याचा कोणी उच्चार केला असतां, शिवाय अशीच क्रोधजनक अशी दुसरी अनेक कारणें एकत्र मिळालीं तरीहि २८. किंवा हे पंडुसुता! ज्याचें आयुष्य संपलें आहे, त्याला उठविण्याकरितां ब्रह्मदेवाच्या जरी पायां पडलें तरी तो ज्याप्रमाणें उठत नाहीं; त्याप्रमाणें त्याच्या ठिकाणीं क्रोध आणण्याविषयीं कमालीची खटपट केली असतांहि ज्यास क्रोध विकार उत्पन्न होत नाहीं २९. 'अक्रोधत्व' असें ज्यास म्हणतात ते याच स्थितीला होय असें जाण असें श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें १३०. [ त्यागः ] मृत्तिकेचा त्याग केला असतां जसा घटाचा सर्वथैव त्याग आपोआपच होतो किंवा तंतूंचा त्याग केला असतां वस्त्राचा त्याग होतो तसेंच वटवृक्षाच्या बीजांचा त्याग केला असतां जसा त्या वटवृक्षाचाहि त्याग सहजच होतो ३१. किंवा सर्व भिंतीचा त्याग केला असतां त्यावरील सर्व चित्रांचाहि त्याग आपोआप होतो अथवा झोपेचा त्याग केला असतां नानातऱ्हेच्या स्वप्नजालाचाहि त्याग आपोआपच होतो ३२. किंवा जलाचा त्याग केला असतां जसा लाटांचाहि त्याग होतो वा वर्षाऋतूचा त्याग केला असतां जसा मेघांचाहि त्याग होतो किंवा धनाचा त्याग केला असतां ज्याप्रमाणें विषयोपभोगांचाहि आपोआपच त्याग होतो ३३. त्याप्रमाणें जे ज्ञानी आहेत, ते 'देहच मी' आहे अशा अहंतेचा त्याग करून सर्वहि संसारमात्राचा [ मूलाज्ञानासह ] त्याग करितात ३४. त्यालाच 'त्याग' अशी संज्ञा आहे असें यज्ञभोक्ता यज्ञ स्वरूप श्रीकृष्ण परमात्मा यानें सांगितलें व तें सांगणें मनांत उमजून भाग्यवान् जो पार्थ, त्यानें प्रश्न केला ३५. "हे प्रभो! शांतीचीं लक्षणें काय आहेत, तीं मला उघड करून सांगा." तेव्हां देव म्हणाले, "तूं फार उत्तम गोष्ट विचारलीस; तर ती तुला सांगतों, इकडे चांगलें लक्ष दे" ३६. [ शांतिः ] ज्ञात्यानें जी ब्रह्मवस्तु जाणावयाची ती पूर्णपणें जाणल्यावर [ प्रमात्यासह सर्व प्रमेयांचा बाध होऊन शेवटीं ] मागून ज्ञाता व ज्ञान हीं सुद्धां ज्या ठिकाणीं खरोखर लय पावतात, [ अधिष्ठानरूप होतात ] तीच [ ब्रह्मस्थितिच ] 'शांति' होय असें समज ३७. ज्याप्रमाणें प्रलयकालच्या पाण्याचा लोट वाढल्यावर सर्व विशाल विश्वविस्तार बुडवून आपणच

आपणचि ॥ ३८ ॥ मग उगम ओघ सिंधु । हा नुरेचि व्यवहार भेदु । परी जलैक्याचा बोधु । तोही कवणा ? ॥ ३९ ॥ तैसी ज्ञेया देतां मिठी । ज्ञातृत्वही पडे पोटीं । मग उरे तेंचि किरीटी । शांतीचें रूप ॥ १४० ॥ आतां कंदर्थवीत व्याधी । बळीकरणाचिया आधीं । आपपरु न शोधी । सद्वैद्यु जैसा ॥ ४१ ॥ कां चिखलीं रुतली गाये । धडभांकड न पाहे । जो तियेचिया ग्लांनी होये । कालाभुला ॥ ४२ ॥ नाना बुडतयातें सकरुणु । न पुसे अंत्यजु कां ब्राह्मणु । काढूनि राखे प्राणु । हेंचि जाणे ॥ ४३ ॥ कीं मांय वनीं पापिये । उघडी केली विपाये । ते नेसल्यावीण न पाहे । शिष्टु जैसा ॥ ४४ ॥ तैसें अज्ञानप्रमादादिकीं । कां प्राक्तनहीन सदोखी । निंदत्वाच्या सर्वविखीं । खिळिले जे ॥ ४५ ॥ तया आंगीकें आपुलें । देऊनियां भलें । विसरविजती सलें । सलतीं तियें ॥ ४६ ॥ अगा पुढिलाचा दोखु । करूनि आपुलिये दिठी चोखु । मग घापे अवलोकु । तयावरी ॥४७॥ जैसा पुजूनि देवो पाहिजे । पेरूनि शेता जाइजे । "तोषौनि प्रसादु घेइजे । अतिथींचा ॥ ४८ ॥ तैसें आपुलेनि गुणें । पुढिलाचें उणें । फेडूनियां पाहणें । तयाकडे ॥ ४९ ॥ वांचूनि न विंधिजें वर्मीं । नातुडविजे अकर्मीं । न बोलविजे नामीं । सदोषीं तिहीं ॥ १५० ॥ वरी कोणे एकें उपायें । पडिलें तें उभें होये । तेंच कीजे परी घाये । नेदावे वर्मीं ॥ ५१ ॥ पैं उत्तमाचियासाठीं । नीच मानिजे किरीटी । हें वांचोनि दिठी । दोषु न घेपे ॥ ५२ ॥ अगा अपैशून्याचें लक्षण । अर्जुना हें फुडें जाण । मोक्षमार्गीचें सुखासन । मुख्य हें गा ॥ ५३ ॥ आतां दया ते ऐसी । पूर्णचंद्रिका जैसी । निववितां न कडसी । सानें थोर ॥ ५४ ॥ तैसें दुःखिताचें शिणणें । हिरतां सकणवपणें । उत्तमाधम नेणें । विवंचूं गा ॥ ५५ ॥ पैं जगीं जीवनासारिखें । वस्तु अंगवरी उपखें । परी जातें जीवित राखे । तृणाचेंहि ॥ ५६ ॥ तैसें पुढिलाचेनि तापें । कळवळलिये कृपें । सर्वस्वेंसीं दिधलेंहि आपणपें । थोडेंचि गमे ॥ ५७ ॥ निम्न भरलियाविणें । पाणी ढळोंचि नेणें । तेवीं श्रांता तोषौनि जाणें । सामोरें पां ॥ ५८ ॥ पैं पायीं

१ व्याधि–रोग–[ रोग्याला ] पीडा करीत असतां. २ रोग्याला बरें करण्याची उत्कट [ चिंता ] असल्यामुळें. ३ दूध देणारी कीं न देणारी. ४ दुःखानें. ५ कासावीस. ६ कुलस्त्री, पतिव्रता, आरण्यांत. ७ कदाचित्. ८ पात्र झालें. ९ साह्य. १० दुःखें. ११ सलतात, खुपतात. १२ संतोष करून. १३ आशीर्वाद. १४ डाग देऊं नये

आपल्या स्वरूपांत घनदाट भरून राहत असतो ३८. मग नद्यांचा उगम, प्रवाह व समुद्रास मिळणें या भेद-व्यवहारात्मक अवस्था उर्वरित राहत नाहींत; एवढेंच नव्हे, पण सर्वत्र जलमय आहे, या एकतेचाहि बोध तरी कोणास आहे ! ३९. त्याप्रमाणें ज्ञेयाचें ऐक्य झाल्यावर ज्ञातृत्वहि आपोआपच नाहींसें होतें. मग [ ज्ञातृ-ज्ञेयविहीन-दशा झाल्यावर] अर्जुना, जें कांहीं उरतें, तेंच 'शांती'चें रूप होय १४०. [ अपैशुनम् ] आतां एखादा रोगी रोगग्रस्त असल्यामुळें त्यापासून पीडा होऊं लागली असतां किंवा बलवान् मानसिक उत्कट चिंतेनें ग्रस्त झाला तर चांगला वैद्य हा रोगी आपला आहे कीं, परका आहे ? असा विचार न करतां त्याचें दुःख निवारण करतो ४१. किंवा एखादी गाय चिखलांत रुतल्यावर तिची दुःखपूर्ण केविलवाणी दशा पाहून ज्याच्या मनांत कासाविशी होते, तो ती गाय दुभती आहे किंवा भाकड-दूध न देणारी आहे, इकडे लक्ष न देतां तिला वर काढतो ४२. किंवा बुडणाऱ्या मनुष्याकडे पाहून ज्याला करुणा उत्पन्न होते, तो ज्याप्रमाणें बुडणारा ब्राह्मण आहे किंवा अंत्यज आहे याची विचारपूस, चौकशी न करितां त्यास बाहेर काढून त्याचे प्राण वांचविणें हेंच जाणत असतो ४३. अथवा महावनांत पापी दुष्टांनीं एखाद्या कुलस्त्रीस अकस्मात् लुबाडून तिला वस्त्रहीन करून सोडून दिलें आहे, अशी स्त्री एखाद्या संभावित मनुष्याच्या दृष्टीस पडल्यावर, तो जसा प्रथम तिच्या अंगावर आपले वस्त्र नेसविल्याविना तिला पहात नाहीं ४४. तसेंच जे अज्ञान व प्रमाद यांनीं व्याप्त आहेत किंवा पूर्व दुष्टकर्मानुरूप ज्यांस कांहीं व्याधि जडलेली आहे, वा जे निंद्यपणाच्या सर्वहि बाबतींत जखडून गेले आहेत ४५. त्यांना आपण स्वतः साह्य करून आपलें अंगचे गुणाद्वारां अनुक्रमें त्यांना ज्या व्याधीपासून दुःख होत असतें, वा त्यास सलणारी जी शल्यें, त्यांचा त्यास विसर पाडतात ४६. अरे ! त्यांच्यापुढें येणाऱ्या मनुष्याचे दोष ते आपल्या दृष्टीनें शुद्ध करून मगच त्यांच्यावर अवलोकनार्थ दृष्टि टाकतात ४७. ज्याप्रमाणें शालिग्रामादिदेव मूर्तीस पूजन, वस्त्रालंकार वाहून व उत्तम पुष्पें वाहून मगच आपलें चित्त तिच्याकडे लावून पहावें किंवा शेतांत धान्य पेरून उत्तम रीतीचें पीक आल्यावर जसें त्याजकडे पाहून समाधान मानावें अथवा आपल्या घरीं अतिथि आला असतां त्यास अन्नदान देऊन संतोषित केल्यावर मगच ज्याप्रमाणें त्याचा आशीर्वाद घ्यावा ४८. त्याप्रमाणें आपल्यापुढें येणाऱ्या मनुष्याचा कमीपणा आपल्या चांगल्या गुणसामर्थ्यानें दूर करून नंतरच त्याजकडे दयार्द्र दृष्टीनें पहावें ४९. एऱ्हवीं असें न करतां त्याच्या वर्मावर टोंचणी देऊन डाग देऊं नये अथवा त्याच्या पापकर्माचा उच्चार करून त्यास दुःख देऊं नये व त्यांस असणाऱ्या व्याधींचें नांव घेऊन, नामांतील दोषानें वा 'तूं व्याधिष्ट आहेस' असेंहि हिणवूं नये १५०. परंतु जो कोणी मनुष्य पतित म्ह. वाईट स्थितींत असेल तर तो ज्या कोणत्या उपायानें उभा राहील; उत्तम स्थितींत येईल; सुधारेल; तेंच उपाय करावेत, पण त्याच्या वर्मी घांव घालूं नयेत ५१. किंवा अर्जुना ! एखाद्या उत्तम मनुष्याच्या योग्यतेशीं तुलना करून त्या मानानें दुसऱ्यास कनिष्ठ मानावें, हें वांचूनि [ असें नाहीं. तसा सापेक्ष श्रेष्ठ कनिष्ठ भाव मनांत मुळींहि न आणतां ] आपल्या दृष्टीनें त्याचें वा कोणाचेहि दोष पाहूं नयेत [ दुर्लक्ष करावें ] ५२. तेंच 'अपैशुन्याचें' खरें लक्षण होय; आणि अर्जुना मुमुक्षूंना मोक्षमार्गांतील सुखावह वाहन म्ह. सुखकर मुख्य साधनहि हेंच होय ५३. [ दयाभूतेषु ] आतां दया ती अशी असावी कीं, ज्याप्रमाणें पौर्णिमेच्या पूर्ण चंद्राचें चांदिणें परताप हरणपूर्वक गारवा, शांति देत असतां हा लहान अथवा हा थोर अशी निवड करीत नाहीं. [ त्याप्रमाणें सर्वांविषयीं सारखीच शांति असावी ] ५४. त्याप्रमाणें कृपाळुपणानें, दयार्द्र अंतःकरणानें दुःखित मनुष्यांचें दुःख हरण करितेवेळेस तो उत्तम आहे किंवा अधम आहे, असा भेद करणें मनानें मुळींहि जाणत नाहीं. [ सर्वांचें दुःख निवारण करतो ] ५५. जगांत पाण्यासारखी दुसरी कोणती वस्तु आहे कीं, जीं गवत सुकूं लागलें असतां आपण स्वतः अंगानें नाश पावते; पण त्या गवताच्या जात असलेल्या जीविताचे आपल्या ओलाव्यानें रक्षण करिते ! ५६. त्याप्रमाणें आपल्यासमोर पीडित मनुष्य आला असतां त्या दुसऱ्याच्या दुःखानें, कृपेनें कळवळलें असतां त्यास [ दुःख निवारणार्थ ] जरी आपल्या सर्वस्वासह दिलें, तरीहि ते थोडे आहे वा आपण त्यांस कांहींच दिलें नाहीं, असें जो मानतो; ५७. पाणी वहात असतांना वाटेंत खळगा आला असतां तो खड्डा पूर्ण भरून सोडल्याशिवाय जसें तें पुढें वाहण्याचे, सरकण्याचे जाणतच नाहीं, तसा आपल्या समोरील दुःखितास, श्रमलेल्या मनुष्यास संतोषित केल्याशिवाय जो पुढें जाणे जाणतच नाहीं [ त्यांस संतुष्ट करून ज्याचे पुढें जाणें होते ] ५८. ज्याप्रमाणें पायांत कांटा बोचतो

कांटा नेहटे । तंव व्यथा जीवीं उमटे । तैसा पोळे संकटें । पुढिलांचेनि ॥ ५९ ॥ कां पावो शीतळता लाहे । कीं ते डोळ्याचिलागीं होये । तैसा परसुखें जाये । सुखावतु ॥ १६० ॥ किंबहुना तृषितालागीं । पाणी आरायिलें असे जगीं । तैसें दुःखितांचे सेलभागीं । जिणें जयाचें ॥ ६१ ॥ तो पुरुष वीरराया । मूर्तिमंत जाण दया । मी उदयजतांचि तया । ऋणिया लाभें ॥ ६२ ॥ आतां सूर्यासि जीवें । अनुसरलिया राजीवें । परी तें तो न शिवे । सौरभ्यं जैसें ॥ ६३ ॥ कां वसंताचिया वाहाणीं । आलिया वनश्रीच्यां अक्षौहिणी । ते न करीतुचि घेणी । निगाले तो ॥ ६४ ॥ हें असो महासिद्धीसी । लक्ष्मीही आलिया पाशीं । परी महाविष्णु जैसी । न गणीच ते ॥ ६५ ॥ तैसें ऐहिकींचे कां स्वर्गींचे । भोग पाईक जालिया इच्छेचे । परी भोगावें हें न रुचे । मनामाजीं ॥ ६६ ॥ बहुवें काय कौतुकीं । जीव नोहे विषयाभिलाखी । अलोलुप्त्वदशा ठाउकी । जाण ते हे ॥ ६७ ॥ आतां माशियां जैसें मोहळ । जळचरां जेवीं जळ । कां पक्षीयां अंतराळ । मोकळें हें ॥ ६८ ॥ नातरी बाळकोदेशें । मातेचें स्नेह जैसें । कां वसंतीच्या स्पर्शें । मऊ मलयानिळु ॥ ६९ ॥ डोळयां प्रियाची भेटी । कां पिलियां कुर्मीची दिठी । तैसी भूतमात्रीं राहटी । मवाळ ते ॥ १७० ॥ स्पर्शें अतिमृदु । मुखीं घेतां सुस्वादु । घ्राणासि सुगंधु । उजाळु आंगें ॥ ७१ ॥ तो आवडे तेवढा घेतां । विरुद्ध जरी न होतां । तरी उपमे येता । कापूर कीं ॥ ७२ ॥ परी महाभूतें पोटीं वाहे । तेवींचि परमाणूमाजीं सामाये । या विश्वानुसार होये । गगन जैसें ॥ ७३ ॥ काय सांगों ऐसें जिणें । जें जगाचेनि जीवें प्राणें । तयां नांव म्हणें । मार्दव मी ॥ ७४ ॥ आतां पराजयें राजा । जैसा कदर्थिजे लाजा । कां मानिया निस्तेजा । निकृष्टास्तव ॥ ७५ ॥ नाना चांडाळ मंदिराशीं । अवचटें आलिया संन्यासी । मग लाज होय जैसी । उत्तमा तया ॥ ७६ ॥ क्षत्रिया रणीं पळोनि जाणें । तें कोण साहे लाजिरवाणें । कां वैधव्यें पाचारणें । महासतियेतें ॥ ७७ ॥ रूपसा उदयलें कुष्ट । संभावितां कुटीचें बोट । तया लाजा प्राणसंकट । होय जैसें ॥ ७८ ॥ तैसें औटहातपणें । जें शव होऊनि जिणें । उपजों उपजों मरणें । नावानावा ॥ ७९ ॥ तियें गर्भमेदमुसें । रक्तमूत्ररसें । वोंतीव होऊनि असे । तें लाजिरवाणें ॥ १८० ॥ हें

आणि त्याचक्षणीं अंतःकरणांत दुःख उत्पन्न होतें, आपला जीव कळवळतो, त्याप्रमाणें दुसऱ्याचें संकटानें जो पोळला जातो. [ ज्याचें मन दुःख पाहून कळवळतें ] ५९. किंवा पायास थंड पदार्थ चोळल्यावर तो गारवा जसा डोळ्यांच्या उपयोगांस येतो तसें जो दुसऱ्याचें सुखानेंच आपणहि सुखावला जातो १६०. अधिक काय सांगावें ! ! तहान लागलेल्या मनुष्याची तृषा भागण्याकरितां जसें जगांत पाणी निर्माण केलें गेलें आहे, त्याप्रमाणें अतिशय दुःखित मनुष्याचें दुःख निवारणात्मक कर्तव्य करण्याकरितांच ज्याचे आयुष्य या जगांत खर्च होत राहते ६१. अशा गुणांनीं युक्त जो पुरुष असतो, तो ' दयेची ' केवळ प्रत्यक्ष मूर्तीच होय; असें समज आणि हे वीरोत्तमा, त्याचा जन्म होतांच मी त्याचा ऋणी होतो ६२. [ अलोलुप्त्व ] सूर्योदय होण्याबरोबर सूर्यकमळाचें फूल उमलून सूर्यास जीवाभावानें अनुसरित–अनन्य असतें; परंतु सूर्य जसा त्याच्या सुगंधाचे उपभोगार्थ त्यास स्पर्शहि करीत नाहीं ६३. किंवा वसंतऋतूच्या आगमनौघांत वनांतील पुष्कळ झाडें टवटवीत होतात, वनलक्ष्मी ऐश्वर्य धारण करिते तथापि त्यांतील एकाहि झाडाचा किंवा फलाचा उपभोग न घेतांच तो वसंतऋतु जसा निघून जातो ६४. हे राहूं दे. लक्ष्मी ही अष्टसिद्धींसह जरी श्रीविष्णूजवळ प्राप्त झाली, तरीपण जसें श्रीमहाविष्णूनें तिच्याकडे लक्षच दिले नाहीं, [ तिला मुळींहि महत्त्व दिलें नाहीं ] ६५. तसें आपल्यास अनुकूल वाटणारें इहलोकींचें किंवा परलोकींचें भोग हे जरी आपल्या इच्छेचे चाकर झालें तरीहि त्यांचा उपभोग घ्यावा असें ज्यास मनांत मुळींहि आवडत नाहीं ६६. बहुत काय सांगावें ! ! सहज कौतुकानें देखील जीव [ अंतःकरण ] विषयाची इच्छा करीत नाहीं अशी जी दशा, तीच ही ' अलोलुप्त्व ' अवस्था होय. असें समज ६७. [ मार्दवं ] मधमाशांना जसें त्यांचें मोहोळ सुखकारक व प्रिय आहे किंवा जलचरांस जसें पाणी सुखकर व प्रिय आहे, किंवा पक्ष्यांना आकाश हे जसें स्वेच्छेनुसार फिरण्यास मोकळें आहे ६८. किंवा बालकाला सुख व्हावें या दृष्टीनें आईचें प्रेम जसें हळुवार असतें अथवा वसंतऋतु सुरू झाल्यावर मलय पर्वतावरून वाहत येणारा मंद, सुगंध वारा जसा स्पर्शास मऊ व सुकोमल असतो ६९. प्रिय वस्तूचें दर्शन जसें डोळ्यांस सुख–समाधान देणारे असतें किंवा, ज्याप्रमाणें कासवीची दृष्टि जशी तिच्याच पिलांना सुखकर, पोषक असते त्याप्रमाणें ज्यांची दृष्टि व वागणूक भूतमात्रांच्या ठिकाणीं मृदु म्ह० मवाळ, प्रेमयुक्त असते, १७०. हात लावला असतां स्पर्शास अतिशय मऊ असतो, तोंडांत घातला असतां चांगलाच रुचकर लागतो नाकासहि जो सुगंध देणारा असतो व डोळ्यानें रूप पाहिलें असतां जो अंगानें पांढरा स्वच्छ असतो ७१. असा जो कापूर तो वाटेल तितका खाल्ला असतां जर कोणासहि अपायकारक झाला नसता तर तो कापूर [ या मार्दवाच्या ] उपमेस पात्र झाला असता ७२. परंतु जे आकाश आपल्या पोटांत पंचमहाभूतांचा समावेश करून त्यास धारण करते त्याचप्रमाणें जे [ आकाश ] परमाणूंतहि सामावते व तें गगन जसें हे विश्व आहे तसे म्ह. त्याच्या आकाराप्रमाणें आकारास येतें ७३. फार काय सांगावें ! असे जे जगाच्या जीवनाकरितांच जगणें आहे अर्थात् अशी जी स्थिति आहे तिलाच ' मार्दव ' नांव आहे, असें मी म्हणतों ७४. [ ह्रीः ] पराजित झालेला राजा जसा त्या पराभवामुळें लज्जेनें दुःखी कष्टी होतो, अथवा निकृष्ट–हीन स्थिति प्राप्त झाली असतां मानी पुरुष जसा निस्तेज होतो ७५. किंवा एखादा उत्तम संन्यासी अकस्मात चुकून एखाद्या चांडाळाच्या घरांस प्राप्त झाला असतां [ हे चांडाळगृह आहे असें त्यास समजलें तर ] त्या उत्तम पुरुषास जशी लज्जा उत्पन्न होते ७६. क्षत्रियाला रणांतून पळून जाणें, हें जें लाजिरवाणें कृत्य, ते कोणता क्षात्रतेजसंपन्न क्षत्रिय सहन करील ! [ कारण, त्याची त्याला लाज वाटते ] किंवा महापतिव्रता स्त्रीस ' गंगा भागिरथी ' नांवानें हांका मारणें हे कसें सहन होईल ! [ तर होत नाहीं ] ७७. रूपसुंदर मनुष्यास जर अंगावर कोड उत्पन्न झालें अथवा संभावित मनुष्यावर वाईटपणाचा आळ आला तर त्यांना ज्याप्रमाणें लज्जेनें प्राणसंकट–प्राणावर बेतल्यासारखे होते ७८. त्याप्रमाणें साडेतीन हात शरीरच [ देहात्मत्व भ्रांतीनें, परिच्छिन्नत्व भ्रांतीनें ] स्वतःस समजून जें प्रेतासारखें होऊन जगणें व वारंवार जन्मास येऊन मरणें याची ७९. आणि गर्भभेदरूपी मुशींत, रक्त व मूत्र–वीर्यादिकांच्या रसांचा ओतीव पुतळा असलेलें जें शरीर तें धारण करून [ देहात्मत्व भ्रांतीनें ] राहणें तें त्यांना लाजिरवाणें वाटते १८०. हे फार बोलणें राहूं दे. तर ज्यांना आपणच देह आहोत; असें देहतादात्म्य धारण करून नांवारूपास येणें यापेक्षां दुसरी

१ बऱ्यासाठीं, उत्तम भागीं. २ कमळानें. ३ सुवास, सुगंध. ४ मार्गी. ५ वनशोभेच्या. ६ चालता होतो. ७ या लोकींचें.

बहु असो देहपणें । नामरूपासि येणें । नाहीं गा लाजिरवाणें । तयाहूनी ॥ ८१ ॥ ऐसैसिया अवकळा । घेपे शरीराचा कंटाळा । ते लाज पैं निर्मळा । निसुगा गोड ॥ ८२ ॥ आतां सूत्रतंतु तुटलिया । चेष्टाचि ठाके सायखडिया । तैसी प्राणजयें कर्मेंद्रियां । खुंटे गती ॥ ८३ ॥ कीं मावळलिया दिनकरु । सरे किरणांचा प्रसरु । तैसा मनोजयें प्रकारु । ज्ञानेंद्रियांचा ॥ ८४ ॥ एवं मनपवननियमें । होतीं दाहीं इंद्रियें अक्षमें । तें अचापल्य वर्में । येणें होय ॥ ८५ ॥

तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता । भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

आतां ईश्वरप्राप्तीलागीं । प्रवर्ततां ज्ञानमार्गीं । धिंवसेयाचि आंगीं । उणीव नोहे ॥ ८६ ॥ वोखटें मरणाऐसें । तेंही आलें अग्निप्रवेशें । परी प्राणेश्वरोद्देशें । न गणीचि सती ॥ ८७ ॥ तैसें आत्मनाथाचिया आधी । लाऊनि विषयविषाची बाधी । धांवों आवडे पाणधी । शून्याचिये ॥ ८८ ॥ न ठाके निषेधु आड । न पडे विधीची भीड । नुपजेचि जीवीं कोड । महासिद्धीचें ॥ ८९ ॥ ऐसें ईश्वराकडे निज । धांवे आपसया सहज । तया नांव तेज । अध्यात्मिक तें ॥ १९० ॥ आतां सर्वही साहातिया गरिमा । गर्वा न ये तेचि क्षमा । जैसें देह वाहोनि रोमा । वाहणें नेणें ॥ ९१ ॥ आणि मातलिया इंद्रियांचे वेग । कां प्राचीनें खवळले रोग । अथवा योगवियोग । प्रियाप्रियांचे ॥ ९२ ॥ यया आघवियांचाचि थोरु । एके वेळे आलिया पूरु । तरी अगस्त्य कां होऊनि धीरु । उभा ठाके ॥ ९३ ॥ आकाशीं धूमाची रेखा । उठिली बहुवा आगळिका । ते गिळी येकीं झुळुका । वारा जेवीं ॥ ९४ ॥ तैसें अधिभूताधिदैवां । अध्यात्मादि उपद्रवां । पातलेया पांडवा । गिळूनि घाली ॥ ९५ ॥ ऐसें चित्तक्षोभाच्या अवसरीं । उचलूनि धैर्या जें चांगावें करी । धृती म्हणिपे अवधारीं । तियेतें गा ॥ ९६ ॥ आतां निर्वाळूनि कनकें । भरिला गांगेंपीयूखें । तया कलशाचियासारिखें । शौच असे ॥ ९७ ॥ जे आंगीं निष्काम आचारु । जीवीं विवेकु साचारु । तो सबाह्य घडला आकारु । शुचित्वाचाचि ॥ ९८ ॥ कां डित पाप ताप । पोखीत तीरींचे पादप । समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥ ९९ ॥ कां जगाचें आंध्य फेडितु । श्रियेचीं राऊळें उघडितु ।

कोणतीहि लाजिरवाणी गोष्ट वाटत नाहीं ८१. अशा दुश्चिन्हांनीं युक्त अशी ज्याचीं दुर्दशा होते, असें जें शरीर तें धारण करण्याचा साधूंना कंटाळा असतो जड-परिच्छिन्न देहाशीं तादात्म्य धारण करून जन्मणें व राहणें याची त्या निर्मळ, पवित्र जाणिवेच्या पुरुषास 'लाज' वाटत असते व इतर जे निर्लज्ज-कोडगे लोक आहेत, त्यांना तेंच शरीर तादात्म्य धारण करून राहणें गोड-बरें वाटत असते ८२. [ अचापलं ]-ज्याप्रमाणें कळसूत्री बाहुल्यांना नाचविण्याच्या दोऱ्या तुटल्या म्हणजे त्यांची चेष्टा, हालचाल बंद होते, त्याप्रमाणें [ योगाभ्यासानें ] प्राणाचा जय केला असतां कर्मेंद्रियांची गति, चेष्टा, हालचाल बंद होते ८३. किंवा सूर्य मावळल्यावर त्याच्या सर्व किरणांचा विस्तार, पसारा संपतो त्याप्रमाणें मनाचा जय केला असतां ज्ञानेंद्रियांचे [दृशी क्रियात्मक] व्यापारहि कुंठित होतात ८४. याप्रमाणें मन व प्राण यांचा नियमन-द्वारां जय केला असतां दहा इंद्रियें पंगु-अकार्यक्षम होतात, त्यालाच 'अचापल्य' असें म्हणतात. ते या उपर्युक्त वर्मानेंच समजून येते ८५.

**अन्वयार्थ**—**तेजः**-प्रगल्भता-विशिष्ट सामर्थ्य-धीटपणा-**क्षमा**-कोणी कांहीं अपराध केला असतांहि मनांत विकार उत्पन्न होऊं न देणें-**धृतिः**—शरीर, इंद्रियें इत्यादिकांना उत्साह देणारें धैर्य-**शौचं**-बाह्य व अंतर शुद्धि-**अद्रोहः**-दुसऱ्यांना मारण्याची इच्छा न करणें-**न अतिमानिता**-अतिशय मानित्व न धारण करणें-**हे भारत**-हे अर्जुना !-**दैवीं संपदं**-दैवी संपत्तीला **अभिजातस्य**-अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषामध्यें हे गुण-**भवन्ति**-असतात ३.

[ **तेजः** ] आतां ईश्वरप्राप्तीकरितां ज्ञानमार्गाचें मनापासून अवलंबन करून प्रवृत्त असतां त्याला धैर्याची उणीव पडत नाहीं८६.प्रतिव्रता स्त्रीस पतीच्या मरणानंतर तिच्या जीवंतपणीं मरणासारखी वाईट गोष्ट व तीहि अग्निप्रवेशद्वारां करण्याचा प्रसंग आला; तरीपण ती गोष्ट केवळ पतीच्याच उद्देशानें करावयाची असल्यानें तीं सहगमन करण्यास मागें पुढें पहात नाहीं ८७. त्याप्रमाणें जो आत्मनाथाची चिंता लागल्यामुळें विषयास विषवत् मानून त्याचा त्याग करून ज्यास आत्मप्राप्तीकरितां शून्याच्या अरुंद कांटेरी मार्गानें [ सुषुम्ना-नाडींतून प्राणवायु नेण्यासारख्या कठीण समाधिसाधन मार्गाचेंहि ] धांवणें-अवलंबन करणें आवडते ८८. त्याला शास्त्रांत सांगितलेल्या निषेधांची अडचण आड येत नाहीं व विधींचि भीड पडत नाहीं व महासिद्धि प्राप्त झाली असतां तिचीहि त्यास अंतःकरणांत कौतुक वाटून आवड उत्पन्नच होत नाहीं ८९. अशा प्रकारें ज्याचें अंतःकरण आपण होऊन सहज ईश्वराकडे धांव घेतें, त्यालाच आध्यात्मिक [शारीरिक] 'तेज' असें म्हणतात १९०. [ **क्षमा** ] आतां ज्याप्रमाणें देह हा आपल्यावरील सर्व रोमांस धारण करीत असूनहि 'आपण सर्व केंस धारण केलें आहेत' याची त्यास मुळींच खबर, दाद नसते. त्याप्रमाणें येईल तो लहान-मोठा प्रसंग सहन करून आपण 'सर्वहि सहन' करतो, 'मी श्रेष्ठ' अशारूपानें मोठेपणाच्या योगानें जें गर्वाला न येणें [ स्वतःच्या सहनशीलतेची मुळींहि खबर नसणें ] तीच 'क्षमा' होय ९१. [ **धृतिः** ] आणि विषयसेवना-विषयीं इंद्रियांची असीम, अति प्रवृत्ति वाढली असतां किंवा पूर्वकर्मानें [ प्रारब्धानें ] रोग खवळले असतां अथवा अप्रिय वस्तूचा योग, किंवा प्रिय वस्तूचा वियोग झाला असतां ९२. या सर्व गोष्टींचा एकसमयावच्छेदें-करून पूर आला, प्राप्त झाला असतां तो एकदम ग्रास करण्यास-सहन करण्यास धैर्य, अगस्ती ऋषि होऊन उभे रहाते [ अचलपणें सहन करतो ] ९३. आकाशांत धुराचा मोठ्या विलक्षण जोरानें एकदम लोट उठला तरीहि ज्याप्रमाणें वारा एका झुळुकेसरसा त्यास गिळून नष्ट करतो ९४. त्याप्रमाणें अर्जुना ! आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक हे त्रिविध उपद्रव जरी एकदम प्राप्त झाले तरीहि ते सर्व [ जें धैर्य ] गिळून टाकते ९५. याप्रमाणें चित्तांत रागादि विकार उत्पन्न होण्याचें वेळींहि सहनशीलतेस उचलून धरून चांगली टिकून कायम राहणारी जी मनोवृत्तिरूप शक्ति तिलाच 'धृति' असें म्हणतात. ९६. [ **शौचम्** ] आतां सुवर्ण-शुद्ध करून तयार केलेला कलश स्वच्छ केला व त्यांत अमृततुल्य गंगोदक भरलें असतां, तें जसें सर्वच, अंतर्बाह्य शुद्ध असतें, त्याप्रमाणें ते 'शौच' [ पवित्रत्व, शुद्धत्व ] होय ९७. ज्या मनुष्याचें शारीरिक बाह्य आचरण निष्काम असतें व ज्याच्या अंतर्यामीं खराच आत्मानात्म विवेक नित्य जागृत असतो, तो अंतर्यामीं व बाहेरूनहि शुद्ध असतो, शुचित्वाचा पुतळाच असतो, तेंच खरे 'शुचित्व' होय ९८. [ **अद्रोहः** ] किंवा गंगेचे उदक जसें जगाचे-स्नान करणाराचेंहि पाप व ताप नाहींसें करीत व तिच्या कांठावरील झाडा झुडपांचे जातां जातां सहजच पोषण करीत, शेवटीं समुद्रास जाऊन मिळते ९९. किंवा ज्याप्रमाणें सूर्य जगाचा

निघे जैसा भास्वतु। प्रदक्षिणे ॥२००॥ तैसी बांधिलीं सोडिता। बुडालीं काढिता। सांकडीं फेडिता। आर्तांचिया ॥ १ ॥ किंबहुना दिवसराती। पुढिलांचें सुख उन्नति। आणित आणित स्वार्थीं। प्रवेशिजे ॥ २ ॥ वांचूनि आपुलिये काजालागीं। प्राणिजाताच्या अहितभागीं। संकल्पाचीही आडवंगी। न करणें जें ॥ ३ ॥ पैं अद्रोहत्व ऐशिया गोष्टी। ऐकसी जिया किरीटी। तें सांगितलें हें दिठी। पाहों ये तैसें ॥ ४ ॥ आणि गंगा शंभूचा माथां। पावोनि संकोचे जेवीं पार्था। तेवीं मान्यपणें सर्वथा। लाजणें जें ॥ ५ ॥ तें हें पुढत पुढती। अमानित्व जाण सुमती। मागां सांगितलेंसे किती। तेंचि तें बोलों ॥ ६ ॥ एवं इहीं सव्विसें। ब्रह्मसंपदा हे वसत असे। मोक्षचक्रवर्तीचें जैसें। अग्रहार होय ॥ ७ ॥ नाना हे संपत्ति दैवी। या गुणतीर्थांची नीच नवी। निर्विण्णसगरांची दैवी। गंगाचि आली ॥ ८॥ कीं गुणकुसुमांची माळा। हे घेऊनि मुक्तिबाळा। वैराग्यनिरपेक्षाचा गळा गिंवसीत असे ॥ ९ ॥ कीं सव्विसें गुणज्योती। इहीं उजळूनि आरती। गीता आत्मया निजपती। नीरांजना आली ॥ २१० ॥ उगळितें निर्मळें। गुण इयेचि मुक्ताफळें। दैवी शुक्तिकळें। गीतार्णवींची ॥ ११ ॥ काय बहु वानूं ऐसी। अभिव्यक्ती ये अपैसी। केलें दैवी गुणराशी। संपत्तिरूप ॥ १२ ॥ आतां दुःखाची आंतुवट वेली। दोषकाट्यांची जरी भरली। तरी निजाभिधानी घाली। आसुरी ते ॥ १३ ॥ पैं त्याज्य त्यजावयालागीं। जाणावी जरी अनुपयोगी। तरी ऐका ते चांगी। श्रोत्रशक्ती ॥१४॥ तरी नरकव्यथा थोरी। आणावया दोषींघोरीं। मेळू केला ते आसुरी। संपत्ति हे ॥ १५ ॥ नाना विषवर्गु एकवटु। तया नांव जैसा बासटु। आसुरी संपत्ति हा खोटु। दोषांचा तैसा ॥ १६ ॥

दम्भोदर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च। अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥

तरी तयाचि असुरां। दोषांमाजीं जया वीरा। वाडपणाचा डांगोरा। तो दंभु ऐसा ॥ १७ ॥ जैसी आपुली जननी। नग्न दाविलिया जनीं। तें तीर्थचि परी पतनीं। कारण होय ॥ १८ ॥ कां विद्या गुरूपदिष्टा। बोभाइलिया चोहटां। तरी इष्टदा परी अनिष्टा। हेतु होती ॥ १९ ॥ पैं आंगें बुडतां महापूरीं। जे वेगें काढी पैलतीरीं। ते नावचि बांधिलिया शिरीं। बुडवी जैसी ॥ २२० ॥ कारण जें जीविता। तें वानिलें जरी सेवितां। तरी अन्नचि

अंधकार नाहींसा करीत सूर्यविकासिनी कमळांना विकसित करून व जगांतील संपत्तीची [ शोभेची ] लक्ष्मीची मंदीरें उघडून व्यापार सुरू करीत आपली रोजची प्रदक्षिणा करण्यास निघतो २००. त्याप्रमाणें जे अज्ञानानें बांधलेली, बद्ध असतील त्यांना मुक्त करीत व जे संसारसागरांत बुडाले आहेत, त्यांना बाहेर काढीत व जे अध्यात्मादि उपद्रवानें पीडित आहेत त्यांचे दुःख, संकटें निवारण करीत १. फार काय सांगावें ! ! रात्रंदिवस जो दुसऱ्यांचें सुख वाढवित वाढवित स्वार्थी म्हणजें जें खऱ्या आत्महितांत प्रवेश करितात २. त्याविना [ एवढेच नव्हें तर ] आपला स्वार्थ साधण्याकरितां दुसऱ्याच्या अहितविषयीं संकल्पाचीहि आडकांठीं जे न करणें म्ह. ज्याच्या अंतःकरणांत इतरांच्या हित नाशाचा संकल्पहि उत्पन्न होत नाहीं ३. अर्जुना ! 'अद्रोहत्व' अशा ज्या गोष्टी तूं ऐकतोस तें अद्रोहत्व मी तुला प्रत्यक्ष तुझ्या दृष्टीस उघड रितीनें पडेल असें खुलासेवार सांगितलें आहे ४. [ **नातिमानिता** ] आणि पार्था ! भगीरथानें गंगेची प्रार्थना करून तिला मृत्यु-लोकांत आणितेवेळी शंकरांनीं तिला आपल्या मस्तकावर जटेंत धारण केल्यावर [ तिचा वेगाचा गर्व हरण होऊन ] ती जशी लज्जित व संकोचित झाली, त्याप्रमाणें लोकांनीं मान दिला असतां ती स्वतः मानास योग्य असूनहि पूर्णपणें संकोचित होतो, ५. त्यालाच हे सुमते अर्जुना ! 'अमानित्व' असें जे म्हणतात ते हेंच होय, असें समज. याबद्दल तुला मागें तेराव्या अध्यायांत पुष्कळ विवेचन सांगितलें आहे, तेंच तें पुनः पुनः किती सांगूं ! ६. याप्रमाणें 'दैवी संपत्ति' या सव्वीस गुणांच्या रूपानें-जणुं काय ब्रह्मैश्वर्यच वास्तव्य करीत आहे. मोक्षरूपी सार्वभौम राजाचें हे 'सव्वीस गुण' म्हणजे जणुं काय अग्रहार–इनामी गांव किंवा जमीनच आहे ७. किंवा या सव्वीस गुणरूपी तिर्थांनी नित्यनवी भरलेली अशी ही दैवी संपत्तिरूप भगवती गंगाच असून ती वैराग्य संपन्न पुरुषरूपी सगरांचा उद्धार करण्याकरितांच दैवानें प्राप्त झाली आहे ८. किंवा ही सव्वीस गुणरूपी पुष्पांची माळा हातांत घेऊन मुक्तिरूपी वधू निरपेक्ष वैराग्यवान् पुरुषरूपी वराचा गळा [ त्याला वरण्यासाठीं ] शोधीत आहे ९. किंवा या सव्वीस गुणरूपी वाती लावून जणुं काय गीता ही आपला पति जो आत्मा त्या पतीस ओवाळ-ण्याकरितां आरती घेऊन आली आहे २१०. किंवा गीतारूपी समुद्रांतील ही सव्वीस गुणरूपी निर्मळ मोत्यें, दैवी संपत्तीरूपी हा शिंपला आहे व त्या शिंपल्याच्या शकलांतून उत्पन्न होऊन मोती बाहेर टाकली आहेत ११. दैवी संपत्तीच्या गुणसमुदायाची जीं हीं लक्षणें सांगितलीं तेवढ्यावरून ती आपोआप स्पष्ट समजण्या-सारखीच आहेत त्यापेक्षां अधिक किती म्हणून सांगूं ! १२. आतां, आसुरी संपत्ति ही आंतून दुःखरूपी अस-लेली बळकट वेली असून दोषरूपी कांट्यांनीं जरी ती भरलेली आहे तरी ती मी आपल्या सांगण्याच्या क्रमांत घालतो. तूं आपल्या मनांत ती समजून घे १३. कारण असें पहा, जी वस्तु त्याज्य आहे, ती अनुपयोगी आहे अर्थात आपल्या उपयोगाची नाहीं, हे खरे तरीपण तिचा त्याग करण्याकरितांच ती जाणली पाहिजे म्हणून कानाच्या सर्व बळानिशी सावधपणें ऐकून घे १४. हें बव जीवांना भयंकर अशी नरकप्राप्ति करून देण्याकरितां घोर दोषांनीं जी आपली एकजूट केली आहे. ती हीं 'आसुरी संपत्ति' होय १५. किंवा सगळी विषें एकत्र झाली म्हणजे त्यांस ज्याप्रमाणें 'काळकूट विष' हें नांव घावें, त्याप्रमाणें आसुरी संपत्ति म्हणजे सर्व दोषांची एक 'लगडच'च होय १६.

**अन्वयार्थ—हे पार्थ—हे** अर्जुना ! **आसुरीं—संपदम्**—आसुरी संपत्तीला-**अभिजातस्य**-अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषाचें—**दंभः**—धार्मिकता प्रगट करणें—**दर्पः**—गर्व—**च**—व—**अभिमानः**—मी उत्कृष्ट आहें, असें मानणें—**क्रोधः**—कोप—**च**—आणि—**पारुष्यम् एव**—कठोर भाषण—मर्मभेदक शब्द बोलणें—**च**—व—**अज्ञानं**—मिथ्या प्रत्यय—कर्तव्य व अकर्तव्य या—विषयांचें अविवेकज्ञान—**हे** गुण असतात ४.

[ **दंभः** ] हे वीरा ! त्या असुर दोषांमध्यें ज्यांची मुख्य दोष म्हणून मोठेपणाची प्रसिद्धि आहे तो 'दंभ' असा आहे; १७. ज्याप्रमाणें आपल्या आईची निंदा करून तिचा दोष लोकांस उघड सांगून तिची निर्भ-र्त्सना केली असतां ती तीर्थाप्रमाणेंच आपल्यास पावन कर-णारी आहे; तरीपण आपल्या पतनास, अधोगतीला नेण्यास तीच कारणीभूत होते १८. किंवा श्रीगुरूंनीं उपदे-शिलेली व त्यापासून आपण संपादन केलेली ब्रह्मविद्या ती चव्हाट्यावर उघड प्रसिद्ध करीत बसलें, तर ती विद्या इष्ट फल देणारी म्ह. आपले परमहित करणारी असूनहि ती आपल्या अहितास कारणीभूत होते १९. हें पहा ! जी नाव आपण स्वतः महापुरांत शिरून आपण बुडत असतांना आपल्याला काढून वेगानें पली-कडील तीरास नेऊन पोहोंचविते ती नावच जर आपण आपल्या डोक्यावर बांधून घेतली, तर ती ज्याप्रमाणें आपल्यास बुडविते २२०. हे पंडुसुता ! जीवाचे भरण-

पंडुसुता । होय विष ॥ २१ ॥ तैसा दृष्टादृष्टाचा सखा । धर्मु जाला तो फोकारिजे देखा । तरी तारिता तोचि दोखा- । लागीं होय ॥ २२ ॥ म्हणौनि वाचेचा चौबारा । घातलिया धर्माचा पसारा । धर्मुचि तो अधर्मु होय वीरा । तो दंभु जाणे ॥ २३ ॥ आतां मूर्खाचिये जिभे । अक्षरांचा आंबुखा सुभे । आणि तो ब्रह्मसभे । न रिझे जैसा ॥ २४ ॥ कां माहुरी लोकांचा घोडा । गजपतिही मानी थोडा । कां कांटियेवरिल्या सरडा । स्वर्गुही नीच ॥ २५ ॥ तृणाचेनि इंधनें । आगी धांवे गगनें । थिल्लरबळें मीनें । न गणिजे सिंधू ॥ २६ ॥ तैसा माजे स्त्रिया धनें । विद्या स्तुती बहुतें मानें । एके दिवसींचेनि परान्नें । अल्पकु जैसा ॥ २७ ॥ अभ्रच्छायेचिया जोडी । निदैवु घर मोडी । मृगांबु देखोनि फोडी । पणियाडें मूर्ख ॥ २८ ॥ किंबहुना ऐसैसें । उतणें जें संपत्तिमिसें । तो दर्पु गा अनारिसें । न बोलें घेई ॥ २९ ॥ आणि जगा वेदीं विश्वासु । आणि विश्वासीं पूज्य ईशु । जगीं एक तेजसु । सूर्युचि हा ॥ २३० ॥ जगस्पृहे आस्पद । एक सार्वभौमपद । न मरणें निर्विवाद । जगा पाढियें ॥ ३१ ॥ म्हणौनि जग उत्साहें । यातें वानूं जाये । कीं तें आइकोनि मत्सरु वाहे । फुगों लागे ॥ ३२ ॥ म्हणे ईश्वरातें खायें । तया वेदा विष सूयें । गौरवामाजीं त्राये । भंगीत असे ॥ ३३ ॥ पतंगा नावडे ज्योती । खद्योता भानूची खंती । टिटिभेनें आपांपती । वैरी केला ॥ ३४ ॥ तैसा अभिमानाचेनि मोहें । ईश्वराचेंही नाम न साहे । बापातें म्हणे मज हे । सवती जाली ॥ ३५ ॥ ऐसा मान्यतेचा पुष्टगंडु । तो अभिमानी परमलंडु । रौरवाचा रूढु । मार्गुचि पैं ॥ ३६ ॥ आणि पुढिलांचें सुख । देखणियाचें होय मिख । चढे क्रोधाग्नीचें विख । मनोवृत्ती ॥ ३७ ॥ शीतळाचिये भेटी । तातला तेलीं आगी उठी । चंद्रु देखोनि जळे पोटीं । कोल्हा जैसा ॥ ३८ ॥ विश्वाचें आयुष्य जेणें उजळे । तो सूर्यु उदैला देखोनि सवळे । पापिया फुटती डोळे । डुडुळाचे ॥ ३९ ॥ जगाची सुखपहांट । चोरां मरणाहूनि निकृष्ट । दुधाचें काळकूट । होय व्याळीं ॥ २४० ॥ अगाधें समुद्रजळें । प्राशितां अधिक जळे । वडवाग्नी न मिळे । शांति कहीं ॥ ४१ ॥ तैसा विद्याविनोदविभवें । देखे पुढिलांचीं दैवें । तंव तंव रोषु

पोषण करण्यास कारणीभूत असणारें जें अन्न तेंच उत्तम म्हणून जर वाजवीपेक्षां अधिक सेवन केलें तर तें अन्नच खरें, परंतु अजीर्ण होऊन विषाप्रमाणें घातक होतें २१. त्याप्रमाणें इहपरलोकीचा सहाय्यक सखा जो धर्म, तो जर चव्हाट्यावर बोलून उघडा केला असतां तो धर्म, आपल्यास तारणाराच खरा, परंतु तो पातकासच-दोषासच कारण होतो २२. म्हणून हे वीरा ! आपण केलेल्या सर्व धर्माचा पसारा वाचेच्या चव्हाट्यावर ठेवला म्ह. जर चहूंकडे आपल्याच वाचेनें तो प्रसिद्ध केला तर धर्मच अधर्म होतो, आणि तोच 'दंभ' होय असें समज २३. [ दर्पः ] आतां मूर्ख मनुष्याच्या जिभेवर कांहीं अक्षरांचा शितोंडा पडला म्ह० त्यास चार अक्षरें आली म्हणजे तो जसा ब्रह्मदेवाचे सभेंतहि समाधान पावत नाहीं त्या सभेस तुच्छ मानतो २४. किंवा तबेला ठेवणाऱ्या लोकांचा [ तबेल्यांतील ठाणबंदी ] घोडा जसा ऐरावतासहि कमी दर्जाचा मानतो अथवा सरडा कांटेरी झाडाच्या कुंपणाच्या वरच्या टोंकावर बसला, म्हणजे तो स्वर्गालाहि नीच-ठेंगणा मानतो २५. तृण हेंच इंधन-जळण मिळालें तरी अग्नीच्या ज्वाला ज्याप्रमाणें आकाशांत धांव घेऊन पोहोंचतात; किंवा डबक्यांतील मासा आपल्या डबक्यांतील पाण्याच्या बळावर समुद्रास मुळींहि मोजीत [ किंमत देत ] नाहीं २६. अथवा ज्याप्रमाणें एक दिवस परान्न मिळालें कीं तेवढ्यानेंच दरिद्री मनुष्य उन्मत्त होतो. त्याप्रमाणें जो स्त्री, धन, विद्या, स्तुति व बहुमान यांच्या क्षणिक प्राप्तीनें उन्मत्त होतो २७. एकादे दिवशीं ढगांची छाया पडलेली पाहून 'आतां आपल्याला बसावयास या छायेविना दुसरी सावली काय करावयाची आहे' अशा विचारानें दैवहीन मनुष्य ज्याप्रमाणें आपलें राहण्याचे घर मोडून टाकतो किंवा जसा मृगजल पाहून एखादा मूर्ख मनुष्य आपल्या घरांतील आड बुजवून टाकतो, किंवा तळें फोडतो २८. अधिक काय सांगावें ! ! याप्रमाणें संपत्तीच्या योगानें जें उन्मत्त होणें तोच 'दर्प' होय असें समज, हे तुला मी निःसंशय सांगतों. याशिवाय आतां निराळें सांगावयास नको २९. [ अभिमानश्च ] आणि सर्व जगाचा वेदांवर नितान्त भरंवसा आहे व सर्व विश्वाला एकमेव ईश्वरच पूज्य आहे आणि सर्व जगांत तेजस्वी असा एकमेव सूर्यच आहे [ त्याविना दुसरा कोणीहि तेजस्वी नाहीं; ] २३०. संपूर्ण जगाच्या इच्छेचे, महत्त्वाकांक्षेचं एकमेव स्थान, इच्छेचा विषय म्हणजे "सार्वभौमपद" हे होय. [ यच्चयावत् प्राणिमात्रांच्या इच्छेचा विषय म्हणजे नित्य निरतिशय सुख हा आहे त्याचें उपलक्षणात्मक सार्वभौमपद आहे ] तसेंच 'न मरणें' आपण कधींहि मरूं नये हेहि सर्व जगास निर्विवादपणें आवडते, [ दुःखाची कोणासहि इच्छा नाहीं. दुःखाच्या आत्यंतिक निवृत्तीची सर्वांस इच्छा आहे. 'मरण' हे भयसीमाच आहे तेंच येथें उपलक्षणानें घेऊन दुःख निवृत्तींत सर्वांचीं एकवाक्यता सूचित होते]. ३१. म्हणून लोक मोठ्या उत्साहानें विश्वासाचे स्थान अशा वेदाचे व वंदनीय ईश्वराचे वर्णन करूं लागले तर ते ऐकून लागलीच यांचें विषयीं ज्याच्या मनांत मत्सर उत्पन्न होतो व जो गर्वानें फुगतो ३२. व म्हणतो कीं मी ईश्वरासच खाऊन टाकीन, वेदास तर विषच घालून ठार करीन व जो सर्वांचें रक्षण करणारा ईश्वर त्या ईश्वराची सत्ता हरण करीन ! [ किंवा आपली सर्व शक्ति आपले थोरपण मिरविण्यांत खर्च करतो ] ३३. पतंगाला दिव्याची प्रकाशमान् ज्योत आवडत [सहन होत] नाहीं, काजव्याला सूर्याचा तिटकारा येतो व टिटवीनें समुद्राशीं वैर मांडले ३४. त्याप्रमाणें अभिमानाच्या मोहानें मदानें त्याला ईश्वराचें तर नांवहि सहन होत नाहीं व वेदासहि मला ही एक सवतच झाली आहे, असें म्हणतो ३५. अशा प्रकारें ज्याच्या अंगांत मान्यतेचा 'पुष्टगंड' अतिशय ताठा भरलेला असतो तोच 'अभिमानी' होय. तो पुरुष अतिशय उन्मत्त असून रौरव नरकाचा रहदारीचा, हमरस्ताच होय ३६. [ क्रोधः ] आणि दुसऱ्याचे सुख पहाण्याचें निमित्त मात्र होण्याबरोबर ज्याच्या मनोवृत्तींत क्रोधरूप अग्नीचें जणुं विषच चढतें ३७. ज्याप्रमाणें तापलेल्या तेलाची व थंड पाण्याची भेट झाली असतां त्या तापलेल्या तेलांत जास्त जाळच भडकतो किंवा चंद्राला पाहूनच कोल्हा आपल्या मनांत जळफळावयास लागतो ३८. ज्याच्या योगानें सर्व विश्वाचें आयुष्य उजळून निघते व सर्व व्यापार सुरू होतात, तोच सूर्य प्रातःकाळीं उगवलेला पाहून पापी घुबडाचे मात्र डोळे फुटतात ३९. जगाची जी पहांट झाली म्हणजे सर्व लोकांस सुख होतें, पण तीच पहांट चोरांस मरणाहूनहि जास्त वाईट, दुःखदायक वाटते आणि सर्पास दूध घातलें तरी त्याचें भयंकर असें काळकूट विषच होतें २४०. वडवाग्नि हा अगाध अशा समुद्रजलाचें जों जों अधिकाधिक प्राशन करीतो तों तों तो वडवाग्नि उलट अधिकच प्रदीप्त होतो आणि त्याला शांतता-तृप्ति म्हणून कसली ती मुळींच होत नाहीं ४१. त्याप्रमाणें दुसऱ्याचे विद्या विनोदवैभव-ऐश्वर्य यांनीं

डुणावे । क्रोधु तो जाण ॥ ४२ ॥ आणि मन सर्पाची कुटी । डोळे नाराचांची सुटी । बोलणें ते वृष्टी । इंगळांची ॥ ४३ ॥ येर जें क्रियाजात । तें तिखयाचें कर्वत । ऐसें सबाह्य खसासित । जयाचें गा ॥ ४४ ॥ तो मनुष्यांत अधमु जाण । पारुष्याचें अवतरण । आतां आइक खूण । अज्ञानाची ॥ ४५ ॥ तरी शीतोष्ण-स्पर्शा । निवाडु नेणें पाषाणु जैसा । कां रात्री आणि दिवसा । जात्यंधु तो ॥४६॥ आगी उठिला आरोगणें । जैसा खाद्याखाद्य न म्हणे । कां परिसा पाडु नेणें । सोनया लोहा ॥४७॥ नातरी ते नानारसीं । रिघोनि दर्वी जैसी । परी रसस्वादासी । चाखों नेणें ॥४८॥ कां वारा जैसा पारखी । नव्हेचि गा मार्गामार्गाविखीं । तैसें कृत्याकृत्य विवेकीं । अंधपण जें ॥४९॥ हें चोख हें मैळ । ऐसें नेणोनियां बाळ । देखे तें केवळ । मुखींचि घाली ॥ २५० ॥ तैसें पापपुण्याचें खिचटें । करोनि खातां बुद्धिचेष्टे । कडु मधुर न वाटे । ऐसी जे दशा ॥ ५१ ॥ तिये नाम अज्ञान । या बोला नाहीं आन । एवं साही दोषांचें चिन्ह । सांगितलें ॥ ५२ ॥ इहींच साही दोषांगीं । हे आसुरी संपत्ति दाटुगी । जैसें थोर विषय सुभगे अंगीं । अंग सानें ॥ ५३ ॥ कां तिघा वन्हींच्या पांतीं । पाहतां थोडे ठाय गमती । परी विश्वही प्राणाहुती । करूं न पुरे ॥ ५४ ॥ धातयाही गेलिया शरण । त्रिदोषीं न चुके मरण । तया तिहींची दुणी जाण । साही दोष हे ॥ ५५ ॥ इहीं साही दोषीं संपूर्णी । जाली इयेची उभारणी । म्हणौनि आसुरी उणी । संपदा नव्हे ॥ ५६ ॥ परी क्रूरग्रहांची जैसी । मांदी मिळे एकेचि राशी । कां येती निंदकापासीं । अशेष पापें ॥ ५७ ॥ मरणाराचें आंग । पडिघाती अवघेचि रोग । कां कुमुहूर्तीं दुर्योग । एकवटती ॥ ५८ ॥ विश्वासला आतुडवीजे चोरा । शिणला सुइजे महापुरा । तैसें दोषीं इहीं नरा । अनिष्ट कीजे ॥ ५९ ॥ कां आयुष्य जातिये वेळे । शेळिये सातवेउळी मिळे । तैसे साही दोष सगळे । जोडती तया ॥ २६० ॥ मोक्षमार्गाकडे । जैं ययाचा आंबुखा पडे । तैं न निघे म्हणौनि बुडे । संसारीं जो ॥ ६१ ॥ अधमां योनींच्या पाउटीं । उतरत जो किरीटी । स्थावरांही तळवटीं । बैसणें घे ॥ ६२ ॥ हें असो तयाच्या ठायीं । मिळोनि साही दोषीं इहीं । आसुरी संपत्ति पाहीं । वाढविजे ॥ ६३ ॥ ऐसिया या दोनी । संपदा प्रसिद्धा जनीं । सांगितलिया चिन्हीं । वेगळाल्या ॥ ६४ ॥

दैवी संपद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता । मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥

सर्वतोपरी संपन्न अशी सभाग्यता हीं जों जों पाहतो तों तों संताप दुणावतो व ज्याच्या अंगाचा अगदीं तिळपापड होऊन जातो, तोच 'क्रोध' होय असें तूं समज ४२. [ **पारुष्यमेव च** ] ज्याचें मन म्हणजे जणुं सर्पाचें वारूळच असते. [ परप्राणघातक संकल्पयुक्त असून ] ज्याची दृष्टि बाणांच्या अग्राप्रमाणें तीक्ष्ण सुटणारी असतें व ज्याचे भाषण म्हणजे अग्नीच्या निखाऱ्यांचा वर्षावच होय म्ह० त्याप्रमाणें तें प्रखर असतें ४३. आणि ज्याच्या इतर ज्या ज्या कांहीं क्रिया आहेत, त्या पोलादी कर्वताप्रमाणें इतरांना त्रासदायक असतात. अशा प्रकारें जो दुसऱ्याचें शरीरास मनास भेद होणाऱ्या कठोर क्रियांनीं अंतर्बाह्य भरलेला आहे ४४. तो मनुष्यां-मध्यें अधम आहे असें समज. याप्रमाणें तो मनुष्य 'पारुष्याची'-कठोरपणाची केवळ मूर्तिच होय. [ **अज्ञानम्** ] आतां अज्ञानाचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक ४५. ज्याप्रमाणें दगड हा थंडी व ऊन यांच्या उष्ण-शीत स्पर्शाची वेगळिक मुळींच जाणत नाहीं किंवा जन्मांध रात्र व दिवस हा भेद मुळींच जाणत नाहीं ४६. अग्नि खावयास भडकला म्हणजे तो जसा कोणत्या वस्तूचा नाश करावा; किंवा कोण-तीचा करूं नये, हे योग्यायोग्य जाणत नाहीं; अथवा परिस हा सोनें किंवा लोखंड यांत जसा भेद जाणत नसतो ४७. किंवा स्वयंपाकांतील पळी ज्याप्रमाणें नाना-तऱ्हेच्या रसांत फिरविण्याच्या निमित्तानें प्रवेश करते; पण ती रस किंवा रसाची रुचि यांचा उपभोग घेणें जाणत नाहीं ४८. अथवा वारा वाहूं लागला म्हणजे हा लहान किंवा मोठा रस्ता बऱ्यावाईट मार्गास न समजतां सर्वत्र वाहतो, त्याप्रमाणें चांगल्या किंवा वाईट कृत्याकृत्यांच्या विचाराविषयीं जें आंधळेपण असते ४९. ही वस्तु चांगली स्वच्छ किंवा मळकट असें न जाणतां लहान मूल जसें जी वस्तु पाहील ती तोंडांतच घालतें २५०. त्याप्रमाणें पाप व पुण्यांची खिचडी तयार करून खात असतां त्याचीं सुखदुःखरूपी फळें भोगतां ज्याच्या बुद्धीस तिच्या व्यवहारांत बरें किंवा वाईट यांचें कांहींच तारतम्य वाटत नाहीं, अशी जी स्थिति ५१. तिला 'अज्ञान' असें नांव आहे, या बोलण्यांत अन्यथा नाहीं. याप्रमाणें सहाहि दोषांचीं लक्षणें तुला सांगितलीं ५२. दैवी संपत्तीपेक्षां आसुरी संपत्तीची संख्या कमी आहे तरीहि हे सहा दोषांच्या आंगांनी युक्त असल्यांमुळें ही आसुरी संपत्ति मोठी बलाढ्य झालेली आहे. ज्याप्रमाणें एकाद्या सडपातळ सुंदर स्त्रीच्या शरीराची ठेवण अंगा-सरशीं असते खरी, तरीपण तिच्या ठिकाणीं विषय अधिक असतो ५३. किंवा प्रलयाग्नि, विद्युदग्नि व वडवाग्नि या तीन अग्नींची संख्यापंक्ति पाहूं गेलें असतां थोडी आहे पण ते खाण्यासाठीं भडकलें तर त्यांना प्राणाहुति कर-ण्याला हें विश्वहि पुरणार नाहीं ५४. अरे! ब्रह्मदेवास शरण गेलें तरीहि ज्यास कफ-पित्त-वात क्षोभात्मक त्रिदोष झाला आहे त्या मनुष्याचें मरण चुकत नाहीं, त्या तीन दोषांच्या दुप्पट हे सहा दोष आहेत, असें समज ५५. या संपूर्ण सहा दोषांनीं ह्या आसुरी संप-त्तीची उभारणी झाली असली तरी ती आपल्या पराक्रमांत कमी आहे असें नाहीं ५६. परंतु दुष्ट-अनिष्ट ग्रहांच्या समुदायाचा योग एखादेवेळीं जसा एकाच राशीला येतो, किंवा निंदा करणाऱ्याजवळ जशीं सर्व पापें येतात ५७. मरण समीप आलेल्या मनुष्यास ज्याप्रमाणें सर्व रोग व्यापून ग्रस्त करतात किंवा कुमुहुर्ताचे वेळीं कुयोग एकत्र होतात ५८. दुसऱ्या एखाद्यावर विश्वास ठेव-णाऱ्या मनुष्यास [ ज्याच्यावर विश्वास ठेवला त्यानें ] चोरांच्या तावडींत सांपडवावे किंवा थकलेल्या भागलेल्या मनुष्यास जसे महापुरांत घालावे [ म्हणजे त्याचे जसें वाईट परिणाम होतात ] त्याप्रमाणें या सहा दोषांकडून मनुष्याचें अतिशय अनिष्ट, अहित होतें ५९. किंवा शेळीचे आयुष्य संपत आले कीं, मग ती चरत असतांहि तिला सात नाग्यांची इंगळी चावण्याचा योग यावा त्याप्रमाणें हे सर्वच्या सर्व-सहाहि दोष त्या मनुष्यास प्राप्त होतात २६०. मोक्षमार्गाची वाटचाल करणाऱ्यांवर [मोक्षस्वरूपाचे व मोक्षसाधनाचे त्यास अचूक ज्ञान नसल्यामुळें ] जर या दंभादि दोषांचा नुसता शिंतोडा पडला तरीहि 'मी संसार सागरांतून निघणारच नाहीं' असें म्हणून तो संसारांतच बुडून राहतो ६१. अर्जुना! अधम योनीच्या पायऱ्यांनीं खालीं उतरत उतरत जन्म घेत तो स्थावर योनीच्या तळापर्यंत येऊन ठेपतो ६२. हें असो, त्याच्याच ठिकाणीं हे सहा दोष एकत्र होऊन त्याचे-कडून ही आसुरी संपत्ति वाढविली जाते असें जाण ६३. याप्रमाणें जगांत ज्या ह्या दोन संपत्ति प्रसिद्ध आहेत, त्यांचीं निरनिराळीं लक्षणें आम्हीं तुला सांगितलीं ६४.

**अन्वयार्थ-दैवी संपद्**-देवांची संपत्ति-**विमोक्षाय**-संसारांतून मुक्त होण्यासाठीं आहे व-**आसुरी**-[ **संपद्** ] असुरांची संपत्ति-**निबन्धाय**-नियत बंधासाठीं आहे असें-**मता**-मानलेलें आहे-**पांडव-हे** अर्जुना! **मा शुचः**-तूं शोक करूं नको. तूं-**दैवीं संपदं**-दैवी संप-त्तीला-**अभिजातः असि**-अनुलक्षून उत्पन्न झाला आहेस ५.

इया दोन्हींमाजीं पहिली। दैवी जे म्हणितली। ते मोक्षसूर्यें पाहली। उखाचि जाण ॥ ६५ ॥ येरी जे दुसरी। संपत्ति कां आसुरी। ते मोहलोहाची खरी। सांखळी जीवां ॥ ६६ ॥ परि हें आइकोनि झणें। भय घेसी हो मनें। काय रात्रीचा दिनें। धाकु धरिजे ॥ ६७ ॥ हे आसुरी संपत्ति तया। बंधालागीं धनंजया। जो साहीं दोषां ययां। आश्रयो होय ॥ ६८ ॥ तूं तंव पांडवा। सांगितलेया दैवा। गुणनिधी बरवा। जन्मलासी ॥ ६९ ॥ म्हणौनि पार्था तूं या। दैवी संपत्ती स्वामिया। होऊनि यावें उवांया। कैवल्याचिया ॥ २७० ॥

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च। दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥

आणि दैवां आसुरां। संपत्तिवंतां नरां। अनादिसिद्ध उजगेरा। राहाटीचा आहे ॥ ७१ ॥ जैसे रात्रीच्या अवसरीं। व्यापेरिजे निशाचरीं। दिवसा सुव्यवहारीं। मनुष्यादिकीं ॥ ७२ ॥ तैसिया आपुलालिया राहाटीं। वर्तती दोन्ही सृष्टी। दैवी आणि किरीटी। आसुरी येथ ॥ ७३ ॥ तेवींचि विस्तारूनि दैवी। ज्ञानकथनादि प्रस्तावीं। मागील ग्रंथीं बरवी। सांगितली ॥ ७४ ॥ आतां आसुरी जे सृष्टी। तेथिंची उपलऊं गोठी। अवधानाची दिठी। दे पां निकी ॥ ७५ ॥ तरी वाद्येंवीण नादु। नेदी कवणाही सादु। कां अपुष्पीं मकरंदु। न लभे जैसा ॥ ७६ ॥ तैसी प्रकृति हे आसुर। एकली नोहे गोचर। जंव एकाधें शरीर। मांल्हातीना ॥ ७७ ॥ मग आविष्करला लांकुडें। पावकु जैसा जोडे। तैसी प्राणिदेहीं सांपडे। आटोपली हे ॥ ७८ ॥ ते वेळीं जे वाढी ऊंसा। तेंचि आंतुला रसा। देहाकारु होय तैसा। प्राणियांचा ॥ ७९ ॥ आतां तयाचि प्राणियां। रूप करूं धनंजया। घडले जे आसुरीया। दोषवृंदीं ॥ २८० ॥

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः। न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥

तरी पुण्यालागीं प्रवृत्ती। कां पापाविषयीं निवृत्ती। या जाणणेयाची राती। तयाचें मन ॥ ८१ ॥ निगणेयां आणि प्रवेशा। चित्त नेदीतु आवेशा। कोशकिटु जैसा। जाचिन्नलें पैं ॥ ८२ ॥ कां दिधलें मागुती येईल। कीं न ये हें पुढील। न पाहतां दे भांडवल। मूर्ख चोरां ॥ ८३ ॥ तैसिया प्रवृत्ति निवृत्ति दोनी। नेणिजती आसुरीं जनीं। आणि शौच तें स्वप्नीं। देखती ना ते ॥ ८४ ॥ काळिमा सांडील कोळसा। वरी चोखी[२२] होईल वायसा। राक्षसही मांसा। विटों शके ॥ ८५ ॥ परी

या दोन संपत्तींपैकीं पहिली जी दैवी संपत्ति म्हणून म्हटलेली आहे ती तुला सांगितली, ती म्हणजे मोक्षरूपी सूर्याच्या उदयानें झालेली पहांटच आहे असें समज. ६५. इतर दुसरी जी आसुरी संपत्ति, ती जीवास मोहरूपी लोखंडाची एक सांखळी–बेडीच होय ६६. पण हे [आसुरी संपत्तीचे वर्णन] ऐकून कदाचित् तूं मनांत धास्ती, भय घेशील हो ! पण तसें भय घेऊं नकोस बरें ! कारण हे पहा ! सूर्यानें रात्रीचा धाक धरावा काय ? ६७. हे धनंजया ! ही आसुरी संपत्ति त्यासच बंधास कारण होत असते कीं, जो या सहा दोषास आश्रय होतो ६८. अर्जुना ! तूं तर वर सांगितलेल्या दैवी संपत्तींतील गुणांचा जणुं काय उत्तम सांठाच जन्माला आला आहेस ६९. म्हणून पार्था ! तूं या दैवी संपत्तीचा स्वामी होऊन मोक्षसुखास प्राप्त हो ! २७०.

**अन्वयार्थ**––**अस्मिन् लोके**–या लोकीं–**दैवः च आसुरः एव**–देव व आसुरच असें–**द्वौ–भूतसर्गौ**–मनुष्याचे दोन सर्ग आहेत त्यांतील–**दैवः**–देवांची सृष्टि–सर्ग–**विस्तरशः**–विस्तारपूर्वक––**प्रोक्तः**–––सांगितला–**पार्थ**–हे पार्थ !–मे–मजपासून–**आसुरम्** [ **सर्गं** ]–असुराचा सर्ग–**श्रुणु**–तूं ऐक ६.

आणि या दैवी संपत्तिवान् व आसुरी संपत्तिवान् अशा लोकांच्या वागणुकीचे हे अनादिसिद्ध मार्ग चालत आलेले आहेत ७१. ज्याप्रमाणें रात्रीच्यावेळीं निशाचरांनीं व्यापार करावा व दिवसा मनुष्यादिकांनीं उत्तम व्यापारांत प्रवृत्त व्हावे ७२. त्याप्रमाणें अर्जुना ! दैवी सृष्टीचें व आसुरी सृष्टीचें असें दोन सृष्टीचें लोक आपापल्या मार्गांनीं जगतांत राहाटत असतात ७३. त्याचप्रमाणें मागच्या अध्यायांत ज्यावेळीं ज्ञान सांगण्याचा प्रसंग आला तेव्हांहि दैवी संपत्ति ही चांगलीं विस्तारेंकरून सांगितली ७४. आतां आसुरी संपत्तींत वागणारे जे लोक आहेत, त्यांजविषयीं तुला सविस्तर माहिती सांगतों, तूं तिकडे पूर्ण अवधानाची चांगली दृष्टि असूं दे ७५. तर नाद ज्याप्रमाणें वाद्याशिवाय कोणासहि ऐकूं येत नाहीं, किंवा पुष्पाशिवाय मकरंद सुवास मिळत नाहीं ७६. त्याप्रमाणें ही आसुरी प्रकृति–संपत्ति जोपर्यंत एखाद्या शरीराचा आश्रय करीत नाहीं तोपर्यंत ही एकटी दृग्गोचर होत नाहीं ७७. मग लांकडावर लांकूड घांसल्यामुळें जसा त्या ठिकाणीं अग्नि प्रगट झाल्याचा दृष्टीस पडतो, तशी मनुष्याच्या देहांत ही आसुरी संपत्ति ओतप्रोत भरली–सांपडली असतां दृष्टोत्पत्तीस येते ७८. ज्या वेळीं ऊंस जसा जसा वाढत जाईल, तसा तसा त्यांतील रसहि वाढत जातो त्याप्रमाणें हिनें आश्रय केलेला प्राण्याचा देह जसाजसा वाढेल, तसतशी ती आसुरी संपत्तिहि आंत वाढत असते ७९. आतां अर्जुना ! आसुरी संपत्तीच्या दोषांच्या समुदायांनीं युक्त असें जें प्राणी जन्मलेले आहेत, त्यांचीं लक्षणें तुला सांगतों २८०.

**अन्वयार्थ**––**आसुराः जनाः** आसुरी प्रकृतीचें जन–**प्रवृत्तिं च निवृत्तिं च**–प्रवृत्ति कोठे करावी व निवृत्त कशापासून व्हावें, तें–**न विदुः**–जाणत नाहींत–**तेषु**–त्यांच्या ठिकाणीं–**शौचं न**–शुचिर्भूतपणा नसतो–**अपि च**–आणि तसाच–**आचारः**–सदाचार–**न**–नसतो व–**सत्यं न विद्यते**–सत्य नसतें ७.

[ **प्रवृत्तिं च निवृत्तिं च** ] तर पुण्याचरणाविषयीं प्रवृत्ति धरावी किंवा पापाचरणापासून निवृत्त व्हावें, यास ओळखणाऱ्या ज्ञानाची रात्र म्हणजेच त्याचे अंतःकरण असते [कृत्याकृत्य विवेक नसतो] ८१. कोशकिडा आवेशानें आपलें घरटें बांधूं लागला, म्हणजे त्या बांधण्याच्या भरांत ज्याप्रमाणें आपल्यास बाहेर निघण्याला किंवा आंत प्रवेश करण्याला वाट पाहिजे ती आहे किंवा नाहीं; इकडे लक्ष न देतां घरटें तयार करून आंत कोंडला जातो ८२. अथवा आपण दिलेलें हें भांडवल वसूल होऊन परत येईल किंवा नाहीं, हा पुढील विचार न पाहतां मूर्ख मनुष्य एखाद्या चोरास कर्जाऊ पैसे देतो ८३. त्याप्रमाणें आसुरी संपत्तीचा आश्रय करणारे जे लोक आहेत, ते प्रवृत्ति व निवृत्ति हे दोन्हीं मार्ग जाणीत नाहींत [ **न शौचम्** ] आणि शुचित्व म्हणून काय वस्तु आहे हें तर त्यांना स्वप्नांत देखील माहीत नसतें ८४. कारण, कदाचित् कोळसाहि आपल्या काळेपणास टाकील कदाचित् कावळाहि पांढरा होईल आणि कदाचित् राक्षसांनाहि मांस खाण्याचा वीट येऊं शकेल ८५. पण अर्जुना ! ज्याप्रमाणें मद्याच्या पात्रास पवित्रपणा कधींहि येत नाहीं, त्याप्रमाणें या आसुरी संपत्तिवान् प्राण्यास शुचित्व

१ सूर्यानें. २ बांधण्याकरितां. ३ गुणांची खाण. ४ सुखाप्रत. ५ मार्ग, प्रसिद्ध मार्ग. ६ हिंडावें. ७ ज्ञान सांगते वेळीं. ८ प्रसंगीं. ९ सांगूं. १० शब्द, ध्वनि, उत्तर. ११ पुष्परस. १२ अंगिकारीना. १३ प्रगट झाला. १४ अग्नि. १५ मावलेली. १६ उपक्रम, लक्षण. १७ निघण्याला. १८ आवेशानें, त्वरेनें. १९ कोसवासी किडा. २० कोंडला. २१ पुण्याविषयीं तत्परता व पापाविषयीं विन्मुखता. २२ पांढरे पण. २३ कावळ्याला.

आसुरां प्राणियां । शौच नाहीं धनंजया । पवित्रत्व जेवीं भांडिया । मद्याचिया ॥ ८६ ॥ वाढविती विधीची आस । कां पाहाती वाडिलांची वास । आचाराची भाष । नेणतीचि ते ॥ ८७ ॥ जैसें चरणें शेळियेचें । कां धांवणें वारियाचें । जाळणें आगीचें । भलतेउतें ॥ ८८ ॥ तैसें पुंढां सूंनि स्वैरें । आचरती ते गा आसुर । सत्येंसि कीर वैर । सदाचि तयां ॥ ८९ ॥ जरी नांगिया आपुलिया । विंचू करी गुदगुलिया । तरी साचा बोली बोलिया । बोलती ते ॥ २९० ॥ अपानांचेनि तोंडें । जरी सुगंधा येणें घडे । तरी सत्य तयां जोडे । आसुरांतें ॥९१॥ ऐसें ते न करितां कांहीं । आंगेंचि वोखटें पाहीं । आतां बोलती ते नंवाई । सांगिजैल ॥ ९२ ॥ एऱ्हवीं करेयाच्या ठायीं चांग । तें तयासि कैचें नीट आंग । तैसा आसुरांचा प्रसंग । प्रसंगें परिस ॥ ९३ ॥ उंधवणीचें जेवीं तोंड । उंभळी धुंवांचे उंभड । हें जाणिजे तेवीं उघड । सांगों ते बोल ॥ ९४ ॥

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् । अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहेतुकम् ॥ ८ ॥

तरी विश्व हा अनादि ठावो । येथ नियंतां ईश्वररावो । चावाडिये न्यांवो अन्यांवो । निवडी वेदु ॥ ९५ ॥ वेदीं अन्यायीं पडे । तो निरंयभोगें दंडे । सन्यांयी तो सुरवाडें । स्वर्गीं जिये ॥ ९६ ॥ ऐसी हे विश्वव्यवस्था । अनादि जे पार्था । इयेतें म्हणती ते वृथा । अवघेंचि हें ॥ ९७ ॥ यज्ञमूढ ठकिले यागीं । देवपिसें प्रतिमालिंगीं । नागवले भगवे योगी । समाधिभ्रमें ॥ ९८ ॥ येथ आपुलेनि बळें । भोगिजे जें जें वेंटाळें । हें वांचोनि वेगळें । पुण्य आहे ? ॥ ९९ ॥ ना अशक्तपणें आंगिकें । वेंगळवेंटाळीं नें टकें । ऐसा गौंदिजेवीण विषयसुखें । तेंचि पाप ॥ ३०० ॥ प्राण घेपती संपन्नांचे । तें पाप जरी साचें । तरी सर्वस्व हाता ये तयांचें । हें पुण्यफळ कीं ? ॥ १ ॥ बळी अबळातें खाय । हेंचि बाधित जरी होय । तरी मासयां कां न होय । निसंतान ? ॥ २ ॥ आणि कुळें शोधूनि दोन्ही । कुमारेंचि शुभलग्नीं । मेळवीजती प्रजासाधनीं । हेतु जरी ॥ ३ ॥ तरी पशुपक्षादि जाती । जया मिती नाहीं संतती । तयां कोणें प्रतिपत्तीं । विवाह केले ? ॥ ४ ॥ चोरियेचें धन आलें । तरी तें कोणासि विष जालें ? । वालभें परद्वार केलें । कोढी कोणी होय ? ॥५॥ म्हणौनि देवो गोसांवी । तो धर्माधर्मु भोगवी । आणि परत्रींच्या गांवीं । करी तो भोगी ॥ ६ ॥ परी परत्र ना

केव्हांहि येणार नाहीं ८६. [ नापि चाचारः ] कां म्हणशील तर, ते कां शास्त्रोक्त क्रिया वा विधिवत् कर्मांची इच्छा करतात, कां वाडवडिलांच्या आज्ञेकडे किंवा आचरणाच्या चालीरीतीकडे पाहतात ! त्यांच्या शास्त्रसंवादी आचार–विचाराची तर त्यांना दादहि नसते त्यांचें पशुवत् वर्तन असते म्हणजे ८७. ज्याप्रमाणें शेळी हवे ते चरते किंवा वारा वाटेल तिकडे वाहतो, तसाच अग्नि एकदां भडकल्यावर हव्या त्या पदार्थास जाळून टाकतो ८८. त्याप्रमाणें आपल्या स्वैर-इच्छेला पुढें करून ते आसुरी संपत्तीचे लोक स्वैर आचरण करितात. [ न सत्यं ] व त्यांचें सत्याबरोबर नेहमीचेच हाडवैर असतें ८९. जर विंचू आपली नांगी मारून त्या योगानें लोकांस गुदगुल्या करूं शकेल, तरच त्यांच्या बोलण्यांत 'सत्य बोलणें' आढळेल ! २९०. गुद-द्वारांतून निघणाऱ्या वाऱ्याबरोबर जर सुगंधाचे येणें घडेल तरच त्या आसुरी संपत्तीच्या लोकांजवळ सत्य सांपडेल ! ९१. अशा प्रकारें काहीं एक न करतांहि ते स्वभावतःच वाईट असतात, समजलास. पहा ! आतां त्यांच्या बोलण्याचा नवलाव तुला सांगतों ९२. एऱ्हवीं उंटाच्या ठिकाणचीं अवयव रचना पाहूं गेलें तर त्यांत त्याचा कोणता अवयव नीट आहे म्हणून सांगावे ? त्याप्रमाणें आसुरी संपत्तीच्या लोकांची स्थिती आहे. त्यांच्यांत चांगले काय आहे ? परंतु प्रसंगानुसार सांगतों, तें ऐक ९३. धुराड्याचे तोंड ज्या प्रमाणें धुराचे लोटच्या लोट बाहेर ओकीत असतें त्याप्रमाणें आतां [ यापुढें ] जी आम्हीं असुरांचीं भाषणें सांगणार आहोंत ती तशींच असतात असें समज तीं बोलणीं आतां उघड सांगतों ९४.

**अन्वयार्थ**—**ते**–आसुरी प्रकृतीचे जन–**जगत्**–हें सर्व जगत्–**असत्यम्**–आम्हांप्रमाणेंच खोटें–**अप्रतिष्ठ**–धर्माधर्मादि प्रतिष्ठारहित–**अनीश्वरं**–ज्याचा कोणी शास्ता-ईश्वर नाहीं असें–**अपरस्परसंभूतं**–कामी स्त्री-पुरुषांपासून उत्पन्न झालेलें–**किम् अन्यत्**–दुसरें काय ?–**कामहेतुकं**–काम या हेतूपासून झालेलें आहे असें–**आहुः**–सांगतात ८.

[ **असत्यं** ] तर विश्व हे ठिकाण [ प्रवाहरूपानें ] अनादि चालत आलेलें आहे व त्याचा ईश्वर हा सर्वांत श्रेष्ठ राजा असून तो तेथील नियंता आहे आणि तेथील चावडीवर वेद हे न्याय व अन्याय यांचा निवाडा करितात ९५. वेद निर्णयानुसार जो अन्यायी ठरविला जातो त्याला नरकभोगाची शिक्षा होते व [ त्या वेद निर्णयानुसार ] जो न्यायी ठरविला जातो तो सुखानें स्वर्गांत वास्तव्य करून राहतो ९६. अर्जुना ! अशी जी ही विश्वाची व्यवस्था अनादिकालापासून चालत आलेली आहे व तिला ते असुर 'हे सर्व खोटें आहे,' असें म्हणतात. ९७. ज्यांना यज्ञाचे वेड लागलें आहे, ते यज्ञ करून फसले, ज्यांना देवाची पूजा करण्याचें वेड लागलें आहे ते मूर्तिपूजा [ शिव ] लिंगार्चन करून फसले व हा संसार टाकून भगवी वस्त्रें धारण करणारे [ संन्यासी ] व जे योगी होतात तेहि समाधि योगाच्या भ्रमानें फसले ९८. या जगांत आपल्या सामर्थ्यानें जें जें मिळवितां येईल व ज्याचा उपभोग घेतां येईल तें तें भोगावें त्यावांचून दुसरें निराळे पुण्य काय आहे ? ९९. किंवा अंगांत शक्ति नसल्यामुळें सर्वविषयोपभोग एकत्र जमवितां येत नाहींत व कांहीं विषय मिळतील त्यांचा उपभोगहि ज्याला घेतां येत नाहीं, म्हणून विषयसुखावांचून पीडित होणें तेंच पाप होय ३००. श्रीमान् लोकांचे प्राणहरण करणें हें जर खरोखर पाप आहे असे म्हणावें, तर त्यांचें सर्वस्वधन आपल्या हातांत येतें हें खात्रीनें पुण्यफल नाहीं काय ? १. जो बलवान् असतो तो अशक्ताला खातो, त्याचा नाश करतो हेंच जर बाधक असें पाप म्हणावें, तर मोठे मासे लहान माशांस खातात, तर त्या पापापासून त्यांचें निसंतान कसें व कां होत नाहीं ? २. [ **अप्रतिष्ठम्** ] आणि दोन्ही कुळें शोधून मुलगा व मुलगी यांचा विवाह शुभमुहूर्तावर केला जावा हाच जर प्रजेच्या उत्पत्तीच्या बाबतींत हेतू असेल ? ३. तर पशुपक्षादिक ज्या जाति आहेत ज्याच्या अनिवार संततीची गणनाहि नाहीं त्यांचीं कोणते सुमुहूर्त पाहून कोणत्या विधिविधानानें लग्नें केलीं जातात ? ४. चोरीचे द्रव्य कोणाजवळ आले वा त्या चोरून आणलेल्या धनाचा कोणी उपयोग केला असतां कोणास तें विषाप्रमाणें बाधलें आहे काय ? किंवा विषयाच्या आवडीनें कोणी व्यभिचार केला तर त्यास कोड उत्पन्न झालें आहे काय ? ५. [ **अनीश्वरं** ] म्हणून, देव–ईश्वर जो जगाचा सत्ताधारी स्वामी आहे तो धर्माधर्म भोगावयास लावतो म्ह. धर्माधर्म सापेक्षतेनें जीवा करवीं सुख आणि दुःख हीं फळें भोगवितो. [**किमन्यत्**] आणि त्या लोकीं जो जीं शुभाशुभ कर्में करतो तो परलोकीं त्या त्या कर्मानुसारच त्यांचीं फळें भोगतो ६.

१ पुढें करून. २ स्वेच्छेला. ३ गुदद्वारानें. ४ वाईट. ५ अपूर्वता. ६ उंटाच्या. ७ धुरडयाचे.. ८ ओकी. ९ धुरांचें. १० उमाळे, लोट. ११ चालक. १२ न्याय, अन्याय.

१३ नरकभोगानें. १४ न्यायानें वागणारा. १५ सुखानें. १६ मूर्ति व लिंगाच्या योगानें. १७ फसले. १८ अंगच्या. १९ एकत्र करणें. २० होत नाहीं. २१ दुःख पावतो.

देवो । न दिसे म्हणौनि तें वावो । आणि कर्ता निमे मा ठावो । भोग्यासि कवणु ? ॥ ७ ॥ येथ उर्वशिया इंद्र सुखी । जैसा कां स्वर्गलोकीं । तैसाचि कृमिही नरकीं । लोळतु श्लाघे ॥ ८ ॥ म्हणौनि नरक स्वर्गु । नव्हे पापपुण्य-भागु । जे दोहीं ठायीं सुखभोगु । कामाचाचि तो ॥९॥ याकारणें कामें । स्त्रीपुरुषयुग्में । मिळती तेथ जन्मे । आघवें जग ॥३१०॥ आणि जें जें अभिलाषें । स्वार्थालागीं हें पोषे । पाठीं परस्परद्वेषें । कामचि नाशी ॥ ११ ॥ एवं कामावांचूनि कांहीं । जगा मूळचि आन नाहीं । ऐसें बोलती पाहीं । आसुर गा ते ॥ १२ ॥ आतां असो हें किडाळ । बोली न करूं पघळ । सागतांचि सफोल । होतसे वाचा ॥ १३ ॥

एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धय: । प्रभवन्त्युग्रकर्माण: क्षयाय जगतोऽहिता: ॥ ९ ॥

आणि ईश्वराचिया खेंती । नुसधियांचि करिती चांथी । हेंही नाहीं चित्तीं । निश्चयो एकु ॥ १४ ॥ किंबहुना उघड । आंगीं लाऊनियां पाखांड । नास्तिक-पणाचें हाड । रोंविलें जीवीं ॥ १५ ॥ ते वेळीं स्वर्गालागीं आदरु । कां नरकाचा अडदरु । या वासनांचा अंकुरु । जळोनि गेला ॥ १६ ॥ मग केवळ ये देहखोडां । अमेध्योदकाचा बुडबुडा । विषयपंकीं सुहाडा । बुडाले गा ॥ १७ ॥ जैं आटावें होती जळचर । तैं डोहीं मिळती ढीवर । कां पडावें होय शरीर । तैं रोगा उदयो ॥ १८ ॥ उदैजणें केतूचें जैसें । विश्वा अनिष्टोद्देशें । जन्मती ते तैसे । लोकां आटुं ॥ १९ ॥ विरूढलिया अशुभ । फुटती तैं ते कोंभ । पापाचे कीर्तिस्तंभ । चालते ते ॥ ३२० ॥ आणि मागांपुढां जाळणें । वांचूनि आगी कांहीं नेणें । तैसें विरुद्धचि एक करणें । भलतेयां ॥ २१ ॥ परी तेंचि गा करणें । आदरिती संभ्रमें जेणें । तो आइक पार्था म्हणे । श्रीनिवासु ॥ २२ ॥

काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विता: । मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रता: ॥ १० ॥

तरी जेंळ पाणियें न भरे । आगी इंधनें नें पुरे । तयां दुर्भरांचिये धुरे । भुकाळु जो ॥ २३ ॥ तया कामाचा वोलावा । जीवीं धरूनि पांडवा । दंभमानाचा मेळावा । मेळविती ॥ २४ ॥ मातलिया कुंजेरा । आगळी जाली मदिरा । तैसा

१ संतोष मानितो. २ इच्छेनें, मनोरथानें. ३ मिळवितो. ४ हीन, निंद्य, खोटें. ५ व्यर्थ. ६ त्रास, तिटकारा. ७ वरवर. ८ बडबड. ९ भय. १० देहरूपी खोड्यामध्यें. ११ अपवित्र जलाचा. १२ सुहृदा अर्जुना. १३ माशांचा मरणसमय येतो, मृत्यु ओढवतो. १४ कोळी. १५ अकल्याणार्थ. १६ मारण्यास. १७ उगवून आलें असतां. १८ समारंभानें, तयारीनें. १९ जाळें. २० काष्ठांनीं. २१ शांत होत नाहीं. २२ अधाशाच्या, अतृप्तांच्या. २३ अग्रभागीं. २४ जिव्हाळा. २५ समूह. २६ हत्तीला.

[ हें शास्त्राचे म्हणणे खरे असें मानावें ] परंतु [ भोगायतनात्मक ] परलोक व [ फलदाता नियामक ] देव-ईश्वर प्रत्यक्ष दिसत नाहींत म्हणून ते नाहींतच, म्हणून ते व त्याविषयीं बोलणे व्यर्थ होय आणि पुण्य किंवा पाप करणारा येथें मरण पावतो नंतर त्याचीं फळें भोगण्यास कोण उरतो ? व भोग्यस्थान तरी कोणते ? ७. [ **कामहैतुकं** ] हें पहा ! स्वर्गलोकीं, शास्त्र म्हणते त्याप्रमाणें जर उर्वशीच्या उपभोगानें इंद्र सुखी असतो, तर प्रत्यक्ष नरकांत लोळणारे किडेहि स्वतःस स्त्री भोगण्यांत तसेंच संतोषीसुख मानतात ८. म्हणून नरक किंवा स्वर्ग हीं पापकर्माचीं फळें नाहींत. कारण, [ त्या नुसत्या गप्पा आहेत ] कारण, दोन्ही ठिकाणीं कामाचाच सुखोपभोग [ समानच ] प्राप्त होतो ९. [ **अपरस्पर संभूतं** ] याच कारणास्तव कामाच्या इच्छेनें स्त्री व पुरुष यांची जोडपी एकत्र झाली म्हणजे झाले, त्यापासून सर्व जग उत्पन्न होते ३१०. आणि आपल्या हिताकरितां जें जें लागेल तें तें कामाकडून पोसलें जाते म्ह. स्वेच्छेनुसार आपण जें कांहीं मिळवितो; नंतर त्याचा आपल्यास वीट येऊन परस्परांत द्वेष उत्पन्न होऊन कामच त्यांचा, किंबहुना ! साऱ्या जगाचा नाश करितो ११. याप्रमाणें जगाच्या उत्पत्ति नाशास कामावांचून दुसरें कांहीं कारणच नाहीं, अशी ते असुर लोक वल्गना करितात पहा ! १२. आतां ह्या निंद्य गोष्टी बोलणें पुरे. या बोलण्याचा जास्ती विचार वा विस्तार नको. कारण, याविषयीं चर्चा करणें त्यांत केवळ वाचा मात्र व्यर्थ होते १३.

**अन्वयार्थ**--**एतां दृष्टिं**-या दृष्टीचा-**अवष्टभ्य**-आश्रय करून-**नष्टात्मानः**-ज्यांचा स्वभाव नष्ट झाला आहे-**अल्पबुद्धयः**-ज्यांची बुद्धि अल्प आहे-**अहिताः**-जगाचे शत्रु-**उग्रकर्माणः**-ज्यांची कर्मे उग्र-क्रूर आहेत असे ते-**जगतः**-जगाचा-**क्षयाय**-क्षय करण्यासाठीं-**प्रभवन्ति**-उत्पन्न होतात ९.

आणि ईश्वराच्या तिरस्कारानें [ देवाचे अस्तित्व मानीत नाहींत, उलट देव असतां तर दिसला असतां अशी ] नुसतीच ते निरर्थक बडबड करीत असतात, इतकेंच नव्हे तर त्या विषयींचा त्यांच्या चित्तांत तसाच [ देव नाहींच असा एक ] दृढनिश्चय झालेला असतो १४. फार काय सांगावें ! उघड रीतीनें आपण अंगानें पाखांडी आहोंत, असा आपल्या ठिकाणीं बाणा बाळगतात. अंतःकरणात्मक वेशींत एक नास्तिकपणाचें हाडच रोवलेलें असतें १५. अशा त्या वेळीं स्वर्गाविषयीं आदर, श्रद्धा किंवा नरकाचे भय या विषयींचा वासनांकुर त्यांच्या चित्तांत जळून गेलेला असतो १६. मग वीरा अर्जुना ! हे आसुरी लोक अपवित्र जलाच्या बुडबुड्याप्रमाणें क्षणिक, नाशवंत जो देह त्या देहरूपी खोल्यांत सांपडून विषयरूपी चिखलांत बुडतात १७. ज्या वेळेस जलचरांचा मृत्यु ओढवलेला असतो त्या वेळेस त्यांना धरण्याकरितां डोहावर कोळी जमून जाळीं टाकतात; किंवा शरीर पडण्याची वेळ आली म्हणजे त्या वेळीं शरीरांत रोगांचा उद्भव होतो १८. किंवा विश्वाच्या प्रजेच्या पीडा होण्याच्या उद्देशानें-अकल्याणार्थ ज्याप्रमाणें धूमकेतूचा आकाशांत उदय होतो, त्याप्रमाणें लोकांचा नाश होण्याची वेळ आली म्हणजे त्यासाठींच आसुरी संपत्तीच्या लोकांचा उदय होतो १९. ज्याप्रमाणें अशुभ पेरून ते उगवून आले असतां त्याला जें अशुभ कोंब फुटतात तेंच ते आसुरी लोक होत. त्याप्रमाणें हे आसुरी लोक पापाचे चालते बोलते कीर्तिस्तंभच आहेत ३२०. आणि ज्याप्रमाणें अग्नीला मागें अथवा पुढें आलेल्या वस्तूस जाळावयाचे, यावांचून अग्नीस दुसरे कांहीं एक कर्तव्य ठाऊक नसते, त्याप्रमाणें त्यांच्याजवळ येणारा मनुष्य चांगला असो अथवा वाईट असो, त्याच्या हे विरुद्ध तेवढेच एक करावयाचे [ ते असुर जाणतात ] २१. परंतु अर्जुना ! ज्या उत्सुकतेनें तीच [ विरुद्ध ] आपली कृत्यें आरंभ करितात त्या त्यांच्या उत्सुकतेचे वर्णन करितो, तें ऐक. असें श्रीनिवास पार्थास म्हणाले २२.

**अन्वयार्थ**--**दुष्पूरं**-**कामम्**-**आश्रित्य**-ज्याची पूर्ति-तृप्ति होणें अशक्य आहे अशा कामाचा आश्रय करून-**दम्भ**-**मानमदान्विताः**-दंभ, मान व मद यांनीं युक्त होत्साते--**मोहात्**-अविवेकामुळें--**असद्ग्राहान्**--असत् ग्रह-अशुभ निश्चय-**गृहीत्वा** करून घेऊन-**अशुचिव्रताः**-ज्यांची व्रतें अशुचि आहेत, असे-**प्रवर्तन्ते**-प्रवृत्त होतात १०.

तर जाळ्यांत पाणी सांठवून ते कधींहि भरले जात नाहीं व अग्नीला काष्ठें कधीं पुरीशी होत नाहींत, अशा केव्हांहि तृप्त न होणाऱ्या वस्तूंमध्यें जो अग्रणी असून सदाच बुभुक्षित असतो २३. असा जो काम त्या कामाचा आपल्या मनांत आश्रय करून हे पांडवा ! त्यांत भरीला म्हणून दंभ व मान यांच्या समूहासहि जमवितात २४. अगोदरच माजलेला हत्ती व त्यांत आणखी भरीला दारू पाजली म्हणजे तो अधिकच उन्मत्त होतो, त्याप्रमाणें मुळांतच अंगांत मदाचा ताठा भरलेलें आणि आसुरी संपत्तीनें युक्त असलेलें जे लोक ते जों जों वृद्ध होतात तों तों त्यांत म्हातारपणाची भर पडते म्हणून ते आप-

मदाचा ताठा तंव जरा । चढतां आंगीं ॥ २५ ॥ आणि आग्रहा तोचि ठावो । वरी मौढ्याऐसा सावावो । मग काय वानूं निर्वाहो । निश्चयाचा ॥ २६ ॥ जिहीं परोपतापु घडे । परावा जीवु रगडे । तिहीं कर्मीं होऊनि गाढे । जन्म-वृत्ती ॥ २७ ॥ मग आपुलें केलें फोकारिती । आणि जगातें धिक्कारिती । दाही दिशीं पसरिती । स्पृहाजाळ ॥ २८ ॥ ऐसेनि गा आटोपें । थोरियें आणती पापें । धर्मधेनु खुरपें । सुटलें जैसें ॥ २९ ॥

चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः । कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥

याचि येका आयती । तयाचिया कर्मप्रवृत्ती । आणि जिणियांही परौती । वाहती चिंता ॥ ३३० ॥ पाताळाहूनि निम्न । जियेचियें उंचीये सानें गगन । जें पाहातां त्रिभुवन । अणुही नोहे ॥ ३१ ॥ ते योगपटाची मेवणी । जीवीं अनियम चिंतवणी । जे सांडूं नेणे मरणीं । वल्लभा जैसी ॥ ३२ ॥ तैसी चिंता अपार । वाढविती निरंतर । जीवीं सूनि असार । विषयादिक ॥ ३३ ॥ स्त्रिया गाइलें आइकावें । स्त्रीरूप डोळां देखावें । सर्वेंद्रियें आलिंगावें । स्त्रियेतेंचि ॥ ३४ ॥ कुंरवंडी कीजे अमृतें । ऐसें सुख स्त्रियेपरौतें । नाहींचि म्हणौनि चित्तें । निश्चयो केला ॥ ३५ ॥ मग तयाचि स्त्री भोगा- । लागीं पाताळ स्वर्गा । धांवती दिग्विभागों । पैरौतेही ॥ ३६ ॥

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः । ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥

आमिषकंवळु थोरी आशा । न विचारितां गिळी मासा । तैसें कीजे विषयाशा । तयांसि गा ॥ ३७ ॥ वांछित तंव न पवति । मग कोरडियेचि आशेची संतती । वाढऊं वाढऊं होती । कोशकिडे ॥ ३८ ॥ आणि पसरिला अभिलाषु । अपूर्णु होय तोचि द्वेषु । एवं कामक्रोधांहूनि अधिकु । पुरुषार्थु नाहीं ॥ ३९ ॥ दिहा खोलणें रात्रीं जागोवा । ठोणांतरियां जैसा पांडवा । अहोरात्रींही विसांवा । भेटेचिना ॥ ३४० ॥ तैसें उंचौनि लोटिलें कामें । नेहटती क्रोधाचिये ढेमे[२३] । तरी रागद्वेष प्रेमें । न माती केंही[२५] ॥ ४१ ॥ तेवींचि जीवींचिया

---

१ प्रसिद्ध करितात. २ इच्छेचें जाळें. ३ अभिमानानें. ४ उंच दशेस. ५ देवाला सोडलेली गाय. ६ साधनानें, तयारीनें. ७ मेल्यानंतरचीहि. ८ खोल. ९ ज्या चिंतेच्या. १० मोजणी, माप. ११ चिंता धारण करतात. १२ संकटांत. १३ घालून. १४ खोटें. १५ ओंवाळणी. १६ दिशांच्या सीमाबाहेर. १७ मांसाचा गोळा. १८ कोशवासी किडा, कोसला. १९ दिवसा. २० पुढें चालणें. २१ देवडीवाल्याला, स्वाराला. २२ आदळती. २३ टेकडीवर. २४ कामक्रोध. २५ कोठेंहि.

त्यांस मोठे ब्रह्माचार्य असें समजून अधिकच ताठून जातात २५. आणि ते कोणतीहि गोष्ट दुराग्रहानें तडीस नेल्याशिवाय रहात नाहींत, असें ह्यास तेच ठिकाण असतात, त्यांत मुर्खपणासारख्याची आणखी साहाय्यक म्हणून भर पडल्यावर मग त्यांच्या निश्चयाच्या स्थिरतेची दाद कोठें लागणार म्हणून सांगावी ! २६. ज्या योगानें दुसऱ्यास पीडा होईल किंवा दुसऱ्या जीवाची प्राणहानि होईल तीं कर्में करण्याविषयीं जे जन्मभर पक्के वतनदार होऊन त्याप्रमाणें नेहमीं प्रवृत्त असतात २७. मग आपण केलेल्या कृत्याची चहूंकडे प्रसिद्धि करितात व सर्व जगाला तुच्छ मानितात आणि इच्छेचे जाळे इतके पसरतात कीं तिला धांव घेण्यास दशदिशाहि पुरत नाहींत ! २८. ज्याप्रमाणें धर्मार्थ देवाच्या नांवानें सोडलेली गाय शेतांत मोकळी सोडल्यावर ती हवी तिकडे व धान्य, गवत, सरसकट चरते, त्याप्रमाणें अभिमानादि विकारयुक्त होऊन पापाचरणद्वारां पापेंच वाढीस आणतात २९.

**अन्वयार्थ**--**च**-आणि-ते आसुर लोक-**अपरिमेयां**-जिचें प्रमाण, इयत्ता कळत नाहीं; अशा-**प्रलयान्तां**-मरणापर्यंत टिकणाऱ्या, मरणानेंच संपणाऱ्या-**चिन्तां**-चिंतेचा--**उपाश्रिताः**--आश्रय केलेले असतात--**कामोपभोगपरमाः**-शब्दादि विषयांचा उपभोग घेण्यामध्येंच तत्पर असलेलें आणि-**एतावत्**-विषयभोग घेणें, हाच काय तो परमपुरुषार्थ आहे-**इति निश्चिताः**-असा निश्चय केलेले असतात ११.

याच एका साधनसामुग्रीनें त्यांची कर्म प्रवृत्ति होत असते आणि जीवनापलीकडील म्ह० मरण पावल्यावरहि आपल्यास सुख मिळावें म्हणून ते चिंता-काळजी वहातात ३३०. जी चिंता पाताळाहूनहि खोल असते, व जिच्या उंचीच्या मानानें आकाशही ठेंगणें आहे आणि जिच्या विस्ताराकडे [ परिमाणाकडे ] तुलनात्मक दृष्ट्या पाहतां त्रिभुवन अणूएवढेहि दिसत नाहीं ३१. नवीनच संन्यास दीक्षा घेतलेल्या यतीस त्या 'योगपटा'ची [ नांवाची ] व संन्यास नियमांची जशी सारखी घोकणी लागत असते, त्याप्रमाणें ज्याच्या चित्तांत असीम स्वरूपाची चिंता [ दृष्टादृष्ट भावी विवंचना ] असते. किंवा पतिव्रता स्त्री आपल्या पतीस मरणासारख्या संकटांतहि [ त्याचेबरोबर सती जाते पण ] त्यास सोडणें मुळींच जाणत नाहीं, तशी त्यास शेवटपर्यंत न सोडणारी चिंता असते ३२. असार अशा विषयादिकांविषयीं नेहमीं मनांत लालसा इच्छा बाळगून त्यांच्या प्राप्तीविषयीं अपार चिंता निरन्तर वाढवितात ३३. स्त्रियांनीं गाइलेले गाणें नेहमीं ऐकावें, स्त्रियांचे स्वरूप डोळ्यांनीं पहावें, [ इतकेंच नव्हे तर ] सर्व इंद्रियांनीं स्त्रियांचेच आलिंगन करण्यास सांपडावें; ३४. आणि मुखावरून अमृतहि ओंवाळून टाकावें. अशा प्रकारचें सुख स्त्रियांखेरीज अन्यत्र नाहींच [ स्त्रीपेक्षां अधिक असें दुसरें सुखच नाहीं ] असा त्यांच्या चित्तानें निश्चय केलेला असतो ३५. मग त्याच स्त्रीभोगाकरितां स्वर्गांत, पाताळांत किंवा दिशांच्या सीमेपलीकडेही धांव घेतात ३६.

**अन्वयार्थ**--**आशापाशशतैः**-आशा हेच शेंकडों पाश, त्यांनीं-**बद्धाः**-बांधले गेलेले-**कामक्रोधपरायणाः**-काम व क्रोध ज्यांचा परम आश्रय आहे, असें ते आसुर प्रकृतीचे लोक--**कामभोगार्थं**--विषयोपभोगासाठीं--**अन्यायेन**-अन्यायानें--**अर्थसंचयान्**-द्रव्यसंचय-**ईहन्ते**-करितात १२.

गळास लाविलेल्या आमिषाच्या मोठ्या आशेनें मासा कांहींहि विचार न करितां जसा ती आमिषाची उंडी खाऊन मरण पावतो, तशीच स्थिति [ मरण ] या विषयाच्या ठिकाणीं त्यांनीं आशा-आसक्ति ठेविल्यानें होतें ३७. मौज ही आहे कीं, इच्छित गोष्ट तर त्यास प्राप्त होत नाहींच; तरीपण उलट कोरड्याच आशेची परंपरा मात्र वाढवीत वाढवीत शेवटीं कोशकिड्याप्रमाणें नसतेच बंधन करून घेतात ३८. आणि एकाद्या वस्तूची इच्छा करावी व ती वाढलेली इच्छा जर पूर्ण झाली नाहीं तर लागलींच त्यांना द्वेष उत्पन्न होतो म्हणजे किंचित् वस्तुलाभापासून तृप्ति मानतात व तीच वस्तु न मिळाल्यामुळें क्रोधयुक्त होतात. एवंच त्यांना कामक्रोधापेक्षां अधिक असा पुरुषार्थच वाटत नाहीं ३९. अर्जुना ! ज्याप्रमाणें ठाण्यांतील स्वारास-देवडीवाल्यास विसांवा नसतो. दिवसा मालकाच्या कामगिरीकरितां फिरावें लागते व रात्री पहारा करीत गस्त घालावी लागते, म्हणून त्याला जसा रात्रंदिवस विसांवा मिळतच नसतो ३४०. त्याप्रमाणें कामानें उंच शिखरावरून लोटून दिल्यामुळें [ ज्या वस्तुविषयीं अतिशय इच्छा धरली तो विषय न मिळाल्यामुळें ] क्रोधाच्या खडकाळ टेकडीवर ते आदळतात, [ क्रोधविष्ट होतात ] तरीहि [ विषयासक्ति कमी होत नाहीं ती नाहींच, उलट निगरगट्ट बनून ] विषयांवरील आसक्तिरूप प्रेमामुळें विषयांविषयींची प्रीति व द्वेष हीं कोठेंहि मावत नाहींत एवढी वाढत असतात ४१. तसेंच चित्तांतील हांवेमुळें विषयवासनांचा 'मेळावा' समुदाय जमविला खरा; तरीपण त्या यच्चयावत् विषय वास-

हांवा । विषयवासनांचा मेळावा । केला तरी भोगावा । अर्थे कीं ना ? ॥ ४२ ॥ म्हणौनि भोगावयाजोगा । पुरता अर्थु पैं गा । आणावया जगा । झोंबती सैरा ॥ ४३ ॥ एकातें साधूनि मारिती । एकाचि सर्वस्वें हरिती । एकालागीं उभारिती । अपाययंत्रें ॥ ४४ ॥ पाशिकें पोतीं वागुरा । सुणीं ससाणें चिकाटी खोंचारा । घेऊनि निघती डोंगरा । पारधी जैसें ॥ ४५ ॥ ते पोसावया पोट । मारूनि प्राणियांचे संघाट । आणिती ऐसें निकृष्ट । तेंही करिती ॥ ४६ ॥ परप्राणघातें । मेळविती वित्तें । मिळाल्या चित्तें । तोषणें कैसें ॥ ४७ ॥

इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् । इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥

म्हणे आजि मियां । संपत्ति बहुतेकांचिया । आपुल्या हातीं केलिया । धन्यु ना मी ? ॥ ४८ ॥ ऐसा श्लाघों जंव जाये । तंव मन आणीकही वाहे । सर्वेचि म्हणे पाहे । आणिकांचेंही आणूं ॥ ४९ ॥ हें जेतुलें असे जोडिलें । तयाचेनि भांडवलें । लाभा घेईन उरलें । चराचर हें ॥ ३५० ॥ ऐसेनि धना विश्वाचिया । मीचि होईन स्वामिया । मन दिठी पडे तया । उरों नेदी ॥ ५१ ॥

असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि । ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १४ ॥

हे मारिले वैरी थोडे । आणीकही साधीन गाढे । मग नांदेन पवाडें । येकलाचि मी ॥ ५२ ॥ मग माझी होतील कामारीं । तियेंवांचूनि येरें मारीं । किंबहुना चराचरीं । ईश्वरु तो मी ॥ ५३ ॥ मी भोगभूमीचा रावो । आजि स्वर्गसुखासी ठावो । म्हणौनि इंद्रुही वावो । मातें पाहूनि ॥ ५४ ॥ मी मनें वाचा देहें । करीं ते कैसें नोहे । कें मजवांचूनि आहे । आज्ञासिद्ध आन ? ॥ ५५ ॥ तंवचि बळिया काळु । जंव न दिसें मी अतुर्बळु । सुखाचा कीर निखिळु । रासिवा मीचि ॥ ५६ ॥

आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥

कुबेरु आथिला होये । परी तो नेणें माझी सोये । संपत्ती मजसम नव्हे । श्रीनाथाही ॥ ५७ ॥ माझिया कुळाचा उजाळू । कां जातिगोतांचा मेळू । पाहतां ब्रह्माही हळू । उणाचि दिसे ॥ ५८ ॥ म्हणौनि मिरविती नांवें । वायां ईश्वरादि आघवे । नाहीं मजसीं सरी पावे । ऐसें कोण्ही ॥ ५९ ॥ आतां लोपला अभिचारु । तया करीन मी जीर्णोद्धारु । प्रतिष्ठीन परमारु । यागवरी ॥ ३६० ॥ मातें गाती वानिती । नटनाचें रिझविती । तयां देईन मागती । ते ते वस्तु ॥ ६१ ॥ माजिरा अन्नपानीं । प्रमदांच्या आलिंगनीं । मी होईन

नांचीं पूर्ति अर्थात् भोग्य विषयांस भोगून तृप्ति मिळण्याकरितां 'द्रव्य' असले पाहिजे ना! ४२. म्हणून विषयवसना पूर्ण होण्यास पुरेल इतके द्रव्य मिळवून आणण्याकरितां जगांतील लोकांस यथेच्छ लुटतात, त्रास देतात ४३. एखाद्याला संधी साधून, आडरानांत गांठून मारतात; एखाद्याचें सर्वस्व हरण करितात व एखाद्याचा नाश करण्याकरितां प्राणघातक-अपायकारक युक्ति योजितात ४४. पारधी लोक डोंगरावर शिकारीस जातेवेळीं ज्याप्रमाणें आपल्याजवळ फांसे, पोतीं, जाळीं, शिकारी कुत्रीं, बहिरी ससाणे, चिकाव्या-घोरपडी व भाले वगैरे घेऊन निघतात ४५. व ते पारधी आपलें पोट भरण्याकरितां पुष्कळ प्राण्यांचे समूह मारून आणतात, त्याप्रमाणें हे आसुरी संपत्तीचे लोकहि अशींच वाईट कर्में करितात ४६. दुसऱ्याचा प्राणघात करून द्रव्य मिळवितात आणि तें मिळाल्यावर त्यांच्या चित्तांत ते कसे संतोष पावतात तें ऐका ४७.

**अन्वयार्थ**--**अद्य**-आतां-**मया**-मी-**इदं**-हें धन-**लब्धं**-संपादन केलें आहे-**इमं मनोरथं प्राप्स्ये**-हें मनोरथ मिळवीन--**इदम् अस्ति**-हें धन आहे--**मे इदम् अपि धनं पुनः भविष्यति**--माझें हें धन पुनः भविष्यकालीं होईल १३.

तो म्हणतो, "आज बहुतेकांची संपत्ति मी आपल्या स्वाधीन करून घेतलीच आहे. म्हणून मी आतां धन्य नाहीं का? ४८. या प्रमाणें जों जों आपणच आपली प्रौढीनें स्तुति करूं लागतो तों तों आपलें मनांत आणखीहि लोकांस लुटण्याची हांव बाळगतो व लागलींच म्हणतो कीं, "उद्या आणखीहि पुष्कळ लोकांचें द्रव्य हरण करून आणूं ४९. जेवढें कांहीं आज हे [ द्रव्य ] आपण मिळविलें आहे, तेवढ्या भांडवलावर जें कांहीं आणखी चराचरांपैकीं शिल्लक असेल तेवढे केवळ फायदा म्हणून मिळवीन." [ लुबाडावयाजोग्या श्रीमंतांजवळ आणखी कांहीं जी स्थावरजंगम संपत्ति शिल्लक राहिली असेल तीहि हरण करून आणीन.] ३५०. याप्रमाणें या विश्वांतील सर्व संपत्तीला मीच एकटा मालक होईन. मग ज्याच्यावर माझी दृष्टी पडेल त्याला उर्वरित राहूं देणार नाहीं, त्याचा तर नाश करीनच करीन! ५१.

**अन्वयार्थ**--**मया**-मी-**असौ शत्रुः**-हा शत्रु-**हतः**-मारला-**च**-आणि-**अपरान् अपि**-दुसऱ्या शत्रूंनाहि--**हनिष्ये**-मारीन-**अहम् ईश्वरः**-मी ईश्वर आहें-**अहं भोगी**-मी भोगी आहे--**अहं सिद्धः**-मी सिद्ध आहे--**बलवान् सुखी**--बलाढ्य व सुखी आहे १४.

मग काय! आजपर्यंत नष्ट केलेले शत्रु थोडे आहेत तर आणखीहि दुसरे जे बलाढ्य आहेत, त्यांनाहि जिकीन वा संधि साधून मारीन आणि मग मी एकटाच मोठ्या लौकिकानें नांदेन ५२. मग माझे जे सेवक, चाकर होतील, त्यांखेरीज इतरांना मी मारीन त्यांचा नाश करीन; फार काय सांगावें!! या सर्व चराचरात्मक विश्वांत जो ईश्वर आहे तो जर कोणी असेल तर मीच होय ५३. मीच भोगरूपी पृथ्वीचा राजा असून सर्व सुखाच्या उपभोगाचें ठिकाणहि मीच आहे म्हणून माझे ऐश्वर्याशीं तुलना करून पाहिले तर इंद्रही तुच्छ आहे!! ५४. मग मी कायावाचामनेंकरून! जें जें करीन तें तें सिद्धीस कसें जाणार नाहीं? आणि ज्याची आज्ञा सिद्धवत् आहे, असा माझ्यावांचून दुसरा आज्ञा करणारा तरी कोण असणार? ५५. महाबलवान् अजोड असा जो मी, त्या मला पाहिले नाहीं, तोंपर्यंतच काळाच्या बलाची प्रतिष्ठा आहे आणि मी म्हणजे खरोखर केवळ सुखाची रासच आहे ५६.

**अन्वयार्थ**--**आढ्यः**-मी धनानें संपन्न आहें--**अभिजनवान् अस्मि**-मी उत्तम कुलीन आहें--**मया सदृशः**-माझ्यासारखा-**कः अन्य अस्ति**-दुसरा कोण आहे? --**यक्ष्ये**-यज्ञ करीन--**दास्यामि**-दान देईन--**मोदिष्ये**-आनंदी होईन--**इति**-याप्रमाणें--**अज्ञानविमोहिताः**-ते अज्ञानानें नानाप्रकारें अविवेकी होतात १५.

"कुबेर संपन्न आहे असें म्हणतात खरें, परंतु त्याच्यानें माझ्या ऐश्वर्याची बरोबरी करवणार नाहीं; आणि माझ्या संपत्तीप्रमाणें श्रीविष्णूचीहि संपत्ति नाहीं ५७. माझ्या कुळाचा नांवलौकिक किंवा शुद्धता अगर जाती-गोताचा म्ह. आप्तवर्गाचा समुदाय पाहिला असतां यांच्या मानानें सृष्टिकर्ता ब्रह्मदेवहि थोडा कमीच असल्याचे दिसते ५८. म्हणून लोक जो ईश्वरादिकांचा नांवलौकिक गातात, मिरवतात तो व्यर्थच आहे. माझ्याशीं बरोबरी करणारा असा कोणीहि सांपडणार नाहीं ५९. आतां जारणमारणादिकांचा लोप झाला आहे, त्यांचा मी जीर्णोद्धार करीन व लोकांस पीडा करणारे असे जे यज्ञयाग वा कर्में तेच मी करीन व प्रचारांत आणीन ३६०. माझ्या ऐश्वर्याचें जे वर्णन करतील किंवा माझी स्तुति करतील आणि नाचण्यानें वा सोंगें धारण करून जे मला संतोषवितील, त्यांना ते ज्या ज्या वस्तू मागतील त्या त्या मी देईन ६१. मादक अन्न खाऊन व मद्य वगैरे पिऊन तरुण स्त्रियांना आलिंगन देण्यांत या

त्रिभुवनीं । आनंदाकारु ॥ ६२ ॥ काय बहु सांगों ऐसें । ते आसुरीप्रकृती पिसें । तुरंबिती असोसें । गगनौळें तियें ॥ ६३ ॥

अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः । प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥

ज्वराचेनि आंटोपें । रोगी भलतैसें जल्पे । चावळेती संकल्पें । जाण ते तैसें ॥६४॥ अज्ञान आतुले धुळी । म्हणौनि आशा वाहटुळी । भोवंडीजती अंतराळीं । मनोरथांच्या ॥६५॥ अनियम आषाढ मेघ । कां समुद्रोर्मी अभंग । तैसे कामिती अनेग । अखंड काम ॥ ६६ ॥ मग पैं कामनांचि तया । जिवीं जाल्या वेलरियें । वोरपिली'' कांटिया । कमळें जैसीं ॥६७॥ कां पाषाणाचिया माथां । हांडी फुटली पार्था । जीवीं तैसें सर्वथा । कुटके जाले ॥ ६८ ॥ तेव्हां चढतिये रजनी । तमाची होय पुरवणी । तैसा मोहो अंतःकरणीं । वाढोंचि लागे ॥ ६९ ॥ आणि वाढे जंव जंव मोहो । तंव तंव विषयीं रोहो'' । विषय तेथ ठावो । पातकासी ॥३७०॥ पापें आपलेनि थांवें । जंव करिती मेळावे । तंव जितांचि आघवे । येती नरकां ॥ ७१ ॥ म्हणौनि गा सुमती । जे कुमनोरथां पाळिती । ते आसुर येती वस्ती । तया ठाया ॥ ७२ ॥ जेथ असिपत्रतरुवर । खदिरांगारांचे डोंगर । तातलां तेलीं सागर । उततातीं ॥ ७३ ॥ जेथ यातनांची श्रेणी'' । हे नित्य नवी यमजाचणी । पडती तिये दारुणीं । नरकलोकीं ॥ ७४ ॥ ऐसे नरकाचिये ''शेले । भोगीं जे जे जन्मले । तेही देखों भुलले । यजिती यागीं ॥ ७५ ॥ एऱ्हवीं यागादिक क्रिया । आहाणें तेचि धनंजया । परी विफळेंती आचरोनियां । नाटकी जैसी ॥ ७६ ॥ वल्लभाचिया उजेरिया । आपणयाप्रति कुंस्त्रिया । जोडोनि तोषिती जैसियां । अहेवपणें ॥ ७७ ॥

आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः । यजन्ते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥

तैसें आपणयां आपण । मानितां महंतपण । फुगती असाधारेंण । गर्वे तेणें ॥ ७८ ॥ मग लवों नेणती कैसे । आटिवा'' लोहाचे खांब जैसे । कां उधवेंले आकाशें । शिळेराशी ॥ ७९ ॥ तैसें आपुलिये बैरवे । आपणचि रिझंतां जीवें । तृणाहीहूनि आघवें । मानिती नीच ॥ ॥ ३८० ॥ वरी धनाचिया मदिरा । माजूनि धनुर्धरा । कृत्याकृत्यविचारा । सवतें'' केलें ॥८१॥ जया आंगीं आयेती ऐसी ।

त्रिभुवनांत तल्लीन होऊन मी आनंदाची मूर्ति होईन ६२. असे ते बोलतात आणखी बहुत काय काय सांगूं! असे ज्यांना आसुरी प्रकृतीनें वेड लागले आहे ते अशा प्रकारें त्या आकाशपुष्पांचा अपरिमित [इच्छेनें] वास घेतात! ६३.

**अन्वयार्थ**–**अनेकचित्तविभ्रांताः**– याप्रमाणें अनेक चित्तसंकल्पांनीं अतिशय भ्रांति पावलेले–**मोहजालसमावृताः**–अविवेकाच्या आवरणानें आच्छादित झालेले, अज्ञानरूप जाळ्यांत अडकलेले–**कामभोगेषु**–विषयभोगांमध्यें–**प्रसक्ताः**–आसक्त झालेले ते–**अशुचौ नरके**–अशुचि नरकांत–**पतन्ति**–पडतात १६.

ज्याप्रमाणें संनिपात झालेला रोगी तापाच्या भरांत हवें तसें बरळतो, त्याप्रमाणें ते आसुरी संपत्तीनें वेडे झालेले लोक हव्या त्या कल्पनांची तोंडानें बडबड करितात असें समज ६४. अज्ञानरूपी धुळींत सांपडले म्हणून आशारूपी वावटळीच्याहि सपाट्यांत सांपडून मग मनोरथरूपी आकाशांत ते वाटोळी फिरविली जातात ६५. ज्याप्रमाणें आषाढ महिन्यांत मेघ जसें एकावर एक असे अगणित येतात; किंवा जशा समुद्रांत एकसारख्या अखंड लाटावर लाटा येत असतात त्याप्रमाणें ते अखंड अनेक वैषयिक कामाची इच्छा करीत असतात ६६. मग मनोरथरूपी वेलच मनांत पसरून जाळ्या झाल्या किंवा ज्याप्रमाणें कांट्यावरून कमळें ओढावीत म्हणजे कमळें फाटून जातात ६७. किंवा पार्था! ज्याप्रमाणें दगडावर [ मातीची वा कांचेची ] हंडी आपटली असतां ती फुटून, तिचे शतशः तुकडे तुकडे होतात, त्याप्रमाणें त्यांच्या अंतःकरणाचे त्या मनोरथामुळें तुकडे तुकडे होतात! ६८. तेव्हां जों जों रात्र वाढेल तों तों काळोखहि वाढतो, त्याप्रमाणें [ जों जों अज्ञान वाढेल तों तों ] त्यांच्या अंतःकरणांत मोहहि वाढतच असतो ६९. आणि जों जों मोह वाढतो तों तों विषयवासनेचीहि वृद्धि होतें; आणि जेथें विषय असतात ते तर पातकालाच कारण वा आश्रय असतात ३७०. पापें आपल्या बळानें जों जों वाढून दाटी करतात तों तों त्यास जिवंतपणींच सर्व नरकयातना [ दुःखें ] भोगाव्या लागतात! ७१. म्हणून हे सुबुद्धिमंता! जे या वाईट वासना मनांत बाळगतात ते असुर त्याठिकाणीं वस्तीला येतात ७२. कीं, ज्या ठिकाणीं तरवारीच्या धारेसारख्या तीक्ष्ण पानांचीं झाडें आहेत, खैराच्या निखाऱ्यांचे डोंगर आहेत व जेथें तापलेल्या तेलाचे समुद्र उसळून येत आहेत ७३. आणि जेथें यातनांची ओळच्या ओळच असूनही यमाची नित्यशः नवीनवीच जाचणी होत असते, अशा घोर नरकलोकांत ते आसुरी प्रकृतीचे लोक पडतात ७४. अशा नरकाच्या शेलक्या भागांत जे जन्मले आहेत, तेहि पहावें तों भ्रमानें यज्ञयागादिक कर्में करण्यांत निमग्न झालेले दिसतात ७५. बाकी खरोखर पाहतां अर्जुना! त्यांच्या यज्ञादिक क्रियांचे जें फळ तेंच मिळून त्या क्रिया फलद्रूप व्हावयाच्या; पण त्यांच्या त्या क्रिया आह्राण म्हणजे पोकळ असतात, त्यामुळें व नाटकी लोकांप्रमाणें त्यांचे आचरण वरपंग असल्यामुळें त्याहि निष्फळ होतात ७६. वाईट चालीच्या स्त्रिया ज्याप्रमाणें आपल्या प्रियकराचा आश्रय करून, तेवढ्यानेंच आपल्यास सौभाग्यवती मानून चित्तांत संतोषित होतात ७७.

**अन्वयार्थ**––**ते** – आसुर लोक–**आत्मसंभाविताः**–आम्ही अनेक उत्तम गुणांनीं युक्त आहों असें स्वतःच मानणारे–**स्तब्धाः**-अनम्र स्वभावाचे-**धनमानमदान्विताः**-धनाविषयीं मान व मद यांनीं युक्त असलेले असे होत्साते–**दंभेन** – दंभानें – **नामयज्ञैः**– नाममात्रयज्ञांनीं–**अविधिपूर्वकम्**–अविधीनें–**यजन्ते**–यजन करितात १७.

त्याप्रमाणें मी सर्वांत श्रेष्ठ आहें असें आपणच आपल्यास महंतपण मानून, ज्यांचे अंगांत त्या गर्वाचा विलक्षण ताठा भरून ते फुगतात ७८. मग लोखंडाचें [ बिडाचे ] अतितीव्र खांब जसें वांकत नाहींत, त्याप्रमाणें हे कोणासहि लवणे–नम्र होणें जाणतच नाहींत, किंवा आकाशांत उंच गेलेल्या पर्वताप्रमाणें लीनता कशी असते हे त्यांस कळतच नाहीं ७९. त्याचप्रमाणें आपणच आपल्या ऐश्वर्यानें व चांगुलपणानें मनांत संतोष मानून इतर सर्वांस तृणाहूनहि कमी लेखितात ३८०. अर्जुना! याशिवाय संपत्तिरूप दारूच्या मदानें उन्मत्त होऊन, हे करण्यास योग्य आहे कीं अयोग्य आहे, या विचारास फांटा देतात व स्वतःस लोकविलक्षण समजतात ८१.

१ वास घेती. २ अपरिमित इच्छेनें. ३ आकाशपुष्पें. ४ भरांत. ५ बडबडतो. ६ बरळतात. ७ वावटळ. ८ इच्छितात. ९ मनोरथच. १० वेलीच्या जाळ्या. ११ ओरबडली. १२ रात्रींत. १३ वृद्धि, वाढ. १४ बळानें. १५ तरवारीच्या धारेसारख्या तीक्ष्ण पानांचे वृक्ष. १६ खैराच्या निखाऱ्यांचे. १७ तापलेल्या. १८ पंक्ति. १९ शेलक्या भागांत. २० हानिकारक. २१ भजवितात. २२ आश्रयाला. २३ वेश्या. २४ सौभाग्यानें. २५ विलक्षण, अतिशय. २६ बिडाचे. २७ उंचावलेले, वाढलेले. २८ पर्वत. २९ ऐश्वर्यानें. ३० संतोष मानून. ३१ वेगळें केलें. ३२ सामुग्री, तयारी.

तेथ यज्ञाची गोठी कायसी । तरी काय काय पिसीं । न करिती गा ? ॥ ८२ ॥ म्हणौनि कोणे एके वेळे । मौढ्यमद्याचेनि बळें । यागाचींही टेवाळें । आदरिती ॥ ८३ ॥ ना कुंड मंडप वेदी । ना उचित साधनसमृद्धी । आणि तयांसी तंव विधी । द्वंद्वचि सदा ॥ ८४ ॥ देवां ब्राह्मणांचेनि नांवें । आडवारेनहि नोहावें । ऐसें आथी तेथ यावें । लागे कवणा ? ॥ ८५ ॥ पैं वासरुंवाचा भोकसा । गाईपुढें ठेवूनि जैसा । उगाणां घेती क्षीररसा । बुद्धिवंत ॥ ८६ ॥ तैसें यागाचेनि नांवें । जग वोऊनि हांवें । नागविती आघवें । अहेरावारी ॥ ८७ ॥ ऐशा कांहीं आपुलिया । होमिती जे उंजरिया । तेणें कामिती प्राणिया । सर्वनाशु ॥ ८८ ॥

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः । मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥

मग पुढां भेरी[१२] निशाण । लाउनी ते दीक्षितपण । जगीं फोकारिती आण । वावो वांवो ॥ ८९ ॥ तेव्हां महत्त्वें तेणें अधमा । गर्वा चढे महिमा । जैसे लेवे[१३] दिधले तमा । काजळाचे ॥ ३९० ॥ तैसें मौढ्य घेणावे । औद्धत्य उंचावे । अहंकारु दुणावे । अविवेकुही ॥ ९१ ॥ मग दुजयाची भाष । नुरवावया निःशेष । बळियेपणा अधिक । होय बळ ॥ ९२ ॥ ऐसा अहंकार बळा । जालिया एकवळा । दर्पसागरु मर्यादवेळीं । सांडूनि उंते ॥ ९३ ॥ मग वोसंडिलेनि[१४] दर्पें । कामाही पित्त कुरुपे । तया धेंगीं सैंधें पेंळिपे । क्रोधाग्नि तो ॥ ९४ ॥ तेथ उन्हाळा आगी खैरमरा । तेलातुपाचिया कोठारा । लागला आणि वारा । सुटला जैसा ॥ ९५ ॥ तैसा अहंकारु बळा आला । दर्पु कामक्रोधीं गूंढला । या दोहींचा मेळु जाला । जयांच्या ठायीं ॥ ९६ ॥ ते आपुलिया सवेशों । मग कोणी कोणी हिंसा । या प्राणियातें वीरेशा । न साधती गा ? ॥ ९७ ॥ पहिलें तंव धनुर्धरा । आपुलिया मांसरुधिरा । वेंचुं करिती अभिचारां- । लागोनियां ॥ ९८ ॥ तेथ जाळिती जियें देहें । यामाजीं जो मी आहें । तया आत्मया मज घाये । वाजती ते ॥ ९९ ॥ आणि अभिचारकीं तिहीं । उपद्रविजे जेतुलें कांहीं । तेथ चैतन्य मी पाहीं । सीणु पावे ॥ ४०० ॥ आणि अभिचारावेगळें । विपायें जे अवगळें । तया टाकिती इंटाळें । पैशून्यांचीं ॥ १ ॥ सती आणि सत्पुरुख । दानशीळ याज्ञिक । तपस्वी अलौकिक । संन्यासी जे ॥२॥ कां भक्त हन महात्मे ।

अंगांत असली सामग्री असून ताठा भरलेला आहे, त्यांच्या ठिकाणीं यज्ञाची कथा कसली? तथापि वेडेपिसे लोक काय काय करीत नाहींत ! ८२. म्हणून कोण्या एखादे वेळेस मूर्खपणारूपी मद्याच्या बळानें आभासमात्र यज्ञाचीहि नक्कल करण्यास तयार होतात ! त्या यज्ञाची तऱ्हा काय म्हणशील तर ८३. त्यांना ना कुंड, ना मंडप, ना वेदी अर्थात् हें कांहीं एक नसतें किंवा तत्संबंधीं लागणारी योग्य सर्व साधनसामुग्री यांचीहि जरूर नसते; आणि कोणतेहि कर्म यथाविधि करण्याविषयीं-विधींशीं त्यांचे सदाचेच वांकडे असते ८४. देवब्राह्मणांचें नांव नुसते वाऱ्याच्या झुळकेबरोबर जरी यांच्या कानांवर पडले तरी तेंहि त्यांना खपत नाहीं. अशी जेथें स्थिति आहे तेथें मग कोणास बरें यावेसें वाटेल ? ८५. परंतु ज्याप्रमाणें व्यवहार चतुर लोक मेलेल्या वासराचें पोटांत पेंढा भरून तें कृत्रिम वासरूं त्या दुभत्या गाईचें पुढें उभें करून ठेवतात व तिचे कांसेंत असेल तेवढें सर्व दूध काढून घेतात ८६. त्याप्रमाणें यज्ञाच्या मिषानें सर्व लोकांस आमंत्रण देतात व ' आपल्यास कांहीं मिळेल ' या आशेनें ते आले असता, उलट त्याजपासूनच अहेराच्या रूपानें उपटून घेऊन सर्व जगास लुटतात ८७. याप्रमाणें आपल्या उत्कर्षासाठीं यज्ञाचा दांभिकपणा माजवून जे कांहीं होम–हवन करतात, त्याद्वारें ते सर्व प्राण्यांच्या नाशाचीच इच्छा करितात ८८.

**अन्वयार्थ–अहंकारम्**–अहंकार–**बलं**-बल-**दर्पं**–दर्प–**कामं**–काम–**च**–व–**क्रोधं**–क्रोध यांचा–**संश्रिताः**–आश्रय केलेले ते आसुर लोक–**आत्मपरदेहेषु**–आपल्या व दुसऱ्यांच्या देहांमध्यें–**मां**–माझा–**प्रद्विषन्तः**–अतिशय द्वेष करणारे व–**अभ्यसूयकाः**–अतिशय असूया करणारे असतात १८.

[ **अहंकारं** ] मग आपल्यापुढें डंका, निशाण वगैरे लावून ' आम्ही दीक्षित आहों ' अशी आपल्या दीक्षितपणाची आपणच जगांत उगीच, व्यर्थ प्रसिद्धि करितात; ८९. त्यावेळीं त्या अधमांस अशा दीक्षितपणाच्या महत्त्वानें अधिकच गर्व चढतो. ज्याप्रमाणें अगोदरच काळा असलेल्या अंधकाराला काजळाचीं पुटें द्यावींत, म्हणजे तो अधिकच काळाकुट्ट होतो ३९०. त्याप्रमाणें त्यांचें मूर्खपण बळावून जाते व उद्धटपणा वाढतो व अहंकारहि, अविचारहि दुप्पट वाढतो ९१. [ **बलं** ] मग आपल्यापेक्षां जगांत दुसरा कोणी बलवान् आहे, असें नांव देखील अजिबात निघूं नये म्हणून त्यांच्या बळास जास्तच जोर येतो ९२. याप्रमाणें अहंकार व बल एकत्र होऊन ते एकदां प्रबल झाल्यावर [ **दर्पं** ] दर्परूपी [ उन्मत्तपणात्मक ] सागर आपली मर्यादा सोडून बाहेर वाहूं लागतो ९३. मग याप्रमाणें दर्प अमर्याद वाढला म्हणजे [ **कामं क्रोध च** ] कामाचेंहि पित्त खवळतें आणि त्याच्या धगीनें तो क्रोधाग्निहि अधिकच पेटतो ९४. मग जसा खरखरित उन्हाळ्यांत तेलातुपाच्या कोठारास प्रखर अग्नि लागावा आणि तशांत वारा सुटावा ९५. तसा बळाचे साह्य मिळालेला अहंकार व काम-क्रोधांनीं गुरफटून व्यापलेला दर्प या दोहींचें ऐक्य ज्याच्या ठिकाणीं झाले आहे ९६. अर्जुना ! ते आपल्या इच्छेनुसार कोणत्या कोणत्या हिंसा करून त्याद्वारां या प्राण्यांना मारणार नाहींत ! ९७. हे धनुर्धरा ! प्रथम हे दीक्षित अभिचारकर्माकरितां म्हणजे जारणमारणाच्या नादास लागून आपल्याच रक्ताचा व मांसाचा व्यय करतात; ९८. त्याकामीं इतरांस किंवा ते आपल्या देहास जो त्रास करून घेतात; त्याचे घाव त्या देहांत [ आत्मरूपानें ] वास करणार जो मी, त्या मज आत्म्याला बसतात ९९. आणि जारणमारणादि क्रियांनीं ज्याला ज्याला म्हणून पीडा देतात, त्यांच्यात जीवचैतन्यरूपानें वास करणारा जो मी त्या मला त्रास–दुःख प्राप्त होते ४००. आणि कदाचित् त्यांच्या जारणमारण क्रियेच्या सपाट्यांतून कोणी क्वचित् बचावून राहिले असतील तर त्यांची वर्में काढून दोषदृष्टिरूपी दगडांचा मारा करून त्यांच्या मनांस ते त्रास देतात १. सती, पतिव्रता, सत्पुरुष, दानशील पुरुष, यज्ञ करणारे, जे अलौकिक तप करणारे व संन्यासी, २. किंवा भक्त, महात्मे पुरुष

१ गोष्ट. २ टवाळक्या. ३ यज्ञकुंडाचा ओटा. ४ वैमनस्य, दुफळी. ५ वारा़हि नसावा. ६ आहे. ७ वासराचा. ८ झाडा. ९ वेधून, बोलावून. १० उत्कर्षासाठीं. ११ इच्छा करतात. १२ डंका. १३ प्रगट करतात. १४ व्यर्थ. १५ लेप. १६ दृढ होतें. १७ उद्धटपणा. १८ ऐक्य. १९ समुद्राच्या भरतीच्या पाण्याच्या मर्यादेचा वेढ–मारवेल. २० वाहूं लागतो. २१ अतिशय भरून वाहणाऱ्या. २२ प्रकोप पावते, क्षोभते. २३ उबाऱ्यानें. २४ अनिवार. २५ पेटतो. २६ प्रदीप्त झालेला. २७ गुरफटला. २८ इच्छेप्रमाणें. २९ खर्च. ३० जारणमारणादि प्रयोगासाठीं. ३१ जारण–मारण करणारांनीं. ३२ क्वचीत्, कदाचित्. ३३ वेगळें राहातें, बचावतें. ३४ दगड. ३५ दुर्वचनतेचें, मर्मांचें.

इयें माझीं निजांचीं धामें । निर्वाळेलीं होमधर्में । श्रौतादिकीं ॥ ३ ॥ तयां द्वेषाचेनि काळकूटें । बासटोनि तिखटें । कुबोलांचीं सदटें । सूति केंडें ॥ ४ ॥

तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् । क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥

ऐसे आघवाचि परी । प्रवर्तले माझ्या वैरी । तयां पापियां जें मी करीं । तें आइक पां ॥ ५ ॥ तरी मनुष्यदेहाचा तागां । घेऊनि रुसती जे जगा । ते पदवी हिरोनि पैं गा । ऐसे ठेवीं ॥ ६ ॥ जे क्लेशगांवींचा उंकरडा । भवपुरींचा पौन-वडा । ते तमोयोनि तयां मूढां । वृत्तीचि दें ॥ ७ ॥ मग आहाराचेनि नांवें । तृणही जेथ नुगवे । ते व्याघ्र वृश्चिक आडवे । तैसिये करीं ॥ ८ ॥ तेथ क्षुधा-दुःखें बहुतें । तोडूनि खाती आपणयातें । मरमरों मागुतें । होताचि असती ॥ ९ ॥ कां आपुला गरळज्वाळीं । जाळिती आंगाची पेंदळी । ते सर्पचि करीं बिळीं । निरुंधलों ॥ ४१० ॥ परी घेतला श्वासु घापे । येतुलेनहीं मापें । विसांवा तयां नाटोपे । दुर्जनांसी ॥ ११ ॥ ऐसेनि कल्पांचिया कोडी । गणितांही संख्या थोडी । तेतुला वेळु न काढी । क्लेशौनि तयां ॥ १२ ॥ तरी तयांसी जेथ जाणें । तेथिंचें हें पहिलें पेणें । तें पावोनि येरें दारुणें । न होती दुःखें ॥ १३ ॥

आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि । मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ॥ २० ॥

हा ठायवरी । संपत्ति ते आसुरी । अधोगति अवधारीं । जोडिली तिहीं ॥ १४ ॥ पाठीं व्याघ्रादि तामसा । योनी तो अळुमाळु ऐसा । देहाधाराचा उसासों । आथी जोही ॥ १५ ॥ तोही मी वोल्हावा हिरें । मग तमचि होती एकसरें । जेथ गेलें आंधारें । काळवंडैजे ॥ १६ ॥ जयांची पापा चिळसी । नरक घेती विवेंसी । शीण जाय मूर्च्छी । सिणें जेणें ॥ १७ ॥ मळु जेणें मैळे । तापु जेणें पोळे । जयाचेनि नांवें सळे । महाभय ॥ १८ ॥ पापा जयाचा कंटाळा । उपजे अमंगळ अमंगळा । विटाळुही विटाळा । बिहे जया ॥ १९ ॥ ऐसें विश्वाचेया वोखटेया । अधम जे धनंजया । तें ते होती भोगूनियां । तामसा योनी ॥ ४२० ॥ अहा सांगतां वाचा रडे । आठवितां मन खिरडे । कटारे मूर्खी केवढे । जोडिले निरयें ॥ २१ ॥ कायिसया ते आसुर । संपत्ति पोषिती वाउरें । जिया दिधलें घोर । पतन ऐसें ॥ २२ ॥ म्हणौनि तुवां धनुर्धरा । नोहावें गा

वगैरे किंवा ज्यांचीं घरें श्रौतादिक होमधर्मानें पवित्र झालेलीं आहेत, अशीं जी माझीं स्वतःची आवडतीं व राहण्याचीं स्थळें आहेत ३. त्यांना द्वेषरूपी काळकूट विषानें माखलेलें दुःशब्दरूपी बळकट व तीक्ष्ण बाण मारतात ! ४.

अन्वयार्थ--अहं-मी-तान् द्विषतः क्रूरान्-त्या माझा द्वेष करणाऱ्या क्रूरास अशुभान् नराधमान्-अशुभ नराधमास-संसारेषु-संसारांतील-आसुरीषु योनिषु एव-आसुरी योनींतच-अजस्रं क्षिपामि-सतत टाकतो १९.

याप्रमाणें जे सर्व प्रकारें माझ्याशीं वैर करण्यास प्रवृत्त झाले आहेत तर त्या पाप्यांना जे मी करतो [ कोणती शिक्षा देतों ] ते तूं ऐक ५. तर मनुष्यदेहाचा आश्रय धारण करून जे या जगांत आपलें कर्तव्य काय तें विसरतात; त्यांची मनुष्यदेहरूपी पदवी हरण करून मी त्यांना अशा स्थितींत ठेवितों ६. कीं, जो क्लेशरूपी गांवाचा उकिरडा आहे व संसारपुरीचा जो पाणवठा आहे ! अशी जी तमोयोनि, तेथील त्या मूर्खास वतन-दारीच देतो ७. मग भूक लागली असतां, जेथें गवताहि उगवत नाहीं, म्हणून खाण्याची सोय नाहीं, तसल्या अरण्यांत मी त्यांना वाघ, विंचू इत्यादि करून ठेवतों ८. त्या योनींत अरण्यांत ते भुकेनें अति तीव्र वेदनांमुळें ग्रस्त झाले म्हणजे ते आपल्या अंगाचे लचके तोड-तोडून खातात व मरतात आणि मरमरून पुनः त्याच योनींत कित्येक वेळां उत्पन्न होतच असतात ९. किंवा आपल्या विषाच्या दाहानें ज्यांच्या शरीराच्या त्वचेचा दाह होतो, ती जळते असा बिळांत कोंडून राहिलेला त्याला सर्वच करून ठेवतों ४१०. परंतु आंत घेतलेला श्वास बाहेर सोडण्यास जितका काळ लागतो तितका थोडा वेळहि तेथें त्या दुर्जनास विश्रांति मिळत नाहीं ११. याप्रमाणें ज्याचें माप करतां येत नाहीं असें कोट्यावधि कल्पचे कल्प संख्या मोजली तरी थोडीच; अशा क्लेशदायक योनींत तितका वेळपर्यंत ठेवतो, त्यांना तेथून काढीत नाहीं १२. परंतु त्यांना ज्या निकृष्ट ठिकाणीं जावयाचे आहे. त्या मार्गांतील हा पहिला मुक्काम होय. मग त्या अंतिम ठिकाणाचा विचार केला असतां इतरही दुःखें त्या भयंकर दुःखापुढें कांहींच नाहींत अशीं दुःखें होणार नाहींत काय ? १३.

अन्वयार्थ--हे कौन्तेय-हे कुंतीपुत्रा !-मूढाः-ते मूढजन-जन्मनि जन्मनि-प्रत्येक जन्मांत-आसुरीं योनिम् आपन्नाः-आसुरी योनींतच उत्पन्न होतात व मां-मला-अप्राप्य एव-प्राप्त न होतांच-ततः- त्याहूनहि-अधमांगतिं-अधमगतीला-यान्ति-प्राप्त होतात २०.

असा त्या आसुरी संपत्तीचा महिमा आहे कीं, ज्याच्या योगानें इतकी अधोगति त्यांनीं मिळविलेली असते तें ऐक १४. नंतर व्याघ्रादि तामस योनींत देहाच्या आधा-रानें जी थोडी तरी स्वस्थता प्राप्त होते १५. तोहि विसा-व्याचा ओलावा मी हिसकावून घेतो, मग जेथें अंधार गेला असताहि काळवंडला जातो, अशा तमाच्या मूर्ति असणाऱ्या योनींत त्यांना मी घालतों १६. ज्या तमाची पापालाहि किळस उत्पन्न होते, नरकही ज्याचे भय घेतात व जेथील शीणामुळें [ श्रमानें ] श्रमही मूर्च्छित होतो १७. ज्याच्या योगानें मलहि-पापहि मलीन होते, ताप ज्याच्या योगानें पोळला जातो व ज्याचें नांव काढलें असतां महाभयासहि भीति वाटते १८. ज्या तमाचा पापालाहि कंटाळा असतो, अमंगळ वस्तूसही ज्याच्या स्पर्शानें अमंगळपणा उत्पन्न होतो व विटाळही ज्याच्या विटाळाला सदा भीत असतो १९. धनंजया ! अशी जी या साऱ्या विश्वाच्या वाईटांतील निकृष्ट अवस्था त्यांत ते आसुर लोक [ उपर्युक्त व्याघ्रादि ] तामस योनी भोगल्यानंतर उत्पन्न होत असतात ४२०. अरेरे ! त्या तामसी योनींचें वर्णन करतांना वाचा रड-कुंडीला येऊन कष्टी होते व त्या योनीची नुसती आठ-वण होण्याबरोबर मन कचरते, मागे सरते. अरे ! अरे ! त्या मूर्खांनीं ही केवढी नरकवासाची जोड करून घेतली ! ! २१. ज्या आसुरी संपत्तीनें असें घोर पतन, [ अधोगति प्राप्त होते ] ती वाईट आसुरी संपत्ति, ते लोक वाउर म्हणजे व्यर्थ कशासाठीं वाढवितात कोण जाणें [ न कळे ! ] २२. अर्जुना ! ज्या असुरी संपत्ति-

१ आवडती, प्रिय. २ पवित्र झाली. ३ माखून. ४ बळकट. ५ टोंचतात, मारतात. ६ बाण. ७ दोरा, धागा. ८ कर्तव्यकर्मे विसरतात. ९ कचऱ्याचा ढीग. १० संसार-पुरीचा. ११ पाणवाट. १२ मूढयोनि-वृक्षादि. १३ अरण्य-वासी. १४ विषाग्नींत. १५ त्वचा, पृष्ठी. १६ कोंडून ठेवला. १७ श्वास बाहेर टाकता येईल इतका. १८ क्लेशांतून. १९ मुक्काम. २० थोडासा, किंचित्. २१ स्वस्थता. २२ हरण करितो, हिरावून नेतो. २३ काळें ठिक्कर होतें. २४ कंटाळा. २५ भय. २६ ग्लनि, थकवा. २७ भितें, कांपतें. २८ भीति. २९ जगांतल्या. ३० निकृष्ट, अधमांतलें अधम. ३१ क्रूर. ३२ मागें सरे. ३३ हायरे हाय. ३४ नरक. ३५ व्यर्थ, बावगी, वाईट.

तिया मोहरा । जेउता वासु आसुरा । संपत्तिवंता ॥ २३ ॥ आणि दंभादि दोष साही । हे संपूर्ण जयांच्या ठायीं । ते त्यजावे हें काई । म्हणों कीरं ? ॥ २४ ॥

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः । कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥

परी काम क्रोध लोभ । या तिहींचेंही थोंब । थांवे तेथें अशुभ । पिकलें जाण ॥ २५ ॥ सर्व दुःखां आपुलिया । देशना धनंजया । पाढांऊ हे भलतया । दिधलें आह्वाती ॥ २६ ॥ कां पापियां नरकभोगीं । सुवावयालागीं जगीं । पातकांची दाटुगी । सभाचि हे ॥२७॥ ते रौरव गा तंवचिवरी । आइकिजती पेंटांतरीं । जंव हे तिन्ही अंतरीं । उठती ना ॥ २८ ॥ अपाय तिहीं आसलगे । यातना इहीं सवंग । हाणी हाणी नोहे हे तिघ । हेचि हाणी ॥ २९ ॥ काय बहु बोलों सुभटा । सांगितलिया निकृष्टा । नरकाचा दारवंटा । त्रिशंकु हा ॥४३०॥ या कामक्रोधलोभां- । माजीं जीवें जो होय उभा । तो निरयपुरीची सभा । सन्मानु पावे ॥ ३१ ॥ म्हणौनि पुढत पुढतीं किरीटी । हे कामादि दोष त्रिपुटी । त्यजावींचि गा वोखेटी । आघवा विषयीं ॥ ३२ ॥

एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः । आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥

धर्मादिकां चौंही आंतु । पुरुषार्थांची तैंचि मातु । करावी जैं संघातु । सांडील हा ॥ ३३ ॥ हे तिन्ही जीवीं जंव जागती । तंववरी निकियांची प्राप्ती । हे माझे कान नाइकती । देवोही म्हणे ॥ ३४ ॥ जया आपणपें पढिये । आत्मनाशा जो बिहे । तेणें न धरावी हे ''सोये । सावधु होइजे ॥ ३५ ॥ पोटीं बांधोनि पाषाण । समुद्रीं बाहीं आंगवण । कां जियावेया जेवण । काळकूटाचें ॥ ३६ ॥ इहीं कामक्रोधलोभेंसी । कार्यसिद्धि जाण तैसी । म्हणौनि ठांवोचि पुसीं । ययांचा गा ॥ ३७ ॥ जैं कहीं अवचटें । हे तिकडी सांखळ तुटे । तैं सुखें आपुलिये वाटे । चालों लाभे ॥ ३८ ॥ त्रिदोषीं सांडिलें शरीर । त्रिकुटीं फिटलिया नगर । त्रिदाह निमालिया अंतर । जैसें होय ॥ ३९ ॥ तैसा कामादिकीं तिघीं । सांडिला सुख पावोनि जगीं । संगु लाहे मोक्षमार्गीं । सज्जनांचा ॥ ४४० ॥ मग सत्संगें प्रबळें । सच्छास्त्राचेनि बळें । जन्ममृत्यूचीं निमाळें । निस्तरें रानें ॥ ४१ ॥ ते वेळीं आत्मानंदें आघवें । जें

वंतांना असा नरकत्रास भोगावा लागतो, त्या मार्गाच्या बाजूस तूं जाऊं नकोस हो ! २३. आणि ज्याच्या अंगीं आसुरी संपत्ती, दंभ आदिकरून संपूर्ण सहा दोष भरलेले असतात, त्यांचा त्याग करावा हें खरोखर तुला सांगावयाला पाहिजे काय ? २४.

**अन्वयार्थ**--**कामः क्रोधः तथा लोभः**–काम क्रोध व लोभ–[ **इति** ]–**इदम्**–असें हें–**त्रिविधं**–तीन प्रकारचें–**आत्मनः नाशनम्**–आत्म्याचा नाश करणारें–**नरकस्य द्वारं**–नरकाचें द्वार आहे–**तस्मात्**–म्हणून–**एतत् त्रयं**–या त्रयाचा–**त्यजेत्**–त्याग करावा २१.

परंतु काम, क्रोध व लोभ या तिघांचें प्रस्थ जेथें जोरावलें आहे, तेथें अशुभ–पाप पिकलें आहे, असें समज २५. अर्जुना ! वाटेल त्यास आपले दर्शन सहज सुलभ व्हावे म्हणून सर्व दुःखांनीं आपला मार्ग अचूकपणें दाखविण्यासाठीं त्यास [ काम क्रोधादिकांस ] वाटाडे म्हणूनच नेमिलें आहे २६. किंवा पापी लोकांस नरकभोगांत लोटण्याकरितां जगामध्ये पातकांची [ काम–क्रोधादिकांची ] ही मोठी थोरली, बलशाली सभाच आहे २७. रौरव नरक भयंकर आहेत म्हणून ज्याची परोक्षतः पुराणांतरीं आपण ख्याति ऐकतों, त्या रौरव नरकांची तोंपर्यंतच भयंकरता आहे कीं, जोंपर्यंत हे तिन्हीं दोष अंतःकरणांत उठले नाहींत ! २८. यांच्यामुळें अपाय सोपे व फार लवकर प्राप्त होतात, यातना तर फार सवंग–स्वस्त होतात व हानि हानि म्हणून जिला म्हणतात ती हानि नसून हे तिन्ही दोषच मूर्तिमंत हानि आहेत २९. अर्जुना ! यांची जी अति निकृष्ट अवस्था सांगितली, तिच्यापेक्षां काय अधिक वर्णन करूं ? फार काय सांगावें ! ! हा त्रिदोषसमुदाय म्हणजे नरकाच्या दरवाज्याचा जणुं उंबरठाच आहे ४३०. या काम क्रोध व लोभ यांच्यांमध्यें जो मनःपूर्वक उभा–अनुकूल म्हणून आश्रय करतो तो नरकपुरीच्या सभेंत मोठ्या सन्मानास प्राप्त होतो ३१. म्हणून हे किरीटी, तुला वारंवार बजावून सांगतों कीं, काम, क्रोध व लोभ यांची ही त्रिपुटी जी सर्व विषयांत सर्व प्रकारें अति वाईट, निंद्य आहे, तिचा त्याग अवश्य करावाच ३२.

**अन्वयार्थ**---**कौन्तेय**–हे अर्जुना !–**एतैः त्रिभिः तमोद्वारैः**–या तीन तमोद्वारांनीं–**विमुक्तः**–विमुक्त झालेला–**नरः**–पुरुष–**आत्मनः**--आपलें–**श्रेयः**---कल्याणाचें- मोक्षाचें साधन–**आचरति**–आचरितो–**ततः**–त्यामुळें–**परां गतिं**–मोक्ष नांवाच्या परागतीला–**याति**–प्राप्त होतो २२.

कोणासहि धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारहि पुरुषार्थापैकीं एखाद्या पुरुषार्थाची गोष्ट तेव्हांच काढतां येईल कीं, ज्या वेळेस हा काम, क्रोध व लोभ ह्या तिघांच्या समुदायाची संगति सोडील ३३. काम, क्रोध व लोभ हे तिन्हीं जोंपर्यंत, अंतर्यामीं जागृतरूपानें वास करीत आहेत तोंपर्यंत, एखाद्यास कल्याणाची प्राप्ति होईल, हें म्हणणें माझे कान तर ऐकत नाहींत, असें भगवान् श्रीकृष्णसुद्धां म्हणतात ! ३४. ज्याला स्वतःवर प्रेम असून आपल्या कल्याणाची इच्छा आहे किंवा आपला नाश होईल म्हणून जो भितो, त्यांनी या तिघांची संगत धरण्याच्या वाटेस जाऊं नये. तर सावध व्हावें ३५. पोटाशीं दगड बांधून समुद्रांत बाहुबलानें तरून जाणें किंवा जगण्याकरितां काळकूट विषाचें सेवन करणें ३६. ह्या कामक्रोधलोभांच्या संगतीनें तशीं कार्यसिद्धि होतें असें समज ! म्हणून अर्जुना ! यांचा मनांतूनच मागमूस नाहींसा करून टाक ३७.ज्यावेळेस अकस्मात्, सहजगत्या ही तीन कड्यांची सांखळी पायांतून तुटून जाईल त्या वेळेस आपल्या हिताच्या [ ब्रह्मात्मैक्यानुभवाच्या ] वाटेनें सुखानें चालण्यास मिळेल ३८. कफ, वात व पित्त या तिन्हीं दोषांनीं शरीरांस टाकावें [ शरीर आरोग्य संपन्न होतें ]. किंवा चहाडी, चोरी व शिंदळकी त्रिकुटीचा नाश झाल्यानंतर एखादे शहरांतील नांदणुक सुखानें होत असते आणि आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक हे तीन ताप नाहींसे झाल्यावर अंतःकरण जसें आनंदयुक्त असे होते ३९. तसें काम क्रोध व लोभ या तीन दोषांनीं ज्यास सोडलेले आहे, त्यासच या जगतांत सुख प्राप्त होऊन मोक्षमार्गांत सज्जनांच्या संगतीचा लाभ होत असतो ४४०. मग तो त्या प्रबल सत्संगतीच्या योगानें व सच्छास्त्राच्या साह्यानें जन्ममृत्यूंचीं माळरानें उल्लंघन करितो; ४१. त्या वेळेस

१ मार्गाकडे. २ जेथें. ३ निश्चयेंकरून. ४ प्रस्थ, प्रतिष्ठा, बूड. ५ बळावतें, रहातें. ६ दाखविण्यास. ७ वाटाडे, बोधक. ८ घालावयास. ९ बलाढ्य. १० परोक्षत्वानें, पुराणांतरीं. ११ सुगम, सोपें, लवकर. १२ दाराचा उंबरठा. १३ मध्येंच लोंबत राहिलेल्या, तीन दोषांचा समुदाय. १४ नरकग्रामाची. १५ वारंवार. १६ वाईट. १७ समुदाय. १८ कल्याणाची. १९ मार्ग, संगत. २० जगण्याकरितां. २१ मागमूस. २२ कदाचित्. २३ तीन कड्यांचा. २४ आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक. २५ अंतःकरण. २६ लाभे, पावतो. २७ खचरट, बरड.

सदा वसतें बरवें । तें तैसेंचि पाटण पावे । गुरुकृपेचें ॥ ४२ ॥ तेथ प्रियाची परमसीमा । तो भेटे माउली आत्मा । तयें खेंवीं आटे डिंडिमा । सांसारिक हे ॥ ४३ ॥ ऐसा जो कामक्रोधलोभां । झाडी करूनि ठाके उभा । तोचि येवढिया लाभा । गोसांवी होय ॥ ४४ ॥

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः । न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥**

ना हें नावडोनि कांहीं । कामादिकांच्याचि ठायीं । दाटिली जेणें डोई । आत्मेचोरें ॥ ४५ ॥ जो जगीं समान सकृपु । हिताहित दाविता दीपु । तो अमान्यु केला बापु । वेद्दु जेणें ॥ ४६ ॥ न धरीचि विधीची भीड । न करीचि आंपली चांड । वाढवीत गेला कोर्ड । इंद्रियांचें ॥ ४७ ॥ कामक्रोध-लोभांची कास । न सोडीच पाळिली भाष । स्वैराचारांचें अंसोस । वेंळघला रान ॥ ४८ ॥ तो सुटकेचिया वांहिणीं । मग पिवों न लाहे पाणी । स्वप्नींही ते काहाणी । दूरीचि तया ॥ ४९ ॥ आणि परत्र तंव जाये । हें कीर तया आहे । परी ऐहिकही न लाहे । भोग भोगूं ॥ ४५० ॥ तरी माशालागीं भुलला । ब्राह्मण पाँणबुडां रिघाला । कीं तेथही पावला । नास्तिकवाद्दु ॥ ५१ ॥ तैसें विषयांचेनि कोडें । जेणें परत्रा केलें उंबडें । तंव तोचि आणिकीकडे । मरणें नेला ॥ ५२ ॥ एवं परत्र ना स्वर्गु । ना ऐहिकही विषयभोगु । तेथ केंउंता प्रसंगु । मोक्षाचा तो ? ॥ ५३ ॥ म्हणौनि कामाचेनि बळें । जो विषय सेवूं पाहे सेंळें । तया विषयो ना स्वर्गु मिळे । ना उद्धरे तो ॥ ५४ ॥

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ । ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ।१६।

या कारणें पैं बापा । जया आंथी आपुली कृपा । तेणें वेदांचिया निरोपा । आनें न कीजे ॥ ५५ ॥ पतीचिया मता । अनुसरोनि पतिव्रता । अनायासें आत्महिता । भेटेचि ते ॥ ५६ ॥ नातरी श्रीगुरुवचना । दिठी देतु जतना शिष्य आत्मभुवना- । माजीं पैसे[२०] ॥ ५७ ॥ हें असो आपुला ठेवा । हाता आथी जरी यावा । तरी आदरें जेवीं दिवा । पुढां कीजे ॥ ५८ ॥ तैसा अशेषांही पुरुषार्थां । जो गोसावी हो म्हणे पार्था । तेणें श्रुतिस्मृति माथां । बैसणें घापे ॥ ५९ ॥ शास्त्र म्हणेल जें सांडावें । तें राज्यही तृण मानावें ।

ज्या ठिकाणीं सर्वत्र संपूर्ण आत्मानंद नेहमीं वास करतो; असेंच जें गुरुकृपारूपी सुंदर-नगर, रम्य स्थान, तें त्याला प्राप्त होतें ४२. मग निरतिशय प्रीतीचे परमोच्चस्थान जी आत्मरूपी माऊली, तिची त्या ठिकाणीं भेट होते व तिला आलिंगन दिल्याबरोबर अविलंबेंकरून संसाराचा ताप आपोआप नाहींसा होतो ४३. याप्रमाणें जो काम, क्रोध व लोभ यांचा परिपूर्ण त्याग करून मोकळा होतो, तोच एवढ्या व्यापक आत्मलाभाचा स्वामी होतो [आत्मप्राप्ति करून येण्यास समर्थ होतो] ४४.

**अन्वयार्थ**--**यः**-जो-**शास्त्रविधि**-शास्त्राचा विधि, वेदाचा विधि-**उत्सृज्य**--सोडून, वेदविधीचा त्याग करून-**कामकारतः**--कामप्रेरित होऊन, कामाकडून प्रेरणा केला गेलेला असा होत्साता-**वर्तते**- वर्तन करतो **सः**--तो **सिद्धिं**--पुरुषार्थाच्या योग्यतेला--**न अवाप्नोति**--प्राप्त होत नाहीं--**न सुखं** -त्याला या लोकीं सुख होत नाहीं व-**न परां गतिं**--[ **अवाप्नोति** ]-स्वर्ग व मोक्ष यांतील एकाहि उत्तम गतीला तो प्राप्त होत नाहीं २३.

किंवा हे [ आत्मप्राप्तीचा लाभ ] कांहीं एक न आवडून ज्यानें कामादिकांच्याच ठिकाणीं आपले डोकें खुपसले तो आत्मचोर, आत्मघात करणारा होय ४५. या जगांत सर्वांना सारखा असून सर्वांवर सारखी कृपा करणारा व आपलें हित किंवा अनहित दाखविणारा केवळ दीपच, असा जो सर्वांचा गुरु-बाप-वेद त्यांच्या आज्ञा जो जुमानीत नाहीं ४६. जो वेद शास्त्रांत सांगितलेल्या विधिनिषेधांची भीड धरीतच नाहीं व ज्यास आपले आत्महिताची चाडच नाहीं व जो इंद्रियांचेच सर्व लाड वाढवित-पुरवित गेला ४७. काम लोभ क्रोध यांची कास सोडणारच नाहीं. म्हणून त्यांना दिलेले वचन जो पाळतो, मोडीत नाहीं व स्वेच्छाचाररूपी अफाट रानांत शिरून हिंडत राहतो ४८. तो सुटकेच्या ओघांतील पाणी पिऊं शकत नाहीं [ जन्ममरणाची अविश्रांत वाटचाल करितो ] इतकेंच नव्हे तर त्यास सुटकेनंतरची [ सोलीव सुखाची ] गोष्ट स्वप्नांत देखील दूरच असते ४९. आणि परलोकास तो अंतरतोच, हे ठेवल्या सारखेच आहे यांत शंका नाहीं; परंतु त्याला या लोकींचेहि भोग भोगण्यास मिळत नाहींतच ४९०. तर एखादा ब्राह्मण नदीच्या तीरीं स्नानसंध्या करीत असतां माशावर मनानें भुलून ते धरावयास कोळी जातींत शिरला असतां, त्याचें कृत्य कोळी लोकांनीं पाहिल्यावर जसें ते "असला हा नास्तिक आमच्या जातींत नको" असे म्हणून त्यास घेईनांत [ त्याची माशाविषयीं इच्छा तर पुरी होतच नाहीं, पण तो त्या कोळ्यांच्या जातीस व ब्राह्मणत्वासही मुकतो ] ९१. त्याप्रमाणें आसक्तीमुळें विषयांच्या नादाला लागून ज्यानें परलोक पालथा घातलाच, [ घालविलाच ] पण इहलोकींहि पाहूं गेले असतां जो मृत्यूच्या सपाट्यांत सांपडलेलाच, असतो ९२. याप्रमाणें त्याला परलोक नाहीं व स्वर्गहि नाहीं! आणि ज्याला इहलोकींहि विषयांचा भोग भोगावयास सांपडत नाहीं, तेथें मोक्षप्राप्तीची गोष्ट कशास बोलावयास पाहिजे? ९३. म्हणून कामाच्या वृद्धीनें, बळानें, आग्रहानें जो विषयाचें सेवन करूं पाहतो, त्याला विषय [ वैषयिक सुख ] भोगावयास मिळत नाहींत, स्वर्गहि प्राप्त होत नाहीं? आणि तो उद्धरूनहि जात नाहीं ९४.

**अन्वयार्थ**-**तस्मात्**-म्हणून-**कार्याकार्यव्यवस्थितौ**-कर्तव्य व अकर्तव्य यांच्या निश्चयाविषयीं-**ते**-तुला-**शास्त्रं प्रमाणं**-शास्त्र हेंच प्रमाण आहे, यास्तव-**शास्त्रविधानोक्तं ज्ञात्वा**-शास्त्रविधानानें सांगितलेलें जाणून-**इह**-या-कर्माधिकारभूमींत-**कर्म**-कर्म कर्तव्य, धर्म-**कर्तुं**-करण्यास-**अर्हसि**-तूं योग्य आहेस २४.

यास्तव बापा अर्जुना! ज्याला आपलें खरोखर कल्याण व्हावें अशी इच्छा असेल त्यानें वेदांत सांगितलेल्या आज्ञेची कधींहि अवज्ञा करूं नये ९५. पतीच्या मर्जीप्रमाणें वागून पतिव्रता स्त्री अनायासानेंच आपलें हितास प्राप्त होते ९६. किंवा श्रीगुरूंच्या आज्ञेकडे लक्ष देऊन जो ती पालन करतो तो शिष्य आत्मानुभवांत प्रवेश करतो ९७. फार काय!! परंतु [ अंधारांत ] आपणच ठेवलेली वस्तु-ठेव जर हातीं यावी असें वाटत असेल, तर त्याप्रमाणें दिव्याचा उजेड अगत्य पुढें करावा ९८. त्याप्रमाणें पार्था! जो 'सर्व पुरुषार्थांचा स्वामी होईन' असें [ जिज्ञासा बुद्धीनें ] म्हणतो त्यानें श्रुति-स्मृति यांस आपले मस्तकच बसकर म्हणून घालावें. [ त्यांच्या सर्व आज्ञा शिरसावंद्य मानल्याच, पाळल्याच पाहिजेत ] ९९. जें टाकून

१ आवडण्याची. २ ताप. ३ झाडा, त्याग. ४ धनी. ५ दिली. ६ आत्मघातानें. ७ आत्मप्राप्तीची इच्छा. ८ लाड. ९ शपथ. १० स्वेच्छाचरणाचें. ११ अतिशयेंकरून मोठें. १२ शिरला. १३ नदींत. १४ कोळशाच्या जातींत. १५ उपडें, पालथें. १६ कसचा, कोठला. १७ बळानें. १८ असेल. १९ अवज्ञा, अपमान. २० प्रवेशतो, शिरतो.

जें घेववी तें न म्हणावें । विषही विरुं ॥ ४६० ॥ ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा । तरी कें आहे अनिष्टा । भेटणें गा ? ॥ ६१ ॥ पैं अहितापासूनि काढिती । हित देऊनि वाढविती । नाहीं गा श्रुतिपरौती । माउली जगा ॥ ६२ ॥ म्हणौनि ब्रह्मेंशीं मेळवी । तंव हे कोणें न सांडावी । अगा तुवांही ऐसीचि भजावी । विशेषेंसी ॥ ६३ ॥ जे आजि अर्जुना तूं येथें । करावया सत्य शास्त्रें सार्थें । जन्मलासि बळार्थें । धर्माचेनि ॥ ६४ ॥ आणि धर्मानुजे हें ऐसें । ओघेंचि आलें अपैसें । म्हणौनि अनारिसें करूं नये ॥ ६५ ॥ कार्याकार्यविवेकीं । शास्त्रेंचि करावीं पारखीं । अकृत्य तें कुंडें लोकीं । वोळावें गा ॥ ६६ ॥ मग कृत्यपणें खरें निगे । तें तुवां आपुलेनि आंगें । आचरोनि आदरें चांगें । सारावें गा ॥ ६७ ॥ जे विश्वंप्रामाण्याची मुंदी । आजि तुझ्या हातीं असे सुबुद्धी । लोकसंग्रहासि त्रिशुद्धी । योग्यु होसी ॥ ६८ ॥ एवं आसुरवर्गु आघवा । सांगोनि तेथिंचा निगावा । तोही देवें पांडवा । निरूपिला ॥ ६९ ॥ इयावरी तो पंडूचा । कुमरु सद्भावो जीवींचा । पुसेल तो चैतन्याचा । कानीं ऐका ॥ ४७० ॥ संजयें व्यासाचिया निरोपा । तो वेळु फेडिलौ तया नृपा । तैसा मीही निवृत्तिकृपा । सांगेन तुम्हां ॥ ७१ ॥ तुम्ही संत माझिया कडा । दिठीचा कराल बहुडा । तरी तुम्हां मानें येवढा । होईन मी ॥ ७२ ॥ म्हणौनि निजें अवधान । मज वोळंगे पसायदान । दीजो जी सनाथु होईन । ज्ञानदेवो म्हणे ॥ ४७३ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥
श्लोक २४, ओव्या ४७३.



शास्त्र जें टाकावे म्हणून म्हणेल तें राज्यहि असले तरी तृणवत् मानून सोडून द्यावे व शास्त्र जें घ्यावे, स्वीकारावे म्हणून सांगेल तें जरी मारक विष असले, तरी घ्यावें, तें विरुद्ध–प्रतिकूल मानूं नये. [ कारण, तशी वेदाची आज्ञा असल्यामुळें त्यांत कल्याण होणारच अर्थात् तशी प्रमारूप आस्तिक्यबुद्धिरूप श्रद्धा असावी ] ४६०. अर्जुना ! हे याप्रमाणें वेदांची एकनिष्ठपणें आज्ञा पालन करणारे झाले तर मग त्याची व अनिष्टाची, अहिताची गांठ कोठून पडणार ! ६१ हें बघ ! अहितापासून सोडवून काढणारी आणि हित [ हिततम ब्रह्मस्थिति ] देऊन वाढविणारी श्रुतीविना जगांत दुसरी कोणीहि माउली नाहींच बरें ! ६२. म्हणून जीवाचे ब्रह्माशीं [ असलेलें अनादि सहज ] ऐक्य [ अभिव्यक्त ] करते, त्या श्रुतीची कोणीहि हेळसांड–अवज्ञा करूं नये, अरे ! तूंहि विशेषेंकरून श्रुतीलाच एकनिष्ठ होऊन भजावे ६३. कारण, अर्जुना ! मागील जन्मीं धर्माचरण केल्यामुळें धर्मानुष्ठान बलेंकरून या जन्मींहि सच्छास्त्रें यथार्थ, सार्थ करण्यासाठींच तूं या राजकुलांत जन्मास आला आहेस ६४. इतकेच नव्हे तर धर्मराजाचा तूं धाकटा भाऊ असल्यामुळें 'धर्मानुज' हें नांव तुला सहजच ओघानें प्राप्त झालें आहे, तेव्हां त्यावरूनहि असाच बोध सूचित होतो कीं, तूं वेदबाह्य वर्तन करूं नकोस ६५. हें योग्य कार्य आहे किंवा अकार्य म्ह. करण्यास अयोग्य आहे, ह्याची विवेकपूर्वक पारख करण्याचें बाबतींत शास्त्रांस व शास्त्रज्ञांनाच 'परीक्षक' ठरवावें, शास्त्रांनीं जें अकार्य म्हणजे निषिद्ध असें ठरविलें असेल, तें वाईट म्हणून टाकून द्यावें ६६. मग खरोखर जें उत्तम कर्तव्य म्हणून निवेल ते तूं स्वतः अगत्यपूर्वक आदरानें पूर्णपणें आचरावें ६७. कारण, हे सुबुद्धिमंता ! आज तुझ्या हातांत जगानें प्रमाण मानण्याजोगा शिक्का असल्यामुळें [ तूं राजा असल्यामुळें तुझा आचार लोक प्रमाण मानतात म्हणून ] खरोखर लोकांनीं तुझ्या आचरणाचा कित्ता गिरविलाच पाहिजे, अशी तुझी योग्यता असून लोकसंग्रहास तूं अधिकारी आहेस ६८. महाराज म्हणतात, याप्रमाणें आसुरी दोष समुहाची सर्व लक्षणें सांगून, त्या आसुरी दोषांतून सुटून निघण्याच्या प्रकाराचा निर्णयहि देवांनीं अर्जुनास सांगितला ६९. यावर तो अर्जुन आपल्या अंतःकरणांतील जें कांहीं सद्विचार, सद्भाव ठेवून विचारील तो विचार चैतन्याच्या कानांनीं म्ह. सावधान चित्तानें ऐका ४७०. श्रीव्यासांनीं आज्ञा केल्याप्रमाणें संजयानें सर्व वृत्तान्त निरोप सांगून धृतराष्ट्र राजाचा वेळ घालविला, त्याप्रमाणें श्रीनिवृत्ति महाराजांचे कृपेनें मीहि तुम्हांला सांगेन ७१. तुम्ही संतमंडळी जर माझ्यावर कृपादृष्टीचा वर्षाव कराल, तर तुम्हांला मान्य होईल एवढा मी होईन. [ आपणास पसंत पडणारें शास्त्रसंवादी व्याख्यान करणारा होईन ] ७२. म्हणून श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात – माझ्या या वाङ्मयसेवेबद्दल मला आपले अवधानरूपी प्रसादाचे दान करावें म्हणजे मी सनाथ, समर्थ व कृतकृत्य होईन ७३.

---

१ विरुद्ध, मारक. २ कोठें. ३ अर्थासहित, यथार्थ. ४ धर्माचें बळ तुझ्या ठायीं आहे म्हणून. ५ धर्मराजाचा धाकटा भाऊ. ६ अन्यथा. ७ परीक्षक. ८ वाईट. ९ त्यागावें, वर्ज करावें. १० उत्तम. ११ जगांत प्रमाण ठेवण्यायोग्य. १२ शिक्क्याची आंगठी. १३ लोकांनीं कित्ता वळवावा अशी १४ निघण्याचा प्रकार, निर्णय. १५ सावधान चित्तानें. १६ वेळ घालविला. १७ कृपेचा वर्षाव. १८ मान्य होईल. १९ आपले. २० माझ्या चाकरीला. २१ प्रसाद.



# अध्याय संगति व सोळाव्या अध्यायाचें तात्पर्य

**सहज इष्टानिष्टकरणी । दोघींचि इया कवतुकिणी ।। अ. १६–६१**

'त्रिगुणातीत' होण्यासाठीं ज्या निर्विशेष निरुपाधिक परब्रह्माचें आत्मत्वानें ज्ञान संपादन करणें आवश्यक आहे, त्याचे स्वरूपज्ञान संपादन करण्याचा प्रकार आणि फल यांचे मागील अध्यायांत वर्णन केले. "**या मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम्**" या श्लोकानें "असंमूढ" मनुष्यासच उत्तम पुरुषास जाणण्याचा अधिकार आहे, असें समजते. अर्थात् त्या असंमोहत्व सिद्धयर्थ आसुरी संपत्ति त्यागपूर्वक दैवी संपत्तीचें संपादन करणें जरूर आहे. त्या दोन्हीं संपत्तीचें स्वरूप सांगण्यासाठीं म्हणजे ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारास उपकारक संपत्ति कोणती व अपकारक संपत्ति कोणती, हे सांगण्यासाठीं हा सोळावा अध्याय आहे.

शिवाय वेदांतशास्त्र आणि वेदान्त शास्त्राचें रहस्य प्रतिपादक गीतेसारखें ग्रंथ श्रवण, अध्ययन केलें तर संसार मिथ्यात्वपूर्वक ब्रह्मात्मैक्यविषयक परोक्षज्ञान सामान्य मनुष्याच्या बुद्धीसहि होतें; पण त्याचा सतत व्यासंग, निदिध्यासन ठेवलें नाहीं तर ते उत्पन्न झालेलें "कोंवळें" ज्ञान प्रायः नष्ट होतें आणि आम्ही वेदान्त वाचला आहे, गीतेचे अध्ययन केलें आहे, त्याजवरील मोठमोठ्या लोकांची व्याख्यानेंहि ऐकिलीं आहेत, एवढाच संस्कार शेवटीं शिल्लक राहतो. अप्रतिबद्ध निरतिशयानंदात्मक 'फल' मात्र त्याचे पदरांत पडत नाहीं. एवढ्यासाठीं उत्पन्न झालेलें परोक्षज्ञान दृढापरोक्षज्ञानपर्यवसायी होण्यासाठीं, त्यास पोषक अशी दैवी संपत्ति व ज्ञानफलास प्रतिबंधक आसुरी संपत्ति या उभयांची स्वरूपें सांगण्यासाठीं हा अध्याय आरंभिला आहे.

पहिल्या आरंभींच्या सतरा ओंव्यांत नवलपूर्ण चितसूर्याच्या रूपकानें अर्थात् श्रीज्ञानेश्वरमहाराज आपल्या श्रीगुरूंचे लोकोत्तर व अनन्यसाधारण महत्त्वपूर्ण सामर्थ्याचें लौकिक सूर्याच्या सामर्थ्याशीं तुलना करून प्रतिपादन करतात. हा नवलसूर्य उगवला असतां विश्वाभास बाधित होऊन मावळतो, अद्वयस्थितिरूप कमळाचा विकास होतो, अविद्यारूपी रात्रीचा नाश करून, ज्ञानाज्ञानात्मक चांदण्या लोपतात. ज्ञान्यास स्वबोधाचा सुदिन होतो; ज्या सूर्योदयापूर्वीं होणाऱ्या प्रातःकाळीं आत्मज्ञानाचे डोळे प्राप्त होऊन जीवपक्षी देहाहंतेची घरटीं सोडतात. ज्याचा उदय झाला असतां लिंगदेहरूपीं कमळाच्या पोटांत नाश पावणाऱ्या जीव चैतन्यरूपी भ्रमराचा 'बंदीमोक्ष' होतो. बुद्धि व बोधरूपीं चक्रवाक दांपत्याची रात्रींच्या विरहानंतरची भेट, असे अपूर्वसुंदर वर्णन करून श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात पुनः कधींहि अस्तास जाणार नाहीं असा 'मुक्त कैवल्य' दिवस होतो. प्रकाश्य–प्रकाशक भावरहित प्रकाश्येविण प्रकाशक, असा निजधाम व्योमींचा राजा असणाऱ्या चितसूर्याचा उदय झाला कीं, पूर्व, पश्चिम, रात्र, दिवस, उदय, अस्त या सापेक्ष कल्पना पार नाहींशा होतात. मग या अद्वयबोध नगरींत आनंदाचा सुकाळ होतो. तत्त्वतः लौकिक सूर्याशीं श्रीगुरूंची तुलना करणें, हेहि त्यांच्या यथार्थ स्वरूपाला उणेपणा आणण्यासारखें आहे. म्हणून क्षमा मागून माझ्या वर्णन करण्यामागील शुद्ध प्रेमभाव आपण पहावा, अशी श्रीगुरूंना विनंती करतात [ १ ते २० ]. माझ्या वाणीनें सत्य बोलण्याचें तप अनेक कल्पपर्यंत केले त्या निष्काम तपजन्य पुण्याईनें श्रीगुरूंची भेट होऊन श्रीगुरुकृपेनें गीतेसारख्या सखोल, अर्थभरित ग्रंथावर व्याख्यान करण्याचें अवघड कार्य माझ्याकडून होत आहे [ २१ ते ४० ]. आत्मलाभविषयक अंतरंग व अंगदट म्हणजे बळकट, निश्चयफलपर्यवसायी साधन जें ज्ञान तें मागच्या अध्यायांत स्पष्ट सांगितलें. ज्ञानी पुरुषास आत्मलाभ झाला कीं, त्यास यत्किंचितहि कर्तव्य उरत नाहीं. ज्या ज्ञानानें कर्तव्याभावरूप मोक्ष मिळतो, तें ज्ञान कशानें प्राप्त होईल ? तें ज्ञान प्राप्त झाल्यावरहि ते आडमार्गाला न जातां त्याचा परिपालनात्मक क्षेम कसा होईल ? हें समजणें साधकाच्यापक्षीं नितान्त जरूरीचें आहे. अतएव ज्ञानास उपकारक अशी सद्गुणात्मक 'दैवी संपत्ति' व दुर्गुणात्मक, प्रतिकूल, अपकारक, अशी 'आसुरी संपत्ति सांगतात. भगवंतांनीं दैवासुर प्रकृतीचें वर्णनास नवव्या अध्यायांतच प्रारंभ केला होता; पण मध्येंच दुसरा प्रसंगप्राप्त विषय सांगण्यांत आल्यामुळें तेथें हा विषय सांगण्याचा राहून गेला. तोच विचार देव या अध्यायांत पुनः खुलासेवार सांगत आहेत. परस्पर पोषक, एकमेकांस उपकारक, असें बहुत पदार्थ एके ठिकाणीं संपादिलें जातात, त्या पदार्थ समुदायास 'संपत्ति' असें म्हणतात. प्रथम सुखाभिव्यक्त करणारी, दैवीगुणांना पोषक असणारी व मोक्षरूप परमफलास निश्चितपणें प्राप्त करून देणारीं, अशी सव्वीस सद्गुण समुदायरूप "दैवी संपत्ति" सांगतात [ ४१ ते ६७ ].

दैवीसंपत्तींतील सर्वश्रेष्ठ गुण म्हणजे १ **अभयः**–होय. भयसीमा अशा मृत्यूची भीति नसणें, निरहंकार वृत्तीनें व निस्पृह वृत्तीनें प्राप्त उचित कर्म करण्यानें अभय प्राप्त होते. किंवा अद्वैत भावानें सर्वत्र आपलेंच स्वरूप ओतप्रोत भरलें आहे. दुसरे हे आपला आत्मा आहे, असें मानून कोण कोणास मारणार या विचारानें, त्यास 'अभय' प्राप्त होते. २ **सत्त्वशुद्धिः**–अंतःकरणांतील रज–तम झडून जाऊन संकल्प–विकल्प–थांबल्यामुळें जी बुद्धि सत् स्वरूपाच्या आवडीनें राहते, असें सत् स्वरूप रुचल्यामुळें तेथें बुद्धीचें जे अनन्य होणें, त्यासच "सत्त्व शुद्धि" म्हणतात. ३ **ज्ञानयोग व्यवस्थितिः**–आत्मलाभ होण्याकरितां अधिकारानुरूप ज्ञान अथवा योग या साधनाचें ठिकाणीं चित्त-वृत्ति अनन्यवृत्तिक करून ठेवणें यासच 'ज्ञानयोग व्यवस्थिति" म्हणतात. ४ **दानः**–मनांत आप–परभाव न ठेवतां देह–वाचा–चित्तानें अनुकूलतेनुरूप संकट–पीडितास मदत देणें, हे 'दान' होय. ५ **दमः**–परमार्थ प्रतिकूल विषयापासून इंद्रियाचा संबंध सोडून त्यांना नियमांत ठेवून इंद्रिय निग्रह करणें, हाच 'दम' होय. ६ **यज्ञः**–स्ववर्णाश्रमानुसार, अधिकारानुसार वेदविहित स्वकर्माचें निरहंकार व निस्पृह वृत्तीनें आचरण करणें, यांस 'यज्ञ' म्हणतात. ७ **स्वाध्यायः**–श्रुतिप्रतिपाद्य तात्पर्य विषयीभूत असा ईश्वर त्याचा आत्मत्वानें साक्षात्कार व्हावा म्हणून 'श्रुतीचा निरंतर अभ्यास करणें' किंवा अधिकार परत्वें 'नाममंत्र जप' करीत राहणें, हाच नित्य 'स्वाध्याय' होय. ८ **तपः**–तप दोन प्रकारचें आहे. स्वरूपाच्या प्रसरालागीं, प्राण, इंद्रिय, शरीर यांना आटवणें, हें एक तप होय. किंवा आपल्या शरीरांत सत्य असा आत्मा व मिथ्या–अनृत असा देह या सत्यानृताचे मिश्रण झाले आहे, त्यांतून नित्य व अनृत यांचीं विवेकानें निवड करून, आत्म्याची वेगळीक जाणून स्वस्वरूपीं सदा जागृत राहणें हें दुसरें 'तप' स्वरूप होय. ९ **आर्जवः**–भूतमात्रांशीं सौजन्यपूर्ण वागण्याच्या पाठीमागे असणारीं जी अंतःकरणाची सरलता त्यास 'आर्जव' म्हणतात. १० **अहिंसा**:-जगाला सुख व्हावें, जगाचे खरे कल्याण व्हावे, या एकमात्र उद्देशानें केलेलें शारीरिक, वाचिक व मानसिक व्यवहार म्हणजेच 'अहिंसा' होय. ११ **सत्यः**–श्रवणसुख चतुर, निःसंदेह शाब्दबोध करणारे, परिणामीं हितकारक असते, असें अविकार बोलणें म्हणजेच 'सत्य' होय. १२ **अक्रोधः**–क्रोध उत्पन्न होण्याजोगी अपारनिमित्त कारणें प्राप्त झालीं तरीहि चित्तांत मुळींहि क्रोधोर्मि निर्माण होत नाहीं. अशा दशेस 'अक्रोध' हें नांव आहे. १३ **त्यागः**–देह अहंता टाकून समूळ संसाराचा त्याग करणें हा 'त्याग' होय. १४ **शान्तिः**-ज्ञेयास गिळून ज्ञाता, ज्ञानहि जेथें विराम पावते किंवा ज्ञेयाचा लय झाल्यावर ज्ञेयसापेक्ष ज्ञातृत्वहि लय पावते. मग जें कांहीं उर्वरित राहते तेंच 'शांती'चें स्वरूप होय. १५ **अपैशुन्यः**–दुसऱ्याच्या दोषास आपल्या चांगल्या दृष्टीनें चोख करून मग त्याचेकडे पहावें. त्यास सन्मार्गाला लावण्यासाठीं आपल्या सद्गुणांचा उपयोग करणें. यासच "अपैशुन्य" म्हणतात. १६ **दयाः**–पुढें आलेल्या दुःखिताला संतुष्ट करून मग ज्याचें पुढें जाणें असतें, जो दुसऱ्याचें दुःखानें स्वतः पोळला जातो तसाच 'परसुखें जाये सुखावतु' आपपरभाव न ठेवतां दुःखितांस यथाशक्य सर्वतोपरी मदत करणें हीच "मूर्तिमन्त दया जाण". १७ **अलोलुप्त्वः**–ऐहिक वा पारात्रिक विषयभोग, इच्छेचे पाईक झाले तरीहि ते भोगावे हे ज्यास मनांतून मुळींच आवडत नाहीं. विषयाभिलाषारहित वृत्ति म्हणजेच "अलोलुप्त्व" दशा होय. १८ **मार्दवः**–भूतमात्रांबरोबर जे मवाळ वर्तन ठेवणें यांस 'मार्दव' म्हणतात. १९ **लाजः**–औट हात देह तादात्म्यानें शव होऊन जगणें, वारंवार जन्मास येऊन मरणें, देहपणानें नामरूपास येणें, इत्यादिविषयीं खंती वाटणें ही 'लाज' होय. २० **अचापल्यः**–मन व प्राण यांचे नियमन करून दाही इंद्रियें पंगु होतात, स्थिर राह-तात, यासच 'अचापल्य' म्हणतात. २१ **तेजः**–ईश्वराकडे अंतःकरण सहज धांवत असतां त्यांस आड येणाऱ्या प्रतिबंधांना तोंड देण्याचें आध्यात्मिक सामर्थ्यास 'तेज' म्हणतात. २२ **क्षमाः**–इतरांचें सर्व अपराध सहन करूनहि त्याविषयीं अजिबात गर्वास न येणें, हीच "क्षमा" होय. २३ **धैर्यः**–आध्यात्मिकादि त्रिविध उपद्रव प्राप्त झाले असतां त्यास जे गिळून टाकते ते 'धैर्य' होय. २४ **शौचः**–अंतःकरणांत अचूक आत्मानात्म–विवेक असणें व बाह्य शुद्ध निष्काम कर्माचरण असणें म्हणजे सबाह्य शुचित्वाचाच आकार घडला असें जाणावें. २५ **अद्रोहत्वः**–आपल्या आत्महिताची वाटचाल करीत असतां, इतरांच्या अहिताचा संकल्पहि न करतां, इतरांचेहि हित साधणे, म्हणजे 'अद्रोहत्व' होय. २६ **अमानित्वः**–स्वतः 'मानास' योग्य असूनहि लोकांनीं सन्मानपूर्वक मानले असतां 'संकोच' पावतो, लाजतो त्या वृत्तीस 'अमानित्व' म्हणतात [ ६८ ते २०६ ].

याप्रकारें सव्वीस दैवीगुणराशीं अशी दैवीसंपत्ति व तिचें स्वरूप सांगितलें, आतां दैवी संपत्तीच्या अगदीं उलट दुःखहेतु, दोषांनीं पूर्ण भरलेली आसुरी संपत्ति देव सांगत आहेत. वरपंग पाहिले तर दैवी संपत्ति सांगितल्यावर आसुरी

संपत्तीचे वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं असें वाटतें; पण जोंवर दोन्हीं संपत्तींतील 'भेद' अचूकपणें कळत नाहीं, तोंवर समजुतींत गोंधळ होण्याचा दाट संभव आहे. म्हणून "त्याज्य त्यजावयालागीं" च; पण त्या आसुरी संपत्तीचेंहि स्वरूप चांगले कळणें जरूरीचे आहे. दैवी संपत्ति मोक्षास कारण आहे व थोर नरक यन्थेस देणारी आसुरी संपत्ति आहे. असें हे दोन वेगवेगळें अनादि सिद्ध मार्ग आहेत. म्हणून त्याचे चांगलें ज्ञान असणें जरूर आहे. अतएव आतां देव, आसुरी संपत्तीचें स्वरूप सांगतात [ २०७ ते २१६ ].

१. **दंभ**--आपण आचरिलेला व दृष्टादृष्टाचा सखा असणारा धर्म वाचेच्या चव्हाट्यावर ठेवणें, अर्थात् धर्मध्वजित्व मिरविणें म्हणजे 'दंभ' होय. २ **दर्प**:—अत्यल्प विद्या, स्त्रिया, धन, स्तुति व मान यांची प्राप्ति झाली असतां उन्मत्त होणें, यास 'दर्प' म्हणतात. ३ **अभिमान**:-सर्व जगाला विश्वासाचें स्थान व पूज्य असा वेद आणि ईश्वर त्यांचे ज्यास अहम्-ममतेच्या मोहामुळें नावहि सहन होत नाहीं, म्हणून तो म्हणतो ईश्वरास मी खाईन व वेदाला विष घालीन. कारण, वेद ही एक मला सवतच झाली आहे. असा जो "मान्यतेचा पुष्टगंडु" त्यास 'अभिमान' म्हणतात. ४ **क्रोध**:--दुसऱ्यांची विद्या व वैभव यांनीं युक्त अशी भाग्यें पाहून मनांत संतापानें जळफळतो म्हणजेच "क्रोध" होय. ५ **पारुष्य**:--मनांत घातक संकल्प असणें, निखाऱ्याच्या वृष्टीसारखे बोलणें, किंबहुना !! ज्याचे अंतर्बाह्य दगडासारखें कठोर आहे, अशा मनाच्या निर्दयतेस "पारुष्य" म्हणतात. ६ **अज्ञान**:--कृत्याकृत्य विवेक नसणें, पाप पुण्यांतील भेद न जाणतां, त्याची खिचडी-बनवून बुद्धीच्या व्यवहारांत बऱ्या वाईटांतील तारतम्य न कळणें, हेंच "अज्ञान" होय. अशी ही आसुरी संपत्ति केवळ 'सहाच' दोषांच्या अंगांनीं बनलेली आहे; तरीपण ही मोठी बलशाली आहे. या सहा दोषांकडून जीवाचा नाश, सर्वतोपरी अकल्याण केले जाते. ती स्थावरादि योनींच्याहि तळापर्यन्त किंबहुना !! नरकापर्यन्त जीवास पोचविते. असा या आसुरी संपत्तीचा फार मोठा प्राक्रम आहे. आसुरी प्रकृति ही जोंवर एखाद्या शरीराचा आश्रय करीत नाहीं, तोंवर ती एकटी अनुभवास येत नाहीं [ २१७ ते २८० ].

आसुरी प्रकृतीच्या लोकांना नेहमीं पापाचरण करावेसे वाटते. पुण्य कर्म करण्याचें त्यांचें मनांत चुकूनहि येत नाहीं. शुचित्व म्हणजे काय हे त्यांस स्वप्नांतहि माहित नसतें. त्याचे सत्याशीं सदाच वैर असते. हे जगत् धर्माधर्म प्रतिष्ठारहित खोटे आहे, असें म्हणतात. या जगाचा कर्ता, प्राण्यांच्या शुभाशुभ कर्मांचा नियंता, व्यवस्थापक, कोणी ईश्वरराव आहे हे ते मुळींच मानीत नाहींत. विश्व व्यवस्था खोटीच आहे म्हणतात. केवळ प्रत्यक्ष प्रमाणावरच त्यांची भिस्त असल्यामुळें देव नाहीं, परलोक नाहीं. जर देव असतां तर प्रत्यक्ष डोळ्यांस दिसला असतां; पण ज्याअर्थी तो दिसत नाहीं, म्हणून नाहींच म्हणतात [ कारण, अज्ञानाच्या असत्वापादक आवरणामुळें 'देव नाही' म्हणतात व अज्ञानकृत आभानापादक आवरणामुळें 'दिसत नाहीं' म्हणतात. ] सारांश; ईश्वर, वेद, आणि परलोक याविषयीं चित्तांत अनादराची वृत्ति असते. जगाच्या उत्पत्ति-स्थिति-लयास "कामावांचून" दुसरें कांहींच मूळ कारण नाहीं, असे म्हणतात. केवळ स्त्री पुरुष संबंधानेंच विश्व निर्माण झाले आहे म्हणतात. जेणेंकरून परोपताप घडेल, परावे जीव रगडले जातील, असली घातक कर्मेंच आजन्म करीत असतात. स्त्रीसुखा-व्यतिरिक्त सुख नाहींच. कामोपभोग हेच सर्वस्व आहे, असें मानतात. असा ज्यांचा निश्चय असतो, त्यामुळें स्वैर भोग भोगावेत, अशी त्यांची हांवेखोर वृत्ति असते; पण विषयोपभोग भोगून तृप्त होण्यासाठीं 'द्रव्य' पाहिजेना ! त्या भोगासाठीं लागणारे द्रव्य सहजीं मिळालें नाहीं, तर स्वार्थासाठीं परप्राणघात करून तें द्रव्य मिळवितात. तो द्रव्याभिलाष कधींच संपत नाहीं. जेवढे मिळविलेलें द्रव्य आहे. त्या भांडवलावर अखिल विश्वाचा, धनाचा, सत्ता-धारी, स्वामी मीच होईन. मग त्या द्रव्यबलावर माझ्या इच्छेनुसार हवे तसे विषयोपभोग भोगीन, मी भोगभूमीचा राजा आहे. किंबहुना !! चराचरांत ईश्वर मीच आहे. माझ्या सुखविलासभोगापुढे ईश्वर, ब्रह्मदेव, कुबेर हे सर्व तुच्छ आहेत. "मजसी सरी पावे ऐसे कोण्ही नाहीं" असें म्हणतात. ते आसुरी प्रकृतीचे लोक होत, असें जाण. मीच सर्व भोगभूमीचा राजा व्हावे म्हणून जारण-मारणादि अभिचार कर्मांचेंहि अनुष्ठान करून त्याचा जीर्णोद्धार करतात. पापें आपल्या बळानें दाटी करतात. तेव्हां अमर्याद विषयोपभोगामुळें येणारीं असह्य दुःखें म्हणजे जीवंत-पणींच आलेला नरक होय, अशी ज्याची स्थिति आहे तेथें यज्ञाची गोष्ट कसली ? पण "**काय काय पिसी। न करितो गा**" म्हणून' यज्ञ-यागादिकांचेंहि आचरण करीत असलेले दिसतात; त्यांत शुचित्व व भक्ति नसते, तसे योग्य विधी--विधानहि नसते. साधुत्वाचा बाह्यात्कारीं आव आणून यज्ञ केला तरी तो नाटकी लोकांप्रमाणें केवळ देखावाच असतो. कारण, यज्ञ यागाच्या निमित्तेंकरून "नागविती आघवे। आहेरावारी" असा सर्व जगास

लुटण्याचा तो आंतला डाव असतो. शिवाय होम हवन करून सर्व प्राण्यांचा नाश इच्छितात [ २८१ ते ३९७ ].

असें क्षणिक विषयसुखासाठीं स्वैर, घोर, घातक वागणाऱ्या आसुरी-प्रकृतीवानास अहंकार, बल, गर्व काम-क्रोधादि विकारांच्या आधीनतेनें स्वतःमध्यें व दुसऱ्यामध्यें असणाऱ्या आत्मत्वाची मुळींच जाणीव होत नाहीं. तें स्वार्थासाठीं घातक, घोर, कर्मे करून इतरांस दुःख देऊन त्या सर्वान्तर्यामी असणाऱ्या चैतन्यरूप आत्मतत्त्वासच ताप, त्रास देतात. ते ज्यावेळीं पतिव्रता, सत्पुरुष, दानशील पुरुष, याज्ञिक तपस्वी व अलौकिक संन्यासी, माझे भक्त आदि करून महात्म्यास त्रास देतात. तेव्हां ईश्वराचा द्वेष करणाऱ्या त्या दुष्ट, पापी लोकांना जे मी करतो ते ऐक. त्यांची मनुष्यपणाची पदवी हिरावून घेतो. त्यांच्या कर्मानुसार क्लेश व दुःखपूर्ण योनींत घालतो. ते वरचेवर अधोगतीला व हीन तम योनींस जातात. शेवटीं त्यास कोट्यवधि कल्पांची संख्या मोजली तरी थोडीच तों वेळपर्यंत मी त्यास त्या नरक दुःखांतून काढीत नाहीं. आसुरी प्रकृतीच्या लोकांना ज्या भयंकर यातना भोगाव्या लागतात, अरेरे ! त्या आसुरांची ही कथा सांगतांना वाचा रडकुंडीला येते ! ! ज्या आसुरी संपत्तीमुळें अशी भयंकर अधोगति मिळते. ती आसुरी संपत्ति ते असुर कशासाठीं बरे पोषितात ! ! अशा आसुरी संपत्तिवंताचा त्याग करावा ! [ ३९८ ते ४२४ ].

अशा अधोगतीचीं मुख्य कारणें म्हणजे काम-क्रोध आणि लोभ हे विकार आहेत. तेथें पाप व नरक हे ठेवल्यासारखेच आहेत. म्हणून ही तीन जणं नरकाची द्वारें आहेत. या तीन विकारांमुळें अपाय सोपे झाले. यातना सवंग झाल्या. हानि ही हानि नसून हे तीन विकार म्हणजेच मूर्तिमंत हानि होय. त्यामुळें या तिघांची कांस धरून विषयोपभोग भोगणाऱ्यास या लोकांतहि चांगल्या रीतीनें, सुखानें नांदतां येणार नाहीं. पारत्रिक गतिविषयीं तर मुळींच बोलावयास नको. या तिघांचा आश्रय केल्यास तो निरयपुरीच्याच सभेंत सन्मानास पावतो. हे अधःपतन सदाचेच टाळायचे असेल तर या काम-क्रोध-लोभरूपीं निंद्य त्रिपुटींचा त्याग करणें जरूर आहे. या तीन दोषांची संगति सोडली तरच त्यास आपल्या खऱ्या कल्याणाची वा पुरुषार्थाची गोष्ट करतां येईल. ज्यांचें आपले स्वतःवर प्रेम असेल व जो आत्मनाशास भीतो त्यानें या तिघांची संगति धरूं नये, सावध व्हावे, त्यास मात्र मोक्षमार्गांचे सांगाति असलेल्या सज्जनांचा संग मिळतो. मग त्या प्रबळ सत्संगतींत सत्शास्त्र श्रवण करावें. श्रीगुरुशास्त्रोपदिष्टार्थाविषयीं दृढनिश्चय करून त्यांच्या सांगीप्रमाणें आत्मसिद्धींची इच्छा करणारा जिज्ञासु वाटचाल करूं लागला म्हणजे जन्म-मृत्यूच्या माळरानांतून पार पडून ब्रह्मनिष्ठ श्रीगुरुकृपेचे नगर प्राप्त होईल, तेव्हां प्रियाची परमसीमा जो माऊली आत्मा त्याची भेट होते, त्या क्षणींच जन्ममरणात्मक संसाराची येरझार संपेल. अर्थात दुःखाची आत्यंतिक निवृत्ति होऊन तेहि सदाचेच संपेल व निरातिशयानंदाची प्राप्ति होईल [ ४२५ ते ४४४ ].

धर्माला अविरुद्ध काय आहे कीं, ज्याचा अंगीकार केला असतां ते ब्रह्मात्मैक्य बोधास पोषक, उपकारक ठरेल. व आत्मप्राप्तीला अपकारक काय आहे, हे आपल्या स्वतःच्या बुद्धीनें ठरवून चालणार नाहीं. त्याचा निर्णय वेद-शास्त्रेंच सांगूं शकतात. म्हणून शास्त्र दृष्टीनेंच योग्यायोग्यतेचा निर्णय करावा. जर वासनापूर्तिसाठीं अनिवार भोग भोगले तर " परत्र ना स्वर्गु । ना ऐहिकहि विषयभोगु । तेथ कैंचा प्रसंगु । मोक्षाचा तो ! ॥ " म्हणून तो उद्धरत नाहीं. एवढ्यासाठीं अहितापासून काढणारी, सर्वांचे हिततम ब्रह्मप्राप्ति करून देऊन वाढविणारी, " नाहीं श्रुति परौति । माऊली जगा " वेदाची आज्ञा शिरसावंद्य मानावी. वेदासच प्रमाण मानावें व त्याप्रमाणेंच आचरण करावें, असें वेदैकनिष्ठ झाल्यावर अनिष्टाची गांठ कोठून पडणार ? श्रुति माऊली, जीवाचे ब्रह्माशीं ऐक्य करते. म्हणून श्रुतीस जीव ब्रह्मैक्यज्ञान होईपर्यंत सोडूं नये. अर्जुना ! तूं देखील श्रुतीला एकनिष्ठपणानें भज. तुला धर्मानुज असें ओघानेंच नांव आलेलें आहे. त्यावरून तूं धर्माच्या विरुद्ध वागूं नकोस एवढाच बोध सूचित होतो. विश्व प्रामाण्याची मुद्रा तुझ्या हातांत असल्यामुळें 'लोकसंग्रहा'स तूं खरोखर योग्य आहेस. कारण, आज तुझें आचरण प्रमाण समजून त्याप्रमाणेंच इतर सामान्य सकळ लोक आचरण करणार आहेत. असा दैवासुर संपत्तिविचार श्रीभगवंतांनीं अर्जुनास सांगितला. तोच विचार श्रीव्यासांच्या आज्ञेनें संजयानें धृतराष्ट्रास सांगितला.

" तैसा मीहि निवृत्तिकृपा । सांगेन तुम्हां ॥ " तुम्हीं संतांनीं मजवर कृपा केली तर आपणास पसंत पडेल असें व्याख्यान करणारा मी होईन. म्हणून माझ्या या वाङ्मय सेवेबद्दल आपले अवधानरूपी " पसायदान " द्यावे म्हणजे मी समर्थ होईन, असें श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात [ ४४५ ते ४७३ ].

[ या संपूर्ण सोळाव्या अध्यायाचा नकाशा क्रमांक १९ पहावा ].



# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय सतरावा

विश्वविकासित मुद्रा । जया सोडी तुझी योगनिद्रा । तया नमोजी गणेंद्रा । श्रीगुरुराया ।। १ ।। त्रिगुणत्रिपुरीं वेढिला । जीवंत्वदुर्गीं आडिला । तो आत्मशंभूनें सोडविला । तुझिया स्मृती ।। २ ।। म्हणौनि शिवेंसीं कांटाळा । गुरुत्वें तूंचि आगळा । तऱ्ही हळु मायाजळा- । माजीं तारूनि ।। ३ ।। जे तुझ्याविखीं मूढ । तयांलागीं तूं वक्रतुंड । ज्ञानियांसी तरी अखंड । उजूचि आहासी ।। ४ ।। दैविकी दिठी पाहतां सानी । तऱ्ही मीलनोन्मीलनीं । उत्पत्ति प्रळयो दोन्ही । लीलाचि करिसी ।। ५ ।। प्रवृत्तिकर्णाच्या चौळीं । उठली मदगंधानिळीं । पूजीजसी नीलोत्पलीं । जीवभृंगांच्या ।। ६ ।। पाठीं निवृत्तिकर्णतालें । आहाळली ते पूजा विधुंळे । तेव्हां मिरविसी मोकळें । आंगाचें लेणें ।। ७ ।। वामांगीचा लास्य-विलासु । जो हा जगद्रूप आभासु । तो तांडवमिसें कैळासु । दाविसी तूं ।। ८ ।। हें असो विस्मो दातारा । तूं होसी जयाचा सोयरा । सोइरिकेचियां व्यवहारा । मुकेचि तो ।। ९ ।। फेडितां बंधनाचा ठावो । तूं जगद्बंधु ऐसा भावो । धरूं वोळगे उवावो । तुझाचि आंगीं ।। १० ।। तंव दुजयाचेनि नांवें तया । देहही नुरेचि पैं देवराया । जेणें तूं आपणपयां । केलासि दुजा ।। ११ ।। तूंतें करूनि पुढें । जे उपायें घेती वेडे । तयां ठांसी बहुवें[28] पाडें । मागांचि तूं ।। १२ ।। जो ध्यानें सूये मानसीं । तयालागीं नाहीं तूं त्याचे देशीं । ध्यानही विसरे तेणेंसीं । वालभ तुज ।। १३ ।। तूतें सिद्धचि जो नेणें । तो नांदे सर्वज्ञपणें । वेदांही येवढें बोलणें ।

१ जीवरूपी किल्ल्यांत. २ कोंडला. ३ शंकराशीं. ४ तुलना. ५ योग्यता. ६ अधिक. ७ प्रभूची ज्ञानदृष्टि. ८ लहान. ९ उघडझापीनें. १० सांसारिक वृत्तिरूपी कानाच्या. ११ हालविण्यानें. १२ मदाच्या सुगंधित वायूनें. १३ नंतर. १४ अंतर्मुख वृत्तिरूपी कानानें. १५ हालली असतां. १६ विसर्जन होतें. १७ शक्तीचा, मायेचा. १८ नृत्यक्रीडा. १९ नृत्याच्या मिषानें. २० कौशल्य. २१ गुरुराया. २२ द्वैतभाव. २३ सेवा करतो, आश्रय करतो. २४ आनंद, उत्कर्ष. २५ निराळा. २६ धांव. २७ राहसी. २८ अनेक प्रकार. २९ बोलतो. ३० ध्यानासह. ३१ आवड, प्रेम.

# सार्थ श्रीज्ञानेश्वरी

## अध्याय सतरावा

हे श्रीगुरु राया! ज्या तुझी योगमाया :विश्वरूपी प्रफुल्लित अशा आकाराला विकसित–प्रकट करते व [ जीवात्मक ] गणांचा गोसावी जो तूं [ श्रीगणेश ] त्या तुला [ माझा ] नमस्कार असो. [ ज्या तुझी योगनिद्रा म्हणजे अद्वयब्रह्मस्थिति ज्या मुमुक्षूंस लाभते तेव्हां ती विश्वात्मक प्रफुल्लित, प्रगट झालेल्या आकारास सोडते बाधित करते अर्थात् विश्वात्मक विकसित मुद्रा बोधानें मावळविणाऱ्या श्रीगणेंद्रा! श्रीगुरुराया!! तुला नमस्कार असो, असाहि एक भवितार्थ होय ] १. त्रिपुरवधाच्या वेळेला शंकरांनीं पुष्कळ खटपट केली असतांना गणपतींचें स्मरण केले, नसल्यामुळें त्यांना यश आले नाहीं. नंतर गणपतीचे स्मरण केले, त्या वेळेस त्रिपुरासुराचा वध झाला व आपण संकटांतून सुटले. या रूपकानें गुरूंची स्तुति करितात. त्रिगुणरूपीं त्रिपुरांनीं वेढिलेला व जीवस्वरूपी किल्ल्यामध्यें कोंडलेला जो आत्मरूपी शंकर त्यानें, हे श्रीगुरुरूपीं तूं जो श्रीगणेश, त्या तुझ्या स्मरणानें आपणांस संकटांपासून सोडविले २. म्हणून श्रीशंकराबरोबर तुमची तुलना केली असतांहि गुरुत्वानें तुमची योग्यता विशेष आहे [ तुमचें पारडें वजनानें खालीं बसतें. ] असें तुम्हीं जड असला तरीपण मायारूप समुद्र जलांतून [ भवसमुद्रांतून ] मुमुक्षूंस तारता म्हणून तारून नेण्याविषयीं नावेप्रमाणें तुम्हीं हलकेच आहां ३. जे तुमच्या ब्रह्मस्वरूपाविषयीं अज्ञानी आहेत, त्यांना तुम्ही वक्रतुंड असल्याचे दिसतां व जे तुमचे यथार्थ स्वरूप जाणतात, त्या ज्ञानवानांना तुम्ही नित्य सरळतोंडी, सन्मुखच आहांत ४. हे गणपतीरूप श्रीगुरुराया, तुमचे डोळे पाहूं गेलें असतां हत्तिप्रमाणें लहान दिसतात, तथापि त्यांच्या उघडझांपीनें आपण जगाची उत्पत्ति [ अविर्भाव ] व नाश [ तिरोभाव ] लीलेनें करितां ५. विहित प्रवृत्तिरूप कानाच्या हालविण्यानें [ संसाररूपी वृत्ति उत्पन्न होऊन गंडस्थळांतून वाहणाऱ्या द्रवरूप ] मदाच्या सुगंधानें युक्त असा वायु सुटून त्यास आकृष्ट होऊन, लुब्ध झालेले जीवरूपी भ्रमर तुमच्या गंडस्थळावर जमून बसल्यानें, जीव भ्रमररूपीं नील कमलांनीं जणुं तुमची पूजाच केली आहे, त्या प्रमाणें तुमचे गंडस्थळ शोभतें ६. नंतर दुसरा निवृत्तिकर्ण हालविण्यानें [ अंतर्मुखवृत्ति उत्पन्न होऊन ] तुमची बांधलेली ती पूजा उधळून विसर्जित होते, त्यावेळेस आपण आपल्या मोकळ्या अंगाच्या लेण्यानेंच, शुद्धस्वरूपानें मिरविले जातां ७. तुमच्या डाव्या मांडीवर बसलेल्या सरस्वतीची [ माया शक्तीची ] नृत्य क्रीडाच हा जगत्‌रूपी आभास उत्पन्न करते व आपण नृत्याच्या मिषानें आपण आपल्या सत्तेनेंच सर्व जगताचा व्यवहार चालवून तांडव कौशल्यच दाखवितां ८. हें असो; हे श्रीगुरुराया! आपण ज्यांचें सोयरे [ संबंधी ] होतां, तो सोयरिकीच्या व्यवहारालाच मुकतो, तो तुमच्या स्वरूपांत मिळतो. त्यास सर्वत्र ब्रह्मभाव प्रतीत होतो. म्हणून त्याचा द्वैतभाव, आपपरभाव नाहींसा होतो ही केवढी विस्मयाची गोष्ट आहे! ९. तुम्ही जगाचे बंधनांचा ठावठिकाणाहि नाहींसा करितां; म्हणून आपण 'जगद्‌बंधु' आहांत [ हेहि उचितच आहे ] असा भाव धरून जे मोठ्या आनंदानें आपल्याला आत्मस्वरूपभावानें शरण येतात १०. त्यांचा द्वैतपणाच्या नात्यानें देहसुद्धां वेगळा शिल्लक उरत नाहीं कारण, देवराया! त्या दुसऱ्याला आपण स्वस्वरूपच करितां, [तसें जो तुला आत्मत्वानें जाणतो] त्याच्या ठिकाणचें द्वैत नष्ट केलें, मग सर्वत्र अद्वैत झाल्यावर दुजाभाव कोठून उरणार? ११. उलट जे तुम्हांला निराळा, पुढे–ज्ञानाचा विषय असें समजून साधनद्वारां तुमची प्राप्ति करून घेण्याकरितां धांवत सुटतात, त्यांना तुमची प्राप्ति न होतां तुम्ही सर्व प्रकारें मागेंच [ वृत्तीच्यामागे–अज्ञात असेंच ] राहतां १२. जे ध्यान करण्याच्या निमित्तानें तुमची मूर्ति मनांत आणूं पाहतात, त्यांना तुम्ही ध्यानांत विषय म्हणून सांपडत नाहीं; इतकेच नव्हे तर त्यांच्या देशांतहि [ध्यानवृत्तींत] तुम्हीं वास करीत नाहीं; परंतु ध्यानासहि जे विसरतात, जे तुमचेविषयीं आपला द्वैतभाव सोडतात, ते मात्र तुम्हांला अति आवडतात १३. जो तुला नित्य स्वतः-सिद्धच [ कर्मानें प्राप्त होण्यासारखा नव्हें असें ] जाणत नाहीं [ उलट शब्दादि, कर्मादि साधनद्वारां तुझी प्राप्ति

नेघसी कानीं ॥ १४ ॥ मौन गा तुझें राशिनांव । आतां स्तोत्रीं कें बांधों हांव । दिसती तेतुली माव । भजों काई ॥ १५ ॥ दैविकें सेवकु हों पाहों । तरी भेदितां द्रोहोचि लाहों । म्हणौनि आतां कांहीं नोहों । तुजलागीं जी ॥ १६ ॥ जैं सर्वथा सर्वेही नोहिजे । तैं अद्वया तूतें लाहिजे । हें जाणें मी वर्म तुझें । आराध्य लिंगा ॥ १७ ॥ तरी नुरोनि वेगळेंपण । रसीं भजिन्नलें लवण । तैसें नमन माझें जाण । बहु काय बोलों ॥ १८ ॥ आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे । तो उचंबळत भरोनि निगे । कां दशीं दीपसंगें । दीपुचि होय ॥१९॥ तैसा तुझिया प्रणितीं । मी पूर्णु जाहलों श्रीनिवृत्ती । आतां आणीन व्यक्तीं । गीतार्थु तो ॥ २० ॥ तरी षोडशाध्यायशेखीं । तिये समाप्तीच्या श्लोकीं । जो ऐसा निर्णयो निष्टंकीं । ठेविला देवें ॥ २१ ॥ जे कृत्याकृत्यव्यवस्था । अनुष्ठावया पार्था । शास्त्रचि एक सर्वथा । प्रमाण तुज ॥ २२ ॥ तेथ अर्जुन मानसें । म्हणे हें ऐसें कैसें । जे शास्त्रेंवीण नसे । सुटिका कर्मा ॥ २३ ॥ तरी तक्षकाची फडे । ठाकोनि कैं तो मणि काढे । कैं नाकींचा केशु जोडे । सिंहाचिये ? ॥ २४ ॥ मग तेणें तो वोंविजे । तरीच लेणें पाविजे । एऱ्हवीं काय असिजे । रिक्तकंठीं ? ॥ २५ ॥ तैसी शास्त्रांची मोकळी । यां कैं कोण पां वेंटाळी । एकवाक्यतेच्या फळीं । पैसिजे कैं ? ॥ २६ ॥ जालयाही एकवाक्यता । कां लाभे वेळु अनुष्ठितां । कैंचा पैसारु जीविता । येतुलालिया ॥ २७ ॥ आणि शास्त्रें अर्थें देशें काळें । या चहूंही जें एकफळे । तो उपावो कें मिळे । आघवयांसी ? ॥ २८ ॥ म्हणौनि शास्त्राचें घडतें । नोहें प्रकारें बहुतें । तरी मूर्खा मुमुक्षां येथें । काय गती पां ? ॥ २९ ॥ हा पुसावया अभिप्रावो । जो अर्जुन करी प्रस्तावो । तो सतराविया ठावो । अध्याया येथ ॥ ३० ॥ तरी सर्वविषयीं वितृष्णु । जो सकळकळीं प्रवीणु । कृष्णाही नवल कृष्णु । अर्जुनत्वें जो ॥ ३१ ॥ शौर्या जोडला आधारु । जो सोमवंशाचा शृंगारु । सुखादि उपकारु । जयाची लीला ॥ ३२ ॥ जो प्रज्ञेचा प्रियोत्तमु । ब्रह्मविद्येचा विश्रामु । सहचरु मनोधर्मु । देवाचा जो ॥ ३३ ॥

अर्जुन उवाच :—

ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयाऽन्विताः । तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥

तो अर्जुन म्हणे गा तमालश्यामा । इंद्रियां फांवलिया ब्रह्मा । तुझा बोलु

करून घेण्याचा प्रयत्न करतो, तुला जाणणें व तसा तुला जाणण्याचा प्रयत्न करणे म्हणजे तुझ्या अद्वैत स्वरूपाच्या–ज्ञानस्वरूपाच्या दृष्टीनें योग्य नाहीं. ] तरीहि तोच सर्वज्ञ म्हणून वावरतो त्या शब्दादि साधनानें तुमची सिद्धि कशी होणार ! कारण जवळ जवळ सर्वज्ञ म्हणून प्रसिद्ध असलेल्या शब्दब्रह्मरूप वेदांनीं केलेले वर्णनहि आपण आपल्या कानांवर घेत नाहीं [ त्यास विषय होत नाहीं तेथें इतरांची काय कथा ! ] १४. तुमचे जन्मराशीवरून काढलेलें 'मौन' हेंच नांव आहे. म्हणून मी आपली स्तुति करण्याची कशाला उत्कट इच्छा करावी ! हें सर्व दृश्य-रूपानें मला भासमान होणारे जगत, हीं सर्व आपली माया आहे, तर मग मी तुमची स्तुति, भजन करावे तरी कसे ! १५. देवा ! मी तुमचा सेवक होऊ पाहीन तर [ तुमच्या अखंडैकरस स्वरूपांत केलेल्या ] सेव्य-सेवक भावामुळें द्वैतरूपी द्रोहच माझ्या पदरांत येईल, म्हणून तुमच्या संबंधानें मी कांहीं एक विशेष होत नाहीं म्हणजे तुमच्यांत व माझ्यांत द्वैतभाव वेगळेपण न ठेवणें हें उत्तम होय व हेच तुमचें खरें पूजन होय १६. जेव्हां मी सर्व प्रकारें देहादि सर्व अनात्म्यांपैकीं कोणीहि नाहीं असें निश्चित व्हावें, तेव्हांच अद्वयस्वरूप अशा तुम्हांला मी प्राप्त होईन तर हें आराध्य दैवता श्रीगुरु-राया ! तुमचे हें वर्म मला माहीत आहेच १७. तर मीठ ज्याप्रमाणें पाण्यापासून वेगळेपणानें न उरून पाण्याला भजते म्ह. त्यांत मिळविलें असतां ऐक्य पावतें, त्याप्रमाणें तुमच्यांत व माझ्यांत द्वैतभाव नाहीं, असें जाणूनहि त्याच बोधानें माझें नमन आहे. मी तुम्हांस नमस्कार करतो, असें समजा; यापेक्षां विशेष काय बोलावें ! १८. आतां हे पहा ! रिकाम्या घागरीनें समुद्रांत प्रवेश केला असतां ती जशीं पाण्यानें उचंबळून, भरून निघते, किंवा वात दिव्याच्या संसर्गानें दीप-स्वरूपच होते, १९. त्याप्रमाणें हें श्रीगुरुराया, निवृत्ति-नाथा ! तुम्हांला नमस्कार केल्यानें मी परिपूर्ण कृतकृत्य झालों. आतां तो गीतेचा अर्थ मी स्पष्ट रूपानें प्रगट करीन २०. [ अध्याय संगति ] तर सोळाव्या अध्यायाच्या अंतीं शेवटच्या श्लोकांत देवांनीं जो असा निश्चय-पूर्वक सिद्धांत प्रस्थापित केला २१. तो हा कीं, पार्था ! चांगल्या अथवा वाईट कृत्याचें आचरण करण्यास तुला एक शास्त्रच सर्वथैव, पूर्णतया प्रमाण मानलें पाहिजे. २२. तें ऐकून अर्जुन मनांत म्हणतो, कीं, "हें असें कसें मानावें ! कोणतेंहि कर्म करण्यास शास्त्रनिर्णया-वांचून मोकळीक-सुटकाच नाहीं, हें देव काय सांगतात ! २३. देवाच्या या बोलण्याचा अर्थ असा कीं, तक्षक नागाच्या जवळ जाऊन त्याच्या फणींत असलेला मणि अगोदर काढावा कसा ? आणि सिंहाच्या नाकांतील केस तरी कसा, कोठें मिळवावा ! २४. मग त्या केसांत तो मणि ओंवला म्हणजेच गळ्यांत भूषण अलंकार घालावें, नाहीतर मोकळ्याच गळ्यानें राहावें कीं काय ! असें झालें २५. त्याप्रमाणें निरनिराळ्या शास्त्रांचे कधीं कोण आकलन करील ! आणि त्यांची एकवाक्यतारूप फल प्राप्त करून त्यांचा उपयोग कोण व केव्हां करून घेईल? २६. बरे ! एकवाक्यता जरी झाली तरी त्याप्रमाणेंच आचरण करण्यास वेळ तरी शिल्लक राहतो कोठे ! म्हणजे इतकें करण्यास तसा आयुष्य-विस्तार तरी कोणास मिळालेला असणार ! २७ आणि समजा शास्त्रज्ञान, अर्थ–द्रव्यादिसामुग्री, योग्य देश व काल या चार साधनांचा एकत्र योग एखाद्यास प्राप्त झाला तरी ते कर्म क्वचितच पार पडणार कारण, सर्वांनाच अशा योगाची प्राप्ति कोठून असणार ? २८. म्हणून शास्त्रानें पुष्कळ प्रकारानें सांगितल्याप्रमाणें सर्व योग जुळून येणें या मृत्युलोकीं सर्वांना बव्हशीं असंभवनीय आहे, असें आहे तर मग मूर्ख–मंद अशा मुमुक्षूंना कोणता तरणोपाय आहे ! २९. हा अभिप्राय पुसण्याकरितां अर्जुनानें जी प्रस्तावना केली तीच या सतराव्या अध्यायाचा मूळ प्रसंग–विषय होय ३०. तर सर्व विषयांविषयीं जो निरीच्छ व सकल कलांमध्यें प्रवीण आणि अर्जुनाच्या रूपानें श्रीकृष्णालाहि आनंद, आश्चर्य देणारा असा जो दुसरा कृष्णच [ अर्जुन ] ३१. जो शौर्यास आधार लाभला आहे, जो सोमवंशाचें भूषण आहे आणि देवादिकांस, दुसऱ्यास सुख देणें हीच तर सर्व ज्याची लीला आहे ३२. जो बुद्धीचा अत्यंत आवडता, आहे ब्रह्मविद्येचें विश्रांतिस्थान आहे आणि जो सदैव श्रीकृष्णाच्या अंतःकरणांत साहचर्यानें असणारा अर्थात मनोधर्म होय ३३

**अन्वयार्थ**—हे कृष्ण–हे कृष्णा !–तु–पण–**ये**–जे–**श्रद्धया अन्विताः**–श्रद्धेनें युक्त होत्साते–**शास्त्रविधि**–शास्त्रोक्त विधीचा–**उत्सृज्य**–त्याग करून **यजन्ते**–देवादिकांची पूजा करितात–**तेषां**–त्यांची–**निष्ठा**–निष्ठा–**का**–कोणती–**सत्त्वं**–सात्त्विक–**आहो**– कीं – **रजः**– राजस [ **उत**–कीं ]–**तमः**–तामस ! १.

तो अर्जुन म्हणतो, "हे तमालपत्राप्रमाणें श्याम-वर्ण असलेल्या श्रीकृष्णा आमच्या सर्व इंद्रियांस प्रत्यक्ष

आम्हां । सोकांक्षु पैं जी ॥ ३४ ॥ जें शास्त्रेंवांचूनि आणिकें । प्राणिया स्वमोक्षु न देखे । ऐसें कां कैंपेखें । बोलिलासी ॥ ३५ ॥ तरी न मिळेचि तो देशु । नन्हेचि काळा अवकाशु । जो करवी शास्त्राभ्यासु । तोही दुरी ॥ ३६ ॥ आणि अभ्यासीं विरजियां । होती जिया सामुग्रिया । त्याही नाहीं आपैतियां । तिये वेळीं ॥ ३७ ॥ उजू नोहेचि प्राचीन । नेदीचि प्रज्ञा संवाहन । ऐसें ठेलें आपादन । शास्त्राचें जया ॥ ३८ ॥ किंबहुना शास्त्रविखीं । एकही न लाहातीचि नेंखी । म्हणोनि उंखिविखी । सांडिली जिहीं ॥ ३९ ॥ परी निर्धारूनि शास्त्रें । अर्थानुष्ठानें पवित्रें । नांदताति परत्रें । साचारें जे ॥ ४० ॥ तयांऐसें आम्हीं होआवें । ऐसी चाँड बांधोनि जीवें । घेती तयांचें मांगावे । आचरावया ॥ ४१ ॥ धेंड्याचिया आंखरां- । तळीं बाळ लिहे दातारा । कां पुंढांसूनि पडिकेंरा । अंक्षमु चाले ॥ ४२ ॥ तैसें सर्वशास्त्र- निपुण । तयाचें जें आचरण । तेंचि कारिती प्रमाण । आपलिये श्रद्धे ॥ ४३ ॥ मग शिवादिकें पूजनें । भूम्यादिकें महादानें । अग्निहोत्रादि यजनें । कारिती जे श्रद्धा ॥ ४४ ॥ तयां सत्त्वरजतमां- । माजीं कोण पुरुषोत्तमा । गति होय ते आम्हां । सांगिजो जी ॥ ४५ ॥ तंव वैकुंठपिठींचें लिंग । जो निगमपद्माचा परागु । जिये जयाचेनि हें जग । अंगच्छाया ॥ ४६ ॥ काळ सावियाचि वाढु । लोकोत्तर प्रौढु । अद्वितीय गूढु । आनंदघनु ॥ ४७ ॥ इयें श्लाघिजती जेणें बिकें । तें जयाचें आंगीं असिकें । तो श्रीकृष्ण स्वमुखें । बोलत असे ॥ ४८ ॥

श्रीभगवानुवाच :—

त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा । सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २ ॥

म्हणे पार्था तुझा अतिसो । हेंही आम्ही जाणतसों । जे शास्त्राभ्यासाचा आडसो । मानितोसि कीं ॥ ४९ ॥ नुसधियाचि श्रद्धा । झोंबों पाहसी परमपदा । तरी तैसें हें प्रबुद्धा । सोहोपें नोहे ॥ ५० ॥ श्रद्धा म्हणितलियासाठीं । पातेजों नये किरीटी । काय द्विजु अंत्यजघृष्टीं । अंत्यजु नोहे ? ॥ ५१ ॥ गंगोदक जरी जालें । तरी मद्यभांडां आलें । तें घेऊं न ये कांहीं केलें । विचारीं पां ॥ ५२ ॥ चंदनु होय शीतळु । परी अग्नीसी पावे मेळु । तैं हातीं धरितां जाळू । न शके काई ? ॥ ५३ ॥ कां किडाचिये आटतिये पुटीं । पडिलें सोळें किरीटी । घेतलें

अनुभवास आलेल्या परब्रह्मा, तुझें बोलणें आम्हांस संशययुक्त असल्याचें दिसतें ३४. कारण, प्राणिमात्राला शास्त्रज्ञानावांचून इतर दुसऱ्या कोणत्याहि उपायानें आपल्या मोक्षाचें आत्मत्वानें दर्शन-ज्ञान होतच नाहीं, असें जें आपण एकपक्षी, पक्षपात धरून बोलला त्याचा हेतु काय? ३५. तर शास्त्राभ्यास करण्यास व त्या शास्त्रानुसार कर्मानुष्ठानादिक करण्यास लागणारा जो योग्य देश तोहि मिळतच नाहीं, तसेंच शास्त्राभ्यासास व कर्मानुष्ठानादिक करण्यास अनुकूल असें लागते तेवढें आयुष्यहि मिळतच नाहीं आणि वेद शास्त्रांचा [ अचूक, समन्वयपूर्वक ] अभ्यास करविणारा जो श्रीगुरु हवा असतो तोहि [ त्याचा लाभ होणे त्यापेक्षांहि ] दूर [ बहु अवघड ] असतो ३६. आणि अभ्यासाला साह्य करणाऱ्या ज्या योग्य व अनुकूल सामुग्री त्याही अभ्यासकांस त्यावेळीं प्राप्त व अनुकूल नसतात ३७. तसेंच पूर्वकर्म अनुकूल नाहींच त्यामुळें बुद्धीहि साह्य देत नाहींच, अशा प्रकारें ज्यास शास्त्रसंपादन खुंटलें व दूरच राहिलें ३८. फार काय सांगावें !! शास्त्रांची एकवाक्यता करण्यास एकहि आधार वा सामर्थ्य मिळत नसल्यामुळें ज्यांनीं [ शास्त्रविषयक ] उहापोह करण्याचें सोडून दिलें आहे ३९. पण शास्त्रांचा अभ्यासपूर्वक निश्चय करून व शास्त्रार्थद्वारां सांगितल्याप्रमाणें यथाविधि पवित्र अनुष्ठान करून, परलोकीं जे खरोखर आनंदानें नांदत आहेत ४०. त्यांच्या सारखेच आपण व्हावें, अशी जीवाशीं इच्छा बाळगून तसें [ शास्त्रसंवादी, फलपर्यवसायी ] आचरण करण्यासाठीं त्यांचे मागावेकित्ते घेतात ४१. प्रभो ! ज्याप्रमाणें वर काढून दिलेल्या धड्यांतील अक्षरांप्रमाणें लहान मूल ते पाहून त्या खालीं हुबेहुब तशीच अक्षरें लिहिते किंवा डोळस मनुष्यास पुढे करून जसा आंधळा मनुष्य त्याच्या धोरणानें वाट चालतो ४२. त्याप्रमाणें जें सर्व शास्त्रांत निपुण असतात त्यांचें जें आचरण असतें तेंच [ आचरण ] जे आपल्या श्रद्धेला प्रमाणभूत करतात. [ त्यावर श्रद्धा ठेवून तसेंच वागतात ] ४३. आणि श्रीशंकर आदिकरून देवांचीं पूजनें, भूमि दानादिकरून महादानें व अग्निहोत्रादि जें यज्ञ तेंहि करणें, हीं कर्में श्रद्धेनें करतात ४४. त्यांना हे पुरुषोत्तमा ! सत्त्व, रज व तम यांपैकीं कोणती गति प्राप्त होते, ते आम्हांला सांगा " ४५. तेव्हां जो वैकुंठपीठीचें आराध्य दैवत आहे व जो वेदरूपी कमलांतील पराग आहे, ज्याच्या आंगच्या छायेनें [ ज्याच्या सत्ता-स्फूर्तीच्या आश्रित असलेल्या मायेनें ] हें सर्व जग जगतें ४६. काळाच्या ठिकाणीं असलेली प्रबलता, [ जगांत प्रतीतीस येणारी ] लोकोत्तरता, प्रौढता, अद्वितीयता, गूढता आणि आनंदघनरूपता ४७. या गुणांच्या थोरपणाचा जो बोलवाला तो ज्याच्या शक्ति-सामर्थ्यामुळें आलेला आहे, तें सामर्थ्य ज्याचे ठिकाणीं सर्वतोपरी आहे, तो भगवान् श्रीकृष्ण आपल्या मुखानें सांगत आहे ४८.

**अन्वयार्थ**--**देहिनां**-देहवान् जीवाची-**सात्त्विकी राजसी च तामसी एव**-सात्त्विकी, राजसी व तामसी-**इति च त्रिविधा श्रद्धा**-अशी त्रिविधा-तीन प्रकारची श्रद्धा-**भवति**-असते-**सा**-ती तिन्ही प्रकारची **श्रद्धा**-**स्वभावजा**-जन्मांतरांतील धर्मादिकांचा जो संस्कार त्या मरणसमयीं अभिव्यक्त झालेला असतो, त्यापासून ती उत्पन्न झालेली असते-**तां**-त्या त्रिविधा **श्रद्धेला**-**शृणु**-तूं ऐक २.

श्री भगवान् म्हणतात:-पार्था ! तुझ्या या बोलण्यावरून एकंदर तुझ्या मनाचा कल काय आहे, हेंहि आम्हीं जाणतों. तूं शास्त्राभ्यासाचीच अडचण मानीत आहेस ना ? ४९. तूं नुसत्या श्रद्धेनेंच [ वाटेल त्या ] परम पदाला [ मोक्षास ] स्वाधीन करून घेऊं पहात आहेस; पण, हे प्रबुद्धा, तूं म्हणतोस तसें व तितकें हें काम सोपें नाहीं ५०. अर्जुना ! श्रद्धा म्हणून म्हटली तरी तेवढ्यावरच, केवळ श्रद्धेवरच सर्व कार्यभाग होईल म्हणून विसंबून राहूं नये, तसा विश्वास ठेवूं नये [ कारण, ती श्रद्धा कोणत्या गुणानें युक्त आहे हें सांगतां येत नाहीं ] हें पहा, अंत्यजाच्या समागमानें ब्राह्मणहि अंत्यज म्हणजे भ्रष्ट होत नाहीं काय ५१. गंगेचें पाणी जरी असले तरी तें जर मद्याच्या भांड्यांत घातलें, तर तें [ अपवित्र होते म्हणून ] कांहीं केल्या घेऊं नये [ कसे घेतां येईल ? ] याचा विचार कर ५२. चंदन हा अंगानें थंड आहे खरा, तरीपण त्याचा अग्नीशीं संबंध झाला असतां, तो हातीं धरला तर जाळूं-भाजूं शकणार नाहीं काय ? ५३. किंवा अर्जुना !

१ संशययुक्त २ कोणाच्याच पक्षानें. ३ गुरु. ४ साहाय्य. ५ स्वाधीन, मिळण्याजोगा. ६ अनुकूल. ७ पूर्व-कर्में, प्रारब्ध. ८ साह्य. ९ संपादन. १० निश्चय. ११ विचार, वाटाघाट. १२ अभ्यास करून. १३ परलोकीं. १४ इच्छा. १५ मार्ग. १६ धड्यांतील. १७ अक्षरांच्या. १८ घालून. १९ डोळस, काठीवाला. २० आंधळा. २१ वेदरूप कमळाचा. २२ गोड.

चोखासाठीं । नागवीना ? ॥ ५४ ॥ तैसें श्रद्धेचें दूळवाडें । अंगें कीर चोखडें । परी प्राणियांच्या पडे । विभागीं जैं ॥ ५५ ॥ ते प्राणिये तंव स्वभावें । अनादिमायाप्रभावें । त्रिगुणाचेचि आघवे । वळिले आहाती ॥ ५६ ॥ तेथही दोन गुण खांचती । मग एक धरी उन्नती । तैं तैसियाचि होती वृत्ती । जीवांचिया ॥ ५७ ॥ वृत्तीऐसें मन धरिती । मनाऐसी क्रिया करिती । केलियाऐसी वेरिती । मरोनि देहें ॥ ५८ ॥ बीज मोडे झाड होये । झाड मोडे बीजीं सामाये । ऐसेनि कल्पकोडी जाये । परी जाति न नशे ॥५९॥ तियापरी यियें अपारें । होत जात जन्मांतरें । परी त्रिगुणत्व न व्यभिचरे । प्राणियांचें ॥ ६० ॥ म्हणौनि प्राणियांच्या पैकीं । पडिली'' श्रद्धा अवलोकीं । ते होय गुणासारिखी । तिहीं ययां ॥ ६१ ॥ विपायें वाढे सत्त्व शुद्ध । तेव्हां ज्ञानासी करी साद । परी एका दोघे वोखेद । येर आहाती ॥ ६२ ॥ सत्त्वाचेनि आंगेंलगें । ते श्रद्धा मोक्षफळा रिगे । तंव रज तम उगे । कां पां राहाती ? ॥ ६३ ॥ मोडोनि सत्वाची त्रांये । रजोगुण आकाशें जाये । तेव्हां तेचि श्रद्धा होये । कर्मकेरसुणी ॥ ६४ ॥ मग तमाची उठी आगी । तेव्हां तेचि श्रद्धा भंगी । हों लागे भोगालागीं । भलतेया ॥ ६५ ॥

सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत । श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥

एवं सत्त्वरजतमा- । वेगळी श्रद्धा सुवर्मा । नाहीं गा जीवग्रामा- । माजीं यया ॥ ६६ ॥ म्हणौनि श्रद्धा स्वाभाविक । असे पैं त्रिगुणात्मक । रजतमसात्त्विक । भेदीं इहीं ॥ ६७ ॥ जैसें जीवनचि उदक । परी विषीं होय मारक । कां मिरेंया- माजीं तीख । उंसीं गोड ॥ ६८ ॥ तैसा बहुवसें तमें । जो सदाचि होये निमे । तेथ श्रद्धा परिणमे । तेंचि होऊनि ॥ ६९ ॥ मग काजळा आणि मसी । न दिसे विवंचनें जैसी । तेवीं श्रद्धा तामसी । सिनी'' नाहीं ॥ ७० ॥ तैसीच राजसीं जीवीं । रजोमय जाणावी । सात्त्विकीं आघवीं । सत्त्वाचीच ॥ ७१ ॥ ऐसेनि हा सकळु । जगडंबरु निखिळु । श्रद्धेचाचि केवळु । वोतला असे ॥७२॥ परी गुणत्रयवशें । त्रिविधपणाचें लांसें । श्रद्धे जें उठिलें असे । तें वोळख तूं ॥ ७३ ॥ तरी जाणिजे झाड फुलें । कां मानस जाणिजे बोलें । भोगें जाणिजे केलें । पूर्वजन्मींचें ॥ ७४ ॥ तैसीं जिहीं चिन्हीं । श्रद्धेचीं रूपें तिन्हीं । देखिजती ते बोनी । अवधारीं पां ॥ ७५ ॥

हिणकस सोनें आटवीत असलेल्या मुशींत उत्तम सोनें पडलें असतां तें हिणकसच होते. आणि मग तें जर उत्तम सोनें आहे म्हणून चांगल्या सोन्याच्या भावानें विकत घेतलें तर त्यापासून नागवणार नाहीं कां ? ५४. त्याप्रमाणें श्रद्धेचें स्वरूप जरी मूळचें शुद्ध आहे खरें; परंतु जेव्हां ती प्राण्यांच्या वांटणीला येते ५५. तेव्हां सर्व प्राणी तर स्वभावतःच अनादि असलेल्या मायेच्या शक्तीनें तीन गुणांचेच बनलेले आहेत ५६. त्यांतहि, कोणतेहि दोन गुण क्षीण होऊन दबतात, तेव्हां तिसरा एक गुण वाढतो त्या वेळेस त्या वाढल्या गुणाच्या अनुरोधानेंच जीवांच्या वृत्ति होतात ५७. ते जीव त्या अंतःकरण वृत्तीच्या अनुरोधानेंच मनांत [ वासनासंकल्प ] धारण करितात, मनाच्या संकल्पाप्रमाणें क्रिया, कर्में करितात, आणि मेल्यावर पुनः आपल्या केलेल्या त्या कर्मांप्रमाणेंच देह धारण करितात ५८. बीज नाहींसें होतें आणि झाड वाढतें, होते व झाड नाहींसें होतें आणि तें त्या बीजांत सामावते. असा हा क्रम कोट्यवधि कल्पाचें कल्प जरी गेलें; तरी मूळ झाडाची जात कांहीं नाहींशीं होत नाहीं ५९. त्याप्रमाणें जीवांची ही अगणित जन्म जन्मांतरें होत–जात असली तरीहि त्या प्राण्यांचें ' त्रिगुणत्व ' हें कांहीं केल्या बदलत नाहीं ६०. म्हणून प्राण्यांच्या वांट्याला जी श्रद्धा आलेली असते, ती या तीन गुणांच्या अनुरोधानें तीन प्रकारची होत असते, असें समज ६१. कदाचित् जेव्हां शुद्ध सत्त्वगुण वाढतो तेव्हां तो ज्ञानाला हांक मारितो [ ज्ञानप्राप्तीची इच्छा होते ]; परंतु त्या एकाला रज व तम हे दोन गुण विरुद्ध आहेत ६२. सत्त्वगुणसंबंधीं, त्याच्या अनुरोधानें जी श्रद्धा असते, ती मोक्षरूप फलापर्यंत जाते; पण त्यावेळीं रज व तम हे दोन गुण स्वस्थ कां बसतील ? ६३. सत्त्वगुणाचा आश्रय वा बलप्रभाव नाहींसा करून ज्यावेळेस रजोगुण आकाशांत जातो म्ह० अतीव वाढतो, त्यावेळेस तीच श्रद्धा कर्मकेरसुणी होतें. [ कर्मरूपी केर सदाच व सरसकट लोटणारी अशीच त्याची मनोवृत्ति होतें ] ६४. मग तमोगुणाची ज्यावेळेस जोरकस आग उठते तेव्हां त्याच श्रद्धेचा भंग होऊन तीच श्रद्धा वाटेल ते निषिद्ध भोग भोगण्यास उद्युक्त व उपयुक्त होऊं लागते ६५.

**अन्वयार्थ**––**हे भारत**–हे अर्जुना !–**सत्त्वानुरूपा**–विशिष्ट संस्कारांनीं युक्त अशा अंतःकरणाच्या अनुरूप–**सर्वस्य**–सर्वांची–प्रत्येक मनुष्याची–**श्रद्धा**–आस्तिक्यबुद्धि–**भवति**––असते––**अयं पुरुषः**––हा संसारी जीव–**श्रद्धामयः**–श्रद्धामय, प्रायः श्रद्धायुक्त असतो. **त्यामुळें**–**यः**–जो–**यच्छ्रद्धः**–ज्या श्रद्धेनें युक्त असतो–**सः एव**–त्या श्रद्धेच्या अनुरूपच–**सः**–तो जीव असतो ३.

याप्रमाणें हे मर्मज्ञ अर्जुना ! या जीवसमुदायांत सत्त्व, रज व तम या तीन गुणांविरहित निराळी अशी श्रद्धा नाहीं ६६. म्हणून सात्त्विक, राजस व तामस या भेदांनीं अशी ही श्रद्धा स्वाभाविकच त्रिगुणात्मक आहे ६७. पाणी हें प्राणिमात्राचें [ जगण्यास ] जीवनच आहे, हें खरें; तरीपण तेंच ज्याप्रमाणें विषवल्लीमध्यें संयुक्त झालें असतां मारक होतें किंवा मिर्यास दिलें असतां तिखट होतें आणि उसाशीं युक्त झालें तर गोड होतें ६८. त्याप्रमाणें तमोगुण अधिक वाढला असतां, जो नेहमींच जन्म पावतो व मरतो, त्या प्राण्याच्या ठिकाणीं श्रद्धा ही ते [ तमोगुणाच्याच अनुरोधानें ] होऊनच परिणामास पावते ६९. मग काजळ आणि मस म्ह० शाई यांमध्यें [ रंगात ] जसा फरक दिसत नाहीं, तशी ही तामसी श्रद्धा [ त्या मनुष्याहून, तमोगुणाहून ] निराळी नाहीं ७०. त्याचप्रमाणें राजस प्राण्यांच्या अंतःकरणांत असलेली श्रद्धा ही रजोगुणमय होऊनच असते असें जाणावें आणि सत्त्वगुणसंपन्नांच्या अंतःकरणांत असणारी ती [ श्रद्धा ] सगळी सत्त्वगुणमयच असते, असें समज ७१. याप्रमाणें हें सर्व जग खरोखर केवळ श्रद्धेचेंच पूर्णतया ओतलेलें आहे ७२. परंतु [ सर्व जग–प्राणि ] त्रिगुणांच्या आधीन असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं असलेल्या श्रद्धेमध्येंहि जें तीन प्रकारचें चिन्ह उत्पन्न झाले आहे तें तूं ओळख ७३. तर ज्याप्रमाणें झाड हे फुलांवरून ओळखावें किंवा बोलावरून जसें मन जाणावें किंवा प्रस्तुत सुखदुःखाच्या भोगांवरून पूर्वजन्मींच्या केलेल्या कर्मांस [ अनुमानानें ] ओळखावें ७४. त्याप्रमाणें ज्या ज्या चिन्हांवरून श्रद्धेची तिन्हीं रूपें कशीं ओळखली जातात त्यांचा प्रकार सांगतों ऐक ७५.

१. चांगलें म्हणून. २ बुडविणार नाहीं काय ? ३ समूह, स्वरूप. ४ सुंदर. ५ दबती. ६ धारण करितात. ७ ही. ८ फेरबदल पावत नाहींत. ९ मध्यें १० प्राप्त झालेली. ११ कदाचित्. १२ मारक औषध, वैरी. १३ अनुरोधानें. १४ आश्रय, मर्यादा. १५ कर्मे करणारी. १६ सुज्ञा. १७ जीवसमूहांत. १८ मिरच्यांत १९ जन्मतो व मरतो. २० भेद. २१ वेगळी. २२ सर्व जग. २३ चिन्हातें. २४ ऐक.

यजन्ते सात्त्विका देवान् यक्षरक्षांसि राजसाः । प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥ ४ ॥

तरी सात्त्विक श्रद्धा । जयांचा होय बांधा । तयां बहुतकरूनि मेधा । स्वर्गीं आथी ॥ ७६ ॥ ते विद्याजांत पढती । यज्ञक्रिये निवडती । किंबहुना पडती । देवलोकीं ॥ ७७ ॥ आणि श्रद्धा राजसा । घडले जे वीरेशा । ते भजती राक्षसां । खेचरां हन ॥ ७८ ॥ श्रद्धा जे कां तामसी । ते मी सांगेन तुजपाशीं । जे कां केवळ पापराशी । अतिकर्कशी निर्दयत्वें ॥ ७९ ॥ जीववधें साधूनि बळी । भूतप्रेतकुळें मैळीं । स्मशानीं संध्याकाळीं । पूजिती जे ॥ ८० ॥ ते तमोगुणाचें सार । काढूनि निर्मिले नर । जाण तामसियेचें घर । श्रद्धेचें तें ॥ ८१ ॥ ऐसीं इहीं तिहीं लिंगीं । त्रिविध श्रद्धा जगीं । पैं हें ययालागीं । सांगतु असें ॥ ८२ ॥ जे हे सात्त्विक श्रद्धा । जतन करावी प्रबुद्धा । येरी दोनी विरुद्धा । सांडाविया ॥ ८३ ॥ हे सात्त्विकमति जया । निर्वाहेती होय धनंजया । बांगूल नोहे तया । कैवल्य तें ॥ ८४ ॥ तो न पढो कां ब्रह्मसूत्र । नालोढो सर्व शास्त्र । सिद्धांत न होत स्वतंत्र । तयाच्या हातीं ॥ ८५ ॥ परी श्रुतिस्मृतींचे अर्थ । जे आपण होऊनि मूर्त । अनुष्ठानें जगा देत । वडील जे हे ॥ ८६ ॥ तयांचीं आचरतीं पाउलें । पाऊनि सात्त्विकी श्रद्धा चाले । तो तेंचि फळ ठेविलें । ऐसें लाहे ॥ ८७ ॥ पैं एक दीपु लावी सायासें । आणिक तेथें लाऊं बैसें । तरी तो काय प्रकाशें । वंचिजे गा ? ॥ ८८ ॥ कां येकें मोल अपार । वेंचोनि केलें धवळार । तो सुरवाडु वस्तीकर । न भोगी काई ? ॥ ८९ ॥ हें असो जो तळें करी । तें तयाचीच तृषा हरी । कीं सुआरासीचि अन्न घरीं । येरां नोहे ? ॥ ९० ॥ बहुत काय बोलों पैं गा । येका गौतमासीचि गंगा । येरां समस्तां काय जगां । वोहोळ जाली ? ॥ ९१ ॥ म्हणौनि आपुलियापरी । शास्त्र अनुष्ठिती कुसरी । जाणे तयातें श्रद्धाळु जो वरी । तो मूर्खुही तरे ॥ ९२ ॥

अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः । दम्भाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥

ना शास्त्राचेनि कीर नांवें । खाकरोंही नेणती जीवें । परी शास्त्रज्ञांही शिवें । टेंको नेदिती ॥ ९३ ॥ वडिलांचिया क्रिया । देखोनि वाती वांकुलिया । पंडितां डाकुलिया । वाजविती ॥ ९४ ॥ आपुलेनीचि आटोपें ।

**अन्वयार्थ—सात्त्विकाः**-सत्त्वनिष्ठ पुरुष-**देवान्**-देवांस-**यजन्ते**-पूजतात-**राजसाः**-राजस लोक-**यक्ष रक्षांसि**-यक्ष व राक्षस यांस पूजतात-**अन्ये तामसाः जनाः**-दुसरे तामस जन-**प्रेतान् च भूतगणान्**-प्रेतांना व भूतगणांना-**यजन्ते**-पूजतात ४.

तर ज्याचें अंतःकरण, सात्त्विक श्रद्धेनें बनलेलें आहे. त्याची बुद्धि बहुत करून स्वर्ग प्राप्तीविषयींच होत असते ७६. ते सर्व विद्यांचे अध्ययन करतात, कोणते यज्ञ करणें योग्य आहे, याचे निर्णयांत व यज्ञक्रियेंत ते निपुण असतात; फार काय सांगावें ! ! ते देव लोकांस पावतात ७७. आणि हे वीरशिरोमणे, अर्जुना ! ज्याचें अंतःकरण राजस-रजोगुणात्मक श्रद्धेनें बनलेलें आहे, ते राक्षस व पिशाच्च यांना भजतात ७८. ज्याचें अंतःकरण तमोगुणात्मक श्रद्धेचें बनलेलें आहे, याविषयीं मी तुला सांगतो कीं, ते केवळ पापराशी असतात व अतिशय कठोर व दयाहीन असतात ७९. ते जीवांचा वधानें बळी सिद्ध करून देतात आणि भूतप्रेत वगैरे दैवत समुदायांची अमंगळ अशा स्मशानांत संध्याकाळीं पूजा करितात ८०. तें तमोगुणाचें सार-अर्क काढून निर्माण केलेलें पुरुष म्हणजे तामस श्रद्धेचें आगर, वसतिस्थानच होत, असें समज ८१. याप्रमाणें जगांत सात्त्विक, राजस व तामस अशी तीन लक्षणांनीं तीन प्रकारची श्रद्धा आहे; परंतु मी हें एवढ्याकरितां सांगत आहे ८२. कीं, या तिन्हींपैकीं जी हि सात्त्विक श्रद्धा आहे तिचाच तूं स्वीकार करावा, आणि हे बुद्धिमंता दुसऱ्या अहितकर विरुद्ध अशा ज्या दोन्ही [ राजस व तामस ] श्रद्धा आहेत त्यांचा त्याग करावा ८३. धनंजया ! या सात्त्विक बुद्धीची ज्याचेकडून जोपासना केली जाते त्यांना मोक्षप्राप्ति होणें हा कांहीं मोठासा बागुलबोवा नाहीं, म्हणजे कठीण नाहीं ८४. तो मनुष्य वेद, श्रीव्यासांचीं ब्रह्मसूत्रें न शिकेना कां ! ते सर्व शास्त्राध्ययन, परिशिलन न करीना कां ! अथवा शास्त्रांची एकवाक्यता करून कोणतेहि स्वतंत्र सिद्धांत त्यांस हस्तगत झालेलें नसेनात कां ! ८५. परंतु जे थोर पुरुष श्रुति स्मृतींचें ' अर्थ ' आपणच स्वतः मूर्तिमन्त होऊन [ श्रेष्ठ ब्रह्मविद् वरिष्ठ झालेलें असतात, व आपल्या वेदानुसारी ] आचरणानें तें सिद्धांत - अर्थ जनास देतात ८६. त्यांचें आचरणरूपी पाऊलाचा कित्ता पाहून, वळवून जो कोणी सात्त्विक श्रद्धेनें चालतो, त्याला त्यांना मिळणारें जें फळ, अगदीं तेंच फळ ठेवल्यासारखें प्राप्त होतें ८७. हें पहा ! एखादा मनुष्य मोठ्या प्रयासानें पहिल्यानदां दिवा लावतो, आणि त्या दिव्यावरून जर दुसरा कोणी आपला दिवा लावूं लागला तर आयता दिवा लावणारा मनुष्य पहिल्या दिव्याच्या प्रकाशाकडून फसविला जाईल काय ? [ त्याच्या घरीं तो दिवा कमी प्रकाश पाडणार नाहीं ] ८८. किंवा एखाद्यानें अपार द्रव्य खर्च करून घर बांधलें असतां, त्या घरांत कांहीं वेळ दुसरा वाटसरू मनुष्य त्या घराचे सुख भोगीत नाहीं काय ? ८९. हें असो; जो तळें बांधतो, त्याचीच कां तहान ते तळें आपल्यामधील पाण्यानें भागवितें अथवा घरांमध्यें स्वयंपाक करणाऱ्याचीच तेवढी तें अन्न तृप्ति करीत असते; आणि त्या अन्नानें इतरांची तृप्ति होत नाहीं कीं काय ? ९०. उगीच पुष्कळ बोलून काय करावयाचें आहे ! अरे ! ! गौतम ऋषींनीं दीर्घ प्रयत्नानें आणलेली गंगा ही एक त्यासच गंगा [ पवित्र करणारी ] आहे आणि जगांतील इतर सर्व लोकांविषयीं ती ओढा झाली आहे कीं काय ?-९१. म्हणून आपल्या अधिकारानुरूप व आपल्यापेक्षां जें दक्षतेनें शास्त्राचें अनुष्ठान करण्याची कुसरी जाणतात तें चातुर्य जाणून जो श्रद्धाळु मनुष्य त्या वडील पुरुषाचें आचरणाचा कित्ता गिरवितो तो मूर्ख असला तरी तरतो ! ९२.

**अन्वयार्थ—ये**-जे-**जनाः**--लोक-**दंभाहंकार संयुक्ताः**-दंभ व अहंकार यांनीं संयुक्त असलेलें-**कामरागबलान्विताः**-काम राग-आसक्ति व तत्प्रयुक्त-बल यांनीं युक्त असलेलें-**अशास्त्रविहितं**-शास्त्रानें ज्याचें विधान केलेलें नाहीं असें-**घोरं**-प्राण्यांना पीडा देणारें-**तपः**-तप-**तप्यन्ते**-तप करतात ५.

उलट गवयाच्या गाण्याच्या पूर्वीं जसें त्याचें खांकरणें गाण्याचा आरंभ सुचवितें, त्याप्रमाणें शास्त्रांच्या नांवानें खांकरणें म्ह. जे खरोखर मनापासून आरंभ करण्याचें सुद्धां जाणत नाहींत, म्हणजे ज्याना शास्त्र काय याची कल्पना सुद्धां नाहीं; हें असो, परंतु कोणी शास्त्रज्ञ आपल्या गांवीं येऊं लागला, तर त्याला आपल्या गांवाच्या शिवेलाहि शिवूं देत नाहींत, म्हणजे गांवांत येऊं देत नाहींत ९३. तसेंच वडिलांचें स्नानसंध्यादि क्रियात्मक आचरण पाहून जे त्यास वेडावून दाखवितात व पंडिताचा संवाद कानावर येईल म्हणून [ तिरस्कारदर्शक ] चुटक्या वाजवितात [ व त्यांचे शब्द देखील कानीं पडूं देत नाहींत ] ९४. उलट आपल्या

१ घटना, ठेवण. २ बुद्धि. ३ सकळ विद्या. ४ पिशाच्चांना. ५ अमंगळ. ६ संरक्षक. ७ बाऊ. ८ वेद. ९ चाखों, पढो.

धनिलाचेनि दर्पें । साचचि पाखंडाचीं तपें । आदरिती ॥ ९५ ॥ आपुलिया पुढिलांचिया । आंगीं घालूनि कातिया । रक्तमांसा प्रणीतेंया । भर भरु ॥ ९६ ॥ रिचविती जळतकुंडीं । लाविती चेव्यांच्या तोंडीं । नवसियां देती उंडी । बाळकांची ॥ ९७ ॥ आग्रहाचिया उेजरिया । क्षुद्र देवतां वरियां । अन्नत्यागें सांतरिया । ठाकती एक ॥ ९८ ॥ अगा आत्मपरपीडा । बीज तमक्षेत्रीं सुहांडा । पेरिती मग पुढां । तेंचि पिके ॥ ९९ ॥ बाहु नाहीं आपुलिया । आणि नावेतेंही धनंजया । न धरी होय तया । समुद्रीं जैसें ॥१००॥ कां वैद्यातें करी संळा । रेंसु सांडी पाय खोळां । तो रोगिया जेवीं जिव्हाळा । सवता होय ॥ १ ॥ नाना पडिकराचेनि संळें । काढी आपुलेचि डोळे । तँ वानेवसां आंधळें । जैसें ठाके ॥ २ ॥ तैसं तयां आसुरां होये । निंदूनि शास्त्रांची सोये । सैंघं धांवताती मोहें । आडवीं जे कां ॥ ३ ॥ कामु करवी तें करिती । क्रोधु मारवी ते मारिती । किंबहुना मातें पुरिती । दुःखाचा गुंडां ॥ ४ ॥

कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः । मां चैवान्तःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥

आपुलां परांवां देहीं । दुःख देती जें जें कांहीं । मज आत्मया तेतुंलाही । होय शीणु ॥ ५ ॥ पैं वांचेचेनिहि पालेंवें । पापियां तयां नातेंळावें । परी पडिलें सांगावें । त्यजावया ॥ ६ ॥ प्रेत बाहिरें घालिजे । कां अंत्यजु संभाषणीं त्यजिजे । हें असो हातें क्षाळिजे । कश्मलातें ॥ ७ ॥ तेथ शुद्धीचिया आशा । तो लेपुं न मनेंवे जैसा । तयांतें सांडावया तैसा । अनुवादु हा ॥८॥ तरी अर्जुना तूं तयांतें । देखसी तैं स्मर हो मातें । जे आंन प्रायश्चित्त येथें । मानेल ना ॥ ९ ॥ म्हणौनि श्रद्धा जे सात्त्विकी । पुढती तेचि पैं येकी । जतन करावी निकी । सर्वांपरी ॥ ११० ॥ तरी धरावा तैसा संगु । जेणें पोखे सात्त्विक लागु । सत्त्ववृद्धीचा भागु । आहारु घेपें ॥ ११ ॥ एऱ्हवीं तरी पाहीं । स्वभाववृद्धीच्या ठाईं । आहारावांचूनि नाहीं । बळी हेतु ॥ १२ ॥ प्रत्यक्ष पाहें पां वीरा । जो सावध घे मदिरा । तो होऊनि ठाके माजिरां । तियेचि क्षणीं ॥ १३ ॥ कां जो सावियां अन्नरसु सेवी । तो व्यापिजे वातश्लेष्मस्वभावीं । काय ज्वरु जालिया निववी । पयादिक ? ॥ १४ ॥ नातरी अमृत जयापरी । घेतलिया मरण वारी । कां आपुलियाऐसें करी । जैसें

शहाणपणाच्या घमेंडीनें व द्रव्याच्या मदानें आपल्याच गर्वात असतात, ते खरोखर पाखांड्याच्या तपाचरणाचा अंगीकार करतात ९५. आपल्या व पुढें आलेल्या दुसऱ्या मनुष्यांच्या अंगावर शस्त्रांचे प्रहार करून त्यांच्या रक्तमांसांनीं यज्ञपात्रें भरभरून ९६. तीं प्रदीप्त अग्निकुंडांत ओततात. चेड्यांना-क्षुद्र देवतांना आहुति देतात, नवस केलेल्या देवदेवतांना बालकांचे बळी देतात ९७. क्षुद्र दैवतांपासून वरप्राप्ति करून घेण्याकरितां त्यास श्रेष्ठ समजून आग्रहाच्या उत्कर्षानें, आढ्यतेनें सात सात दिवस स्वतः अन्न सेवनाचा त्याग करून अनुष्ठानें करतात ९८. हे सूज्ञा! अशा प्रकारें ते आपल्यास व दुसऱ्यास पीडा करणेंरूपी बीज तमोगुणी [ अंतःकरणरूपीं ] जमिनींत पेरतात, आणि त्यापासून पुढें तेथें तमाचेंच पीक पिकतें ९९. अर्जुना! ज्या मनुष्यास स्वतः बाहुबलानें पोहतां येत नाहीं, आणि जो नावेचाहि आश्रय करीत नाहीं तो समुद्रांत गेला असतां त्याची जी [ दयनीय ] स्थिति होते १००. किंवा जो रोगी वैद्याचा द्वेष करतो व जो लाथेनें काढा लवंडून देतो तो रोगी जसा जीवापासून वेगळा होतो, म्हणजे मरतो १. अथवा जो डोळस मनुष्याचा कंटाळा करून त्याच्या द्वेषानें आणि [ साधारण असलेले ] आपलेंच डोळे काढून टाकतो, त्या एकाएकीं झालेल्या आंधळ्या मनुष्यास जसे त्याच्या माजघरांतच पडून राहावे लागते २. तशी त्या आसुरांची स्थिति होते! कारण, शास्त्रांत सांगितलेल्या मार्गाची ते निंदा करतात, व त्यामुळें ते मोहरूपी अरण्यांत सैरावैरा [ अविवेकानें ] धांवतात ३. कामाच्या आधीन होऊन तो काम जे करवील ते त्याच्या अनुरोधानेंच आचरण करतात; क्रोधाच्या आधीन होऊन तो ज्याचा वध करण्यास लावील त्याचा वध करतात; बहुत काय सांगावें! ! मला दुःखात्मक दगडांत पुरतात! ४.

**अन्वयार्थ**--**अचेतसः**--अविवेकी--**शरिरस्थं** शरीरांतील--**भूतग्रामम्** - इंद्रियसमुदायांत--**च**--आणि --**अन्तः**-**शरिरस्थं माम् एव**--शरीरांत असलेल्या मलाच--**कर्षयन्तः**--कृश करणारे--**तान् आसुरनिश्चयान्**--त्यांना आसुर निश्चयाचें--**विद्धि**--जाण ६.

ते आपल्या व दुसऱ्यांच्या शरीरास जें जें कांहीं दुःख देतात तें तें सर्व दुःख सर्वांच्या अंतर्यामीं असणाऱ्या मज आत्म्यालाच होत असतें ५. हें पहा! अशा पाप्यांना वाचेच्या पदरानेंहि स्पर्श करूं नये. [ त्यांचें नामग्रहणहि करूं नये. ] पण त्यांचा त्याग करण्याकरितां त्यांचीं लक्षणें सांगणें भाग पडलें ६. प्रेतास स्पर्श करूं नये; पण प्रेत बाहेर काढण्याकरितां त्यास स्पर्श करावा लागतो किंवा अंत्यजाबरोबर संभाषण करूं नये [ तरीपण 'दूर हो म्हणून' दोन शब्द त्याला बोलावे लागतात ] फार काय! ! विष्ठेला हात लावूं नये, पण शौचाचे वेळीं विष्ठाहि हातानेंच धुवून काढावी लागते ७. या ठिकाणीं फक्त शुद्धीच्या इच्छेच्या निमित्तानेंच त्यांना स्पर्श केल्यामुळें तो स्पर्श दोषकारक मानतां येत नाहीं, तसा त्या पापी आसुरी लोकांचा त्याग करण्याकरितां त्यांचीं हीं लक्षणें सांगितलीं खरी ८. तरीपण अर्जुना! त्या आसुरी लोकांना जेव्हां पाहशील तेव्हां तूं माझेंच स्मरण कर हो! कारण, त्या पापक्षालनार्थ याशिवाय दुसरें प्रायश्चित्त कांहीं उपयोगी पडणार नाहीं ९. म्हणून जी सात्त्विक श्रद्धा आहे, तीच एकमेव वरचेवर सर्व प्रकारें चांगलीच जतन करावी ११०. दुसरें असें कीं, ज्या योगानें सात्त्विक संबंधाचें, श्रद्धावृत्तीचें पोषण व वाढ होईल तशीच संगति धरावी आणि ज्या अन्नाच्या सेवनानें सत्त्वाचाच उत्कर्ष होईल तोच आहार सेवन करावा ११. वास्तविक असें पहा कीं, स्वभाववृद्धि होण्यास [ स्वभाव बनण्यास ] आहारावांचून दुसरें कोणतेंहि प्रबल साधन नाहीं १२. वीरा अर्जुना! तूं प्रत्यक्ष असें पहा कीं, जो धडधडीत सावध, शुद्धीवर असलेला मनुष्य जेव्हां मद्याचें सेवन करितो, तेव्हां तो तत्क्षणींच उन्मत्त होऊन राहतो १३. किंवा, जो मनुष्य नेहमीं आपल्या मनास हवे ते अन्न खातो तो त्या अन्नाच्या स्वभावानुसार वात व कफ यांनीं व्यापिला जातो. किंवा एखाद्यास ज्वर आला असतां ते दुधादिक त्यास ताप कमी करून शांत करतील काय? १४. अथवा ज्याप्रमाणें अमृताचें सेवन केलें असतां तें मरणास टाळतें किंवा विषाचें सेवन केलें असतां

---

१ कोयता. २ प्रणीता, यज्ञपात्र. ३ ओततात, घालितात. ४ चेटुकाच्या. ५ बळी. ६ आढ्यतेनें, उत्कर्षानें. ७ इतर लहान देवतांपासून वरप्राप्ती करितां. ८ सात दिवसापर्यंत. ९ सूज्ञा. १० द्वेषाला. ११ काढा, औषध. १२ लाथेनें. १३ डोळसाच्या. १४ द्वेषानें. १५ माजघरांत. १६ मार्ग.

१७ अनिवार. १८ अरण्यांत १९ दगडांत. २० परक्याच्या. २१ तेव्हांहि. २२ वाचेच्या पदरानेंहि. २३ शिवूं नये. २४ चिखल. २५ दोष. २६ मानीत नाहीं २७ भाषण. २८ अन्य. २९ चालणार नाहीं. ३० वाढ. ३१ त्यावा. ३२ मार्ग. ३३ उन्मत्त. ३४ सावा नामक धान्याचा.

विष ॥ १५ ॥ तेवीं जैसा घेपे आहारु । धातु तैसाचि होय आकारु । आणि धातुऐसा अंतरुं । भावो पोखे ॥ १६ ॥ जैसें भांडियाचेनि तापें । आंतुलें उदकही तापे । तैसी धातुवशें आटोपे । चित्तवृत्ती ॥ १७ ॥ म्हणौनि सात्त्विकु रसु सेविजे । तैं सत्त्वाची वाढी पाविजे । राजसा तामसा होईजे । येरी रसीं ॥ १८ ॥ तरी सात्त्विकु कोण आहारु । राजसा तामसा कायी आकारु । हें सांगों करीं आदरु । आकर्णनीं ॥ १९ ॥

आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः । यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥

आणि एकेसरें आहारा । कैसेनि तिनी मोहरां । जालिया तेही वीरा । रोकडें दाऊं ॥ १२० ॥ तरी जेवणाराचिया रुची । निष्पत्ति कीं बोनियांची । आणि जेवितां तंव गुणांची । दासी येथ ॥ २१ ॥ जो जीव कर्ता भोक्ता । तो गुणास्तव स्वभावता । पावोनियां त्रिविधता । चेष्टे त्रिधा ॥ २२ ॥ म्हणौनि त्रिविधु आहारु । यज्ञुही त्रिप्रकारु । तप दान हन व्यापारु । त्रिविधचि ते ॥ २३ ॥ पैं आहार लक्षण पहिलें । सांगों जें म्हणितलें । तें आईक गा भलें । रूप करूं ॥२४॥

आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥ ८ ॥

तरी सत्त्वगुणाकडे । जैं दैवें भोक्तां पडे । तैं मधुरीं रसीं वाढे । मेचुं तया ॥ २५ ॥ आंगेंचि द्रंव्यें सुरसें । जे आंगेंचि पदार्थ गोडसे । आंगेंचि स्नेहें बहुवसें । सुपक्कें जियें ॥ २६ ॥ आकारें नव्हती डेंगळें । स्पर्शें अति मवाळें । जिभेलागीं स्नेहाळें । स्वादें जियें ॥ २७ ॥ रसें गांढीं वरी ढिलीं । द्रवभांवीं आथिलीं । ठायें ठेंवो सांडिलीं । अग्नितापें ॥ २८ ॥ आंगें सानें परिणामें थोरु । जैसें गुरु-मुखींचें अक्षरु । तैशी अल्पीं जिहीं अपारु । तृप्ति राहे ॥ २९ ॥ आणि मुखीं जैसीं गोडें । तैसीचिहि ते आंतुलेकडे । तिये अन्नीं प्रीति वाढे । सात्त्विकांसी ॥ १३० ॥ एवं गुणलक्षण । सात्त्विक भोज्य जाण । आयुष्याचें त्राणें । नीचें नवें हें ॥ ३१ ॥ येणें सात्त्विक रसें । जंव देहीं मेहो वरिषे । तंव आयुष्यनदी उसेंसे । दिहाचि दिहा ॥ ३२ ॥ सत्त्वाचिये कीर पाळेंती । कारण हेंचि सुमती । दिवसाचिये उन्नती । भानु जैसा ॥ ३३ ॥ आणि शरीरा हन मानसा । बळाचा पैं कुवासा । हा आहारु तरी दशा । कैंची रोगां ॥ ३४ ॥ हा सात्त्विकु

ते आपल्यासारखे करते [ मारते-मृत्यु प्राप्त होतो ] १५. त्याप्रमाणें जसा अन्न-आहार भक्षण करावा तसाच आपल्या शरीरांतील रक्त मांसादि धातूंचा आकार बनतो आणि त्या धातूंप्रमाणें अंतर्भाव [ अंतःकरणाचा स्वभावहि ] अधिकाधिक पोसला जातो १६. जसें भांडे तापल्यामुळें आंतले पाणीहि तापतें, तशी धातूच्या अनुरोधानें चित्तवृत्ति होत असते १७. म्हणून सात्विक अन्नरसाचें सेवन केले असतां सत्त्वाची व सात्विक भावाची वाढ होत असते आणि इतर रसांमुळें राजस व तामस भावांची उत्पत्ति व वाढ होत असतें १८. तेव्हां सात्त्विक आहार कोणता आणि राजस व तामस या आहाराचें काय स्वरूप आहे, हें मी सांगतों, तर त्याचें आदरानें श्रवण कर १९.

**अन्वयार्थ**--तु-आणि तसाच-**सर्वस्य**-सर्वांचा-**आहारः अपि**-आहाराहि-**त्रिविधः**-तीन प्रकारचा-**प्रियः**-प्रिय-**भवति**-होतो-**यज्ञः**-यज्ञ-**तपः**--तपश्चर्या-**तथा**-त्याचप्रमाणें-**दानं**-दान, त्रिविध असतें-**तेषां**-त्यांचा-**इमं भेदं**-हा भेद-**शृणु**-ऐक ७.

आणि सरसकट अन्नाचे एकदम तीन प्रकार कसे झाले तेहि अर्जुना ! आतां स्पष्ट सांगतों १२०. हें बघ ! तरी जेवणाराच्या रुचीप्रमाणें अन्न तयार करावें लागतें आणि या विश्वांत जेवणार, तर त्रिगुणांचा दास झालेला आहे ! २१. कारण, जो जीव कर्ता व भोक्ता आहे तो स्वभावतःच तीन गुणांच्या अनुरोधानें तीन प्रकारचा होऊन [ चित्तवृत्ति धारण करून ] तीन प्रकारची कर्मे करितो २२. म्हणून आहार तीन प्रकारचा आहे, यज्ञहि तीन प्रकारचा आहे, तप व दानादि हीं तीन प्रकारची आहेत; आणि व्यापाराहि तीन प्रकारचे आहेत २३. परंतु प्रथमतः तुला जें आहाराचें लक्षण सांगतो म्हणून म्हटलें तें चांगलें स्पष्ट करून सांगतों ऐक २४.

**अन्वयार्थ**-**आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः**-आयुष्य, मानस बल, शरीरबल, आरोग्य, सुख व प्रीति यांना वाढविणारे-**रस्याः**-रसयुक्त-**स्निग्धाः**-स्नेहयुक्त-**स्थिराः**-देहांत परिणामरूपानें चिरकाल राहणारे-**हृद्याः**-हृदयाला प्रिय वाटणारें असें-**आहाराः**-आहार-**सात्त्विक प्रियाः**-सात्त्विक लोकांना प्रिय असतात ८.

तर जेव्हां दैवयोगानें भोक्ता जो जीव तो सत्त्वगुणाच्या उत्कर्षांत असतो, तेव्हां मधुर अन्न खाण्याविषयीं त्याला विशेष आवड वाढलेली असते २५. जे पदार्थ स्वतःच उत्तम मधुर रसानें युक्त असतात, जें स्वभावतः गोड असतात, जे स्वतः अति स्निग्ध व चांगले परिपक्व झालेले असतात; २६. जे आकारानें फार मोठे वा बेढब नसतात, स्पर्श पाहतां हातास अतिशय मऊ लागतात आणि जिभेवर ठेविलें असतां लवकर विरघळणारे रुचकर, व स्वादिष्ट असतात २७. जे रसानें पूर्ण भरलेले असून रस निघण्यासाहि बाहेरून कठीण नसतात पाणीदार जसून विस्तवाच्या उष्णतापूर्ण आचीनें सुटलेली म्ह. जागजागी काळी झालेली नसतात २८. श्रीगुरूंच्या मुखांतील [ महावाक्यांतील ] अक्षरें जरी दिसण्यांत थोडी असली, तरी त्याचा परिणाम जसा मोठा, फार चांगला होतो, त्याप्रमाणें जे पदार्थ दिसण्यांत थोडे असतात; पण ते खाल्ले असतांहि त्यापासून अपार तृप्ति होते २९. आणि जे खातेवेळेस तोंडास गोड लागतात तसेंच ते परिणामींहि गोड-हितकर असतात अशा अन्नाविषयीं सात्त्विकाची विशेष प्रीति वाढत असते १३०. याप्रमाणें सात्त्विक मनुष्याला आवडणारा सात्त्विक आहार उपर्युक्त गुण असलेल्या लक्षणांचा असतो. अशा पदार्थांच्या सेवनापासून आयुष्याचे बल नित्य नवे वाढतें ३१. अशा सात्त्विक रस-आहाररूपी मेघांची जों जों देहावर वृष्टि होते, तों तों आयुष्यरूप नदी दिवसानुदिवस अधिकच वाढत जाते ३२. हे सुबुद्धिमंता ! ज्याप्रमाणें दिवसाची उन्नति होण्यास सूर्य हा कारण आहे, त्याप्रमाणें सत्त्वगुणांचें रक्षण करण्यास हाच आहार योग्य कारण-साधन आहे ३३. आणि शरीरास व मनास सामर्थ्य पुरविणारा, त्याची वाढ करणारा असा हाच आहार आहे व तसा आहार असेल तर मग त्या ठिकाणीं रोगाचा शिरकाव कोठून होणार ! ३४. हा सात्त्विक अन्न-आहार जेव्हां सेवन केला जातो

१ घ्यावा. २ अतर्गत, अंतःकरणांतील. ३ उत्पन्न होतो. ४ श्रवणीं. ५ एकदम. ६ तीन प्रकार झाले. ७ प्रकार. ८ प्रत्यक्ष, स्पष्ट. ९ अन्नाची. १० बागे. ११ स्पष्ट करूं. १२ जीव. १३ आवड, इच्छा. १४ स्वतः. १५ पदार्थ. १६ स्वादिष्ट. १७ मोठीं. १८ मऊ, हळुवार. १९ विरघळणारे. २० साधन, भरपूर. २१ मऊ. २२ पाणीदार. २३ कांहीं ठिकाणीं विस्तवाच्या आचीनें द्रव्यलाभ गेला आहे अशी. २४ गुणानें. २५ बळ. २६ नित्य. २७ मेघ वर्षे. २८ दिवसेंदिवस भरून येतें. २९ रक्षणार्थ. ३० आहार. ३१ आश्रय.

होय भोग्यु। तेंचि भोगावया आरोग्यु। शरीरासी भाग्यु। उदयलें जाणो ॥ ३५ ॥ आणि सुखाचें घेणें देणें। निकें उवांया ये येणें। हें असो वाढे सांजणें। आनंदेंसीं ॥ ३६ ॥ ऐसा सात्त्विकु आहारु। परिणमला थोरु। करी हा उपकारु। सबाह्यासी ॥ ३७ ॥ आतां राजसासि प्रीती। जिहीं रसीं आथी। करूं तयाही व्यँक्ती। प्रसंगें गा ॥ ३८ ॥

कट्‌वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः। आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥

तरी मारें उणें काळकूट। तेणेंमानें जें कडुवट। कां चुनियाहूनि दासट। आम्ल हन ॥३९॥ कणिकीतें जैसें पाणी। तैसेंचि मीठें बांधया आणी। तेतुलीच मेळवणी। रसांतरांची ॥ १४० ॥ ऐसें खारट अपाडें। राजसा तया आवडे। उन्हाचेनि मिषें तोंडें। आगीचि गिळी ॥ ४१ ॥ वाफेचिया सिगे। वातीही लाविल्या लागे। तैसें उन्ह मागे। राजसु तो ॥ ४२ ॥ वावदळ पाडूनि ठाये। सौबळु डाहारला आहे। तैसें तीख तो खाये। जें घायेंविण रुपे ॥ ४३ ॥ आणि राखेहूनि कोरडें। आंत बाहेरी येके पाडें। तो जिव्हादंशु आवडे। बहु तया ॥ ४४ ॥ परस्परें दांतां। आदळु होय खातां। तो गा तोंडीं घेतां। तोषों लागे ॥ ४५ ॥ आधींच द्रव्यें चुरमुरीं। वरी परवंडिजती मोहरी। जियें घेतां होती धुवारी। नाकेंतोंडें ॥ ४६ ॥ हें असो उगें आगीतें। म्हणे तैसें राइतें। पढियें प्राणापरौतें। राजसासि गा ॥ ४७ ॥ ऐसा न पुरोनि तोंडा। जिभा केला वेडा। अन्नमिषें अग्नि भडभडां। पोटीं भरी ॥ ४८ ॥ तैसाचि लवंगा सुंठे। मग भुई ना सेजे खाटे। पाणियाचें न सुटे। तोंडोनि पात्र ॥ ४९ ॥ ते आहार नव्हती घेतले। व्याधिव्याळ जे सुतले। ते चेववावयां घातलें। माजवण पोटीं ॥ १५० ॥ तैसें एकमेकां सळें। रोग उठति एके वेळे। ऐसा राजसु आहारु फळे। केवळ दुःखें ॥ ५१ ॥ एवं राजसा आहारा। रूपें केलें धनुर्धरा। परिणामाचाही विसुरा। सांगितला ॥ ५२ ॥ आतां तया तामसा। आवडे आहारु जैसा। तेंही सांगों चिळसा। झणें तुम्ही ॥ ५३ ॥ तरी कुहिलें उष्टें खातां। न मनिजे तेणें अनहिता। जैसें कां उपहिता। म्हैसी खाय ॥५४॥

यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत्। उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥

तेव्हांच शरीराचे आरोग्य भोगण्याचें भाग्य उदयास आले, असें समजावें ३५. आणि मग त्यामुळें सर्व घेण्यादेण्याच्या व्यापाराचा विस्तार सुखमय होतो. हें असो; फार काय ! तर त्याची आनंदाबरोबर मैत्री होऊन सख्य वाढते ३६. याप्रमाणें हा सात्त्विक आहार चांगला परिणामास पावला तर थोर लाभ असून, तो आंत मनाला व बाहेर शरीराला असा अन्तर्बाह्य सुखकर होतो ३७. आतां राजस गुणाच्या मनुष्याची कोणत्या अन्नावर प्रीति असते, तेंहि तुला प्रसंगानुसार स्पष्ट करून सांगतो ३८.

**अन्वयार्थ**—**कटु–अम्ल–लवण– अत्युष्ण – तीक्ष्ण रूक्ष–विदाहिनः**–कडू, आंबट, खारट, अति उष्ण, तिखट, रुक्ष–नीरस व दाहक–तोंडाची आग करणारे असे–**व–दुःख–शोक–आमयप्रदा**–दुःख, शोक आणि रोग देणारे -**आहाराः**–आहार–**राजसस्य**-राजस प्रकृतीच्या मनुष्याला-**इष्टाः**–आवडतात ९.

तर फक्त मारकपणाचे बाबतींत मात्र उणें, बाकी जे काळकूट विषाच्या बरोबरीचेच कडू असते किंवा चुन्याहूनहि दाहक असून जे आंबट असतें ३९. कणीक भिजण्यास जितकें पाणी लागतें, तितकेंच त्यांत मीठ घालतो आणि आवांतरहि खारट जिन्नस त्यांत तितक्याच प्रमाणांत मिसळतो १४०. असे अतिशय खारट पदार्थ त्या राजस म्ह. रजोगुणी मनुष्यास आवडतात; आणि ऊन ऊन म्हणून इतके कढत पदार्थ खातो कीं, त्या रूपानें तो केवळ अग्निच तोंडानें गिळतो असें वाटते ४१. त्या कढत पदार्थांतून इतक्या वाफा निघतात कीं, त्याच्या टोकांवर जणुं कांहीं दिव्याची वातहि लावली असतां तीहि पेटेल, असें ऊन पदार्थ तो रजोगुणी मनुष्य खावयास मागतो ४२. भयंकर वावटळीला मागें सारील असें किंवा पहारीच्या टोकाप्रमाणें रुपणारें, प्रहार करणारे असे झणझणींत तिखट पदार्थ तो खातो, कीं, ज्या योगानें जखम न पडतां, घावाविना शस्त्राप्रमाणें वेदना होतात; ४३. आणि राखेहून रुक्ष व अंतर्बाह्य कोरडे असलेलें असें जे तोंडी लावणें असतें ते त्याला फार आवडतें ४४.

जो पदार्थ खातेवेळेस एकमेकांवर दांत आदळतील असें व इतकें कठीण पदार्थ तोंडांत घेतांना–खातेवेळेस त्याला फार आनंद होऊं लागतो ४५. अगोदरच–मूळचेच झणझणींत असून त्यांत त्यांना आणखी मोहरी लावून [ त्याचे अनेक प्रकार करतात ] मग काय विचारतां ! त्यांचें सेवन केलें असतां नाकातोंडांतून झिणझिण्या व वाफा येतात ! ४६. हें तर राहूंच द्या, पण जें अग्नीला 'गप्प बैस' म्हणून मागें सारतें, असें रायतें राजोगुणी मनुष्यास प्राणापेक्षांहि विशेष आवडतें ४७. अशाप्रकारें ज्याचे तोंडास पुरेसे न होऊन म्ह० कांहीं खाल्ल्यानें ज्याची तृप्ति होत नाहीं, असा जिभेनें वेडा केलेला रजोगुणी मनुष्य जणुं काय अन्नाच्या निमित्तानें धगधगीत पेटलेला अग्निच पोटांत घालतो ४८. त्याप्रमाणें लवंगा व सुंठ खाऊन त्यामुळें भुईवर अंथरूणावर किंवा खाटेवर बेचैन होऊन गडबडा लोळतो व तोंडापासून पाण्याचे भांडें एकीकडे ठेवीत नाहीं ४९. तर हें अन्न म्ह. अन्न सेवन केलें नसून त्या रूपानें त्या रजोगुणी मनुष्यानें व्याधिरूप निवांत निजलेलें सर्प जागें करण्याकरितां पोटांत उत्तेजक कैफच घालला आहे १५०. त्याबरोबर एकमेकांच्या स्पर्धेनें रोग एकदम उठतात. अशा रीतीनें राजस अन्नापासून केवळ दुःखच फळ मिळत असतें ५१. हें धनुर्धरा ! याप्रमाणें राजस अहाराचें–अन्नाचें वर्णन केलें व त्या अहाराच्या परिणामाचाहि विचार तुला सांगितला ५२. आतां तमोगुणी मनुष्यास जो आहार आवडतो, तेंहि तुला सांगतों. कदाचित् तुम्हांस त्याची किळस येईल; पण चिळस घेऊं नका हो ! ५३. तर कुजलेलें व उष्टें अन्न खातांना यापासून अहित होईल असें त्याच्या मनांतहि येत नाहीं ! ज्याप्रमाणें म्हैस आंबोण खाते [ तसेंच तोहि खात असतो ] ५४.

**अन्वयार्थ**—**यातयामम्**–अर्धे शिजलेलें–**गतरसं**–रस–रहित–**पूति**–दुर्गंधयुक्त–**पर्युषितं** – शिळें–**च** – **यत् उच्छिष्टम्** – आणि जें उच्छिष्ट–**अपि च**–त्याचप्रमाणें–**अमेध्यं**–यज्ञाला अयोग्य–**भोजनं**–भोजन–अन्न–**तामस-प्रियं**–तें तामस लोकांना प्रिय असतें १०.

---

१ आकारास, विस्तारास. २ मैत्री. ३ परिणाम पावला. ४ उघड. ५ मारकपणानें कमी. ६ त्याप्रमाणें. ७ दाहक, भाजणारें. ८ आंबट. ९ जणुं मिठाचाच गोळा बनविला. १० इतर खारट जिनसांची. ११ अतिशय. १२ उष्ण. १३ अग्रावर. १४ दगड, वाऱ्याची वावटळ, विजेचा आघात. १५ मागें सरून. १६ पहार, शस्त्र. १७ प्रहार करणारे. १८ तिखट. १९ तोंडी लावणें. २० झणझणीत. २१ लावतात. २२ वेदना, धार. २३ आवडतें. २४ जिभेनें. २५ दाह. २६ बीज. २७ व्याधिरूपी सर्प. २८ निजलेले. २९ जागृत करण्याकरितां. ३० कैफ. ३१ स्पर्धेनें. ३२ निरूपण. ३३ अभिप्राय, विस्तार. ३४ किळस. ३५ घेऊं नका. ३६ कुजलेले. ३७ आंबवणाला.

निपजलें अन्न तैसें । दुपाहरीं कां येरें दिवसें । अंतिकरें तैं तामसें । घेईजे तें ॥५५॥ नातरी अर्ध उकडिलें । का निपट करपोनि गेलें । तैसेंहि खाय चुकलें । रसा जें येवों ॥५६॥ जया कां आथि पूर्ण निष्पत्ती । जेथ रसु धरी व्यक्ती । तें अन्न ऐसी प्रतीती । तामसा नाहीं ॥ ५७ ॥ ऐसेनि कहीं विपायें । सदन्ना वेरपडा होये । तरी घाणी सुटे तंव राहे । व्याघ्रु जैसा ॥५८॥ कां बहुवे दिवशीं वोलांडिलें । स्वादपणें सांडिलें । शुष्क अथवा सडलें । गोंभिणेंही हो ॥ ५९ ॥ तेंही बाळाचे हौतवरी । चिवडिलें जैसी रांडी करी । का सवें बैसोनि नारी । गोतांबीलें करी ॥ १६० ॥ ऐसेनि कश्मळें जें खाय । तें तया सुखभोजन ऐसें होय । परी येणेंही नै धाय । पापिया तो ॥ ६१ ॥ मग चमत्कारु देखा । निषेधाचा आंबुखा । जया का सदोखा । कुद्रव्यासी ॥ ६२ ॥ तया अपेयांच्यां पानीं । अखाद्यांच्या भोजनीं । वाढविजे उतान्ही । तामसें तेणें ॥ ६३ ॥ एवं तामस जेवणारा । ऐसैसी मेचुं हे वीरा । तयाचें फल दुसरां । क्षणीं नोंहीं ॥ ६४ ॥ जे जेव्हांचि हें अपवित्र । शिवे तयाचें वक्त्र । तेव्हांचि पापा पात्र । जाला तो कीं ॥ ६५ ॥ यावरतें जे जेवीं । ते जेविती वोजें न म्हणावी । पोटभरती जाणावी । यातना ते ॥ ६६ ॥ शिरच्छेदें काय होये । का आगीं रिघतां कैसें आहे । हें जाणावें काई पाहें । परी सोंहातुचि असे ॥ ६७ ॥ म्हणौनि तामसा अन्ना । परिणामु गा सिनाना । न सांगोंचि गा अर्जुना । देवो म्हणे ॥ ६८ ॥ आतां ययावरी । आहाराचिया परी । यज्ञुही अवधारीं । त्रिधा असे ॥ ६९ ॥ तरी तिहींमाजीं प्रथम । सात्त्विक यज्ञाचें वर्म । आईक पां सुमहिम- । शिरोमणी ॥ १७० ॥

अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते । यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥ ११ ॥

तरी एकु प्रियोत्तमु- । वांचोनि वाढों नेदी कामु । जैसा का मनोधर्मु । पतिव्रतेचा ॥ ७१ ॥ नाना सिंधूतें ठाकोनि गंगा । पुढारां न करीचि रिगा । का आत्मा देखोनि उगा । वेदु ठेला ॥ ७२ ॥ तैसें जे आपुल्या स्वहितीं । वेचूनियां चित्तवृत्ती । नुरवितीचि अहंकृती । फळालागीं ॥ ७३ ॥ पातलेया झाडाचें मूळ । मागुतें सरों नेणोंचि जळ । जिरालें कां केवळ । तयाच्याचि आंगीं ॥ ७४ ॥ तैसें मनें देहीं । यजननिश्चयाच्या ठायीं । हारपोनि जें कांहीं । वांछितीना ॥ ७५ ॥ तिहीं

त्याप्रमाणें सकाळीं शिजविलेलें अन्न दुपारी किंवा तो दिवस गेल्यानंतर दुसरे दिवशीं खाण्याची तामस मनुष्यास अति प्रीति असते ५५. किंवा अर्धवट शिजविलेलें, कच्चें अथवा पार करपून जणुं केवळ राखुंडी झालेलें तसेंच ज्याच्यापासून रस पार निघून गेला आहे, असेंहि अन्न तो खातो ५६. जें अन्न पूर्ण पक्व झालेलें असतें व ज्यांत रसभरितपणा व गोडी आलेली असते त्या अन्नाला तामस मनुष्य आपल्या अनुभवदृष्टीनें अन्न असें मुळींच मानीत नाहीं ५७. असें असूनहि जर उत्तम अन्न कदाचित् खाण्याचा प्रसंग प्राप्त झाला तर वाघाप्रमाणें तें अन्न तसेंच ठेवून त्यास तो वास येऊन नासेपर्यंत राहतो म्ह० ते अन्न खात नाहीं ५८. किंवा ज्या अन्नाला तयार होऊन बहुत दिवस झाले आहेत, असा ज्याचा रुचकरपणा नाहींसा झालेला आहे व जे वाळून कोरडें झालेलें किंवा सडलेलें आहे अथवा धुतें, ज्यांत बारीक जंतु पडलेलें असोत ५९. आणि तेंहि [ घाण अन्न ] मुलाबाळांच्या हातांनीं चिखलाप्रमाणें चिवडलेलें व जणुं त्याची राड करतो अथवा बायको व इतर मंडळी बरोबर घेऊन गोतांबील करतो, म्हणजे सर्वजण मिळून एकाच ताटांत खातो १६०. अशा प्रकारचें घाणेरडेपणानें जेव्हां तो अन्न खातो, तेव्हांच त्याला सुखाचें भोजन केलेसें होतें; परंतु एवढ्यानेंहि त्या पाप्याची तृप्ति होत नाहीं ! ६१. मग चमत्कार पहा कीं, ज्या सदोष व वाईट पदार्थांवर शास्त्रनिषेधाचा शिंतोडा-शिक्का पडून जे सेवन करण्यास त्याज्य ठरले आहेत ६२. त्या अपेयांचें पान करण्याची, अभक्ष्य भक्षण करण्याची त्या तामसी मनुष्याकडून अतिशय हांव, उत्कट इच्छा वाढविली जाते ६३. वीरा अर्जुना ! अशा प्रकारें त्या जेवणाऱ्या तामस मनुष्याची असले पदार्थ खाण्याची जी आवड असते, त्या आवडीचें फल त्यास दुसऱ्या क्षणीं नव्हे तर तत्क्षणींच मिळतें ! ६४. कारण, ज्यावेळीं त्याचें तोंड या अपवित्र पदार्थांस सेवन करण्याच्या निमित्तानें शिवतें त्याचवेळेस तो पापास पात्र झालेला असतो ६५. मग याशिवाय जें तो जेवतो ती खरोखरच जेवण्याची पद्धत म्हणूं नये तर तें जेवण म्हणजे पोट भरण्याची जणुं दुःख यातनाच होय असें समजावें ६६. शिरच्छेद केल्यापासून काय होते किंवा अग्नींत प्रवेश केला असतां त्याचा कसा काय परिणाम होतो, या गोष्टींचा प्रत्यक्ष कां अनुभव घ्यावा लागतो ? पण पहा ! तसलेंहि परिणाम तो तमोगुणी मनुष्य सहनच करतो ! ६७. म्हणून श्रीकृष्ण म्हणतात :-अर्जुना ! तामस अन्नाचा परिणाम निराळा सांगण्याचे कारण वा तशी जरूरी नाहीं. कारण, तामस अन्न सेवनांत होणारे अतीव दुःख हाच त्याचा खरा दृष्ट परिणाम ६८. आतां यापुढें आहाराप्रमाणेंच यज्ञहि तीन प्रकारचा आहे. ऐक ! ६९. तर सुकीर्तीवानांमध्यें श्रेष्ठ असणाऱ्या अर्जुना ! त्या तीहींमधील सात्त्विक यज्ञाचें लक्षण पहिल्याप्रथम सांगतों, तें ऐक १७०.

**अन्वयार्थ**--**अफलाकांक्षिभिः**:-फलाची आकांक्षा न करणाऱ्या लोकांकडून-**यः विधिदृष्टः यज्ञः**:-जो शास्त्राच्या विधीनें प्राप्त झालेला यज्ञ-**यष्टव्यम् एव इति**-मला अवश्य यज्ञ करावयास पाहिजे असें-**मनः समाधाय**-मनाचें समाधान करून-**इज्यते**-केला जातो-**सः सात्त्विकः**-तो सात्त्विक यज्ञ आहे ११.

तर ज्याप्रमाणें पतिव्रता स्त्रीचा मनोधर्म एका प्रिय पतीवांचून अन्याविषयीं काम वाढूं देत नाहीं ७१. किंवा गंगा नदी समुद्रास मिळाल्यावर पुढें जाण्याचा प्रयत्न करीतच नाहीं, अथवा आत्मस्वरूपाचें दर्शन होतांच वेद स्तब्ध राहिला ७२. त्याप्रमाणें, जें आपल्या हिताकरितां चित्ताची वृत्ति अर्पण करून, जे फळाच्या आशेनें कर्तेपणाचा अहंकार मुळींहि उर्वरित राहूं देत नाहींत ७३. जसें पाणी झाडाच्या मुळाजवळ पोहोंचल्यावर मागें सरणें-परतणें जाणतच नाहीं, तर त्यास मिळून तेथें मुरून त्याचें पोषणच करितें ७४. तसे जे मनानें व देहानें यज्ञ निश्चयांत व यज्ञ करण्यांत निमग्न होतात, परंतु त्यापासून कसल्याहि फलाची इच्छा करीत नाहींत ७५. फलाची

---

१. दोन प्रहरचें. २ आदले दिवशीं. ३ प्रीतीनें. ४ निःशेष. ५ पक्व झालेलें. ६ अनुभव. ७ कदाचित्. ८ उत्तम अन्नाला. ९ प्राप्त झाला, लाभला. १० पुष्कळ दिवस झालेले. ११ फुगलेले. १२ हातानें. १३ चिखल. १४ एका ताटांत बसून सर्वांनीं जेवणें. १५ घाणेरडेपणानें.

१६ तृप्त होत नाहीं. १७ शिंतोडा, सेचन. १८ पिण्यास अयोग्य अशा पदार्थांच्या. १९ इच्छा. २० आवडे. २१ तत्क्षणींच मिळते. २२ रीति. २३ सहन करतो. २४ वेगळाला. २५ सुकीर्तीश्रेष्ठा, कीर्तिमानांत वरिष्ठ अशा. २६ अर्जुना. २७ येऊन पोंचून. २८ अर्पण करून.

फळवांच्छात्यागीं । स्वधर्मावांचूनि विरागीं । कीजे तो यज्ञु सर्वांगीं । अळंकृतु ॥ ७६ ॥ परी आरिसों आपणपें । डोळां जैसें घेपें । कां तळहातींचें दीपें । रत्न पाहिजे ॥ ७७ ॥ नाना उदितें दिवाकरें । गमावा मार्गु दिठी भरे । तैसा वेदु निर्धारें । देखोनियां ॥ ७८ ॥ तियें कुंडें मंडप वेदी । आणीकही संभारसमृद्धी । ते मेळवणी जैसी विधी । आपणपां केली ॥ ७९ ॥ सकळावयव उचितें । लेणीं पातलीं जैसीं आंगातें । तैसें पदार्थ जेथिंचे तेथें । विनियोगुनी ॥ १८० ॥ काय वानूं बहुतीं बोलीं । जैसीं सर्वाभरणीं भरली । ते यज्ञविद्याचि रूपा आली । यजनमिषें ॥ ८१ ॥ तैसा सांगोपांगु । निफजे जो यागु । नुठऊनियां लैगु । महत्त्वाचा ॥ ८२ ॥ प्रतिपाळु तरी पांटाचा । झाडीं कीजे तुळसीचा । परी फळा फुला छायेचा । आश्रयो नाहीं ॥ ८३ ॥ किंबहुना फळाशेवीण । ऐसेया निगुंती निर्माण । होय तो यागु जाण । सात्त्विकु गा ॥ ८४ ॥

अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् । इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥

आतां यज्ञु कीर वीरेशा । करी पैं याचिऐसा । परी श्राद्धालागीं जैसा । अवंतिला रावो ॥ ८५ ॥ जरी राजा घरासि ये । तरी बहुत उपेगा जाये । आणि कीर्तीही होये । श्राद्ध न ठके ॥ ८६ ॥ तैसा धरूनि आवांकां । म्हणे स्वर्गु जोडेल असिका । दीक्षितु होईन मान्यु लोकां । घडेल यागु ॥ ८७ ॥ ऐसी केवळ फळालागीं । महत्त्व फोकारावेंया जगीं । पार्था निष्पत्ति जे यागीं । राजस पैं ते ॥ ८८ ॥

विधिहीनमसृष्टान्नं मन्त्रहीनमदक्षिणम् । श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥

आणि पशुपक्षिविवाहीं । जोशी कामापरौता नाहीं । तैसा तामसा यज्ञा पाहीं । आग्रहोचि मूळ ॥ ८९ ॥ वारया वाट न वाहे । कीं मरण मुहूर्त पाहे । निषिद्धांसि बिहे । आगी जरी ॥ १९० ॥ तरी तामसाचिया आचारा । विधीचा आथी वोढावारां । म्हणौनि तो धनुर्धरा । उत्सृंखळु ॥ ९१ ॥ नाहीं विधीची तेथ चाड । नये मंत्रादिक तयाकड । अन्नजातां न सुंये तोंड । मासिये जेवीं ॥ ९२ ॥ वैराचा बोधु ब्राह्मणा । तेथ कें रिगेल दक्षिणा । अग्नि जाला वाउधाणा । वरपडीं जैसा ॥ ९३ ॥ तैसें वायांचि सर्वस्व वेंचे । मुख न देखती श्रद्धेचें । नागविलें निपुत्रिकाचें । जैसें घर ॥ ९४ ॥ ऐसा जो यज्ञाभासु । तया नाम यागु तामसु ।

इच्छा सोडून स्वधर्माशिवाय इतर गोष्टींविषयीं विरक्त [ आसक्ति रहित ] होऊन जे सर्वांगपरिपूर्ण अशा यज्ञाचें अनुष्ठान करितात ७६. परंतु आपल्या हातांत आरसा घेतल्यावर त्यांत आपलें स्वरूप जसें आपल्याच डोळ्यांनीं पाहिलें जातें किंवा [ काळोखांत ] तळहातां-वरील रत्न दिव्याच्या उजेडानें जसें स्वच्छ पाहिलें जातें. ७७. अथवा सूर्य उगवल्यावर त्यामुळें आपणास जाण्याचा मार्ग जसा आपल्या दृष्टींत स्पष्ट भरतो तसा वेदांत सांगितलेल्या मार्गावर विश्वास ठेवून जे त्याच्या साह्यानें निश्चय करून ७८. तीं कुंडें, मंडप, वेदी व याशिवाय लागणारी यज्ञाची सर्व विपुल सामुग्री यांची अशा रीतीनें जमवाजमव करितात कीं, जणुं काय वेदांनीच आपण स्वतः येऊन ती तयारी केली आहे ७९. अंगावर सर्व अवयवांत जेथल्या तेथें उचित दागिने घातले असतां ते जसे शोभतात, तसे यज्ञाचे सर्व पदार्थ जेथें पाहिजेत तेथें नीट व्यवस्थेनें मांडणी करून १८०. आणखी त्या याज्ञिकांचे शब्दांनी किती वर्णन करूं ? तर तो यज्ञमंडप पाहिला असतां असें वाटतें कीं, जणुं मूर्तिमंत सर्वालंकारयुक्त यज्ञविद्याच यज्ञाच्या निमित्तानें या ठिकाणीं आली आहे ! ८१. अशा प्रकारें जो यज्ञ, अंगें व उपांगें यासहित होतो आणि ज्यांत कसल्याहि फलाच्या किंवा मोठेपणाच्या इच्छेच्या संबंधास मुळींच वाव नसतो ८२. तुळशीच्या झाडापासून फलाचा, फुलांचा छायेच्या प्राप्तिविषयक हेतूला मुळींहि आश्रय नसतो तरी लोक पाटांतील पाण्यानेंहि त्याचा चांगलाच प्रतिपाळ करितात ८३. फार काय सांगावें ! ! फलाशेशिवाय अशा युक्तीनें जो यथासांग यज्ञ केला जातो त्यालाच ' सात्त्विक यज्ञ ' म्हणतात असे समज ८४.

**अन्वयार्थ**--**हे भारतश्रेष्ठ**-हे भरतकुलश्रेष्ठा !-**तु**-पण-**फलम् अभिसंधाय**-फलाची इच्छा ठेवून-**दंभार्थम् अपि एव**-व केवळ दंभासाठीहि--**यत्** जे-**इज्यते**-यजन केलें जातें-तं **यज्ञं**-त्या यज्ञाला-**राजसं**-राजस यज्ञ-**विद्धि**-जाण १२.

आतां हे वीरश्रेष्ठा ! दुसऱ्या प्रकारचा जो राजस यज्ञ तोहि खरोखर याच्यासारखाच करितात, पण श्राद्धतिथीचे दिवशीं सहज राजासहि मेजवानीला आमंत्रण द्यावें [ त्याप्रमाणें ! ] ८५. म्हणजे जर राजा, आपल्या घरीं भोजनास आला तर त्यापासून आपणास पुष्कळच उपयोग होईल. तो असा कीं, आपला जगांत नांव लौकिकहि होईल आणि श्राद्धहि थांबणार नाहीं [ तें तर पार पडेलच, एवंच, कामांत काम होऊन जाईल ! ] ८६. त्याप्रमाणें, फलाशा पूर्ण विचार धरून तो मनांत म्हणतो कीं, आपल्यास आयतीच संपूर्ण स्वर्गप्राप्ति होईल, व लोकांना दीक्षित म्हणून मान्य होईन. म्ह. लोक आपल्यास बहुमान देतील व आपल्या हातून यज्ञासारखें महात्कार्यहि घडेल ! ८७. अर्जुना ! अशा प्रकारें केवळ फलाची ! आशा धरून त्या साठींच व जगांत आपली कीर्ति व्हावी म्हणून जे यज्ञ केलें जातात ते ' राजस यज्ञ ' होत ८८.

**अन्वयार्थ**-- **विधिहीनं**-शास्त्रोक्त विधीवांचून-**असृष्टान्नं**-ज्यांत अन्नदान केलेलें नाहीं-**मंत्रहीनं**-मंत्ररहित-**अदक्षिणं**-दक्षिणारहित-**श्रद्धाविरहितं**-श्रद्धाशून्य-**यज्ञं**-यज्ञाला-**तामसं**-तामस यज्ञ-**परिचक्षते**-सांगतात १३.

आणि पशुपक्ष्यां या विवाहामध्यें कामावांचून जसा दुसरा जोशी लागत नाहीं तसा तामस यज्ञाला आग्रहच मूळ कारण होय. ८९. वाऱ्याकडून वाहण्यास कोणतीहि एकादी वाट चालविली जाणार नाहीं; किंवा मरण येण्यास जर मुहूर्त पाहील ? आणि अग्नि जर निषिद्ध पदार्थ जाळण्यास भिईल १९०. तरच तामसाच्या यज्ञादि आचरणास वेदविधीची मर्यादा धरबंध-असेल ! म्हणून हे धनुर्धरा ! तो पुरुषच स्वतः स्वैर वा अमर्याद असतो ९१. त्याला विधीची चाड नसते, मंत्राची वगैरे त्यास गरज लागत नाहीं, आणि जसें माशीच्या तोंडाकडून अन्न मात्र सुटत नाहीं, [ सर्व अन्नावर माशी तोंड घालते ] ९२. त्या ठिकाणीं ब्राह्मणांविषयीं ' हा शत्रु आहे ' अशी पूर्ण वैरभावाची समजूत असते, मग तेथें दक्षिणेचा विचार कोठून असणार ? आणि वाहुटळ सुटली असतां त्यास जसें अग्नीचे साह्य मिळावे म्हणजे तो जसा सारखा भडकतो ९३. किंवा निपुत्रिकाचें घर त्याच्या पश्चात् पाहिजे त्यानें लुटण्यासारखेंच होते त्याप्रमाणें सर्व द्रव्य व्यर्थ खर्च होतें. त्यांत श्रद्धेचें तोंडहि पाहिलें जात नाहीं [ त्यांत श्रद्धेचा लवलेशहि नसतो. ] ९४. श्रीनिवास

१ वैराग्यपूर्वक. २ आरशामध्यें. ३ डोळ्यांनीं आपलें स्वरूप जसें पाहिलें जातें. ४ उगवलेल्या. ५ दिवस. ६ जाण्याचा, पाहिजे तो. ७ दिसतो. ८ यज्ञाची सामुग्री. ९ स्वतः विधीनेंच. १० अलंकार. ११ व्यवस्था करून. १२ इच्छा. १३ उत्तम प्रकारचा. १४ युक्तीनें १५ आमंत्रण देऊन आणला, बोलावला. १६ अवसान, हेतु. १७ आयता. १८ प्रसिद्धयर्थ. १९ उत्पत्ति, खटपट. २० कामावांचून दुसरा लग्न लावणारा जोशी नाहीं. २१. अमंगळ वस्तूस. २२ भिईल. २३ मर्यादा, धरबंध. २४. अमर्याद. २५ अन्नमात्राचे ठिकाणीं. २६ घालते.

आइकें म्हणे निवासु । श्रियेचा तो ॥ ९५ ॥ आतां गंगेचें एक पाणी । परी नेलें आनोंनीं वाहेणीं । एक मैळीं एक आणी । शुद्धत्व जैसें ॥९६॥ तैसें तिहीं गुणीं तप । येथ जाहलें आहे त्रिरूप । तें एक केलें दे पाप । उद्धरी एक ॥ ९७ ॥ तरी तेंचि तिहीं भेदीं । कैसेनि पां म्हणौनि सुबुद्धी । जाणों पाहासी तरी आधीं । तपचि जाण ॥ ९८ ॥ येथ तप म्हणजे काई । तें स्वरूप दाऊं पाहीं । मग भेदिलें गुणीं तिहीं । तें पाठीं बोलों ॥९९॥ तरी तप जें कां सम्यक्‌ । तेंही त्रिविध आइक । शारीर मानसिक । शाब्द गा ॥ २०० ॥ आतां या तिहीं माझारीं । शारीर तंव अवधारीं । तरी शंभू कां श्रीहरी । पढियंता होय ॥ १ ॥

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् । ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥

तया प्रिय देवतालया । यात्रादिकें करावया । आठही पाहार जैसें पायां । उळिग घापे ॥ २ ॥ देवांगणमिरवणियां । अंगोपचार पुरवणियां । करावया म्हेणियां । शोभती हात ॥ ३ ॥ लिंग कां प्रतिमा दिठी । देखतखेंवों अंगेष्टी'' । लोटिजे कां काठी । पडली जैसी ॥ ४ ॥ आणि विधिविनयादिकीं । गुणीं वडील जे लोकीं । तया ब्राह्मणाची निकी । पाइकी कीजे ॥ ५ ॥ अथवा प्रवासें कां पीडा । का शिणले जे सांकडां । ते जीव सुखवांडा । आणिजती ॥ ६ ॥ सकल तीर्थांचिये धुरे'' । जियें का मातापितरें । तयां सेवेसि कीर शरीरें । लोणें कीजे ॥ ७ ॥ आणि संसाराऐसा दारुणु । जो भेटलाचि हरी शीणु । तो ज्ञानदानीं सकरुणु । भजिजे गुरु ॥ ८ ॥ आणि स्वधर्माचा आगिठां । देह'' जाड्याचिया किटौं । आवृत्तिपुटीं सुभटा । झाडी कीजे ॥ ९ ॥ वस्तु भूतमात्रीं नमिजे । परोपकारीं भजिजे । स्त्रीविषयीं नियमिजे । नांवें-नांवें ॥ २१० ॥ जन्मतेनि प्रसंगे । स्त्रीदेह शिवणें आंगें । तेथूनि जन्म आघवें । सोंवळें कीजे ॥ ११ ॥ भूतमात्राचेनि नांवें । तृणही नासुंडावें । किंबहुना सांडावे । छेद भेद ॥ १२ ॥ ऐसैसी जैं शरीरीं । रहाटीची पडे उजरी । तैं शारीर तप घुमरी । आलें जाण ॥ १३ ॥ पार्था समस्तही हें करणें । देहाचेनि प्रधानपणें । म्हणौनि ययातें मी म्हणें । शारीर तप ॥१४॥ एवं शारीर जें तप । तयाचें दाविलें रूप । आतां आइक निष्पाप । वाङ्मय तें ॥ १५ ॥

म्हणतातः–असा जो यज्ञाविषयींचा वरकांति कलला नुसता नाटकी डौल, त्याला ' तामस यज्ञ ' असें म्हणतात, हे ऐक ! ९५. आतां गंगेचें एकच पाणी जसें निरनिराळ्या मार्गांनीं [ उपयोगास ] आणलें असतां एका मार्गानें शुद्धता व एका मार्गानें अपवित्रता आणली जाते ९६. तसेंच सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या योगें जें तप त्रिविध स्वरूपाचें झालें आहे, त्यांपैकीं एक प्रकारचें तप केलें असता ते पापद्वारां अधोगति देते व दुसऱ्या प्रकारचें तप केलें असतां तें [ पुण्यद्वारां ] उद्धरतें ९७. हे बुद्धिमान् अर्जुना ! या तपाचे तीन भेद कसे होतात हें तूं समजून घेण्याची इच्छा करीत असलास, तर आधीं तप म्हणजे काय, हेंच समजून घे ९८. आतां तप म्हणजे काय, त्याचे स्वरूप तुला सांगतों. मग त्रिगुणाच्या योगें त्याचेहि तीन भेद कसे होतात, ते मागाहून सांगेन ९९. तरी अर्जुना ! उत्तम, उचित तप ज्याला म्हणतात, त्याचेहि तीन प्रकार आहेत ते कायिक, वाचिक व मानसिक हे होत ते ऐक २००. आतां या तिहींमधील कायिक–शारीरिक तप कोणते, तें ऐक. तर शंकर अथवा विष्णु यांपैकीं जो देव आवडत असेल त्याची ज्यास भक्ति असेल १.

**अन्वयार्थ—देव-द्विज-गुरु-प्राज्ञपूजनं**–देव, ब्राह्मण, गुरु व प्राज्ञ-विद्वान् यांचे पूजन–**शौचं**–स्नानादि शौच–**आर्जवं**–सरळपणा–**ब्रह्मचर्यं**–स्त्रीशरीराशीं संसर्ग न करणें –**च अहिंसा**–आणि प्राण्यांची हिंसा न करणें, त्यांना ताडन न करणें हें–**शारीरं तपः**–शारीर–शरीरानें होणारें तप–**उच्यते**–म्हटलें जाते १४.

त्या आपल्या प्रियदेवतांच्या मंदिरांत जाऊन त्यांचें दर्शन करण्याविषयीं किंवा यात्रादिक करण्याविषयीं आठहि प्रहरांत ज्याच्या पायांना जणुं भोवरा बांधला आहे म्ह० विसांवा नसतो २. देवांचें आंगण [ झाडलोट करून, सडासंमार्जन करून ] सुशोभित करण्याविषयीं, देवाचें पूजासाहित्य पुरविण्याविषयीं व देवांची शास्त्र सांगेल ती सेवा करण्याविषयीं ज्याचे हात शोभतात ३. शंकराचें लिंग अथवा विष्णूचीं मूर्ति, दृष्टीनें पाहिल्याबरोबर जो दंडाप्रमाणें जमिनीवर अंग टाकून साष्टांग नमस्कार घालतो ४. आणि लोकांत विधिविनयादि गुणांनीं पूज्य, श्रेष्ठ असे जे ब्राह्मण, त्यांची चांगली सेवा करतो ५. अथवा प्रवासानें थकलेले किंवा संकटांत सांपडून शिणलेले जे जीव असतील, त्यांना सुखावस्थेस आणतो; [ त्यांची सेवा वगैरे करून श्रमपरिहार करितो, किंवा संकट निवारण करून त्यास दुःखमुक्त करितो; ] ६. सर्व तीर्थांमध्यें श्रेष्ठ असलेली जीं मातापितरें त्यांची सेवा करण्यांत जो खरोखर आपलें शरीरहि त्यांवरून ओंवाळून टाकतो ७. आणि जो भेटल्याबरोबर संसारासारखे दुर्धर, भयंकर दुःख नाहींसें करून त्यापासून आपल्याला मुक्त करणारा व ज्ञानामृत पाजण्याविषयीं तत्पर असा दानशूर व दयाघन श्रीगुरूंना जो भजतो म्ह० त्यांची सेवा करितो ८. आणि अर्जुना ! स्वधर्मरूप अग्नींत देहाभिमानरूपी जो कीट–मळ त्याला जो वारंवार स्वधर्माचरण करणेंरूपी किंवा वेदाध्ययनरूपी पुटे देऊन तो पार नाहींसा करतो ९. प्राणिमात्राचे ठिकाणीं एकच परमात्म वस्तु आहे, असें समजून तेथें त्यास नमस्कार करतो, परोपकार करण्याविषयीं जो तत्पर असतो; आणि स्त्रीविषयीं जो क्षणोक्षणीं निग्रह करून पूर्ण नियमित झालेला असतो; [ तो असा कीं ] तिचें नांवहि घ्यावयाचें नाहीं ! २१०. जन्माच्या प्रसंगींच मात्र स्त्रीशरीराचा म्हणजे आईचा अंगानें स्पर्श झाला, तेवढाच काय तो स्त्रीस्पर्श ! तेथून पुढें सारा जन्म सोवळा करतो म्ह० जन्मभर स्त्रीशरीराला स्पर्शहि करीत नाहीं ११. भूतमात्राच्या नांवानें गवतासहि जीव आहे, असें समजून तो त्यास हिसका देत नाहीं व तुडवितहि नाहीं. फार काय सांगावें ! ! तो कोणाचीहि मोडतोड करणें टाकून देतो किंवा वर्मी लागेल असें कोणासहि बोलत नाहीं १२. अशा प्रकारच्या वागण्यामुळें–सवयींमुळें शरीरांत उचित व्यापार करण्याचा ज्या वेळेस उत्कर्ष होतो, त्या वेळेस त्याचे अंगांत ' शारीर तप ' पूर्णपणें ठसलें, भरास आलें आहे, असें समज १३. पार्था ! या सर्व गोष्टी करणें देहाच्या प्राधान्यानें, आश्रयानें वा अनुरोधानें घडून येतात, म्हणून मी यास शारीर [ कायिक ] तप असें म्हणतों १४. याप्रमाणें ' शारीर तप ' ज्यास म्हणतात, त्याचीं लक्षणें तुला स्पष्ट सांगितलीं. आतां, निष्पाप असें जें ' वाचिक तप ' त्याचीं लक्षणें सांगतों, तीं ऐक १५.

१ लक्ष्मीचें वसतिस्थान–कृष्ण. २ निरनिराळ्या मार्गानें. ३ अपवित्रपणा. ४ आधीं तप म्हणजे काय तें ऐक. ५ मग. ६ वाचिक. ७ शिव किंवा विष्णु यांतून आवडेल त्याचें. ८ प्रहर. ९ भोंवरा. १० देवांगण सुशोभित करण्यास. ११ गंधपुष्पादिक. १२ सेवा, पूजा. १३ पहातांच. १४ साष्टांग. १५ यथाशास्त्र आचरण करणारे. १६ चाकरी, सेवा. १७ संकटांनीं. १८ सुखावस्थेस. १९ अग्रभागीं. २० ओंवाळणी, लिंबलोण. २१ अग्नींत, शेगडींत. २२ स्थूल बुद्धिरूपी, हीण. २३ अभ्यास योगरूपी पुटानें, वेदाध्ययन. २४ जन्मकाळींच मात्र स्त्रीस्पर्श. २५ ओढून नये.

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् । स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥

तरी लोहाचें आंग तुकें । न तोडितांचि कनक । केलें जैसें देख । परिसें तेणें ॥ १६ ॥ तैसें न दुखवितां सेजे । जावळिया सुख निपजे । ऐसें साधुत्व कां देखिजे । बोलणां जिये ॥ १७ ॥ पाणी मुदल झाडा जाये । तृण तें प्रसंगेंचि जियें । तैसें एका बोलिलें होये । सर्वांहि हित ॥१८॥ जोडे अमृताची सुरसरी । तैं प्राणांतें अमर करी । स्नानें पाप ताप वारी । गोडीही दे ॥१९॥ तैसा अविवेकुही फिटे । आपुलें अनादित्व भेटे । आइकतां रुचि न विटे । पीयुषीं जैसी ॥२२०॥ जरी कोणी करी पुसणें । तरी होआवें ऐसें बोलणें । नातरी आवर्तणें । निगमु का नाम ॥२१॥ ऋग्वेदादि तिन्ही । प्रतिष्ठीजती वाग्भुवनीं । केली जैसी वदनीं । ब्रह्मशाळा ॥२२॥ नातरी एकाधें नांव । तेंचि शैवं का वैष्णव । वाचे वसे तें वाग्भव । तप जाणावें ॥ २३ ॥ आतां तप जें मानसिक । तेहीं सांगों आइक । म्हणे लोकनाथनायक । नायकु तो ॥ २४ ॥

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः । भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥

तरी सरोवर तरंगीं । सांडिलें आकाश मेघीं । कां चंदनाचें उरगीं । उद्यानें जैसें ॥ २५ ॥ नाना कळावैषम्यें चंद्रु । कां सांडिला आधीं नरेंद्रु[२१] । नातरी क्षीर समुद्रु । मंदराचळें ॥ २६ ॥ तैसीं नाना विकल्पजाळें । सांडूनि गेलिया सकळें । मन राहे कां केवळें । स्वरूपें जें ॥ २७ ॥ तपनेंवीणें प्रकाशु । जाड्येंवीण रसीं रसु । पोकळीवीण अवकाशु । होय जैसा ॥ २८ ॥ तैसी आपली सोयें देखे[२२] । आणि आपलिया स्वभावा मुके । हिंवली जैसी आंगिकें । हिवों नेदी निजांग ॥ २९ ॥ न चळतें कळंकेंवीण । शशिबिंब जैसें परिपूर्ण । तैसें चोखी[२] शृंगारपण । मनाचें जें ॥ २३० ॥ बुजाली वैराग्याची वोरप । जिराली मनाची धांपेंकांप । तेथ केवळ जाली वोफ । निजबोधाची ॥ ३१ ॥ म्हणौनि विचारावया शास्त्र । राहाटवावें जें वक्त्र । तें वाचेचेंही सूत्र । हातीं न धरी ॥ ३२ ॥ तें स्वलाभ लाभलेपणें । मन मनपणाही धरूं नेणें । शिवतलें जैसें लवणें । आपुलें निज ॥ ३३ ॥ तेथ कें उठिती ते भाव । जिहीं इंद्रियमार्गीं धांव । घेऊनि ठाकावे गांव । विषयांचे

**अन्वयार्थ–यत्**–जें–**अनुद्वेगकरं**–प्राण्यांच्या मनांत दुःख उत्पन्न न करणारें–**सत्यं**–खरें–**च प्रियहितं**–व प्रिय आणि हितकर–**वाक्यं**–**च**–व–**स्वाध्यायाभ्यसनम् एव**–यथाविधि वेदशास्त्राध्ययन–**वाङ्मयं तपः**–**हें** वाङ्मय तप–**उच्यते**–सांगितलें जातें १५.

तर असें पहा कीं, परीसानें लोखंडाचा आकार व वजन हीं, मुळींहि कमी न करितां ज्याप्रमाणें त्या लोखंडास सोनें केलें १६. त्याप्रमाणें ज्याच्याशीं जे कांहीं बोलावयाचें त्याच्याजवळ असणाऱ्या दुसऱ्या मनुष्यास दुःख न होतां सहज सुख होईल, असा चांगुलपणा ज्या बोलण्यांत सहज असल्याचें दिसून येतें १७. जसें:–वस्तुतः पाणी मुख्य झाडास दिलें जाते, पण त्यायोगें पाटाच्या कांठाजवळ असणारें गवत सहजच जगत असतें, तसें कोणासहि एकास उद्देशून बोलतेवेळीं त्या बोलण्यापासून सहजच सर्वांचें हित होते १८. जेव्हां अमृताची गंगा प्राप्त होते तेव्हां ती प्राण्यास जशी तिचे अमृत प्राशन केल्यानें अमर करते व स्नानानें पाप नाहींसें करून संसार तापहि नाहींसा करते व गोडीहि देते, १९. त्याप्रमाणें अज्ञानहि नाहींसें होतें, आपल्या अनादि, अनंत अशा आत्मस्वरूपाची पुनः भेट होते व पुष्कळ वेळ ऐकल्यानेंहि अमृताप्रमाणें ज्याच्या रुचीचा विवडून वीट येत नाहीं. २२०. जर कोणी कांहीं विचारलेंच तर अशा प्रकारची भाषण करण्याची पद्धति असते वा असावी. नाहींतर वाचेनें वेदाचें पुनः पुनः पठण अथवा हरिनामोच्चारण चाललेलें असावें २१. ऋग्वेदादि तिन्हीं वेदांची वाचारूप मंदिरांत प्राणप्रतिष्ठा करितात किंबहुना ! ! ज्यांनीं आपल्या वदनामध्यें जशी काय वेदशाळाच केलेली असते २२. किंवा एखादे नांव, मग तेंच शिव अथवा विष्णु यांपैकीं कोणाहि एकाचे असो तेच नामोच्चारण रूपानें वाचेंत राहावें हेंच वाचेपासून उत्पन्न झालेलें वाचिक तप होय असें जाणावें २३. आतां जे मानसिक तप आहे तेंहि लक्षणासहित सांगतों तें ऐक. असें लोकनाथांच्या नायकांचा मालक जो श्रीकृष्ण परमात्मा तो म्हणाला २४.

**अन्वयार्थ**––**मनःप्रसादः**–मनाची अत्यंत शांति–प्रसन्नता–**सौम्यत्वं**–सौम्यता–**मौनं**–न बोलण्याविषयीं मनाचा संयम–**आत्मविनिग्रहः**–सामान्यतः सर्व बाजूंनीं मनाचा निरोध करणें–**भावसंशुद्धि**–मनाचा निष्कपटपणा–**इति एतत्**–**तपः**–**हें** अशा प्रकारचें तप–**मानसं**–मानस तप–**उच्यते**–म्हटलें जातें १६.

तर लाटांनीं सरोवर टाकलें असतां किंवा मेघांनीं आकाश टाकलें असतां किंवा चंदनाची बाग सर्पांनीं सोडली असतां २५. अथवा कलांच्या न्यूनाधिकतेनें पूर्णचंद्रास सोडलें असतां मानसिक चिंतेनें राजास सोडलें असतां अथवा जसा मंदराचलानें क्षीरसमुद्र टाकावा २६. तसें अनेक प्रकारचा संशयात्मक समुदाय [ मनास ] अगदीं निःशेषतया सोडून गेल्यावर जें मन केवळ स्वरूपानें अर्थात् शुद्धस्वरूपीं निमग्न होऊन राहतें २७. अथवा उष्णतेवांचून जसा प्रकाश असावा किंवा जाड्यावांचून जसा अन्नांत रस अथवा आणि पोकळीशिवाय जसा अवकाश वा पदार्थ असावा २८. तसेंच [जें मन] आपलें [ यथार्थ आत्म–] स्वरूप पाहते–जाणते व [ मन ] आपल्या स्वभावास सदाचेच मुकते. तें असें कीं, थंडी आपल्या थंडीची आपल्याच अंगास बाधा होऊन थरथर कापूं देत नाहीं २९. अचल –स्थिर आणि कलंकरहित स्वच्छ असें चंद्राचें बिंब जसें नित्य परिपूर्ण असावें तितक्याच पवित्रपणानें [ स्थिर मनाचें आत्मस्वरूपीं निमग्न होणें हें ] मनाचें जें सौंदर्य–वैभवच असतें २३०. म्हणून वैराग्याची इच्छा नाहींशी झाली आहे आणि मनाचे चांचल्य व धडधडणें जेथें पूर्ण कमी झालें आहे अशा शुद्ध मनांतच निजात्मबोध उत्पन्न होण्याची शुद्ध भूमिका–योग्यता म्ह. वाफसा तयार होतो ३१. म्हणून शास्त्राचा विचार करण्यासाठीं ज्या मुखाचा उपयोग करावयाचा [ ज्या मुखानें शास्त्राध्ययन करावयाचें ] तें मुख वाचेनेंहि सूत हातीं धरीत नाहीं [ भाषणाविरहित मौनसंपन्न असेंच असतें ] ३२. ज्याप्रमाणें मीठ आपलें मूळ स्वरूप जें पाणी त्याचा स्पर्श झाला असतां ते तद्रूप होतें त्याप्रमाणें मनाला आत्मस्वरूपाचा लाभ झाल्यामुळें तें मन मनपणासहि धरूं जाणत नाहीं म्ह. तें संकल्प विकल्प सोडून देऊन परमात्मरूप झालेलें असतें ३३. अशा वेळेस त्या मनांत इच्छा कोठून उत्पन्न होणार कीं, जिच्या योगानें इंद्रिय मार्गांनीं धांव घेऊन विषयरूपी त्या गांवास येऊन प्राप्त

१ आकार, वजन. २ जवळच्या, दुसऱ्याला. ३ सरळपणा. ४ सुरसरित्गंगा. ५ अज्ञान. ६ आत्मस्वरूप. ७ अमृत पितांना. ८ अध्ययन. ९ वेद. १० वाचारूपी दिरांत. ११ वेदशाळा. १२ शिव. १३ विष्णु. १४ वाचेपासून झालेले, वाचिक. १५ इंद्रादिक लोकनायकाचा धनी कृष्ण. १६ लाटांनीं. १७ सापांनीं. १८ बाग. १९ कमजास्त कलांनीं. २० चिंतेनें, मनस्तापानें. २१ राजा. २२ उष्णतेवांचून. २३ वस्तु. २४ स्वरूप. २५ जाणून. २६ शरीरावयव. २७ आत्मरूपी. २८ स्थिरपणा. २९ इच्छा. ३० धडधडणें. ३१ कंप. ३२ रूपमय.

ते ॥ ३४ ॥ म्हणौनि तिये मानसीं । भावशुद्धिचि असे अपैसी । रोमशुचि जैसी । तळहातासी ॥ ३५ ॥ काय बहु बोलों अर्जुना । जैं हे दशा ये मना । तैं मनोतपाभिधाना । पात्र होय ती ॥ ३६ ॥ परी ते असो हें जाण । मानस तपाचें लक्षण । देवो म्हणे संपूर्ण । सांगितलें ॥ ३७ ॥ एवं देहवाचाचित्तें । जें पातलें त्रिविधत्वातें । तें सामान्य तप तूंतें । परिसविलें गा ॥ ३८ ॥ आतां गुणत्रयसंगें । हेंचि विशेषीं त्रिविधीं रिगे । तेंही आइक चांगें । प्रज्ञाबळें ॥ ३९ ॥

श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः । अफलाकाङ्क्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥

तरी हेंचि तप त्रिविधा । जें दाविलें तुज प्रबुद्धा । तेंचि करीं पूर्णश्रद्धा । सांडूनि फळ ॥ २४० ॥ जैं पुरतिया सत्त्वशुद्धी । आचरिजे आस्तिक्यबुद्धी । तैं तयातेंचि गा प्रबुद्धी । सात्त्विक म्हणिपे ॥ ४१ ॥

सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत् । क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥

नातरी तपस्थापनेलागीं । दुजेपण मांडूनि जगीं । महत्त्वाच्या शृंगीं । बैसावया ॥ ४२ ॥ त्रिभुवनींचिया सन्माना । न वचावें ठाया आना । धुरेचिया आसना । भोजनालागीं ॥ ४३ ॥ विश्वाचिया स्तोत्रा । आपण होआवया पात्रा । विश्वें आपलिया यात्रा । कराविया यावें ॥ ४४ ॥ लोकांचिया विविधा पूजा । आश्रयो न धरावया दुजा । भोग भोगावे वोजा । महत्त्वाचिया ॥ ४५ ॥ अंग बोल माखूनि तपें । विकावया आपणपें । अंगहीन पडपे । जियापरी ॥४६॥ हें असो धनमानीं आस । वाढउनी तप कीजे सायास । तैं तेंचि तप राजस । बोलिजे गा ॥ ४७ ॥ परी पहुरणी जें दुहिलें । तैं तें गुरूं न दुभेचि व्यालें । का उभें शेत चारिलें । पिकावया नुरे ॥ ४८ ॥ तैसें फोकारितां तप । कीजे जें साक्षेप । तें फळीं तंव सोप । निःशेष जाय ॥ ४९ ॥ ऐसें निर्फळ देखोनि करितां । माझारीं सांडी पंडुसुता । म्हणौनि नाहीं स्थिरता । तपा तया ॥ २५० ॥ एऱ्हवीं तरी आकाश मांडी । जो गर्जोनि ब्रह्मांड फोडी । तो अवकाळु मेघु काय घडी । राहत आहे ? ॥५१॥ तैसें राजस तप जें होये । तें फळीं कीर वांझ जाये । परी आचरणींही नोहे । निर्वाहतें गा ॥ ५२ ॥ आतां तेंचि तप पुढती । तामसाचिया रीती । पैं परत्रा आणि कीर्ती । मुकोनि कीजे ॥ ५३ ॥

मूढग्राहेणात्मनो यत् पीडया क्रियते तपः । परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥

होईल २४. म्हणून ज्याप्रमाणें तळहाताला केंस विरहितपणा ही निर्मलता स्वभावतःच आहे, त्याप्रमाणें उपर्युक्त प्रकारें तयार झालेल्या मनाचे ठिकाणीं सहजच भावशुद्धि असते २५. अर्जुना ! फार काय सांगावें ! ! जेव्हां मनास ही उपर्युक्त योग्यता प्राप्त होते, तेव्हांच ती स्थिति " मानस तप " अशा नांवास प्राप्त होते २६. देव म्हणतात :– परंतु तें असो; मानस तपाचीं जीं लक्षणें आहेत, तीं मी तुला सर्व सांगितलीं असें समज २७. याप्रमाणें देह, वाचा व चित्त यांच्या योगानें जें त्रिविधत्वास पावले आहे तें सामान्य तप तुला ऐकविलें २८. आतां तीन गुणांच्या संगानें हेंच [ सामान्य तप ] विशेषेंकरून तीन प्रकारचें कसे होतें, तेंहि बुद्धीच्या स्थैर्यात्मक बळानें चांगलें ऐक २९.

अन्वयार्थ——अफलाकांक्षिभिः–फलाची आकांक्षा न करणाऱ्या–युक्तैः–समाहित चित्त –नरैः– पुरुषांकडून–परया श्रद्धया–अतिशय श्रद्धेनें–तप्तं–केलेलें–तत् त्रिविधं तपः–जें तीन प्रकारचें तप त्याला–सात्त्विकं-सात्त्विक–परिचक्षते–म्हणतात १७.

तर हे प्रबुद्धा ! हेंच तप जें आम्हीं तुला तीन प्रकारचें सांगितलें, त्याचेंच पूर्ण श्रद्धापूर्वक आचरण कर, पण ते त्याच्या फलाची आशा सोडून कर २४०. अरे ! ज्यावेळीं पूर्ण अंतःकरणशुद्धीनें आणि श्रद्धारूप आस्तिक्य-बुद्धीनें या तपाचें आचरण केलें जाते त्यावेळीं याच तपाला ज्ञाते जन ' सात्त्विक तप ' असें म्हणतात ४१.

अन्वयार्थ——यत् तपः–जें तप–सत्कार मान पूजार्थं–सत्कार, मान व पूजा यांसाठीं–च–आणि–दंभेन एव–दंभानेंच–क्रियते–केलें जातें–तत्–तें–इह–येथें–राजसं–राजस–चलं–चंचल व–अध्रुवम्–अनित्य –प्रोक्तं–म्हटलें जातें १८.

[ आतां अगोदर राजस तपाचें लक्षण सांगतात ]. अथवा, तपाची स्थापना करण्याच्या मिषानें जगांत द्वैत-भाव निर्माण करून मोठेपणाच्या शिखरावर बसण्याची जे इच्छा करितात ४२. त्रिभुवनांतील सर्व सन्मानानें [ आपल्याविना ] दुसऱ्या कोणाकडेहि जाऊं नये आणि सभेंत व भोजनाचें समयीं पक्तींत आपल्यास अग्रभागीं बसण्याचा मान मिळावा म्हणून ४३. सर्व जगांतील लोकांच्या स्तुतिस्तोत्रास आपणच पात्र व्हावें आणि यच्चयावत् लोकांनीं आपलेच दर्शनास वा यात्रेस यावे म्हणून ४४. तसेंच लोकांच्या नाना प्रकारच्या पूजांनीं आपल्याविना दुसरा कोणताच आश्रय न धरावा व महत्त्वाचे पांघरुणाखालीं सर्वभोग आपल्यासच उपभोगास मिळावेत, अशी ज्यांची इच्छा असते ४५. अरे ! जशी एखादी वृद्ध वेश्या आपले शरीर विकण्याकरितां [ वय झांकून ] वरकांती शृंगार करून थाटामाटानें बसतें, जो आपल्या स्वतःस विकण्याकरितां [ नांवलौकिक वाढण्यासाठीं ] आपलें शरीर व बोलणें तपानें जणुं माखतो [ बाह्यतः शारीरिक क्रियेनें, वेषान्तरानें आणि बोलण्यानें आपण मोठे तपस्वी असल्याचा आव आणतो ] ४६. हें असो परंतु द्रव्य व मान यांच्या प्राप्तीची आशा धरून, वाढवून जें सायासानें भरलेलें तप करणें, त्यालाच ' राजस तप ' म्हटलें जातें ४७. परंतु पहुरणी नांवाच्या किड्यानें गाभणे गुराचे थान चोखलें असतां ते गुरूं व्यायले तरी दूध देत नाहीं, किंवा उभे शेत जनावरास चारले असतां पिकण्यासाठीं कांहींच उरत नाहीं म्हणजे त्यापासून पिकाची प्राप्ति होत नाहीं ४८. तसें जे तप आपली प्रसिद्धि व्हावी या हेतूनें व अतिशय कष्टानें केलेलें असते तें तप फळाचे बाबतीत पूर्णतया निष्फळ होतें. शेवटीं फल काय तर ' कांहीं नाहीं ' असें होते ४९. याप्रमाणें अर्जुना ! तपापासून फलप्राप्ति होत नाहीं, असें समजल्यावर तो ते पाहून तें तप मध्येंच सोडून देतो, म्हणून त्या तपाला स्थिरता नसते २५०. सहज विचार करून पाहिलें तर अकालीं आलेला मेघ संपूर्ण आकाशास व्यापतो व जणुं तो ब्रह्मांड फोडून टाकील अशी गर्जनाहि करितो; परंतु तो अकालीं मेघ घटकाभर तरी टिकतो काय ? ५१. तसें जें राजस तप आहे. ते फलाचें बाबतींत तर खरोखर वांझेप्रमाणें व्यर्थच होत जाते; परंतु अर्जुना ! ते आचरणांतहि अखेरपर्यंत [ अव्याहतपणें ] टिकणारें असें नसतें ५२. आतां यापुढें तेंच तप जेव्हां "तामस तपाच्या" पद्धतीनें आचरिलें जाते तेव्हां त्या [ या राजस तपांत निदान ऐहिक कीर्ति तरी मिळण्याचा संभव आहे ] तामस तपापासून तर कीर्ति आणि स्वर्ग या दोहोंचीहि प्राप्ति होणार नाहीं ! असेंच ते केलें जातें ५३.

अन्वयार्थ——यत् तपः–जें तप–मूढग्राहेण–अविवेक-युक्त निश्चयानें–आत्मनः–आत्म्याच्या–पीडया–पीडेनें–वा–अथवा–परस्य–दुसऱ्याच्या–उत्सादनार्थं–विनाशा-साठीं–क्रियते–केलें जातें–तत्–तें–तामसं–तामस तप म्हणून–उदाहृतम्–म्हटलेलें आहे १९.

१ मानसतप अशा नांवाला. २ योग्य. ३ कायावाचामनेंकरून. ४ तीन प्रकारचें होतें. ५ बुद्धीच्या बळानें.

६ ज्ञात्या. ७ पूर्ण सत्त्वशुद्धि होण्याकरितां. ८ महत्त्वरूपी पर्वताच्या शिखरावर. ९ अग्रभागींच्या. १० चांगलेपणानें.

केवळ मूर्खपणाचा वारा । जीवीं घेऊनि धनुर्धरा । नामें ठेविजे शरीरा । वैरियांचें ॥ ५४ ॥ पंचाग्नीची दडगी । खोलैंवीजती शरीरालागीं । कां इंधनें कीजे हें आगी । आंतु लावी ॥५५॥ माथां जाळिजती गुगुळु । पाठीं घालिजती गळु । आंग जाळिती इंगळु । जळतभीतां ॥ ५६ ॥ दवडोनि श्वासोच्छ्वास । कीजती वायांचि उपवास । कां घेपंती धूमाचें घांस । अधोमुखें ॥ ५७ ॥ हिमोदकें आकंठें । खडकें सेविजती तंटें । जितया मांसाचें चिमुटे । तोडिती जेथ ॥ ५८ ॥ ऐसी नानापरी हे काया । घांय सूतां पैं धनंजया । तप कीजे नाशावया । पुढिलांतें ॥ ५९ ॥ आंगभारें सुटला धोंडा । आपण फुटोनि होय खंडखंडा । कां आड जालियातें रगडा । करी जैसा ॥ २६० ॥ तेवीं आपलिया आटणियां । सुखें असतया प्राणिया । जिणावयां शिराणियां । कीजती गा ॥ ६१ ॥ किंबहुना हे वोखटी । घेऊनि क्लेशाची हांतवटी । तप निफजे तें किरीटी । तामस होय ॥ ६२ ॥ एवं सत्त्वादिकांच्या आंगीं । पडिलें तप तिहीं भागीं । जालें तेंही तुज चांगी । दाविलें व्यक्ती ॥ ६३ ॥ आतां बोलतां प्रसंगा । आलें म्हणौनि पैं गा । करूं रूप दानलिंगां । त्रिविधा तया ॥ ६४ ॥ येथ गुणाचेनि बोलें । दानही त्रिविध असे जालें । तेंचि आइक पहिलें । सात्त्विक ऐसें ॥ ६५ ॥

दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे । देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥

तरी स्वधर्मा आंतौतें । जें जें मिळेल आपणयातें । तें तें दीजे बहुतें । सन्मानयोगें ॥ ६६ ॥ जालया सुबीजेंप्रसंगु । पडे क्षेत्रेंवाफेचा पांगु । तैसाचि दानाचा हा लैंगु । देखतसें ॥ ६७ ॥ अनर्घ्य रत्न हातां चढे । तैं भांगारांची वोढी पडे । दोनी जालीं तरी न जोडे । लेतें आंग ॥ ६८ ॥ परी सण सुहृद संपत्ती । हे तिन्ही येकीं मिळती । जैं भाग्य धरी उन्नती । आपुल्याविषयीं ॥ ६९ ॥ तैसें निफजावया दान । जैं सत्त्वासि ये संवाहनें । तैं देश काळ भाजन । द्रव्यही मिळे ॥ २७० ॥ तरी आधीं तंव प्रयत्नेंसीं । होआवें कुरुक्षेत्र का काशी । नातरी तुकें जो इहींसीं । तो देशुही हो ॥ ७१ ॥ तेथ रविचंद्रराहुमेळु । होतां पाहे पुण्यकाळु । का तयासारिखा निर्मळु । आनुही जाला ॥ ७२ ॥ तैशा काळीं तिये देशीं । होआवी पात्र संपत्ती ऐसी । मूर्ति आहे धरिली जैसी । शुचित्वेंचि कां ॥ ७३ ॥

हे धनुर्धरा ! केवळ मूर्खपणाचा व्यर्थ अभिमान घेऊन जे आपल्या शरीरास सुद्धां वैरी असेंच समजतात ५४. पंचाग्नि ज्वाळा शरीरास लावल्या जातात, आपलें शरीर हेंच सरपण आहे, असें मानून त्यास पंचाग्नीनें पेटवितात ५५. आपल्या डोक्यावर [ शेगडी घेऊन त्यांत ] गुगुळ जाळतात, पाठींत गळ घातले जातात आणि पाहतांच भय वाटेल अशा रखरखित निखाऱ्यांनीं आपले शरीर जाळतात ५६. श्वासोच्छ्वास व्यर्थ दवडले जातात व व्यर्थच उपासहि करितात अथवा झाडादिकांस उफराटे टांगून घेऊन खालीं तोंड करून धुराचे घास–'धूम्रपान' करितात ५७. हिंवाळ्यांत नदींत गळ्याइतक्या थंड पाण्यांत उभे राहतात व खडकावर किंवा नदीचें तीरास बसतात; आणि जीवंतपणींच आपल्या अंगाचें मांसाचें लचकेच्या लचके तोडतात ५८. हे धनंजया ! अशा नानातऱ्हेनें आपल्या या शरीरांस घाव घालून, दुःख देऊन जे तप करतात आणि तेंहि दुसऱ्याचा नाश करण्याकरितांच तपाचरण करितात ५९. डोंगरावरून सुटलेला धोंडा आपल्या जडपणानें खालीं पडला, म्हणजे त्याचे स्वतःचे तर तुकडे तुकडे होतातच; परंतु तो खालीं येतेवेळेस त्याचे सपाट्यांत एखादी वस्तु आड सांपडली तर जसा तिचाहि चुराडा करितो २६०. तसें आपल्या शरीरास दुःख देऊन जे सुखांत असतील त्या प्राण्यांना अथवा जे प्रमुख असतील त्यांना जिंकण्याच्या तीव्रेच्छेनें जी तपाचरणें केलीं जातात ६१. अर्जुना ! फार काय सांगावें! परंतु अशा वाईट व क्लेशयुक्त रीति स्वीकारून जे तप उत्पन्न होतें तेच 'तामस तप' होय ६२. याप्रमाणें सत्त्व रज व तम यांच्या अनुरोधानें जे तपाचे तीन भाग झाले, तेंहि तुला चांगले स्पष्ट करून दाखविले ६३. आतां, बोलण्याच्या ओघानेंच आलें म्हणून दानाचेंहि तीन प्रकार कसे होतात, त्याचीहि लक्षणें तुला सांगतों ६४. हे पहा ! गुण म्हटलें कीं, त्या गुणाच्या अनुरोधानें दानाचेंहि तीन प्रकार झाले आहेत. त्यांपैकीं पहिले जें 'सात्त्विक दान' असें आहे तें ऐक ६५.

**अन्वयार्थ**—**यत् दानं**–जें दान–**दातव्यम् इति**-मला अवश्य द्यावयास पाहिजे, अशा भावनेनें–**अनुपकारिणे**–उपकार न करणाऱ्या–प्रत्युपकार करण्यांत असमर्थ असलेल्या पुरुषाला–**देशे काले च पात्रे च**–विहित देश, काल व पात्र यांमध्यें–**दीयते**–दिलें जातें–**तत् दानं**–तें दान—**सात्त्विकं**—सात्त्विक–**स्मृतं**–म्हटलेलें आहे २०.

तर आपल्या स्वधर्माचरणानें व सन्मार्गानें मिळविलेलें वा मिळालेलें जें जें कांहीं धनादिक असेल तें मोठ्या आदरातिथ्यानें दुसऱ्यास अर्पण करावें ६६. कदाचित् उत्तम बीज मिळाले तरी ते पेरण्याकरितां उत्तम जमीन व वाफसा यांची उणिव पडतें, त्याप्रमाणें या सात्त्विक दानाचा योग दिसतो [ कारण इच्छा असली तरी दान देण्यास योग्य द्रव्य, पात्र मनुष्य, योग्य देश व काल यांचा एकदम मिळून योग होणें अतिशय अवघड असते ] ६७. मोलवान् रत्न हातीं सांपडलें तरी तेव्हां त्याला कोंदण करण्यास सोन्याची उणीव पडते; कदाचित् रत्न व सोनें दोन्हीं मिळाली तरी अलंकार घालण्यास लागणारें चांगलें अंग–इंद्रिय मिळत नाहीं ६८. परंतु दिवाळीसारखा सण, आपले आप्तवर्ग व संपत्ति हे तीन योग तेव्हांच एकत्र मिळून येतात जेव्हा भाग्योन्नति झालेली असतें. कारण, हें केवळ भाग्योत्कर्षावरच अवलंबून आहे ६९. तसें आपल्या हातून योग्य सात्त्विक दान घडवून आणण्याविषयीं जेव्हां सत्त्वगुणास उन्नत अवस्था येऊन त्याची साह्यता होते तेव्हा देश–काल, सत्पात्र व द्रव्य हे सर्व योग एकत्र जुळून अनुकूल होतात २७०. प्रथम तर प्रयत्नानें होईल तेवढें दान करण्यास कुरुक्षेत्र अथवा काशी हे देश असावें, नाहींतर जे त्यांच्या बरोबरीस येतील असे दुसरे देशहि असले तरी चालेल ७१. त्या पुण्यक्षेत्रांत सूर्य किंवा चंद्र आणि राहू यांचा योग येतो [ सूर्यग्रहण किंवा चंद्रग्रहण ] या सारखा दानार्थ पुण्यकाल असतो, अथवा त्यांच्या योग्यतेचाच दुसरा पवित्र काल असला तरीहि चालेल ७२. तशा देशांत व त्या पर्वकालीं असा सत्पात्र ब्राह्मण असावा कीं, तो जणुं काय शुचिर्भूतपणाची साक्षात् मूर्तिच, त्या रूपानें अवतरली आहे ७३.

१ शरीराला वैरी असें समजून. २ तसज्वाला. ३ लागतात. ४ सर्पण. ५ पेटवी. ६ काष्टें. ७ घेतले जातात. ८ कंठापर्यंत. ९ खडकाळ. १० नदीतट. ११ क्लेश देतां. १२ इतरास. १३ प्रतिबंध केल्यास. १४ आपल्या शरीरास दुःख देऊन. १५ जिंकण्यास. १६ उत्कट इच्छा. १७ वाईट. १८ रीति. १९ उपजते. २० प्रकार. २१ मध्यें, आंत.

२२ उत्तम बीज, मिळालें तर. २३ शेताची व वाफेची. २४ जरूरी. २५ प्रसंग, संबंध. २६ मोलवान्. २७ सोन्याची. २८ निवड, आवश्यकता. २९ घालण्यास योग्य. ३० दिवाळी आदि. ३१ आप्तवर्ग. ३२ उत्कर्ष. ३३ साह्य होते. ३४ दान देण्यास योग्य, सत्पात्र. ३५ साम्य पावे. ३६ सूर्य-चंद्रग्रहण. ३७ दुसरा समय.

आचाराचें मूळपीठ। वेदांची उतारपेठ। तैसें द्विजरत्न चोखट। पावोनियां ॥ ७४ ॥ मग तयाच्या ठाईं वित्ता। निवर्तवावी स्वसत्ता। परी प्रियापुढें कांता। रिगे जैसी ॥ ७५ ॥ का जयाचें ठेविलें तया। देऊनि होईजे उतराइया। नाना हडपें विडा राया। दिधला जैसा ॥ ७६ ॥ तैसेनि निष्कामें जीवें। भूम्यादिक अर्पावें। किंबहुना हांवे। नेदावें उठों ॥ ७७ ॥ आणि दान जया द्यावें। तयातें ऐसेया पाहावें। जया घेतलें नुमचवे। कायसेंनही ॥ ७८ ॥ साद घातलिया आकाशा। नेदी प्रतिशब्दु जैसा। का पाहिला आरसा। येरीकडे ॥ ७९ ॥ नातरी उदकाचिये भूमिके। आफळिलेनि कंदुकें। उधळौनि कवतिकें। न येईजे हाता ॥ २८० ॥ नाना वसो घातला चारू। माथां तुरंबिला बुरू। न करी प्रत्युपकारु। जियापरी ॥ ८१ ॥ तैसें दिधलें दातयाचें। जो कोणेही आंगें नुमचे। अर्पिलया साम्य तयाचें। कीजे पैं गा ॥ ८२ ॥ ऐसिया जें सामग्रिया। दान निफजे वीरराया। तें सात्त्विक दानवर्यां। सर्वांही जाण ॥ ८३ ॥ आणि तोचि देशु काळु। घडे तैसाचि पात्रमेळु। दानभागुही निर्मळु। न्यायगतु ॥ ८४ ॥

यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः। दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥ २१ ॥

परी मनीं धरूनि दुभतें। चारिजे जेवीं गाईतें। का पेंव करूनि आइतें। पेरूं जाइजे ॥ ८५ ॥ नाना दिठी घालूनि आहेरा। अवंतुं जाइजे सोयिरा। वाण धाडिजे घरा। वोवसीयाचे ॥ ८६ ॥ पैं कळांतर गांठी बांधिजे। मग पुढिलांचें काज कीजे। पूजा घेऊनि रसु दीजे। पीडितांसी ॥ ८७ ॥ तैसें जया जें दान देणें। तो तेणेंचि गा जीवनें। पुढती भुंजावा भावें येणें। दीजे जें का ॥ ८८ ॥ अथवा कोणी वाटे जातां। घेतलें उमचों न शकता। मिळे जैं पंडुसुता। द्विजोत्तमु ॥ ८९ ॥ तरी कवड्या एकासाठीं। अशेषां गोत्रांचींच किरीटी। सर्वे प्रायश्चित्तें सुयें मुठीं। तयाचिये ॥ २९० ॥ तेवींचि पारलौकिकें। फळें वांछिजती अनेकें। आणि दीजे तरी भुकें। येकाही नोहे ॥ ९१ ॥ तेंही ब्राह्मणु नेवो सरे। कीं हाणिचेनि शिणें झांसुरे। सर्वस्व जैसें चोरें। नागऊनि नेलें ॥ ९२ ॥ बहु काय सांगों सुमती। जें दीजे या मनोवृत्ती। तें दान गा त्रिजगतीं। राजस पैं ॥ ९३ ॥

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते। असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

तो म्हणजे केवळ आचाराचेंच मुख्य आदिस्थान व वेदांतील सर्व माल उतरविण्याचें स्थान–वेदशास्त्रसंपन्न असा उत्तम सत्पात्र श्रेष्ठ ब्राह्मण प्राप्त झाला असतां ७४. मग त्या ब्राह्मणास दान द्यावयाची जी संपत्ति त्यावरील आपली सत्ता काढून घ्यावी व त्यास ती संतोषानें अर्पण करावी, ती अशी कीं, जशी स्त्री आपल्या पतीजवळ स्वसंतोषानें आपले स्वामीत्व त्यास देऊनच जात असते ७५. किंवा एखाद्याची आपल्याजवळ असलेली ठेव आपण जशी त्यास स्वसंतोषानें परत देऊन उतराई व्हावें अथवा हुजऱ्याजवळ असलेला विडा जसा त्यानें राजास अर्पण करावा ७६. तसें निष्काम बुद्धीनें भूमि आदिकरून दान ब्राह्मणास अर्पण करावें, फार काय सांगावे ! ! त्या दानाविषयीं कोणत्याहि प्रकारच्या फलेच्छेस उत्पन्न होऊं देऊं नये; ७७. आणि ज्यास दान द्यावयाचें तो अशा रीतीचा असल्याचा पहावा कीं, ज्याचेकडून आपल्यास केलेल्या दानाची परत फेड कोणत्याहि प्रकारें होणार नाहीं ७८. आकाशास पुष्कळ आरोळ्या, हाका मारल्या तरी जसें त्याचें प्रत्युत्तर आकाश देत नाहीं; किंवा आरशाचे मागचे बाजूस पाहिलें असतां, जसें त्यांत तो प्रतिबिंब दाखवित नाहीं ७९. अथवा उदकाच्या सपाटीवर चेंडू मारला असतां, तो जसा उसळून येऊन आपण होऊन हातांत येत नाहीं २८०. किंवा वसूस [ पोळास ] चारा घातला असतां त्या चाऱ्यापासून जसा तो उपकार परत फेडीत नाहीं अथवा ज्याप्रमाणें कृतघ्न मनुष्याचे मस्तक पूजिले [ त्याच्यावर प्रेमानें कितीहि उपकार केले] तरी तो ते परत फेडीत नाहीं ८१. त्याप्रमाणें दान घेणारा, दात्यानें दिलेल्या दानाची कोणत्याहि प्रकारें मोबदला देऊन परत फेड करूं शकणार नाहीं, त्यास दान समर्पण केल्यावर दान देणाऱ्यानें चित्तांत त्याचा अभिमान किंवा त्याचे स्मरणहि ठेऊं नये ८२. हे वीरोत्तमा अर्जुना ! अशा सर्व सामुग्रीनें युक्त असें जें दान केले जाते तें सर्वांत श्रेष्ठ असें ' सात्त्विक दान ' होय, असें तूं समज ८३. आणि तोच दानाला योग्य देश व योग्य काल जुळुन आलेला असतो पात्रहि तसेंच योग्य असते व ज्याचें दान करावयाचें तो दानभागहि तसाच निर्मळ व शास्त्रानुसार मिळविलेला असतो ८४.

**अन्वयार्थ**—**तु**–पण–**यत्**–जें दान–**प्रत्युपकारार्थं**–प्रत्युपकारासाठीं–**वा**–**पुनः**–किंवा–**फलम् उद्दिश्य**–फलाचा उद्देश धरून–**च परिक्लिष्टं**–व अतिशय क्लेशानें–**दीयते**–दिलें जातें–**तत्**–तें–**राजसं दानं**–राजस दान–**स्मृतं**–म्हटलेलें आहे २१.

[ आतां राजस दानाचीं लक्षणें सांगतों, असा सर्व योग्य योग आलेला असतो.] परंतु मनांत दुधाची इच्छा धरून जसें गाईस उत्तम रीतीनें चारावें, पोसावें किंवा दाणे सांठविण्याकरितां अगोदरच पेव तयार करून मगच शेतांत धान्य पेरावयास जावे ८५. अथवा अहेराच्या प्राप्तीवर नजर ठेवून जसें सोयऱ्याधायऱ्यास लग्नकार्याचें वेळीं आमंत्रण करण्यास जावे किंवा ओंवसा करणारीचें म्ह. परत माघारा देणारीचेच घरीं वाण पाठवावे ८६. अथवा लांच पदरांत बांधून मगच जसें दुसऱ्याचें काम करावें, किंवा द्रव्य घेऊन मगच जसें रोग्यास औषध द्यावें ८७. तसें ज्याचे दान देणें असते अर्थात् ज्याला जे दान द्यावे त्याच्च मानानें त्यापासून त्याची परतफेड होऊन तो आपल्या उपयोगी पडावा [ व त्यानें आपली लोकांत वाखाणणी करावी ] या हेतूनें दान करतात ८८. अथवा अर्जुना ! वाटेनें जातांना कोणी एखादा सहज उत्तम ब्राह्मण भेटला, पण त्यापासून घेतलेल्या दानाचा मोबदला प्रत्युपकार होऊं शकणार नाहीं असा असेल तर ८९. हे किरीटी, त्यास एक कवडी म्ह. अत्यल्प द्रव्य दान देऊन त्याबद्दल आपल्या सर्व आप्तवर्गांच्या, सर्व प्रायश्चित्तांचा संकल्प करून त्याचे हातावर पाणी सोडतो २९०. त्याचप्रमाणें त्या दानापासून परलोकच्या अनेक फलांची आशा करून त्यास ते दान देतात, आणि ते दिलेले [ तरी किती थोडके असते कीं तें ] त्या ब्राह्मणाच्या एक वेळच्या भुकेलाहि पुरावयाचें नाहीं ९१. बरें ! तेवढेंच अत्यल्प दान कां होईना, पण [ तें तरी संतोषानें द्यावयाचें कां ! तर नाहीं ! ] तो ब्राह्मण तें घेऊन गेला कीं, आपली मोठी हानि झाली असें म्हणून त्या नुकसानीच्या शिणानें मनांत झुरतो जणुं काय चोरानें त्याचें सर्वस्वच हरण करून लुटून नेलें ! ९२. हे सुमते अर्जुना ! आणखी काय सांगावें ! ! अशा मनोवृत्तीनें जे दान दिलें जाते तें दान त्रिजगतांत ' राजस दान ' होय असें समज ९३.

**अन्वयार्थ**—**यत्दानं**–जें दान–**अदेशकाले**–अयोग्य देश व अविहित काल यांत–**च**–व–**अपात्रेभ्यः**–अपात्रांना–**असत्कृतम्**–असत्कारानें व–**अवज्ञातम्**–अवज्ञेनें–**दीयते**–दिलें जातें–**तत्**–तें–**तामसं**–तामस दान–**उदाहृतं**–म्हटलेलें आहे २२.

मग म्लेच्छांचे वेंसौटे । दांगोणे[३] हन कैकंटे । कां शिबिरें[४] चोहटे । नगरींचे ते
॥ ९४ ॥ तेही ठाईं मिळणी । समयो सांजवेळु कां रजनी । तेव्हां उदार होणें धनीं ।
चोरियेच्या ॥ ९५ ॥ पात्रें भाट नागारी । सामान्य स्त्रियां का जुवारी । जिये मूर्तिमंते
भुररीं । भुले तया ॥ ९६ ॥ रूपानृत्याची पुरवणी । ते पुढां डोळेभारणी । गीतं-
भाटीव तो श्रवणीं । कर्णजपु ॥ ९७ ॥ तयाहीवरी अळुमाळु । जैं घे फुलागंधाचा
गुंगुळु । तंव भ्रमाचा तो वेताळु । अवतरे तैसा ॥ ९८ ॥ तेथ विभांडूनियां जग ।
आणिले पदार्थ अनेग । तेणें घालूं लागे मातंग । गंवादी जैसी ॥ ९९ ॥ एवं ऐसेनि जें
देणें । तें तामस दान मी म्हणें । आणि घडे दैवगुणें । आणिकही ऐक ॥ ३०० ॥
विपायें घुणाक्षर पडे । टाळिये काउळा सांपडे । तैसें तामसां पर्व जोडे । पुण्यदेशीं
॥ १ ॥ तेथ देखोनि तो आथिला । योग्यु मागोंही आला । तोही दर्पा चढला ।
भांबावें जरी ॥ २ ॥ तरी श्रद्धा न धरी जीवीं । तया माथाही न खालवी । स्वयें न
करी ना करवी । अर्घ्यादिक ॥ ३ ॥ आलिया न घली बैसों । तेथ गंधाक्षतांचा काय
अतिसो । हा अप्रसंगु कीर असो । तामसीं नरीं ॥ ४ ॥ पैं बोळविजे रिणाइतु । तैसा
झकवी तयाचा हातु । तूं करणें याचा बहुतु । प्रयोगु तेथ ॥ ५ ॥ आणि जया जें दे
किरीटी । तयातें उमाणी तयासाठीं । मग कुबोलें कां लोटी । अवज्ञेच्या ॥ ६ ॥ हें
बहु असो यापरी । मोल वेंचणें जें अवधारीं । तया नांव चराचरीं । तामस दान ॥ ७ ॥
ऐसें आपुलाला चिन्हीं । अळंकृतें तिन्हीं । दानें दाविलीं अभिधानीं । रजतमाचिया
॥ ८ ॥ तेथ मी जाणत असें । विपायें तूं गा ऐसें । कल्पिसील मानसें । विचक्षणा
॥ ९ ॥ जे भवबंधमोचक । येकलें कर्म सात्त्विक । तरी कां वेखासी सदोख । येर
बोलावीं ? ॥ ३१० ॥ परी नोसंतितां विवसी । भेटी नाहीं निधीसी । कां धूं न
साहतां जैसी । वाती न लगे ॥ ११ ॥ तैसें शुद्धसत्त्वाआड । आहे रजतमाचें कवाड ।
तें भेदणें यातें कीड । म्हणावें कां ? ॥ १२ ॥ आम्ही श्रद्धादि दानांत । जें
समस्तही क्रियाजात । सांगितलें कां व्यास्त । तिहीं गुणीं ॥ १३ ॥ तेथ भरंवसेनि
तिन्ही । न सांगोंचि ऐसें मानीं । परी सत्त्व दावावया दोन्ही । बोलिलों येरें
॥ १४ ॥ जें दोहींमाजीं तिजें असे । तें दोन्ही सांडितांचि दिसे । अहोरात्रत्यागें
जैसें । संध्यारूप ॥ १५ ॥ तैसें रजतमविनाशें । तिजें जें उत्तम दिसे ।

[आतां तामस दानाचीं लक्षणें सांगतो ] मग म्लेंच्छांची वस्ती असेल त्या ठिकाणीं अथवा अरण्यांत किंवा अपवित्र जागा असेल तेथें अथवा तंबूत, नगराच्या चव्हाट्यावर ९४. तशांत त्या ठिकाणीं जमून तिन्हीं-सांजा अथवा रात्रीची वेळ प्राप्त झाल्यावर, चोरी करून आणिलेल्या धनावर [ दान देण्यास ] उदार होणें ९५. हें दान देण्यास तेथें पात्र कोण ? तर भाट लोक, तमासगीर लोक, गारुडी किंवा वेश्या अथवा जुगार खेळणारे लोक किंवा जे मूर्तिमंत चेटकी–भूलच आहेत, यांच्यावर खुष होतात व हीच त्यांची पात्रें ! ९६. कारण, अशा लोकांनीं त्यांच्या पुढें नृत्य गायन केल्यावर त्यांत रूपाची व नृत्याची भर पडून ती भूल पाडते अथवा भाट लोकांनीं स्तुति केलेली ऐकल्यावर, विवेक शून्य होऊन तीच त्यांच्या कानांत नेहमीं कर्णजप–तीच गुणगुण चालू असते ९७. त्याहीनंतर ते चैनींत असतात तेव्हां कांहींसा पुष्पांचा अगर सुगंधि द्रव्यें यांचाच सुगंधरूपी गुगुळाचा धूप घेण्यांत तल्लीन होतो तेव्हां तो केवळ भ्रमाचें मूर्तिमंत वेताळच बनून अवतीर्ण होतो ९८. मग दुसऱ्यास लुटून आणलेलें जें अनेक पदार्थ त्यांच्या योगानें मांग वगैरे लोकांस अन्नसत्रहि घालतो ९९. याप्रमाणें जें जें दान करणें तें तें तामस 'दान' असें मी म्हणतो आणि दैववशात् आणखीहि एक [ सुयोग ] प्रकार घडून येतो; तो ऐक ३००. तर कदाचित् 'घुणा'–संज्ञक किड्यानें भुंग्यानें लांकूड पोखरल्यावर त्यास [ रामनाम किंवा अन्य ] अक्षरांचा आकार यावा किंवा सहज टाळी वाजवीत असतां तींत सहजच कावळाहि सांपडावा त्याप्रमाणें तामस मनुष्यास पुण्यक्षेत्राचें ठिकाणीं क्वचित् पर्वणीचा लाभ व्हावा १. आणि त्या ठिकाणीं ह्याची ऐश्वर्य संपन्नता पाहून, योग्य सत्पात्र अतीथि दान मागावयासहि आला आणि तशांत त्यास पाहून हा गर्वातिरेकामुळें भांबाऊन गेलेला असलाच तर अर्थात् त्याला कांहीं द्यावें असेंहि जरी मनांत आलेंच २. तरी त्याजविषयीं पूज्य बुद्धि बाळगीत नाहीं व त्यास मस्तक खालीं लववून नमस्कारहि करीत नाहीं. त्या ब्राह्मणाचें अर्घ्यादिकहि आपण स्वतः करीत नाहीं व दुसऱ्याकडूनहि समर्पण करवीत नाहीं ३. आणि आलेल्या सत्पात्रास आसनहि घालीत नाहीं, मग गंधाक्षतांनीं त्याचे विशेष पूजन करणें इत्यादि हा विशेषपणा कोठचा? हें सर्व प्रकार त्या तामसी पुरुषांचे ठिकाणीं खरोखर असंभवनीय होत ४. परंतु कांहीं थोडेसे देऊन ऋणकऱ्या सावकाराची बोळवण करावी, त्याप्रमाणें त्याच्या हातावर कांहीं द्रव्यादि अल्पदान ठेवून त्याची बोळवणूक करून फसवितो. तो तमोगुणीं 'अरे तुरे' करून त्याचा अपमान करतो ५. आणि अर्जुना ! तो जर 'अहो ! माझ्यासारख्या ब्राह्मणास अधिक दान मिळावें' असें म्हणाला तर त्याला जे देतो तेवढ्यावरच "इतकीच तुझी योग्यता, किंमत आहे," अशी त्याची अवहेलना करून मोजतो ! इतकेच नव्हे तर, त्या ब्राह्मणास वाईट शब्द बोलून, धक्के मारून घालवितो, अशी त्याची अमर्यादा करतात ६. हें पुष्कळ बोलणें राहूं दे. याप्रमाणें जें द्रव्य खर्च–दान करणें, त्याला या चराचरात्मक जगांत 'तामस दान' असें म्हणतात ७. याप्रमाणें आपापल्या लक्षणांनीं अलंकृत म्ह० चिन्हांनीं युक्त अशी हीं सात्त्विक, राजस आणि तामस हीं तिन्ही दानें तुला स्पष्ट सांगितलीं ८. त्यांविषयीं हे बुद्धिमान् अर्जुना ! मी हे जाणत आहे कीं, येथें कदाचित् तूं आपल्या मनानें अशा तऱ्हेची कल्पना करशील कीं ९. संसार बंधनापासून सोडविणारे जर एकटे सात्त्विक कर्मच आहे, तर त्यावांचून पाशांतून सोडविण्याचे बाबतींत विरुद्ध, दोषयुक्त अशी जीं इतर वेगळीं राजस, तामस कर्में, त्यांचें वर्णन कां करावें ? ३१०. दृष्टान्तपूर्वक उत्तर सांगतात, अरे ! जमीनींतील द्रव्याच्या ठेव्यावरील समंधाचें, पिशाच्याचे निवारण केल्याशिवाय जसें तें पुरलेले हातीं येत नाहीं, अथवा धूर सोसला नाहीं तर जसा अग्नि वा दीप लागत–पेटत नाहीं ११. तसें शुद्ध सत्त्वगुणाचें आड जें रजस्तमोगुणाचे कवाड–प्रतिबंध आहे, तें फोडून नाहींसा करण्याचा प्रयत्न केला असतां त्यास वाईट कां म्हणावें ? १२. आम्हीं श्रद्धेपासून आरंभ करून शेवट दानापर्यंत जेवढ्या कांहीं क्रियामात्र म्हणून सांगितल्या; त्या सर्व तीन गुणांनीं व्याप्त–युक्त आहेत १३. ते तिन्हीं गुण सांगण्याचा खरोखर मनोदय–इरादा नव्हता; परंतु सत्त्वगुणाचे रूप उघड स्पष्ट रीतीनें दाखविण्याकरितां दुसऱ्या दोन गुणांचें वर्णन ओघानें करावेंच लागले, असें समज १४. जें दोहोंमध्यें तिसरें आहे, तें त्या दोवांचा त्याग केल्यावर दिसतें. ज्याप्रमाणें दिवस व रात्र यांचा त्याग केला असतां त्या दोहोंमधील संध्याकाळचें स्वरूप दिसते १५. त्याप्रमाणें रज व तम यांच्या नाशानें तिसरें

१ वस्ती. २ अरण्यें. ३ अपवित्र भूमि. ४ तंबू. ५ गारुडी, तमासगीर. ६ वेश्या. ७ भूल पडणारीं. ८ नेत्र सुख. ९ स्तुति. १० थोडासा. ११ सुवास १२ नागवून, लुटून. १३ मांग १४ अन्नछत्रास

तें सत्त्व हें आपैसें । फावासि ये ॥ १६ ॥ एवं दाखवावया सत्त्व तुज । निरूपिलें तम रज । तें सांडूनि सत्त्वें काज । साधीं आपुलें ॥ १७ ॥ सत्त्वेंचि येणें चोखाळें । करीं यज्ञादिकें सकळें । पावसी तैं करतळें । आपुलें निज ॥ १८ ॥ सूर्यें दाविलें सांतें । काय एक न दिसे तेथें । तेवीं सत्त्वें केलें फळातें । काय नेदी ? ॥ १९ ॥ हे कीर आवेडतांविखीं । शक्ति सत्त्वीं आथी निकी । परी मोक्षेंसी एकीं । मिसळणें जें ॥ ३२० ॥ तें एक आनचि आहे । तयाचा सावावो जैं लाहे । तैं मोक्षाचाही होये । गांवीं संरतें ॥ २१ ॥ पैं भांगारं जऱ्ही पंधरें । तऱ्ही राजांवळींचीं अक्षरें । लाहे तैंचि सरे । जियापरी ॥ २२ ॥ स्वेच्छें शीतळें सुगंधें । जळें होती सुखप्रदें । परी पवित्रत्व संबंधें । तीर्थाचेनि ॥ २३ ॥ नयी हो कां भलतैसी थोरी । परी गंगा जैं अंगिकारी । तैंचि तिये सागरीं । प्रवेशु गा ॥ २४ ॥ तैसें सात्त्विका कर्मा किरीटी । येतां मोक्षाचिये भेटी । न पडे आंडकाठी । तें वेगळें आहे ॥ २५ ॥ हा बोलु आइंकतखेवीं । अर्जुना औधि न माये जीवीं । म्हणे देवें कृपा करावी । सांगावें तें ॥ २६ ॥ तेथ कृपाळुचक्रवर्ती । म्हणे आइक तयाची व्यक्ती । जेणें सात्त्विक तें मुक्ती- । रत्न देखे ॥ २७ ॥

ॐतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः । ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥

तरी अनादि परब्रह्म । जें जगदादि विश्रामधाम । तयाचें एक नाम । त्रिधा पैं असे ॥ २८ ॥ तें कीर अनाम अजाती । परी अविद्यावर्गाचिये राती- । माजीं वोळखावया श्रुती । खूण केली ॥ २९ ॥ उपजलिया बाळकासी । नांव नाहीं तयापासीं । ठेविलेनि नांवेंसी । ओ देत उठी ॥ ३३० ॥ कष्टले संसार- शिणें । जे देवों येती गाऱ्हाणें । तयां ओ दे नांवें जेणें । तो संकेतु हा ॥ ३१ ॥ ब्रह्माचा अबोलां फिटावा । अद्वैतत्त्वें तो भेटावा । ऐसा मंत्रु देखिला कणवा । वेदें बापें ॥ ३२ ॥ मगें दाविलेनि जेणें ऐकें । ब्रह्म आळविलें कवतिकें । मागां असत ठाके । पुढां उभें ॥ ३३ ॥ परी निगमाचळशिखरीं । उपनिषदार्थनगरीं । आहाति जे ब्रह्माच्या येकेंहारीं । तयांसीच कळे ॥ ३४ ॥ हेंही असो प्रजापती । शक्ति जे सृष्टि करिती । ते जया एका आवृत्ती । नामाचिये ॥ ३५ ॥ पैं सृष्टीचिया उपक्रमा- । पूर्वीं गा वीरोत्तमा । वेडा ऐसा ब्रह्मा । एकला

जे उत्तम दृष्टोत्पत्तीस येते तो सत्त्वगुण होय हे आपोआपच समजून येते १६. अशा प्रकारें सत्त्वगुण स्पष्ट दाखविण्याकरितां तुला तम व रज या गुणांचीं लक्षणें सांगितलीं, तर त्या रज-तमाचा त्याग करून सत्त्वगुणांच्या योगें तूं आपली कार्यसिद्धि करून घे १७. या शुद्ध सत्त्वगुणानेंच तूं यज्ञादि सर्व कर्मांचें आचरण कर, म्हणजे त्यामुळें तुला ते स्वस्वरूप तळहातांतील वस्तूप्रमाणें अगदीं सहज प्राप्त होईल १८. स्वतः सूर्यानेंच जर कोणतीहि वस्तु दाखविली तर मग त्यास या जगांत काय एक दिसणार नाहीं? तसें सत्त्वगुणानें कर्माचे आचरण केलें असतां तें कोणत्या फलाला देणार नाहीं? १९. अशी वाटेल ते फल सर्वतोपरी देण्याची सत्त्वगुणाच्या अंगीं चांगली शक्ति आहे खरी; परंतु ज्या एकानें मोक्षाशीं एकरूप होतां येते ३२०. ते एक साधन निरालेंच आहे आणि त्याचे जेव्हां सत्त्वगुणास [ सात्त्विक कर्मास ] साहाय्य होतें; तेव्हांच मोक्षप्राप्तिरूप गांवांतहि प्रवेश करण्याची योग्यता येते २१. हें पहा! जरी पंधराच्या दराचें [ उत्तम, शंभर नंबरी ] सोनें असलें, तरी जेव्हां त्यास [त्याच्यावर] राजमुद्रेची अक्षरें लाभतात, त्याच्यावर राजशिक्का पडेल, तेव्हांच तें जसें चहूंकडे योग्य किंमतीनें चालतें २२. स्वच्छ, थंड व सुगंध युक्त असें पाण्याचे अनेक प्रकार सुखदायक असतात; पण त्या पाण्यांत पवित्रपणा तीर्थाच्या संबंधानें येतो २३. अन्य नदीचें वा इतर ठिकाणच्या पाण्याला कसलीहि योग्यता असेना का? पण जेव्हां गंगा त्याचा अंगीकार करील तेव्हांच त्याचा समुद्रांत प्रवेश होईल २४. त्याप्रमाणें अर्जुना! सात्त्विक कर्माच्या आचरणानें मोक्षाच्या भेटीला येत असतांना ज्याच्यायोगें मध्यें आडकाठी–प्रतिबंध होत नाहीं, तें वेगळेंच आहे २५. हें देवाचें भाषण ऐकतांच अर्जुनाच्या अंतःकरणांत ऐकण्याची उत्कंठा मावेनाशी झाली व तो म्हणाला कीं, 'देवांनीं कृपा करून असे काय आहे तें सांगावें,' २६. तेव्हां कृपाळुवांचे सार्वभौम राजे श्रीकृष्ण म्हणाले:–जिचें योगानें सात्त्विक [कर्मानुष्ठानास] गुणास ते मोक्षरूपी रत्न हस्तगत होते तें [ त्या ब्रह्म वस्तूचीं लक्षणें ] ऐक. २७.

**अन्वयार्थ**—**ॐ तत्सत्**–'ॐ तत्सत्'–**इति**–असा **ब्रह्मणः**–ब्रह्माचा–**त्रिविधः**–तीन प्रकारचा–**निर्देशः**–निर्देश–**स्मृतः**–सांगितलेला आहे–**तेन**–त्या निर्देशानें–**पुरा**–पूर्वी–**ब्राह्मणाः**–ब्राह्मण–**च वेदाः**–व वेद–**च**–आणि–**यज्ञाः**–यज्ञ–**विहिताः**–निर्माण केलेले आहेत. २३.

तर जें परब्रह्म अनादि असून जें जगताच्या उत्पत्ति, स्थिति–लयादि सर्वांचें विश्रांतिस्थान–अधिष्ठान आहे, त्याचें एकच नांव तीन प्रकारचें आहे २८. खरोखर पाहिलें असतां 'ब्रह्म' हें नाम व जाति एतद्रहित आहे. परंतु अज्ञानरूपी अंधकारांत असणाऱ्या अज्ञानी लोकांनी ब्रह्मास ओळखण्याकरितां श्रुतिमाऊलींनी जी 'खूण' केली, तेंच त्या 'ब्रह्मा'चें नाम होय २९. नुकतेच जन्मास आलेलें मूल आपल्या जन्माबरोबर आपले नांव हे तर घेऊन येत नसतेच; पण तेंच त्याचें नांव ठेवून त्या नांवानें माता, पिता हांक मारूं लागल्यावर तें 'ओ' देत उठतें, हें प्रत्यक्ष आहे ३३०. त्याप्रमाणें संसारांत अनेक कष्ट भोगून भोगून शिणलेलें जीव वेदांकडे जेव्हां आपल्या शिणाचें गाऱ्हाणें सांगण्यास आले, तेव्हां त्या जीवांना वेदांनीं संकेत केलेल्या ज्या नांवानें हांक मारल्यास जे ब्रह्म 'ओ' देत उठते, तोच ब्रह्माचा हा संकेत–'नाम' रूपी खूण होय ३१. ब्रह्माचा व जीवाचा फारा दिवसांचा अबोला [ अबोध ] फिटावा व ऐक्यरूपानें [ अद्वैतपणानें ] त्या ब्रह्माची जीवास भेट व्हावी, याप्रमाणें वेदरूपी बापानें कृपावंत होऊन ब्रह्माचा हा 'नाममंत्र' शोधून काढला. ३२. मग वेदानें सांगितलेल्या ज्या एका नाममंत्रानें ब्रह्मास हांक मारली असतां तें ब्रह्म वृत्तीच्या मागें [ अधिष्ठान, अज्ञात ] असूनहि सहज [ वृत्तीच्या ] पुढें उभें राहतें; [ साक्षात्कारात्मक प्रत्यक्ष ज्ञान होतें ] ३३. परंतु जे वेदरूपी पर्वताच्या शिखरावर असलेल्या उपनिषदांच्या अर्थरूपी नगरांत [ श्रोत्रिय–वेदशास्त्रसंपन्न ] आहेत, जे ब्रह्माच्या एका पंक्तीस [ ब्रह्मनिष्ठ, अनुभूतिसंपन्न ] आहेत त्यासच हे [नाममाहात्म्य] कळते ३४. हेंहि राहूं दे. ब्रह्मदेवामध्यें सृष्टि उत्पन्न करण्याची जी शक्ति आहे, ती ज्या एका नामाच्या आवर्तनानें–उच्चारानेंच त्यास प्राप्त झाली आहे ३५. परंतु हे वीरोत्तमा! सृष्टि उत्पन्न करण्याचे पूर्वी

१ प्राप्त होतें. २ शुद्ध. ३ स्वस्वरूप. ४ दाखविलें असतां. ५ सर्वतोपरी, पाहिजे त्याविषयीं. ६ आहे. ७ निरालेंच. ८ साहाय्य. ९ प्रविष्ट, पोचतां. १० सोनें. ११ राजाचा शिक्का. १२ चालतें. १३ विघ्न, प्रतिबंध. १४ ऐकतांच. १५ मनोव्यथा तळमळ. १६ दयेचा सार्वभौम. १७ विश्रांतिस्थान. १८ नामजातिरहित. १९ खूण. २० अनिर्वाच्यपण. २१ कृपेनें. २२ जो एक मंत्र वेदानें दाखविला त्यानें. २३ वेदरूपी पर्वतशिखरावर. २४ पंक्तीस. २५ अनुष्ठानानें, उच्चारानें. २६ आरंभाच्या आधीं.

होता ॥ ३६ ॥ मज ईश्वरातें नोळखे । ना सृष्टीही करूं न शके । तो थोरु केला एकें । नामें जेणें ॥ ३७ ॥ जयाचा अर्थु जीवीं ध्यातां । जें वर्णत्रयचि जपतां । विश्वसृजनयोग्यता । आली तया ॥ ३८ ॥ तेधवां रचिलें ब्रह्मजेन । तयां वेद दिधलें शासन । यज्ञाऐसें वर्तन । जीविकें केलें ॥ ३९ ॥ पाठीं नेणों किती येर । सृजिले लोक अपार । जाले ब्रह्मदत्त अग्रहार । तिन्हीं भुवनें ॥ ३४० ॥ ऐसें नाममंत्रें जेणें । धातया अंढंच करणें । तयाचें स्वरूप आइक म्हणे । श्रीकांतु तो ॥ ४१ ॥ तरी सर्व मंत्रांचा राजा । तो प्रणवो आदिवर्णु बुझें । आणि तत्कारु जो दुजा । तिजा सत्कारु ॥ ४२ ॥ एवं ॐतत्सदाकारु । ब्रह्मनाम हें त्रिप्रकारु । हे फुल तुरेंबी सुंदरु । उपनिषदाचें ॥ ४३ ॥ येणेंसीं गा होऊनि एक । जैं कर्म चाले सात्त्विक । तैं कैवल्यांतें पाइक । घरींचें करी ॥ ४४ ॥ परी कापुराचें थैंलींव । आणूनि देईल दैव । लेवों जाणणेंचि आडवें । तेथ असे बापा ॥ ४५ ॥ तैसें आदरिजेल सत्कर्म । उच्चरिजेल ब्रह्मनाम । परी नेणिजेल जरी वर्म । विनियोगांचें ॥ ४६ ॥ तरी महंताचिया कोडी । घरा आलियाही वोढी । मानूं नेणतां परवंडी । मुद्दल तुंटे ॥ ४७ ॥ कां ल्यावया चोखंट । टीकें भांगार एकवट । घालूनि बांधिली मोट । गळा जेवीं ॥ ४८ ॥ तैसें तोंडीं ब्रह्मनाम । हातीं तें सात्त्विक कर्म । विनियोगेंवीण काम । विफळ होय ॥ ४९ ॥ अगा अन्न आणि भूक । पासीं असे परी देख । जेऊं नेणतां बालक । लंघनचि कीं ॥ ३५० ॥ का स्नेहसूत्रैं वैश्वानरा । जालियाही संसारा । हातवटी नेणतां वीरा । प्रकाशु नोहे ॥ ५१ ॥ तैसे वेळे कृत्य पावे । तेथिंचा मंत्रुही आठवे । परी व्यर्थ तें आघवें । विनियोगेंवीण ॥ ५२ ॥ म्हणौनि वर्णत्रयात्मक । जे हें परब्रह्मनाम एक । विनियोगु तूं आइक । आतां याचा ॥ ५३ ॥

तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतप: क्रिया: । प्रवर्तन्ते विधानोक्ता: सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥

तरी या नामींचीं अक्षरें तिन्हीं । कर्मा आदिमध्यनिदानीं । प्रयोजांवीं पैं स्थानीं । इहीं तिन्हीं ॥ ५४ ॥ हेंचि एकी हातवटी । घेऊनि हन किरीटी । आलें ब्रह्मविद भेटी । ब्रह्माचिये ॥ ५५ ॥ ब्रह्मेसीं होआवया एकी । ते न वंचती यज्ञादिकीं । जें चावळलें वोळखीं । शास्त्रांचिया ॥ ५६ ॥ तो आदि तंव ओंकारु ।

ब्रह्मदेव एकटाच वेड्यासारखा गोंधळलेला, असा होता ३६. ज्या मज ईश्वरापासून त्याची उत्पत्ति झाली, त्या ईश्वरासहि तो ओळखीत नव्हता अथवा [ सामर्थ्याचे अभावीं ] सृष्टीहि उत्पन्न करूं शकत नव्हता. अशा स्थितींत ज्या एका नांवाच्या उच्चारानें त्यास ती योग्यता देऊन समर्थ केला ३७. ज्या नामाच्या अर्थाचें अंतःकरणांत चिंतन केल्यामुळें व ज्या ब्रह्मबोधक तीन अक्षरांचा जप केल्यामुळें त्या ब्रह्मदेवास सृष्टि उत्पन्न करण्याची योग्यता आली ३८. तेव्हां त्यानें ब्राह्मण लोक निर्माण केले आणि त्यांना आचार धर्माची ' शासन पद्धती 'ची शिकवण देणारे वेद दिले. त्यांचे निर्वाहाकरितां त्यानें त्यांस यज्ञासारखा कर्मरूप धंदा, आचरण करण्यास सांगितला ३९. नंतर त्यानें किती असंख्य अगणित लोक उत्पन्न केले हें कांहीं कळत नाहीं, तिन्हीं भुवनें हीं त्यांस [ त्या लोकांना ] ब्रह्मदेवानें दिलेलें अग्रहार इनामच झाले ३४०. अशा प्रकारें ज्या नाममंत्रानें ब्रह्मदेवास एवढ्या प्रचंड शक्तीनें श्रेष्ठ, समर्थ केलें त्याचे स्वरूपलक्षण तूं ऐक असें तो लक्ष्मीपति श्रीकृष्ण म्हणाला ४१. तर सर्व मंत्रांचा राजा-श्रेष्ठ जो ओंकार तो त्याच्या नामांतील पहिलें, मूळ अक्षर होय असें समजा, आणि ' तत्'कार हे दुसरें अक्षर होय व तिसरें अक्षर 'सत्'कार हे होय ४२. याप्रमाणें ' ॐ तत्सत ' या रूपानें ब्रह्माचें हे नाम तीन प्रकारचे आहे; आणि उपनिषदाचे हे जें नामरूपी सुंदर पुष्प, त्याचा तूं वास घे. [ औपनिषदिक पद्धतीस अनुसरून तूंहि त्याचा चांगला विचार कर ] ४३. या नामाशीं एक होऊन, मिळून जेव्हां सात्त्विक कर्म चालते म्ह० नामविनियोगपूर्वक कर्माचें आचरण केले जाते, तेव्हां तें [ सात्त्विक कर्म ] मोक्षास आपल्या घरचा जणुं काय चाकर करते ४४. परंतु दैवयोगानें जर कापुराचे अलंकार आणून दिले, प्राप्त झाले, तर बाबारे ! ते [ अंगावर ] कसें घालावें, वापरावें, हे समजण्याचीच अडचण असते ४५. तसें सत्कर्माचें आचरण केलें जाईल ब्रह्माच्या नांवाचा उच्चारहि केला जाईल, पण त्याचें विनियोगाचे-व्यवस्थेचे वर्म जर जाणले गेलें नसेल ४६. तर साधुवृंद आपण होऊन घरीं आले असतांहि त्यांचा सन्मान कसा करावा याची पद्धत माहित नसल्यामुळें [ ती न जाणतां ] मान न करितां त्यांच्याशीं अयोग्य रीतीनें वर्तन केलें म्हणजे पुण्याचा क्षय होतो ४७. अथवा सुंदर टीका [ जडावाचे अलंकारविशेष ] व सोन्याचें दागिनें यांची एके ठिकाणीं मोट [गाठोडे] बांधून ती जशी गळ्यांत अडकवावी, बांधावी म्ह० त्याचा सौंदर्यासाठीं कांहींच उपयोग नसतो ४८. तसा तोंडानें ब्रह्माच्या नामाचा उच्चार केला व हातानें सात्त्विक कर्माचें आचरण केलें; तरीपण त्याच्या विनियोगाच्या माहितीविना ते सर्व कर्म व्यर्थ-निष्फळ होते ४९. अरे ! विचार कर, अन्नहि जवळ तयार आहे व भूकहि लागलेली आहे; तरीपण असें पहा कीं, लहान बालकास तें हातानें कसे जेवावे, हे मुळींहि कळत नसल्यामुळें त्यास जसा लंघन-उपवासच घडतो ३५०. अथवा अर्जुना ! तेल, वात व अग्नि हीं एके ठिकाणीं झाली असतांहि जर दिवा कसा लावावा, ही युक्ति माहीत नसेल, तर उजेड करितां येत नाहीं ५१. त्याप्रमाणें उचित पर्वकाळ प्राप्त होऊन व कर्म करण्याचा इच्छापूर्वक प्रसंग प्राप्त झाला, त्या वेळेंचा मंत्रहि जरी आठवला, तरीपण विनियोगाविना, योजनेची हातवटी माहीत नसल्यामुळें ते सर्व योग व्यर्थ होतात ५२. म्हणून तीन अक्षरांचें जें हें एक परब्रह्माचें नांव आहे, त्या ब्रह्मनामाचा आतां कर्माचें ठिकाणीं विनियोग कसा करावा, तें सांगतों तूं ऐक ५३.

**अन्वयार्थ**--**तस्मात्**-म्हणून-**ॐ**-' ओम् '-**इति उदाहृत्य**-असें उच्चारून-**ब्रह्मवादिनां**-वेदवादी ब्राह्मणांच्या-**विधानोक्ताः**-वेदशास्त्रानें सांगितलेल्या-**यज्ञ-दान-तपः-क्रियाः**-यज्ञ, दान व तप या क्रिया-**सततं**-सतत-**प्रवर्तन्ते**-प्रवृत्त होतात २४.

तर या परब्रह्म नामाची जीं तीन अक्षरें आहेत तीं त्या कर्माच्या आरंभीं-आधीं, मध्यें व शेवटीं या तीन ठिकाणीं योजावीं ५४ हें किरीटी ! हीच एक हातवटी घेऊन ब्रह्मवेत्ते ब्रह्माच्या भेटीस [ब्रह्मात्मैक्य साक्षात्कारास] आले आहेत ५५. जें शास्त्राची [ समन्वयपूर्वक ] माहिती करून घेऊन बोलतात, ते ब्रह्माशीं [आपलें] ऐक्य होण्याकरितां, यज्ञादि क्रियांचा त्याग करीत नाहींत ५६. ते

१ जग उत्पन्न करण्याचें सामर्थ्य. २ ब्राह्मण. ३ शासनपद्धति, आचारपद्धति. ४ आचरण. ५ निर्वाहासाठीं. ६ नंतर. ७ इनाम. ८ ब्रह्मदेवाला. ९ अचल, श्रेष्ठ. १० ॐकार. ११ समजा. १२ हुंगी. १३ मोक्षाला. १४ चाकर. १५ अलंकार. १६ अडथळा. १७ व्यवस्थेचें, उपयोगाचें. १८ ओढीनें. १९ अपमान, प्रकार, रीत. २० पुण्याचा क्षय होतो. २१ सुंदर. २२ अलंकार विशेष, टीका. २३ सोनें. २४ तेल, वात व अग्निज्योति. २५ एकच संमेलन, मिलाफ. २६ शेवटीं. २७ योजावी.

ध्यानें करिती गोचरु। पाठीं आणिती उच्चारु। वाचेही तो ॥ ५७ ॥ तेणें ध्यानें प्रकटें। प्रणवोच्चारें स्पष्टें। लागती मग वाटे। क्रियांचिये ॥ ५८ ॥ आंधारीं अभंगु दिवा। आडवीं समर्थु बोळांवा। तैसा प्रणवो जाणावा। कर्मारंभीं ॥ ५९ ॥ उचितदेवोद्देशें। द्रव्यें धर्म्यें आणि बहुवसें। द्विजद्वारां हन हुताशें। यजिती पैं ते ॥ ३६० ॥ आह्वनीयादि वन्ही। निक्षेपरूपीं हवनीं। यजिती पैं विधानीं। फुंडे होउनी ॥ ६१ ॥ किंबहुना नाना याग। निष्पत्तीचे घेउनी अंग। करिती नावडतेया त्याग। उपाधीचा ॥ ६२ ॥ कां न्यायें जोडला पवित्रीं। भूम्यादिकीं स्वतंत्रीं। देशकाळशुद्ध पात्रीं। देती दानें ॥ ६३ ॥ अथवा एकांतरा कृच्छ्रीं। चांद्रायणें मासोपवासीं। शोषोनि गा धातुरांशी। करिती तपें ॥ ६४ ॥ एवं यज्ञदानतपें। जियें गाजती बंधरूपें। तिहींच होय सोपें। मोक्षाचें तयां ॥ ६५ ॥ स्थळीं नांवा जिया दाटिजे''। जळीं तियांचि जेवीं तरिजे। तेवीं बंधेकीं कर्मीं सुटिजे। नामें येणें ॥ ६६ ॥ परी हें असो ऐसिया। या यज्ञदानादि क्रिया। ओंकारें सावायिलिया। प्रवर्तती ॥ ६७ ॥ तिया मोटकिया जेथ फळीं। रिगों पाहाती निहाळीं। प्रयोजिती तिये काळीं। तच्छब्दु तो ॥ ६८ ॥

तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपक्रियाः। दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकाङ्क्षिभिः ॥ २५ ॥

जें सर्वांही जगापरौतें। जें एक सर्वही देखतें। जें तच्छब्दें बोलिजे तें। पैल वस्तु ॥ ६९ ॥ तें सर्वादिकत्वें चित्तीं। तद्रूप ध्यावूनियां सुमती। उच्चारेंही व्यक्ती। आणिती पुढती ॥ ३७० ॥ म्हणती तद्रूपा ब्रह्मा तया। फळेंसीं क्रिया इयां। तेंचि होतु आम्हां भोगावया। कांहींचि नुरो ॥ ७१ ॥ ऐसेनि तदात्मकें ब्रह्में। तेथ उगाणूनि कर्में। आंग झाडिती न ममें। येणें बोलें ॥ ७२ ॥ आतां ओंकारें आदरिलें। तत्कारें समर्पिलें। इया रिती जया आलें। ब्रह्मत्व कर्मा ॥ ७३ ॥ तें कर्म कीर ब्रह्माकारें। जालें तेणेंही न सरे। जे करी तेणेंसी दुसरें। आहे म्हणौनि ॥ ७४ ॥ मीठ आंगें जळीं विरे। परी क्षारता वेगळी उरे। तैसें कर्म ब्रह्माकारें। गमे तें द्वैत ॥ ७५ ॥ आणि दुजें जंव जंव घडे। तंव तंव संसारभय जोडे। हें देवो आपुलेनि तोंडें। बोलती वेद ॥ ७६ ॥ म्हणौनि परत्वें ब्रह्म असे। तें

कर्मांच्या अगोदर तर ध्यानानें ॐकार सिद्ध करतात आणि नंतर वाचेनें 'ओऽम्' असा त्याचा स्पष्ट उच्चार करतात ५७. अशा रीतीनें ध्यानानें ओंकार सिद्ध केल्यावर व नंतर प्रणवोच्चार स्पष्ट केल्यावर मग ते कर्माचें आचरण करण्यास आरंभ करितात ५८. मग अंधारांत केव्हांहि न विझणारा दिवा असावा त्याप्रमाणें, अथवा अरण्यांतून बरोबर पोंचविण्यासाठीं बलवान् सोबती असावा त्याप्रमाणें, कर्मारंभींचा प्रणवोच्चार समजावा [ कर्मारंभींचा ओंकार विनियोग केला असतां ते कर्म निर्विघ्नपणें परिसमाप्त होतें ] ५९. धर्मानें मिळविलेलें पुष्कळ द्रव्य वेदांत सांगितलेल्या देवतेला अर्पण करण्याच्या हेतूनें ब्राह्मणद्वारां अथवा अग्नीच्या मुखानें [द्वारां] यज्ञ करतात ३६०. आहवनीय, गार्हपत्य व दाक्षिण या तीन अग्नींत, हवनीय आज्यादि द्रव्यांनीं तें यथाविधि, विधिनिपुण होऊन हवन करितात ६१. फार काय सांगावें ! ! परंतु अनेक चांगल्या तऱ्हेनें पार पडून यज्ञाच्या निमित्तानें आपणास प्रतिबंधक, अतएव नावडत्या देहाहंकारादि उपाधींचा त्याग करितात ६२. किंवा न्यायानें [ धर्मानें ] मिळविलेलें व पवित्र असें द्रव्य व आपल्या मालकीची भूमि आदिकरून मालमत्तेची मुख्य दानें हीं पवित्र देशकाल पाहून आणि पवित्र पात्र अधिकाऱ्यास देतात ६३. अथवा एकांतरानें, कृच्छ्रानें, चांद्रायणानें अर्थात् व्रतांचें आचरणानें अथवा महिन्याचे महिने केलेल्या उपवासानें शरीरांतील सप्तधातु शोषून [ शरीर शुद्ध करून ] तपाचें आचरण करतात ६४. अशा प्रकारें यज्ञ, दान व तप हीं जीं कर्में बंधरूप म्हणून प्रसिद्ध आहेत खरी; तरीपण त्यांचे आरंभीं प्रणवोच्चार केला असतां त्याच कर्मामुळें त्यास मोक्ष सोपा होतो ६५. नदीच्या कडेस जमीनीवर असलेल्या नावेचे, पाण्यांत लोटतेवेळीं जड ओझें वाटतें, परंतु त्याच नावेच्या योगानें पाण्यावरून चांगलें तरून जातां येतें, त्याप्रमाणें बंधक-संसारांत पाडणारीं अशीं जीं कर्में, त्या कर्माचरणापासूनच या नामाच्या योगानें मनुष्याची सुटका–मुक्तता होतें ६६. परंतु या गोष्टी तशाच राहूं दे. या प्रकारें या यज्ञ, दान वगैरे ज्या क्रिया आहेत, त्या ॐकाराच्या साह्यानें [ मोठ्या योग्यतेस येतात ] केल्या जातात ६७. त्या क्रिया [ ती कर्में ] जेव्हां फळामध्यें कांहींसा प्रवेश करूं पाहत आहेत असें ज्या वेळेस त्यांच्या दृष्टीस पडतें, त्या वेळेस ते 'तत्' शब्दाचा विनियोग करितात. [ म्हणजे 'तत्' शब्दानें बोधित होणारें जें परब्रह्म त्यास फलासह कर्म समर्पण करितात ] ६८.

**अन्वयार्थ—मोक्षकांक्षिभिः**–मोक्षाची इच्छा करणाऱ्या लोकांकडून–**तत् इति**–'तत्' या ब्रह्माच्या नांवाचा उच्चार करून–**फलम् अनभिसंधाय**–फलाची इच्छा न करून–**विविधाः**–नाना प्रकारची–**यज्ञ-तपः-क्रियाः**–यज्ञकर्में–तपश्चर्या–**च दानक्रियाः**–व दानक्रिया–**क्रियन्ते**–केल्या जातात २५.

जें सर्वहि जगाच्या पलिकडे आहे, जें एकटें सर्वांचाहि द्रष्टा–साक्षी आहे, व जें सर्वश्रेष्ठ आहे अशी जी परब्रह्म वस्तु आहे ती 'तत्' या शब्दानें सांगितली जाते ६९. अर्जुना ! तें ब्रह्म सर्वांच्याहि अगोदरचें आहे, असें लक्षांत आणून त्याचे 'तत्' रूपानें चित्तांत ध्यान करून, पुढें तें त्याचा 'तत्' असा उच्चार करून स्पष्टतेस आणतात ३७०. आणि तें असें म्हणतात कीं, 'तत्' स्वरूप जें ब्रह्म, त्यालाच फळांसह या सर्व क्रिया अर्पण असोत. आम्हांस भोगावयास कांहींहि शिल्लक न राहोत ७१. याप्रमाणें 'तत्' स्वरूप ब्रह्मास कर्में अर्पून तीं 'न मम' म्हणजे 'माझी नव्हेत' या शब्दानें अंग झाडून [ आपला व कर्माचा संबंध तोडून ] मोकळे होतात ७२. आतां ॐकाराच्या उच्चारादि विनियोगानें ज्याचा आरंभ केला आहे व 'तत्' या शब्दाच्या उच्चारात्मक विनियोगानें ज्याचे फळ ब्रह्म-स्वरूपीं अर्पण केले आहे आणि अशा रीतीनें ज्या कर्माला ब्रह्मत्व आलें आहे ७३. तें कर्म खरोखर ब्रह्मरूप झालें खरें; तरीपण तेवढ्यानेंच कार्यभाग होत [ संपत ] नाहीं कारण, तें ब्रह्मरूप झालेलें कर्म व तो कर्म करणारा, कर्ता असा तेथें दुजाभाव–भेद शिल्लक रहातो [ त्याचें ब्रह्माशीं ऐक्य होत नाहीं ] म्हणून ७४. मीठ पाण्यांत टाकलें असतां अंगानें विरून जातें, परंतु त्याचा खारटपणा जसा पाण्यापासून वेगळाच उरत असतो, तसें कर्म जरी ब्रह्माकार झालें, तरी असें समजणें [ कर्ता वेगळा उरतो ] तेंच द्वैत भासणें होय ७५. आणि जसें जसें द्वैत उत्पन्न होतें, वाढतें व तसें तसें संसार भयहि अधिकच प्राप्त होत असतें, हे देव स्वतः आपल्या तोंडानें बोलतात, इतकेंच नव्हे तर वेदद्वारांहि तसेंच सांगतात ७६. म्हणून जें

१ प्रत्यक्ष. २ अरण्यांत. ३ सोबती. ४ ॐकार. ५ अग्नींत. ६ आहवनीय, गार्हपत्य व दक्षिणाग्नि हे अग्निहोत्राचे तीन अग्नि. ७ अग्नींत द्यावयाचें तें. ८ दक्ष, प्रवीण. ९ उत्पन्न करून. १० मायेचा, प्रकृतीचा. ११ एक दिवसाआड भोजन करणें. १२ शरीरांतील सर्व धातु. १३ कडेस, जमिनीवर. १४ होडी. १५ जड वाटवास, हालत नाहींत. १६ प्रतिबंधक.

आत्मत्वें परियेंवसे । सच्छब्द या रिणोदोषें । ठेबिला देवें ॥ ७७ ॥ तरी ओंकार तत्कारीं । कर्म केलें जें ब्रह्मशरीरीं । जें प्रशस्तादि बोलवरी । वाखाणिलें ॥ ७८ ॥ प्रशस्तकर्मीं तिये । सच्छब्दा विनियोगु आहे । तोचि आइका होये । तैसा सांगों ॥ ७९ ॥

सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते । प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥

तरी सच्छब्दें येणें । आटूनि असंताचें नाणें । दाविजे अव्यंगेवाणें । सत्तेचें रूप ॥ ३८० ॥ जें सत् तेंचि काळें देशें । होऊं नेणेचि अनारिसे । आपणपां आपण असे । अखंडित ॥ ८१ ॥ हें दिसतें जेतुलें आहे । तें असंतपणें जें नोहे । देखतां रूपीं सोये" । लाभे जयाची ॥ ८२ ॥ तेणेंसीं प्रशस्त तें कर्म । जें जालें सर्वात्मक ब्रह्म । देखिजे करूनि सम । ऐक्यबोधें ॥ ८३ ॥ तरी ओंकार तत्कारें । जें कर्म दाविलें ब्रह्माकारें । तें गिळूनि होइजे एकसरें । सन्मात्रचि ॥ ८४ ॥ ऐसा हा अंतरंगु । सच्छब्दाचा विनियोगु । जाणा म्हणे श्रीरंगु । मी ना म्हणें हो ! ॥ ८५ ॥ ना मीचि जरी हो म्हणें । तरी श्रीरंगीं दुजें हेंचि उणें । म्हणौनि हें बोलणें । देवाचेंचि ॥ ८६ ॥ आतां आणिकीही परी । सच्छब्दु हा अवधारीं । सात्विक कर्मा करी । उपकारु जो ॥ ८७ ॥ तरी सत्कर्में चांगें । चालिलीं अधिकारबगें । परी एकाधें कां आंगें । हिणावती जें ॥ ८८ ॥ तैं उणें एकें अवयवें । शरीर ठाके आघवें । का अंगहीन भांडावें । रथाची गती ॥ ८९ ॥ तैसें एकेचि गुणेंवीण । सताचि परी असतपण । कर्म धरी गा जाण । जिये वेळे ॥ ३९० ॥ तेव्हां ओंकार तत्कारीं । सावायिला हा चांगी परी । सच्छब्दु कर्मा करी । जीर्णोद्धारु ॥ ९१ ॥ तें असंतपण फेडी । आणी सद्भावाचिये रूढी । निजसत्त्वाचिये प्रौढी । सच्छब्दु हा ॥ ९२ ॥ दिव्यौषध जैसें रोगिया । कां सावावो ये भंगलिया । सच्छब्दु कर्मा व्यंगलिया । तैसा जाण ॥ ९३ ॥ अथवा कांहीं प्रमादें । कर्म आपुलिये मर्यादे । चुकोनि पडे निषिद्धे । वाटे हन ॥ ९४ ॥ चालतयाचि मार्गु सांडे । पारखियाचि अखरें पडे । राहाटीमाजीं न घडे । काइ काइ ? ॥ ९५ ॥ म्हणौनि तैसी कर्मा । राभस्यें सांडे सीमा । असाधुत्वाचिया दुर्नामा । येवों पाहे जें ॥ ९६ ॥ तेथ गा हा सच्छब्दु । येरां दोहींपरीस प्रबुद्धु । प्रयोजिला करी साधु । कर्मातें यया ॥ ९७ ॥ लोहा

म्हणून जें ब्रह्म दुसरेपणानें आहे, या भ्रमामुळें परोक्ष वाटत असलेलें [ब्रह्म] तें आत्मत्वानें अनुभवास यावें, हे ऊण, ही उणीव फेडण्याकरितां म्ह. 'सत्' शब्दाच्या ज्ञानानें निरसन करण्याच्या उद्देशानेंच देवांनीं 'सत्' शब्दाची योजना करून ठेविली आहे ७७. तर 'ॐकार' व 'तत्कार' यांच्या विनियोगानें वा उच्चारानें केलेलें जें कर्म तें ब्रह्म स्वरूपच केलेले आहे व ज्या कर्माची 'प्रशस्त कर्म' इत्यादि शब्दांनीं स्तुति केली आहे ७८. त्या प्रशस्त कर्माचें ठिकाणीं 'सत्' शब्दाचा विनियोग कसा करितात, तो ऐकण्याजोगा आहे, तोच आहे तसा सांगतों ऐक ७९.

**अन्वयार्थ**–**सद्भावे**–अस्तित्व या-अर्थी–**च साधुभावे** व सद्वृत्तत्व या अर्थी–**सत् इति एतत्**–'सत्' असें हें पद–**प्रयुज्यते**–योजिलें जातें–**तथा**–त्याप्रमाणें–**पार्थ**–हे पार्थ !–**प्रशस्ते कर्मणि**–विवाहादि प्रशस्त कर्मांमध्यें–**सच्छब्दः**–'सत्' हा शब्द–**युज्यते**–योजला जातो २६.

तर या 'सत्' शब्दानें असद्रूपी मिथ्या नाणे, म्ह. अनात्मपदार्थमात्रास आटून, त्यांचा निरास करून सत्तेचें [अधिष्ठान ब्रह्माचें] व्यंगरहित स्वरूप दृष्टीस दाखविलें जाते ३८०. त्या सत्तेचें 'स्वरूप' देशानें किंवा कालानें बदलणें वा भिन्नरूपास प्राप्त होणें जाणत नाहीं, ती 'सत्ता' आपण आपल्या ठिकाणीं जशीच्या तशीच अखंडित असते ८१. हें जेवढें म्हणून दृश्यमान् [नामरूपात्मक] जगत् दिसत आहे, तेवढे सर्वहि असत् असल्यामुळें तें सत्तेचें [ब्रह्माचे] रूप नाहीं. असें जाणल्यावर ज्या सत्तेच्या स्वरूपाचा आश्रय लाभतो. [आत्मस्वरूपाची] आत्मत्वानें प्राप्ति होते ८२. या सत् शब्दाच्या योगानें सत्वात्मक ब्रह्मरूप झालेलें जें प्रशस्त कर्म त्याचें ब्रह्माशीं ऐक्य करून, ऐक्य ज्ञानानें त्याला आपल्यासह सम-अद्वयस्वरूप पहावें ८३. नंतर ॐकार व तत्कार या दोन शब्दांनीं जें कर्म ब्रह्मस्वरूप-झालें, असें त्याचे मी पूर्वींच वर्णन सांगितले आहे, [मग या सत् शब्दाचा उपयोग काय ? असें म्हणशील] तर कर्म ब्रह्मरूप झालें असाही संस्कार राहूं नये, तो संस्कारहि नाहींसा करून एकदम सामान्य सन्मात्र ब्रह्मच व्हावे, असा सत् शब्दाचा विनियोग आहे ८४. याप्रमाणें हा 'सत्' शब्दाचा अंतरंग विनियोग समजा असें श्रीरंग म्हणाले. [श्री ज्ञानेश म्हणतात;] हें मी म्हणत नाहीं हो ! ८५. किंवा 'असे माझें म्हणणे आहे' असे 'मीच म्हणतों, देव म्हणत नाहींत' असें जर मी म्हटलें असते तर श्रीरंगाहून 'मी वेगळा आहे' असें होऊन त्याच्या स्वरूपांत द्वैतभाव उत्पन्न केल्याचा दोष घडला असतां, हाच उणेपणा होय. म्हणून मी जें बोलत आहें तें सर्व माझें नसून देवाचेंच बोलणें आहे, असें समजा ८६. आतां 'सत्' शब्द हा दुसऱ्या आणखीहि एका तऱ्हेनें सात्त्विक कर्मावर उपकार करितो, तो ऐक ८७. तर सत्कर्में यथाविधि व आपापल्या अधिकारानुरूप उत्तम प्रकारें चाललीं असलीं; तरीपण तीं एखाद्या अंगानें जेव्हां उणावतात, कमी पडतात ८८. शरीराचा एखादा अवयव कमी असला म्हणजे जसे सर्व शरीराचे व्यापार थांबतात किंवा रथाचा एखादा चाक वगैरे भाग कमी झाल्यावर त्या रथाची गति जशीं थांबते ८९. तसें कर्म सत् [उत्तम] खरें; परंतु ज्यावेळीं एखाद्याच गुणाच्या अभावीं तें सत्कर्मच असत्पणास धारण करते ३९०. तेव्हा ॐकार व तत्कार यांच्या उत्तम प्रकारच्या साहाय्यानें युक्त झालेला 'सत्' शब्द हा त्या व्यंग-कर्मांचा जीर्णोद्धार करतो ९१. हा आपल्या [सत्-पणाच्या] तेजाचे बळानें तें कर्माचें 'असत्पण'–व्यंग नाहींसे करतो व त्या कर्मास 'सत्पणा'च्या व्यवहाराच्या योग्यतेस आणतो ९२. दिव्य औषधी मिळाली तर ती जशीं रोग्याला बरें करतें किंवा एखाद्या धैर्य खचलेल्या मनुष्यास साह्य मिळाल्यावर जशी त्यास पुनः धैर्यात्मक दुप्पट शक्ति येते तशी 'सत्' हा शब्द व्यंग झालेल्या कर्माला तसा [त्याचा न्यूनपणा नाहींसा करून पूर्ण करणारा] आहे असे समज ९३. अथवा कांहीं अनवधानानें कर्म आपली मर्यादा सोडून जर निषिद्ध मार्गास पडले ९४. एखाद्या वाटेनें सदा चालणारा मनुष्य आहे तोहि ती वाट चुकतो. परिक्षकाचेंच पदरीं [नजर चुकीनें खोट्या भ्रमानें] अखेर–खोटे पडते; तर [अध्यासात्मक] व्यवहारांमध्यें काय काय घडत नाहीं ! ९५. म्हणून तशी कर्माची अविचारानें वा प्रमादानें मर्यादा सुटते व त्याला जेव्हां निषिद्ध कर्माचें 'वाईट' हे नांव येऊं पहात असतें ९६. तेव्हां [ओम् व तत्] या दोहोंपेक्षां प्रौढ असा जो 'सत्' शब्द आहे त्याची योजना केली असतां हा त्या कर्माला चांगलेपणा किंवा सत्कर्मत्व आणतो ९७. लोखंडाला जसें परिसाचें घर्षण,

१ परीणमते, त्याचा शेवट होतो. २ अगीव भरून काढ-ण्याकरितां, ३ ब्रह्मकार, ब्रह्मरूपी. ४ ऐकण्याजोगा. ५ मिथ्या ६ केवल, निष्कलंक. ७ नित्य, अविनाशी. ८ वेगळें. ९ जेवढें. १० अनित्यपणानें. ११ व्यवस्था, अस्तित्व. १२ टाकून.

परिसाची घृष्टी । वोहळा गंगेची भेटी । कां मृता जैसी वृष्टी । पीयूंषाची ॥ ९८ ॥ पैं असाधुकर्मा तैसा । सच्छब्दुप्रयोगु वीरेशा । हें असो गौरवुचि ऐसा । नामाचा यया ॥९९॥ घेऊनि येथिंचें वर्म । जैं विचारिसी हें नामँ । तैं केवळ हेंचि ब्रह्म । जाणसी तूं ॥ ४०० ॥ पाहें पां ॐतत्सत् ऐसें । हें बोलणें तेथ नेतसे । जेथूनि कां हें प्रकाशे । दृश्यजात ॥ १ ॥ तें तंव निर्विशिष्ट । परब्रह्म चोखंट । तयाचें हें आंतुर्वट । व्यंजक नाम ॥२॥ परी आश्रयो आकाशा । आकाशचि का जैसा । या नामानेंनामी आश्रयो तैसा । अभेदु असे ॥ ३ ॥ उदयिला आकाशीं । रवीचि रवीतें प्रकाशी । हे नामव्यक्ती तैसी । ब्रह्मचि करी ॥ ४॥ म्हणौनि त्र्यक्षरें हें नाम । नव्हे जाण केवळ ब्रह्म । यालागीं कर्म । जें जें कीजे ॥ ५ ॥

यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते । कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥

तें याग अथवा दानें । तपादिकेंही गहनें । तियें निफजतु कां न्यूनें । होऊनि ठातुं ॥ ६ ॥ परी परिसाचा वँरकली । नाहीं चोखाकिंडाची बोली । तैसी ब्रह्मीं अर्पितां केलीं । ब्रह्मचि होती ॥७॥ उणिया पुरियाची परी । नुरेची तेथ अवधारीं । निवडूं न येती सागरीं । जैसिया नदी ॥ ८ ॥ एवं पार्था तुजप्रती । ब्रह्मनामाची हे शक्ती । सांगितली उपपंत्ती । डोळसा गा ॥ ९ ॥ आणि येकेकाही अक्षरा । वेगळवेगळा वीरा । विनियोगुं नागरा । बोलिलों रीती ॥ ४१० ॥ एवं ऐसें सुमहिम । म्हणौनि हें ब्रह्मनाम । आतां जाणितलें कीं सुवर्म । राया तुवां ? ॥११॥ तरी येथूनि येंाचि श्रद्धा । उँपलविली हो सर्वदा । जयाचें जालें बंधो । उरों नेदी ॥ १२ ॥ जिये कर्मी हा प्रयोगु । अनुष्ठिजे सद्विनियोगु । तेथ अनुष्ठिला सांगु । वेदुचि तो ॥ १३ ॥

अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् । असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रद्धात्रयविभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः ॥१७॥

ना सांडूनि हे सोये[२४] । मोडूनि श्रद्धेची बाँहे । दुराग्रहाची त्रौंये । वाढऊनियां ॥ १४ ॥ मग अश्वमेध कोडी[२५] कीजे । रत्नें भरोनि पृथ्वी दीजे । एकांगुष्ठींही तपिजे । तपसाहस्रीं ॥ १५ ॥ जळाशेंयाचेनि नांवें । समुद्रही कीजती नवे । परी किंबहुना आघवें । वृथाचि तें ॥१६॥ खडकावरी वर्षलें । जैसें भस्मीं हवन केलें ।

ओढ्यास जशी गंगेची भेट, अथवा मेलेल्या मनुष्यास जशी अमृताची वृष्टि ९८. तसा; हे वीरेशा ! असत्कर्माला 'सत्' ह्या शब्दाचा प्रयोग, विनियोग होय. हे असो ! या 'सत्' नामाचा महिमाच असा आहे ९९. असे उपर्युक्त सत् शब्दादि ब्रह्मनामाच्या विनीयोगाचे वर्म जाणून घेऊन जेव्हां तूं त्या ब्रह्मनामाचा विचार करशील, तेव्हां नामच तत्त्वतः केवळ ब्रह्म आहे; असे तुला समजेल ४००. हे पहा ! ॐ तत् सत् हीं अक्षरें [ त्यांचा उच्चारपूर्वक विनियोग ] मुमुक्षूस त्या ठिकाणीं नेतात, कीं ज्याचेकडून [ब्रह्माकडून] हे दृश्यरूप संपूर्ण अनात्म पदार्थ प्रकाशिले जातात १. ते परब्रह्म निधर्म, शुद्ध, स्वच्छ असून अपरिछिन्न आहे, तथापि 'ॐतत्सत्' हें त्याचें अंतरंग व त्यास दर्शक, व्यक्त करून जाणविणारे नाम आहे २. परंतु आकाशाला जसा एकमेव आकाशाचाच आश्रय आहे, तसा ॐतत्सत् या अक्षरांना, नामाला ब्रह्माचाच आश्रय आहे. [ कारण, नाम-नामीचा अभेद आहे ] ३. आकाशांत उदय पावलेल्या सूर्याला सूर्यच प्रकाशितो त्याप्रमाणें 'ॐतत्सत्' या नामाचा उच्चार ब्रह्माचा आत्मत्वानें बोध करून ब्रह्मच करते ४. म्हणून हे त्र्यक्षरी 'नाम' हे नांव नसून केवळ ब्रह्मच आहे असें समज आणि एवढ्याचकरितां जें जें कर्म तूं करशील ५.

**अन्वयार्थ**—**च**-आणि-**यज्ञे तपसि च दाने**-यज्ञ, तप व दान कर्मांत-**स्थितिः**-तत्परतेनें राहणें, याला-**सत् इति उच्यते**-'सत' असें म्हणतात-**च एव**-आणि **तदर्थीयं**-त्या यज्ञादिकासाठीं जें-**कर्म**-कर्म तें-**सत्**-सत्कर्म-**इति एव**-असेंच-**अभिधीयते**-म्हटलें जातें २७.

आणि त्या कर्मांमध्यें आरंभींच कांहीं व्यंग उत्पन्न होवो, किंवा ती पूर्ण होवोत किंवा तीं आरंभूनहि अपूर्ण राहोत; मग ती कर्में, यज्ञ असोत, दानें, कठीण, गहन तपें यांपैकीं कोणतीहि असोत ६. पण परिसाच्या कसोटीवर घासून स्पर्शानें झालेल्या सोन्याच्या कसोटींत उत्तम किंवा हिणकस सोने ह्याचीं भाषाहि नसते, त्याप्रमाणें केलेलीं कर्में [ उपर्युक्त रीतीनें ] ब्रह्मार्पण केलीं असतां ब्रह्मरूपच होतात ७. आणि ज्याप्रमाणें समुद्रामध्यें लहान मोठ्या नद्या वेगळेपणानें निवडतां येत नाहींत, त्याप्रमाणें ओऽम्-तत्-सत्' या ब्रह्मनामाच्या विनियोगानें ब्रह्मार्पण अर्थात ब्रह्मरूप झालेल्या त्या कर्मांच्या ठिकाणीं पूर्णापूर्ण [ उत्तम, सांग कर्में किंवा निषिद्ध न्यून कर्में ] असा हा भेद उरत नाहीं असें समज ८. हे ज्ञानवंता अर्जुना ! याप्रमाणें ब्रह्मनामाच्या शक्तीचा विचार तुला दृष्टांतपूर्वक उघड करून सांगितला ९. आणि हे वीरा ! ब्रह्मनामाच्या एकेक अक्षरांचीहि निरनिराळी व्यवस्था योजना [ कर्मांत कोठे व कशी करावी हे ] तुला चांगल्या रीतीनें मी सांगितलें ४१०. याप्रमाणें असें हें ब्रह्मनाम चांगल्या थोरवीनें संपन्न आहे, हे मर्मज्ञ राजा अर्जुना ! तूं हें ब्रह्मनाम जाणलेस काय ? ११. तर या पुढें नेहमीं याच नामावर तुझी श्रद्धा विस्तारलेली असूं दे. कारण, या नामाच्या उचित विनियोगानें झालेलें कर्म जन्ममरणात्मक बंधाला उरूं देत नाहीं १२. ज्या कर्मांत या शब्दांचा उत्तम, सद्विनियोगासह प्रयोग अनुष्ठिला जातो तेथें तें कर्म पूर्ण, सांग वेदाच्या मनोगतानुरूपच अनुष्ठान केलें असें होईल १३.

**अन्वयार्थ** – **यत्**-जें-**अश्रद्धया**-अश्रद्धेनें-**हुतं**-हवन केलेले-**दत्तं**-दान दिलेलें-**तपः तप्तं**-तप केलेलें-**च कृतं**-व केलेलें कर्म-**तत्**-त्याला-**असत् इति**-असत् असें-**उच्यते**-म्हटलें जातें-**पार्थ**-हे पार्थ ! [ **तत्**-तें ] **न प्रेत्य**-मरणानंतर फलाच्या उपयोगी नाहीं-**च**-व-**नो**-**इह**-येथेंहि उपयोगी नाहीं २८.

नाहींतर हा 'नाम मार्ग' सोडून; नामावरील श्रद्धा नाहींशी करून व दुराग्रहाचें बल वाढवून १४. मग कोट्यवधि अश्वमेध यज्ञ केले, सर्व पृथ्वी रत्नांनीं भरून दान दिली, अथवा एका अंगुष्ठावर उभें राहून सहस्रावधि वर्षें तपश्चर्या केली १५. आणि परोपकारार्थ जलाशय तलाव म्हणून गोड्या पाण्याचा नवा समुद्र तयार केला तरी फार काय सांगावें ! तें सर्व व्यर्थच होय १६. जसा खडकावर पाऊस पडावा

---

१ घर्षण. २ ओढयाला. ३ अमृताची. ४ या शब्दाचा विचार करतील. ५ दृष्टिगोचर पदार्थ. ६ अपरिच्छिन्न. ७ सुरेख. ८ अंतर्गत. ९ जाणविणारें. १० नामरहिताला. ११ तीन अक्षरीं. १२ अपूर्ण. १३ राहोत. १४ कसोटींत.

१५ चांगल्या वाईटाची. १६ उपयोग, व्यवस्था. १७ व्यवस्था. १८ चांगल्या. १९ श्रेष्ठ. २० नामाची. २१ विस्तारिली. २२ जन्मबंधास. २३ मार्ग. २४ हात, आश्रय. २५ सत्ता. मर्यादा, प्राबल्य. २६ कोटी. २७ तलाव वगैरेंच्या.

कां खेंवं दिधलें । साउलिये ॥ १७ ॥ नातरी जैसें चडकेणा । गगना हाणितलें अर्जुना । तैसा समारंभु सुना । गेलाचि तो ॥ १८ ॥ घाणां गाळिले गुंडे । तेथ तेल ना पेंडी जोडे । तैसें दरिद्र तेवढें । ठेलेंचि आंगीं ॥ १९ ॥ गांठीं बांधली खापरी । येथ अथवा पैलतीरीं । नँ सरोनि जैसी मारी । उपवासी गा ॥ ४२० ॥ तैसें कर्मजातें तेणें । नाहीं ऐहिकींचें भोगणें । तेथ परत्र तें कवणें । अपेक्षावें ॥ २१ ॥ म्हणौनि ब्रह्मनामश्रद्धा । सांडूनि कीजे जो धांदा । हें असो सिणुं नुसधा । दृष्टादृष्टीं तो ॥ २२ ॥ ऐसें कलुषकरिकेसरी । त्रितापतिमिरतमारी । श्रीवर वीर नरहरी । बोलिलें तेणें ॥ २३ ॥ तेथ निजानंदा बहुवंसा- । माजीं अर्जुन तो सहसा । हरपला चंद्रु जैसा । चांदिणेनि ॥ २४ ॥ अहो संग्रामुं हा वाणियों । मापें नाराचांचिया आणियों । सूनि माप घे मैंवणिया । जीवितेंसी ॥ २५ ॥ ऐसिया समयीं कर्कशें । भोगीजत स्वानंदराज्य कैसें । आजी भाग्योदयो हा नसे । आनी ठाईं ॥ २६ ॥ संजयो म्हणे कौरवराया । गुणा रिझों ये रिपूचिया । आणि गुरुही हा आमुचिया । सुखाचा येथ ॥ २७ ॥ हा न पुसता हे गोठी । तरी देवो कां सोडिते गांठी । तरी कैसेंनि आम्हां भेटी । परमार्थेंसी ! ॥ २८ ॥ होतों अज्ञानाच्या आंधारां । वोसंतीतें जन्मवोंहरा । तों आत्मप्रकाश- मंदिरा- । आंतु आणिलें ॥२९॥ येवढा आम्हां तुम्हां थोरु । केला येणें उपकारु । म्हणौनि हा व्याससहोदरु । गुरुत्वें होय ॥ ४३० ॥ तेवींचि संजयो म्हणे चित्तीं । हा अतिशयो या नृपती । खुंपेल म्हणौनि किती । बोलत असों ॥ ३१ ॥ ऐसी हे बोली सांडिली । मग येरीचि गोठी आदरिली । जे पार्थें कां पुसिली । श्रीकृष्णातें ॥ ३२ ॥ याचें जैसें का करणें । तैसें मीही करीन बोलणें । ऐकिजो ज्ञानदेवो म्हणे । निवृत्तीचा ॥ ४३३ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥ श्लोक २७, ओव्या ४३३.

★

किंवा भस्मांत, राखेंत आहुति देऊन होम करावा अथवा सावलीस आलिंगन द्यावें १७. किंवा अर्जुना! आकाशास चापटीनें मारावें, त्याप्रमाणें हें सर्व 'समारंभ'—कर्मानुष्ठानें फुकट जातात! १८. घाण्यांत जर गोटे घालून गाळले, तर त्यापासून तेल अथवा पेंड यांपैकीं कांहींच प्राप्त होत नाहीं, तसे स्वतःस दारिद्र्य तेवढे राहतेच [तशीच कर्मानुष्ठानाची खटपट व्यर्थ होते] १९. पदरांत बांधून घेतलेली खापरखुंटी, या देशांत अथवा दुसऱ्या देशांत गेलें, तरी जशी ती द्रव्याच्या ऐवजीं [म्ह. पैसा म्हणून] न चालल्यामुळें उपाशी मारते ४२०. तसें श्रद्धाविरहित केलेल्या सर्व कर्मांचें आचरणापासून ऐहिक भोग [भोग्य सुख] मिळत नाहींत, तर मग तेथें परलोकच्या भोग्य सुखाची आशा कशास करावी? २१. म्हणून ब्रह्मनामावरील [किंवा तत्सदृश रामकृष्णादि नामावरील] श्रद्धा सोडून [ब्रह्मार्पण न करितां] जो कर्म खटाटोप करावयाचा तो राहूं दे. त्यांत कांहीं अर्थ नाहीं, तो इहपरलोकीं केवळ शीणच होय २२. असे पातकरूपी हत्तीचा नाश करणारा सिंह, त्रितापरूपी अंधकाराचा नाश करणारा सूर्य जो लक्ष्मीपति व सर्व वीरांमध्यें श्रेष्ठ असे जे श्रीकृष्ण परमात्मा, ते बोलले २३. जसा पौर्णिमेच्या चांदण्यानें चंद्र हारपला, [तद्रूपतेनें झांकला] जातो तसा तेव्हां तो अर्जुन स्वात्मानंदांत एकदम निमग्न, तद्रूप झाला २४. अहो! संग्राम हाच कोणी एक केवळ वाणी असून बाणाचीं टोकें हींच कोणीं त्याचीं मापें होत. तीं घालून तद्द्वारां तो जीवितासह जणुं काय मापच घेतो आहे २५. अशा दुर्घट, कठोर प्रसंगीं अर्जुन आत्मानंदाचे भरांत पूर्णपणें कसा निमग्न झाला आहे ते पहा! म्हणून आज ह्याच्या प्रमाणें दुसऱ्या कोणाचेंहि ठिकाणीं असा भाग्याचा उदय झालेला दिसत नाहीं! २६. संजय म्हणतो—हे कौरवेश्वरा धृतराष्ट्रा! अर्जुन हा शत्रुपक्षाचा आहे खरा; तरीपण त्या शत्रूचे [अर्जुनाचे] या गुणास पाहूनहि मोठा संतोष होत आहे; एवढेच नव्हे तर यावेळीं आमच्या सुखप्राप्तीला अर्जुन हाच येथें गुरुहि [कारण] झाला आहे २७. [जर हा अर्जुन] ही गोष्ट न विचारता, [विचारली नसती] तर देवांनीं आपलें हृदयांतील अध्यात्मज्ञानाच्या गाठोड्याची गांठ कशाला सोडिली असती], तर आम्हांस परमार्थाची भेट तरी कशी झाली असती? २८. अज्ञानरूपी अंधकारांत जन्ममरणांच्या येरझारा करीत पडलों होतों, तों त्यानें आपणांस आत्मप्रकाशरूपी मंदिरांत आणून सोडलें आहे २९. आज अर्जुनानें आम्हांवर व तुम्हांवरहि एवढा मोठा उपकार केला आहे म्हणून आज हा अर्जुन गुरुत्वाच्या नात्यानें जणुं श्रीव्यास सहोदरच, बंधुच आहे ४३०. इतक्यांत संजय आपल्या मनांत म्हणाला कीं, मी जी अर्जुनाची अतिशय स्तुति केली, ती धृतराष्ट्रास सहन होणार नाहीं, तर ती यास वर्मी लागेल म्हणून आपण किती बोलत आहोंत तेव्हां आतां फार बोलूं नये ३१. याप्रमाणें संजयानें [अर्जुन वर्णनाची] ही गोष्ट सोडून, अर्जुनानें श्रीकृष्णास जी दुसरी गोष्ट विचारली होती, तीच गोष्ट सांगण्यास आरंभ केला ३२. संजयानें अर्जुनाचें वर्णन सोडून भगवंतास अर्जुनानें विचारलेली गोष्ट सांगण्यास जसा प्रारंभ केला तसेंच मीहि त्याचें व्याख्यान करीन ते ऐकावें असें श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानदेव म्हणतात ३३.

१ आलिंगन. २ थप्पड. ३ व्यर्थ, शून्य. ४ किंमत न येतां. ५ नुसता शीण. ६ इहपरलोकीं. ७ पातकरूपी हत्तीचा नाश करणारा सिंह. ८ तापत्रयरूप अंधकाराचा नाश करणारा सूर्य. ९ निमग्न झालेला. १० युद्ध. ११ व्यापार. १२ बाणांचीं टोकें हींच मापें. १३ खोंचून. १४ मोजणीस. १५ कठोर. १६ प्रीती उत्पन्न. १७ सारीत. १८ जन्माच्या येरझारा. १९ व्यासाचा भाऊ. २० खोंचेल, सहज होणार नाहीं. २१ गोष्ट.



# अध्याय संगति व सतराव्या अध्यायाचें तात्पर्य

तोचि शास्त्राचा बोळावा । घेवोनि वैरी जिणावा ।
ह्या निरोपु तो सतरावा । अध्याय येथ ।। अ. १८–१४५३

मागील अध्यायांत दैवी आणि आसुरी या उभय संपत्तींचें वर्णन करून मुमुक्षूनें शास्त्राच्या दृष्टीनेंच क्रिया निर्णय करावा, असें सांगून आतां शास्त्रीय कर्मच; पण शास्त्रार्थास न जाणणाऱ्या आणि केवळ आचरण परंपरेला अनुसरून, श्रद्धेनें देवताराधनादि कर्में करणाऱ्या व सात्त्विक आहार, यज्ञ, दान, तप इत्यादिकांचे आचरण करणाऱ्या मुमुक्षूस ज्ञानाधिकार प्राप्त होतो व ज्ञानद्वारां मोक्षहि प्राप्त होतो हें सांगण्यासाठींच हा अध्याय आरंभ करीत आहेत. यज्ञदान तपादिकांचे त्रिगुणानें कसें भेद होतात तें सांगून शेवटीं परमात्मस्वरूपाच्या नामाचें सामर्थ्य व मोक्षफळ सांगून या अध्यायाचा समारोप केला आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराज श्रीगुरुनिवृत्तिनाथांचे 'श्रीगणेशा'च्या रूपकानें वर्णन व नमन करतात. ज्याच्या अज्ञानानें विश्वात्मक आकार विकसित होऊन सत्यरूपानें भासतो व ज्याची 'योगनिद्रा' म्ह. यथार्थ स्वरूपस्थिति ती या विश्वात्मक विकसित मुद्रेस बाधित करते त्या सद्‌गुरुरूपी श्रीगणेशास नमस्कार असो. ज्याच्या स्मरणानें त्रिगुण त्रिपुरांतून, बंधांतून आत्मशंभूनें केलेली मुक्तता, तुजविषयीं जें मूढ आहेत त्यांना तूं वक्रतुंड आहेस, ज्ञान्यांना तर तूं सदा सन्मुख आहेस. सूक्ष्म दृष्टीच्या उघडण्या–झांकण्यांत तूं सृष्टीची उत्पत्ति–प्रलय लीलेनेंच करतोस. तूं ज्यांचा सोयरा होतोस त्याला सर्वत्र आत्मप्रतीति होत असल्यामुळें "सोयरिकेच्या व्यवहारा । मुकेचि तो" तो आपल्याशीं समरस होतो. त्यामुळें आप–परभावच उरत नाहीं. द्वैतभावच उरत नाहीं. तुला पुढें–वृत्तिज्ञानाचा विषय करून, तुझ्या प्राप्तीच्या साधनद्वारां जे धांव घेतात, त्यांना तूं वृत्तीच्या मागे अधिष्ठानरूप असल्यामुळें फार फार दूर राहतोस, देवा ! 'मौन' हें आपले जन्मराशीवरून ठेवलेलें नांव आहे. तेथें "स्तोत्रीं के बांधों हांव" बरें ! जे दृश्यत्वेंकरून तुझें स्वरूप दिसत आहे, ते तर मायिक आहे. मग मी भजन कशाचे करूं ! वात जशी दिव्याच्या संगतीनें दिवाच होते, त्याप्रमाणें हे श्रीगुरुनिवृत्तिराया ! मी आपल्यास नमन करून पूर्णकाम झालों आहे. आपल्या सामर्थ्यानेंच मी गीतार्थ शब्दांकित करण्यास समर्थ झालों असल्यामुळें "आतां आणीन व्यक्ति । गीतार्थु तो" [ १ ते २० ].

सोळाव्या अध्यायाचे शेवटीं भगवंतांनीं असा निश्चयात्मक निर्णय दिला कीं, "ज्यास–आपले खरें हित व्हावे असें वाटत असेल, त्यानें कृत्याकृत्य व्यवस्था जाणून अनुष्ठान करावयाचे असेल तर 'शास्त्रचि एक सर्वथा। प्रमाण तुज" असा शास्त्रोक्त मार्गाचाच अवलंब केला पाहिजे. जो या शास्त्रप्रतिपादित मार्गाचा त्याग करून स्वैर वागतो त्यास सिद्धि, सुख किंवा उत्तम गति, यांपैकीं कांहींच मिळत नाहीं." यावर अर्जुनानें देवापुढें जी शंका उपस्थित केली त्यांतून हा सतरावा अध्याय निर्माण झाला आहे. जो शास्त्रार्थ जाणून तदनुसार वागतो असा एक अधिकारी वर्ग व जो शास्त्रोक्त मार्गाचा परित्याग करून काम–वासनांनीं बद्ध होऊन स्वैर, यथेच्छ भोगविलासानें वागतो असा दुसरा वर्ग. या उभय वर्गांहून आणखी एक तिसरा वर्ग आहे, तो असा कीं, वेदशास्त्राविषयीं आदर आहे, पण शास्त्रार्थ जाणण्यास लागणारी तेवढी बुद्धि नाहीं; अशांना साधनानुष्ठानांत ज्या अडचणी आहेत त्या अशा कीं, शास्त्रानुसार कर्में करावयाची म्हटलें तरी, प्रथत: शास्त्राची परस्परांत एकवाक्यता नाहीं. त्याच्यांत बराच मतभेद व मत–मतान्तरें असल्याची दिसून येतात त्यांचा समन्वय जाणून "एकवाक्यतेच्या फळीं । पैसिजे कैं" ती बुद्धि त्या सर्वांस नसते व मंदप्रज्ञतेमुळें वेद–शास्त्रांतील साधनांचे मुल्य रहस्य मुळांतून सर्वांस कोठून कळणार ? शास्त्राभ्यास करविणारे जे श्रीगुरु त्यांचीहि भेट सहजीं होत नाहीं. बरें ! शास्त्रविध्यनुसार कर्मानुष्ठान करावयाचें म्हटलें तरी ते कर्म निर्विघ्नपणें, अचूक सिद्धीस जाण्यासाठीं 'शास्त्रज्ञान, लागणारी द्रव्यादि आर्थिक सामग्री, शुद्ध देश, योग्य, पवित्र काल, यांची आवश्यकता आहे. या सर्व साधनसामग्रीचा एकत्र योग जुळून येऊन जे कर्म अचूकपणें, पार पडणार हे तर अगदीं क्वचितच घडेल. कारण, कोणतेहि कर्म करावयाचे असले व त्यांत वरील साधनसामग्रींपैकीं उणीव वा कांहींना कांहीं अडचणी येतातच. सर्वांना असा हा योग कोठून साधणार ? असा योग जुळून येणें जवळ जवळ अशक्यच आहे. अशा परिस्थितींत ज्याचें ठिकाणीं श्रद्धा आहे; पण जे मंदप्रज्ञ, अज्ञानी अर्थात् शास्त्राचें ज्यास अज्ञान आहे. त्यांनीं शास्त्रनिपुण

पुरुषाच्या आचारास प्रमाण मानून, त्यांचेवर श्रद्धा ठेवून पूजन-यजनादि धार्मिक कृत्यें केली, कर्मानुष्ठान केले तर सत्त्व-रज-तम यांपैकीं त्यांना कोणती गति मिळते ? यावर आनंदघन भगवान् श्रीकृष्ण आपल्या मुखानें सांगत आहेत [ २१ ते ४८ ].

नुसत्या श्रद्धेच्या बळावर मोक्षपद स्वाधीन करूं पाहतोस; पण हे वाटते तेवढे सोपे नाहीं. कारण, केवळ " श्रद्धा " म्हणून तेवढ्यावरच विसंबून राहून भागत नाहीं. ती श्रद्धा कोणत्या प्रकारची आहे, हे पाहणें अधिक महत्त्वाचें आहे. [ श्रत् हे मुळांत ' सत् 'चे वैदिक स्वरूप आहे. अर्थात् ' सत् 'ला धारण करण्याची जी मनाची शक्ति ती श्रद्धा होय. ' श्रद्धा ' म्हणजे नुसता सामान्य बौद्धिक विश्वास नव्हे. केवल आकलन करण्याची शक्ति नव्हे. वेद व महावाक्योपदेश करणाऱ्या सद्‌गुरूंनीं उपदेशिलेल्या अर्थाविषयीं यथार्थपणें " हा असाच अर्थ आहे " अशी प्रमारूप आस्तिक्य बुद्धि असणें, म्हणजे 'श्रद्धा' होय. ती शास्त्र शुद्ध श्रद्धा असली तरच ज्ञान प्राप्तीची तीव्र इच्छा, ज्ञान व मोक्ष प्राप्त होतो. तामस-राजस श्रद्धेनें केलेली पूजा-अर्चा, कर्म वा परमार्थांतील कोणतेहि साधनानुष्ठान केवल निष्फलच नव्हे; तर अनर्थकरहि होते. म्हणून सात्त्विक म्हणजेच शास्त्रशुद्ध श्रद्धा असावी म्हणजे तिची परिणति साक्षात्कारात्मक ब्रह्मात्मैक्यज्ञानांत होते. ] मुळांत ' श्रद्धे'चें स्वरूप " आंगें कीर चोखडे " शुद्ध चांगले आहे; तरीपण रजोगुणाच्या मिश्रणामुळें किंवा तमोगुणाच्या मिश्रणामुळें त्या श्रद्धेचें स्वरूप कलुषित होत असते. विश्वांतील प्राणिमात्र हे त्रिगुणात्मक अनादि मायेच्या प्रभावामुळें सर्व त्रिगुणात्मकच बनलेलें आहेत. म्हणून प्राण्यांच्या वाट्याला आलेली श्रद्धाहि, या तीन गुणानुरूप होते. या तीन गुणांपैकीं दोन गुण कमी होतात व कोणता तरी एक गुण दुसऱ्या इतर दोन गुणांहून अधिक उत्कर्षास आलेला दिसून येतो. ' श्रद्धा ' ही त्रिगुणात्मक प्रकृति स्वभावानुसार सात्त्विक, राजस, आणि तामस अशी तीन प्रकारची बनत असते. अर्थात् ज्याची जशी श्रद्धा असते तसाच तो बनत असतो. हे सकळ जगडंबर, निखळ श्रद्धेचाच ओतलेला आहे. हर एक मनुष्य श्रद्धामय आहे. सर्व प्राणी सत्त्व-रज-तम या तीन गुणांच्या आधीन असल्याकारणानें श्रद्धेचेहि तीन प्रकार झाले आहेत. ज्या लक्षणांनीं श्रद्धेची तिन्ही रूपें कळून येतात. [ म्हणजे जशी श्रद्धा असेल तशी वृत्ति निर्माण होते व म्हणूनच ज्याच्या त्याच्या श्रद्धेनुरूप होणारी सर्व कर्मेंहि भिन्न भिन्न स्वरूपाची होतात. तसेंच यजन, पूजन, दान, तप इत्यादिकांतहि वैचित्र्य वा विविधता असल्याची दिसून येते. म्हणून श्रद्धेवरच मनुष्याचें जीवनचरित्र किंवा जीवनाविष्कार किंवा सत्त्व-रज-तम या तीन गुणांची वाढ अवलंबून आहे. ' श्रद्धावानासच ज्ञान व परमशांतीचा लाभ होतो. " असे भगवंत सांगतात. श्रद्धाविहीनास प्रमाण संशय, प्रमेयसंशय, मोक्षस्वरूपविषयक संशय, मोक्षसाधनांविषयीं संशय, केवल ' त्वम् ' पदार्थ विषयक संशय इत्यादि अनेकप्रकारच्या संशयांमुळें ब्रह्मात्मैक्य ज्ञान प्राप्त होणे जवळ जवळ अशक्य होऊन बसले आहे. साधकाची वेद, शास्त्र, पुराणें आणि संतवचनें यावर श्रद्धा नसेल तर साधनानुष्ठानांत उपर्युक्त बौद्धिक संशय निर्माण होऊन, निराशा निर्माण होऊन तो आपल्या साधनेपासून च्युत वा भ्रष्ट होण्याची दाट शक्यता आहे. सात्त्विक श्रद्धेच्या प्रकाशांतच जर परमार्थ साधनेची वाटचाल केली, तर श्रवण-मनन निदिध्यासन आणि तत्त्वम् पदार्थ शोधनद्वारां ब्रह्मात्मैक्य ज्ञानप्राप्ति होऊन व कृतार्थ होऊन जीवन सफल होते. हे या प्रसंगीं लक्षांत असावे. ] तो त्रिविध श्रद्धा लक्षणांचा प्रकार ऐक. [ ४९ ते ७५ ]

[ १ ] **सात्त्विक श्रद्धा**:-सात्त्विक श्रद्धा ही मोक्षास साधन आहे. सात्त्विक यज्ञ-दान-तप करण्याची वृत्ति ही या सात्त्विक श्रद्धेमुळेंच होते या सात्त्विक श्रद्धेमुळें यज्ञादि विहित कर्मे करावीत, विद्या संपादन करावी वेद शास्त्राचे अध्ययन करावे, ज्ञान संपादन करावे, सत्संगति करावी, श्रीगुरूंच्या उपदेशानुसार साधनानुष्ठान करावे, अशी वृत्ति निर्माण होत असते. म्हणून त्यास ज्ञानद्वारां मोक्ष प्राप्ति होत असते. [२] **राजस श्रद्धा**:-राजस श्रद्धा ही कर्मे करावीत, सिद्धि व ऐहिक ऐश्वर्य मिळवावे, अशी लोभी वृत्ति निर्माण करते. राजस श्रद्धेचे लोक राक्षसास व यक्षास भजतात; [३] **तामस श्रद्धा**:- तामस श्रद्धा ही आळस व अविवेक निर्माण करते. तामसी लोकांची तामसश्रद्धा परप्राण घात करण्याची वृत्ति निर्माण करते. हे तामसी लोक अर्थात् जारण-मारणानें परप्राणघात करण्यासाठीं भूत-प्रेत-कुळें यांची स्मशानांत संध्याकाळीं पूजा करतात. मुमुक्षूंनीं या तीन श्रद्धांपैकीं राजसश्रद्धा व तामसश्रद्धा, या विरुद्ध श्रद्धांचा त्याग करून फक्त सात्त्विक श्रद्धेचाच स्वीकार करावा. अशी सात्त्विक श्रद्धा, सात्त्विक मति, जतन केली असेल तर " बागुल नोहे तया । कैवल्य ते ". सात्त्विक श्रद्धावान् मंदप्रज्ञ असल्यामुळें श्रीव्यासांचे ब्रह्मसूत्रादि सर्व शास्त्रांचें अध्ययन घडले नाहीं किंवा शास्त्राचे अज्ञान असले, तरी एवढ्यानेंच त्यानें शास्त्राज्ञेचें उल्लंघन केले, असे होत नाहीं किंवा मोक्षहि

दुरावत नाहीं; तर जे ' वडील ' श्रुति-स्मृतीचे अर्थ होऊन म्हणजे आपण स्वतः अर्थरूपता संपादन केल्याने मूर्तिमन्त अर्थस्वरूप होऊन, त्याप्रमाणें आपण अनुष्ठान करून ते अर्थ जगास उदार वृत्तीनें देतात. अशा थोर महात्म्यांच्या आचरणरूपी पात्रलावर पाऊल ठेवून सात्त्विक श्रद्धेनें जो कोणी मुमुक्षु परमार्थाकडे वाटचाल करतो, त्यास, ते तत्त्वज्ञ संत ज्या मोक्षरूपी फळास प्राप्त होतात, तेंच फळ अगदीं ठेवल्यासारखे प्राप्त होते. याप्रकारें आपल्या अधिकारानुरूप ' शास्त्रानुष्ठानकुसरी ' जाणून थोर महात्म्यांच्या आचरणाचा कित्ता गिरविणाराहि तरतो. [ ७६ ते ९२ ]

किंवा शास्त्रार्थ स्वतःस तर कळत नाहींच; पण शास्त्राविषयीं आदरबुद्धि, श्रद्धाहि नसते. अशाहि प्रकारचे कांहीं लोक असतात. ते आपल्या ऐहिक भोगैश्वर्याच्या गर्वानें शास्त्रानुसार वागणाऱ्या पंडितास वेडावून दाखवून त्यांचा तिरस्कार करतात व पाखांड्याच्या मतानुसार वेदबाह्य आचाराचा अंगीकार करतात. शास्त्राच्या वळणाचा धिक्कार करून अविचारानें वागतात. स्वतःस व इतरांस पीडाकारक अशी कर्में करीत असतात. त्यांच्या या घातक कर्मामुळें सर्वांतर्यामी असा जो मी, त्या मलाच दुःखें देतात. विचार केला तर या पाप्यांचें वाणीनें नांवहि उच्चारूं नये; परंतु त्यांचा त्याग करण्याकरितां, त्यांचे स्वरूप कसें आहे, ते समजवून देण्यासाठीं आम्हाला त्याविषयीं बोलावे लागले. म्हणून अर्जुना ! तूं या पाप्यांचा त्याग कर, कदाचित् चुकून तूं या आसुरी लोकास पाहशील तेव्हां माझे स्मरण कर हो ! कारण, त्याविना त्यास इतर कोणतेहि प्रायश्चित चालणार नाहीं. म्हणून सर्वतोपरी एकमेव सात्त्विक श्रद्धाच जतन करावी, ज्यामुळें सात्त्विक वृत्तीचे पोषण होईल. अशीच संगति धरावी व ज्यामुळें सत्त्वगुणाचा उत्कर्ष-वाद होईल असाच सात्त्विक आहार सेवन करावा. कारण, आहाराचा व अंतःकरण वृत्तीचा अतिशय जवळचा संबंध आहे. आपण जसा आहार घ्यावा त्याच प्रकारें देहांतील रक्त मांसादि धातूंचा आकार बनतो व त्या धातूंप्रमाणेंच अंतःकरणाचा स्वभाव बनतो. म्हणून सात्त्विक रस सेवन करून अंतःकरणांतील सत्त्वगुणाची वाढ करून सात्त्विक कर्मेंच आचरावीत म्हणजे [ याशिवाय सत्संगति, इत्यादि दैवीसंपत्तीच्या साह्यानें ] अंतःकरण शुद्धिद्वारां मोक्ष साधनीभूत ज्ञान प्राप्त होण्याचा अधिकार येईल. आतां सात्त्विक, राजस आणि तामस आहारांचे स्वरूप काय तें सांगतों ऐक [ ९३ ते ११९ ].

हर-एक मानवाचा आहार हा ज्याच्या त्याच्या रुचिवर अवलंबून असतो. ती ' रुचि ' ही प्रकृति स्वभावानुसार असणाऱ्या प्रधानगुणावर अवलंबून असते याच कारणास्तव कर्ताभोक्ता जो जीव, तो तीन प्रकारचा होऊन तीन प्रकारचीं कर्में करतो. सत्त्वगुण संपन्न मनुष्यास मधुर रसाची आवड वाढते जे पदार्थ अंगानेंच रसभरित, स्निग्ध व परिपक्व असतात, असाच त्यास आहार आवडतो. सात्त्विक आहार दिसावयास थोडा; पण पूर्णतया तृप्ति देणारा असतो, सात्त्विक आहार मधुर असतो तसा परिणामींहि हितकर असतो; सत्त्वगुणास पोषक असतो. आयुरारोग्यवर्धक असतो. या सात्त्विक आहारामुळें आंत मनांत संतोष-प्रसन्नता लाभते व बाहेर शरीरास आरोग्य लाभते. असा हा उपकारक आहार आहे. रजोगुणी मनुष्यास कडू, अति आंबट, अति खारट, असें पदार्थ आवडतात. कढत पदार्थाच्या वाफेवर लाविली तर ' वातहि ' पेटेल, असें कढत पदार्थ खातो, घावावांचून रुपणारे, झणझणीत असें तिखट खातो, राखेपेक्षां कोरडे खातो, असा रजोगुणी माणूस अन्नाच्या निमित्तानें पोटांत जणुं अग्निच भरतो. त्यास परस्परांच्या स्पर्धेनें एकदम रोग उत्पन्न होतात त्याचे परिणामीं फल म्हणजे बाह्य शरीर रोगी होणें व आंत. मन दुःखी, कष्टी होणें, हे होय. तमोगुणी मनुष्याचा आहार पाहिल्याबरोबर चिळस येते. कुजलेले, उष्टे, खातांना त्यापासून आपले अनहित होईल, असें तो मानीत नाहीं. म्हैस जशी अंबोण खाते तसें तो अन्न खातो. शिळे, अर्धवट शिजलेलें, पार करपून गेलेलें, असें पदार्थ त्यास आवडतात. शुष्क वा सडलेलें अन्न, बाळाच्या हातून चिवडून ' राडी ' करतो व बायका-पोरांसह एका ताटांत बसून गोतांबील करतो. असें भोजन झाले तरच " सुख भोजन ऐसे होय " एव्हवीं तामसी मनुष्य शास्त्रनिषिद्ध, अशा अभक्ष्य भक्षणाविषयीं व अपेयपान करण्याविषयीं, खाण्याची उत्कट हांव वाढवीत असतो. त्या तामस आहाराचा परिणाम म्हणजे तामस आहार सेवन करण्यांत होणाऱ्या यातना, दुःख आणि क्लेश, हा होय. तें दुःख फल त्यास लागलींच भोगावे लागते [ १२० ते १६८ ].

जसा प्राण्यांचा आहार तीन प्रकारचा आहे. तसेंच तें प्रकृतिगुण स्वभावानुसार जीं कर्में करतात तींहि तीन प्रकारचीं आहेत. त्यापैकीं, यज्ञ, दान व तप यांचें तीन तीन प्रकार सांगतों. पहिल्यानूदां यज्ञाचें तीन प्रकार सांगतों. सात्त्विक यज्ञकर्ता आत्महिताकडे नजर ठेवून, वेद विधीनुसार निश्चय करून, तीं कुंडें, मंडप, वेदी इत्यादि साहित्य-सामग्री शास्त्रानुसार अचूक जमवितो. ती अशी की जणुं सर्वालंकार धारण करून साक्षात् यज्ञविद्याच, या यज्ञाच्या-

रूपानें अभिव्यक्त झाली आहे, असा सांगोपांग यज्ञ फळाशेविना व अहंकृतीविना, निगुतीनें निर्माण होतो. तो "सात्त्विक यज्ञ" आहे, असें समज. "राजस यज्ञ" करणारा सात्त्विक मनुष्याप्रमाणेंच यज्ञ करतो असें दिसतें; पण त्याची चित्तवृत्ति त्या यज्ञापासून निर्माण होणाऱ्या फलावर असते. तो म्हणतो कीं, मला स्वर्गफल मिळेल, माझी दिक्षित-याज्ञिक म्हणून जगांत प्रसिद्धि होईल आणि यज्ञहि माझ्या हातून होईल, अशा फलाभिलाषेनें व लौकिक कीर्तीच्या इच्छेनें केला जाणारा यज्ञ 'राजस यज्ञ' होय. 'तामसी–यज्ञ' करणाऱ्या मनुष्याच्या यज्ञाला केवळ 'आग्रहोचि मूळ' आहे. त्याच्या यज्ञास विधीचा धरबंध मुळींच नसतो. म्हणून त्या यज्ञाच्या नांवानें होणारा त्याचा आचार म्हणजे एक "उच्छृंखळ" आचरणच असते. असा जो निव्वळ यज्ञाभास असतो. त्यास "तामस यज्ञ" असें नांव आहे, असें श्रीकृष्ण म्हणाले [ १६९ ते १९९ ].

तसेंच त्रिगुणामुळें तपहि 'त्रिरूप' झाले आहे. प्रथम 'तप' म्हणजे काय त्याचे स्वरूप तुला दाखवूं. त्या तपांतहि पुनः शारीरिक, वाचिक आणि मानसिक, असे तीन प्रकार आहेत. त्यांपैकीं ज्यास पुढे करून तें तप केले जाते, त्यास अनुसरून तीन प्रकार आहेत. देवपूजा, देवाचे अंगण, झाडून, सारवून, रांगोळी घालून, सुशोभित करण्याकरितां त्याचे हात शोभतात. शिवलिंग किंवा विष्णूची प्रतिमा डोळ्यांनीं पाहिल्याबरोबर दंडापरी दंडवत घालतो. वेदशास्त्रसंपन्न व तसेंच सदाचार संपन्न ब्राह्मणांची सेवा करणें, पीडितास, संकटांत सांपडलेल्यास मदत करणें, सकळ तीर्थांमध्यें श्रेष्ठ जी मातापितरें त्यांचीहि शारीरिक सेवा करणें, जो भेटतां क्षणीं संसारासारखें भयंकर दुःख निवृत्त करतो व जो ज्ञानदानीं सकरुण असतो त्या श्रीगुरुला भजतो. भूतमात्रीं ब्रह्मवस्तु जाणून त्यास नमन करतो. ब्रह्मचर्य व्रतानें राहतो व परोपकार तत्पर असतो; अशी देहासक्ति सोडून शरीरानें ही सेवा करणें; यांत देहाचेच प्रधानपण असल्यामुळें त्यास मी 'शारीर-तप" म्हणतों.

आतां वाङ्मय तपाचें स्वरूप सांगतों. ज्या बोलण्यानें श्रोत्याचा 'अविवेक' नाहींसा होतो व श्रोत्यास अनादित्व म्हणजे आत्मस्वरूप पुनः भ्रमनिवृत्तिपूर्वक प्राप्त होते, असें अमृतमधुर, अवीट बोलणें असतें. स्वाध्याय, वेदपठण अथवा भगवन्नाम याची वाचेनें आवर्तनें करणें कीं, ज्यामुळें जणुं वदनीं ब्रह्मशाळाच स्थापन केली आहे, असें वाटतें. असें शिवाचे अगर विष्णूचें नाम वाचेवर राहते 'ते वाग्भव तप जाणावे'. मानस तप म्हणजे ज्यामुळें आत्म-दर्शन होते, ते होय. आत्मलाभ झाल्यावर मन आपल्या सकल्प-विकल्परूप स्वभावास मुकते. मनाचे ठिकाणीं मानस तपामुळें आत्मदर्शनास योग्य अशी शुद्ध भूमिका तयार होत असते अर्थात् विषयवासनारहित मनांत 'भावशुद्धि' आपोआपच असते. वैराग्यादिक साधनांचा शीणभाग जाऊन, मन निःसंदेह व चिरस्थिर होऊन कृतार्थता लाभते, अशी भावशुद्धि लाभते तेव्हां ती स्थिति 'मानस तप' या नावास प्राप्त होते [ १९९ ते २३७ ].

अर्जुना! काया-वाचा-चित्तानें त्रिविधत्वास पावलेलें सामान्य तप तुला सांगितलें. आतां हेच तप; पण तीन गुणांच्या संगतीनें विशेषेंकरून तीन प्रकारचे कसे होते, तेहि सांगतों ऐक. उपर्युक्त तीन प्रकारचे तप; पण आपले यांत परमकल्याण आहे, या पूर्ण श्रद्धेनें, फलाशा सोडून, परिपूर्ण अंतःकरण शुद्धीनें आणि आस्तिक्य बुद्धीनें आचरिलें जाते व ज्यामुळें वासना व देहाहंकार जाऊन मनुष्य मोक्षाचा आधिकारी होतो, त्यास 'सात्त्विक तप' म्हणतात. लोकांत मान प्रतिष्ठा मिळावी, विश्वस्तुतीस पात्र व्हावे, महत्त्वाच्या पांघरुणाखालीं भोग भोगावयास मिळावेत व धन मिळावे, या हेतूनें व मोठ्या कष्टानें जे तप केले जाते व ज्यामुळें दंभ लोभ व अहंकार वाढतो ते 'राजस तप' होय. हे तप करीत असतां अपेक्षित फल प्राप्त होत नाहीं, असें पाहून तो तें तप मध्येंच टाकतो, असें ते शेवटपर्यंत स्थिर राहणारें नसते. असे फलाचे बाबतींत व्यर्थ असते ते 'राजस तप' समजावे. 'तामस तपांत' ते तप करणाऱ्याच्या अंतःकरणांत केवळ मूर्खपणाच वावरत असतो. दुराग्रहानें आपल्यास्वतःच्या शरीरास कष्ट देतात व त्या करण्यांत दुसऱ्यांचा नाश व्हावा, असा त्या तपाचा दुष्ट हेतु असतो कीं, ज्यामुळें दुःख निर्माण होते. ते 'तामस तप' होय [ २३८ ते २६२ ].

कर्मामध्यें जो 'दान' नामक प्रकार आहे. त्यांतहि त्रिगुणामुळें तीन प्रकार झाले आहेत, स्वधर्मानें मिळविलेलें द्रव्य केवळ कर्तव्य म्हणून, योग्य देशीं, योग्य कालीं, दान करणें, याला 'सात्त्विक दान' असे म्हणतात सदाचार संपन्न, वेदाध्ययन केलेल्या पात्र द्विजरत्नास पाहून त्यास द्रव्य देवून, त्यावरील 'स्वसत्ता' पूर्ण काढून घ्यावी. निष्काम बुद्धीनें भूम्यादिक अर्पण करावींत, त्यांच्याकडून प्रत्युपकाराची अपेक्षा ठेवूं नये; एवढेच नव्हे तर दात्यानें त्याची आठवणहि चित्तांत राहूं देऊं नये. यास 'सात्त्विक दान' म्हणतात. यांत दात्याचे अंगीं नम्रता,

निर्लोभता, निरहंकारता व दया हे गुण वाढतात. राजसी मनुष्याचे 'राजस दानां'त सात्त्विक दानाप्रमाणेंच देश, काल, सत्पात्र, तसाच दानभागहि न्यायगत व निर्मळ असतो; पण त्यांत फलाशेची व प्रत्युपकाराची, परत फेडीची इच्छा असते. दान घेणाऱ्याचे हातावर तो आपल्या अशेष गोत्रजांच्या पातकांचे सर्व प्रायश्चित-निमित्त उदक सोडतो पण दान देतो तो 'फक्त एक पैसा'. ते अत्यल्प दानहि तो ब्राह्मण घेऊन गेल्यावर ती हानिच झाली, म्हणून दानाविषयीं मनांत झुरतो, अशा मनोवृत्तीनें दिले जाते ते 'राजस दान' होय. या दानांत दात्याचे अंगीं स्वार्थपरायणता व दंभच दिसून येतो. 'तामस दानां'त योग्य देश, काल व सत्पात्र यांचा पूर्णतया अभावच असतो; उलट चोरून आणलेलें द्रव्य, रात्रीच्या वेळीं, भाट, गारुडी, वेश्या, जुवारी लोक यांना दिले जाते. दैववशात् पर्वकालीं, पुण्यदेशीं, सत्पात्र मागावयास आला तरीहि तो दर्पास चढलेला व भांबावलेला असतो व श्रद्धा वगैरे कांहींच नसते. त्यामुळें त्यांच्या हातून एक कवडीहि सुटत नाहीं. अल्पसे दान देऊन त्याची बोळवण करून त्यास फसवितो. त्यास तिरस्कारपूर्ण वाईट शब्द बोलून अपमान करून त्यास तुच्छतेनें लावून देतो [ २६३ ते ३०७ ].

भवबंधमोचक फक्त एक सात्त्विक कर्म असतांना इतर सदोष राजस व तामस याचे वर्णन कशाला करावे ? अर्जुना ! अशी तूं कल्पना करशील; पण शुद्ध सत्त्वगुणांच्या आड रजतमाचे कवाड-प्रतिबंध आहे, तो नाहींसा करण्याला वाईट म्हणावें काय ? तर नाहीं; म्हणून श्रद्धा, यज्ञ, तप व दान यांचेहि तीन प्रकार सांगितले. कारण, सत्त्वगुण स्पष्ट समजण्यासाठीं तुला रजोगुण व तमोगुण यांचे रूप सांगितलें. शुद्धसत्त्वगुणसंपन्न होऊन शास्त्रविहित कर्म केले तर जीवास लोकविशेषाची प्राप्ति होईल. त्यांत जर एकानें साह्य केले तरच त्यापासून साक्षात् मोक्षाचाहि लाभ होईल. मोक्षाच्या भेटीला, सात्त्विक कर्माला ज्यामुळें "आडकाडी न पडे । ते वेगळे आहे" हे देवाचें बोलणें ऐकून सात्त्विक कर्मास आडकाडी न येऊं देतां मोक्ष फलास मिळवून देणारी 'वेगळी एक' अशी ती गोष्ट तरी कोणती आहे ? ती समजून घेण्याची उत्कंठा अर्जुनाच्या अंतःकरणांत मावेना व तो म्हणाला देवांनीं कृपा करून ती गोष्ट सांगावी. तेव्हां कृपाळु चक्रवर्ति श्रीकृष्ण म्हणाले ज्या एकाचे सात्त्विक कर्मास साह्य मिळाले तर 'मुक्तिरत्न' लाभते तीं वस्तु व तिचें महात्म्य सांगतों ऐक [ ३०८ ते ३२७ ].

"ॐ तत् सत्" हीं जीं परब्रह्माची नांवें आहेत ती नांवें घेऊन सात्त्विक कर्में केली तर मोक्षापर्यंत नेण्याचे सामर्थ्य, कर्मांत आणून ठेवण्याची शक्ति या नामामध्यें आहे. म्हणूनच अशी सात्त्विक बुद्धिपूर्वक केलेली यजन-पूजनादि कर्में कैवल्यांत पर्यवसित होतात. सहज विचार करून पाहिले तर अनादि, निर्गुण ब्रह्माला नांवच नाहीं; असणार कोठून? खरोखर ते परब्रह्म नामरहित, जातीरहित आहे; पण त्याला अविद्यारूपी रात्रींत अचूक ओळखण्यासाठीं श्रुतीनें जी 'खूण' केली आहे. तिलाच 'नाम' असें म्हणतात, म्हणजे परब्रह्मवस्तु अव्यवहार्य कोणत्याहि पदाच्या अभिधावृत्तीस-वाच्यवृत्तीस कधींहि विषय होत नाहीं; पण त्या वस्तूशीं व्यवहार होण्यासाठीं श्रुतीनें 'नाम' निर्देशात्मक खूण केली आहे. संसार दुःखानें शिणलेलें, जीव अतिशय कष्टी होऊन आपली दुःखांची गाऱ्हाणीं सांगण्यासाठीं जेव्हां परमात्म्याकडे येतात, तेव्हां तो त्या जीवास ज्या नावानें 'ओ' देत उठतो, प्रत्यक्षरूपानें भेटतो, तोच हा 'नाम'-रूपी संकेत होय. जीवाचा ब्रह्माशीं असलेला अनादिकालचा अबोला फिटावा व ते ब्रह्म जीवास आत्मत्वानें भेटावें, असा 'नाममंत्र' वेदानें सर्व जीवांची दया मनांत येऊन शोधून काढला. मग त्या वेदानें शोधून दाखविलेल्या नाममंत्रानें कौतुकानें आळविले, तरी वृत्तीच्या पाठीमागे म्हणजे अज्ञात असलेलें परब्रह्म, वृत्तीच्या पुढे उभे राहते म्ह० अपरोक्ष होतें; परंतु उपरिनिर्दिष्ट 'नाममहात्म्य' वेदरूपी पर्वताच्या शिखरावर असणाऱ्या उपनिषदाच्या अर्थरूपी नगरींत राहतात म्हणजे ज्यास वेदाचा शिरोभाग असणाऱ्या उपनिषदाच्या अर्थज्ञानद्वारें संपूर्ण वेदाचे समन्वयपूर्वक तात्पर्यज्ञान आहे, असें 'श्रोत्रिय' असून जे परब्रह्माच्या एका पंक्तीला बसले आहेत म्हणजे ब्रह्मास आत्मत्वानें जाणणारें 'ब्रह्मनिष्ठ' आहेत, त्यांनाच कळेल. हेहि असो साक्षात् ब्रह्मदेवांतहि जी सृष्टि उत्पन्न करण्याची शक्ति आहे ती ज्या एका नामाच्या आवर्तनानेंच आली आहे, अशी त्या परब्रह्माची नामें म्हणजे 'ओम्, तत्, सत्' हीं तीन आहेत. नामाच्या 'विनियोगासह' जेव्हां सात्त्विक कर्म आचरिलें जाते, तेव्हां ते 'कैवल्या'स घरचा चाकर करते. ते नाम कसें घ्यावे याचे मर्ममात्र ज्ञात पाहिजे; नाहींतर विनियोगाच्या हातवटीविना केलेले ते सात्त्विक कर्म निष्फळ होईल. म्हणून तूं तीन प्रकारचे जे हें एक परब्रह्माचें नाम आहे, त्या ब्रह्मनामाचा सात्त्विक कर्मामध्यें कसा विनियोग करावयाचा तो ऐक [ ३२८ ते ३९३ ].

तो असा कीं ते पुरुष कर्माच्या आरंभीं, ध्यानानें 'ओंकार' त्याचा अर्थ वृत्तीवर आरूढ करून सिद्ध

करतात. मग वाचेनें ते 'ओ ऽ म्' असा स्पष्ट उच्चारहि करतात. या ओंकाराच्या साह्यानें यज्ञदानादि क्रिया चालू होतात. त्या क्रिया जेव्हां फळ देण्यास प्रवृत्त होतात, फलोन्मुख होतात, तेव्हां ते पुरुष 'तत्' शब्दाचा विनियोग करतात. अर्थात् 'तत्' शब्दानें बोधित होणारें जें परब्रह्म त्याला, यज्ञ-दान-तपादि क्रिया फळासह आपल्या ठिकाणीं भोगावयास कांहींहि न ठेवतां समर्पण करतात. या रीतानें ओंकाराच्या विनियोगानें कर्मारंभ केला व 'तत्' शब्दाच्या विनियोगानें ते कर्म फळासह ब्रह्मार्पण केले. म्हणून कर्मास ब्रह्मत्व आले. कर्म ब्रह्मरूप झाले; पण तेवढ्यानेंहि पुरते कार्य संपत नाहीं. कारण, "करीतेणेसी दुसरें आहे म्हणौनि," कर्म ब्रह्मार्पण करणारा कर्ता आपल्यास ब्रह्माहून वेगळा समजतो. म्हणून द्वैत भासमान होतें. जसें जसें द्वैत उत्पन्न होत असते. "तंव तंव संसारभय जोडे" म्हणून दुसरेपणानें असलेले परब्रह्म आत्मत्वानें अनुभवास यावे अर्थात् ही उणीव भरून यावी. या उद्देशानें म्हणजे कर्ता ब्रह्मरूप होण्यासाठीं देवानें 'सत्' शब्द ठेवला असून त्याचा कर्माचे शेवटीं विनियोग सांगितला आहे. असें ब्रह्मार्पण केलेल्या कर्मासच 'प्रशस्त कर्म' असें म्हणतात [ ३९४ ते ३७९ ].

'सत्' शब्दानें जेवढे म्हणून साकार जगत् दिसत आहे, ते सर्व असत् मिथ्या आहे, म्हणून त्या यच्चयावत् आकाराचा निरास करून अधिष्ठानरूप निर्दोष सत्तेचे म्हणजे ब्रह्माचे स्वरूप दाखविले जाते. सर्वात्मक ब्रह्म झालेले जें 'प्रशस्त कर्म' त्याचे सत् संज्ञक ब्रह्माशीं ऐक्य करून त्यास आपल्यासह सर्व ब्रह्मच आहे, अशी ऐक्यबोधानें व्यापकानुभूति प्राप्त होते, असा हा 'सत्' शब्दाचा अंतरंग विनियोग आहे, असें श्रीकृष्ण म्हणतात. 'मी ना म्हणे हो!' कारण, 'मी म्हणतो' असें म्हटलें तर श्रीरंगाहून मी वेगळा आहे, असें होऊन त्याच्या 'अद्वय' स्वरूपाला द्वैत उत्पन्न झाल्याचा दोष आहे. तसा 'दुजेपणा' निर्माण करणें हाच 'उणेपणा' आहे.

या 'सत्' शब्दाचा आणखी एक प्रकारें सात्त्विक कर्मावर पर्यायानें जीवावर एक मोठा उपकार आहे. मनुष्य जेव्हां सात्त्विक कर्म करतो. तेव्हां तो आपल्या परीनें ते कर्म अचूकपणें करण्याचा पुरता प्रयत्न करतो; तरीपण त्यांत एखाद्या अंगानें उणेपणा राहणें संभवनीय आहे. तेव्हां हा 'सत्' शब्द आपल्या 'सत्' पणाच्या सामर्थ्यानें कर्माचें 'असत्पण' नाहींसें करून, दोष निवृत्तिपूर्वक त्या कर्मास सत् कर्माच्या, 'सत्पणा'च्या योग्य व्यवहारास आणतो. किंवा मनुष्याकडून अनवधानतेमुळें कर्म आपल्या शास्त्र मर्यादेचे उल्लंघन करून घडणेंहि संभवनीय आहे, कारण, एखादा वाटेनें सदा चालणारा मनुष्यहि वाट चुकतो, परिक्षकाच्या पदरींहि नजर चुकीनें, भ्रमानें खोटें पडते, नव्हे "राहटीं माजी न घडे। काइ काइ?" या न्यायानें जेव्हां कर्म शास्त्र मर्यादा उल्लंघिल्यामुळें 'असाधुत्व' नामास येऊं पाहते, तेव्हां 'सत्' शब्द योजिला तर तो त्या कर्मास सत्कर्मत्व आणतो. या प्रकारें विनियोगाचें वर्म जाणून या ब्रह्मनामाचा विचार करशील तर नाम हेंच केवळ परब्रह्मस्वरूप आहे, असें तुला कळेल. संपूर्ण दृश्यजात ज्याच्या प्रकाशानें प्रकाशित होते त्या निर्विशिष्ट, चोखट, परब्रह्माचें "ओऽम् तत् सत्" हे नाम अंतरंग व व्यंजक असें आहे, व या नाम-नामीचा तत्त्वतः अभेद आहे. शास्त्रशुद्ध श्रद्धेनें 'नामाच्या' विनियोगपूर्वक झालेलें कर्म जन्ममरणरूपी संसार संज्ञक बंधाला उरूं देत नाहीं. कर्मास व कर्म कर्त्यास ब्रह्मरूपता प्राप्त करून देण्याचे सामर्थ्य या परब्रह्म नामांत आहे; पण या नामाची आवश्यकताच काय आहे? अशा दुराग्रहाच्या भरीस पडून या 'नामभक्तियोगा'नुष्ठानाचा मार्ग सोडून कोट्यवधि अश्वमेध केले किंवा रत्नें भरून पृथ्वी दान दिली, तपश्चर्या केली तरी तें सर्व व्यर्थच आहे. अशांना त्या कर्मांनीं ऐहिक भोग मिळत नाहींत, तेथें पारत्रिक भोगाची कोणी अपेक्षा करावी? म्हणून ब्रह्मनामश्रद्धा सोडून केलेला कोणताहि व्यवहार करावयाचा तो राहूं दे. कारण, तो निव्वळ इह-परलोकीं शीणच होय [ ३८० ते ४२२ ].

असें जीवास ब्रह्माची आत्मत्वानें प्राप्ति करून देणाऱ्या 'परब्रह्म' नामाची महती श्रीहरीच्या मुखांतून ऐकतांना अशा युद्धासारख्या कर्कश प्रसंगींहि अर्जुन स्वानंदसाम्राज्यांत वास्तव्य करीत आहे, हे पाहून संजयहि त्या आनंदानें सुखावला व अर्जुनाच्या भाग्याची व उपकाराची जाणीव होऊन बोलूं लागला. आपण अज्ञानाच्या अंधारांत जन्ममरणरूपी अविश्रांत वाट चालत होतो. तो त्यानें आपणाला आत्मप्रकाशरूपी मंदिरांत आणलें आहे. या दृष्टीनें अर्जुनानें तुम्हां आम्हांवर थोर उपकार केला आहे. म्हणून "हा व्यास सहोदरू गुरूत्वें होय." पण ही स्तुति धृतराष्ट्रास आवडणार नाहीं, उलट खुपेल म्हणून त्यानें ती स्तुतीचीं बोलणी आवरती घेतली. मग संजयानें, अर्जुनानें श्रीकृष्णास विचारलेली गोष्ट सांगण्यास आरंभ केला. तेंच मीहि सांगेन, तें श्रोत्यांनीं ऐकावें, असें श्रीनिवृत्तीनाथांचे शिष्य श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात [ ४२३ ते ४३३ ].

[ या संपूर्ण सोळाव्या अध्यायाचा नकाशा क्रमांक १९ पहावा ].

